नागेशभट्ट

कृत

# परिभाषेन्दुशेखराचें

## विस्तृत विवरणासह व प्रक्रियेसह

# मराठी भाषान्तर

अनुवादक व प्रकाशक

रा. ब. नारायण दाजीबा वाडेगांवकर,

एम्. ए., रिटायर्ड डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्, नागपूर.



मुद्रक

म्यानेजर, श्रीराम प्रिंटिंग प्रेस, नागपूर.

१९३६



# अर्पणपत्रिका



कै. परमपूज्य गुरुवर्य महामहोपाध्याय भट्टजीशास्त्री
(जयकृष्णशास्त्री) घाटे.



स्मारं स्मारं गुणगणजुषः शब्दशास्त्रे नदीष्णान्
विद्याम्भोधिप्रतरणकलाकोविदानाहिताग्नीन् ।
निर्वाणाख्यं पदमुपगतान्भट्टजीशास्त्रिवर्यान्
भक्त्या तेषां पदकमलयोरर्प्यते ग्रन्थ एषः ॥

## विद्वद्वर्य प्रो. गोपाळ केशव गर्दे, एम्. ए., वेदान्तशास्त्री व शास्त्रचिन्तामणि



गर्देवंशावतंसः सुविमलधिषणः केशवाचार्यसूनुः
निष्णातः शब्दशास्त्रे गुरुचरणरतो भट्टजीशास्त्रिशिष्यः ।
कीर्तिं तन्वन् गुरूणां फणिपुरमखिलं भूषयन् न्यायवेत्ता
गोपालो भूरिशास्त्रप्रवचनकुशलो राजतेऽयं मनीषी ॥

# प्रस्तावना.

परिभाषेन्दुशेखरनामक ग्रन्थाचा कर्ता नागेश ऊर्फ नागोजीभट्ट हा एक अलौकिक बुद्धिमान् पण्डित इसवी सनाच्या १८ व्या शतकांत होऊन गेला. हा सर्व शास्त्रांत निष्णात असल्यामुळें व याच्या अलौकिक विद्वत्तेमुळें याला तत्कालीन पण्डितलोक सर्वतन्त्रस्वतन्त्र असें संबोधित असत. यानें अनेक शास्त्रांवर बरेच ग्रन्थ लिहिले आहेत मन्त्रशास्त्र, धर्मशास्त्र, अलङ्कारशास्त्र, योगशास्त्र, व्याकरणशास्त्र इत्यादि शास्त्रांवर यानें लिहिलेले अनेक ग्रन्थ उपलब्ध आहेत. त्यांपैकीं कांहीं ग्रन्थ छापले असून इतर ग्रन्थ अजून छापले गेले नाहींत. यानें न्यायशास्त्रावर देखील युक्तिमुक्तावलिनामक ग्रन्थ लिहिला आहे व तसेंच रामायणावर टीका लिहिली आहे. हा विद्वान् पण्डित जरी सर्व शास्त्रांत निष्णात होता तरी व्याकरणशास्त्र हा त्याचा अत्यन्त आवडता विषय होता, व या शास्त्रावर त्यानें अनेक प्रमाणभूत ग्रन्थ लिहिले आहेत, व या ग्रन्थांचें ज्यानें अध्ययन केलें नाहीं तो खरा वैयाकरण नव्हे असें सर्व आधुनिक वैयाकरणांचें मत आहे. भट्टोजी दीक्षितांच्या सिद्धान्तकौमुदीला जें आज अग्रस्थान व विलक्षण महत्व प्राप्त झालें आहे तें नागेशाच्या परिश्रमाचें फल होय असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. सिद्धान्तकौमुदी हा व्याकरणशास्त्रावरील अत्युत्तम ग्रन्थ आहे हें कोणीहि प्राञ्जलपणें कबूल करील. तथापि त्या ग्रन्थावर भट्टोजी दीक्षितांनीं जी प्रौढमनोरमानामक टीका लिहिली त्या टीकेंत आपल्या गुरूच्या—म्हणजे शेषकृष्णाच्या—मतांचें मधून मधून खण्डन केलें असल्यामुळें शेषकृष्णाच्या वंशजांना भट्टोजी दीक्षिताची ही कृति मुळींच पसंत पडली नाहीं व शेषकृष्णाच्या मुलाचा शिष्य प्रसिद्ध जगन्नाथराय पण्डित यानें मनोरमाकुचमर्दिनीनामक ग्रन्थ लिहून भट्टोजी दीक्षितास नालायक ठरविण्याचा प्रयत्न केला. पण नागेशानें आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें आपल्या गुरूच्या पितामहावर केलेला हा हल्ला हाणून पाडला व भट्टोजी दीक्षितांचीं मतेंच भाष्यसम्मत आहेत असें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें. याचा परिणाम असा झाला कीं भट्टोजी दीक्षितापूर्वीं ज्या ग्रन्थाच्या—म्हणजे रामचन्द्रकृत प्रक्रियाकौमुदीच्या—अध्ययनाचा प्रचार होता तो ग्रन्थ व त्या ग्रन्थावर शेषकृष्णानें केलेली प्रक्रियाकौमुदीप्रकाशनामक टीका व तसेंच त्या ग्रन्थावर इतर वैयाकरणांनीं लिहिलेल्या टीका लुप्तप्राय होऊन व्याकरणशास्त्रांत भट्टोजी दीक्षित, नागेश व त्यांचे अनुयायी यांचेच ग्रन्थ प्रमाणभूत मानले जाऊं लागले, व त्याच ग्रन्थांचें अध्ययन अध्यापन सर्वत्र प्रचारांत आलें, व तोच प्रचार अजून अव्याहत चालू आहे. ही क्रान्ति घडवून आणण्याचें श्रेय जरी भट्टोजी दीक्षितांस आहे तरी, वर सांगितल्याप्रमाणें, तें श्रेय पुष्कळ अंशीं नागेशामुळेंच प्राप्त झालें आहे. या बाबतींत नागेशानें जी कामगिरी बजाविली ती भाष्यकाराच्या कामगिरीप्रमाणेंच

होती हें म्हणणें अयथार्थ होणार नाहीं. अनेक वार्तिककारांनीं अष्टाध्यायीवर हल्ला करून जेव्हां ती सदोष आहे असें ठरविण्याचा प्रयत्न केला तेव्हां भाष्यकारांनीं अद्वितीय भाष्य लिहून तो हल्ला हाणून पाडला व अष्टाध्यायीचें महत्व प्रस्थापित केलें. त्याचा परिणाम हा झाला कीं अष्टाध्यायी रचण्यापूर्वी इन्द्रादिकांचीं जीं व्याकरणशास्त्रें प्रसिद्ध होतीं तीं सर्व लुप्तप्राय होऊन अष्टाध्यायीला अग्रस्थान मिळालें व तें अद्यून कायम आहे. जशी भाष्यकारांनीं पाणिनीच्या बाबतींत कामगिरी बजाविली तशीच नागेशानें, वर सांगितल्याप्रमाणें, दीक्षितांच्या बाबतींत कामगिरी बजाविली. ह्या बाबतींत मतभेद आहे हें मी जाणून आहे. पण माझें लिहिणें प्राचीनमतानुसार आहे हें लक्षांत असूं द्यावें.

अशा अलौकिक बुद्धिमान् पुरुषाचें जीवनचरित्र लिहिण्याचीं कांहींच साधनें उपलब्ध नसावीं हें पाहून फार खेद वाटतो. नागेशाचा जन्म कोणत्या सालीं व कोठें झाला, त्याला भाऊबहिणी होत्या काय, त्याचे वडिलास बन्धु होते काय, व त्याचे वडील काय धंदा करीत असत, आणि तसेंच त्याच्या वंशांतील मूळ पुरुषांचें वास्तव्य कोठें होतें व ते काशीस राहण्यास केव्हां आले वगैरे संबंधानें कांहींच माहिती मिळूं शकत नाहीं. नागेशाच्या ग्रन्थांवरुन एवढीच माहिती मिळते कीं काळे या उपनावाच्या महाराष्ट्रब्राह्मणकुलांत त्याचा जन्म झाला असून त्याच्या पित्याचें नाव शिवभट्ट व आईचें नाव सती होतें व श्रृंगवेरपुराधीश राजा रामसिंह हा त्याचा शिष्य असून आश्रयदाता होता श्रृंगवेरपुर हें गांव अलाहबादेच्या उत्तरेस कांहीं मैलांवर असून तें आतां सिंग्रौर या नावानें प्रसिद्ध आहे.

नागेशानें जे ग्रन्थ लिहिले आहेत त्यांपैकीं कांहीं ग्रन्थांत त्यानें आपलें उपनाव काळे असें दिलें असून, इतर ग्रन्थांत उपाध्याय असें आपलें उपनाव दिलें आहे. बृहत्शब्देन्दुशेखरांत तर त्यानें पूर्वार्धाचे अखेरीस आपले उपनाव काळे असें दिलें असून त्याच ग्रन्थाच्या उत्तरार्धाचे अखेरीस उपाध्याय असें आपलें उपनाव दिलें आहे. तथापि नागेशाचें उपनाव वास्तविक काळे असून, उपाध्याय ही पदवी त्याच्या पूर्वजांस त्यांच्या विद्वत्तेमुळें किंवा धंद्यामुळें मिळाली असावी असें वाटतें.

जयपुरचा राजा सवाई जयसिंह ( इ० स० १६८८–१७२८ ) यानें इ० स० १७१४ मध्यें अश्वमेधयज्ञ केला होता. त्या यज्ञाकरितां त्यानें हिंदुस्थानांतील निवडक, प्रसिद्ध, विद्वान पण्डितांना निमन्त्रणपत्रिका पाठविल्या होत्या. ज्यांना अशा पत्रिका पाठविल्या होत्या त्यांपैकीं नागेश हा एक होता. तो यज्ञास गेला नाहीं. मी क्षेत्रसन्यास घेतला आहे व काशीक्षेत्र सोडून कोठेंहि न जाण्याचा मी संकल्प केला असल्यामुळें जयपुरास माझें येणें होऊं शकत नाहीं असें नागेशानें सवाई जयसिंहास उत्तर पाठविलें. सवाई जयसिंहानें नागेशास यज्ञाकरितां मुद्दाम निमन्त्रण पाठविलें होतें त्यावरून हें स्पष्ट होतें कीं नागेश हा महाविद्वान् पण्डित आहे अशी त्याची

त्यावेळीं सर्वत्र ख्याति झाली असली पाहिजे, व एवढी विद्वत्ता संपादन करण्यास व प्रसिद्ध विद्वान् पण्डितांमध्यें गणना करण्यालायक होण्यास, नागेश त्यावेळीं निदान ४० वर्षांचा तरी असला पाहिजे. यावरून नागेशाचा जन्म इ० स० १६७४ चे सुमारास झाला असावा असें अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं.

महामहोपाध्याय पण्डित हरप्रसाद शास्त्री माजी प्रिन्सिपाल, संस्कृत कॉलेज, कलकत्ता, यांनीं बंगाल रायल एशिआटिक सोसायटी येथील ग्रन्थसंग्रहालयांत जीं हस्तलिखित पुस्तकें आहेत त्यांची एक सूचि तयार केली आहे व तिच्यावर एक विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. त्या प्रस्तावनेंत ते असें म्हणतात कीं 'The greatest supporter of Bhatoji Dixit, however, was Nagoji Bhatt, a pupil of Hari Dixit who commented upon all his works and the works of his school He had a long life and lived more than hundred years and died in 1775 on the day when Warren Hasting's life was in jeopardy on account of the Benares revolt." (पहा पान १०८) ही जी माहिती पण्डित मजकुरांनीं दिली आहे ती कोणत्याहि लेखी पुराव्याच्या आधारावर दिली नसून, दन्तकथेच्या आधारावर दिली आहे हें त्यांच्या प्रस्तावनेवरूनच स्पष्ट होतें ( पहा प्रस्तावना पान २५ ). ही दन्तकथा खरी असल्यास नागेशाचें वय मरणकाळीं सुमारें १०० वर्षांचें असलें पाहिजे हें उघड होतें.

काशींत अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं नागेश फार वृद्ध होऊन वारला. त्याच्या वार्धक्यामुळें त्याची कंबर वाकली होती व पाठीचे ठिकाणीं मोठें कुबडें निघालें होतें. त्याचा लेखनव्यवसाय आमरणान्त चालू होता. पाठीस कुबडें निघाल्यामुळें त्याला भिंतीस टेंकून बसतांना फार त्रास होत असे. म्हणून त्यानें भिंतीला एक छिद्र पाडलें होतें व त्या छिद्रांत आपलें कुबडें घालून तो भिंतीला टेंकून बसत असे व आपला लेखनव्यवसाय अव्याहत चालवीत असे. ही आख्यायिका खरी असल्यास तिजवरून देखील हें दिसून येतें कीं नागेश मरणसमयीं फार वृद्ध झाला होता. परंतु याचें उलट महाराष्ट्र ज्ञानकोशांत ( पहा जिल्द १६ 'न' पान ७१ ) असें लिहिलें आहे कीं नागेश आपल्या वयाच्या ६२ वे वर्षीं काशीक्षेत्रीं मरण पावला. या म्हणण्याला देखील कांहीं लेखी पुरावा दिला नसून लोकवार्ता हाच आधार दिला आहे. सारांश नागेशाचा जन्म कधीं झाला व त्याचें देहावसान कधीं झालें हें निश्चितपणें सांगतां येणें फार कठीण आहे.

नदिया येथील विद्यापीठांतील एका ग्रन्थांत नागेशाबद्दल दिलेली माहिती ज्ञानकोषकारांनीं आपल्या ग्रन्थांत नमूद केली आहे. ती अशी आहे कीं नागेश लहानपणीं वेदाध्ययन करून नंतर याज्ञिक शिकला व त्यावर आपला उदरनिर्वाह करूं लागला. परंतु त्याचा निर्वाह नीट होईना म्हणून तो वाईस गेला व तेथील विद्यालयांत पढूं लागला. तेथें त्यानें काव्याचें व इतर ग्रन्थांचें अध्ययन केल्यावर तो

आपल्या वयाच्या ४० वे वर्षी काशीस परत गेला व तेथें त्यानें व्याकरणशास्त्राचें अध्ययन केलें. पुढें त्यानें मन्त्रशास्त्राचा अभ्यास करून ५० वे वर्षी सप्तशतीवर टीका लिहिली व नंतर महाभाष्यावर टीका लिहून व्याकरणशास्त्रावर व इतर शास्त्रांवर त्यानें मोठाले ग्रन्थ लिहिले. या माहितीवरून असें दिसून येतें कीं नागेशानें आपल्या वयाच्या ५० वे वर्षी ग्रन्थरचना करण्यास सुरुवात केली व १२ वर्षांत सर्व ग्रन्थ लिहून तो ६२ वे वर्षी मरण पावला. परंतु त्यानें अनेक शास्त्रांवर जे मोठमोठे ग्रन्थ लिहिले आहेत ते सर्व ग्रन्थ तो १२ वर्षांत लिहूं शकला हें मानणें अगदीं असंभवनीय दिसतें. पठनपाठनादि सर्व व्यवसाय संभाळून एवढी प्रचण्ड ग्रन्थरचना करण्याकरितां नागेशास निदान २५ वर्षें तरी लागलीं असलीं पाहिजेत. म्हणून नागेशाबद्दल ज्ञानकोषकारांनीं जी माहिती दिली आहे ती विश्वसनीय मानतां येत नाहीं.

नागेशाबद्दल अशी आख्यायिका आहे कीं तो सोळा वर्षांचा होईपर्यंत त्याचें विद्याभ्यासाकडे मुळींच लक्ष नव्हतें. त्यानें आपल्या आयुष्याचा हा काळ मल्लविद्या संपादन करण्यांतच घातला होता. आखाड्यांत जावें, कसरत करावी, कुस्ती लढावी व दिवसभर काशीक्षेत्रांत व्यर्थ इकडे तिकडे फिरत असावें अशी त्याची सोळा वर्षांचा होईपर्यंत उनाड मुलासारखी दिनचर्या होती. एकदां काशींत पण्डितांची सभा चालू असतां, नागेश उन्मत्तपणें त्या सभेंत शिरून अग्रस्थानीं जाऊन बसला. सभेंत हजर असलेल्या पण्डितांनीं त्याच्या या उन्मत्त आचरणाबद्दल त्याला बरेंच वाक्ताडन केलें व सभेंतून हाकलून दिलें. त्यामुळ नागेशास फार वाईट वाटलें व त्यानें भरसभेंत सर्व पण्डितांच्या समोर अशी प्रतिज्ञा केली कीं मी विद्या संपादन करून पण्डिताग्रणी होईन. असें म्हणून तो सभेंतून निघून गेला व त्या दिवसापासून त्यानें मनोभावें करून वाग्देवीची उपासना करण्यास प्रारंभ केला. भट्टोजी दीक्षितांचे पौत्र व त्या काळीं प्रसिद्ध विद्वान् म्हणून नावाजलेले पण्डित हर दीक्षित यांचे जवळ त्यानें व्याकरणशास्त्र शिकण्यास सुरुवात केली, व त्या शास्त्राचें अध्ययन त्यांचेजवळ संपवून तो त्या शास्त्रांत अत्यंत निष्णात झाला. यानंतर त्यानें व्याकरणशास्त्रावर अनेक ग्रन्थ रचले व त्या सर्व ग्रन्थांचें पठन पाठन आजकाल सर्वत्र चालू आहे व ते सर्व ग्रन्थ व्याकरणशास्त्रांत प्रमाणभूत मानले जातात. व्याकरणशास्त्राचें खरें रहस्य जाणण्यास ते ग्रन्थ अत्यंत उपयोगी आहेत असें सर्व आधुनिक वैयाकरणांचें मत आहे. सर्वत्र अशी देखील आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं ज्याप्रमाणें नागेशानें आपला आश्रयदाता प्रसिद्ध राजा रामसिंह याच्या नावानें रामायणावर टीका लिहिली त्याचप्रमाणें त्यानें आपल्या गुरूच्या—म्हणजे हर दीक्षितांच्या— नांवानें भट्टोजी दीक्षितकृत प्रौढमनोरमेवर शब्दरत्न नांवाची प्रसिद्ध टीका लिहिली. ही टीका खरोखरच नागेशानें लिहिली किंवा हर दीक्षितांनीं लिहिली हें निश्चितपणें सांगतां येणें फार कठीण आहे. तथापि लोकवार्ता अशीच आहे कीं ही टीका नागेशानेंच कृतज्ञताबुद्धिपूर्वक आपले गुरूच्या नांवानें लिहिली. प्रसिद्ध शार्मण्यदेशीय पण्डित ऑफ्रेक्ट यानें जी संस्कृत ग्रन्थांची मोठी सूचि बरेंच

दिवसांपूर्वी तयार केली आहे तींत देखील रामायणावरील टीका व शब्दरत्न हे ग्रन्थ नागेशकृत आहेत असें म्हटलें आहे, व त्या सूचींत त्यानें नागेशकृत सर्व ग्रन्थांची यादी दिली आहे. ती बरीच मोठी असल्यामुळें येथें विस्तारभयास्तव देतां येत नाहीं. तथापि निर्णयसागर छापखान्यांत जें महाभाष्य छापलें आहे त्यांत दिलेल्या प्रस्तावनेंत त्या सर्व ग्रन्थांची यादी दिली आहे व वाटल्यास ती तेथें पाहावी. नागेशानें जसें व्याकरणशास्त्राचें अध्ययन केलें होतें त्याचप्रमाणें त्यानें इतर शास्त्रांचें देखील अध्ययन केलें होतें. हीं इतर शास्त्रें तो हरदीक्षिताजवळच शिकला किंवा इतर विद्वान् पण्डितांजवळ शिकला हें जाणण्यास कोणतेंच साधन उपलब्ध नाहीं, तथापि त्याच्या ग्रन्थावरून असें दिसून येतें कीं तो न्यायशास्त्र रामरामभट्टाचार्यनामक वङ्गदेशीय प्रसिद्ध न्यायशास्त्र्याजवळ शिकला होता; कारण 'अधीत्य फणिभाष्याब्धिं सुधीन्द्रहरिदीक्षितात् । न्यायतन्त्रं रामरामाद्वादिरक्षोघ्नरामतः ॥' असें त्यानें बृहत्शब्देन्दुशेखरांत व मञ्जूषेंत म्हटलें आहे.

इ० स० १६५७ सालीं देवरुखे ब्राह्मण पाङ्क्त व शरीरसंबंधार्ह आहेत कीं काय या प्रश्नाचा निर्णय करण्याकरितां काशी क्षेत्रांत विद्वान् पण्डितांची सभा भरली होती व त्या सभेनें देवरुखे ब्राह्मणांतर्फे लेखी निकाल दिला. त्या लेखी निकालावर रामरामभट्टाचार्यांची सही आहे. या निकालाची नकल श्री० रा. स. पिंपुटकर यांनीं चितळेभट्टप्रकरण या ग्रन्थांत छापली आहे. हाच रामरामभट्टाचार्य नागेशाचा गुरु असावा.

नागेशाला राजा रामसिंहाचा आश्रय मिळेपर्यंत तो विपन्नावस्थेंतच होता असें दिसून येतें. जेथें सरस्वतीचा वास आहे तेथें लक्ष्मी ढुंकून देखील पाहत नाहीं असा त्याकाळीं सामान्य नियम असे, व नागेश त्या नियमास अपवाद नव्हता. त्याची गरीबीची स्थिति असल्यामुळें, त्याची पत्नी त्याला नेहमीं द्रव्यार्जन व कीर्तिसंपादन करण्याकरितां परदेशांत जाण्याबद्दल आग्रह करीत असे. पण तो तिच्या म्हणण्याकडे नेहमीं दुर्लक्ष करीत असे पठनपाठनांत व विद्यानन्दांत नेहमीं निमग्न असणाऱ्या व काशीसारख्या पुण्यक्षेत्रांत राहणाऱ्या त्या धर्मशील व विद्वान् पुरुषास द्रव्य किंवा कीर्ति संपादन करण्याची मुळींच हाव नव्हती. पण स्त्रीच्या अत्यन्त आग्रहास्तव त्याला एकदां तिचें म्हणणें मानणें भाग पडलें, व तो परदेशास जाण्याचा निश्चय करून गंगातीरावर येऊन दाखल झाला व नावाड्यास म्हणाला कीं माझेजवळ तुला देण्याकरितां पैसे नसल्यामुळें तूं मला पैलतीरावर फुकट पोहचवून दे. नावाडी त्याला नावेवर फुकट घेऊन जाण्यास तयार नव्हता. तेव्हां त्यानें नावाड्याला म्हटलें कीं मी काशींतील विद्वान् ब्राह्मण असल्यामुळें तूं मजजवळून पैसा न घेतां मला गंगापार करून दिलें पाहिजे. यावर नावाडी नागेशास उन्मत्तपणें म्हणाला कीं तूं कोण असा मोठा विद्वान् पण्डित आहेस कीं

आम्ही तुला पैलतीरावर फुकट घेऊन जावें. काशी क्षेत्रांत खरा विद्वान् पण्डित एक नागोजीभट्ट आहे. तसा पण्डित नावेवर बसण्याकरितां आल्यास आम्ही त्याला नावेवर फुकट घेऊन जाऊं शकतो. तुझ्यासारख्या ब्राह्मणास आम्ही फुकट नेणार नाहीं. नावाड्याचें हें भाषण ऐकून नागेश कांहीं उत्तर न देतां मुकाट्यानें घरीं परत गेला व झालेला सर्व वृत्तान्त त्यानें आपल्या पत्नीस कळविला व तो म्हणाला कीं काशींतील आबालवृद्धांस ज्याचें नांव माहीत आहे व काशीसारख्या ठिकाणीं ज्याची कीर्ति सर्वत्र पसरली आहे त्याला कीर्ति संपादन करण्याकरितां परदेशांत जाण्याची कांहींच गरज नाहीं. द्रव्याची अडचण आहे खरी, तथापि काशीसारख्या पुण्यक्षेत्रांत राहून व नित्य गंगास्नान करून विश्वेश्वर जें देईल तेवढ्यांतच सन्तोष मानून आपण कसा तरी आपला संसार चालवूं. एखादा पुरुष प्रसिद्धीस आला म्हणजे त्याच्या संबंधानें अनेक आख्यायिका लोकांत प्रचलित होत असतात. त्यांपैकीं खऱ्या कोणत्या व खोट्या कोणत्या हें निश्चितपणें ठरविणें फार कठीण जातें. म्हणून वर दिलेली ही आख्यायिका खरी आहे किंवा नाहीं हें सांगणें फार कठीण आहे. एवढें मात्र खरें कीं रामराजाचा आश्रय मिळेपर्यंत नागेशाची साम्पत्तिक स्थिति विशेष चांगली नव्हती, व त्याच्या अलौकिक विद्येच्या बलावर त्याला राजाश्रय मिळाल्यावरच त्याची साम्पत्तिक स्थिति सुधारली, व ज्या रामराजानें नागेशाला आश्रय दिला तो त्याचा शिष्य झाला हें रामायणाच्या टीकेंत आरंभीं जे श्लोक दिले आहेत त्यावरून स्पष्ट होतें. त्यांपैकीं एका श्लोकांत रामसिंहानें स्वतःला ' भट्टनागेशशिष्येण ' असें म्हटलें आहे.

नागेशानें मञ्जूषाग्रन्थांत असें म्हटलें आहे कीं ' शब्देन्दुशेखरं पुत्रं मञ्जूषां चैव कन्यकाम् । स्वमतौ स्वयमुत्पाद्य शिवयोरर्पितौ मया ॥.' असा श्लोक नागेशानें आपल्या ग्रन्थांत लिहिला असल्यामुळें, कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं नागेशास सन्तति नव्हती, पण या म्हणण्यांत विशेष तथ्य नाहीं. नागेशाच्या काळांत काशींतील विद्वान् पण्डितांत अशी प्रथाच पडली होती कीं स्वतः लिहिलेल्या ग्रन्थांपैकीं एक ग्रन्थ कन्या मानून व दुसरा ग्रन्थ पुत्र मानून दोन्ही कन्यापुत्ररूपी ग्रन्थ विश्वेश्वरास अर्पण करावे. पण एवढ्यावरून हें सिद्ध होत नाहीं कीं ज्या पण्डितांनीं अशा रीतीनें विश्वेश्वरास ग्रन्थ समर्पण केले त्यांना सन्तति नव्हती. नागेशसमकालीन महादेवभट्ट पुणताम्बकर या प्रसिद्ध नैयायिकानें न्यायशास्त्रावर कांहीं ग्रन्थ लिहिले होते. त्याला पुत्र असून कांहीं कन्याहि होत्या. असें असून देखील त्यानें स्वतः लिहिलेल्या ग्रन्थांपैकीं प्रकाशकौस्तुभनामक ग्रन्थ पुत्र मानून व सर्वोपकारिणीनामक ग्रन्थ कन्या मानून दोन्ही ग्रन्थ विश्वेश्वरास अर्पण केले हें त्याच्या घरीं असलेल्या त्याच्या ग्रन्थांवरून स्पष्ट होतें. सारांश एखाद्या ग्रन्थकारानें अनेक ग्रन्थ लिहून त्यांपैकीं दोन ग्रन्थ विश्वेश्वरास कन्यापुत्ररूपानें अर्पण केल्यानें त्याला सन्तति नव्हती हें म्हणणें साहस होय. काशीस जी माहिती उपलब्ध झाली तीवरून असें दिसतें कीं नागेशास एक कन्या

होती व नागेशानें आपलें स्वतःचें राहण्याचें घर तिच्या नांवें दानपत्र लिहून तिला बक्षीस दिलें. हें घर तीन मजली असून दगडानें बांधलें आहे व सिद्धेश्वरी मोहल्यांत अझून कायम आहे. त्या घरांत नागेशाच्या मुलीचे वंशज–म्हणजे देव घराण्यांतील मंडळी–राहत असतात. नागेशानें स्वतःचें घर आपल्या मुलीस बक्षीस दिलें यावरून हें मात्र दिसून येतें कीं त्याला पुत्र नव्हते. त्याला पुत्र असते तर त्यानें आपलें घर मुलीला बक्षीस करून दिलें नसतें.

नागेशाचें उपनाव काळे होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हें उपनाव देशस्थ, कोकणस्थ व कऱ्हाडे ब्राह्मणांत सांपडतें व तसेंच यजुर्वेदी ब्राह्मणांत देखील सापडतें. तथापि वर उल्लेखिलेलें देव घराणें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचें असल्यामुळें–म्हणजे नागेशानीं आपली कन्या देशस्थ ब्राह्मणास दिली असल्यामुळें–हें स्पष्ट होतें कीं नागेश हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होता.

प्रसिद्ध विद्वान् वैजनाथ पायगुंडे हा नागेशाचा पट्टशिष्य होता व त्यानें देखील नागेशाप्रमाणें अनेक शास्त्रांवर ग्रन्थ लिहिले आहेत व नागेशाच्या कित्येक ग्रन्थांवर टीका लिहिली आहे.

नागेशासंबंधानें जेवढी माहिती मिळूं शकली तेवढी वर ग्रथित केली आहे. दुर्दैवानें जास्त माहिती न मिळूं शकल्यामुळें, नागेशाच्या जीवनचरित्रासंबंधानें जास्त कांहीं लिहितां येत नाहीं, व त्या थोर विद्वान् पुरुषास अनेक साष्टांग प्रणिपात करून त्याचें जीवनचरित्र संपवितो.

माझें संस्कृताचें ज्ञान व विशेषतः व्याकरणशास्त्राचें ज्ञान अगदीं थोडें असून देखील परिभाषेन्दुशेखरासारख्या व्याकरणशास्त्रावरील कठीण ग्रन्थाचें भाषान्तर व विवरण करण्याचें साहस मी कां केलें आहे याबद्दल येथें उल्लेख करणें जरूर वाटतें. सिद्धान्तकौमुदींत मधून मधून कित्येक परिभाषा दिल्या असल्यामुळें परिभाषांचें आपल्यास ज्ञान व्हावें म्हणून मी श्री. गोपाळ केशव गर्दे एम्. ए. माजी प्रोफेसर हिस्लॉप कॉलेज, नागपूर यांना मला परिभाषेन्दुशेखर ग्रन्थ समजवून देण्याबद्दल विनन्ति केली व त्यांनीं ती मोठ्या आनंदानें मान्य केली. परंतु त्यांनीं अशी अट घातली कीं मी परिभाषेन्दुशेखराचें सरळ भाषेंत मराठी भाषान्तर करावें व त्या ग्रन्थांतील प्रत्येक कठीण पंक्तीच्या अर्थाचें अशा रीतीनें विवेचन करावें कीं ज्यानें सिद्धान्तकौमुदी वाचली आहे त्याला भाषान्तराच्या सहायानें परिभाषेन्दुशेखर ग्रन्थ समजण्यांत अडचण न यावी. ‘आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया’ या उक्तीप्रमाणें मला त्यांची आज्ञा मानणें भाग पडलें, व सम्पूर्ण ग्रन्थाचें वाचन झाल्यावर मी भाषान्तर करण्यास प्रारंभ केला. वार्धक्यामुळें माझ्या हातास फार कंप सुटला आहे व मला लिहिणें अशक्यप्राय झालें आहे. म्हणून मी श्री० वि. क. पेशवे एम्. ए. यांना विनन्ति केली कीं मी ग्रन्थाचें भाषान्तर सांगत जाईन व त्याप्रमाणें तुम्ही

भाषान्तर लिहीत जावें. त्यांनीं माझ्या विनन्तीस मान देऊन मी जसें भाषान्तर त्यांना सांगत गेलो तसें त्यांनीं समग्र भाषान्तर लिहून काढलें. त्यावेळीं माझ्याजवळ फक्त भैरवी टीकाच होती. पण पुढें विजयाटीका व अखेर अखेर सुप्रसिद्ध भूति-टीका माझें पाहण्यांत आल्यावर, मला बऱ्याच परिभाषा पुन्हा लिहून काढाव्या लागल्या व हें पुनर्लेखनाचें काम माझ्या जेष्ठ चिरंजीवानें केलें, व तसेंच प्रूफ तपासण्याचें सर्व काम त्यानेंच केलें. वरील टीकाकारांचा मी फार ऋणी आहे.

ज्या थोर सद्‌गृहस्थाजवळ मी सिद्धान्तकौमुदी, परिभाषेन्दुशेखर, मुक्तावलि, तर्कपाद इत्यादि ग्रन्थांचें अध्ययन केलें त्यांच्या विद्वत्तेबद्दल प्रान्तांत जशी माहिती असावी तशी नसल्यामुळें त्यांचें संक्षिप्त चारित्र मी येथें देत आहे. श्री. गोपाळराव गर्दे यांचा जन्म ४–१–१८७२ इ. रोजीं सागरास भैयाजी रिंगे यांचे घरीं झाला. त्यांच्या वडिलांचें नाव केशवभट्ट असून मातुश्रीचें नाव रमाबाई होतें. केशवभट्ट याज्ञिक व पुराणिक होते, व याज्ञिकी करून ते आपला संसार चालवीत असत. त्यांना पुराण सांगून जी द्रव्यप्राप्ति होत असे ती ते संसारांत खर्च न करितां, दानधर्मांत व ब्राह्मणभोजनांत ते त्या द्रव्याचा विनियोग करीत असत. त्यांना दोन मुली व पांच पुत्र होते. मुलांमध्यें गोपाळराव तिसरे होत. रा० गोपाळरावांचा मॅट्रिकपर्यंत अभ्यास सागर हायस्कुलांत झाला व ते त्या शाळेंतून मॅट्रिकची परिक्षा इ० स० १८८७ त पास झाले. सागरास कॉलेज नसल्यामुळें त्यांना जबलपुरास जावें लागलें. जबलपुरास ते कै० प्रो० दिनकरराव जठार यांचे वडील रा० धुंडिराजपंत जठार यांचे घरीं राहत असत जबलपुर कॉलेजांतून ते बी. ए. ची परिक्षा १८९१ मध्यें पास झाले. त्या परिक्षेकरितां त्यांनीं गणित, फिजिक्स व केमिस्ट्री हे विषय घेतले होते. त्यांची गरीबीची स्थिति असल्यामुळें त्यांनीं बी. ए. ची परीक्षा पास झाल्याबरोबर हितकारिणी हायस्कूल जबलपुरमध्यें शिक्षकाची नौकरी पत्करली व त्या शाळेंत ते मॅट्रिक वर्गाला गणित व संस्कृत हे विषय शिकवीत असत. त्या काळांत त्यांना नायब तहसिलदारीची जागा सहज मिळूं शकली असती व त्यांनीं ती नौकरी पत्करली असती तर ते अवश्य मोठ्या हुद्यावर चढले असते व सेवानिवृत्त झाल्यावर त्यांना चांगली पेन्शन देखील मिळाली असती. तसेंच त्यांनीं बी. एल्. चा अभ्यास केला असता तर वकील होऊन त्यांनीं बरेंच द्रव्य सम्पादन केलें असतें. परंतु शिक्षकाचा धंदा त्यांना पसंत असल्यामुळें त्यांच्या मित्रमंडळींचा त्यांना आग्रह असून देखील त्यांनीं नायब तहसिलदारी मिळण्याबद्दल मुळींच खटपट केली नाहीं किंवा बी. एल्. चा त्यांनीं अभ्यास केला नाहीं. ते जबलपुरास शिक्षकाचें काम करीत असतांना त्यांनीं तेथील प्रसिद्ध नैयायिक श्री० शंकरशास्त्री सोमण यांचेजवळ न्यायशास्त्राचें अध्ययन केलें. इ० स० १८९६ मध्यें नागपुर येथील हिस्लॉप कॉलेजांत प्रोफेसर ऑफ फिजिक्सची जागा खालीं झाल्यामुळें त्या जागेवर त्यांना नेमण्यांत आलें, व तेव्हांपासून ते नागपुरासच राहत असतात. त्यांना ही जागा मिळाल्यापासून दोन वर्षांचे आंतच त्यांनीं

कॉलेजच्या पुस्तकालयांत फिजिक्स विषयावर जेवढीं पुस्तकें होतीं तेवढीं सर्व वाचून काढलीं व १९०९ पर्यंत ते कॉलेजांत फिजिक्स शिकवीत असत. १९०९ चे सुमारास त्या कॉलेजांत गणितविषयाच्या प्रोफेसरची रिकामी खालीं झाल्यामुळें त्यांना गणित-विषयाचे प्रोफेसर नेमण्यांत आलें व तेव्हांपासून १९३३ मध्यें सेवानिवृत्त होईपर्यंत ते कॉलेजांत गणितविषय शिकवीत असत. सन १८९८ सालीं त्यांचा नागपूर येथील प्रसिद्ध विद्वान् महामहोपाध्याय भट्टजीशास्त्री घाटे यांचेशीं परिचय झाला. व त्यांनीं त्यांचेजवळ काव्यप्रकाश, रसगंगाधर, उपनिषदें, ब्रह्मसूत्रभाष्य इत्यादि अनेक ग्रन्थांचें अध्ययन केलें. त्यांची विलक्षण बुद्धिमत्ता व ग्राहकशक्ति पाहून भट्टजीशास्त्री त्यांच्यावर फार प्रसन्न असत व त्यांनीं त्यांना व्याकरणशास्त्र शिकण्याबद्दल सूचना केली. त्यांच्या आज्ञेनुसार श्री० गोपाळराव यांनीं त्यांचेजवळ सिद्धान्तकौमुदी, शब्देन्दुशेखर व महा-भाष्य या ग्रन्थांचें अध्ययन केलें. त्यांनी भट्टजीशास्त्रिजवळ परिभाषेन्दुशेखर ग्रन्थ वाचला नव्हता. परंतु पुढें त्यांनीं तो ग्रन्थ व तसेंच व्याकरणशास्त्रावरील इतर बरेच ग्रन्थ स्वतः वाचून काढले. त्यांची अशी विलक्षण बुद्धि आहे कीं ते बहुधा कोणताहि कठीण ग्रन्थ लावूं शकतात व शिकवूं शकतात. ते जसे गणित, फिजिक्स, केमिस्ट्री इत्यादि विषयांत प्रवीण आहेत तसेंच व्याकरणशास्त्रांत, न्यायशास्त्रांत, वेदान्तशास्त्रांत व साहित्यशास्त्रांत देखील प्रवीण आहेत. त्यांचा विद्याव्यासंग फार दांडगा असून त्यांनीं धर्मशास्त्रावरील देखील अनेक ग्रन्थ वाचले आहेत. त्यांची स्मरणशक्ति अशी विलक्षण आहे कीं त्यांनीं जें एकदां वाचलें किंवा गुरुमुखांतून ऐकलें तें ते बहुधा विस-रत नाहींत. ते नेहमी पठनपाठनांत व विद्यानन्दांत निमग्न असतात त्यांचेजवळ कोणीहि विद्यार्थी शिकण्यास गेला तर ते त्याला मोठ्या आनंदानें फुकट शिकवीत असतात. विद्यार्थ्यानें त्यांना कितीदां जरी विचारलें तरी तें कधींहि रागावत नाहींत व विद्यार्थ्याची समजूत पटवून देण्याचा प्रयत्न करितात. ते अत्यन्त शांत व गंभीर स्वभावाचे असून त्यांना क्रोध काय तो माहीत नाहीं व त्यांची चित्तवृत्ति नेहमी प्रसन्न असते. ते एवढे विद्वान् असून देखील त्यांना गर्व कधींहि शिवला नाहीं. समा-जांत आपली किर्ति व्हावी व आपलें नांव सर्वत्र प्रसिद्ध व्हावें अशी त्यांनीं कधींहि इच्छा बाळगिली नाहीं. ते नेहमी विद्याभ्यासांत निमग्न राहत असल्यामुळें व त्यांचें चारचौघांत विशेष जाणें येणें नसल्यामुळें व त्यांचा स्वभाव फार भिडस्त असल्यामुळें समाजाला त्यांच्या विद्वत्तेची व थोरवीची जशी माहिती असावी तशी झाली नाहीं. त्यांना द्रव्याची मुळींच हांव नाहीं. ते अत्यन्त निःस्पृह आहेत व देव जेवढें कांहीं देतो तेवढ्यांतच ते संतुष्ट असतात. त्यांची राहणी अगदीं साधी असून ते मोठे पापभीरु, प्रामाणिक व सज्जन आहेत. दरभंगानरेश काशींतील ज्या मण्डलाचे अध्यक्ष आहेत त्या भारतधर्ममहामण्डलानें प्रो० गोपाळरावांना 'वेदान्त-शास्त्री' ही पदवी सुमारें ११ वर्षांपूर्वी अर्पण केली व तसेंच सङ्केश्वर मठाधिपति जगद्गुरु श्री शंकराचार्य यांनीं सुमारें अडीच वर्षांपूर्वी त्यांना 'शास्त्रचिन्तामणि' ही

पदवी देऊन त्यांचा गौरव केला. त्याचप्रमाणें १९३४ सालीं नागपूरच्या कांहीं गुणग्राहक मण्डळींनीं प्रो० गर्दे सेवानिवृत्त झाल्यावर त्यांच्या सन्मानार्थ टाउन हॉलमध्यें एक जाहीर सभा भरविली व त्या सभेंत त्यांना मानपत्र देऊन व नागपुर यूनिव्हर्सिटीचे माजी कुलगुरु व नागपुर हायकोर्टाचे जज ऑनरेबल् श्री० भवानीशंकर नियोगी एम्. ए., एल्एल्. एम् यांच्या हस्तें सुमारें ४५०० रु. ची थैली अर्पण करून त्यांच्याबद्दल आपला आदर व्यक्त केला. अशा सत्पुरुषाशीं माझा सम्बन्ध घडला हें मी आपलें मोठें भाग्य समजतों.

परिभाषेन्दुशेखरासारख्या कठीण ग्रन्थाचें भाषान्तर व विवरण करण्याची माझे ठिकाणीं मुळींच लायकी नसून मी तें केवळ प्रो० गर्दे यांच्या आज्ञेनुसार केलें आहे हें वर सांगितलेंच आहे. त्यांनीं आपला अमूल्य वेळ खर्च करून मला ग्रन्थ समजावून दिला नसता व हा ग्रन्थ लिहीत असतांना मला ज्या मधून मधून अडचणी येत असत त्या त्यांनीं सोडविल्या नसत्या तर मला हा ग्रन्थ तयार करणें अशक्य झालें असतें. त्यांनीं मजकरितां जे परिश्रम घेतले त्याबद्दल मी त्यांचे कितीहि आभार मानले तरी कमीच आहेत. मी केलेलें भाषान्तर व विवरण कित्पत् चांगलें साधलें आहे याबद्दल मला कांहींच सांगतां येत नाहीं. तथापि तें चांगलें झालें असल्यास, त्याचें सर्व श्रेय प्रो० गर्दे यांनाच आहे. ‘ साळुंकि ही बोले मञ्जूळ वाणी । बोलविता धनी वेगळाचि ॥’ हा अभंग मला अक्षरशः लागू पडणारा आहे. हा ग्रन्थ लिहितांना माझे हातून बऱ्याच चुका झाल्या असतील, कित्येक ठिकाणीं ज्या गोष्टी अवश्य लिहिल्या पाहिजे होत्या त्या लिहिणें राहून गेलें असेल, व कांहीं ठिकाणीं मजकडून पुनरुक्ति झाली असेल. व्याकरणशास्त्राचें माझें ज्ञान अल्प असल्यामुळें व हा माझा प्रथमच प्रयत्न असल्यामुळें माझे हातून तसे दोष होणें अगदीं साहजिक आहे व या सर्व दोषांबद्दल मी एकटाच जबाबदार आहे. हे दोष विद्वज्जनांनीं माझ्या नजरेस आणल्यास मी त्यांचा फार आभारी होईन.

प्रो० किलहॉर्न यांनीं परिभाषेन्दुशेखराचें इंग्रजींत सुंदर भाषान्तर केलें आहे व हा ग्रन्थ लिहितांना मला त्या भाषान्तराचा बराच उपयोग झाला. याबद्दल मी प्रोफेसर मजकूरचा आभारी आहे. मी आपला ग्रन्थ काशींतील कांहीं प्रसिद्ध महाराष्ट्र वैयाकरणांस वाचून दाखविला. क्विन्स कॉलेज, बनारस येथील व्याकरणशास्त्राचे मुख्य अध्यापक व्याकरणाचार्य गणपतिशास्त्री मोकाटे, व्याकरणाचार्य गोपाळशास्त्री नेने, व्याकरणाचार्य व मीमांसातीर्थ अनन्तशास्त्री फडके, व्याकरणाचार्य मुकुन्दशास्त्री पुनतांबेकर, न्यायाचार्य गोपाळशास्त्री भट्ट, व गीर्वाणवाग्वर्धिनी सभेचे कांहीं सभासद—म्हणजे सुप्रसिद्ध पण्डित राजेश्वरशास्त्री द्रवीड व पण्डित देवनायकाचार्य इत्यादि शास्त्रिलोकांनीं—हें भाषान्तर मधून मधून वाचण्याची किंवा ऐकून घेण्याची

जी तसदी घेतली व माझ्या अडचणी दूर करून माझ्या ग्रन्थावर अभिप्राय दिला त्याबद्दल मी त्यांचा अत्यन्त ऋणी आहे. तसेंच मॉरिस कॉलेज नागपुर येथील संस्कृताचे प्रोफेसर श्री० व्ही० व्ही० मिराशी, एम्. ए. व व्याकरणाचार्य पण्डित चतुर्वेदी यांनीं या ग्रन्थाचा बराचसा भाग वाचून मला प्रोत्साहन दिलें याबद्दल मी त्यांचा देखील फार आभारी आहे. त्याचप्रमाणें महामहोपाध्याय पण्डित माधवशास्त्री भाण्डारी यांनी या भाषान्तराचा बराच भाग वाचून पाहिला व कांहीं उपयुक्त सूचना करून ग्रन्थावर जो अभिप्राय दिला त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. तसेंच ज्या छापखान्यांत हा ग्रन्थ छापला गेला त्या छापखान्याचे मालक व मॅनेजर यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. मी इ० स० १८९२ सालीं एम्. ए. चा अभ्यास करीत असतांना महामहोपाध्याय भटजीशास्त्री घाटेजवळ परिक्षेस नेमलेल्या ग्रन्थांपैकीं बऱ्याच ग्रन्थांचें अध्ययन केलें होतें. ते जसे प्रो० गर्दे यांचे गुरु होते तसेंच माझे देखील गुरु होते व त्यांचा मजवर फार लोभ असे. मी जबलपुरास सरकारी नौकरींत असतांना ते मजजवळ मुद्दाम महिनाभर येऊन राहिले होते. ते जर आज ह्यात असते तर मी व्याकरणशास्त्राची जी थोडीबहुत सेवा केली आहे ती पाहून त्यांना समाधान वाटलें असतें. पण दैवगति अशी विचित्र कीं त्यांचे हयातींत मजकडून व्याकरणशास्त्राची मुळींच सेवा घडूं शकली नाहीं. तथापि त्यांनीं माझे ठिकाणीं व्याकरणशास्त्राबद्दल जी अभिरुचि उत्पन्न केली त्यामुळेंच मला प्रो० गर्दे साहेबांच्या प्रेरणेवरून हा ग्रन्थ लिहिण्याची बुद्धि झाली.

हें भाषान्तर वैयाकरणांकरितां केलें नसून माझ्यासारख्या अल्पज्ञ विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां केलें आहे व या भाषान्तरानें विद्यार्थिवर्गाला फायदा झाल्यास माझ्या परिश्रमांचें सार्थक झालें असें मी समजेन. हें भाषान्तर छापण्याच्या हेतूनें मुळींच केलें नव्हतें. परंतु अनेक मित्रांच्या आग्रहावरून तें छापून प्रसिद्ध करण्याचें धाडस मी केलें आहे व या धाडसाबद्दल विद्वज्जन मला क्षमा करतील अशी आशा आहे. अखेरीस ज्या जगन्नियन्त्याच्या कृपेनें हा प्रयत्न कसा तरी तडीस गेला त्याला सहस्रशः साष्टांग प्रणिपात करून मी ही प्रस्तावना पुरी करितों.



**सूचनाः**—हा ग्रन्थ छापतांना दुर्दैवेंकरून बऱ्याच छापण्याच्या चुका झाल्या आहेत. त्याबद्दल वाचकांनीं माफी करावी व ग्रन्थाच्या शेवटीं जें शुद्धिपत्र जोडलें आहे त्याच्या सहायानें हा ग्रन्थ वाचावा. सहज कळण्यासारख्या चुका शुद्धिपत्रांत समाविष्ट केल्या नाहींत.

धंतोली, नागपूर.<br>
तारीख. १६-११-१९३६.

ना. दा. वाडेगांवकर.

# उपोद्घात.

नागेशानें व्याकरणशास्त्रावर जे अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रन्थ लिहिले त्यांपैकीं परिभाषेन्दुशेखर हा एक ग्रन्थ आहे. ‘ परिभाषा इन्दुरिव शेखरे यस्य ’ असा परिभाषेन्दुशेखर या सामासिक शद्बाचा विग्रह आहे. चन्द्र जसा सर्वत्र प्रकाश पाडतो त्याचप्रमाणें परिभाषा देखील सर्व व्याकरणशास्त्रावर प्रकाश पाडणाऱ्या असल्यामुळें, त्यांची चन्द्राशीं तुलना केली आहे. अशा परिभाषांचें ज्या ग्रन्थांत विवेचन केलें आहे त्याला परिभाषेन्दुशेखर हें नांव अगदीं अन्वर्थक व शोभणारें आहे यांत कांहीं संशय नाहीं.

परिभाषा म्हणजे काय हें येथें सांगणें अवश्य आहे. ‘ परितो भाष्यते इति परिभाषा ’ अशी परिभाषा या शद्बाची व्युत्पत्ति असून ‘ परितो व्यापृतां भाषां परिभाषां प्रचक्षते ’ अशी परिभाषेची व्याख्या आहे. परिभाषा या शद्बाचा अर्थ इंग्रजींत करणें झाल्यास ‘ rules of interpretation असा केला पाहिजे. कायद्याचा अर्थ नीट समजण्याकरितां अनेक सामान्य नियम घालून दिले आहेत व त्यांना rules of interpretation असें म्हणत असतात. या विषयावर अनेक यूरोपियन व अमेरिकन विद्वान् लोकांनीं अनेक मोठमोठे ग्रन्थ रचले आहेत. त्या ग्रन्थांसारखाच व्याकरणशास्त्राचा अर्थ नीट कळण्याकरितां नागेशानें प्रकृत ग्रन्थ लिहिला आहे. अष्टाध्यायींत सुमारें ४००० सूत्रें असून तीं अगदीं लहान आहेत. त्या सूत्रांचा अर्थ नीट करून देण्याच्या कामी पडणारे जे सर्वसाधारण नियम आहेत त्यांना परिभाषा असें म्हणतात. एकच परिभाषा तिच्या चिन्हांनीं युक्त असलेल्या अनेक सूत्रांचा अर्थ निश्चित करून देण्याच्या उपयोगीं पडत असल्यामुळें, तिला ‘ परितो भाष्यते इति परिभाषा ’ असें म्हणतात. ‘ तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य, तस्मादित्युत्तरस्य ’ इत्यादि परिभाषा अष्टाध्यायींत साक्षात् सूत्ररूपानें पठित केल्या आहेत. ‘तस्मिन्निति निर्दिष्टे’ हें एक सूत्र असून, अष्टाध्यायींत पठित असलेल्या जेवढ्या सूत्रांत सप्तमीविभक्तीचा निर्देश करून कार्य होणें सांगितलें आहे तेवढ्या सर्व सूत्रांचा अर्थ नीट करून देण्याच्या कामीं पडत असल्यामुळें, त्याला परिभाषा असें म्हणतात. ‘ परिभाषा ’ या शद्बाचा असा अर्थ असल्यामुळें, भाष्यकारांनीं निषेधसूत्रांना देखील गौणव्यवहारानें परिभाषा मानलें आहे; कारण ज्या विधिसूत्रांचा निषेधकसूत्रें निषेध करितात तीं विधिसूत्रें कोठें प्रवृत्त व्हावीं व कोठें प्रवृत्त होऊं नयेत हें ठरविण्याच्या कामी तीं निषेधसूत्रें उपयोगी पडतात. ज्या परिभाषा सूत्ररूपानें अष्टाध्यायींत साक्षात् पठित केल्या आहेत त्यांचें प्रकृतग्रन्थांत विवेचन केलें नाहीं. ज्या परिभाषा अष्टाध्यायींत पठित नाहींत त्यांचेंच प्रकृतग्रन्थांत विस्तृत विवेचन केलें आहे.

परिभाषा दोन प्रकारच्या असतात; कांहीं शास्त्रत्वसम्पादिका असतात व कांहीं शास्त्रत्वावच्छिन्नोद्देश्यिका असतात ज्या परिभाषेच्या प्रवृत्तीनंतर विधिसूत्राचा अर्थ परिपूर्ण होऊन निश्चित होतो ती प्रथमप्रकारची परिभाषा होय. जसें–' इको यणचि ' या सूत्राचा अर्थ ' तस्मिन्निति निर्दिष्टे ' ही परिभाषा प्रवृत्त झाल्यानंतरच पूर्ण होऊन निश्चित होतो. तसेंच ' यस्मिन् विधिस्तदादावल्ग्रहणे ' ही परिभाषा प्रवृत्त झाल्यावरच, ' वान्तो यि प्रत्यये' या सूत्राचा अर्थ निश्चितपणें ठरवितां येतो. म्हणून अशा प्रकारच्या परिभाषा शास्त्रत्वसम्पादिका होत. सूत्रांचा अर्थ निश्चित झाल्यावर त्या सूत्रांत परस्परांमध्यें प्रबलदुर्बलभावाचें किंवा बाध्यबाधकभावाचें बोधन करून देणाऱ्या परिभाषा शास्त्रत्वावच्छिन्नोद्देश्यिका होत.

प्रकृत ग्रन्थांत तीन प्रकरणें सांगितलीं आहेत. प्रथम प्रकरणाचें नांव शास्त्रत्वसम्पादनोद्देश प्रकरण असून त्या प्रकरणांत प्रथमप्रकारच्या परिभाषा—म्हणजे शास्त्रत्वसम्पादिका परिभाषा—पठित केल्या आहेत. दुसऱ्या प्रकरणाचें नांव बाधबीजप्रकरण असून त्यांत द्वितीय प्रकारच्या परिभाषा पठित केल्या आहेत. तृतीय प्रकरणाचें नांव तन्त्रशेषप्रकरण असें आहे व त्याचा अर्थ पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांचा शेष असा आहे. वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या ज्या परिभाषा प्रथम व द्वितीय प्रकरणांत पठित केल्या नाहींत त्या तृतीय प्रकरणांत पठित केल्या आहेत. पहिल्या दोन प्रकरणांत महत्वाच्या परिभाषा सांगितल्या असून बाकी राहिलेल्या किरकोळ परिभाषा तृतीय प्रकरणांत सांगितल्या आहेत आणि म्हणूनच त्याला तन्त्रशेषप्रकरण असें अन्वर्थक नांव दिलें आहे.

वरील दोन्ही प्रकारच्या परिभाषांचे तीन प्रकार आहेतः ( १ ) वाचनिकी, ( २ ) न्यायसिद्ध, व ( ३ ) ज्ञापकसिद्ध, वाचनिकी परिभाषेचे दोन पोटभेद आहेत–( १ ) स्वतन्त्र वाचनिकी व ( २ ) सूत्रसिद्ध वाचनिकी. पाणिनीय सूत्राच्या अर्थावरूनच जी परिभाषा सिद्ध होते—म्हणजे पाणिनीय सूत्राच्या अर्थांतूनच जी परिभाषा निघते–तिला सूत्रसिद्ध वाचनिकी म्हणतात. जी परिभाषा पाणिनीय सूत्राच्या अर्थांतून निघत नाहीं व जी न्यायसिद्ध किंवा ज्ञापकसिद्ध नाहीं आणि जी भाष्यकारांनीं भाष्यांत स्वतन्त्र रीतीनें वचनरूपानें पठित केली आहे तिला स्वतन्त्र वाचनिकी परिभाषा म्हणतात. कित्येक वैयाकरणांच्या मतें स्वतन्त्र वाचनिकी अशी कोणतीहि परिभाषा नाहीं. ज्या परिभाषा स्वतन्त्र वाचनिकी मानल्या आहेत त्या सर्वांचीं ज्ञापकें पाणिनीय सूत्रांत मिळत असल्यामुळें, त्या ज्ञापकसिद्धच मानल्या पाहिजेत असें त्यांचें मत आहे, व ते असें म्हणतात कीं कांहीं परिभाषांचें व्याख्यान करितांना नागेशानें जरी त्या स्वतन्त्र वाचनिकी आहेत असें म्हटलें आहे तरी त्या म्हणण्याचा अर्थ एवढाच समजावा कीं त्या परिभाषांचें ज्ञापक भाष्यांत सांगितलें नाहीं; पण तेवढ्यावरून त्या परिभाषा ज्ञापकसिद्ध नाहींत व स्वतन्त्र वाचनिकी आहेत असें

मात्र समजूं नये. नागेशानें ज्या परिभाषा स्वतन्त्र वाचनिकी मानल्या आहेत त्यांचीं ज्ञापकें टीकाकारांनीं दिलीं आहेत. तथापि ज्याअर्थीं नागेशानें प्रकृत ग्रन्थांत ठिकठिकाणीं कित्येक परिभाषा स्वतन्त्र वाचनिकी व कित्येक सूत्रसिद्ध वाचनिकी मानल्या आहेत त्याअर्थीं तशा प्रकारच्या परिभाषा मानणें इष्ट वाटल्यावरुन, वाचनिकी परिभाषेचे वर सांगितलेले दोन पोटविभाग केले आहेत.

न्यायसिद्ध परिभाषेचे देखील दोन पोटभेद आहेत–(१) लौकिकन्यायसिद्ध व (२) शास्त्रीयन्यायसिद्ध किंवा युक्तिसिद्ध. लोकांत प्रचलित असलेल्या व्यवहाराचे आधारावर जी परिभाषा रचली आहे तिला लौकिकन्यायसिद्ध परिभाषा म्हणतात व जी शास्त्रीयन्यायाच्या–म्हणजे शुद्ध तर्काच्या किंवा युक्तीच्या–आधारावर रचली आहे तिला युक्तिसिद्ध परिभाषा म्हणतात. अशा दोन्ही प्रकारच्या परिभाषा प्रकृतग्रन्थांत ठिकठिकाणीं सांगितल्या आहेत व या ग्रन्थास जोडलेल्या अनुक्रमणिकेवरून त्या कोणकोणत्या परिभाषा आहेत हें कळून येईल.

जी परिभाषा एखाद्या पाणिनीय सूत्रानें किंवा त्या सूत्रांतील एखाद्या पदानें ज्ञापित होते––म्हणजे पाणिनीला ती अवगत होती असें अनुमान काढतां येतें–तिला ज्ञापकसिद्ध परिभाषा म्हणतात. ग्रन्थकारानें ज्ञापकाचें लक्षण प्रकृतग्रन्थांत सांगितलें नाहीं. टीकाकारांनीं ज्ञापकाचें लक्षण दिलें आहे, व तें ‘ स्वांशे चारितार्थ्यम्, वचनसिद्धिः , फलमन्यस्थलेष्वपि ’ असें आहे. एखादें सूत्र किंवा त्यांतील एखादें पद एखाद्या परिभाषेचें ज्ञापक तेव्हांच मानतां येतें कीं जेव्हां, ती परिभाषा नसल्यास, तें सूत्र किंवा तें पद व्यर्थ ठरतें, पण ती परिभाषा मानल्यानेंच चरितार्थ —म्हणजे आवश्यक— ठरतें. प्रकृत ग्रन्थांत अनेक ज्ञापकसिद्ध परिभाषा सांगितल्या आहेत व ग्रन्थकारानें त्यांचीं ज्ञापकें दिलीं आहेत आणि तीं ज्ञापकें कशीं ठरतात हें विवरणांत विस्तारपूर्वक चर्चा करून सिद्ध करून दाखविलें आहे, व त्या परिभाषा वाचल्यानें ज्ञापक कशाला म्हणतात हें कळून येईल.

प्रकृतग्रन्थांत ज्या ज्ञापकसिद्ध परिभाषा सांगितल्या आहेत त्यांचें नागेशानें पाणिनीय सूत्रांतून एक ज्ञापक दिलें आहे. एवढ्यावरुन हें मात्र समजूं नये कीं नागेशानें एखाद्या परिभाषेचें जें ज्ञापक दिलें आहे तेवढेंच त्या परिभाषेचें ज्ञापक आहे. त्या परिभाषेचीं इतर ज्ञापकें देखील पाणिनीय सूत्रांतून दतां येतील. परंतु नागेशानें उदाहरणादाखल केवळ एक ज्ञापक सांगितलें आहे एवढाच त्याचा अर्थ समजावा.

कांहीं परिभाषा अशा आहेत कीं ज्या लौकिकन्यायसिद्ध असून देखील त्यांचीं ज्ञापकें पाणिनीय सूत्रांत आढळतात. अशा ठिकाणीं त्या परिभाषा केवळ लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें त्यांचें ज्ञापक शोधून काढण्याची कांहींच गरज राहत नाहीं व त्या लौकिकन्यायसिद्धच मानणें इष्ट आहे असें नागेशानें परिभाषा १० च्या टीकेंत

सुचविलें आहे. तथापि लौकिकन्यायसिद्ध परिभाषेपेक्षां ज्ञापकसिद्ध परिभाषा अधिक बलवती असते असें कित्येक वैयाकरणांचें मत असल्यामुळें, (पहा भैरवी पान २१४) जी परिभाषा लौकिकन्यायसिद्ध असून ज्ञापकसिद्ध देखील आहे ती या ग्रन्थास जोडलेल्या परिभाषानुक्रमणिकेंत दोन्ही प्रकारची दाखविली आहे.

न्यायसिद्ध परिभाषा देखील ज्ञापकसिद्ध असूं शकते आणि तसेंच वाचनिकी परिभाषा देखील ज्ञापकसिद्ध असूं शकते. ज्या परिभाषा वाचनिकी किंवा न्यायसिद्ध असून ज्ञापकसिद्ध देखील आहेत तशा परिभाषा अनुक्रमणिकेंत दोन्ही तऱ्हेच्या दाखविल्या आहेत.

नागेशानें कित्येक परिभाषांचें विवरण करितांना त्या अनित्य आहेत असें म्हटलें आहे, व त्यांचें अनित्यत्व सिद्ध करण्याकरितां भाष्याचें प्रमाण देऊन उदाहरणें देखील दिलीं आहेत. यावरून हें स्पष्ट होतें कीं सर्वच ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा नित्य नसून त्यांपैकीं कांहीं अनित्य आहेत. इष्ट रूप सिद्ध करण्याच्या कामी उपयोगी पडणें हें परिभाषांचें मुख्य प्रयोजन आहे. जी परिभाषा भाषेंत प्रचलित असलेलीं सर्व शुद्ध व इष्ट रूपें सिद्ध करण्याच्या उपयोगीं पडत नसून बरींच इष्ट रूपें सिद्ध करण्याच्या उपयोगीं पडते व कांहीं थोडीं इष्ट रूपं सिद्ध करण्याच्या उपयोगीं पडत नाहीं ती परिभाषा अनित्य समजावी, व जेथें ती परिभाषा इष्ट रूप सिद्ध करण्याच्या आड येते तेथें ती अनित्य मानून तिचा उपयोग करूं नये व अन्यरीतीनें इष्टरूप सिद्ध करून घ्यावें, आणि जेवढ्या ठिकाणीं ती इष्टरूपें सिद्ध करण्याच्या उपयोगी पडते तेवढ्याच ठिकाणीं तिचा उपयोग करावा.

प्रकृतग्रन्थांत ' ज्ञापकसिद्धं न सर्वत्र ' अशी एक परिभाषा ( प० १२५ ) सांगितली आहे. त्या परिभाषेंतील ' ज्ञापक ' हा शब्द न्यायाचें देखील उपलक्षण आहे व त्या परिभाषेचा अर्थ असा आहे कीं ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा सर्वत्र उपयोगीं पडणाऱ्या परिभाषा नाहींत व त्या अनित्य समजाव्या, आणि त्या लावल्यास जर अनिष्ट रूप सिद्ध होत असेल तर त्यांचा उपयोग न करितां अन्य रीतीनें इष्ट रूपांची सिद्धि करून घ्यावी. ही परिभाषा पाणिनीयकृतीवरूनच सिद्ध होते. जर ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा नित्य असत्या तर ज्याप्रमाणें पाणिनीनें अष्टाध्यायींत कित्येक परिभाषा सूत्ररूपानें पठित केल्या आहेत त्याचप्रमाणें त्यानें अशा परिभाषा देखील अष्टाध्यायींत पठित केल्या असत्या, आणि त्या पठित केल्या नसल्यामुळेंच त्यांचें अनित्यत्व ज्ञापित होतें. पण अशा रीतीनें जर सर्वच ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा अनित्य आहेत तर नागेशानें प्रकृतग्रन्थांत कांहीं तशा परिभाषा अनित्य आहेत असें कां म्हटलें व त्यांचें अनित्यत्व सिद्ध करण्याकरितां खटपट कां केली हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं ' ज्ञापकसिद्धं न सर्वत्र ' हा सामान्य नियम आहे व प्रत्येक सामान्य नियमास कांहीं अपवाद असतातच. म्हणून कांहीं परिभाषा अपवादरूपानें नित्य व कांहीं सामान्य नियमान्वयें

अनित्य असूं शकतात. ज्या न्यायसिद्ध व ज्ञापकसिद्ध परिभाषा नागेशानें अनित्य म्हटल्या आहेत त्या कोणत्या स्थलीं अनित्य आहेत हें समजून यावें व तशा स्थलीं त्या परिभाषांचा उपयोग न करितां इतर रीतीनें इष्टरूपांची सिद्धि करून घ्यावी या हेतूनें नागेशानें प्रकृतग्रन्थांत त्यांच्या नित्यत्वानित्यत्वाची चर्चा केली आहे. जरी प्रत्येक न्यायसिद्ध व ज्ञापकसिद्ध परिभाषा अनित्य असली तरी ती कोणत्या विशेष स्थलीं अनित्य आहे हें समजणें आवश्यक आहे. नाहीं तर तिचा सर्वत्र उपयोग केल्यास कित्येक अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति न यावी म्हणून नागेशास तशी चर्चा करणें आवश्यक होतें हें उघड आहे. ज्या परिभाषांचें अनित्यत्व नागेशानें सिद्ध करून दाखविलें आहे त्यांच्यापुढें परिभाषानुक्रमणिकेंत अनित्य हा शब्द घातला आहे. त्यामुळें कोणत्या परिभाषा अनित्य आहेत हें एकदम ध्यानांत येईल. सूत्रसिद्ध वाचनिकी परिभाषा पाणिनीय सूत्रांतूनच निघाल्या असल्यामुळें, ज्याप्रमाणें पाणिनीय सूत्रें अनित्य मानतां येत नाहींत त्याप्रमाणें तशा परिभाषा देखील अनित्य मानतां येत नाहींत हें उघड आहे. तसेंच पाणिनीय सूत्रांतील उणीव भरून काढण्याकरितां ज्या परिभाषा भाष्यकारांनीं भाष्यांत स्वतन्त्ररीतीनें वचनरूपानें पठित केल्या आहेत त्या देखील नित्य मानल्याच पाहिजेत.

प्रकृत ग्रन्थाच्या आरंभीं नागेशानें ' प्राचीनवैयाकरणतन्त्रे वाचनिकान्यत्र पाणिनीयतन्त्रे ज्ञापकन्यायसिद्धानि भाष्यवार्तिकयोरुपनिबद्धानि यानि परिभाषारूपाणि तानि व्याख्यायन्ते ' अशी पंक्ति लिहिली आहे. त्या पंक्तीचा सरळ अर्थ असा आहे कीं, प्राचीन वैयाकरणांच्या ग्रन्थांत ज्या परिभाषा वचनरूपानें—म्हणजे सूत्र रूपानें—पठित आहेत परंतु ज्या पाणिनीय शास्त्रांत ( सूत्ररूपानें पठित केल्या नसून ) ज्ञापकसिद्ध किंवा न्यायसिद्ध आहेत आणि भाष्यकार व वार्तिककार यांनीं भाष्यांत किंवा वार्तिकांत ग्रथित किंवा ध्वनित केल्या आहेत तशाच परिभाषांचें या ग्रन्थांत व्याख्यान करण्याचें योजिलें आहे. या पंक्तीवरून हें स्पष्ट होतें कीं ज्या ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा भाष्यकारांनीं किंवा वार्तिककारांनीं स्वीकारल्या आहेत त्यांचेंच व्याख्यान करण्याबद्दल नागेशानें ग्रन्थारम्भीं प्रतिज्ञा केली आहे. त्यामुळें ज्या परिभाषा वाचनिकी मानल्या आहेत, व तसेंच ज्या परिभाषा भाष्यकारांनीं किंवा वार्तिककारांनीं पठित किंवा निदान ध्वनित केल्या नाहींत, व तसेंच ज्या पठित करून प्रत्याख्यात केल्या आहेत अशा परिभाषा नागेशानें प्रकृत ग्रन्थांत सांगावयास नको होत्या, व त्यांचें व्याख्यान करावयास नको होतें. पण त्यानें अशा परिभाषांचें देखील प्रकृतग्रन्थांत व्याख्यान केलें असल्यामुळें, त्याजवर प्रतिज्ञाहानिरूप दोष येतो. या दोषाचें निवारण करण्याकरितां टीकाकारांनीं बरीच खटपट केली आहे. उदाहरणार्थ सदाशिवभट्टांनीं ' ज्ञापकन्यायसिद्धानि ' या पदांतील ' ज्ञापक ' या शब्दाचा अर्थ ज्ञापकसिद्ध, ' न्याय ' या शब्दाचा अर्थ न्यायसिद्ध, व 'सिद्ध' या शब्दाचा अर्थ वाचनिकी असा केला असून, ' भाष्यवार्तिकयोरुपनिबद्धानि ' हें ' ज्ञापकन्यायसिद्धानि ' या पदाचें

विशेषण न मानतां, विशेष्य मानलें आहे. त्यामुळें वरील पंक्तीचा अर्थ असा होतो कीं, ज्या परिभाषा ज्ञापकसिद्ध, न्यायसिद्ध, व वाचनिकी आहेत—मग त्या भाष्यांत किंवा वार्तिकांत पठित केल्या असोत किंवा नसोत, किंवा पठित केल्या असून प्रत्याख्यात केल्या असोत—आणि तसेंच ज्या परिभाषा भाष्यकारांनीं किंवा वार्तिककारांनीं स्वीकारल्या आहेत त्यांचें प्रकृत ग्रन्थांत व्याख्यान करण्याचें योजिलें आहे. असा अर्थ केल्यास, हें खरें कीं, नागेशावर प्रतिज्ञाहानिरूप दोष येत नाहीं, पण हा अर्थ बराच ओढून ताणून केला आहे. पण कांहींहि असो, व्याकरणशास्त्रांत उपयोगी पडणाऱ्या कोणत्या परिभाषा आहेत व कोणत्या नाहींत हें व्याकरणशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या ध्यानांत यावें, व ज्यांचा व्याकरणशास्त्रांत उपयोग करणें अयोग्य ठरविलें आहे त्यांचा उपयोग करूं नये याकरितां नागेशानें सर्व परिभाषा सांगून त्यांचें सविस्तर व्याख्यान केलें हें योग्यच केलें असें म्हटलें पाहिजे.

ज्या परिभाषा भाष्यांत पठित किंवा ध्वनित केल्या नसल्यामुळें, किंवा ज्या पठित केल्या असून भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केल्या असल्यामुळें, नागेशाच्या मतें, स्वीकारार्ह नाहींत त्या परिभाषानुक्रमणिकेंत दाखविल्या आहेत.

ज्या परिभाषा प्रकृतग्रन्थांत सांगितल्या आहेत त्या सर्व पाणिनीच्या काळीं प्रचलित होत्या कीं काय व त्या सर्व पाणिनीस अवगत होत्या कीं काय हें सांगणें फार कठीण आहे, कारण पाणिनिसमकालीन कोणताहि परिभाषाग्रन्थ अझून उपलब्ध झाला नाहीं. तसा ग्रन्थ उपलब्ध झाल्यास, पाणिनीच्या वेळीं कोणत्या परिभाषा प्रचलित होत्या हें निश्चितपणें सांगतां येईल. तथापि प्रकृतग्रन्थांत दिलेल्या परिभाषांपैकीं बऱ्याच परिभाषांचें ज्ञापक अष्टाध्यायींत मिळत असल्यामुळें, तशा परिभाषा पाणिनीय कालांत प्रचलित होत्या हें मानणें वावगें होणार नाहीं. दुसरें असें कीं पाणिनीय कालांत सूत्ररूपानें ग्रन्थरचना करण्याचा प्रघात होता व सूत्रें जेवढीं लहान करणें शक्य असेल तेवढीं लहान करण्याची प्रथा होती. त्याकाळीं तशा अत्यंत संक्षिप्त सूत्रांचा अर्थ लावण्यास उपयोगी पडणारे कांहीं तरी सामान्य नियम असलेच पाहिजेत, व पाणिनीनंतर कांहीं काळानें झालेल्या व्याडिनामक पुरातन ग्रन्थकारानें त्या काळीं प्रचलित असलेल्या सर्व परिभाषा एकत्र संगृहीत करून परिभाषापाठनामक एक ग्रन्थ लिहिला होता व त्याचे नावानें प्रसिद्ध असलेला तो ग्रन्थ बंगाल रायल एशियाटिक सोसायटीच्या पुस्तकालयांत उपलब्ध आहे असें म० हरप्रशादशास्त्री यांनीं तयार केलेल्या सूचीवरून दिसून येतें. परिभाषापाठ हा ग्रन्थ खरोखरच व्याडीनें केला होता किंवा त्याच्यानंतर बऱ्याच काळानें त्याच्या नांवानें दुसऱ्या कोणी ग्रन्थकारानें तो तयार केला हें सांगणें फार कठीण आहे. तो ग्रन्थ छापला नसल्यामुळें त्यांत कोणत्या परिभाषा पठित केल्या आहेत हें देखील सांगतां येत नाहीं. मात्र एवढें खरें कीं व्याडि हा भाष्यकाराच्या बरेंच पूर्वीं होऊन गेला व तो पाणिनीच्या

मामाचा पणतु होता अशी आख्यायिका आहे. त्यानें एकलक्षश्लोकात्मक संग्रहनामक मोठा ग्रन्थ लिहिला होता व भाष्यकाराच्या वेळीं तो उपलब्ध असून अतिशय मान्य ग्रन्थ समजला जात असे असें भाष्यावरून दिसून येतें. त्या ग्रन्थांत बहुधा त्याकाळीं प्रचलित असलेल्या सर्व परिभाषांचा उल्लेख केला असावा, परंतु तो ग्रन्थ आतां उपलब्ध नसल्यामुळें त्या ग्रन्थांत कोणत्या परिभाषा सांगितल्या होत्या हें समजण्यास कांहीं साधन उपलब्ध नाहीं.

पण्डित हरप्रशाद् शास्त्री आपल्या प्रस्तावनेंत असें म्हणतात कीं ' the whole of the Paribhasha literature seems to emanate from Vyadi ( Catal. No. 4337-46 ). Vyadi seems to have collected the nucleus of the Paribhashas and subsequent writers have added to them till their number was fixed by the vritti of Siradeva. The Paniniya Paribhasha seems to apply to all schools or grammar. The last word on the Paribhashas has been said by Nagesh and his pupil Vaidyanath Payagunde. ' वरील उतान्यावरून हें दिसून येतें कीं बंगाल रायल एशियाटिक सोसायटीच्या पुस्तकालयांत परिभाषाशास्त्रावर दहा हस्तलिखित ग्रन्थ उपलब्ध आहेत. ते ग्रन्थ पाहण्यांत आले नसल्यामुळें ते केव्हां रचले गेले व त्यांत कोणत्या परिभाषा दिल्या आहेत हें सांगतां येत नाहीं. तथापि परिभाषाशास्त्रावर रचलेला सीरदेवकृत परिभाषावृत्तिनामक पुरातन ग्रन्थ उपलब्ध आहे व तो काशींत छापला गेला आहे. सीरदेव कोणत्या शतकांत झाला हें सांगतां येणें कठीण आहे. तथापि १४ व्या शतकांत माधवानें जी धातुवृत्ति लिहिली आहे तींत सीरदेवकृत परिभाषावृत्तीचा निर्देश केला असल्यामुळें, सीरदेव इ० सनाच्या १४ व्या शतकापूर्वी झाला असावा हें उघड आहे. सीरदेवाच्या ग्रन्थांत आठव्या शतकांत झालेल्या न्यासकाराचा ठिकठिकाणीं निर्देश केला असून हरदत्तादि प्रसिद्ध पुरातन वैयाकरणांचा कोठेंहि नामनिर्देश केला नसल्यामुळें, तो बराच प्राचीन वैयाकरण असावा असें दिसून येतें. परंतु तो कोणत्या शतकांत झाला हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. त्याच्या ग्रन्थांत देखील १३३ परिभाषा सांगितल्या असून त्यांपैकीं बऱ्याच परिभाषा परिभाषेन्दुशेखरांत जशा पठित केल्या आहेत त्याच शब्दांत दिल्या आहेत. कांहीं परिभाषा भिन्न शब्दांत सांगितल्या असून इतर थोड्या वेगळ्या परिभाषा देखील दिल्या आहेत, व परिभाषेन्दुशेखरांत दिलेल्या परिभाषांपैकीं कांहीं परिभाषा सांगितल्या नाहींत. सीरदेवानें आपल्या ग्रन्थाचे दोन भाग केले आहेत. प्रथम भागांत ज्ञापकसिद्ध परिभाषा सांगितल्या असून, द्वितीय भागांत न्यायसिद्ध परिभाषा सांगितल्या आहेत. ह्यावरून असें दिसून येतें कीं सीरदेवाच्या मतें कोणतीहि परिभाषा वाचनिकी नसून दोनच प्रकारच्या–म्हणजे ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध–परिभाषा आहेत. सीरदेवानें प्रथम भागाचें, अष्टाध्यायीप्रमाणें, आठ अध्याय केले असून,

प्रत्येक अध्यायाचे चार पाद केले आहेत, व प्रत्येक पादांत अशाच परिभाषा सांगितल्या आहेत कीं ज्या त्या पादांत पठित असलेल्या सूत्रांनीं ज्ञापित होतात. सारांश ज्ञापकसूत्रक्रमानुसार सीरदेवानें ज्ञापकसिद्ध परिभाषा आपल्या ग्रन्थांत दिल्या आहेत. नागेशानें परिभाषेन्दुशेखरांत हा क्रम स्वीकारला नसून भिन्न क्रम स्वीकारला आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, त्यानें आपल्या ग्रन्थाचीं तीन प्रकरणें करून प्रत्येक प्रकरणांत समाविष्ट होण्याजोग्या परिभाषा त्या त्या प्रकरणांत दिल्या आहेत. नागेशानें स्वीकारलेला क्रम अधिक उपयुक्त व सरस आहे हें दोन्हीं ग्रन्थांचें अवलोकन केल्यानें सहज ध्यानांत येऊं शकतें.

परिभाषेन्दुशेखरावर अनेक विद्वान वैयाकरणांनीं टीका केल्या आहेत. पण त्यांपैकीं पुष्कळ टीका बऱ्याच अवघड आहेत व त्यांत अनेक अवान्तर विषयांचें प्रतिपादन केलें असल्यामुळें, त्या प्रत्येक स्वतन्त्र ग्रन्थासारख्याच झाल्या आहेत. त्या सर्व टीकांच्या तात्पर्याचा प्रकृतग्रन्थांत समावेश केला असता तर आतां जेवढा ग्रन्थ झाला आहे त्याच्या दुप्पट ग्रन्थ झाला असता व तो विद्यार्थ्यांना कंटाळवाणा झाला असता. म्हणून महत्त्वाच्या विषयांचेंच प्रकृतग्रन्थांत विवेचन केलें आहे. ऑल्फ्रेक्टचें असें म्हणणें आहे कीं परिभाषेन्दुशेखरावर नागेशानें स्वतः हैमवती नांवाची टीका लिहिली आहे. परंतु विश्वसनीय माहितीवरून असें कळून येतें कीं ती टीका नागेशानें लिहिली नसून दुसऱ्याच ग्रन्थकारानें लिहिली आहे.

(१) पाणिनीय सूत्रें, ( २ ) वार्तिकें, ( ३ ) परिभाषा, व (४) या तीहींचेंहि ज्या ग्रन्थांत उत्कृष्ट रीतीनें विस्तृत विवेचन केलें आहे तें महर्षिपतञ्जलिकृत महाभाष्य या चोहोंचेंहि ज्याला पूर्ण ज्ञान आहे तो खरा वैयाकरण होय. वरील चार अङ्गांपैकीं एका अङ्गाची–म्हणजे परिभाषांची–परिभाषेन्दुशेखरांत विस्तृत चर्चा करून नागेशानें व्याकरणशास्त्राची मोठी सेवा केली आहे, व याबद्दल त्याला जितके धन्यवाद दिले तितके कमीच आहेत. या ग्रन्थाचें मी जें भाषान्तर व विवरण केलें आहे त्यायोगानें महाराष्ट्रीय विद्यार्थिवर्गास फायदा होवो अशी आशा करून मी हा उपोद्घात पूर्ण करितो.



# परिभाषासूचीपत्र.



| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | निमित्ततया नाश्रीयते | सूत्रांतील 'शयितरि' हा निर्देश हिचा ज्ञापक आहे. उपादानकारण व निमित्त-कारण नेहमी भिन्न असतात या लौकिक-न्यायावर रचली असल्यामुळें, लौकिक-न्यायसिद्ध देखील आहे. | |
| ११ | यदागमास्तद्गुणीभूतास्तद्ग्र-हणेन गृह्यन्ते | लौकिकन्यायसिद्ध. 'देवदत्तस्याङ्गाधिक्ये तद्विशिष्टस्यैव देवदत्तग्रहणेन ग्रहणम्' या लौकिकन्यायानें सिद्ध. 'आने मुक्' या सू-त्रांत मुग्विधान केल्यामुळें ही अनित्य आहे. | २७ |
| १२ | निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति | सूत्रसिद्धवाचनिकी. 'षष्ठी स्थानेयोगा' या सूत्रांतून ही निघाली आहे. | ३८ |
| १३ | यत्रानेकाविधमान्तर्यं तत्र स्थानत आन्तर्यं बलीयः | सूत्रसिद्धवाचनिकी. 'स्थानेऽन्तरतमः' या सूत्रांतून निघाली आहे. | ४५ |
| १४ | अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य | सूत्रसिद्धवाचनिकी. ' स्वं रूपं शद्बस्य ' या सूत्रांतून निघाली आहे. ' विशिष्टरू-पोपादाने उपस्थितार्थस्य शद्बम्प्रति विशे-षणतयान्वयसम्भवे त्यागे मानाभावः' या शास्त्रीय न्यायानें सिद्ध होत असल्यामुळें युक्तिसिद्ध देखील आहे. | ४९ |
| १५ | गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसम्प्र-त्ययः | वास्तविक हा लौकिक न्याय असून याचा व्याकरणशास्त्रांत उपयोग केल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ५३ |
| १६ | अनिनस्मन्ग्रहणान्यर्थवता चानर्थकेन च तदन्तविधिं प्रयोजयन्ति | स्वतन्त्रवाचनिकी. ' येन विधिः ' या सूत्रावरील भाष्यांत वचनरूपानें पठित केली आहे. | ६४ |
| १७ | एकयोगनिर्दिष्टानां सह वा प्रवृत्तिः सह वा निवृत्तिः | लौकिकन्यायसिद्ध. ' एककार्यनियुक्तानां बहूनां लोके सहैवानुवृत्तिर्निवृत्तिर्वा ' या लौकिकन्यायानें सिद्ध. | ६६ |
| १८ | क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्त्तते | सूत्रसिद्धवाचनिकी. ' स्वरितेनाधिकारः ' या सूत्रान्वयें सिद्ध आहे. | ६९ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| १९ | भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न | ज्ञापकसिद्ध. ‘ ज्यादादीयसः ’ या सूत्रांतील ‘ आत् ’ या पदाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. ‘ अणुदित् ’ या सूत्रांतील ‘ अप्रत्ययः ’ या पदाचा अनुवाद करणारी असल्यामुळें, ही सुत्रसिद्धवाचनिकी देखील आहे. | ७० |
| २० | भाव्यमानोऽप्युकारः सवर्णान् गृह्णाति | ज्ञापकसिद्ध. ‘दिव उत् ’ व ‘ ऋत् उत्’ या सूत्रांतील उकाराचें तपरकरण हिचें ज्ञापक आहे. | ७२ |
| २१ | वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् | सूत्रसिद्धवाचनिकी. ‘प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्’ या सूत्राच्या अर्थाचाच प्रपंच करणारी ही आहे. | ७३ |
| २२ | उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपादिकानि | ज्ञापकसिद्ध. ‘ अतः कृकमि ’ या सूत्रांतील ‘ कंस ’ या पदाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | ७६ |
| २३ | प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम् | सूत्रसिद्धवाचनिकी. ‘ यस्मात् प्रत्ययविधिः ’ व ‘ येन विधिः ’ या दोन सूत्रांतून ही निघाली आहे. | ७७ |
| २४ | प्रत्ययग्रहणे चापञ्चम्याः | स्वतन्त्रवाचनिकी. | ८४ |
| २५ | उत्तरपदाधिकारे प्रत्ययग्रहणे न तदन्तग्रहणम् | ज्ञापकसिद्ध. ‘ हृदयस्य हृल्लेख ’ या सूत्रांतील ‘ लेख ’ या पदाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | ८८ |
| २६ | स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न | स्वतन्त्रवाचनिकी. ‘ ष्यङः सम्प्रसारणम्’ या सूत्रावरील भाष्यांत ही वचनरूपानें पठित केली आहे. | ९० |
| २७ | संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति | ज्ञापकसिद्ध. ‘ सुप्तिङन्तं पदम् ’ या सूत्रांतील ‘ अन्त ’ या शद्वाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | ९६ |
| २८ | कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि | ज्ञापकसिद्ध. ‘ गतिरनन्तरः ’ या सूत्रां- | ९९ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | ग्रहणम् | तील ' अनन्तरः ' या पदाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | |
| २९ | पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च | ' येन विधिः ' या सूत्राच्या अर्थाचा प्रपंच करणारी असल्यामुळें ही सूत्रसिद्ध वाचनिकी आहे. ' पादस्य पदाज्यातिगोपहतेषु ' या सूत्रास ही परिभाषा लागत नाहीं असें भाष्यांत सांगितलें आहे. | १०५ |
| ३० | व्यपदेशिवदेकस्मिन् | ' एकपुत्रसत्वे जेष्ठमध्यमकनिष्ठव्यवहारदर्शनात् ' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध समजावी. | १०७ |
| ३१ | ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति | ' समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' या वार्तिकांतील ' प्रत्यय ' या अंशाचा अनुवाद करणारी असल्यामुळें, ही सूत्रसिद्ध—वार्तिकसिद्ध—वाचनिकी आहे; व तसेंच ही ज्ञापकसिद्ध देखील आहे आणि 'सपूर्वाच्च ' हें सूत्र हिचें ज्ञापक आहे. | ११७ |
| ३२ | व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन | ज्ञापकसिद्ध. 'पूर्वात्सपूर्वादिनिः' असें एक सूत्र न करितां, ' पूर्वादिनिः' व ' सपूर्वाच्च ' अशीं दोन वेगळीं सूत्रें केलीं आहेत हेंच हिचें ज्ञापक होय. | ११९ |
| ३३ | यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे | स्वतन्त्रवाचनिकी. ' येन विधिः ' या सूत्रावरील भाष्यांत ही पठित केली आहे. | १२३ |
| ३४ | सर्वो द्वन्द्वो विभाषयैकवद्भवति | 'चार्थे द्वन्द्वः' या सूत्रांतील 'च' या पदाच्या अर्थाचा अनुवाद करणारी असल्यामुळें ही सूत्रसिद्धवाचनिकी आहे व तसेंच ज्ञापकसिद्ध देखील आहे; ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांतील ' बहुवचनस्य ' हें पद हिचें ज्ञापक आहे. | १२५ |
| ३५ | सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते | ' व्यत्ययो बहुलम् ' या सूत्राचा बहुलम् ' असा योगविभाग केल्यानें, किंवा | १२८ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | | 'षष्ठीयुक्तश्छन्दसि वा' या सूत्राचा 'वा' असा योगविभाग केल्यानें सिद्ध होत असल्यामुळें, ही सूत्रसिद्धवाचनिकी आहे. | |
| ३६ | प्रकृतिवदनुकरणं भवति | ज्ञापकसिद्ध. 'क्षियो दीर्घात्' या सूत्रांतील 'क्षियः' यांतील इयङ्निर्देश हिचा ज्ञापक आहे. प्रातिपदिकास होणारा विभक्तिप्रत्यय धातूचें अनुकरण करणाऱ्या 'क्षि' या शब्दास लावला असल्यामुळें, ही अनित्य आहे. | १२८ |
| ३७ | एकदेशविकृतमन्यवत् | 'छिन्नपुच्छे शुनि श्वत्वव्यवहारः' या लौकिक न्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें ही लौकिक न्यायसिद्ध आहे. 'अभीयात्' इत्यादि रूपें सिद्ध करण्याकरितां लागू पडत नसल्यामुळें, ही अनित्य मानली आहे. | १२९ |
| | २—बाधबीजप्रकरणम् | | |
| ३८ | पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः | या परिभाषेचे वेगळे वेगळे भाग करून पुढील परिभाषांत सांगितले आहेत. त्यांपैकीं 'पूर्वात्परं बलवत्' हा प्रथम भाग या परिभाषेंत दिला आहे, व तो 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्राचा अनुवाद करणारा असल्यामुळें तो भाग सूत्रसिद्धवाचनिकी परिभाषा होय. | १३१ |
| ३९ | पुनः प्रसङ्गविज्ञानात्सिद्धम् | 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्राचाच प्रपंच करणाऱ्या असल्यामुळें या सूत्रसिद्धवाचनिकी आहेत. तें सूत्र विधिपर मानल्यास प. ३९ सिद्ध होते, व नियमपर मानल्यास प. ४० सिद्ध होते. | १३५ |
| ४० | सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव | | १३६ |
| ४१ | विकरणेभ्यो नियमो बलीयान् | ज्ञापकसिद्ध. 'वृद्भ्यः स्यसनोः' या सूत्रांत विकल्पेंकरून परस्मैपदिप्रत्यय होण्याचें विधान केलें आहे तें हिचें ज्ञापक आहे. | १४७ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ४२ | पराान्नित्यं बलवत् | 'अक्लृप्ताभावकस्याभावकल्पनापेक्षया क्लृप्ताभावकस्यैव तत्कल्पनमुचितम्' या तत्त्वावर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | १५४ |
| ४३ | शब्दान्तरस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति | 'यद्व्यक्तिसम्बन्धितया पूर्वं प्रवृत्तिस्तद्व्यक्तिसम्बन्धितयैव पुनः प्रवृत्तौ कृताकृतप्रसङ्गित्वम्' या न्यायाच्या आधारावर रचल्यामुळें या युक्तिसिद्ध आहेत, व यांच्याविरुद्ध प० ४६-४८ असल्यामुळें, या अनित्य ठरतात. | १५५ |
| ४४ | शब्दान्तरात् प्राप्नुवतः शब्दान्तरे प्राप्नुवतश्चानित्यत्वम् | | १५७ |
| ४५ | लक्षणान्तरेण प्राप्नुवन्विधिरनित्यः | | १५८ |
| ४६ | क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता | ' यदा तु शास्त्रव्यतिरेकेण...व्यक्तिविशेषाश्रयणाभावः 'या न्यायावर रचली असल्यामुळें युक्तिसिद्ध, व अनित्य. (पा.१६०) | १६० |
| ४७ | यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम् | 'वालिसुग्रीवयोर्युध्यमानयोर्भगवता वालिनि हतेऽपि सुग्रीवस्य वालितः प्राबल्यं न व्यवहरन्ति । भगवत्सहायैः पाण्डवैर्जये लब्धेऽपि पाण्डवानां प्राबल्यं व्यवहरन्ति च ।' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें या दोन्ही लौकिकन्यायसिद्ध आहेत, व अनित्य आहेत. | १६२ |
| ४८ | यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते तदप्यानित्यम् | | १६३ |
| ४९ | स्वरभिन्नस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति | युक्तिसिद्ध. 'स्वरोऽपि शब्दान्तरत्वसम्पादकः' असा न्याय असल्यामुळें, प. ४३-४६ ज्या न्यायानें सिद्ध होतात त्याच न्यायानें ही सिद्ध होते. | १६४ |
| ५० | असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे | ' मनुष्योऽयं प्रातरुत्थाय प्रथमं स्वशरीरकार्याणि करोति, ततः सुहृदां, ततः सम्बन्धिनाम् ' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ही ज्ञापकसिद्ध देखील आहे व ' वाह ऊठ् ' या सूत्रांतील ' ऊठ् ' ग्रहण हिचें ज्ञापक आहे. ' सम्प्रसारणाच्च ' या सूत्रावरील भाष्यांत ही अनित्य ठरविली आहे. | १६७ |
| ५१ | नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः | ज्ञापकसिद्ध. ' षत्वतुकोरसिद्धः ' या | २२० |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | | सूत्रांतील तुग्ग्रहण हिचें ज्ञापक आहे. ही भाष्यकारांनीं अनावश्यकी मानून प्रत्याख्यात केली असल्यामुळें, स्वीकारार्ह नाहीं. | |
| ५२ | अन्तरङ्गानपि विधीन्बहिरङ्गो लुग्बाधते | ज्ञापकसिद्ध. 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' हें सूत्र किंवा त्या सूत्रांत केलेली 'मपर्यन्तस्य' या सूत्राची अनुवृत्ति, हिचें ज्ञापक आहे. भाष्यरीत्या ही स्वतन्त्रवाचनिकी असून वार्तिकरीत्या ज्ञापकसिद्ध आहे असें कांहीं वैयाकरण म्हणतात. | २३२ |
| ५३ | पूर्वोत्तरपदनिमित्तकार्यात्पूर्वमन्तरङ्गोऽप्येकादेशो न | ज्ञापकसिद्ध. 'नेन्द्रस्य परस्य' हें निषेधसूत्र हिचें ज्ञापक आहे. | २४८ |
| ५४ | अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो ल्यब्बाधते | ज्ञापकसिद्ध. 'अदो जग्धिः' या सूत्रांतील 'ल्यप्' ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | २५४ |
| ५५ | वार्णादाङ्गं बलीयो भवति | ज्ञापकसिद्ध व अनित्य. कित्येकांच्या मतें 'अभ्यासस्यासवर्णे' या सूत्रांतील 'असवर्णे' या पदाचें ग्रहण, पण ग्रन्थकाराच्या मते तें संपूर्ण सूत्र, हिचें ज्ञापक आहे. 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांतील सतुक्क निर्देश हिच्या अनित्यत्वाचा ज्ञापक आहे. | २५६ |
| ५६ | अकृतव्यूहाः पाणिनीयाः | ज्ञापकसिद्ध. 'समर्थानां प्रथमाद्वा' या सूत्रांतील 'समर्थ' हें पद हिचें ज्ञापक आहे. 'अल्लोपोऽनः' या सूत्रांतील तपरकरण हिच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें, ही स्वीकारार्ह नाहीं. | २७५ |
| ५७ | अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान् | 'सर्वथा प्रतिबद्धावकाशस्य सर्वतो बलवत्वदर्शनात्' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | २९७ |
| ५८ | येन नाप्राप्ते यो विधिरारभ्यते स तस्य बाधको भवति | तक्रकौण्डिन्यन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | २९७ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ५९ | क्वचिदपवादविषयेऽप्युत्सर्गोऽभिनिविशत इति | माठरकौण्डिन्यपरिवेषणन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ३०९ |
| ६० | पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्ते नोत्तरान् | ' अवश्यं स्वपरस्मिन् बाधनीये प्रथमोपस्थितानन्तरबाधेन चारितार्थ्ये पश्चादुपस्थितस्य ततः परस्य बाधे मानाभावः ' या न्यायावर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ३२२ |
| ६१ | मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्ते नोत्तरान् | ' पूर्वोपस्थितबाधेन नैराकाङ्क्ष्यम् ' या तत्वावर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ३२३ |
| ६२ | अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति | प्रत्यासत्तिन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. | ३२५ |
| ६३ | पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः | लक्षणैकचक्षुष्कलक्ष्यैकचक्षुष्कबुद्धिमूलक न्यायावर रचल्या असल्यामुळें ह्या दोन्ही परिभाषा युक्तिसिद्ध आहेत. | ३२८ |
| ६४ | प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते | | ३३२ |
| ६५ | उपसंजनिष्यमाणनिमित्तोऽप्यपवाद उपसंजातनिमित्तमप्युत्सर्गं बाधत इति | ' उत्सर्गशास्त्रप्रवृत्त्यसम्भावनाप्रयोज्यापवादशास्त्रप्रवृत्तिसम्भावना ' या तत्वावर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ३३३ |
| ६६ | अपवादो यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यते | 'निरवकाशत्वरूपस्य बाधकत्वबीजस्याभावात् '—म्हणजे अपवाद सावकाश झाल्यामुळें त्याचें बाधकत्व नष्ट होतें—या न्यायावर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ३३९ |
| ६७ | अभ्यासविकारेषु बाध्यबाधकभावो नास्ति | ज्ञापकसिद्ध. 'दीर्घोऽकितः' या सुत्रांतील अकिद्ग्रहण हिचें ज्ञापक आहे. | ३४२ |
| ६८ | ताच्छीलिकेषु वासरूपविधिर्नास्ति | ज्ञापकसिद्ध. 'निन्दाहिंसाक्लिश' या सूत्रांत ' वुञ् ' प्रत्यय व्हावा असें जें विधान | ३४५ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | | केलें आहे तें हिचें ज्ञापक आहे. ' सूद-दीपदीक्षश्च' या सूत्रांत ' दीप् ' धातूला ' युच् ' प्रत्यय न व्हावा असा निषेध केला असल्यामुळें, ही अनित्य ठरते. वास्तविक ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र अनित्य असल्यामुळें प० ६८,६९ व ७० सिद्ध होतात. म्हणून त्या युक्तिसिद्ध समजाव्या. | |
| ६९ | क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु वासरूपविधिर्नास्ति | वर सांगिल्याप्रमाणें युक्तिसिद्ध. | ३४८ |
| ७० | लादेशेषु वासरूपविधिर्नास्ति | वर सांगितल्याप्रमाणें युक्तिसिद्ध. तसेंच ही ज्ञापकसिद्धहि आहे व ' हशश्वतोर्लङ् च ' या सूत्रांत केलेलें लङ्विधान हिचें ज्ञापक आहे. | ३५० |
| ७१ | उभयनिर्देशे पञ्चमीनिर्देशो बलीयान् | ' तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र ' तस्मिन्निति निर्दिष्टे ' या सूत्राच्या मानानें परसूत्र असल्यामुळें ही सिद्ध होते आणि म्हणून ही युक्तिसिद्ध समजावी. | ३५२ |
| ७२ | प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम् | ज्ञापकसिद्ध. ' कुमारः श्रमणादिभिः ' या सूत्रांत केलेला स्त्रीलिङ्ग श्रमणादि पाठ हिचा ज्ञापक आहे. ' शक्तिलाङ्गलाङ्कुश ' या वार्तिकांतील 'घटघटी' ग्रहण हिच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे, व भाष्यकारांनीं सांगितल्याप्रमाणें ही सात ठिकाणीं अनित्य आहे. | ३५५ |
| ७३ | विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम् | परिभाषा ७२ अनित्य असल्यामुळें, तिच्या अनित्यत्वामुळें ही परिभाषा सिद्ध होते व म्हणून ही युक्तिसिद्ध आहे. | ३६० |
| ७४ | सूत्रे लिङ्गवचनमतन्त्रम् | ज्ञापकसिद्ध. ' अर्धं नपुंसकम् ' या सूत्रांतील ' नपुंसकम् ' या पदाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. धान्यपलालन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध देखील आहे. | ३६१ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ७५ | नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः | ' न हि अब्राह्मणमानयेत्युक्ते लोष्टमानीय कृती भवति ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ३६२ |
| ७६ | गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः | ज्ञापकसिद्ध. ' उपपदमतिङ् ' या सूत्रांतील 'अतिङ् ' ग्रहण हिचें ज्ञापक आहे. ही युक्तिसिद्ध देखील मानतां येते. ही अनित्य आहे, व 'अम्बाम्ब ' या सूत्रांतील ' गो. भूमि ' इत्यादि पदांचें ग्रहण हिच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे. कित्येकांचे मतें ही अनित्य नाहीं. | ३६५ |
| ७७ | साम्प्रतिकाभावे भूतपूर्वगतिः | ' तत्तद्वचनसामर्थ्यन्यायसिद्धेयम्.' 'काकवत् देवदत्तस्य गृहम् ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ( पहा पान ३७३ ) | ३७२ |
| ७८ | बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि | ' सिद्धं तु तद्गुणसंविज्ञानात्पाणिनेर्यथा लोके ' असें भाष्यांत म्हटलें असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ३७४ |
| ७९ | चानुकृष्टं नोत्तरत्र | 'अन्ययेऽयथाभिप्रेताख्याने' या सूत्रांतील ' णमुल् ' ग्रहण हिचें ज्ञापक आहे व ही ज्ञापकसिद्ध आहे. ही अनित्य आहे. 'लुटि च क्लृपः ' या सूत्रावरील भाष्यांत अनुवृत्यर्थक सर्व चकारांचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, ही भाष्यविरुद्ध ठरते व म्हणून स्वीकारार्ह नाहीं. | ३७६ |
| ८० | स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत् | ज्ञापकसिद्ध. ' नोत्तरपदे ' या सूत्रांतील पृथिव्यादि पर्युदास हिचा ज्ञापक आहे. कैयटाच्या मतें ही अनावश्यकी आहे व भाष्यांत देखील तसेंच ध्वनित केलें आहे. | ३७८ |
| ८१ | हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत् | ज्ञापकसिद्ध. ' यतोऽनावः ' या सूत्रांतील ' अनावः ' हा प्रतिषेध हिचा ज्ञापक आहे. | ३८० |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ८२ | निरनुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य | ज्ञापकसिद्ध. ' वामदेवाड्ड्यड्डयौ ' या सूत्रांतील प्रत्ययांचें डित्करण यांचें ज्ञापक आहे. | ३८२ |
| ८३ | तदनुबन्धकग्रहणे नातदनुबन्धकस्य | | ३८२ |
| ८४ | क्वचित्स्वार्थिकाः प्रकृतितो लिङ्गवचनान्यतिवर्तन्ते | ज्ञापकसिद्ध. 'णचः स्त्रियाम्' या सूत्रांतील ' स्त्रियाम् ' हें पद हिचें ज्ञापक आहे. | ३८७ |
| ८५ | समासान्तविधिरनित्यः | ज्ञापकसिद्ध. ' प्रतेरंश्वादयस्तत्पुरुषे ' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्य अंश्वादिगणांमध्यें जो ' राजन् ' शद्बाचा पाठ केला आहे तो हिचा ज्ञापक आहे. | ३८८ |
| ८६ | सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य | 'उपजीव्यविरोधस्यायुक्तत्वम् ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ' कष्टाय क्रमणे ' या सूत्रांतील ' कष्टाय ' हा निर्देश हिच्या अनित्यत्वाचा ज्ञापक आहे, व भाष्यांत सांगितल्याप्रमाणें ही आठ ठिकाणीं अनित्य आहे. | ३८९ |
| ८७ | सन्नियोगशिष्टानामन्यतरापाय उभयोरप्यपायः | ज्ञापकसिद्ध. ' बिल्वकादिभ्यश्छस्य लुक् ' या सूत्रांतील छग्रहण हिचें ज्ञापक आहे. तसेंच ही लौकिकन्यायसिद्ध देखील आहे. 'एकैकस्मिन् प्रयोजने येषां सहाधिकारस्तत्रान्यतरनिवृत्तावितरनिवृत्तिः ' या लौकिकन्यायावर ही रचली आहे. ( पहा पा. ४१० ) | ४०८ |
| ८८ | ताच्छीलिके णेऽणकृतानि भवन्ति | ज्ञापकसिद्ध.'कार्मस्ताच्छील्ये' या सूत्रान्वयें ' कार्म ' शद्बाची जी निपातनानें सिद्धि केली आहे ती हिची ज्ञापिका आहे. कित्येकांच्यामतें ' छत्रादिभ्यो णः ' असें सूत्र केलें असल्यामुळें ही अनित्य आहे. ( पहा पा. ४१४ ) | ४१३ |
| ८९ | धातोः कार्यमुच्यमानं तत्प्रत्यये भवति | ज्ञापकसिद्ध. ' भ्रौणहत्य ' यांतील तत्वनिपातन हिचें ज्ञापक आहे. ( पहा पा. | ४१५ |

| पं. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | | ४१५ ) ' न भूसुधियोः ' असें निषेधक-सूत्र असल्यामुळें, ही अनित्य आहे. | |
| ९० | तन्मध्यपतितस्तद्ग्रहणेन गृह्यते | ज्ञापकसिद्ध. ' नेदमदसोरकोः' या सूत्रांतील 'अकोः' हा निषेध हिचा ज्ञापक आहे. | ४१९ |
| ९१ | लुग्विकरणालुग्विकरणयोरलुग्विकरणस्य | ज्ञापकसिद्ध. पाणिनीय सूत्रांत हिचें कोठेंहि ज्ञापक नसून ' यस्य विभाषा ' या सूत्रावरील भाष्य हिचें ज्ञापक आहे. ही भाष्यांत साक्षात् पठित केली नसून ध्वनित केली आहे. | ४२१ |
| ९२ | प्रकृतिग्रहणे ण्यधिकस्यापि ग्रहणम् | ज्ञापकसिद्ध. ' हेरचङि ' या सूत्रांतील ' अचङि ' हा प्रतिषेध हिचा ज्ञापक आहे. ही कुत्वविषयकच आहे. | ४२४ |
| ९३ | अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिः | ज्ञापकसिद्ध. ' ज्यादादीयसः ' या सूत्रांतील ' आत् ' ग्रहण व तसेंच ' ज्ञाजनोर्जा ' या सूत्रांतील ' जा ' ग्रहण हिचें ज्ञापक आहे. पाणिनीयसूत्रांत ' द्वयोः ' असा निर्देश असल्यामुळें ही अनित्य आहे. कित्येकांचें मतें ही अनावश्यकी आहे. | ४२६ |
| ९४ | संज्ञापूर्वकविधेरनित्यत्वम् | ज्ञापकसिद्ध. ' ओर्गुणः ' या सूत्रांतील ' गुण ' शद्वाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३१ |
| ९५ | आगमशास्त्रमनित्यम् | ज्ञापकसिद्ध. ' आनि लोट् ' या सूत्रांतील आडागमाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३२ |
| ९६ | गणकार्यमनित्यम् | ज्ञापकसिद्ध. ' तनादिकृञ्भ्यः ' या सूत्रांतील ' कृञ् ' शद्वाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३३ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ९७ | अनुदात्तेत्त्वलक्षणमात्मनेपदमनित्यम् | ज्ञापकसिद्ध. ' चक्षिङ् ' धातूचें ङित्करण हिचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३४ |
| ९८ | नञ्घटितमनित्यम् | ज्ञापकसिद्ध. ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' या सूत्रांतील ' वर्जं ' शब्दाचें ग्रहण हिचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३५ |
| ९९ | आतिदेशिकमनित्यम् | ज्ञापकसिद्ध. ' लोटो लङ्वत् ' हें सूत्र हिचें ज्ञापक मानलें आहे. कित्येक ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र हिचें ज्ञापक मानतात. (पहा पा. ४४०) भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३९ |
| १०० | सर्वविधिभ्यो लोपविधिरिड्विधिश्च बलवान् | ज्ञापकसिद्ध. ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र हिच्या प्रथमांशाचें ज्ञापक मानलें असून ' आर्धधातुकस्येट् ' या सूत्रांतील इट्ग्रहण द्वितीयांशाचें ज्ञापक मानलें आहे. पहा ( पा. ४४१ ) भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४३९ |
| १०१ | प्रकृतिग्रहणे यङ्लुगन्तस्यापि ग्रहणम् | ' षाष्ठद्वित्वस्य द्विः प्रयोगत्वसिद्धान्तेन प्रयोगद्वयरूपे समुदाये प्रकृतिरूपत्वबोधनम् ' या शास्त्रीयन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४४२ |
| १०२ | विधौ परिभाषोपतिष्ठते नानुवादे | ' विध्यङ्गभूतानां परिभाषाणां विधेयेन असिद्धतया सम्बन्धासम्भवेऽपि तद्विशेषणे व्यवस्थापकत्वेन चरितार्थानां तद्विशेषणव्यवस्थापकत्वे मानाभावः ' या शास्त्रीयन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ४४६ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| १०३ | उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी | स्वतन्त्रवाचनिकी. | ४५३ |
| १०४ | अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य | स्वतन्त्रवाचनिकी. | ४५९ |
| १०५ | नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरनभ्यासविकारे | ज्ञापकसिद्ध. ' नाम्रेडितस्यान्त्यस्य तु वा ' या सूत्रांतील ' अन्त्यस्य ' या पदाचें ग्रहण हिच्या प्रथमांशाचें ज्ञापक असून, ' अर्तिपिपर्त्योश्च ' या सूत्रांतील ' पिपर्ति ' शद्वाचें ग्रहण ' अनभ्यासविकारे ' या द्वितीयांशाचें ज्ञापक आहे. (पहा पा० ४६७) भाष्यकारांनीं ही पठित करून प्रत्याख्यात केली आहे. | ४६६ |
| १०६ | प्रधानाप्रधानयोः प्रधाने कार्यसम्प्रत्ययः | ' लोके बहुषु गच्छत्सु राजा गच्छतीति प्रधाने राजा व्यपदिश्यते । राज्ञश्च प्राधान्यं तदधीनप्रवृत्तिनिवृत्तित्वादन्येषाम् ' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे (पहा पा.४७०) | ४६९ |
| १०७ | अवयवप्रसिद्धेः समुदायप्रसिद्धिर्बलीयसी | मीमांसेंतील रथाधिकरणन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. | ४७० |
| १०८ | व्यवस्थितविभाषयापि कार्याणि क्रियन्ते | स्वतन्त्रवाचनिकी. | ४७२ |
| १०९ | विधिनियमसम्भवे विधिरेव ज्यायान् | ' नियमे ह्यश्रुताया अन्यनिवृत्तेः सामर्थ्यात्परिकल्पनमुक्तानुवाददोषश्चेति लाघवाद्विधिरेव' या मीमांसाशास्त्रांतील न्यायानें सिद्ध होत असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ४७५ |
| ११० | सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः | ' सामान्योपस्थितिकाले नियमेन विशेषोपस्थापकसामग्र्यभावः ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ही अनित्य आहे, व ' न ल्यपि ' हें सूत्र हिच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे. | ४७७ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| १११ | प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्य ग्रहणम् | स्वतन्त्रवाचनिकी. ही एकदेशीची उक्ति असल्यामुळें व भाष्यांत इष्टरूपें सिद्ध करण्याकरितां कोठेंहि हिचा उपयोग केला नसल्यामुळें ही अनावश्यकी आहे. ( पहा पा. ४८१ ) | ४७९ |
| ११२ | सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम् | ' सहचरणं सदृशयोरेव ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. 'द्वित्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे' या सूत्रांत 'कृत्वोऽर्थे' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें ही अनित्य मानली आहे ( पहा पा. ४८५ ) | ४८२ |
| ११३ | श्रुतानुमितयोः श्रुतसम्बन्धो बलवान् | ' प्रकरणादितः श्रुतेः बलवत्वम् ' या मीमांसान्यायानें सिद्ध होत असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ४८६ |
| ११४ | लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् | प्रतिपदोक्त शीघ्रोपस्थितिक व लाक्षणिक विलम्बोपस्थितिक या लौकिक लाघवगौरवमूलकन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ( पहा पा. ४९३ ) | ४९१ |
| ११५ | गामादाग्रहणेष्वविशेषः | ज्ञापकसिद्ध ' देप् ' धातूचें पित्वकरण हिच्या एकांशाचें ज्ञापक आहे व ' एकदेशानुमतिद्वारा सम्पूर्णपरिभाषा ज्ञाप्यते ' असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे. ( पहा पा. ४९७-९८ ) | ४९६ |
| ११६ | प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः | ' देवदत्तादयो भोज्यन्ताम् ' या लौकिकन्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ४९९ |
| ११७ | क्वचित्समुदायेऽपि | ' गर्गाः शतं दण्ड्यन्तामर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति ' या लौकिकन्यायानें सिद्ध असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ५०० |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| ११८ | अभेदका गुणाः | ज्ञापकसिद्ध. 'अस्थिदधि' या सूत्रांतील 'उदात्तः' या पदाचें ग्रहण हिंचें ज्ञापक आहे. कैयटाचें असें म्हणणें आहे कीं अष्टाध्यायी स्वरयुक्त पठित आहे असा पक्ष स्वीकारल्यास, 'चतसर्याद्युदात्त-निपातनं करिष्यते' इत्यादि भाष्य हिंचें ज्ञापक समजावें. | ५०१ |
| ११९ | बाधकान्येव निपातनानि | 'येन नाप्राप्ते' या न्यायानें सिद्ध होत असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. | ५१२ |
| १२० | पर्जन्यवल्लक्षणप्रवृत्तिः | पर्जन्यरूप लौकिक दृष्टान्तावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ५१४ |
| १२१ | निषेधाश्च बलीयांसः | 'यस्योन्मूलनाय यस्य प्रसक्तिर्भवति ततस्तस्य बलवत्त्वं, कंसात् कृष्णस्येव' या लौकिकन्यायावर रचली असल्यामुळें ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ५१९ |
| १२२ | अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे | 'उपस्थितं परित्यज्य अनुपस्थितपरिकल्पने मानाभावः' या शास्त्रीयन्यायावर रचली असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. | ५२३ |
| १२३ | योगविभागादिष्टसिद्धिः | 'तत्तत्समानविधिकद्वितीययोगेन विभक्तस्यानित्यत्वज्ञापनम्' या शास्त्रीयन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें ही युक्तिसिद्ध आहे. | ५२५ |
| १२४ | पर्यायशब्दानां लाघवगौरवचर्चा नाद्रियते | ज्ञापकसिद्ध. 'अन्यतरस्यां विभाषा वेति सूत्रनिर्देशज्ञापितमिदम्' | ५२६ |
| १२५ | ज्ञापकसिद्धं न सर्वत्र | 'स्पष्टमेव पठितव्येऽनुमानाद्बोधनमसार्वत्रिकत्वार्थम्' या युक्तीवर रचली असल्यामुळें, ही युक्तिसिद्ध आहे. | ५२६ |
| १२६ | पूर्वत्रासिद्धीयमद्वित्वे | ज्ञापकसिद्ध. 'अणुदित् सवर्णस्य' या सूत्रातील अण्ग्रहण हिंचें ज्ञापक आहे व | ५२९ |

| प. अं. | परिभाषा. | परिभाषाप्रकार. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| | | ' उभौ साभ्यासस्य ' हें सूत्र असल्यामुळें ही अनित्य ठरते ( पहा पा. ५३३) | |
| १२७ | एकस्या आकृतेश्चरितः प्रयोगो द्वितीयस्यास्तृतीयस्याश्च न भविष्यति | लाघवगौरवमूलक लौकिकन्यायावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. ( पहा पा. ५३५ ) | ५३३ |
| १२८ | सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् | भाष्यकारांनीं ही प्रत्याख्यात केली आहे. | ५३५ |
| १२९ | क्वचिद्विकृतिः प्रकृतिं गृह्णाति | } भाष्यांत पठित नसल्यामुळें ह्या स्वीकारार्ह नाहींत. | ५३७ |
| १३० | औपदेशिकप्रायोगिकयोरौपदेशिकस्यैव ग्रहणम् | | ५३८ |
| १३१ | श्तिपा शपानुबन्धेन निर्दिष्टं यद्गणेन च। यत्रैकाज्ग्रहणं चैव पञ्चैतानि न यङ्लुकि | ज्ञापकसिद्ध. ' एकाच उपदेशे ' या सूत्रांतील एकाज्ग्रहण हिच्या एका अंशाचें ज्ञापक आहे. भाष्यांत पठित नसल्यामुळें ही स्वीकारार्ह नाहीं. | ५४१ |
| १३२ | पदगौरवाद्योगविभागो गरीयान् | लाघवगौरवमूलक लौकिकन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे, पण भाष्यविरुद्ध असल्यामुळें, स्वीकारार्ह नाहीं. | ५५३ |
| १३३ | अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः | लाघवगौरवमूलक लौकिकन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें, ही लौकिकन्यायसिद्ध आहे. | ५५५ |

**टीपः**—प्रस्तावना पा. ७ ओ. २९ येथील ' ह्याविचारणीया ' च्या जागीं ' ह्यविचारणीया ' असें वाचावें, व तसेंच पा. ९ ओ. ३ येथील ' रिकामी खाली ' च्या जागीं ' जागा रिकामी ' असें वाचावें.



# अक्षरानुक्रमवार परिभाषासूचीपत्र.



# अभिप्राय.

प्रकृतग्रन्थावर अनेक विद्वान् व्याकरणाचार्यांनीं दिलेले अभिप्राय:—

(१). महामहोपाध्याय व्याकरणाचार्य माधवशास्त्री भाण्डारी, प्रधानाध्यापक, ओरिअॅन्टल् कॉलेज, लाहोर लिहितात—रा. ब. वाडेगांवकर साहेबांनीं परिभाषेन्दुशेखर ग्रन्थावर मराठी भाषेंत केलेली टीका मी बहुतेक सर्व वाचली. त्यावरून मराठी भाषेंत फार बहुमूल्य शास्त्रीय ग्रन्थाची भर पडली आहे असें मला पूर्णपणें वाटतें. या टीकेची भाषा अगदीं सरळ आहे व पूर्णपणें ग्रन्थाचें अक्षरशः विवेचन व प्रक्रियेचा स्पष्टपणें सर्व खुलासा अत्यंत सुबोध रीतीनें केला आहे. हा ग्रन्थ महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांना उपकारक तर होईलच, पण शास्त्री लोकांना सुद्धा अत्यंत मान्य होईल असा मला विश्वास वाटतो. वाडेगांवकर साहेब या अपूर्व कामगिरीबद्दल अत्यंत धन्यवादार्ह आहेत.

(२). व्याकरणाचार्य श्री. गणपतिशास्त्री मोकाटे, व्याकरणशास्त्राचे मुख्याध्यापक, क्वीन्स् कॉलेज, बनारस, लिहितात—श्री. महोदय बाबासाहेब वाडेगांवकर यांनीं परिभाषेन्दुशेखर ग्रन्थावर महाराष्ट्रभाषेंत स्वतः बनविलेली टीका मला दाखविली. ती टीका कांहीं कांहीं ठिकाणीं मी आपाततः वाचून पाहिली. मुळाच्या पंक्तीचा अर्थ मराठींत सुंदर रीतीनें उतरला आहे. उदाहरणेंहि सूत्रांचे अंक देऊन फार विशद रीतीनें सोडवून दाखविलीं आहेत. एवंच हा ग्रन्थ कौमुदी शिकलेल्या विद्यार्थ्यांना उपकारक होईल असें मला वाटतें.

(३). व्याकरणाचार्य श्री. कालिदासशास्त्री जोशी, बनारस, लिहितात—रा. ब. ना. दा. वाडेगांवकरसाहेब यांनीं परिभाषेन्दुशेखराचें जें मराठींत भाषांतर व विवेचन केलें आहे त्यापैकीं ५५ प. छापून तयार आहेत. त्या सर्व मी काळजीपूर्वक वाचून पाहिल्या व तसेंच बऱ्याच इतर परिभाषा देखील वाचल्या. रा. ब. साहेबांनीं प्रत्येक पंक्तीचा अक्षरार्थ देऊन त्या पंक्तीच्या अर्थाचें कंसांत विस्तृत विवेचन केलें आहे. पंक्तीचा अर्थ नीट लक्षांत येण्याकरितां जेथें उदाहरणांची आवश्यकता आहे तेथें आवश्यक उदाहरणें देऊन त्यांची प्रक्रियापूर्वक सिद्धि करून दाखविली आहे. प्रक्रिया लिहितांना त्यांनी सूत्राङ्क देऊन पाणिनीय सूत्रें सांगितलीं आहेत. त्यामुळें प्रक्रिया एकदम ध्यानांत येते. ग्रन्थाची भाषा फार सोपी व सरळ असल्यामुळें व होतां होई तों पर्यंत पारिभाषिक शब्द वापरले नसल्यामुळें, विद्यार्थ्यास प्रत्येक पंक्तीचा अर्थ उत्तम रीतीनें ध्यानांत येण्यास कांहींच अडचण येत नाहीं. सारांश हा ग्रन्थ

सर्वांगसुंदर व छात्रवर्गास अत्यंत हितावह झाला आहे. परिभाषेन्दुशेखर व्याकरणशास्त्रांतील फार कठीण ग्रन्थ असल्यामुळें, अशा भाषांतराची विद्यार्थिवर्गास फार गरज होती. रा. ब. साहेबांनीं ती गरज भरून काढल्यामुळें त्यांना जितके धन्यवाद दिले तितके कमीच आहेत. माझी पूर्ण उमेद आहे कीं ज्या विद्यार्थ्यानें कौमुदी वाचली आहे त्याला प्रकृतभाषांतराच्या सहायानें परिभाषेन्दुशेखर ग्रन्थ उत्तम रीतीनें समजण्यांत कांहींच अडचण येऊं नये. एवढया उतारवयांत अविश्रान्त परिश्रम करून रा. ब. साहेबांनीं हें जें विस्तृत भाषांतर केलें आहे त्या योगानें त्यांनीं विद्यार्थिवर्गावर फार मोठा उपकार केला आहे.

( ४ ). व्याकरणाचार्य पं. चतुर्वेदी एम्. ए. मॉरिस कॉलेज, नागपूर येथील संस्कृताचे प्रोफेसर लिहितात—

I had the privilege of having gone carefully through the major portion of the marathi version of परिभाषेन्दुशेखर by R. B. N. D. Wadegaonker. The translation is lucid and accurate and leaves nothing to be desired for an intelligent understanding of the text. The learned translator has not only taken care to refer to the important sutras required in the प्रक्रिया of the forms—the knowledge of which is indispensable if one wishes to go through the subtleties of the text, but has made the translation immensely useful by adding within brackets explanatory notes and giving, at the end, in case of important परिभाषाs an analytic summary of the various views on the subject. R. B. Saheb, being a retired high officer in the Judicial service, it is no wonder that he has brought his critical faculty of judgment and the method of logical presentation to the work and has given us a lucid and threadbare explanation of **each and every** word of the Text—which few scholars would have done so successfully. With his masterly knowledge of analysing and sifting facts and penetrative insight into the application of maxims of interpretation, he has rendered an invaluable service to the students of नागोजीभट्ट whose work, being overloaded by hair-splitting commentaries, has been growing obscure.

I myself have the honour of having studied the work in the traditional way from Benares Pandits; but I must confess, without hesitation, that on many a point I have been benefitted by reading Rao Bahadur's version, for its clear cut explanation of obscure points has made the Text more intelligible. A sanskrit student, who has studied सिद्धान्त कौमुदी should, in my opinion, be able to understand परिभाषेन्दुशेखर—the standard and unique work of its type—without the help of a teacher. Herein lies the intrinsic merit and speciality of the work—a distinct improvement on Kielhorn's English version of the Text, which, though precise and logically written, frightens many students by its terse and pithy style. A Hindi rendering of the Marathi version should be more useful, for it will then reach many more deserving hands.

I pray God for a long period of Rao Bahadur's retired career to enable him to do still more work in making the scholarly works of the Paninian system of grammar more easily intelligible to the Sanskrit students.

( ५ ). व्याकरणाचार्य पंडित गोपाळशास्त्री नेने, क्वीन्स् कॉलेज, बनारस येथील व्याकरणशास्त्राचे अध्यापक लिहितात:—

श्रीमद्भिर्माननीयैर्नागपूरनिवासिभिर्भूतपूर्वप्राड्विवाकप्रवरैर्बाबासाहेबमहोदयैरचिरादेव विरचितं परिभाषेन्दुशेखरस्य महाराष्ट्रभाषान्तरमापाततोऽवलोकितम् । शास्त्रीयग्रन्थेषु पारिभाषिकशब्दानां भाषान्तरकरणमतिदुश्शकमपि यथावद्ग्रन्थकाराभिप्रायप्रदर्शकं तत्र तत्रानूदितमवलोक्य सर्वस्यापि विदुषो मनसो मोदमावहेत् । अस्मिन् पुस्तके प्रथमतो ग्रन्थस्य शब्दतोऽनुवादं विरच्य तत्स्पष्टीकरणाय कृतश्श्रीमतां प्रयत्नोऽतीव स्तुत्यो वर्तते । तेनेदं पुस्तकं महाराष्ट्रभाषाभाषिणामल्पसंस्कृतज्ञानामपि महतो ग्रन्थस्य परिभाषेन्दुशेखरस्य याथातथ्येनार्थप्रकाशकं भवेदिति मदीयो विश्वासः ।

( ६ ). व्याकरणाचार्य व मीमांसातीर्थ पं० अनन्तशास्त्री फडके, क्वीन्स् कॉलेज, बनारस येथील अध्यापक लिहितात—

श्रीयुतैः प्राड्विवाकप्रवरैः श्रीबाबासाहेबवाडेगांवकरमहोदयैः परिभाषेन्दुशेखरस्य महाराष्ट्रभाषायां कृतं नूतनं सोदाहरणं व्याख्यानं बहुषु स्थलेषु मया सुसमालोचितम् । सम्यग्मूलार्थद्योतिभिः सुललितैः पदैः कृतमेतद्व्याख्यानं नीरसव्याकरणग्रन्थस्यान्यभाषायां सुललितैः पदैः कर्तव्यस्यानुवादस्याद्यमुदाहरणं भवेदिति वदतो मम जिव्हामसत्यवाददोषो न स्पृशेदिति निश्चितम् । अत्र सर्वत्र स्थलेषूदाहरणानि सूत्राङ्कप्रदर्शनपूर्वकं सम्यक्तया विवृतानि । कौमुदीं पठित्वाऽग्रिमग्रन्थपिपठिषूणां छात्राणां कृतेऽतीवोपकारकमेतद्व्याख्यानं भवेदिति निःसन्दिग्धं मे मतम् ।

( ७ ). व्याकरणाचार्य पं. मुकुन्दशास्त्री पुणतामकर, साङ्गवेद विद्यालय, काशी येथील व्याकरणशास्त्राचे अध्यापक लिहितातः—

श्रीमद्भिस्तत्रभवद्भिः रावबहादुरपदमलङ्कुर्वाणैर्भूतपूर्वन्यायाधीश्वरैर्विविधविद्यानदीष्णैः ना. दा. वाडेगांवकरमहानुभावैर्विनिर्मितं महाराष्ट्रभाषया परिभाषेन्दुशेखरस्य व्याख्यानं यथामति विलोकयता मया नितरामवर्णनीय आनन्दसन्दोहोऽनुभूतः । यतोऽत्र महाराष्ट्रभाषायां ग्रन्थतात्पर्यनिर्णयसमर्थानां पर्यायशब्दानां प्रदानं महाराष्ट्रभाषायाः समधिकवैदुष्यपरिचायकमित्यत्र नास्ति द्वापरः । किञ्च मध्ये समुपदर्शितायां प्रक्रियायां मया यावान् ग्रन्थोऽवलोकितस्तत्राऽशुद्धिदोषोऽपि मदीयदृष्टिपथं नागतः । अहोऽतितरामेषां समुद्यमः श्लाघ्यः ।...............

( ८ ). गीर्वाणवाग्वर्धिनी सभेच्या विद्वान् सभासदांचे मत त्या सभेचे मन्त्री खाली लिहिल्याप्रमाणें कळवितातः—

श्रीमद्भिर्विदर्भराजधानीनिवासिभिर्न्यायाधीशपदाधिष्ठितैर्वाडेगांवकरमहोदयैर्व्याकरणशास्त्रीयपरिभाषेन्दुशेखरग्रन्थो गुरुमुखादवधृत्य व्युत्पत्सुपाश्चात्यभाषाविद्यार्थिनां सौकर्याय सुरुचिरमहाराष्ट्रभाषया प्रसन्नेन वाग्गुम्फेन प्रथमतयाऽनूद्योपदिष्टोऽस्माकं चेतश्चमत्करोति । वाडेगांवकरमहोदयानामयमुद्योगोऽत्यन्तं प्रशस्यः । उपदेश्यतया अभिप्रेतानां पाश्चात्यविद्यार्थिनां सम्यक् हितावहश्चेति वयं प्रतीमः । श्रीमतां कीर्तिवर्द्धिनी इयं कृतिः श्रीविश्वेश्वरप्रसादेन सुचिरमेधतामिति समाशास्महे । इति काशीस्थगीर्वाणवाग्वर्धिनीसभासदां सम्मतं मतं निवेदयामः ।

सभापतिः—**गोपाळभट्टभट्टः** मन्त्रीः—**हरिराम शुक्लः**



* श्रीगणेशायनमः *

# परिभाषेन्दुशेखराचें मराठी भाषांतर.

गणाधिपं नमस्कृत्य सर्वारिष्टविनाशकम् ।
सकलार्थप्रदां चाम्बां मातापुरनिवासिनीम् ॥ १ ॥
त्र्यंकटेशं च वरदं पाणिन्यादीन्मुनींस्तथा ।
विद्वच्छ्रेष्ठं च नागेशं सर्वशास्त्रविशारदम् ॥ २ ॥
दुर्बोधपरिभाषेन्दुशेखरस्य सुबोधकम् ।
भाषान्तरं महाराष्ट्र्यां कुर्वे गुरुप्रसादतः ॥ ३ ॥
क्वाहं मन्दमतिः क्वायं परिभाषेन्दुशेखरः ।
बहुभिः पण्डितैर्यत्नः कृतो यस्यार्थबोधने ॥ ४ ॥
गुर्वादेशात्तथाप्येतत् क्रियते साहसं मया ।
गुर्वाज्ञा नावमन्तव्येति हि सर्वत्र विश्रुतम् ॥ ५ ॥
अतो मे साहसमिदं क्षन्तव्यं पण्डितैरिति ।
विनयावनतो भूत्वा प्रार्थयेहं कृताञ्जलिः ॥ ६ ॥
ये व्याकरणशास्त्रज्ञास्तदर्थं नायमुद्यमः ।
अल्पज्ञा मन्दमतयस्तदर्थमयमुद्यमः ॥ ७ ॥
स्खलितानि दुरुक्तानि ग्रन्थेऽस्मिन्स्युः पदे पदे ।
प्रदर्शितानि चेत्तानि महाननुग्रहो भवेत् ॥ ८ ॥

---

## प्रथमं प्रकरणम्

**नत्वा साम्बं शिवं ब्रह्म नागेशः कुरुते सुधीः ।**
**बालानां सुखबोधाय परिभाषेन्दुशेखरम् ॥१॥**

परब्रह्मस्वरूपी साम्ब ( अम्बेसहित ) सदाशिवास नमस्कार करून ( महाभाष्यादि आकरग्रन्थांचें अध्ययन केलें नसल्यामुळें परिभाषांचा अर्थ ज्यांना नीट रीतीनें अवगत झाला नाहीं अशा ) लोकांना ( परिभाषांचा अर्थ ) सहजपणें कळावा या हेतूनें पण्डित नागेश परिभाषेन्दुशेखर ( नामक ग्रन्थ ) करितो.

**प्राचीनवैयाकरणतन्त्रे वाचनिकान्यत्र पाणिनीयतन्त्रे ज्ञापकन्यायसिद्धानि भाष्यवार्त्तिकयोरुपनिबद्धानि यानि परिभाषारूपाणि तानि व्याख्यायन्ते ।**

पुरातन वैयाकरण ( इन्द्र इत्यादिकांनीं ) केलेल्या व्याकरणग्रन्थांत सूत्ररूपानें पठित पण पाणिनीयशास्त्रांत ( अष्टाध्यायीमध्यें ) ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध असलेल्या

ज्या परिभाषा भाष्यांत किंवा वार्तिकांत सांगितल्या आहेत अशा परिभाषांची ( ह्या ग्रन्थांत ) व्याख्या केली जाते.

---

## परिभाषा १

**ननु लण्अइउण्सूत्रयोर्णकारद्वयस्यैवोपादानेनाणिण्ग्रहणेषु सन्देहाद्निर्णयोऽत आह—**

( माहेश्वर सूत्रांत ) 'ण्' हा अनुबन्ध दोन ठिकाणीं म्हणजे एकदां 'अइउण्' ह्या प्रथम सूत्रांत व पुनः 'लण्' ह्या सहाव्या सूत्रांत आढळतो. तेव्हां 'अण्' किंवा 'इण्' प्रत्याहारानें कोणत्या णकाराचें ग्रहण करावें असा संशय उत्पन्न होतो; व ( पाणिनीचा उद्देश काय होता हें कळण्यास अष्टाध्यायींत साधन नसल्यामुळें) संशयाचें निराकरण होत नाहीं. अशा स्थितींत काय करावें ह्मणून ही परिभाषा सांगतातः—

**व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि सन्देहादलक्षणम् ॥ १ ॥**

( कोणत्याहि सूत्रांतील शब्दांच्या अर्थाबद्दल संशय उत्पन्न झाला असतां, भाष्यकारादिकांच्या ) व्याख्यानावरून संशयनिवृत्ति करून घ्यावी; कारण एखाद्या सूत्रांत संदेहजनक शब्द असला तरी तें सूत्र त्यांत सांगितलेलें कार्य केल्याशिवाय राहत नाहीं. ( सूत्रनिर्दिष्ट कार्य निश्चितच असलें पाहिजे हें लक्षांत ठेऊन, जेव्हां संदेह उत्पन्न होतो, तेव्हां त्या संदेहाचें निराकरण भाष्यकारादिकांच्या व्याख्यानावरून करून घ्यावें. )

**विशेषास्यान्यतराद्यर्थरूपस्य व्याख्यानाच्छिष्टकृतात् प्रतिपत्तिर्निश्चयो, यतः सन्देहाच्छास्त्रमलक्षणमननुष्ठापकं लक्षणमलक्षणं तथा न, शास्त्रस्य निर्णयजनकत्वौचित्यादित्यर्थः ।**

सूत्रांत एखादा संदेहजनक शब्द आल्यास त्याच्या अनेक अर्थांपैकीं कोणता अर्थ बरोबर आहे हें निश्चितपणें समजण्यासाठीं, शिष्टांनीं ( भाष्यकारादिकांनीं ) त्या शब्दाचें जें व्याख्यान केलें आहे त्यावरून निश्चित अर्थ करून घ्यावा. कारण ( अष्टाध्यायींतील ) सूत्रांत एखादा संदेहजनक शब्द असला तरी शब्दांचें शुद्ध रूप कोणतें हें समजण्यास जें ज्ञान आवश्यक आहे तें त्या सूत्रांत नाहीं किंवा तें सूत्र त्यांत सांगितलेलें कार्य करून इष्टरूप सिद्ध करीत नाहीं असें होत नाहीं. ( कोणास संशय उत्पन्न झाला एवढ्यावरून पाणिनीय शास्त्र अननुष्ठापक—कार्य करण्यास असमर्थ—ठरत नाहीं ) व पाणिनीय व्याकरणशास्त्र निश्चितार्थप्रतिपादक आहे हेंच मानणें योग्य आहे.

**असन्दिग्धानुष्ठानसिध्यर्थेऽत्र शास्त्रे सन्दिग्धोच्चारणरूपाचार्यव्यवहारेण सन्देहनिवृत्तेर्व्याख्यानातिरिक्तनिमित्तानपेक्षत्वं बोध्यत इति यावत् ॥**

पाणिनीय शास्त्राचा उद्देश निश्चितपणें कार्यसिद्धि व्हावी ( सूत्रनिर्दिष्ट कार्यें निश्चितपणें करतां यावींत व शुद्ध स्वरूप ठरवितां यावें ) असा असल्यामुळें, पाणिनीनें क्वचित् सूत्रांत संदेहजनक शब्द उच्चारला असल्यावरून असें ज्ञापित होतें कीं, संदेह-

निवृत्ति करण्यास व्याख्यानाखेरीज इतर कोणतेंहि साधन नाहीं. ( भाष्यकारादिकांच्या व्याख्यानावरूनच संशयाची निवृत्ति करून घेतली पाहिजे; सारांश अशा संदेहजनक स्थलीं व्याख्यानच शरण मानिलें पाहिजे. )

**तेनाणुदित्सवर्णस्येत्येतत्परिहाय पूर्वेणाण्ग्रहणं, परेणेण्ग्रहणमिति लण्सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥ १ ॥**

ह्मणूनच ( असंदिग्धपणें कार्यसिद्धि करितां यावी हें व्याकरणशास्त्राचें प्रयोजन असल्यामुळें व्याख्यानावरूनच आपणास असें कळतें कीं ) जेथें जेथें 'अण्' प्रत्याहाराचें पाणिनीय सूत्रांत ग्रहण केलें आहे तेथें तेथें 'अणुदित्सवर्णस्य' ( सू. १४ ) एवढें एकच सूत्र खेरीज करून इतर सर्व सूत्रांत 'अण्' प्रत्याहारानें पूर्व णकाराचेंच ग्रहण करावें व 'इण्' इत्यादि प्रत्याहारांत दुसऱ्या णकाराचेंच ग्रहण करावें असें 'लण्' सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे.

---

# परिभाषा २ व ३

**तत्र संज्ञापरिभाषाविषये पक्षद्वयमित्याह—**

संज्ञा व परिभाषा संबंधानें जे दोन पक्ष आहेत ते सांगणाऱ्या परिभाषा खालीं सांगतात:—

## यथोद्देशं संज्ञापरिभाषम् ॥ २ ॥

संज्ञा व परिभाषा ज्या ठिकाणीं सांगितल्या आहेत (तो प्रदेश न सोडतां) तेथेंच राहतात.

## कार्यकालं संज्ञापरिभाषम् ॥ ३ ॥

ज्या सूत्रांत कांहीं कार्य करण्याचें सांगितलें आहे त्या सूत्रान्वयें कार्य करते-वेळीं, संज्ञा व परिभाषा तेथें ( सूत्रप्रदेशांत ) उपस्थित होतात.

**उद्देशमनतिक्रम्य यथोद्देशम् । उद्देश उपदेशदेशः । अधिकरणसाधनश्चायम् ॥ यत्र देशे उपदिश्यते तद्देशे एव वाक्यार्थबोधेन गृहीतशक्त्या गृहीतपरिभाषार्थेन च सर्वत्र शास्त्रे व्यवहारः । देशश्चोच्चारणकाल एवात्र शास्त्रे व्यवह्रियते ॥ तत्तद्वाक्यार्थबोधे जाते भविष्यति किञ्चिदनेन प्रयोजनमिति ज्ञानमात्रेण सन्तुष्यद्यथाश्रुतग्राहिप्रतिपत्त्रपेक्षोऽयं पक्ष इतीदूत्सूत्रे कैयटः ।**

( यथोद्देशपक्ष ह्मणजे काय व कार्यकालपक्ष ह्मणजे काय व ह्या दोन पक्षांत काय फरक आहे हें ग्रन्थकार आतां सांगू इच्छितात. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे ह्या दोन पक्षांत हा फरक आहे कीं, यथोद्देशपक्षांत, संज्ञासूत्रें व परिभाषा जेथें पठित आहेत त्याठिकाणीं विधिसूत्रांच्या अर्थाचा बोध होतो. पण कार्यकालपक्षांत विधिसूत्रें जेथें पठित आहेत तेथेंच संज्ञासूत्रें व परिभाषा ह्यांच्या सहायानें त्यांच्या अर्थाचा बोध

होतो. ) 'उद्देशमनतिक्रम्य यथोद्देशम्' ह्या अव्ययीभाव समासाचा अर्थ 'आपला प्रदेश ( आपली जागा ) न सोडतां' असा आहे. 'उद्देश' म्हणजे ज्या ठिकाणीं ( संज्ञासूत्र किंवा परिभाषा ) पठित आहे तो प्रदेश. 'उद्देश' हा शब्द ('उद् + दिश्' ह्या धातूस ) अधिकरणवाचक अर्थांत 'घञ्' प्रत्यय लागून झाला आहे. ( उद्दिश्यते अस्मिन् इतिउद्देशः ). संज्ञा व परिभाषा ज्या ठिकाणीं पठित आहेत, त्याच ठिकाणीं ज्या वाक्यांनीं त्या पठित केल्या आहेत त्या वाक्यांच्या अर्थाचा बोध होऊन संज्ञांच्या सांकेतिक अर्थाचें व तसेंच परिभाषांच्या अर्थाचें पूर्णपणें ज्ञान होतें, व त्यांच्या त्या अर्थाला धरूनच त्यांचा व्याकरणशास्त्रांत सर्वत्र उपयोग केला जातो. ह्या व्याकरणशास्त्रांत, 'देश' ह्या शब्दाचा 'उच्चारणकाल' असा अर्थ मानला आहे. 'ईदूत्' १-१-११ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें ह्मटलें आहे कीं, संज्ञासूत्रें व परिभाषा ज्या ठिकाणीं पठित आहेत तेथें गुरूपासून ज्ञात झालेल्या अर्थाचें पूर्णपणें ज्ञान करून घेतल्यावर, पुढें ह्या ज्ञानाचा ( व्याकरणशास्त्रांत ) केव्हांनां केव्हां तरी उपयोग होईलच अशी श्रद्धा बाळगणाऱ्या व झालेल्या ज्ञानानें संतुष्ट होणाऱ्या ( छात्रां ) करितां हा यथोद्देशपक्ष आहे. ( सारांश, अपेक्षाबुद्धिमूलक यथोद्देशपक्ष असून, उपेक्षाबुद्धिमूलक कार्यकालपक्ष आहे. संज्ञासूत्रें व परिभाषा व्याकरणशास्त्रांत पठित असल्यामुळें त्यांचा पुढें, व्याकरणशास्त्रांत सांगितलेल्या विधिसूत्रांचा अर्थ यथार्थपणें समजून घेण्याकरितां, अवश्य उपयोग होईल असें समजून जे छात्र गुरूनें सांगितलेला संज्ञासूत्रांचा व परिभाषांचा अर्थ त्याचवेळीं पूर्णपणें अवगत करून घेतात व नेहमीकरितां तो अर्थ ध्यानांत ठेवितात तशा श्रद्धालु व अपेक्षाबुद्धियुक्त छात्रांकरितां यथोद्देशपक्ष आहे. 'वृद्धिरादैच्' इत्यादि संज्ञासूत्रांचा व 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' इत्यादि परिभाषांचा गुरूनें सांगितलेला अर्थ ते नेहमींकरितां ध्यानांत ठेवीत असल्यामुळें, जेव्हां ते 'वृद्धिरेचि' इत्यादि संज्ञाघटित सूत्रें व 'इको यणचि' इत्यादि सप्तमीनिर्देशयुक्त सूत्रें पठन करितात, तेव्हां गुरूनें पूर्वीं सांगितलेला 'वृद्धि' ह्या पदाचा अर्थ व तसेंच सप्तमीनिर्देशानें कोणास कार्य होतें हें त्यांनां पूर्णपणें अवगत असल्यामुळें, त्यांनां विधिसूत्रार्थ चटकन् कळतो व अशाच छात्रांकरितां यथोद्देशपक्ष आहे हें लक्षांत ठेवावें. ह्याच्या उलट जे छात्र गुरूपासून संज्ञासूत्रांचा व परिभाषांचा अर्थ ऐकून घेतल्यावर त्याकडे त्यावेळीं दुर्लक्ष करितात व जेव्हां विधिसूत्रांचा अर्थ समजून घेण्याची वेळ येईल तेव्हां संज्ञांचा व परिभाषांचा अर्थ नीट लक्षांत आणून विधिसूत्रांचा अर्थ ज्ञात करून घेऊं अशी ढकल करितात तशा उपेक्षाबुद्धियुक्त छात्रवर्गाकरितां कार्यकालपक्ष आहे. परिभाषासंबंधानेंच प्राचीन मतांत व नवीन मतांत फरक आहे. संज्ञासंबंधीं दोहोंत ऐकमत्य आहे. प्राचीन व नवीन मतांप्रमाणें, यथोद्देशपक्षांत, संज्ञाघटित विधिसूत्रांचा अर्थ संज्ञासूत्रांच्या प्रदेशांत केला जातो; पण कार्यकालपक्षांत, संज्ञासूत्रें विधिसूत्रप्रदेशांत उपस्थित होऊन व दोहोंची एकवाक्यता होऊन सूत्रार्थ केला जातो. तसेंच, परिभाषासंबंधानें कैयटादि प्राचीन वैयाकरणांचें मत असें आहे कीं, यथोद्देशपक्षांत विधिसूत्रें

परिभाषांजवळ उपस्थित होतात व दोहोंची एकवाक्यता होऊन परिभाषाप्रदेशांत विधिसूत्रांच्या अर्थाचा बोध होतो; परंतु कार्यकालपक्षांत, परिभाषा विधिसूत्रप्रदेशांत उपस्थित होतात व दोहोंची एकवाक्यता होऊन विधिसूत्रप्रदेशांत विधिसूत्रांच्या अर्थाचा बोध होतो. हें परिभाषासंबंधानें वर सांगितलेलें प्राचीन मत नागेशादि नवीन वैयाकरणांस मान्य नसल्यामुळें, नागेश, 'केचित्तु' ह्या शब्दानें सुरू होणाऱ्या पुढील पंक्तींत परिभाषासंबंधानें नवीन मताचें प्रतिपादन करितात. नवीन मताप्रमाणें, यथोद्देशपक्षांत परिभाषेजवळ विधिसूत्रें उपस्थित होत नसून, त्यांच्या अर्थांचें केवळ स्मरण होत असतें. यथोद्देशपक्षांत परिभाषेजवळ विधिसूत्रें उपस्थित होतात असें मानल्यास, विधिसूत्रांतील परापरत्व नष्ट होईल. जसें 'वृक्षेभ्यः' हें रूप साधतांना, 'सुपिच' सू. २०२–व 'बहुवचने झल्येत्'–सू. २०५–ह्या दोन सूत्रांची प्राप्ति होते. दोन्ही सूत्रांत सप्तमीविभक्तीचा निर्देश असल्यामुळें, हीं दोन्हीं सूत्रें 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ह्या परिभाषेजवळ उपस्थित होतील व एकदेशस्थ बनतील, व त्यामुळें त्यांचें परापरत्व नष्ट होईल. असें झाल्यास, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हा न्याय लावतां येणार नाहीं व कोणत्या सूत्रान्वयें कार्य करावें हें ठरवितां येणार नाहीं. परंतु परिभाषेजवळ विधिसूत्रें उपस्थित होत नसून त्यांच्या केवळ अर्थाचें परिभाषाप्रदेशांत स्मरण होतें असें नवीन मताप्रमाणें मानल्यास, विधिसूत्रें एकदेशस्थ बनत नाहींत, व त्यामुळें त्यांचें परापरत्व नष्ट न होतां, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हा न्याय लावण्यांत कांहींच अडचण येत नाहीं; आणि 'बहुवचने झल्येत्' हें परसूत्र असल्यामुळें तें प्रवृत्त होऊन, 'वृक्षेभ्यः' असें इष्टरूप सिद्ध होतें. तसेंच कार्यकालपक्षांत जशा परिभाषा प्राचीन मताप्रमाणें विधिसूत्रप्रदेशांत उपस्थित होतात, तशा त्या, नवीन मताप्रमाणें विधिसूत्रप्रदेशांत साक्षात् उपस्थित होत नसून, त्या प्रदेशांत केवळ त्यांच्या अर्थांचेंच स्मरण होतें. परिभाषा विधिसूत्रप्रदेशांत साक्षात् उपस्थित होतात असें जें प्राचीन मत आहे तें मानल्यास, 'ङमोह्रस्वात् अचिङमुट् नित्यम्' इत्यादि सूत्रांत जेथें पञ्चमी व सप्तमी ह्या दोन्ही विभक्तींचा निर्देश आहे, तेथें 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व 'तस्मादित्युत्तरस्य' ह्या दोन्ही परिभाषा उपस्थित होऊन एकदेशस्थ बनतील, व तसें झाल्यास त्या परिभाषांचें परापरत्व नष्ट होईल, व विप्रतिषेधन्याय अशा ठिकाणीं लावतां येणार नाहीं; आणि त्यामुळें विधिसूत्रांचा अर्थ करण्याकरितां कोणती परिभाषा लावावी हें ठरवितां येणार नाहीं. पण परिभाषा विधिसूत्रप्रदेशांत उपस्थित न होतां, तेथें त्यांच्या केवळ अर्थांचेंच स्मरण होतें असें जे नवीन मत आहे तें मानल्यास, त्या परिभाषा एकदेशस्थ न बनतां, त्यांचा मूळ प्रदेश कायम राहतो व त्यामुळें विप्रतिषेधन्याय लावण्यास कांहीं अडचण येत नाहीं, आणि 'तस्मादित्युत्तरस्य' हें परसूत्र असल्यामुळें तें लावून 'ङमोह्रस्वात्' ह्या विधिसूत्राचा अर्थ निश्चितपणें करितां येतो. प्राचीन मतामध्यें दोन्हीं पक्षांत जरी विप्रतिषेधन्याय उपयोगांत आणला जातो हें खरें आहे तरी, तो गौणरीत्या उपयोगांत आणला जातो; पण नवीन मतांत तो मुख्यरीत्या लागू

पडतो. तसेंच परिभाषा व विधिसूत्रें अचेतन असल्यामुळें, स्वदेश सोडून त्यांचें परदेशांत जाणें संभवत नसल्यामुळें, तीं परदेशांत साक्षात् उपस्थित होतात हें मानणें बरोबर नाहीं. ह्या सर्व कारणांमुळें, प्राचीन मत स्वीकारतां येत नाहीं व नवीन मत सयुक्तिक असल्यामुळें आणि त्याला भाष्याचा आधार असल्यामुळें तेंच ग्राह्य आहे असें आतां पुढील ग्रन्थांत नागेश सांगणार आहेत. पुढील ग्रन्थ नीट लागावा व परिभाषासंबंधानें प्राचीन मतांत व नवीन मतांत काय फरक आहे हें पूर्णपणें लक्षांत यावें ह्या हेतूनें ही विस्तारपूर्वक चर्चा केली आहे. )

**केचित्तु परिभाषाविषये तस्मिन्नित्यादिवाक्यार्थबोधे सप्तमीनिर्देशादि केति पर्यालोचनायां सकलतत्तद्विध्युपस्थितौ सकलतत्तत्संस्काराय गुणभेदं परिकल्प्यैकवाक्यतयैव नियमः ।**

कित्येक ( भाष्यतत्त्ववित् नवीन ) वैयाकरणांचें परिभाषासंबंधानें असें मत आहे कीं, ' तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ' इत्यादि परिभाषांच्या अर्थाचा ( गुरुमुखापासून ) बोध झाल्यानंतर, सप्तमी इत्यादि विभक्तींचा निर्देश कोणकोणत्या सूत्रांत आहे अशी जिज्ञासा उत्पन्न होते व त्यावेळीं जेवढीं सूत्रें बुद्धींत उपस्थित होतात—म्हणजे ज्यांचें स्मरण होतें—त्यापैकीं प्रत्येक सूत्राला ती परिभाषा लावून व दोहोंची एकवाक्यता करून विधिसूत्रांचा अर्थ ( परिभाषाप्रदेशांत ) नीट समजून घेतला जातो. ( ह्या पंक्तींत ' परिभाषाविषये ' हा शब्द घातला आहे. त्याचें कारण असें कीं, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, प्राचीन मतांत व नवीन मतांत संज्ञासंबंधानें ऐक्यमत आहे. फरक काय तो ह्या दोन मतांत परिभाषासंबंधानेंच आहे. तसेंच ह्या पंक्तींत ' सकलतत्तद्विध्युपस्थितौ ' हा जो शब्द वापरला आहे त्यांतील ' सकल ' ह्या पदाचा ' संपूर्ण ' असा अर्थ नसून ' कतिपय ' असा अर्थ आहे, आणि ' उपस्थिति ' ह्या पदाचा अर्थ ' परप्रदेशांत चालून जाणें ' असा नसून, ' बुद्धीचें ठिकाणीं स्मरण होणें ' असा आहे. सारांश, ह्या पंक्तीचा अर्थ असा आहे कीं जेव्हां गुरु आपल्या शिष्यास ' तस्मिन्निति निर्दिष्टे ' इत्यादि परिभाषांचा अर्थ नीट समजवून देतो व शिष्याला तो अर्थ पूर्णपणें कळतो तेव्हां सप्तमीनिर्देशाचीं सूत्रें कोणकोणतीं आहेत ही जिज्ञासा त्याचें मनांत सहज उत्पन्न होते व तो गुरुला तीं सूत्रें सांगण्याबद्दल विनंति करितो, आणि त्यावेळीं उदाहरणादाखल जीं सूत्रें गुरु त्याला सांगतो किंवा जीं सूत्रें त्याला स्वतःला आठवतात अशाच सूत्रांना यथोद्देशपक्ष लागतो. जीं सूत्रें त्याला त्यावेळीं गुरु सांगत नाहीं किंवा ज्यांचें स्मरण त्याला होत नाहीं अशा सूत्रांचे ठिकाणीं कार्यकालपक्ष लागतो असें नवीन वैयाकरणांचें मत आहे. त्यांच्या मताप्रमाणें दोन्ही पक्षांत विधिसूत्रें परिभाषाप्रदेशांत किंवा परिभाषा विधिसूत्रप्रदेशांत चालून जात नसून व तद्देशस्थ होत नसून आपआपल्याच प्रदेशांत कायम राहतात, व त्यामुळें त्यांचें परापरत्व ठरवितांना कांहीं अडचण येत नाहीं. )

**कार्य्यकालपक्षे तु त्रिपाद्यामप्युपस्थितिरिति विशेषः ।**

( नवीन मताप्रमाणें, यथोद्देशपक्ष व कार्यकालपक्ष ह्या दोन पक्षांत हा फरक

आहे कीं ) केवळ कार्यकालपक्षामध्येंच परिभाषा त्रिपादींत देखील उपस्थित होतात.

( ' कार्यकालपक्षे तु ' ह्यांतील ' तु ' शब्दाचा अर्थ ' एव ' असा आहे. परिभाषा सपादसप्ताध्यायींत पठित असल्यामुळें व ' पूर्वत्रासिद्धम् ' ह्या सूत्रान्वयें, त्यांच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध असल्यामुळें, यथोद्देशपक्षांत परिभाषा त्रिपादींतील सूत्रांस लागू पडूं शकत नाहींत. म्हणूनच परिभाषा त्रिपादींतील सूत्रांस लागू पडण्याकरितां कार्यकालपक्षाची मदत घ्यावी लागते. सारांश, यथोद्देशपक्ष व कार्यकालपक्ष हे दोन्ही पक्ष सपादसप्ताध्यायींतील सूत्रांना लागू पडतात; कारण परिभाषा व तीं विधिसूत्रें एकमेकांच्या दृष्टीनें असिद्ध नाहींत. परंतु त्रिपादींत पठित असलेल्या विधिसूत्रांचे ठिकाणीं कार्यकालपक्षच लागतो. येथें हें लक्षांत ठेवावें कीं जरी सपादसप्ताध्यायींच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे तरी त्रिपादीच्या दृष्टीनें सपादसप्ताध्यायी असिद्ध नाहीं. म्हणून त्रिपादीपठित विधिसूत्रें परिभाषांच्या मदतीनें आपला अर्थ कार्यकालपक्षांत यथार्थरीतीनें स्वप्रदेशांत करून घेतात. आतां, परिभाषासंबंधानें जें नवीन मत ग्रन्थकारानें सांगितलें आहे तें भाष्यास धरून आहे व परिभाषासंबंधीं प्राचीन मत भाष्यविरुद्ध आहे हें सिद्ध करण्याकरितां, नागेश पुढच्या पंक्तींत भाष्याचें प्रमाण देतात. )

**एतदेवाभिप्रेत्याधिकारो नाम त्रिप्रकारः कश्चिदेकदेशस्थः सर्वं शास्त्रमभिज्वलयति यथा प्रदीपः सुप्रज्वलितः सर्वं वेश्माभिज्वलयतीति षष्ठीस्थाने इति सूत्रे भाष्य उक्तम्। अधिकारशब्देन पारार्थ्यात्परिभाषाप्युच्यते। कश्चित्परिभाषारूप इति कैयटः। दीपो यथा प्रभाद्वारा सर्वगृहप्रकाशक एवमेतत्स्वबुद्धिजननद्वारा सर्वशास्त्रोपकारकमिति तत्तात्पर्यम्। एतच्च पक्षद्वयसाधारणं भाष्यं पक्षद्वयेऽपि प्रदेशैकवाक्यताया इतः प्रतीतेः। तत्रैतावान्विशेषः, यथोद्देशे परिभाषादेशे सर्वविधिसूत्रबुद्धावात्मभेदं परिकल्प्य तैरेकवाक्यता परिभाषाणाम्। तदुक्तं क्ङिति चेति सूत्रे कैयटेन 'यथोद्देशे प्रधानान्यात्मसंस्काराय सन्निधीयमानानि गुणभेदं प्रयुञ्जत' इति॥**

( वर जें परिभाषासंबंधानें नवीन मत सांगितलें आहे ) त्याच अभिप्रायानें, ' षष्ठी स्थानेयोगा ' १–१–४९ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार असें म्हणतात कीं अधिकार तीन प्रकारचा असतो ( १–' स्वरितेनाधिकारः ' ह्या सूत्रान्वयें सांगितलेला अधिकार, तो त्या अधिकारांत पठित असलेल्या सर्व सूत्रांस लागू पडतो. जसें 'अङ्गस्य' हें अधिकारसूत्र अङ्गाधिकारांत पठित असलेल्या प्रत्येक सूत्राचें ठिकाणीं उपस्थित होतें. २—' चकार. ' जेथें उत्तरसूत्रांत ' चकार ' असतो तेथें पूर्वसूत्रांतील विधेय त्या चकारानें उत्तरसूत्रांत अनुकृष्ट होतें हें प्रसिद्धच आहे. ३—' परिभाषा. ' ह्या परिभाषा त्यांच्या चिन्हांनीं युक्त असलेल्या सर्व विधिसूत्रांस लागू पडतात व त्या विधिसूत्रांचा अर्थ योग्य रीतीनें करून देण्याच्या उपयोगीं पडतात म्हणून त्यांना ' अधिकार ' असें म्हटलें आहे ). त्यापैकीं एक अधिकार—म्हणजे ' परिभाषा '–असा आहे कीं जो ( आपला प्रदेश न सोडतां ) एकाच जागीं राहून, ज्या प्रमाणें चांगला प्रकाश-

युक्त दिवा ( आपली जागा न सोडतां, जेथें तो आहे तेथूनच ) आपल्या प्रकाशाच्या योगानें सर्व घरांत प्रकाश पाडतो त्याचप्रमाणें, सर्व व्याकरणशास्त्रावर प्रकाश पाडतो.''

' अधिकार ' या शब्दानें परिभाषांचेंहि ग्रहण होतें; कारण, अधिकारसूत्राप्रमाणें, परिभाषा स्वतःकरितां उच्चारल्या नसून इतर सूत्रांचा—म्हणजे विधिसूत्रांचा अर्थ योग्य रीतीनें करून देण्यासाठीं त्या सांगितल्या असतात. वरील भाष्यांत ' कश्चित् ' ह्या शब्दानें परिभाषेचें ग्रहण होतें असें कैयटानें म्हटलें आहे. त्या भाष्याचें तात्पर्य हें आहे कीं ज्याप्रमाणें दिवा आपल्या जागेहूनच सर्व घरांत प्रकाश पाडतो त्याचप्रमाणें परिभाषा ( आपल्या जागींच राहून ) आपल्या अर्थाच्या स्मरणद्वारा सर्व व्याकरणशास्त्राच्या उपयोगीं पडतात—म्हणजे त्यांच्या चिन्हांनीं युक्त असलेल्या सर्व विधिसूत्रांचा अर्थ नीट लावण्याच्या कामीं पडतात. ( वरील भाष्यांत ' एकदेशस्थः ' हें पद घातलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें कीं परिभाषा आपला प्रदेश केव्हांहि सोडीत नाहींत व विधिसूत्रांजवळ चालून जात नाहींत आणि तद्देशस्थ बनत नाहींत. म्हणूनच परिभाषासंबंधानें पूर्वीं जें प्राचीन मत सांगितलें आहे तें स्वीकारतां येत नाहीं; कारण त्या मताप्रमाणें परिभाषा विधिसूत्रांजवळ जाऊन तद्देशस्थ बनतात. आतां, कैयटाचें असें म्हणणें आहे कीं वरील भाष्य केवळ यथोद्देशपक्षाबद्दल असून तें कार्यकालपक्षास लागू पडणारें नाहीं. कारण त्याच्या मताप्रमाणें, यथोद्देशपक्षांतच परिभाषा आपली जागा सोडीत नाहींत व कार्यकालपक्षांत त्या विधिसूत्र देशस्थ बनतात. ह्यावर नागेशाचें म्हणणें असें आहे कीं, वरील भाष्य केवळ यथोद्देशपक्षास लागणारें नसून ) तें भाष्य दोन्ही पक्षांस म्हणजे यथोद्देश व कार्यकालपक्षांस लागू पडणारें असें उभयपक्षसाधारण भाष्य आहे. ( कारण तें भाष्य केवळ यथोद्देशपक्षासच लागतें असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. दुसरें असें कीं तें केवळ यथोद्देपक्षास लागतें असें मानल्यास परिभाषांना कार्यकालपक्ष लागूच पडणार नाहीं; कारण त्या जर स्वदेशींच राहिल्या तर प्राचीन मताप्रमाणें त्यांच्या संबंधानें कार्यकालपक्षाची उपस्थिति होणें अशक्य आहे. ) वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं दोहीं पक्षांत—म्हणजे यथोद्देश व कार्यकालपक्षांत—एकाच प्रदेशाचे ठिकाणीं परिभाषा व विधिसूत्रें ह्यांची एकवाक्यता होते. ह्या दोन पक्षांत फरक येवढाच आहे कीं, यथोद्देशपक्षांत, परिभाषाप्रदेशामध्यें विधिसूत्रांचें स्मरण होऊन जेवढ्या विधिसूत्रांचें स्मरण होतें तितकेदां परिभाषा उच्चारून प्रत्येक सूत्राची परिभाषाविधेयाशीं एकवाक्यता केली जाते. ' क्ङिति च ' १–१–५ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें म्हटलें आहे कीं, ' यथोद्देशपक्षांत, विधिसूत्रें परिभाषेजवळ ठेविलीं जातात व जितकीं विधिसूत्रें उपस्थित होतात तितकेदां परिभाषा उच्चारून परिभाषेच्या विधेयासह प्रत्येक विधिसूत्राची एकवाक्यता केली जाते ( सारांश, कैयटाच्या प्राचीन मताप्रमाणें देखील यथोद्देशपक्षांत परिभाषाप्रदेशामध्येंच विधिसूत्रार्थबोध होतो. परंतु परिभाषाप्रदेशांत विधिसूत्रें साक्षात् उपस्थित केलीं जातात असें जें कैयटाचें म्हणणें आहे तें नवीन मतवाद्यांना कबूल नसून त्यांच्या मताप्रमाणें परिभाषाप्रदेशांत केवळ विधिसूत्रा-

र्थस्मरण होतें. हाच दोन मतांत फरक आहे. कैयटाचें मत कसें दोषयुक्त आहे हें ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत. )

**कार्यकाले तु तत्तद्विधिप्रदेशे परिभाषाबुद्ध्यैकवाक्यतेति । अत्रैकदेशस्थ इत्यनेन तत्र तत्र तद्बुद्धावपि तत्तद्देशस्थत्वं वारयति, यथा व्यवहर्तॄणां कार्यार्थमनेकदेशगमनेऽपि न तत्तद्देशीयत्वव्यवहारः किन्त्वभिजनदेशीयत्वव्यवहार एव, तद्वत् ।**

परंतु कार्यकालपक्षांत विधिसूत्रप्रदेशामध्यें परिभाषेच्या अर्थाचें स्मरण होऊन त्या प्रदेशांत दोहोंची एकवाक्यता केली जाते (व विधिसूत्रप्रदेशांत सूत्रार्थबोध होतो; परंतु यथोद्देशपक्षांत परिभाषाप्रदेशामध्यें सूत्रार्थबोध होतो. हाच दोन पक्षांत फरक आहे.) वर सांगितलेल्या ('षष्ठी स्थानेयोगा' ह्या सूत्रावरील) भाष्यांत 'एकदेशस्थः' हें पद घातलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, परिभाषांचें विधिसूत्रप्रदेशांत जरी स्मरण होतें तरी त्या विधिसूत्रांचे जवळ चालून जात नाहींत व विधिसूत्रदेशस्थ बनत नाहींत (आणि त्यामुळें त्यांच्यांतील परापरत्व कायम राहतें. प्राचीन मताप्रमाणें परिभाषा विधिसूत्राजवळ जाऊन विधिसूत्रप्रदेशस्थ बनतात; परंतु हें ह्मणणें 'एकदेशस्थः' ह्या भाष्यांतील पदाच्या विरुद्ध असल्यामुळें, प्राचीन मत चूक ठरतें.) ज्याप्रमाणें रोजगार करण्याकरितां निघालेले पुरुष जरी अनेक देशांत जातात तरी त्या देशांतील राहणारे समजले जात नसून आपल्या मूळ प्रदेशांतलेच राहणारे समजले जातात त्याचप्रमाणें परिभाषासंबंधानें समजावें.

**निषेधवाक्यानामपि निषेध्यविशेषाकाङ्क्षत्वाद्विध्येकवाक्यतयैवान्वय इति परिभाषासादृश्यात्परिभाषात्वेन व्यवहारः क्ङिति चेत्यत्र भाष्ये । तत्रैकवाक्यता पर्युदासन्यायेन । प्रसज्यप्रतिषेधेऽपि तेन सह वाक्यार्थबोधमात्रेणैकवाक्यताव्यवहारः ॥**

( निषेधसूत्रांना देखील गौणरीत्या परिभाषा मानतात त्याचें कारण ग्रन्थकार असें सांगतात कीं ) अमुक कार्य होऊं नये असें सांगणाऱ्या कार्यनिषेधकसूत्रांना, ज्याचा तीं निषेध करितात त्याची आकांक्षा (गरज) असल्यामुळें, ज्या ज्या विधिवाक्यांत सांगितलेल्या कार्याचा तीं निषेध करितात त्या त्या विधिवाक्याबरोबरच त्यांचा उच्चार करून दोहोंची (विधिवाक्य व तत्संबंधी निषेधवाक्य ह्यांची) एकवाक्यता केल्यानें अर्थबोध होत असल्यामुळें, व ह्या बाबतींत त्यांचें परिभाषांशीं सादृश्य असल्यामुळें, त्यांना (कार्यनिषेधकसूत्रांना) देखील परिभाषाच मानावें असें 'क्ङिति च' (१-१-५) ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्मटलें आहे. ही जी (विधिवाक्य व निषेधवाक्य ह्यांची) एकवाक्यता करावयाची ती कधीं पर्युदासरूपानें व कधीं प्रसज्यप्रतिषेधरूपानें होऊन, दोहोंच्या (विधायक व निषेधक सूत्रांच्या) एकत्रीकरणानें अर्थबोध होतो. पर्युदासाचा स्वीकार केल्यास, दोहोंची मिळून पदैकवाक्यता होते. (जसें 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ हें विधायकसूत्र व 'क्ङिति च' सू. २२१७ हें निषेध सूत्र;

ह्या दोहोंची, पर्युदासपक्ष स्वीकारून, एकवाक्यता केल्यास, 'अक्ङित्सार्वधातुकार्धधातुकयोः प्रत्यययोः परयोः इगन्ताङ्गस्य गुणो भवति' असें एकवाक्य होतें.) प्रसज्यप्रतिषेध करून दोन भिन्न वाक्यें केल्यास, त्या दोन वाक्यांचें महावाक्य करून एकवाक्यता होते. (जसें 'सार्वधातुकार्धधातुकयोः प्रत्यययोः परयोः इगन्ताङ्गस्य गुणो भवति, किंतु किति ङिति प्रत्यये परे गुणो न भवति').

**संज्ञाशास्त्रस्य तु कार्यकालपक्षे न पृथग्वाक्यार्थबोधः किन्तु प्रदेशवाक्येन सहैव, अत एवाणोऽप्रगृह्यस्येत्येतदेकवाक्यतापन्नादसोमादित्येतत्प्रति न मुत्वाद्यसिद्धम्, असिद्धत्वस्य कार्यार्थतया कार्यज्ञानोत्तरमेव तत्प्रवृत्तिः, कार्यज्ञानं च प्रदेशदेश एवेति तद्देशस्थस्यासिद्धत्वात्पूर्वग्रहणेनाग्रहणात्**

कार्यकालपक्षांत, संज्ञासूत्रें जेथें पठित आहेत तेथें त्यांच्या देखील अर्थाचा बोध होत नाहीं. ( म्हणजे तेथें त्यांच्या अर्थाचा बोध जरी झाला तरी त्यामुळें कांहीं विधायक कार्य होऊं शकत नाहीं ); परंतु ज्या विधायकसूत्रांत संज्ञांचा उपयोग केला आहे त्या सूत्रांसह या संज्ञासूत्रांचा विधायकसूत्राच्या प्रदेशांत अन्वय केल्यास अर्थबोध होतो. (—म्हणजे कोणतें कार्य करावें ह्याचा बोध होतो. सारांश संज्ञासूत्रांना जेथें विधिसूत्रें पठित आहेत त्या ठिकाणीं नेऊन दोहोंची एकवाक्यता केल्यानें विधिसूत्रप्रदेशांत त्यांचा कार्यकालपक्षामध्यें अर्थबोध होतो.) म्हणूनच 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' ( ८–४–५७ सू० ११० ) ह्या विधिसूत्राजवळ ' अदसो मात् ' ( १–१–१२ सू. १०१ ) हें प्रगृह्यसंज्ञेचें सूत्र नेऊन तेथें दोहोंची एकवाक्यता केल्यावर, विधिसूत्राच्या प्रदेशांत आणलेल्या ' अदसो मात् ' ह्या सूत्राच्या दृष्टीनें ' अदसोऽसेर्दादु दोमः' ( ८–२–८० सू. ४१९ ) हें सूत्र असिद्ध ठरत नाहीं व त्यामुळें ( ' अमी ' ह्या शब्दांतील ) मुत्वाला असिद्धत्व प्राप्त होत नाहीं. ('पूर्वत्रासिद्धम्' ह्या सूत्रान्वयें, सिद्धकाण्डांतील सूत्रांच्या दृष्टीनें त्रिपादीपठित सर्व सूत्रें असिद्ध आहेत व तसेंच त्रिपादींत पठित पूर्व पूर्वसूत्रांच्या दृष्टीनें उत्तरोत्तर सूत्रें असिद्ध आहेत. ह्या रीतीनें 'अदसो मात्' ह्या सिद्धकाण्डांतील सूत्राच्या दृष्टीनें 'अदसोऽसेर्दादु दोमः' व 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' हीं दोन्हीं त्रिपादींतील सूत्रें असिद्धच आहेत. ' अदसोऽसेर्दादु दोमः ' ह्या त्रिपादींतील पूर्वसूत्राच्या दृष्टीनें 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' हें त्रिपादींतील परसूत्रहि असिद्धच आहे. पण जेव्हां कार्यकालपक्षांत 'अदसो मात्' हें संज्ञासूत्र ' अणोऽप्रगृह्यस्य ' ह्या सूत्राला जाऊन मिळतें व त्याच्याशीं एकवाक्यतापन्न होतें, तेव्हां अशा तऱ्हेनें एकजीव झालेल्या ह्या दोन सूत्रांच्या दृष्टीनें, ' अदसोऽसेर्दादु दोमः ' हें, पूर्वसूत्र असल्यामुळें असिद्ध ठरूं शकत नाहीं,—म्हणजे सिद्ध ठरतें; व त्यामुळें, ' अमी ' ह्यातील मुत्वाला असिद्धत्व प्राप्त होत नाहीं, व त्याला ' प्रगृह्य ' संज्ञा प्राप्त होऊन, तें पदान्ती असलें तरी, अनुनासिक होत नाहीं;) कारण ( 'पूर्वत्रासिद्धम्' ह्या सूत्रानें सांगितलेलें ) असिद्धत्व, कार्य करण्याकरितांच ( —म्हणजे सिद्धसूत्रान्वयें प्रथम कार्य करून मग असिद्धसूत्रान्वयें कार्य

करावें ह्या करितांच ) सांगितलें आहे, व कार्यज्ञान झाल्यावरच जें कार्य करणें आहे तें सिद्ध किंवा असिद्ध आहे हें ठरविणें शक्य आहे. कार्यज्ञान, कार्यविधायक सूत्र जेथें पठित असेल, त्याप्रदेशींच ( ठिकाणींच ) होऊं शकतें. म्हणून ' अणोऽप्रगृह्यस्य ' ह्या कार्य विधायक सूत्राजवळ उपस्थित होऊन त्याच्याशीं एकवाक्यतापन्न झाल्यानें तद्देशस्थ बनलेलें ' अदसो मात् ' हें संज्ञासूत्र, ' अदसोऽसेर्दादु दोमः' ह्या असिद्धकाण्डांतील पूर्वसूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतें, व त्यामुळें ' पूर्वत्रासिद्धम् ' ह्या सूत्रांतील 'पूर्व' शब्दानें ' अदसो मात् ' ( उत्तरसूत्रदेशस्थ होऊन उत्तरसूत्र झाल्यामुळें ) ह्या सूत्राचें, ग्रहण होऊं शकत नाहीं.

**एवं तद्बोधोत्तरमेव विरोधप्रतिसन्धानं चेति तत्परत्वमेव विप्रतिषेधसूत्रप्रवृत्तौ बीजम् । अत एव कार्यकालपक्षेऽयादिभ्यः परैव प्रगृह्यसंज्ञेत्यदसोमादितिसूत्रे भाष्य उक्तम् ।**

वर सांगितल्याप्रमाणें, ज्या विधिसूत्रांत संज्ञेचा उल्लेख आहे त्या सूत्राच्याजवळ संज्ञासूत्र नेल्यानंतर तेथें त्या संज्ञासूत्राचा अर्थबोध होत असल्यामुळें, तें संज्ञासूत्र विधिसूत्रप्रदेशस्थ आहे असें समजून, ' पूर्वत्रासिद्धिम् ह्या सूत्रान्वयें परापरत्व ठरवावें. ( संज्ञासूत्राचा ज्या विधिसूत्रप्रदेशांत सफल वाक्यार्थबोध होतो तद्देशस्थ तें संज्ञासूत्र समजून विप्रतिषेधन्यायानें परापरत्व ठरवावें असा नियम स्वीकारला आहे ) म्हणूनच, कार्यकालपक्षांत, ' एचोऽयवायवः ' सू० ६१ ह्या सूत्राच्या अपेक्षेनें प्रगृह्यसंज्ञासूत्र पर आहे असें ' अदसो मात् ' १–१–१२ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( वास्तविक, प्रगृह्यसंज्ञासूत्रें अष्टाध्यायींत प्रथमाध्यायांत पठित आहेत; ' एचोऽयवायावः ' सू० ६१ व ' प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ' सू० ९० हीं सूत्रें षष्ठाध्यायाच्या प्रथमपादांत पठित असून त्या दोहोंमध्यें ' प्लुतप्रगृह्या ' हें परसूत्र आहे. पण कार्यकालपक्षांत जेव्हां ' ईदूदेत् द्विवचनम् प्रगृह्यम् ' सू० १०० हें संज्ञासूत्र ' प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ' ह्या सूत्राजवळ जाऊन त्याच्याशीं एकवाक्यतापन्न होतें व तद्देशस्थ बनतें, तेव्हां त्याला ' एचोऽयवायावः ' ह्या सूत्राच्या दृष्टिनें परत्व येतें व ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायानें तें संज्ञासूत्र पर ठरून, ' गङ्गे अमू ' इत्यादि ठिकाणीं अयादेश न होतां, प्रकृतिभाव कायम राहतो. येथें सहज अशी शंका उत्पन्न होतें कीं ज्याप्रमाणें परिभाषा अचेतन आहेत त्याचप्रमाणें संज्ञासूत्रें देखील अचेतन आहेत. मग परिभाषा विधिसूत्रांजवळ कां चालून जात नाहींत व संज्ञासूत्रें विधिसूत्रांजवळ कां चालून जातात ? ह्या शंकेचें उत्तर हें आहे कीं वर दिलेल्या भाष्यांत ' एकदेशस्थः ' हें पद केवळ परिभाषासंबंधानें उच्चारलें आहे; संज्ञासूत्रासंबंधानें तें पद उच्चारलें नाहीं. त्यामुळें असें दिसून येतें कीं भाष्यकाराच्या मतें, कार्यकालपक्षांत संज्ञासूत्रें विधिसूत्रप्रदेशांत जाऊन तद्देशस्थ बनतात; व भाष्य प्रमाण मानलेंच पाहिजे. भाष्याच्या प्रामाण्याबद्दल संशय काढण्यास आपणांस मुळींच अधिकार नाहीं. दुसरें असें कीं, कार्यकालपक्षांत संज्ञासूत्रें जेथें पठित आहेत तेथें त्यांचा सफल—म्हणजे कार्य करण्याच्या उपयोगी पड

णारा असा—वाक्यार्थबोध होत नसून, विधिसूत्रप्रदेशांतच त्यांचा सफल वाक्यार्थबोध होत असल्यामुळें, त्यांना विधिसूत्रप्रदेशस्थ मानलें जातें. संज्ञासूत्रें व परिभाषा ह्यांत हा फरक आहे कीं परिभाषामध्यें विधेय सांगितलें असतें—म्हणजे कोणास कार्य करावें ह्या संबंधानें निर्देश केला असतो; परंतु संज्ञासूत्रांत विधेय मुळींच सांगितलें नसतें. ह्यामुळें संज्ञासूत्रांचा कार्य करण्याच्या उपयोगीं पडणारा अशा तऱ्हेचा वाक्यार्थबोध विधिसूत्र-प्रदेशांतच होऊं शकतो, आणि म्हणूनच, ज्या ठिकाणीं सूत्राचा सफल वाक्यार्थबोध होतो, तद्देशस्थ तें सूत्र आहे असा नियम असल्यामुळें, कार्यकालपक्षांत संज्ञासूत्रें विधिसूत्र-प्रदेशस्थ मानलीं जातात. )

**आकडाराधिकारस्थभपदसंज्ञादिविषये तु यथोद्देशपक्ष एवेति तत्रत्य-परत्वेनैव बाध्यबाधकभावः ।**

परंतु ' आकडारादेका संज्ञा ' सू० २३२ ह्या अधिकारांत सांगितलेल्या भसंज्ञा, पदसंज्ञा इत्यादि संज्ञासंबंधानें यथोद्देशपक्षच स्वीकारावा व त्या संज्ञाविधायक-सूत्रांतील परापरत्वाच्या अनुरोधानेंच बाध्यबाधकभाव ठरवावा. (असें असल्यामुळें, भसंज्ञा, पदसंज्ञेच्या मानानें पर असल्यामुळें, ती पदसंज्ञेची बाधक होते. भसंज्ञा, पद-संज्ञा, इत्यादि आकडाराधिकारस्थ संज्ञांच्या विषयांत यथोद्देशपक्ष न स्वीकारतां कार्य-कालपक्ष स्वीकारल्यास, इष्टरूपसिद्धि होणार नाहीं. जसें—'राजन्+शस्' अशा स्थितींत, 'अल्लोपोऽनः' सू० २३४ व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू० २३६ ह्या दोन सूत्रांची प्राप्ति होते. कार्यकालपक्षांत ह्या दोन सूत्रांजवळ तत्तत्संज्ञा-विधायकसूत्रें येऊन मिळतील व त्या संज्ञाविधायकसूत्रांना त्या विधिसूत्रांचें स्थान मिळेल व त्यावरून पूर्वापरभाव ठरवावा लागेल. जसें—'अल्लोपोऽनः' सू० २३४ ह्या सूत्राजवळ 'यचि भम्' सू० २३१ हें भसंज्ञाविधायकसूत्र जाऊन त्याशीं एकवाक्यतापन्न झाल्यावर, 'अल्लोपोऽनः' ह्या सूत्राचें जें स्थान आहे तें स्थान 'यचि भम्' ह्या सूत्राला प्राप्त होईल. तसेंच 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू० २३६ ह्या सूत्राजवळ ' स्वादिष्वसर्वनामस्थानें ' सू० २३० हें पदसंज्ञा-विधायक सूत्र येऊन त्याशीं एकवाक्यतापन्न होईल आणि त्यामुळें 'न लोपः प्रातिपदिका-न्तस्य' ह्या सूत्राचें जें स्थान आहे तें स्थान 'स्वादिष्वसर्वनामस्थानें' ह्या सूत्रास प्राप्त होईल. 'कडाराः कर्मधारये' ह्या सूत्रापूर्वीं जीं संज्ञाविधायकसूत्रें पठित आहेत त्यांनाच एकसंज्ञानियम लागू पडतो. परंतु 'अल्लोपोऽनः' व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' हीं दोन्हीं सूत्रें 'कडाराः कर्मधारये' ह्या सूत्रानंतर पठित आहेत. त्यामुळें त्यांच्या संबंधांत एकसंज्ञानियम लागू पडूं शकत नाहीं. म्हणून 'अल्लोपोऽनः' व 'यचि भम्' हीं दोन सूत्रें एकवाक्यतापन्न होऊन बनलेल्या सूत्रानें 'राजन्' ह्यांतील अकाराचा लोप होईल व नंतर 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' हें असिद्धकाण्डांतील सूत्र व त्याला जाऊन मिळालेलें 'स्वादिषु' हें सूत्र ह्या दोन सूत्रांची एकवाक्यता होऊन बनलेल्या सूत्रानें 'राजन्' ह्यांतील नकाराचा देखील लोप होईल, व 'राज्ञः' असें इष्ट रूप सिद्ध

होणार नाहीं. पण अशा ठिकाणीं यथोद्देशपक्ष स्वीकारल्यास, अनिष्ट रूप होण्याची आपत्ति टळते. कारण पूर्वीं सांगितलेप्रमाणें, यथोद्देशपक्षांत संज्ञाविधायकसूत्रें कार्यविधायकविधिसूत्राजवळ न जातां आपल्याच जागीं कायम राहत असतात, व विधिसूत्रें त्यांना येऊन मिळत असतात. आणि त्या विधिसूत्रांचें परापरत्व संज्ञाविधायकसूत्रांच्या परापरत्वाच्या अनुरोधानेंच ठरवावें लागतें. त्यामुळें 'अल्लोपोऽनः' हें विधिसूत्र 'यचि भम्' ह्या भसंज्ञाविधायक परसूत्राजवळ जाऊन मिळाल्यानें, तें परसूत्र ठरतें, व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' हें सूत्र 'स्वादिषु असर्वनामस्थाने' ह्या पदसंज्ञाविधायक पूर्वसूत्राशीं जाऊन मिळाल्यानें, तें पूर्वसूत्र ठरतें, आणि 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ह्या न्यायान्वयें, 'अल्लोपोऽनः' हें सूत्र 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' ह्या पूर्वसूत्राचें बाधक ठरून, त्या सूत्रानें होणारें कार्य होऊं देत नाहीं व 'राजन्' ह्यांतील केवळ अकाराचाच लोप होतो व नकाराचा लोप होत नाहीं व 'राज्ञः' असें इष्ट रूप सिद्ध होतें.)

**पदादिसंज्ञानां तत्र जातशक्तिग्रहेणैव त्रिपाद्यामपि व्यवहारः। अतएव पूर्वत्रासिद्धमिति सूत्रे परिभाषाणामेव त्रिपाद्यामप्रवृत्तिमाशङ्क्य कार्यकालपक्षाश्रयेण समाहितमित्याहुः। यथोद्देशपक्षः प्रगृह्यसंज्ञाप्रकरणे भाष्ये॥ २॥**

'पद' इत्यादि संज्ञाविधायक सूत्रें अष्टाध्यायींत ज्या ठिकाणीं पठित आहेत त्या ठिकाणींच त्यांच्या सांकेतिक अर्थाचा पूर्णपणें बोध होत असल्यामुळें, त्यांच्या त्या अर्थाला धरूनच त्यांचा त्रिपादींत उपयोग केला जातो. ह्मणूनच 'पूर्वत्रासिद्धम्' ८-२-१ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं, परिभाषा त्रिपादींत कशा प्रवृत्त होऊं शकतील अशी केवळ परिभाषांच्या संबंधानेंच शंका उपस्थित करून त्या शंकेचें समाधान कार्यकालपक्ष स्वीकारून केलें आहे असें कांहीं वैयाकरणांचें ह्मणणें आहे. प्रगृह्यसंज्ञाप्रकरणावरील भाष्यांत यथोद्देशपक्ष सांगितला आहे.

**कार्यकालमित्यस्य च कार्येण काल्यते स्वसन्निधिं प्राप्यत इत्यर्थः। कार्येण स्वसंस्काराय स्ववृत्तिलिङ्गचिन्हितपरिभाषाणामाक्षेप इति यावत्॥ अतएव पूर्वत्रासिद्धमिति सूत्रे भाष्ये त्रिपाद्या असिद्धत्वात्तत्र सपादसप्ताध्यायीस्थपरिभाषाणामप्रवृत्तिमाशङ्क्य यद्यपीदंतत्रासिद्धं तास्त्विह सिद्धमित्युक्त्वा तावताप्यसिद्धिरित्यभिप्रायके कथमिति प्रश्ने कार्यकालं संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यमित्युक्तम्॥**

'कार्यकालम्' ह्मणजे 'कार्यविधायक विधिसूत्रानें आपलेजवळ बोलाविलें जातें' असा अर्थ समजावा. कार्यविधायकविधिसूत्रें आपापला अर्थ योग्य रीतीनें लावून घेण्याकरितां त्या त्या विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या चिन्हांनीं युक्त अशा अनुरूप परिभाषा आपल्याजवळ आणून घेतात (—ह्मणजे त्या परिभाषांच्या अर्थाचें विधिसूत्रप्रदेशांत स्मरण होतें.) ह्मणूनच 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रावरील भाष्यांत, "सपादसप्ताध्यायींत परिभाषा पठित असल्यामुळें असिद्धकाण्डामध्यें त्या कशा प्रवृत्त होऊं

शकतील, कारण त्यांच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे'' अशी शंका काढून भाष्यकारांनीं तिचें समाधान अशा रीतीनें केलें आहे कीं, जरी सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे तरी त्रिपादीच्या दृष्टीनें सपादसप्ताध्यायी असिद्ध नाहीं. ह्यावर शंकाकारानें पुनः अशी शंका काढली कीं, असें मानल्यानें देखील, त्रिपादीमध्यें परिभाषांचा प्रवृत्ति कशी होऊं शकणार, कारण त्रिपादी असिद्ध आहे; ह्या शंकेवर 'कार्यकालं संज्ञापरिभाषम्' असें भाष्यांत उत्तर देऊन शंकेचें निवारण अशा तऱ्हेनें केलें आहे कीं, अशा ठिकाणीं कार्यकालपक्ष स्वीकारावा; व जेथें जेथें कार्यविधायक सूत्रें पठित आहेत (मग तीं त्रिपादींत असलीं तरी हरकत नाहीं) तेथें तेथें त्यांना लागू पडणारीं संज्ञासूत्रें उपस्थित होतात. (व परिभाषांच्या अर्थाचें स्मरण होतें व दोहोंची एकवाक्यता होऊन विधिसूत्र-प्रदेशांत विधिसूत्रांच्या अर्थाचा बोध होतो.)

**न च कार्यकालपक्षे ङमो ह्रस्वादित्यादौ तस्मादित्युत्तरस्य तस्मिन्निति-निर्दिष्टेपूर्वस्येति परिभाषाद्वयोपस्थितौ परत्वादुभयनिर्देशे पञ्चमीनिर्देशो बलीयानिति तस्मिन्नितिसूत्रस्थभाष्यासङ्गतिः, उभयोरेकदेशस्थत्वेन परत्वा-दित्यस्यासङ्गत्यापत्तेः स्पष्टं चेदमिको गुणेत्यत्र कैयट इति वाच्यम्, विप्र-तिषेधसूत्रेऽष्टाध्यायीपाठकृतपरत्वस्याश्रयणेनादोषात् ।**

ह्यावर जर कोणी कैयटाच्या 'इको गुणवृद्धी' १-१-३ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेचा आधार घेऊन अशी शंका करील कीं, ('ज्या विधिसूत्रांत पञ्चमी व सप्तमी ह्या दोन्ही विभक्तींचा निर्देश आहे अशा) 'ङमो ऱ्हस्वादचि ङमुण्नित्यम्' सू० १३४—ह्या व ह्यासारख्या सूत्रांजवळ, कार्यकालपक्षांत, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व 'तस्मादित्युत्तरस्य' ह्या दोन्ही परिभाषा उपस्थित होऊन एकदेशस्थ झाल्यामुळें एका परिभाषेला पर व दुसरीला अपर कसें ह्मणतां येणार, व 'उभयनिर्देशे पञ्चमी निर्देशो बलीयान्' असें जें 'तस्मिन्निति' (१–१–६६) ह्या सूत्रावरील भाष्यांत झटलें आहे, तें पूर्व व्याख्यानाशीं विसंगत ठरेल' तर ही शंका बरोबर नाहीं. कारण 'विप्रति-षेधे परं कार्यम्' ह्या सूत्रांत जें परापरत्व सांगितलें आहे तें अष्टाध्यायींत जो सूत्रपाठक्रम आहे त्यावरूनच ठरवावयाचें असतें; व त्या सूत्रपाठक्रमाचा आश्रय केल्यानें, शंकाका-रानें वर जो दोष दाखविला आहे त्याचें निवारण होतें. (ह्मणजे 'तस्मादित्युत्तरस्य) हें परसूत्र असल्यामुळें 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ह्या पूर्वसूत्रापेक्षां तें बलवत्तर ठरतें, व 'उभयनिर्देशे पञ्चमीनिर्देशो बलीयान्' असें जें झटलें आहे तें अगदीं योग्य ठरतें.

**नहि कार्यकालपक्ष इत्येतावता तदपैति । पक्षद्वयेऽपि प्रदेशेषु स्वबु-द्धिजननेनाविशेषात् । नहि तत्पक्षेऽप्यचेतनस्य शास्त्रस्य स्वदेशं विहाय तद्देशगमनं सम्भवति । नाप्यस्मदादिबुद्धिजननेन स्वदेशत्यागो भवति । अत एव भाष्ये एकदेशस्थस्यैव सर्वशास्त्राभिज्वालकत्वमुक्तम् । अत एव तस्मिन्निति सूत्रे कैयटः सूत्रपाठापेक्षया परत्वस्य व्यवस्थापकत्वमिति ।**

कार्यकालपक्षांत अष्टाध्यायीपाठकृत परापरत्व नष्ट होत नाहीं. कारण दोन्ही

( कार्यकाल व यथोद्देश ) पक्षांत ह्या संबंधीं एकवाक्यता आहे कीं, परिभाषा ( जेथें पठित आहेत ती जागा न सोडतां, ) आपल्या जागेहूनच ज्या सूत्रांशीं त्यांचा संबंध येऊन पोहोंचतो त्यांचे ठिकाणीं आपला अर्थ बोधित करितात. परिभाषा अचेतन असल्यामुळें, कार्यकालपक्षांत देखील, जेथें त्या पठित आहेत ती जागा सोडून ज्या ज्या सूत्रांशीं त्यांचा संबंध येतो त्या त्या सूत्रांच्या जागीं त्यांचें जाणें संभवत नाहीं, व आपणास ( कार्यकालपक्षांत ) परिभाषांच्या अर्थाचा बोध ज्या ज्या सूत्रांस त्या लागू पडतात त्या त्या ठिकाणीं जरी होत असला तरी एवढ्यावरून त्या आपली जागा सोडतात ( व विधिसूत्राजवळ चालून जातात ) असें ठरत नाहीं. ( सारांश कार्यकाल-पक्षांत परिभाषा आपली जागा सोडून कोठेंहि जात नाहींत ), त्यामुळेंच भाष्यकारांनीं ह्मटलें आहे कीं, 'परिभाषा एकाच जागेहून सर्व व्याकरणशास्त्राला प्रकाशित करिते;' व ह्या मुळेंच 'तस्मिन्निति–१–१–६६—ह्या सूत्रावरील भाष्याच्या व्याख्येंत कैयटानेंहि ह्मटलें आहे कीं, परिभाषांचें परापरत्व अष्टाध्यायींतील सूत्रपाठक्रमाच्या अनुरोधानेंच ठरविलें पाहिजे.

**इकोगुणेति सूत्रस्थकैयटस्तु चिन्त्य एव। अन्यथा सर्वशास्त्राणां प्रयोगार्थत्वेन प्रयोगरूपैकदेशस्थत्वेन क्वापि परत्वं न स्यात्।**

'इको गुणवृद्धी' १–१–३–ह्या सूत्रावरील भाष्याच्या व्याख्येंत मात्र जें कैयटानें ह्मटलें आहे (व ज्याचा पूर्वी उल्लेख केलाच आहे) तें बरोबर नाहीं. तें ह्मणणें बरोबर मानल्यास, असें देखील ह्मणतां येईल कीं व्याकरणशास्त्राचा अवतार लौकिक शब्दांच्या रूपांची शुद्धरीतीनें सिद्धि व्हावी ह्याकरितां असल्यामुळें, शब्दांची शुद्धरूपसिद्धि करण्याकरितां सर्व सूत्रें, रूपसिद्धि करतेवेळीं, एक जागीं येऊन मिळतात, व असें मानल्यास, सूत्रांचें परापरत्व नष्ट होईल. (ह्मणजे परापरत्व ठरवितां येणार नाहीं व त्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र व्यर्थ ठरेल.)

**किं च क्ङितिचेतिसूत्रस्थकैयटरीत्या विधिसूत्राणां यथोद्देशपक्षे परिभाषादेशे सन्निधानेन तेषां परत्वं व्याहन्येत। एवं च वृक्षेभ्य इत्यत्र सुपि चेत्यतः परत्वाद् बहुवचने झल्येदित्येत्त्वमित्याद्युच्छिद्येतेत्यलम्॥ ३॥**

दुसरें असें कीं, 'क्ङिति च' १–१–५ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें ह्मटल्याप्रमाणें यथोद्देशपक्षांत सर्व कार्यविधायकसूत्रें त्यांना लागू पडणाऱ्या परिभाषा-जवळ उपस्थित होतात. पण असें मानल्यास, त्या सूत्रांचें परापरत्व नष्ट होईल; व अशा तऱ्हेनें त्यांचें परापरत्व नष्ट झाल्यामुळें 'वृक्ष' शब्दाचें 'वृक्षेभ्यः' असें पञ्चमी विभक्तीच्या बहुवचनाचें रूप करतेवेळीं, 'सुपि च' व 'बहुवचने झल्येत्' हें परसूत्र 'तस्मिन्नितिनिर्दिष्टे पूर्वस्य' ह्या परिभाषेजवळ उपस्थित होतील, व ( दोन्हीं सूत्रें एकेच ठिकाणीं आल्यामुळें त्यांचा परापरत्वभाव नष्ट होऊन ) 'वृक्षेभ्यः' ह्यांत एत्वसिद्धि होऊं शकणार नाहीं. ( परापरत्व कायम असलें तरच 'बहुवचने झल्येत्' हें परसूत्र

असल्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ह्या सूत्रान्वयें 'सुपि च' ह्या पूर्वसूत्राचा बाध होऊन एत्वसिद्धि होऊं शकेल. ) वर जेवढें सांगितलें आहे तेवढें पुरें.

---

## परिभाषा ४

**इत्संज्ञका अनुबन्धास्तेष्ववयवानवयवत्वसन्देह आह—**

अनुबन्ध इत्संज्ञक आहेत; हे अनुबन्ध ज्याला लागले आहेत त्याचे अवयव आहेत अथवा अवयव नाहींत असा संशय उत्पन्न होत असल्यामुळें, ही परिभाषा सांगतात:—

**अनेकान्ता अनुबन्धा इति ॥ ४ ॥**

" अनुबन्ध ज्याला लागले असतात त्याचे ते अवयव नव्हत "

**अनेकान्ता अनवयवा इत्यर्थः । यो ह्यवयवः स कदाचित्तत्रोपलभ्यत एव, अयं तु न तथा, तदर्थभूते विधेये कदाप्यदर्शनात् । शित्किदित्यादौ समीपेऽवयवत्वारोपेण समासो बोध्यः**

' अनेकान्ताः ' म्हणजे ' अवयव नाहींत '. अवयव हा अवयवीचे ठिकाणीं केव्हां तरी दिसतोच. ( जसें:—झाडाची फांदी कापल्यानंतर जरी ती झाडाचे ठिकाणीं दिसत नाहीं तरी कापण्यापूर्वी ती झाडाचें ठिकाणीं अवश्य दिसतेच). पण अनुबन्ध असा नाहीं. कारण सानुबन्ध प्रत्यय, आदेश, आगम इत्यादिकांचें वाच्य जें त्यांचें प्रयोगार्ह निरनुबन्धरूप त्यांत तो कधींच दिसत नाहीं, ( जसें: ' शप् ' याचा अर्थ ' अ'. हें ' अ ' विकरण लागलें असतां, त्यांत ' श् ' किंवा ' प् ' ह्यांपैकीं कोणताहि अनुबन्ध आढळत नाहीं). 'शित्' (='ज्याचा अनुबन्ध 'श्' आहे असा') 'कित्' (='ज्याचा अनुबन्ध 'क्' आहे असा') इत्यादि शब्दांचें जें (बहुव्रीहीचें) सामासिक रूप बनलें आहे तें ('श्' किंवा 'क्' इत्यादि प्रत्ययादिकांचे अवयव आहेत ह्या अर्थांत नसून) अनुबन्धांचें उच्चारण समीप होत असल्यामुळें, त्यांच्यावर अवयवत्वाचा आरोप करून तसें सामासिक रूप झालें आहे असें समजावें.

**वुञ्छण्कठेत्यादौ णित्त्वप्रयुक्तं कार्यं पूर्वस्यैवेत्यादि तु व्याख्यानतो निर्णेयम् ।**

( आतां कोणी अशी शंका करील कीं, जर अनुबन्ध प्रत्ययादिकांचे अवयव नाहींत व ते समीप उच्चारले असल्यामुळें त्यांचे ठिकाणीं अवयवत्वाचा केवळ आरोप केलेला असतो तर, 'वुञ्छण्कठ–सू. १२९२–ह्या सूत्रांत असणारा 'ण्' हा अनुबन्ध जसा 'छ' जवळ आहे तसाच तो 'क' जवळहि असल्यामुळें, दोहोंचाहि म्हणजे 'छ' चा व 'क' चा अनुबन्ध मानावा लागेल; व णित्वामुळें होणारें वृद्धिकार्य जसें 'छ' नें होतें तसें 'क' नेंहि होऊं लागेल. ह्या शंकेचें उत्तर असें कीं, अनुबंध हा त्याच्या लगेच मागें जें असतें त्याचा होत असून त्याच्या लगेच पुढें जें असतें त्याचा होत नाहीं. म्हणून )

गित्त्वामुळें होणारें वृद्धिरूप कार्य पूर्व 'छ' प्रत्ययच करूं शकतो ( व 'क' प्रत्यय तें कार्य करूं शकत नाहीं), हें व्याख्यानावरून निश्चित करून घ्यावें. (कारण 'व्याख्यानतो विशेष-प्रतिपत्तिः' असें प्रथम परिभाषेंत सांगितलेंच आहे. )

**हलन्त्यामित्यत्रान्त्यशब्दः परसमीपबोधकः ॥ ४ ॥**

' हलन्त्यम्–सू. १ ह्या सूत्रांत 'अन्त्य' शब्द ( अवयववाचक नसून ) 'दुस-ऱ्याच्या समीप असणारा' ह्या अर्थाचा बोधक आहे.

---

## परिभाषा ५

**" वस्तुतस्तु– "** वास्तविक ।

**' एकान्ताः ' ॥ ५ ॥**

—अनुबन्ध अवयव आहेत.

**" इत्येव न्याय्यम् । "**

हेंच म्हणणें बरोबर आहे. ( सारांश परिभाषा ४ एकदेशीची उक्ति असल्यामुळें ती स्वीकारार्ह नाहीं व परिभाषा ५ ही सिद्धान्तीची उक्ति असल्यामुळें तीच ग्राह्य आहे )

**शास्त्रे तत्रोपलम्भादन्यत्रानुपलम्भाच्च । अनवयवो हि काकादिरेकजातीयसम्बन्धेन गृहवृक्षादिषूपलभ्यते नैवमयम् । एवं हि बहुव्रीहिरपि न्याय्यत एवोपपन्नः । अन्त्यादिशब्दे लक्षणा च न ।**

व्याकरणशास्त्रांत अनुबन्ध आपल्या अवयवीजवळच सांपडतो व इतर ठिकाणीं तो सांपडत नाहीं (जसें 'कर्तरि शप्' 'तुदादिभ्यः शः' ह्या दोन्ही सूत्रांत 'शप्' व 'श' ह्यां दोहोंचाहि अर्थ जरी 'अ' आहे तरी 'प्' हा अनुबन्ध 'शप्' येथेंच आढळत असून 'श' येथें आढळत नाहीं, व पित्त्वनिमित्तामुळें गुणरूपी कार्य 'शप्' लागला असतांच होतें, व 'श' लागला असतां होत नाहीं). कावळे इत्यादि पक्षी वृक्षावर बसलेले आढळतात, पण ते पक्षी त्या वृक्षाचा अवयव नसल्यामुळें, ज्या संयोगसंबंधानें ते वृक्षावर बसलेले आढळतात त्याच संयोगसंबंधानें ते इतर ठिकाणींहि (घरावर) बसलेले आढळतात, पण अनुबन्धासंबंधानें तसें नाहीं. (अनुबन्ध हा ज्याचा अवयव आहे, तेथेंच आढळतो, इतर ठिकाणीं आढळत नाहीं). अनुबन्ध हे अवयव मानल्यास, 'शित् कित्' इत्यादि ठिकाणीं (लक्षणेचा आश्रय न करितां) बहुव्रीहिसमासाची साहजिकरीत्या उपपत्ति लागते व 'हलन्त्यम्' ह्या ठिकाणीं 'अन्त्य' शद्बाचा लक्षणेनें (म्हणजे अवयवत्वाचा आरोप करून) अर्थ करण्याची गरज पडत नाहीं.

**किं चानवयवत्वे णशकप्रत्ययादौ णादेरित्त्वानापत्तिः प्रत्ययादित्वाभावात् । इग्रचश्चकारस्य वैयर्थ्यापत्तिश्च । इदश्च तस्य लोप इत्यत्र भाष्ये**

श्यङ्म् । तत्र ह्युक्तमेकान्ता अनुबन्धा इत्येव न्याय्यमिति दिक् ॥ ५ ॥

दुसरें असें कीं, अनुबन्ध प्रत्ययादिकांचे अवयव न मानल्यास ( म्हणजे प्रत्यय अनुबन्धरहित मानल्यास, 'ज्वलितिकसन्तेभ्यो णः—सू. २९०२ 'पाघ्राध्माधेट्दृशः शः सू. २८९८ 'इगुपधज्ञाप्रीकिरः कः सू २८९७ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या ) 'ण' 'श' 'क' प्रत्ययांचे आदिवर्ण 'ण्' 'श्' 'क्' इत्संज्ञक होणार नाहींत. ( कारण ह्या तिन्ही प्रत्ययांत 'अ' एवढाच प्रत्यय मानल्यास ) 'ण्' 'श्' 'क्' ह्यानां प्रत्ययाचे आदिवर्ण म्हणताच येणार नाहीं. (जर अनुबन्धसहित प्रत्यय मानला तरच ते प्रत्ययाचे आदिवर्ण मानतां येतील, व 'चुटू' सू. १८९. 'लशक्वतद्धिते'–सू. १९५–'आदिर्ञिटुडवः' सू. २२८९ हीं सूत्रें व्यर्थ ठरणार नाहींत. ) तसेंच ("प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः' सू. १८३८ ह्या सूत्रांत 'द्वयसच्' ह्यांतील 'च्' 'द्वयसच्' व 'दघ्नच्' ह्या दोहोंच्याहि समीप असल्यामुळें, देहलीदीपन्यायानें दोहोंनांहि काम देईल, व) 'दघ्नच्' यातील 'च्' व्यर्थ पडेल. (दोन्हीं शब्दांपुढें पाणिनीनें भिन्न भिन्न 'च्' उच्चारला आहे. ह्यावरून 'एकान्ताः अनुबन्धाः' ह्या परिभाषेचें ते दोन चकार ज्ञापक ठरतात.) 'तस्यलोपः'–१–३–९ ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्या विषयीं स्पष्ट उल्लेख केला आहे व तेथें हेंहि सांगितलें आहे कीं अनुबन्ध प्रत्ययादिकांचे अवयव आहेत हेंच मानणें योग्य आहे.

---

# परिभाषा ६

**नन्वेकान्तत्वेऽनेकाल्त्वादेव औशादीनां सर्वादेशत्वसिद्ध्याऽनेकाल्सूत्रे शिद्ग्रहणं व्यर्थमत आह ॥**

आतां कोणी अशी शंका करील कीं, अनुबन्ध प्रत्ययादिकांचे अवयव मानले गेल्यामुळें ( ' अष्टाभ्य औश् ' सू० ३७२ ह्या सूत्रांत सांगितलेला ) ' औश् ' आदेश व इतर असेच आदेश हे आपोआपच ' अनेकाल् ' झाले, व ते अनेकाल् झाल्यामुळें, ज्याचे ठिकाणीं ते आदेश सांगितले आहेत त्या पूर्ण शब्दाचे जागीं, ' अनेकाल्शित्सर्वस्य ' सू० ४५ ह्या सूत्रान्वयें, होणारच. मग ' अनेकाल् शित्सर्वस्य ' ह्या सूत्रांत पुनः ' शित् ' शब्दाचें ग्रहण व्यर्थच ठरतें. ( म्हणजे ' शित् ' आदेश अनेकाल् असणारच; तेव्हां 'अनेकाल्' ह्या शब्दानें त्याचें ग्रहण होत असल्यामुळें, पुनः 'शित्' आदेश पूर्ण शब्दाचे जागीं होतो हें सांगण्याची गरज काय आहे ? तशी गरज न उरल्यामुळें, सूत्रांतील ' शित् ' शब्द व्यर्थ पडतो ) म्हणून ( ह्या शंकेचें निवारण करण्याकरितां ) ही परिभाषा सांगतातः—

**नानुबन्धकृतमनेकाल्त्वम् ॥ ६ ॥**

जो अनुबन्धरहित असतांना एकाल् असतो त्याला अनुबन्ध लावल्यामुळें अनेकाल् समजूं नये.

( सारांश जो आदेश करावयाचा तो स्वतः अनेकाल असला तरच तो सर्वादेश होतो. अनुबन्धामुळें त्याला अनेकाल्त्व येत असलें तर तें अनेकाल्त्व सर्वादेशसिद्धि होण्याकरितां उपयोगीं पडूं शकत नाहीं )

**शिद्ग्रहणमेवैतज्ज्ञापकम्, तेनार्वणस्तृ इत्यादेर्न सर्वादेशत्वम् ।**

(' अनेकाल् शित् सर्वस्य ' ह्या सूत्रांत ' अनेकाल् ' हा शब्द असून देखील पुनः ' शित् ' हा शब्द घातला आहे तो ) ' शित् ' शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक होय. ( ही परिभाषा नसती तर ' शित् ' ग्रहण व्यर्थ ठरलें असतें. ) ही परिभाषा असल्यामुळें, ' अर्वणस्त्रसावनञः ' सू० ३६४ ह्या सूत्रांत सांगितलेला ' तृ ' हा आदेश पूर्ण ' अर्वन् ' शब्दाचें जागीं न होतां, (' अलोन्त्यस्य ' सू० ४२ ह्या सूत्रानें ) अन्त्य वर्ण ' न् ' ह्याचें जागीं होतो. (' तृ ' हा अनेकाल् दिसतो, पण त्यांतील ऋकार अनुबन्ध असल्यामुळें, त्याला ह्या परिभाषेमुळें अनेकाल् मानतां येत नाहीं.)

**डादिविषये तु सर्वादेशत्वं विनानुबन्धत्वस्यैवाभावेनानुपूर्व्यात्सिद्धम्।**

(' लुटः प्रथमस्य डारौरसः ' सू० २१८८ ह्या सूत्रानें ' लुट् ' लकारांत ' तिप्तस् झि ' ह्या प्रथमपुरुषाच्या प्रत्ययांच्या जागीं ) ' डा ' इत्यादि जे आदेश सांगितले आहेत ते सर्वादेश झाल्याशिवाय (व तो सर्वादेश होऊन त्यांना स्थानिवद्भावानें ' प्रत्यय ' ही संज्ञा प्राप्त झाल्याशिवाय, ' चुटू ' सू० १८९ ह्या सूत्रान्वयें, ' ड् ' इत्यादिकांना ' इत्संज्ञक ') अनुबन्ध मानतां येत नसल्यामुळें, त्यांचें सर्वादेशत्व वर दिलेल्या क्रमानें सिद्ध होतें. (तो क्रम असाः—' डा ' हा स्वतः सिद्ध अनेकाल् असल्यामुळें, ' अनेकाल् शित् सर्वस्य ' ह्या सूत्रान्वयें, तो प्रथम सर्वादेश होतो. तो सर्वादेश झाला म्हणजेच मग त्या ' डा ' ला स्थानिवद्भावानें ' प्रत्यय ' अशी संज्ञा प्राप्त होते, आणि नंतर ' चुटू ' ह्या सूत्रान्वयें ' ड् ' हा इत्संज्ञक अनुबन्ध होतो. तोंपर्यंत ' ड् ' ह्याला अनुबन्ध मानतांच येत नाहीं, आणि म्हणूनच ' डा ' हा सर्वादेश होतो. सारांश ' नानुबन्धकृतमनेकाल्त्वम् ' ही परिभाषा ' डा ' हा सर्वादेश होण्याच्या आड येत नाहीं.)

---

## परिभाषा नं. ७

**नन्वेवमप्यवदातं मुखमित्यत्र पलोपोत्तरमात्वेकृतेऽदाविति घुसंज्ञाप्रतिषेधो न स्याद्दैपः पकारसत्त्वेऽनेजन्तत्वादात्वाप्राप्त्या पलोपोत्तरं पकाराभावेनास्य दाप्त्वाभावादत आह—**

आतां कोणी अशी शंका करील कीं, अनुबन्ध जर अवयव मानले तर 'अवदातं मुखम्' ह्यांत 'अवदातम्' (अव+दैप् शोधने+क्त) हें रूप सिद्ध कसें व्हावें ? कारण 'दैप्' ह्यांतील 'प्' ह्या अनुबन्धाचा ('तस्य लोपः' सू० ६२ ह्या सूत्रानें) लोप होऊन

'दे' असें धातूचें रूप राहतें, व 'आदेच उपदेशेऽशिति' सू० २३७० ह्या सूत्रानें 'दे' चा 'दा' होतो. ( 'दाप्' होत नाहीं. ) व अशा 'दा' ला (तो 'दाप्' नसल्यामुळें) घुसंज्ञानिषेध लागू पडत नाहीं. कारण 'दाधाघ्वदाप्' सू० २३७३ ह्या सूत्रान्वयें, 'दाप्' लाच घुसंज्ञानिषेध सांगितला आहे. 'दैप्' ह्यांतील 'प्'चा लोप न केल्यास, 'दैप्' धातु एजन्त मानतां येणार नाहीं. ( कारण त्याच्या अन्तीं 'ऐ' नसून 'प्' आहे ) व त्यामुळें ( 'आदेच उपदेशेऽशिति' सू० २३७० ह्या सूत्रान्वयें ) 'दैप्' ह्याचें 'दाप्' असें रूप होऊं शकणार नाहीं. 'प्'चा लोप झाल्यानंतर 'आदेचः'—ह्या सूत्रानें 'दे'चा 'दा' जरी होईल तरी अशा 'दा'चें ठिकाणीं 'प'चा अभाव राहणार (व त्यामुळें 'दा' ह्याला घुसंज्ञानिषेध लागू पडूं शकत नसल्यामुळें, तो घुसंज्ञक होईल, व 'अच उपसर्गात्तः' सू० ३०७८ ह्या सूत्रान्वयें 'अवदातम्' असें रूप न होतां, 'अवत्तम्' असें विकृत रूप होईल). ह्या शंकेचें निवारण करण्याकरितां ही परिभाषा सांगतात .

## नानुबन्धकृतमनेजन्तत्वम् ॥ ७ ॥

अनुबन्धामुळें एजन्तत्व नष्ट होत नाहीं ( ह्मणजे अनुबन्धसहित धातु अनुबन्ध रहित केल्यानंतर जर एजन्त असेल तर अनुबन्धामुळें तो एजन्त नाहीं, असें मानूं नये)

**उदीचां माङ इति निर्देशोऽस्या ज्ञापकः । आदेच उपदेश इति सूत्रेणोपादिश्यमानस्यैजन्तस्यात्वं क्रियते ङकारसत्त्वे त्वेजन्तत्वाभावादात्वाप्राप्तेस्तस्यासङ्गतिः ।**

"उदीचां माङो व्यतीहारे" सू० ३३१७ ह्या सूत्रांत ( 'मेङः' असें न उच्चारतां, पाणिनीनें) 'माङः' असें जें पद उच्चारलें आहे, तें ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. 'आदेच उपदेशेऽशिति' सू. २३७० ह्या सूत्रान्वयें धातुपाठांत पठित 'मेङ' ह्या एजन्त धातूतील 'ए' च्या ठिकाणीं 'आ' केला आहे. 'मेङ्' ह्यांत जोंपर्यंत 'ङ्'कायम आहे, तोंपर्यंत तो धातु एजन्त समजतां येत नाहीं. (कारण त्याच्या अन्तीं 'ए' नसून'ङ्' आहे) व त्यामुळें ('आदेचः' ह्या सूत्रानें 'ए'चें जागीं 'आ' होऊं शकत नाहीं, असें मानल्यास, 'उदीचां माङः' ह्या सूत्रांत) 'माङः' असें जें उच्चारण केलें आहे तें अशुद्ध ठरतें. ( पण ज्या अर्थी सूत्रांत 'माङः' असा निर्देश केला आहे त्या अर्थी तो निर्देश ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतो. सारांश, अनुबन्धामुळें धातूचें एजन्तत्व नष्ट होत नाहीं हें ह्या निर्देशामुळें सिद्ध होतें.)

**न चास्यामवस्थायां तस्य धातुत्वाभावात्कथमात्वम्, तत्र धातोरित्यस्य निवृत्तेरित्यन्यत्र विस्तरः ॥ स्पष्टं चेदं दाधाघ्वदाविति सूत्रे भाष्ये ॥७॥**

ह्यावर कोणी अशी शंका करील कीं, 'मेङ्' ह्यांत जोंपर्यंत 'ङ्' आहे तोंपर्यंत त्या 'मेङ्'ला'धातु' ही संज्ञा प्राप्तच होऊं शकत नाहीं; (कारण भाष्यकारांच्यामतें, धातुपाठांत सांगितलेल्या धातूंच्या अनुबन्धरहित रूपालाच 'धातु' ही संज्ञा आहे) व

'मेङ्' याला धातुसंज्ञा नसल्यामुळें, 'ए'चें आत्व कसें व्हावें ? ( कारण धातूच्या एकाराला आत्व होतें. 'मेङ्' हा धातुच नाहीं; ) पण ही शंका बरोबर नाहीं. ('आदेच' ह्या सूत्रांत) 'धातोः' ह्या पदाची अनुवृत्ति नाहीं असा अन्यत्र उल्लेख केला आहे (त्यामुळें 'मेङ्' ह्याला धातु न मानलें तरी 'आदेचः' हें सूत्र लागू पडतें व 'मेङ्' ह्यांतील 'ए' चें आत्व होतें). 'दाधाध्वदाप्' १-१-२० ह्या सूत्रावरील भाष्यांत हें स्पष्टपणें सांगितलें आहे.

---

## परिभाषा ८

नन्वेवमपि वासरूपसूत्रेण कविषयेऽणोऽप्यापत्तिरित्यत आह—

आतां कोणी अशी शंका करील कीं, 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' सू० २८३० ह्या सूत्राप्रमाणें, स्त्रीप्रत्ययाधिकारस्थ सोडून इतर सर्व 'कृत्' प्रत्यय असरूप असल्यास, एकमेकांचें बाधक न होतां, दोन्हीहि प्रत्यय विकल्पेंकरून होतात. ( परिभाषा नं. ५ मध्यें सांगितल्याप्रमाणें अनुबन्ध जर प्रत्ययांचे अवयव मानले तर ) अनुबन्धसहित 'क' व 'अण्' हे प्रत्यय ( जरी हे दोन्ही प्रत्यय अनुबन्धरहित केल्यास दोन्हींचाहि अर्थ 'अ' असल्यामुळें अकाररूपानें सरूप आहेत तरी ) असरूप होतील, व त्यामुळें जेथें 'क' प्रत्यय सांगितला आहे तेथें 'वासरूप' ह्या सूत्रान्वयें विकल्पेंकरून 'अण्' प्रत्ययहि होईल. ( म्हणजे 'कर्मण्यण्'—सू० २९१३ ह्यानें 'अण्' प्रत्यय होईल व 'आतोऽनुपसर्गे कः' सू० २९१५ ह्यानें विकल्पेंकरून 'क' प्रत्ययहि होईल.) म्हणून (ह्या शंकेचें निवारण करण्यासाठीं ) ही परिभाषा सांगतात—

### नानुबन्धकृतमसारूप्यम् ॥ ८ ॥

प्रत्ययांना अनुबन्धामुळें आलेलें असारूप्य, असारूप्य नव्हे.

**ददातिदधात्योर्विभाषा इति णबाधकशस्य विकल्पविधायकमस्यां ज्ञापकम् ॥ तेन गोद इत्यादौ नाणिति वासरूपसूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥ ८ ॥**

'ण' प्रत्ययाचा बाध करणाऱ्या 'श' प्रत्ययाचें विकल्पानें विधान करणारें 'ददातिदधात्योर्विभाषा' सू० २९०१ हें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक होय ('ण' व 'श' ह्या प्रत्ययांत 'ण्' व 'श्' हे अनुबन्ध आहेत; व दोन्ही प्रत्ययांचा अर्थ 'अ' हाच आहे. अनुबन्धसहित हे दोन प्रत्यय जर असरूप मानले तर 'ददातिदधात्योः' ह्या सूत्रांत 'विभाषा' हा शब्द घालण्याचें कांहींच कारण नव्हतें; व 'ददातिदधात्योः' एवढेंच सूत्र केलें असतें; व या सूत्रानें 'श' प्रत्यय होऊन 'श्याद्व्यधा'—सू० २९०३—ह्या सूत्रानें आकारान्तधातूस सांगितलेला 'ण' प्रत्ययहि 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' ह्या सूत्रान्वयें, विकल्पेंकरून झालाच असता. तरी पण पाणिनीनें

' ददातिदधात्योः ' ह्या सूत्रांत ' विभाषा ' हा शब्द मुद्दाम टाकला आहे; ह्यावरून हें स्पष्टपणें सिद्ध होतें कीं, 'ण' व 'श' प्रत्यय सरूप आहेत व त्यामुळें ते एकमेकांचे बाधक ठरतात—म्हणजे एक झाला तर दुसरा होऊं शकत नाहीं. तरी पण ते ' दा ' व ' धा ' ह्या धातूंस विकल्पेंकरून व्हावे असें पाणिनीस इष्ट असल्यामुळें, त्याला वरील सूत्रांत ' विभाषा ' हा शब्द घालणें भाग पडलें. ह्या सूत्रावरून हें स्पष्ट होतें कीं, अनुबन्धामुळें दिसणारें असारूप्य हें असारूप्य समजूं नये.) व ह्यामुळेंच ' गोदः ' ह्या ठिकाणीं, (' आतोऽनुपसर्गे कः ' ह्या सूत्रानें ' क ' प्रत्यय झाल्यावर, ' कर्मण्यण् ' ह्या सूत्रानें ) ' अण् ' प्रत्यय होत नाहीं. ( व ' आतो युक्चिण्कृतोः ' सू० २७६१ ह्या सूत्रान्वयें ' गोदायः ' असें रूप होत नाहीं. कारण ' क ' व अण् ' हे प्रत्यय जरी अनुबन्धामुळें विसदृश दिसतात तरी असें असारूप्य, ह्या परिभाषेमुळें, असारूप्य मानतां येत नाहीं, व हे प्रत्यय सरूप ठरून परस्परांचे बाधक होतात.) हें ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' ३–१–९४ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे.

---

## परिभाषा ९

**ननु संख्याग्रहणे बह्वादीनामेव ग्रहणं स्यात्प्रकरणस्याभिधानियामकत्वसिद्धात्कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसम्प्रत्यय इति न्यायात्। अस्ति च प्रकृते बह्वादीनां संख्यासंज्ञा कृतेति ज्ञानरूपं प्रकरणम्। न तु लोकप्रसिद्धैकद्व्यादीनामित्यत आह—**

(' बहुगणवतुडति संख्या ' सू० २५८ हें संख्यासंज्ञाविधायकसूत्र असल्यामुळें ) बहु, गण, 'वतु'प्रत्ययान्त व 'डति'प्रत्ययान्त, ह्यांचेंच ' संख्या ' शब्दानें ग्रहण होईल. ( कारण जेथें एका शब्दाचे अनेक अर्थ आहेत तेथें, प्रकरणाकडे लक्ष देऊन, त्या शब्दाचा प्रकरणाशीं जुळणारा असाच अर्थ स्वीकारला पाहिजे. जसें:— ' सैन्धव ' शब्दाचे ' मीठ ' व ' अश्व ' असे दोन अर्थ आहेत. एखादा गृहस्थ भोजन करीत असतांना त्यानें ' सैन्धवमानय ' असें म्हटलें तर भोजनप्रकरणाला धरून, ' सैन्धव ' ह्या शब्दाचा ' मीठ ' असाच अर्थ केला पाहिजे. पण एखादा राजा शिकारीस निघतेवेळीं म्हणेल कीं ' सैन्धवमानय ' तर तेथें, मृगयाप्रकरणास अनुसरून, ' सैन्धव ' शब्दाचा अर्थ ' घोडा ' असाच केला पाहिजे. सारांश, ) प्रकरण हें अनेकार्थबोधक शब्दाच्या विशिष्ट अर्थाचें नियामक आहे, व ह्याला धरूनच ' कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययः ' असा न्याय सांगितला आहे. ( जेथें एखाद्या शब्दाचें कृत्रिम व अकृत्रिम असे दोन्ही अर्थ आहेत तेथें, विधायक सूत्रान्वयें कार्य करतेवेळीं, कृत्रिमाचेंच ठिकाणीं तें कार्य करावें. ' संख्या ' शब्दाचा अकृत्रिम अर्थ एक, द्वि त्रि, इत्यादि आहे; त्याचा कृत्रिम अर्थ बहु, गण, 'वतु'प्रत्ययान्त व 'डति'प्रत्ययान्त, असा आहे.

तेव्हां पाणिनीय सूत्रानें संख्येवरून कांहीं कार्य करावें असें सांगितल्यास, कृत्रिम संख्येहूनच तें कार्य झालें पाहिजे.) पाणिनीच्या व्याकरणशास्त्रांत 'संख्या' ह्या शब्दाचा कृत्रिम अर्थ केला आहे, व हें व्याकरणशास्त्ररूपी प्रकरण लक्षांत धरून 'संख्या' शब्दाचा लोकप्रसिद्ध एक दोन इत्यादि असा अकृत्रिम अर्थ न घेतां, कृत्रिमच अर्थ घेतला पाहिजे ( सारांश, कृत्रिम अर्थाचेंच ग्रहण करावें किंवा अकृत्रिम अर्थाचेंहि ग्रहण करावें असा संदेह उत्पन्न झाल्यामुळें तो संदेह निवृत्त व्हावा ) म्हणून ही परिभाषा सांगतात—

## उभयगतिरिह भवति ॥ ९ ॥

" व्याकरणशास्त्रांत दोन्ही प्रकारच्या अर्थांचें ग्रहण करावें. ( व दोन्हीहि अर्थ मानून कार्य करावें. ) "

**इह शास्त्रे ।**

ह्या परिभाषेंतील 'इह' ह्या शब्दाचा अर्थ "ह्या व्याकरणशास्त्रांत" असा आहे.

**'संख्याया अतिशदन्ताया' इति निषेधोऽस्या ज्ञापकः । नहि कृत्रिमा संख्या त्यन्ता शदन्ता वास्ति ।**

'संख्याया अतिशदन्तायाः कन्' सू० १६८७ हें निषेधसूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ( संख्यावाचक शब्दाच्या अन्तीं जर 'ति' किंवा 'शत्' असेल तर 'कन्' प्रत्यय होत नाहीं असा निषेध ह्या सूत्रांत सांगितला आहे. येथें 'संख्या' ह्या शब्दाचा कृत्रिम अर्थ केल्यास हा निषेध व्यर्थ ठरेल; कारण ) कृत्रिमसंख्यावाचक शब्द ( बहु, गण, 'वतु'प्रत्ययान्त व 'डति'प्रत्ययान्त शब्द ) ह्यांच्या अन्तीं 'ति' किंवा 'शत्' नसतोच.( ह्या निषेधावरून हें स्पष्ट होतें कीं, 'संख्या' शब्दाचा कृत्रिमच अर्थ न घेतां, उभयविध—म्हणजे कृत्रिम व अकृत्रिम असे—अर्थ घ्यावे, म्हणजेच वरील निषेध चरितार्थ ठरेल. )

**तेन 'कर्तरि कर्मव्यतिहारे' 'कण्वमेघेभ्यः करणे' 'विप्रतिषिद्धं चानधिकरणे' त्यादौ लौकिकक्रियाद्रव्याद्यवगतिः ।**

अशी परिभाषा आहे म्हणूनच, 'कर्तरि कर्मव्यतिहारे' सू० २६८० ह्या सूत्रांत 'कर्म' शब्दाचा अकृत्रिम अर्थ 'क्रिया' असा आहे. ( 'कर्तुरीप्सिततमं कर्म' हा कृत्रिम अर्थ घेऊं नये. ) तसेंच 'शब्दवैरकलहाभ्रकण्वमेघेभ्यः करणे' सू० २६७३ ह्या सूत्रांत 'करण' ह्या शब्दाचा अकृत्रिम अर्थ 'क्रिया' हाच आहे. ( 'साधकतमं करणम्' हा कृत्रिम अर्थ घेऊं नये.) तसेंच 'विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि' सू० ९१७ ह्या सूत्रांत 'अधिकरण' हा शब्द अकृत्रिम अर्थ 'द्रव्य' ह्याचा वाचक आहे. ( 'आधारोऽधिकरणम्' हा त्याचा कृत्रिम अर्थ येथें घेऊं नये.)

**तत्र क्वोभयगतिः क्वाकृत्रिमस्यैव क्व कृत्रिमस्यैवेत्यत्र लक्ष्यानुसारि व्याख्यानमेव शरणम् । अत एवाम्रेडितशब्देन कृत्रिमस्यैव ग्रहणं न तु द्विस्त्रिर्घुष्टमात्रस्य । स्पष्टं चेदं संख्यासंज्ञासूत्रे भाष्ये ।**

पाणिनीय व्याकरणशास्त्रांत कोठें दोन्हींहि अर्थांचें ग्रहण करावें, कोठें केवळ कृत्रिमार्थांचेंच ग्रहण करावें व कोठें केवळ अकृत्रिम अर्थाचेंच ग्रहण करावें हें ठरवितांना, ( भाष्यकारादिकांनीं) इष्टरूपसिद्धि हें प्रयोजन लक्षांत धरून, ज्या सूत्रांत जसा अर्थ केला आहे तो अर्थ घेऊनच कार्यसिद्धि करावी. म्हणूनच अशा ठिकाणीं, निश्चितार्थबोध होण्याकरितां केवळ व्याख्यानाचा आश्रय केला पाहिजे. असें असल्यामुळें ' तस्यपरमाम्रेडितम् ' सू० ८३ ह्या सूत्रांतील ) ' आम्रेडित ' शब्दाच्या कृत्रिमार्थांचेंच ( व्याकरणशास्त्रांत ) ग्रहण करावें, व ' दोन किंवा तीनदा जें उच्चारलें आहे ' असा ह्या शब्दाचा अकृत्रिम अर्थ करूं नये. संख्यासंज्ञासूत्रावरील भाष्यांत ( १–२–२३ ) हें स्पष्टपणें सांगितलें आहे.

**यत्तु संज्ञाशास्त्राणां मच्छास्त्रे ऽनेन शब्देनैत एवेति नियमार्थत्वं कृत्रिमाकृत्रिमन्यायबीजमिति, तन्न । तेषामगृहीतशक्तिग्राहकत्वेन विधित्वे सम्भवति नियमत्वायोगात् ।**

पाणिनीय व्याकरणशास्त्रांत, संज्ञाविधायक सूत्रांत संज्ञावाचक शद्बांचा जो कृत्रिम अर्थ दिला आहे त्याचेंच ग्रहण करावें ( व अकृत्रिम अर्थाचें ग्रहण करूं नये) असा नियम करण्याच्या उद्देशानेंच संज्ञासूत्रें रचलीं आहेत व एतन्मूलकच 'कृत्रिमाकृत्रिम न्याय' आहे असें कोणी म्हणतात. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण संज्ञावाचक शद्बांनीं ज्या विशेष अर्थाचा पूर्वीं बोध होत नव्हता त्या नवीन अर्थाचाहि बोध त्यापासून व्हावा ( म्हणजे त्या संज्ञावाचक शद्बांचा लोकव्यवहारांत जो मामुली अकृत्रिम अर्थ आहे त्याखेरीज त्यांत नवीन म्हणजे कृत्रिम अर्थाची भर घालून त्यांना एक जास्त विशिष्ट अर्थ जोडून दिला आहे) अशा विधानाकरितां संज्ञासूत्रें रचलीं आहेत असें म्हणणें संभवत असतांना, त्या संज्ञावाचक शद्बांचें एकाच विशिष्ट (कृत्रिम) अर्थांत नियमन केलें आहे–म्हणजे संज्ञाविधायकसूत्रांत संज्ञावाचक शद्बांचा जो कृत्रिम अर्थ दिला आहे तेवढ्याच अर्थाचें ग्रहण करावें व त्या शद्बांच्या इतर अर्थाचें ग्रहण करूं नये–हें म्हणणें बरोबर नाहीं ( सारांश संज्ञाविधायकसूत्रें हीं विधिसूत्रें मानलीं जाऊं शकत असतां, त्यांना नियामक सूत्रें मानणें बरोबर नाहीं.)

**सर्वे सर्वार्थवाचका इत्यभ्युपगमोऽपि योगिदृष्ट्या, न त्वस्मद्दृष्ट्या विशिष्य सर्वशब्दार्थज्ञानस्याशक्यत्वात् । सामान्यज्ञानं तु न बोधोपयोगीत्यन्यत्र निरूपितम् ॥ ९ ॥**

(प्रत्येक शद्बान सर्व अर्थांचा बोध होत असल्यामुळें, संज्ञावाचक शद्बांत संज्ञाविधायक सूत्रांनीं नवीन अर्थाची भर घातली आहे हें म्हणणें बरोबर नाहीं–असें जर कोणी म्हणेल तर तें ठीक नाहीं; कारण) सर्व शद्ब सर्व अर्थांचे वाचक आहेत हें म्हणणें योगिजनांच्या दृष्टीनें ठीक असलें तरी आपल्या (व्यवहारी पामरांच्या) दृष्टीनें तसें म्हणणें बरो-

दर नाहीं; कारण यच्चयावत् सर्व शब्द व त्यांचे सर्व अर्थ जाणणें आपणांस अशक्य आहे. व (कोणी एखादें वाक्य उच्चारल्यास त्यांतील प्रत्येक शब्दाचा) विशेष–म्हणजे अभिप्रेत-अर्थ कोणता आहे हेंहि जाणणें अशक्य आहे. (प्रत्येक शब्दाचे सर्व प्रकारचे अर्थ आहेत असें) सामान्यज्ञान, वाक्यार्थबोधाच्या उपयोगीं पडूं शकत नाहीं. (वाक्यांतील प्रत्येक शब्दाचा संकेतित अर्थ–म्हणजे जो अर्थ वक्त्याला अभिप्रेत आहे तो अर्थ–कळल्याशिवाय वाक्यार्थबोध होऊं शकत नाहीं) हें इतर ठिकाणीं सांगितलें आहे.

---

## परिभाषा नं० १०

**नन्वध्येता शयितेत्यादाविङ्शीङोर्ङित्वाद् गुणनिषेधः स्यादत आह—**

' अधि+इङ्+ता=अधि+एता=अध्येता ' व ' शीङ्+इ+ता=शे+इता=शयिता ' इत्यादि स्थलीं, ' इङ् ' व ' शीङ् ' हे दोन्ही धातु ङित् आहेत. त्यामुळें ' क्ङिति च' सू० २२१७ ह्या सूत्रान्वयें त्यांना गुणाचा निषेध पावला आहे (अशी कोणी शंका करील तर, त्या शंकेचें निवारण व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात—

**कार्यमनुभवन् हि कार्यी निमित्ततया नाश्रीयते ॥ १० ॥**

ज्याच्यावर कार्य केलें जातें तो कार्यी, तें कार्य अनुभवीत असतांना, ( सूत्र-विहित ) कार्याचें निमित्त होऊं शकत नाहीं.

**स्थण्डिलाच्छयितरीति निर्देशश्चास्या ज्ञापकः**

' स्थण्डिलाच्छयितरिव्रते ' सू० १२१६ ह्या सूत्रांत ' शयितरि ' असा जो निर्देश केला आहे तो ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ( 'शयितरि' ह्यांत ' शीङ् ' धातूच्या अन्त्य ईकाराचा ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ ह्या सूत्रानें गुण करून ' एचोऽयवायावः ' सू० ६१ ह्या सूत्रानें ' ए ' च्या जागीं अयादेश करून सप्तमीच्या एक वचनाचें रूप निर्दिष्ट केलें आहे. ' शीङ् ' धातु ङित् असूनहि पाणिनीनें अन्त्य ईकाराला गुण केला आहे; कारण ' शीङ् ' हा धातु गुणरूपी कार्य अनुभवित असतांना गुणप्रतिबन्धक कार्याचें निमित्त होऊं शकत नाहीं. ह्यामुळें ' शयितरि ' हा शब्द त्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो.)

**ऊर्णुनविषतीत्यादिसिद्धये कार्यमनुभवन्निति। अत्र हि द्विर्वचनेऽचीति नुशब्दस्य द्वित्वम्। अन्यथा सन्यङोरित्यस्य षष्ठ्यन्तत्वात्सन्नन्तस्य कार्यित्वेनेसो द्वित्वनिमित्तत्वाभावात्तत्प्रवृत्तिर्न स्यात् ॥**

' ऊर्णुनविषति ' इत्यादि रूपांची सिद्धि व्हावी एवढ्याकरितां ' कार्यमनुभवन् ' हे शब्द ह्या परिभाषेंत घातले आहेत. ' ऊर्णुनविषति ' हें रूप सिद्ध करितांना, ' द्विर्वचनेऽचि ' सू० २२४३ असें सूत्र असल्यामुळें, ( गुणरूपी अजादेश होण्यापूर्वीं ) ' नु ' ह्याचें द्वित्व केलें आहे. परिभाषेंत जर ' कार्यमनुभवन् ' हे शब्द नसते ( व ' कार्यी निमित्ततया नाश्रीयते ' एवढीच जर परिभाषा पठित असती ) तर, ' सन्यङोः ' सू० २३९५ ह्या सूत्रांत ' सन्यङोः ' हा षष्ठ्यन्त निर्देश आहे म्हणून, ' सन्नन्त ' ' ऊर्णु+इस् ' एवढा सर्व ' कार्यी झाल्यामुळें ' ' इस् ' हा द्वित्वाचें निमित्त होऊं शकला नसता, व द्वित्वनिमित्ताच्या अभावामुळें ' द्विर्वचनेऽचि ' हें निषेध-सूत्र प्रवृत्त झालें नसतें ( व त्यामुळें गुणाचा प्रतिषेध झाला नसता व गुण होऊन, 'नु' चें द्वित्व न होतां, ' नो ' चें द्वित्व झालें असतें व सनाचें विकृत रूप झालें असतें. सन्यङोः ' हें षष्ठीचें द्विवचन आहे, सप्तमीचें रूप नव्हें. ह्या सूत्राचा अर्थ ' सन्नन्तस्य यङन्तस्य च द्वित्वं भवति ' असा केला आहे. ह्या अर्थाप्रमाणें सन्नन्ताला द्वित्व होतें. ह्यामुळें द्वित्वरूपी कार्य अनुभविणारा 'ऊर्णु+इस् ' एवढा शब्दसमुदाय कार्यी होतो. तर मग ह्या परिभाषेप्रमाणें तो द्वित्वरूपी कार्याचें निमित्त—म्हणजे कारण—कसा होऊं शकणार ? परंतु परिभाषेंत ' कार्यमनुभवन् ' हे शब्द टाकले असल्यामुळें, व द्वित्व-रूपी कार्य अनुभविणारें पूर्ण सन्नन्ताङ्ग कार्यी नसून, ' अजादेर्द्वितीयस्य ' सू० २१७६ ह्या सूत्राप्रमाणें द्वितीय एकाच् ' नु ' हाच द्वित्वरूपी कार्य अनुभविणारा असल्यामुळें, हें सन्नान्ताङ्ग द्वित्वरूपी कार्याचें निमित्त=कारण होऊं शकतें. ह्या दोहोंत—म्हणजे द्वितीय एकाच् ' नु ' व सन्नन्ता—ङ्ग ह्यामध्यें अवयवावयविभावामुळें फरक आहे. पूर्ण सन्नन्ताङ्ग हें अवयवी असून, ' नु ' हा त्याचा अवयव आहे. सारांश, द्वित्वकार्य अनु-भविणारा कार्यी ' नु ' व द्वित्वाचें निमित्त पूर्ण सन्नन्ताङ्ग हे भिन्न असल्यामुळें, ही परिभाषा ' नु ' चें द्वित्व होण्याच्या आड येत नाहीं.)

**वस्तुतः समवायिकारणनिमित्तकारणयोर्भेदस्य सकललोकतन्त्रप्रसिद्धतया तस्य तत्त्वेनाश्रयणाभावेन नैषा ज्ञापकसाध्या। अत एव हिः प्रयुक्तः। स हि तत्त्वेनानाश्रयणे हेतोः प्रसिद्धत्वं द्योतयतीति तत्वम्॥ द्विर्वचनेऽचीत्यत्र भाष्ये ध्वनितैषा॥ १०॥**

वास्तविक पाहिलें असतां, समवायिकारण व निमित्तकारण भिन्न असतात ही गोष्ट सर्व शास्त्रांत व लोकव्यवहारांत प्रसिद्ध आहे. (हीं दोन कारणें परस्पर भिन्न असल्यामुळें ) समवायिकारणाला केव्हांहि निमित्तकारण मानतां येत नाहीं; म्हणून ही परिभाषा ज्ञापकसिद्ध मानण्याचें कारण नाहीं. ( कारण समवायिकारण कधींहि निमित्त-कारण होऊं शकत नाहीं ह्या लौकिक न्यायानेंच ती सिद्ध होते. येथें ' कार्यमनुभवन् हि कार्यी ' म्हणजेच समवायि कारण होय. जसें–घटरूपकार्य अनुभविणारी मृत्तिका ही समवायिकारण असल्यामुळें, वर सांगितलेल्या लौकिकन्यायाप्रमाणें ती केव्हांहि निमित्त

कारण होऊं शकत नाहीं. म्हणून ही परिभाषा लौकिकन्यायानें सिद्ध होत असतां, ज्ञापक शोधण्याची गरज काय ? ) म्हणूनच ह्या परिभाषेंत ' हि ' हा शब्द घातला आहे, व तो शब्द हेंच सुचवितो कीं, समवायिकारण हें केव्हांहि निमित्तकारण होऊं शकत नाहीं हें सर्वत्र प्रसिद्ध—म्हणजे लौकिकन्यायसिद्ध—असल्यामुळें, कार्य अनुभविणारा कार्यीं हा समवायिकारण असतांना, निमित्तकारण केव्हांहि होऊं शकत नाहीं. ' द्विर्वचनेऽचि ' १-१-५९ ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्या परिभाषेचें ( व ह्या परिभाषेंतील ' कार्यमनुभवन् ' ह्या अंशाचें ) अस्तित्व ध्वनित केलें आहे.

---

# परिभाषा नं० ११

ननु प्रणिदापयतीत्यादौ दारूपस्य विधीयमाना घुसंज्ञा दापेर्न स्यादत आह—

' प्रणिदापयति ' इत्यादि स्थलीं, ' दा ' ला सांगितलेली ' घु ' संज्ञा ' दाप् ' ला होणार नाहीं. ( ' दा ' धातुचा ' णिच् ' करितांना ' अर्तिन्ही ' सू० २५७० ह्या सूत्रानें पुगागम होत असल्यामुळें, ' दा ' धातूचें ' दाप् ' असें रूप होतें, व त्यामुळें ' दाधाघ्वदाप् ' सू० २३७२ ह्या सूत्रानें ' दा ' धातुची घुसंज्ञा नष्ट होऊन ' नेर्गदनद '—सू० २२८५ ह्या सूत्रानें ' प्रणिदापयति ' ह्यांतील ' न् ' चे णत्व होणार नाहीं. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## यदागमास्तद्गुणीभूतास्तद्ग्रहणेन गृह्यन्ते ॥ ११ ॥

" ज्याला आगम होणें सांगितलें आहे त्याला आगम झाल्यावर, आगम त्याचा अवयव होत असल्यामुळें, आगमरहित शब्दाच्या वाचकशब्दानें आगमसहित शब्दाचें ग्रहण होतें. "

**यमुद्दिश्यागमो विहितः स तद्गुणीभूतः शास्त्रेण तदवयवत्वेन बोधितोऽतस्तद्ग्रहणेन तद्ग्राहकेण तद्बोधकेन शब्देन गृह्यते बोध्यत इत्यर्थः ।**

ज्याला उद्देशून आगम सांगितला आहे त्याला तो आगम झाल्यावर व्याकरणशास्त्रांत तो आगम त्याचा अवयव समजला जातो. म्हणून आगमरहिताच्या वाचक शब्दानें आगमसहिताचा बोध होतो. ( जसें ' दा ' ह्या आगमरहित धातूचा वाचक शब्द ' घु ' आहे; ' अर्तिन्ही ' ह्या सूत्रानें ' दा ' धातूस ' प् ' हा आगम झाल्यावर ' दाप् ' असें आगमसहित रूप होतें, व ' घु ' ह्या शब्दानें त्या आगमसहित ' दाप् ' रूपाचेंहि ग्रहण होतें. )

**तत्र तद्गुणीभूता इत्यंशो बीजकथनम् । लोकेऽपि देवदत्तस्याङ्गाधिक्ये तद्विशिष्टस्यैव देवदत्तग्रहणेन ग्रहणं दृश्यते ॥**

ह्या परिभाषेतील ' तद्गुणीभूताः ' ह्या शब्दानें अशा तऱ्हेचा बोध होण्याचें कारण सांगितलें आहे. लौकिक व्यवहारांत देखील देवदत्ताला ( इतर लोकांच्या मानानें ) अधिक अवयव असल्यास, ' देवदत्त ' शब्दानें जास्त अवयवानें युक्त अशा देवदत्ताचें ग्रहण केलें जातें. ( आणि ह्याच लौकिकन्यायानुसार ज्याला आगम होतो त्याचा तो आगम अवयव होत असल्यामुळें, आगमरहिताच्या वाचकशब्दानें आगमसहित शब्दाचेंहि ग्रहण होतें. )

**यमुद्दिश्य विहित इत्युक्तेः प्रनिदारयतीत्यादौ न दारित्यस्य घुत्वम् ॥**

ह्या परिभाषेंतलि 'यदागमाः' ह्या शब्दाची 'यमुद्दिश्य विहितः' ( ' ज्याला उद्देशून आगम सांगितला आहे ) अशी व्याख्या केली असल्यामुळें, ' प्रनिदारयति ' इत्यादि ठिकाणीं 'दार्' ह्याला 'घु' संज्ञा प्राप्त होत नाहीं. (' प्र+नि+दॄ+णिच् ' अशा स्थितींत ' अचोञ्णिति' सू. २५४ ह्या सूत्रानें 'दॄ' ह्यांतील अन्त्य ऋकाराची वृद्धि होऊन, ' उरण्रपरः' सू. ७० ह्या सूत्रान्वयें ' प्र+नि+दार्+णिच् ' असें होतें. आतां शंकाकार अशी शंका करील कीं, ' दा' धातूला पुगागम होऊन 'दाप्' असें झाल्यावर तुम्हीं त्याची 'घु' संज्ञा मानता, तर मग 'दॄ' ह्याचें 'दार्' असें रूप, वर सांगितल्याप्रमाणें, झाल्यावर, 'दार्' ह्याला देखलि 'घु' संज्ञा कां प्राप्त होऊं नये ? कारण जसा 'प्' हा आगम आहे तसा 'र्' हाहि आगम आहे. ह्या शंकेचें उत्तर असें आहे कीं, 'र्' हा आगम धातूला झाला नसून, 'आ' ह्या वृद्धीला ' उरण्रपरः ' सू. ७० ह्या सूत्रान्वयें झाला आहे. जसा पुगागम 'दा' धातूला उद्देशून झाला आहे तसा 'र्' हा आगम 'दा' ला उद्देशून झाला असता तर, 'दा' शब्दानें 'दार्' चें ग्रहण, ह्या परिभाषेप्रमाणें, झालें असतें, व त्याला घुसंज्ञा प्राप्त झाली असती. 'यमुद्दिश्य विहितः' हे शब्द व्याख्येंत घातले असल्यामुळें, जशी ' दाप् ' ला घुसंज्ञा प्राप्त होते तशी 'दार्' ला घुसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'नेर्गदनद' हें सूत्र लागू पडत नाहीं व' प्रनिदारयति ' येथें णत्व होत नाहीं.)

**' आने मुक् ' इति मुग्विधानसामर्थ्यादेषाऽनित्या । अन्यथा पचमान इत्यादावकारस्य मुकि अनया परिभाषया विशिष्टस्य सवर्णदीर्घे तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ।**

' आने मुक् ' सू ३१०१ ह्या सूत्रानें मुगागम सांगितला असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य आहे असें समजावें. (ही परिभाषा नित्य आहे असें मानल्यास,) 'आने मुक् ' हें सूत्र व्यर्थ ठरेल. कारण, 'पचमानः' ('पच्+शप्+शानच्=पच+आन') इत्यादि स्थलीं 'पच' हें अदन्त अङ्ग असल्यामुळें, त्यांतील अन्त्य अकाराला ' आने मुक्' ह्या सूत्रानें ' म् ' हा आगम झाल्यावर, 'पचम्+आन' अशी स्थिति होते, व ' 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ ह्या सूत्रांतील ' अकः ' ह्यानें मुगागमसहित अकाराचें–म्हणजे–' अम् 'चें,-ह्या परिभाषेप्रमाणें, ग्रहण केल्यास,–म्हणजे 'पचम् ' हें 'पच' च आहे असें मानल्यास,–सवर्णदीर्घ होईल. (व 'पचम्+आनः=पचानः' असें विकृत रूप होईल,

व 'आने मुक्' हें सूत्र मुद्दाम केलें असूनहि व्यर्थ ठरेल. म्हणूनच ही परिभाषा अनित्य मानली पाहिजे, व ती अनित्य मानल्यास, मुगागमसहित अकाराचें–म्हणजे, 'अम्'चें 'अक्'नें ग्रहण होणार नाहीं. 'अम्' ला 'अम्' च मानावें, 'अ' मानूं नये, म्हणजे सवर्णदीर्घाची प्राप्ति न होतां, ' पचम्+आनः=पचमानः' असें रूप सिद्ध होतें. )

**तेन दिदीय इत्यादौ यणादि न,**

ही परिभाषा अनित्य मानली आहे म्हणूनच, ' दिदीये ' इत्यादि ठिकाणीं यणादेश होत नाहीं. ( 'दिदीये' हें ' दीङ् क्षये' ह्या धातूच्या लिटाचें रूप आहे. 'दी+ए=दीदी+ए=दिदी+ए' अशा स्थितींत, 'दीङो युडचि क्ङिति सू. २५०७ ह्या सूत्रानें प्रत्ययास 'युट्' आगम होऊन, 'दिदी+य्+ए=दिदीये' असें रूप होतें. जर ह्या परिभाषेप्रमाणें, आगमरहित 'ए' प्रत्यय व आगमसहित 'ए' प्रत्यय–म्हणजे 'ये'—हे एकच मानले तर ' एरनेकाचोऽसंयोगपूर्वस्य ' सू. –२७३ ह्या सूत्रानें ' दिदी ' यांतील अन्त्य ईकारास यणादेश होऊन 'दिद्य्+ये='दिद्य्ये' असें विकृत रूप होईल; तस रूप होत नाहीं, कारण ही परिभाषा अनित्य मानली आहे, व त्यामुळें 'ये' ह्याला 'ए' असें मानतां येत नाहीं.)

**जहारेत्यादावात औ णल इति च न।**

( 'वुग्युटौ उवङ्यणोः सिद्धौ वक्तव्यौ'-सू० २५०७ वरील वार्तिक–ह्याप्रमाणें ' दिदीये ' असेंच रूप होऊं शकतें, म्हणून ग्रन्थकार ' जहार ' हें दुसरें उदाहरण देतात. ) ही परिभाषा अनित्य आहे म्हणूनच, ' जहार ' इत्यादिस्थलीं ' आत औ णलः सू० २३७१ हें सूत्र लागत नाहीं. ( ' हृ+णल्=जहृ+णल् ' येथें ' उरत् ' व 'कुहोश्चुः' सू. २२४४ व २२४५ ह्यां सूत्रान्वयें अत्व व चुत्व होऊन आणि 'अचो ञ्णिति' सू० २५४ ह्यानें वृद्धि होऊन 'जहार्+अ' अशी स्थिति झाली असतां, जर ह्या परिभाषेप्रमाणें, उरण्रपरः ' सू० ७० ह्या सूत्रानें ' आ ' ह्या वृद्धीला झालेला जो 'र्' हा आगम त्या आगमासहित 'आ' ला हा 'आ' च आहे असें मानलें तर, ' आत औ णलः' हें सूत्र लागून ' णल्' चें जागीं ' औ ' असा आदेश होऊन, ' जहार्+औ=जहा+औ=जहौ ' असें 'वृद्धिरेचि' सू. नं. ७२ ह्या सूत्रान्वयें विकृत रूप सिद्ध होईल. तसें न व्हावें म्हणूनच ही परिभाषा अनित्य मानली आहे. )

**न चाकारादेर्वर्णस्य वर्णान्तरमवयवः कथमिति वाच्यम्, वचनेनावयवत्वबोधनात्। तस्य चावयवत्वसादृश्ये पर्यवसानं बोध्यम्।**

' अ ' इत्यादिवर्णांचा दुसरा वर्ण अवयव कसा मानतां येईल ? ( जसें–'पचम्+आन' ह्यांतील ' म् ' हा वेगळा वर्ण 'अ' चा अवयव कसा मानावा, किंवा ' दाप् ' ह्यांतील ' प् ' हा आगम भिन्न वर्ण असल्यामुळें, ' आ ' चा अवयव कसा मानावा ? वर्णसमुदायांत जे वर्ण असतात ते त्या समुदायाचे अवयव मानणें योग्य होईल; पण एक वर्ण दुसऱ्या वर्णाचा अवयव मानणें योग्य नाहीं— अशी शंका कोणी केल्यास ही शंका

घेणें बरोबर नाहीं. कारण ' वचन '–म्हणजे ही परिभाषाच–सांगते कीं, एक वर्ण (आगम) दुसऱ्या वर्णाचा ( ज्याला आगम झाला आहे त्याचा) अवयव समजावा. ( वास्तविक एक वर्ण दुसऱ्या वर्णाचा अवयव नसतो. तथापि ) आगमाचें ठिकाणीं अवयवत्वाची कल्पना करावी–म्हणजे ज्याला आगम झाला आहे त्याचा तो आगम अवयव आहे असा त्या आगमाचे ठिकाणीं अवयवत्वाचा आरोप करावा—हें ह्या परिभाषेचें तात्पर्य समजावें.

**न चोक्तज्ञापकाद्वर्णग्रहणे ऽस्या अप्रवृत्तिरिति वाच्यम् ,–' आने मुक् ' इति सूत्रे भाष्येऽकारस्याङ्गावयवस्य मुगित्यर्थे पचमान इत्यत्र ' तास्यनुदात्तेत् ' इति स्वरो न स्यादित्याशङ्क्योपदेशभक्तस्तद्ग्रहणेन ग्रहीष्यत इत्युक्तेरसङ्गत्यापत्तेः ॥**

' जेथें एकाच वर्णास–म्हणजे ' एकाल् ' ला–आगम होतो तेथें ही परिभाषा लागत नाहीं हें, ही परिभाषा अनित्य आहे ह्याचें ज्ञापक मानलेल्या ' आने मुक् ' ह्या सूत्रावरूनच सिद्ध होतें–अशी कोणी शंका केल्यास, (' आने मुक् ' ह्या सूत्रानें ' पच ' ह्यांतील अन्त्य अकार जो एकवर्ण म्हणजे एकाल् आहे त्याला ' म् ' हा आगम होतो. अशा ठिकाणीं ' अम् ' हा ' अ ' च आहे अशी. ह्या परिभाषेमुळें, बुद्धि न व्हावी म्हणून ' आनेमुक् ' हें सूत्र मुद्दाम केलें आहे व हें सूत्र जेथें एकाल्ला आगम होतो तेथें ' यदागमाः ' ही परिभाषा लागत नाहीं ह्याचें ज्ञापक ठरतें अशी शंका केल्यास.) ही शंका बरोबर नाहीं. कारण असें मानल्यास, भाष्याशीं ( तीन ठिकाणीं ) विरोध येईल. ( तो विरोध कसा येतो हें पुढील व्याख्यानांत सांगितलें आहे )

(१) भाष्यांत ' आने मुक् ' ह्या सूत्राचा अर्थ असा केला आहे कीं, अङ्गावयव जो अन्त्य अकार त्याला, ' आन ' पुढें आल्यास, ' मुक् ' आगम होतो. भाष्यकारांनीं ह्या सूत्राचा असा अर्थ करून अशी शंका केली आहे कीं, ' पचमान ' येथील ' अ ' च्या पुढें असणारा लादेश ' शानच् ' (' लटः शतृशानचौ ' सू० ३१०० ह्या सूत्रानें होणारा जो सार्वधातुक आदेश आहे) त्या शानचांतील–म्हणजे ' आन ' यांतील-' आ ' ला ' तास्यनुदात्तेत् '–सू० ३७३० ह्या सूत्रानें अनुदात्त स्वर कसा होऊं शकणार? ( कारण ' अ ' व ' आ ' ह्यांमध्यें ' मुक् 'चें व्यवधान आहे. ह्या शंकेचें निराकरण भाष्यकार असें करितात कीं, ) ' शप् ' चा–म्हणजे ' अ ' चा–अवयव झालेला जो ' मुक् '=' म् ' त्याचें ' शप् ' ( अ ) ग्रहणानें ग्रहण होतें. ( म्हणजे मुगागमसहित जो शप्=' अम् ' त्याला मुगागमरहित ' शप् ' च–म्हणजे ' अ ' च–मानावें. त्यामुळें ' म् ' चें व्यवधानच नाहीं असें समजावें; म्हणजे, ' तास्यनुदात्तेत् ' ह्या सूत्रानें अनुदात्तस्वर होऊं शकतो. ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, एकाल्च्या ठिकाणींहि ' यदागमाः ' ही परिभाषा लागते; कारण ' अ ' हा एकाल्–म्हणजे केवळ एकवर्ण–असून देखील, भाष्यकारांनीं अकारानें आगमसहित अकाराचें–म्हणजे ' अम् ' चें–ग्रहण केलें आहे. म्हणून जेथें एकच वर्णाला आगम होतो तेथें ही परिभाषा लागत नाहीं हें म्हणणें चूक ठरतें )

**किं च ङमन्तपदावयवस्य ह्रस्वात्परस्य ङमो ङमुडित्यर्थे कुर्वन्नास्त इत्यादौ ङमो ङमुडागमे णत्वप्राप्तिमाशङ्क्य यदागमा इति न्यायेनाद्यनस्यापि पदान्तग्रहणेन ग्रहणात्पदान्तस्य इति निषेध इत्यनया परिभाषयागमानामागमिधर्मवैशिष्ट्यमपि बोध्यत इत्याशयकङमुट्सूत्रस्थभाष्यासङ्गतेः ।**

(२) दुसरें असें कीं, ' ङमो ह्स्वादचि ङमुट् नित्यम् ' सू० १३४ ह्या सूत्राचा भाष्यकारांनीं, ' ह्स्वात्परः यः ङम् पदान्तः तस्य ङमुट् आगमो भवति, अचि परे सति '–म्हणजे ' ङम् ' ह्रस्व स्वरापुढें असून पदाच्या अन्ती असल्यास व त्यापुढें स्वर आल्यास, त्या ' ङम् ' ला ' ङमुट् ' आगम होतो–असा अर्थ केला आहे. ह्या अर्थाप्रमाणें ( ' कुर्वन्+आस्ते=कुर्वन्नास्ते ' अशा स्थितींत ' कुर्वन् ' ह्यांतील पदान्त नकारापुढें ' आ ' हा स्वर असल्यामुळें त्या नकाराला ' ङमुट् =न् ' असा आगम होऊन ' कुर्व+ङमुट्=न्+न्+आस्ते ' अशी स्थिति होते. अशा स्थितींत ' कुर्वन्न् ' ह्यांतील अन्त्य ' न् ' ला ' पदान्तस्य ' सू० १२८ ह्या सूत्रामुळें जरी णत्व होऊं शकत नाहीं तरी त्याच्यापूर्वी असलेल्या ) ङमुडागमरूपी प्रथम ' न् ' ला णत्व कां होऊं नये अशी शंका भाष्यकार करितात ( कारण तो ' न् ' पदान्तीं नसल्यामुळें, ' पदान्तस्य ' हा निषेध त्याला लागू पडूं शकत नाहीं. ) आणि त्या शंकेचें समाधान असें करितात कीं, पदान्त ' न् ' ला झालेला ' ङमुट् ' ( न् ) आगम पदान्त ' न् ' चा अवयव असल्यामुळें तोहि , ' यदागमाः ' ह्या परिभाषेच्या आधारें, पदान्तच समजला पाहिजे. म्हणून ' पदान्तस्य ' ह्या निषेधामुळें त्या प्रथम ' न् ' लाहि णत्व होऊं शकत नाहीं ( ह्याहि भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, एकाल्ग्रहणांत ही परिभाषा लागते; कारण ' कुर्वन् ' यांतील पदान्त ' न् ' ला झालेला ' न् ' आगम त्याचा अवयव होतो असें म्हणून भाष्यकारांनीं ही परिभाषा लावली आहे. जर प्रथम ' न् ' ला णत्व झालें असतें तर ' ष्टुनाष्टुः ' सू० ११३ ह्या सूत्रान्वयें, द्वितिय ' न् ' लाहि णत्व झालें असतें व ' कुर्वण्णास्ते ' असा विकृत सन्धि झाला असता .) वरील भाष्याचा आशय असा आहे कीं, ज्याला आगम झाला आहे त्याचे धर्म आगमास प्राप्त होतात. ( जसें ' कुर्वन् ' ह्यातील ' न् ' चें ठिकाणीं जो पदान्तत्व धर्म आहे तो त्याला झालेल्या ' न् ' ह्या आगमासहि प्राप्त होतो. त्यामुळें तो आगमहि पदान्त समजला जातो. ) सारांश ' एकाल् ' ला ही परिभाषा लागत नाहीं हें म्हणणें ङमुट् सूत्रावरील ८–३–३२ भाष्याविरूद्ध ठरतें.

**किञ्च गुणादिरपरत्वे रेफविशिष्टे गुणत्वाद्येष्टव्यम् । अन्यथा ऋकारस्य गुणवृद्धी अरारावेवेति नियमो न स्यात् तच्च । वर्णग्रहण एतदप्रवृत्तौ न सङ्गच्छते ।**

(३) तिसरें असें कीं, भाष्यकाराची अशी इष्टि ( म्हणणें ) आहे कीं, गुण (अ) व वृद्धि (आ) ह्यांनां ' उरण्रपरः ' ह्या सूत्रान्वयें ) ' रेफ ' ( र् ) लाग-

ह्यावर रेफविशिष्ट 'अ' व 'आ' ( म्हणजे 'अर्' व 'आर्' ) ह्यांना 'ऋ' चे अनुक्रमें गुण व वृद्धि समजावे. वर्णग्रहणांत 'यदागमाः' ही परिभाषा लागत नाहीं असें मानल्यास, 'ऋ' चा गुण 'अर्' व वृद्धि 'आर्' हा जो भाष्यकारांनीं नियम सांगितला आहे तो सिद्ध होणार नाहीं व भाष्याशीं विरोध येईल. ( वास्तविक पाहतां 'अदेङ्गुणः' व 'वृद्धिरादैच्' सू० १७ व १६ ह्यां सूत्रांप्रमाणें, 'अ' ला गुणसंज्ञा आहे, 'अर्' ला गुणसंज्ञा नाहीं; तसेंच 'आ' ह्याला वृद्धिसंज्ञा आहे, 'आर्' ह्याला वृद्धिसंज्ञा नाहीं. तथापि 'यदागमाः' ही परिभाषा वर्णग्रहणांत देखील लागते असें मानल्यास, 'र्' हा आगम, 'एकाल्' 'अ' व 'आ' यांचा अवयव ठरतो, व 'अर्' म्हणजे 'अ' च, व 'आर्' म्हणजे 'आ' च, असें मानल्यानें, 'अर्' ह्याला गुणसंज्ञा व 'आर्' ह्याला वृद्धिसंज्ञा प्राप्त होते. )

**अत एव रदाभ्यामितिसूत्रे भाष्यं "गुणो भवति वृद्धिर्भवति रेफशिरा गुणवृद्धिसंज्ञकोऽभिनिर्वर्तत" इति ।**

( वर्णग्रहणांत ही परिभाषा लागू पडते ) म्हणूनच, 'रदाभ्याम्'-८-४-४२ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, जेव्हां 'ऋ' ला गुण होतो किंवा वृद्धि होते असें म्हटलें जातें तेव्हां रेफ ज्यांच्या शिरावर आहे असे 'अ' व 'आ' —म्हणजे 'अर्' व 'आर्'—हे अनुक्रमें गुणसंज्ञक व वृद्धिसंज्ञक होतात.

**अत एव 'नेटि' 'णेरनिटि' इत्यादि चरितार्थम् ।**

'यदागमाः' ही परिभाषा पाणिनीला मान्य असल्यामुळेंच, 'नेटि' सू० २२६८ व 'णेरनिटि' सू० २३१२ हीं सूत्रें सार्थक ठरतात. ( ही परिभाषा पाणिनीस मान्य नसती तर, वरील दोन सूत्रें करण्याची कांहींच गरज नव्हती. 'वदव्रजहलन्तस्याचः' सू० २२६७ ह्या सूत्रानें परस्मैपदीधातुपुढें 'सिच्' आला असतां, 'वद्' 'व्रज्' व हलन्ताङ्ग ह्यांतील अचाला वृद्धि होते. ह्या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'सिच्' ह्याचा 'इडागमरहित' 'सिच्' असा अर्थ केला तर 'नेटि' ह्या निषेधवाचक सूत्राची गरजच नाहीं. कारण 'प्राप्तस्यैव निषेधः' ह्या न्यायानें प्राप्ताचाच निषेध केला जातो. पण 'यदागमाः' ह्या परिभाषेचा आश्रय केल्यास, 'सिच्' म्हणजे इडागमरहित व तसाच इडागमसहित 'सिच्' असा अर्थ होतो, व ही परिभाषा पाणिनीस मान्य असल्यामुळें, इडागमसहित 'सिच्' पुढें असतां देखील वृद्धि प्राप्त होईल हें जाणूनच, तशा ठिकाणीं वृद्धि न व्हावी म्हणून, 'नेटि' हें सूत्र पाणिनीनें केलें आहे. तसेंच 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' सू० २२९७ ह्या सूत्रांत 'सिच्' चा इडागमरहित व तसाच इडागमसहित 'सिच्' असा जो अर्थ आहे तो देखील, ही परिभाषा पाणिनीस मान्य होती हेंच दर्शवितो. तसेंच 'णेरनिटि' असें सूत्र न करितां, पाणिनीनें केवळ 'णेः' असेंच सूत्र केलें असतें तर, ह्या यदागमपरिभाषेप्रमाणें, इडागमरहित किंवा इडागम-

सहित आर्धधातुकप्रत्यय पुढें असतां, णिलोप झाला असता; तो णिलोप इडागमरहित आर्धधातुकप्रत्यय पुढें असतांच व्हावा म्हणून, ' णेरनिटि ' असें सूत्र केलें आहे. वरील सूत्रांवरून हें स्पष्ट होतें कीं ' यदागम ' परिभाषा पाणिनीला मान्य होती. )

**अनागमकानां सागमका आदेशा इत्यस्य त्वयमर्थः—आर्धधातुकस्येडागम इत्यर्थे ज्ञाते नित्येषु शब्देष्वागमविधानानुपपत्यार्थापत्तिमूलकवाक्यान्तरकल्पनेनेड्रहितबुद्धिप्रसङ्गे सेड्बुद्धिः कर्तव्येति ।**

( कोणी अशी शंका करितात कीं, ' स्थानिवदादेशोऽनल्विधौ ' सू० ४९ हें सूत्र असल्यामुळें, ' यदागमाः ' ह्या परिभाषेची आवश्यकताच नाहीं. कारण ह्या परिभाषेनें जें कार्य करणें आहे तें, स्थानिवद्भाव मानून करितां येईल. ह्या शंकेचें निरसन करण्याकरितां ग्रन्थकार प्रथम असें म्हणतात कीं, ' अनागमकानां सागमकाः आदेशाः ' —म्हणजे ' आगमरहिताचे जागीं आगमसहित आदेश होतात '—ह्याचा अर्थ असा आहे कीं, ' आर्धधातुकस्येड् वलादेः ' सू० २१८४--म्हणजे ' वलादि आर्धधातुक प्रत्ययांना इडागम होतो '—असा ह्या सूत्राचा अर्थ कळल्यानंतर, आपल्यास सहजच वाटतें कीं, प्रत्ययास आगम होतो असें विधान करणें अयोग्य होय, कारण ( वैयाकरणांच्या मतें ) शब्द नित्य ( म्हणजे अपचय व उपचयरहित आणि अविकारि—म्हणजे ज्याचें स्वरुप कधींहि न बदलतां एकसारखेंच राहत ) असल्यामुळें, त्याला आगम होतो असें विधान करणें बरोबर नाहीं. ( कारण तसें विधान केल्यास शब्दाला अनित्यत्व येण्याची आपत्ति येते ) म्हणून, आगम विधायक ' आर्धधातुकस्येट् ' ह्या सूत्राचें अर्थापत्तिन्यायान्वयें वाक्यान्तर कल्पून, आपण ( वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होतो असें न समजतां, ) अशी बुद्धि करावी कीं, ( असें समजावें कीं ) इड्रहित वलादि आर्धधातुक प्रत्ययाचे जागीं इट्सहित वलादि आर्धधातुकप्रत्यय होतो. ( अशी बुद्धि केल्यास प्रत्ययाला आगम होतो असें मानल्यानें शब्दस्वरूप बदलून शब्दाला अनित्यत्व येत होतें तें न येतां, शब्दाचें नित्यत्व कायम राहतें; कारण आपण एका नित्य शब्दाचें ठिकाणीं दुसरा नित्य शब्द होतो असें मानल्यानें, शब्दाचें ठिकाणीं अनित्यत्व येण्याची आपत्ति सहजच टळते. ' अर्थातपत्तिन्यायान्वयें ' असें वर म्हटलें आहे. ' पीनो देवदत्तो दिवा न भुङ्क्ते ' हें अर्थापत्तिन्यायाचें उदाहरण आहे. आंगानें जाडा देवदत्त दिवसा जेवत नाहीं असा त्याचा अर्थ आहे. मग देवदत्त लठ्ठ कसा ? त्याच्या जाडेपणामुळें, अर्थात हें सिद्ध होतें कीं तो रात्रीं जेवीत असतो; नाहींतर तो रोड झाला असता. अशा ठिकाणीं वाक्यार्थ नीट जुळण्याकरितां ' रात्रौ भुङ्क्ते ' अशी वाक्यान्तरकल्पना करावी लागते. तसेंच प्रकृतस्थलीं शब्दाचें नित्यत्व कायम राखण्याकरितां, ' इडागमरहितवलाद्यार्धधातुकप्रत्यये सेडार्धधातुकबुद्धिः कर्तव्या ' अशी वाक्यान्तराची कल्पना करावी असें ग्रन्थकाराचें म्हणणें आहे )

**एवं चादेशेष्विवात्रापि बुद्धिविपरिणाम इति न नित्यत्वहानिः ।**

ज्या प्रमाणें एका शब्दाचे ठिकाणीं दुसऱ्या शब्दाचा आदेश होतो असें म्हटलें असतां, ' स्थानी ' व ' आदेश ' हे दोन्ही नित्य शब्द असल्यामुळें नित्यत्वाची हानि होत नाहीं, त्याचप्रमाणें आगमाचें विधान केलें असतां, तशीच बुद्धि करावी. ( म्हणजे अनागमकाचे ठिकाणीं सागमक आदेश होतो असें समजावें ); व असें मानल्यास शब्दाच्या नित्यत्वाचा बाध होत नाहीं.

**स्थानिवत्सूत्रे च नेदृशादेशग्रहणं साक्षादष्टाध्यायीबोधितस्थान्यादेशभावे चारितार्थ्यात् ।**

( वर केलेलें प्रतिपादन योग्य असलें तरी, ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र असल्यामुळें, ' यदागम ' परिभाषा व्यर्थ ठरते हें जें आमचें म्हणणें आहे त्याला कांहीं बाध येत नाहीं,—असें शङ्काकार म्हणत असल्यास, त्याच्या आक्षेपावर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) ' स्थानिवदादेशः ' ह्या सूत्रांत, वर सांगितलेल्या ' आनुमानिक ' स्थान्यादेशभावाचें ग्रहण होत नाहीं. ( जसें ' अर्तिह्री्ली '—सू० २५७० ह्या सूत्रानें ' णिच् ' पुढें असतां, 'दा' धातूस पुगागम होतो व आपण अशी कल्पना किंवा बुद्धि करितों कीं, 'दा' चें ठिकाणीं ' दाप् ' होतो. अशा प्रकारच्या आनुमानिक किंवा काल्पनिक आदेशाचें ग्रहण ' स्थानिवदादेशः ' ह्या सूत्रांत अन्तर्भूत होत नाहीं,—म्हणजे ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र अशा काल्पनिक आदेशाला मुळींच लागत नाहीं. ) ' स्थानिवदादेशः' ह्या सूत्रानें अष्टाध्यायींत साक्षात् पठित असलेल्या आदेशांचेंच ग्रहण केलें जातें. ( जसें ' अदो जग्धिर्ल्यप्ति किति सू० ३८० ' हनो वध लिङि ' ' लुङि च ' सू० २४३३–२४३४ अशा सूत्रांनीं सांगितलेल्या आदेशांचेंच ग्रहण होतें, व आनुमानिक आदेशांचें ह्या सूत्रानें ग्रहण होत नाहीं. ) म्हणून तें सूत्र अष्टाध्यायींत सांगितलेल्या साक्षात् आदेशांच्या ठिकाणीं चरितार्थ ठरत असल्यामुळें, यदागमपरिभाषा व्यर्थ ठरत नाहीं.

**किञ्चैवं सति स्थानिबुद्ध्यैव कार्यप्रवृत्त्या निर्दिश्यमानस्येतिपरिभाषाया अप्राप्त्याऽडागमसहितस्य पिबाद्यादेशापत्त्या लावस्थायामडितिभाष्योक्तसिद्धान्तासङ्गतिः ।**

दुसरें असें कीं, ' स्थानिवदादेशः ' ह्या सूत्रानें आनुमानिक आदेशांचेंहि ग्रहण होतें असें मानल्यास, लावस्थेंतच ( ' ल ' च्या जागीं तिबादिप्रत्ययांचे आदेश होण्या, पूर्वींच, ' लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः ' सू० २२०६ ह्यानें ) ' अट् ' हा आगम होत असतो असा जो भाष्यांत सिद्धान्त सांगितला आहे त्याची सङ्गति लागणार नाहीं. कारण जेथें ' स्थानिवदादेशः ' ह्या सूत्रानें, आदेशाचें ठिकाणीं तो स्थानी आहे अशी बुद्धि करून, आपण कार्य करूं इच्छितों तेथें, ' निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति ' प० १२ ही परिभाषा लागत नसल्यामुळें, अडागमसहित ' पा ' ('अ+पा' ) ह्याचे ठिकाणीं ( ' पाघ्राध्मा ' सू० २३६० ह्या सूत्रानें ) पिबादेश होण्याची आपत्ति येईल.

( 'पा+लङ्' अशा स्थितींत, प्रथम लङाचे जागीं तिबादेश होऊन, व नंतर 'पा' चे जागीं पिबादेश होऊन मग अडागम होतो असा क्रम नसून, भाष्यकाराच्या सिद्धान्ताप्रमाणें, लावस्थेतच—म्हणजे लङाच्या ठिकाणीं तिबादेश होण्यापूर्वीच—अडागम होत असल्यामुळें, 'अ+पा+लङ्' अशी स्थिति होते. पुढें लङाचे जागीं तिबादेश होऊन व 'शप्' विकरण लागून, 'अ+पा+शप्+त्' अशी स्थिति होते; नंतर 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रान्वयें, स्थानिवद्भाव मानल्यास—म्हणजे आगमसहित 'अ+पा' हा 'पा' च आहे असें मानल्यास, 'पाघ्राध्मा' ह्या सूत्रानें सांगितलेला पिबादेश 'अ+पा' च्या जागीं होऊन 'अ+पा+शप्+त्=पिब्+शप्+त्=पिबत्' असें 'पा' धातूच्या लङाचें विकृत रूप होईल. 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रानें होणाऱ्या स्थानिवद्भावामध्यें 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा लागत नसल्यामुळें, 'अपा' येथील केवळ 'पा' चें जागीं पिबादेश करितां येणार नाहीं. पण 'यदागमाः' ही परिभाषा मानल्यास, 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा प्रवृत्त होऊन 'घ्राघ्राध्मा' ह्या सूत्रांत निर्दिष्ट जो 'पा' तेवढ्याचेंच ठिकाणीं पिबादेश होऊन, 'अपिबत्' असें रूप सिद्ध होईल. )

**स्थानिवद्भावविषये निर्दिश्यमानस्येतिपरिभाषायाः प्रवृत्तौ तिसृणामित्यत्र परत्वात्तिस्रादेशे स्थानिवद्भावेन त्रयादेशमाशङ्क्य सकृद्गतिन्यायेन समाधानपरभाष्यासङ्गतिः ।**

( जेथें 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रानें आदेशाला स्थानिवद्भाव होतो तेथें 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा लागत नाहीं, असें जें वर म्हटलें आहे त्याच्या समर्थनार्थ ग्रन्थकार भाष्याचें प्रमाण देतात. ) जेथें 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रानें आदेशाला स्थानिवद्भाव होतो तेथें 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा लागते असें मानल्यास, भाष्यकारांनीं 'तिसृणाम्' हें रूप बरोबर आहे असें समर्थन करितांना जें भाष्य लिहिलें आहे तें असंगत ठरेल. ( 'त्रेस्त्रयः' सू० २६४ ह्या सूत्राप्रमाणें, षष्ठीविभक्तीच्या बहुवचनाचा 'आम्' प्रत्यय पुढें असतां, 'त्रि' चे ठिकाणीं 'त्रय' असा आदेश होतो; 'त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ' सू० २९८ ह्या सूत्रान्वयें, स्त्रीलिङ्गवाचक 'त्रि' शब्दाचे जागीं 'तिसृ' असा आदेश होतो. स्त्रीलिङ्गवाचक 'त्रि' शब्दाच्या षष्ठीचें बहुवचन करितांना, ) 'त्रिचतुरोः' हें सूत्र पर असल्यामुळें, ( व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू० १७५ असें सूत्र असल्यामुळें, ) परसूत्र प्रवृत्त होऊन, स्त्रीलिङ्गवाचक 'त्रि' शब्दाचे जागीं ( 'त्रि+आम्' अशा स्थितींत, 'त्रेस्त्रयः' ह्या पूर्वसूत्राप्रमाणें 'त्रय' असा आदेश न होतां, ) 'तिसृ' असा आदेश होतो. ( व 'तिसृ+आम्' अशी स्थिति होते. अशी स्थिति प्राप्त झाली असतां, ) भाष्यकार अशी शंका करितात कीं, 'त्रि' चे जागीं झालेला 'तिसृ' हा आदेश 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रान्वयें, 'त्रि' च आहे असें मानून 'तिसृ' चें जागीं पुनः 'त्रेस्त्रयः' ह्या सूत्रानें 'त्रय' असा आदेश कां करूं नये ? व ह्या शंकेचें समाधान 'सकृद्गतिन्याय'

( 'सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव' परि० ४० ) लावून करितात. ( म्हणजे 'त्रेस्त्रयः' ह्या पूर्वसूत्राचा 'त्रिचतुरोः' ह्या परसूत्रानें एकदां बाध झाला असल्यामुळें, 'त्रेस्त्रयः' हें पूर्वसूत्र पुनः प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व 'तिसृ' चे जागीं पुनः 'त्रय' असा आदेश होऊं शकत नाहीं. 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' ह्या परिभाषेचा उपयोग करून भाष्यकारांनीं शंकेचें समाधान केलें नाहीं. त्यांनी त्या परिभाषेचा उपयोग केला असता तर, त्यांना सहज असें समाधान करितां आलें असतें कीं, 'त्रेस्त्रयः' ह्या सूत्रांत सांगितलेला जो 'त्रि' शब्द त्याचेच जागीं 'त्रय' असा आदेश होऊं शकतो व 'तिसृ+आम्' येथें 'त्रि' शब्द नसून 'तिसृ' शब्द असल्यामुळें, त्या अनिर्दिष्ट 'तिसृ' शब्दाचे जागीं, 'निर्दिश्यमानस्य' ह्या परिभाषेप्रमाणें, त्रयादेश होऊं शकत नाहीं. पण अशा तऱ्हेनें समाधान न करितां सकृद्गतिन्यायाचें अवलंबन करून, भाष्यकारांनीं ज्याअर्थीं समाधान केलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'स्थानिवदादेशः' ह्या सूत्रानें जेथें आदेशाला 'स्थानिवद्भाव' होतो तेथें 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा लागू शकत नाहीं. )

**एरुरित्यादौ स्थानषष्ठीनिर्देशात्तदन्तपरतया पठितवाक्यस्यैव समुदायादेशपरत्वेनादेशग्रहणसामर्थ्यात्तस्य स्थानिवत्सूत्रे ग्रहणेन न दोषः।**

'एरु' सू० २१९६ इत्यादि सूत्रांत ( 'इ चे स्थानीं' असा अर्थ सांगणाऱ्या 'एः' या ) स्थानषष्ठीचा निर्देश केला असल्यामुळें ( जरी त्या सूत्राचा 'इ' चे स्थानीं 'उ' होतो असा अक्षरार्थ आहे तरी ) त्या सूत्राचा तदन्तविधिपर—म्हणजे इकारान्ताचे स्थानीं उकारान्त आदेश होतो असा अर्थ केल्यास, त्या साक्षात् पठित 'एरुः' या सूत्राचाच 'समुदायरूप स्थानीचे जागीं समुदायरूप आदेश होतो' असा अर्थ होतो; व 'स्थानिवदादेशः' सू० ४९ या सूत्रांत 'आदेशः' हा शब्द मुद्दाम घातला असल्यामुळें, त्या सूत्रानें समुदायरूपस्थानीचे जागीं होणाऱ्या समुदायरूप आदेशाचें ग्रहण होतें व तें सूत्र अशा रीतीनें होणाऱ्या आदेशास लागू पडण्यांत कांहीं अडचण येत नाहीं ( 'स्थानिवत्' एवढेंच सूत्र केलें असतें तरी, 'स्थानी' हा शब्द सापेक्ष असल्यामुळें त्या शब्दानें 'आदेश' या शब्दाचें आपोआप ग्रहण झालेंच असतें. असें असून देखील ज्या अर्थीं पाणिनीनें 'स्थानिवदादेशः' या सूत्रांत 'आदेश' हा शब्द घातला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, पाणिनीचा हा हेतु होता कीं, 'आदेश' शब्दानें समुदायरूपी आदेशाचें देखील ग्रहण व्हावें. असें मानलें म्हणजे, 'ति' या समुदायाचे ठिकाणीं झालेल्या 'तु' ह्या समुदायरूपी आदेशाला 'स्थानिवदादेशः' हें सूत्र लागू पडतें व त्यामुळें 'पचतु' याला पदसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

**अनुमानिकस्थान्यादेशभावकल्पनेऽपि श्रौतस्थान्यादेशभावस्य न त्याग इत्यचः परस्मिन् इत्यादेर्नासङ्गतिः। एतेन यदागमा इति परिभाषा**

स्थानिवत्सूत्रेण गतार्थत्यपास्तम् । एतत्सर्वं दाधाघ्वदाबितिसूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥ ११ ॥

( वर सांगितलेला ' ति ' चे जागीं होणारा ' तु ' हा आदेश साक्षात् सूत्रनिर्दिष्ट नसून तदन्तविधीनें करावा लागत असल्यामुळें ) अशा ठिकाणीं ' ति ' हा आनुमानिकस्थानी व ' तु ' हा आनुमानिकआदेश अशा तऱ्हेची आनुमानिकस्थान्यादेशभावाची कल्पना करावी लागते तरी ( अशा ठिकाणीं होणारा आदेश साक्षात् सूत्रनिर्दिष्ट स्थानी व आदेश—म्हणजे इकार व उकार—यांना धरूनच होत असल्यामुळें, ) अशा साक्षात् निर्दिष्ट स्थानी व आदेश यांचा त्याग करितां येत नाहीं ( कारण हा समुदायरूपी आदेश त्या साक्षात् सूत्रनिर्दिष्ट स्थानी व आदेश यांच्या आधारावर केला असल्यामुळें, जर पायाच काढून घेतला तर त्यावर रचलेली इमारत ढासळून पडणार. समुदायाचे ठिकाणीं समुदायरूपीआदेश करतेवेळीं एक अचाचे जागीं होणाऱ्या साक्षात् सूत्रनिर्दिष्ट आदेशाचा त्याग करितां येत नाहीं, ) म्हणूनच ' अचःपरस्मिन् ' सू० ५० इत्यादि सूत्रें चरितार्थ ठरतात ( कारण ' अचःपरस्मिन् ' हें सूत्र लागण्याकरितां एका अचाचे ठिकाणीं आदेश होतो हें मानणें आवश्यक आहे. समुदायाचे ठिकाणीं समुदायरूपी आदेश होतो एवढेंच मानल्यास ' अचःपरस्मिन् ' हें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थळ सांपडणार नाहीं व तें सूत्र व्यर्थ ठरेल. येथें समुदायरूपी आदेशांत व अर्थापत्तिमूलक वाक्यान्तरकल्पनेनें होणाऱ्या आदेशांत काय फरक आहे हें सांगणें जरूर आहे. जेथें सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश केला असून ' स्थानी ' व ' आदेश ' यांचा पृथक् निर्देश केला आहे व त्या सूत्राचा तदन्तपर अर्थ करून एक समुदायाचे जागीं दुसऱ्या समुदायाचा आदेश होतो अशी आनुमानिकस्थान्यादेशभावकल्पना करावी लागते—उदाहरणार्थ वर सांगितल्याप्रमाणें ' एरुः ' या स्थलीं,—तशा स्थलीं ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र लागू पडतें. पण जेथें सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश नसून इतर प्रकारच्या षष्ठीचा निर्देश केला आहे व ' स्थानी ' व ' आदेश ' यांचा पृथक निर्देश केला नसल्यामुळें ' आगमरहितस्य स्थाने आगमसहितस्य आदेशो भवति ' अशी, शब्दाचें नित्यत्व कायम राखण्याकरितां अर्थापत्तिमूलक वाक्यान्तरकल्पना करावी लागते, तेथें जरी आनुमानिकस्थान्यादेशभाव होतो तरी तशा ठिकाणीं ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र लागू पडत नाहीं व ' यदागमाः ' ही परिभाषा लागू पडते; आणि अशा रीतीनें तें सूत्र व ही परिभाषा हीं दोन्हीं आपापल्या विषयांत चरितार्थ ठरतात, व एक दुसऱ्याचा बाध करीत नाहीं. असें आहे ) म्हणूनच ' स्थानिवदादेशः ' या सूत्रांत ' यदागमा.' या परिभाषेचा अन्तर्भाव होतो ( व ही परिभाषा असण्याची कांहीं गरज नाहीं )—हें म्हणणें चूक ठरतें. ' दाधाध्वदाप् ' १-१-२० या सूत्रावरील भाष्यांत हें सर्व स्पष्टपणें सांगितलें आहे.

---

# परिभाषा नं. १२

**नन्वेवमुदस्थादित्यादावुदः स्थास्तम्भोः पूर्वस्य इति पूर्वसवर्णापत्तिरत आह—**

यदागमपरिभाषेचा स्वीकार केल्यास, ' उदस्थात् ' इत्यादि स्थलीं ' उदःस्थास्तम्भोःपूर्वस्य ' ह्या सूत्रान्वयें पूर्वसवर्ण होण्याची आपत्ति येईल ( व ' उदस्थात् ' असें रूप सिद्ध न होतां, ' उत्थात् ' असें विकृत रूप सिद्ध होईल; कारण ' उद्+अ+स्था+लुङ् ' अशा स्थितींत, ' यदागमाः ' ह्या परिभाषेनें ' अ+स्था ' ह्याला ' स्था ' असें मानल्यास—ह्मणजे ' उद् ' च्या पुढें जरी ' अ+स्था ' आहे तरी तो ' स्था ' च आहे असें मानलें तर—' उदःस्थास्तम्भोःपूर्वस्य ' सू० ११८ हें सूत्र प्रवृत्त होऊन ' अ+स्था ' ह्याच्या पूर्वी जो ' द् ' आहे त्याचा सवर्णरूपी आदेश 'अ' चे जागीं करावा लागेल, व त्यामुळें ' उद्+द्+स्था=उद्+त्+स्था=उत्+त्+स्था=उत्था ' असें रूप होऊन पुढें लुङाचें रूप करितांना ' उत्था+सिच्+त् ' अशी स्थिति झाली असतां, ' गातिस्थाघुपाभूभ्यः ' सू० २२२३ ह्यानें सिचाचा लुक् होऊन, ' उत्थात् ' असें विकृत रूप होईल. ही आपत्ति टाळण्याकरितां, ) ही परिभाषा सांगतात.

## निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति ॥ १२ ॥

" सूत्रांत ज्या स्थानीचें उच्चारण केलें आहे तेवढ्याचेंच जागीं आदेश होतात. "

( ' उदःस्थास्तम्भोः ' ह्या सूत्रांत ' स्था ' चा निर्देश केला असल्यामुळें, ' आदेः परस्य ' ह्या सूत्रान्वयें, सकाराच्याच ठिकाणीं त्याच्या पूर्वी असलेल्या दकाराच्या सवर्णाचा आदेश होतो. ' उद्+अ+स्था+लुङ् ' ह्या ठिकाणीं ' उद् ' च्या लगेंच पुढें ' स्था ' नसून दोहोंत अकाराचें व्यवधान असल्यामुळें,—म्हणजे सकारापूर्वी अकार असून ' उद् ' ह्यांतील दकार नसल्यामुळें, सकाराचें जागीं सवर्णाची प्राप्तीच नाहीं. म्हणून ' उदस्थात् ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**' षष्ठीस्थानेयोगे ' ति सूत्रमावर्तते । तत्र द्वितीयस्यायमर्थः । षष्ठ्यन्तं निर्दिश्यमानमुच्चार्यमाणमुच्चार्यमाणसजातीयमेव निर्दिश्यमानावयवरूपमेव वा स्थानेन स्थाननिरूपितसम्बन्धेन युज्यते न तु प्रतीयमानमित्यर्थस्तेनेदं सिद्धम् ।**

' षष्ठी स्थानेयोगा ' हें सूत्र दोनदां उच्चारावें. ( पहिल्यानें उच्चारलेल्या ह्या सूत्राचा अर्थ कौमुदींत जसा दिला आहे तसा करून ) दुसऱ्यानें उच्चारलेल्या त्या सूत्राचा अर्थ असा करावा—'षष्ठी' ह्या प्रथम शब्दाचा (तदन्तविधीनें) ' षष्ठ्यन्तम् ' असा अर्थ करून ( व ह्या शब्दापुढें ' निर्दिश्यमानम् ' ह्या शब्दाचा अध्याहार करून ' षष्ठ्यन्तं निर्दिश्यमानम् ' ह्या पदांचा ) अर्थ असा समजावा कीं, १—ज्याचें षष्ठीविभक्तींत सूत्रांत उच्चारण केलें आहे तो, किंवा २—त्याच्याशीं जो सजातीय

आहे तो, ( जसें—' उदःस्थास्तम्भोः ' सू० ११८ या सूत्रांत ' स्था ' चें षष्ठी विभक्तींत उच्चारण केलें आहे. त्या सूत्रांत ज्या ' स्था ' चा पाणिनीनें उच्चार केला आहे तो ' स्था, ' आज आपण जो ' स्था ' उच्चारतो त्याहून व्यक्तिदृष्ट्या भिन्न आहे; तरी पण दोन्ही ' स्था ' ची एकच ' स्था ' रूप जाति असल्यामुळें, सूत्रांत उच्चारलेल्या ' स्था ' नें आपण आज उच्चारलेल्या ' स्था ' चें ग्रहण होतें. तसेंच ' अस्यच्वौ ' सू० २११८ या सूत्रांत जरी षष्ठी विभक्तींत अकाराचें उच्चारण केलें आहे तरी, जाति पक्षाचा किंवा ' अणुदित् सवर्णस्य ' सू० १४ या सूत्राचा आश्रय केल्यास, ' अस्य ' ह्यानें, सजातीयत्वामुळें किंवा सवर्णत्वामुळें, अठराहि प्रकारच्या अकाराचें ग्रहण होतें. म्हणूनच ' उच्चार्यमाणसजातीयम् ' असा शब्द ग्रन्थकारानें वापरला आहे, ) किंवा ३—ज्याचें सूत्रांत षष्ठी विभक्तींत उच्चारण केलें आहे त्याचा जो अवयव आहे तो. ( तो अवयव ' आदेःपरस्य ' या सूत्रान्वयें आद्यवयव असूं शकेल किंवा ' अलोऽन्त्यस्य या सूत्रान्वयें अन्त्यावयव असूं शकेल. उरलेल्या ' स्थानेयोगा ' या शब्दाचा अर्थ असा समजावा कीं वर जो ' स्थानी ' म्हणून सांगितला आहे ) तेवढ्याचेंच जागीं आदेश करावा, ( असा दुसऱ्यानें उच्चारलेल्या ' षष्ठी स्थानेयोगा ' या सूत्राचा अर्थ होतो, व असा अर्थ होत असल्यामुळें, ) आनुमानिक स्थानीचें जागीं—म्हणजे ' यदागम ' परिभाषेनें किंवा तदन्तविधीनें ज्ञापित होणाऱ्या स्थानीचें जागीं—आदेश करूं नये. ( ' षष्ठी स्थानेयोगा ' या सूत्राचा ) असा अर्थ केला म्हणजे त्यावरूनच ही परिभाषा सिद्ध होते. ( सारांश ही परिभाषा न्यायसिद्ध किंवा ज्ञापकसिद्ध नसून सूत्रसिद्ध वाचनिकी आहे. )

**न चास्य च्वावित्यादौ दीर्घाणामादेशानपत्तिस्तेषां निर्दिश्यमानत्वाभावादिति वाच्यम्, जातिपक्षे दोषाभावात् ।**

' अस्य च्वौ ' सू० ११८ इत्यादि सूत्रांत ( ऱ्हस्वाचेंच उच्चारण केलें असून ) दीर्घाचें उच्चारण केलें नसल्यामुळें (—म्हणजे ' अ ' या स्थानीचें उच्चारण केलें असून ' आ ' या स्थानीचें उच्चारण केलें नसल्यामुळें ) दीर्घाचें ठिकाणीं आदेश न होण्याची आपत्ति येईल, ( व त्यामुळें ' अगङ्गा गङ्गा संपद्यमाना स्यात् गङ्गीस्यात् ' किंवा ' अमाला माला भवति मालीभवति ' इत्यादि रूपें सिद्ध होणार नाहींत )—अशी कोणी शंका केल्यास ती शंका बरोबर नाहीं; कारण जातिपक्ष स्वीकारल्यास, ( अकारानें अठराहि प्रकाराच्या अकाराचें ग्रहण होत असल्यामुळें ) कांहीं दोष उत्पन्न होत नाहीं ( व 'अ'नें 'आ'चें ग्रहण होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं )

**किं च न भूसुधियोरिति निषेधेन ग्रहणकशास्त्रगृहीतानां निर्दिश्यमानकार्यबोधनान्न दोषः ।**

( शङ्काकार असें म्हणतो कीं, जातिपक्ष मानल्यास दोष येत नाहीं असें वर म्हटलें आहे तें जरी ठीक असलें तरी, व्यक्तिपक्ष स्वीकारल्यास, आमचा आक्षेप कायमच राहतो; पण हेंहि म्हणणें बरोबर नाहीं; कारण ) ' न भूसुधियोः ' सू० २७३

ह्या निषेधावरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें एखाद्या वर्णास कार्य सांगितलें असतें तेथें, 'अणुदित्सवर्णस्य' ह्या ग्रहणकशास्त्रानें बोधित जे त्याचे सवर्ण आहेत त्या सवर्णांसहि तें कार्य लागू पडतें व त्यामुळें कांहीं अडचण येत नाहीं. ( 'ओः सुपि' सू० २८१ ह्या सूत्रानें ऱ्हस्व उकारास यणादेश सांगितला आहे, व 'एरनेकाचः'—सू० २७२ ह्या सूत्रानें ऱ्हस्व इकारास यणादेश सांगितला आहे. वरील दोन्हीं सूत्रांत ऱ्हस्व उकार व ऱ्हस्व इकार निर्दिष्ट असल्यामुळें त्यांचेंच जागीं यणादेशाची प्राप्ति होत असतां, 'न भूसुधियोः' ह्या सूत्रानें दीर्घ ऊकारान्त 'भू' व दीर्घ ईकारान्त 'सुधी' ह्यांना केलेला यणादेशाचा निषेध, 'प्राप्तस्यैव निषेधः' ह्या न्यायानें, अनुपपन्न ठरतो. पण ग्रहणकशास्त्राच्या आधारें, इकार व उकार अठराप्रकारच्या इकारांचे व उकारांचे वाचक आहेत असें मानलें म्हणजेच, वरील निषेध योग्य ठरतो. म्हणून हें मानणें अवश्य आहे कीं, ग्रहणकशास्त्रानें बोधित अशा सवर्णांची निवृत्ति 'निर्दिश्यमानस्य' ह्या परिभाषेनें होत नसून, सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या अकारादिकांनीं सर्व प्रकारच्या अकारादिकांचें ग्रहण होतें. )

**इयङुवङोर्ङित्वं त्रिवर्णोवर्णान्तधातुश्नुभ्रुवामित्यर्थेन धात्वादीमपि निर्दिष्टत्वादन्त्यादेशत्वाय ।**

( 'अचिश्नुधातुभ्रुवां य्वोः इयङुवङौ' सू० २७१ ह्या सूत्रांत 'य्वोः' असा स्पष्ट स्थानीचा निर्देश केला आहे, व त्यामुळें, 'निर्दिश्यमानस्य' ह्या परिभाषेनें, 'इ' व 'उ' ह्यांचेच जागीं 'इय्' व 'उव्' असे आदेश अनुक्रमें पावले आहेत. असें असून देखील, 'इयङ् उवङ्' ह्या आदेशांना 'ङ्' हा अनुबन्ध कां लावला आहे. ? 'ङिच्च' सू० ४३—ह्या सूत्राचें अन्त्य वर्णाचे जागीं आदेश होणें हें प्रयोजन आहे, पण 'अचिश्नुधातु' या सूत्रांत अन्त्य 'इ' व 'उ' असा स्पष्ट स्थानिनिर्देश असल्यामुळें, आदेशांचे ठिकाणीं 'ङित्त्व' करणें व्यर्थ ठरतें. ह्या शंकेचें समाधान ग्रन्थकार असें करितात कीं, 'येन विधिस्तदन्तस्य' हें सूत्र लावून सूत्रांत जो 'धातु' शब्द आला आहे त्याचे 'य्वोः' हें विशेषण करून, 'य्वोः धातोः' याचा अर्थ 'इवर्णान्त व उवर्णान्त धातु' असा केला पाहिजे, व असें केल्यानें, अन्त्यवर्णाचे जागीं ? होण्याकरितां, आदेशाचें ठिकाणीं केलेलें ङित्त्व योग्य ठरतें. ) 'अचि श्नुधातु' —या सूत्राचा अर्थ इवर्णान्त व उवर्णान्त धातु व श्नु व भ्रू असा असून, सूत्रांत धातु इत्यादिकांचाहि निर्देश केला असल्यामुळें, अन्त्यवर्णाचे जागीं आदेश होण्याकरितां आदेशांना 'ङ्' हा अनुबन्ध लावला आहे.

**रीङ्रिङोर्ङित्त्वं तु स्पष्टार्थमेव ।**

( 'रीङृतः' सू० १२३४ व 'रिङ्शयग्लिङ्क्षु' सू० २३६७ ह्या सूत्रांत, 'ऋ' चे ठिकाणीं 'री व रि' आदेश व्हावे हें सांगितलें आहे. 'निर्दिश्यमानस्य' ह्या परिभाषेप्रमाणें, ते आदेश, सूत्रांत स्थानी जो 'ऋ' त्याचा निर्देश केला असल्या-

मुळें ' ऋ ' चे जागींच होणार असें असूनहि, आदेशांना ' ङ् ' हा अनुबन्ध कां लावला आहे ? ह्या शंकेचें समाधान ग्रन्थकार असें करितात कीं, येथें ङित्त्व करण्याचें वास्तविक कांहींच प्रयोजन नसल्यामुळें, ) ' रीङ् ' व ' रिङ् ' येथील ङित्त्वकरण केवळ स्पष्टार्थबोध होण्याकरितां आहे असें समजावें.

**एतेनेदं ङित्त्वं वर्णग्रहणे निर्दिश्यमानपरिभाषाया अप्रवृत्तिज्ञापकमित्यपास्तम् । हयवरट्सूत्रस्थेन 'अयोगवाहानामुपदेशे ऽलो ऽन्त्यविधिः प्रयोजनम् । वृक्षस्तत्र । नैतदस्ति प्रयोजनम्, निर्दिश्यमानस्येत्येव सिद्ध-' मिति भाष्येण विरोधात् ।**

' जेथें सूत्रांत एकच वर्णाचा स्थ्र निरूपानें उच्चार करून त्याचे ठिकाणीं आदेश होणें सांगितलें आहे तेथें ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लागत नाहीं हें ' रिङ् ' व ' रीङ् ' ह्या आदेशांना 'ङित् ' केलें असल्यामळें स्पष्ट होतें'—असें जर कोणी म्हणेल तर तें म्हणणें चुकीचें आहे. कारण हें म्हणणें ' हयवरट् ' ह्या ( माहेश्वर ) सूत्रावरील भाष्याच्या विरुद्ध जातें. कारण ( त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं ' अयोगवाहांचा'—म्हणजे अनुस्वार, विसर्ग, जिह्वामूलीय, उपध्मानीय व यम यांचा—समावेश माहेश्वर सूत्रांत करावा असें सांगून, ' अयोगवाहांचें ' ग्रहण करण्याचें प्रयोजन काय ? ( ह्या प्रश्नाचा विचार करितांना भाष्यकार म्हणतात कीं, ) अलोन्त्यविधि प्रयोजन होईल काय ? कारण 'वृक्षस्तत्र' हें कसें होईल ? आणि असें म्हणून, लगेंच उत्तर देतात कीं, अलोन्त्यविधि हें प्रयोजन होऊं शकत नाहीं, कारण 'निर्दिश्यमान' परिभाषेनें 'वृक्षस्तत्र' हें सिद्ध होऊं शकतें. ( ' अल् ' प्रत्याहारांत अयोगवाहांचें ग्रहण न केल्यास, ' वृक्षः तत्र ' ह्या ठिकाणीं विसर्गाचें जागीं, ' अलोन्त्यस्य ' ह्या सूत्रान्वयें, सकार होणार नाहीं; पण त्यांचें ' अल् ' प्रत्याहारांत ग्रहण केलें तर, वृक्षःतत्र ' ह्या उदाहरणांत ' वृक्षः ' ह्याच्या अन्तीं जो विसर्जनीयरूपी अल् आहे त्याचे जागीं 'विसर्जनीयस्य सः' सू० १३८ ह्यानें सकार होईल. म्हणून 'अल् ' प्रत्याहारांत अयोगवाहांचें ग्रहण करण्याचें प्रयोजन अलोन्त्यविधि होय काय ? अशी शंका उपस्थित करून भाष्यकार लगेंच उत्तर देतात कीं, अलोन्त्यविधि हें प्रयोजन होऊं शकत नाहीं; कारण ' विसर्जनीयस्य सः ' ह्या सूत्रांत स्थानी जो ' विसर्जनीय ' त्याचा स्पष्ट निर्देश केला असल्यामुळें, विसर्गाच्या जागीं, ' निर्दिश्यमानस्य ' ह्या परिभाषेप्रमाणें, ' स् ' हा आदेश होऊन ' वृक्षस्तत्र ' असें रूप सिद्ध होईल. म्हणून ' अल् ' प्रत्याहारांत अयोगवाहांचें ग्रहण करण्याचें प्रयोजन अलोन्त्यविधि मानणें हें योग्य नाहीं. ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, केवळ अल्ग्रहणांत देखील भाष्यकारांनीं ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लाविली आहे; त्यामुळें, ' अल् ' ग्रहणांत ' निर्दिश्यमान ' परिभाषा लागत नाहीं हें म्हणणें भाष्यविरूद्ध असल्यामुळें, चूक आहे. )

**अनया परिभाषया येनविधिरिति सूत्रबोधिततदन्तस्य स्थानित्वा-**

**भावबोधनं यदागमाइति लब्धस्य च । तेन सुपद उदस्थादित्यादिसिद्धिः**

' येन विधिस्तदन्तस्य ' सू० २६ ह्या सूत्रानें बोधित तदन्ताला, व ' यदागमाः ' ह्या परिभाषेनें बोधित आगमसहिताला, ' निर्दिश्यमानस्य ' ह्या परिभाषेनें कार्य करितांना, स्थानित्व प्राप्त होत नाहीं. (–म्हणजे ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लावतेवेळीं, तदन्ताला व आगमसहिताला स्थानीं मानतां येत नाहीं हें ह्या परिभाषेवरून स्पष्ट होतें. ) त्यामुळें ' सुपदः ' ' उदस्थात् ' इत्यादि रूपांची सिद्धि होते. ( जसें ' पादः पत् ' सू० ४१४ ह्या सूत्रांत ' पाद् ' ह्या स्थानीचा स्पष्ट निर्देश केला असल्यामुळें ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लागते, व ' येन विधिस्तदन्तस्य ' हें सूत्र लागत नाहीं. तें सूत्र लावल्यास, ज्याच्या अन्तीं ' पाद् ' आहे असा ' सुपाद् ' शब्द स्थानी होऊन, त्या पूर्ण शब्दाचें जागीं ' पत् ' असा आदेश होईल व त्या शब्दाचें द्वितीयाविभक्तीच्या बहुवचनाचें रूप ' सुपदः ' असें न होतां, ' पदः ' असें विकृत रूप होईल. तसेंच ' उत्+अ+स्था+लुङ् ' ह्या ठिकाणीं, ' उदः स्थास्तम्भोः पूर्वस्य ' ह्या सूत्रांत स्थानी जो ' स्था ' त्याचा स्पष्ट निर्देश असल्यामुळें, ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लागते, व त्यामुळें ' स्था ' ह्यांतील सकाराच्या व ' उद् ' ह्यांतील दकाराच्या मध्यें ' अ ' चें व्यवधान असल्यामुळें, सकाराचे जागीं पूर्वसवर्णादेश -म्हणजे 'स्था' तील सकाराचे जागीं पूर्ववर्ण जो ' द् ' त्याच्या सवर्णाचा आदेश–होत नाहीं. व ' उदस्थात् ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. अशा ठिकाणीं, ' यदागमाः ' ही परिभाषा लावल्यास व ' अ+स्था ' हा ' स्था ' च आहे असें मानल्यास, ' उत्थात् ' असें विकृत रूप होईल हें पूर्वींच सांगितलें आहे. )

**अनया च स्वस्वनिमित्तसन्निधापितानामलोन्त्यस्येत्यादीनां समावेश एव न बाध्यबाधकभावो विरोधाभावात् ।**

आपापलीं निमित्तें असल्यामुळें कार्य करण्यास उपस्थित झालेलीं अलोऽन्त्यस्य' ( व ' आदेःपरस्य ' ) इत्यादि सूत्रें ह्या परिभाषेसह आपापलीं कार्यें करितात. वरील सूत्रांत व ह्या परिभाषेत विरोध नसल्यामुळें, एक दुसऱ्याचें बाधक होत नाहीं. ( ह्या परिभाषेप्रमाणें, पाणिनीय सूत्रांत साक्षात् निर्दिष्ट किंवा पूर्वसूत्रांतून अनुवृत्त असा जो स्थानी असेल त्याचेच ठिकाणीं आदेश होतो, पण तो आदश आद्यावयवाचे ठिकाणीं किंवा अन्त्यावयवाचे ठिकाणीं व्हावा हें ' आदेःपरस्य ' सू० ४४ व ' अलोन्त्यस्य ' सू० ४२ ह्या सूत्रांनीं ज्ञापित होतें. सारांश हीं सूत्रें व ही परिभाषा आपापलीं कार्यें, एकत्र मिळून करितात. जसें ' त्यदादिनामः ' सू० २६५ ह्या सूत्रांत ' त्यद् ' इत्यादि सर्वनामांचा ' स्थाना ' असा षष्ठीविभक्तींत निर्देश केला असल्यामुळें, त्यांचे ठिकाणीं ' अ ' हा आदेश होतो, पण तो ' अलोन्त्यस्य ' ह्या सूत्रानें ' त्यद् ' ह्याच्या अन्त्यावयवाचें जागीं होतो. तसेंच ' उदःस्थास्तम्भोः ' या सूत्रांत षष्ठीविभक्तींत ' स्था ' या स्थानीचा निर्देश केला आहे, व ' उदः ' हें पञ्चम्यन्त पद असल्यामुळें, ' तस्मा-

दित्युत्तरस्य ' सू० ४१ या सूत्रान्वयें, 'उद्' च्यापुढें असणाऱ्या स्था ' ला पूर्व-सवर्णादेश प्राप्त होतो अशा ठिकाणीं 'आदेःपरस्य ' सू० ४४ हें सूत्र प्रवृत्त होतें व ' स्था ' च्या आदिवर्णाचे- म्हणजे सकाराचे-जागीं पूर्वसवर्णादेश होऊन, ' उत्थानम् ' असें रूप सिद्ध होतें. )

नाप्येतयोरङ्गाङ्गिभाव उभयोरपि परार्थत्वेन तदयोगात् ।

वरील सूत्रांत व ह्या परिभाषेंत अङ्गाङ्गिभावहि नाहीं,—ह्मणजे एक प्रधान व दुसरें गौण असा संबंध नाहीं. कारण हीं सूत्रें व ही परिभाषा ( स्वतःच्या उपयोगाकरितां नसून ) इतर सूत्रांच्या उपयोगाकरितां सांगितलीं आहेत. त्यामुळें ( 'गुणानां च परार्थत्वात् असम्बन्धः समत्वात् स्यात्' ह्या न्यायानें ) त्यांच्यांत अङ्गाङ्गिभाव राहूं शकत नाहीं. ( कारण विशेषणें जरी विशेष्यास गुणीभूत असतात तरी त्यांचा आपसांत समान दर्जा असल्यामुळें, त्यांच्यांत परस्परांत प्रधानगौणभाव राहूं शकत नाहीं. )

अनेकाल्शिदिति सूत्रे सर्वश्चैतत्परिभाषाबोधित एव गृह्यते ।

'अनेकाल् शित्सर्वस्य ' सू० ४५ ह्या सूत्रांतील 'सर्व ' शब्दानें ' निर्दिश्यमानस्य' ह्या परिभाषेनें बोधित जो स्थानी त्याचेंच ग्रहण करावें. (सूत्रांत ज्याचा उच्चार केला आहे तोच स्थानी समजून त्याचे जागीं आदेश करावा; 'येन विधिस्तदन्तस्य ' किंवा ' यदागमाः' ही परिभाषा लावून स्थानीचें ग्रहण करूं नये. असें केल्यास, 'पादः पत् ' सू० ४१४ 'जराया जरसन्यतरस्याम्' सू० २२७ इत्यादि सूत्रान्वयें 'सुपदः' ' निर्जरसः ' अशीं जीं रूपें, ' निर्दिश्यमान ' परिभाषा लावल्यानें, सिद्ध होतात, ता न होतां, 'पदः' 'जरसः ' अशीं रूपें होतील व तसेंच 'उदस्थात्' असें रूप न होतां, 'उत्थात्' असें रूप होईल हें पूर्वीं सांगितलेंच आहे )

यत्त्वादेः परस्यालोऽन्त्यस्येतावेव तद्बाधकाविति, तन्न । 'उदस्थादि'-ति सूत्रविषयेऽस्याः 'पादः पदि'ति सूत्रे भाष्ये सञ्चारितत्वात् । नाप्येतयोरियं बाधिका एतयोर्निर्विषयत्वप्रसङ्गादिति तिविंशतेरिति सूत्रे कयटः ।

कित्येक असें ह्मणतात कीं 'आदेः परस्य ' व 'अलोन्त्यस्य ' हीं सूत्रें 'निर्दिश्यमानस्य ' ह्या परिभाषेचे बाधकच मानले पाहिजेत ( कारण ही परिभाषा ' षष्ठी स्थानेयोगा ' ह्या पूर्वसूत्रांत पठित आहे व वरील दोन सूत्रें परसूत्रें आहेत. त्यामुळें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ह्या न्यायानें तीं सूत्रें ह्या परिभाषेचीं बाधक होतात )—पण हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण 'पादःपत्' ६–४–१३० ह्या सूत्रावरील भाष्यांत 'उदः स्थास्तम्भोः पूर्वस्य' ह्या सूत्रानें 'उदस्थात्' हें रूप सिद्ध करितांना, भाष्यकारांनीं ' निर्दिश्यमानस्य ' ही परिभाषा लावून 'आदेःपरस्य' हें सूत्रहि लाविलें आहे (—ह्मणजे ह्या दोहोंचाहि एकेच वेळीं उपयोग केला आहे. त्या दोहोंत बाध्यबाधकभाव मानला असता तर, दोहोंचा युगपत् उपयोग केला नसता. ) तसेंच, ' निर्दिश्यमानस्य ' ही

परिभाषा ह्या सूत्रांचा बाध करणारी आहे असेंहि समजूं नये; कारण 'ति विंशतेः' ६-४-१४२ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें ह्मटलें आहे कीं, ही परिभाषा ह्या सूत्रांचा बाध करिते असें मानल्यास, हीं सूत्रें कोठेंहि प्रवृत्त होऊं शकणार नाहींत व त्यामुळें निरवकाश — ह्मणजे व्यर्थ — ठरतील ( कारण ही परिभाषा त्या सूत्रांचा बाध करिते असें मानल्यास, 'उदःस्थास्तम्भोः' 'त्यदादीनामः' इत्यादि सूत्रांत षष्ठीविभक्तींत निर्दिष्ट असलेले स्था, स्तम्भ, त्यदादि सर्वनामें इत्यादि संपूर्ण शब्द स्थानी मानावें लागतील, व त्यांच्या आदि किंवा अन्त्य अवयवाचे जागीं आदेश होत नाहींत असें मानावें लागेल; व तसें मानल्यास, 'आदेःपरस्य' व 'अलोऽन्त्यस्य' हीं सूत्रें प्रवृत होण्यास एकहि उदाहरण सांपडणार नाहीं व तीं सूत्रें मुद्दाम केलेलीं असून देखील निरुपयोगी ठरतील. )

**अकज्विषये तु नायं न्यायः स्थानिवद्भावेनेव तन्मध्यपतितन्यायेन तद्बुध्यैव कार्यजननात् ।**

पण ( 'अव्ययसर्वनाम्नाम् अकच् प्राक् टेः' सू. २०२६ ह्या सूत्रानें ) जेथें 'अकच्' झाला आहे तेथें 'निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा लागत नाहीं कारण तेथें 'तन्मध्यपतितस्तद्ग्रहणेन गृह्यते'—परिभाषा ९० ह्या न्यायानें ( 'टि' च्या पूर्वी झालेला 'अकच्' शब्दाच्या मध्यें पडला असल्यामुळें,) अकच्सहित शब्द अकच्रहितच आहे अशी स्थानिवद्भावासारखी बुद्धि करून, ( 'सर्व' शब्दाला जसें कार्य होतें तसेंच 'सर्वक' शब्दालाहि ) कार्य होऊं शकतें. (—ह्मणजे 'सर्वकेषाम्,' 'सर्वकस्मिन्' इत्यादि रूपें 'सर्वेषाम्' 'सर्वस्मिन्' प्रमाणें सिद्ध होऊं शकतात. )

**इयं चावयवषष्ठीविषयेऽपि । अत 'एव तदोः सः सा' विति सत्वमतिस्य इत्यत्रोपसर्गतकारस्य न । निर्दिश्यमानयुष्मदाद्यवयवमपर्यन्तस्यैव यूयादयो न त्वतियूयमित्यादौ सोपसर्गावयवमपर्यन्तस्यैति बोध्यम् । पादःपदिति सूत्रे 'षष्ठीस्थाने' इति सूत्रे च भाष्ये स्पष्टैषा ॥१२॥**

( 'षष्ठी स्थानेयोगा' ह्या सूत्रावरून ही परिभाषा काढली असल्यामुळें, ज्या सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश आहे तेथेंच ही परिभाषा लागते व ज्या सूत्रांत इतर प्रकारच्या संबंधवाचक षष्ठीचा प्रयोग असेल तेथें ही परिभाषा लागत नाहीं—हें म्हणणें बरोबर नाहीं असें ग्रन्थकार सांगतात ) अवयवावयविभाववाचक षष्ठीचा जेथें निर्देश केला असतो तेथें देखील ही परिभाषा लागते. म्हणूनच 'अतिस्यः' ह्या ठिकाणीं, 'अति' ह्या उपसर्गांतील तकाराचे जागीं 'तदोः सःसावनन्त्ययोः' ह्या सूत्रान्वयें सकार होत नाहीं. ( कारण 'त्यदादीनामः' सू. २६५ ह्या सूत्रांतील 'त्यदादीनाम्' ह्या शब्दाची 'तदोःसःसौ' ह्या सूत्रांत अनुवृत्ति होऊन, 'त्यदादीनां तदोः सः' असा अर्थ होतो व त्यदादीनाम्' ही अवयवषष्ठी होते, व 'त्यदादीनाम्' हें अनुवृत्त पद 'तदोः सः सौ' ह्या सूत्रांत निर्दिश्यमान

असल्यामुळें, त्यदादींचा अवयव जो तकार त्याचेंच ठिकाणीं सकार होतो. ‘ अति ’ हा निपात त्यदादींचा अवयव नसल्यामुळें, त्यांतील तकाराचे जागीं सकार होत नाहीं. ह्यावरून हें स्पष्ट आहे कीं, ‘ निर्दिश्यमानस्य ’ ही परिभाषा अवयवषष्ठीचे ठिकाणीं देखील लागू पडते ). म्हणूनच ‘ युष्मद् ’ ‘ अस्मद् ’ हे सूत्रांत निर्दिश्यामान स्थानी असल्यामुळें, त्यांच्या ‘ मपर्यन्त ’ अवयवाचे जागीं ‘यूय’ ‘वय’ असे आदेश होतात. निपातसहित ‘ युष्मद् ’ ‘ अस्मद् ’ ह्यांच्या मपर्यन्त अवयवाचे जागीं ‘यूय ’ ‘वय’ हे आदेश होत नाहींत. त्यामुळेंच ‘ अतियूयम् ’ ‘ अतिवयम् ’ अशीं रूपें सिद्ध होतात. ( ‘ यूयवयौ जसि ’ सू० ३८८ ह्या सूत्रांत ‘ युष्मदस्मदोः’ हें पद अनुवृत्त होतें व ‘ मपर्यन्तस्य ’ सू० ३८३ हें अधिकारसूत्र प्रवृत्त होऊन, ‘यूय-वयौ जसि ’ ह्या सूत्राचा ‘ युष्मदस्मदोः मपर्यन्तस्य यूय वय इति आदेशौस्तः जसि परे सति’ असा अर्थ होतो. येथें अनुवृत्त ‘ युष्मदस्मदोः ’ हें पद निर्दिश्यमान अस-ल्यामुळें व अवयवषष्ठी असल्यामुळें, ‘ युष्मद् ’ ‘ अस्मद् ’ शब्दांचा जो मपर्यन्त अवयव त्याचेंच जागीं ‘यूय’ ‘वय’ असें अनुक्रमें आदेश होतात; ‘ अति ’ ह्या निपात-सहित ‘युष्मद् ’ ‘अस्मद् ’ शब्दांच्या मपर्यन्त अवयवांचे जागीं तसे आदेश होत नाहींत, कारण ‘ अति ’ हा निपात ‘ युष्मद् ’ ‘ अस्मद् ’ ह्यांचा अवयव नसून भिन्न शब्द आहे; त्यामुळें अतियूयम् अतिवयम् अशीं रूपें सिध्द होतात ) ‘ पादः पत् ’ ६-४-१३० व ‘ षष्ठी स्थानेयोगा ’ १-१-४९ ह्या सूत्रांवरील भाष्यांत ह्या परिभाषेचा उल्लेख केला आहे.

---

## परिभाषा १३

**ननु चेतेत्यादौ ह्रस्वस्येकारस्य प्रमाणत आन्तर्यादकारोपि स्यादत आह—**

‘ चेता ’ (=‘ चि + तास् + डा ’ ) इत्यादि ठिकाणीं ऱ्हस्व इकाराचें जागीं अकारहि व्हावा; कारण ‘ इ ’ व ‘ अ ’ हे दोन्ही वर्ण ऱ्हस्व असल्यामुळें, त्यांच्यांत प्रमाणरूपीं ( एकमात्रा असणें हें ) सादृश्य आहे; (तसें न व्हावें) म्हणून ही परिभाषा सांगतात.

**यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत आन्तर्यं बलीयः ॥ १३ ॥**

“ जेथें अनेक प्रकारचें सादृश्य ( दोन वर्णांत ) असतें तेथें, स्थानामुळें होणारें सादृश्य हें सर्वांत अधिक समजावें.”

( ‘ चेता ’ ह्या ठिकाणीं ‘ सार्वधातुकार्धधातुकयोः’ सू० २१६८ ह्या सूत्रानें ‘ चि ’ धातूच्या अन्त्य इकारास गुण पावला आहे; ‘ अदेङ् गुणः सू० १७ ह्या सूत्रा-

प्रमाणें, ' अ ' ' ए ' 'ओ' ह्या तिन्ही वर्णांना गुण संज्ञा आहे. तर मग 'इ' व 'अ' हे दोन्ही वर्ण ह्रस्व असून त्यांची एकच मात्रा असल्यामुळें, त्यांच्यांत सादृश्य आहे म्हणून, ' चि ' ह्यांतील अन्त्य ' इ ' चें जागीं ' अ ' असा गुणरूपी आदेश कां न व्हावा अशी शंका उत्पन्न होते. ह्या शंकेचें निवारण ही परिभाषा करिते, व स्थानी-चे जागीं होणारा आदेश कसा असावा हें सांगते. ह्या परिभाषेप्रमाणें, ' इ ' व ' अ ' ह्यांचें स्थान भिन्न असल्यामुळें—म्हणजे ' इ ' चें तालुस्थान व ' अ ' चें कण्ठस्थान असल्यामुळें–' इ ' चे जागीं 'अ' असा गुणरूपी आदेश न होतां, ' ए ' चें कण्ठतालुस्थान असल्यामुळें, आणि ' इ ' व ' ए ' यांत तालुरुपी स्थानसाम्य असल्या-मुळें, ' इ ' चें जागीं ' ए ' असा गुणरूपी आदेश होतो )

**अनेकविधं स्थानार्थगुणप्रमाणकृतम् । अत्र मानं, 'षष्ठीस्थाने इत्यत एकदेशानुवृत्त्या स्थानेग्रहणेऽनुवर्तमाने पुनः 'स्थानेऽन्तरतम' इति सूत्रे स्थानेग्रहणमेव । तद्धि तृतीयया विपरिणम्य वाक्यभेदेन स्थानिनः प्रसङ्गे जायमानः सति सम्भवे स्थानत एवान्तरतम इत्यर्थकम् । तमबग्रहणमेवा-नेकविधान्तर्यसत्त्वागमकम् । स्थानतः स्थानेनेत्यर्थः ।**

ह्या परिभाषेंतील ' अनेकविधम् ' ह्या शब्दाचा स्थान, अर्थ, गुण, व प्रमाण ह्यानीं प्राप्त झालेलें ( सादृश्य ) असा अर्थ आहे. ' षष्ठी स्थानेयोगा' ह्या सूत्रांतील 'स्थानेयोगा' ह्या शब्दाचा एकदेश ' स्थाने ' ह्या शब्दाची ('क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्तते' प. १८ ह्या न्यायान्वयें ) स्थानेऽन्तरतमः ' ह्या सूत्रांत अनुवृत्ति होत असून देखील. पुन्हा त्या सूत्रांत ' स्थाने ' ह्या शब्दाचें ग्रहण केलें आहे त्यामुळें, ही परिभाषा सिद्ध होते ह्या सूत्रांत ' स्थाने ' ह्या शब्दाचें पुन्हा जें ग्रहण केलें आहे तें अशा करितां केलें आहे कीं ' स्थाने स्थानेऽन्तरमः ' असें सूत्र समजावें, व)–सूत्रांत असलेल्या 'स्थाने' ह्या सप्तम्यन्त शब्दाचा तृतीया विभक्तींत विपरिणाम करून ( म्हणजे 'स्थाने' ह्याच्या जागीं ' स्थानेन ' असें करून ' स्थाने स्थानेन अन्तरतमः' असें जें वाक्य तयार होतें त्याचीं ) दोन भिन्न वाक्यें करावीं; ( एक वाक्य ' स्थाने अन्तरतमः भवति,' दुसरें वाक्य 'स्थानेन यः अन्तरतमः स एव भवति' ) व ह्या दोन वाक्यांचा अर्थ असा होतो कीं स्थानीचे जागीं आदेश होण्याचा प्रसंग आला असतां, संभव असल्यास, तोच आदेश करावा कीं ज्याचें स्थानीशीं ' स्थानतः ' सादृश्य आहे. ( वरील पंक्तींत ' सति सम्भवे ' असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं जेथें स्थानतः आन्तर्य संभवत असेल तेथें स्थानीचे जागीं असाच आदेश करावा कीं ज्याचें स्थानीशीं स्थानतः सादृश्य आहे. परंतु जेथें अनेक वर्णांशीं स्थानतः आन्तर्य असेल तेथें आभ्यन्तर किंवा बाह्य प्रयत्नांच्या साम्यत्वामुळें जो वर्ण अन्तरतम ठरत असेल त्याच वर्णाचा आदेश करावा. जसें—'उदः स्थास्तम्भोः' सू० ११८ या सूत्रानें ' स्था ' व 'स्तम्भ' यांतील आदिस-काराचे जागीं ' उद् ' यांतील दकाराच्या सवर्णाचा आदेश होणें सांगितलें आहे.

स्थानतः साम्य पाहूं गेल्यास ' लृतुलसानां दन्ताः ' या शिक्षावचनान्वयें सकाराचे जागीं लृ, त्, थ, द्, ध्, न्, व ल् या सर्व वर्णांची प्राप्ति होते; अशा ठिकाणीं ज्या वर्णाचा आभ्यन्तर किंवा बाह्य प्रयत्न सकाराशीं जुळतो त्याच वर्णाचा सकाराचे जागीं आदेश करावा. सकाराचा आभ्यन्तर प्रयत्न वरील सर्व स्थानतः सदृश वर्णांहून भिन्न आहे, परंतु सकाराचा व थकाराचा बाह्य प्रयत्न सारखाच आहे. ह्मणून सकाराचे जागीं थकारादेश होतो. सारांश, ही परिभाषा ज्ञापकसिद्ध किंवा न्यायसिद्ध नसून पाणिनीयसूत्रांतूनच निघाली असल्यामुळें ती सूत्रसिद्ध वाचनिकी समजावी.)
' अन्तरतमः ' ह्या ठिकाणीं जें ' तमप् ' ग्रहण केलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं सादृश्य अनेक प्रकारचें असतें. परिभाषेंतील ' स्थानतः ' ह्या शब्दाचा अर्थ ' स्थानेन ' असा आहे. ( येथील ' तस् ' प्रत्यय तृतीयाविभक्तीचा द्योतक आहे. )

**तत्र स्थानत आन्तर्यमिकोयणचीत्यादौ प्रसिद्धमेव ।**

( आन्तर्य -ह्मणजे सादृश्य—अनेक प्रकारचें असतें असें वर ह्मटलें आहे, व ते प्रकारहि वर सांगितले आहेत. आतां, प्रत्येक प्रकाराच्या सादृश्याचें उदाहरण ग्रन्थकार देतात. ) ' इकोयणचि ' सू० ४७ इत्यादि सूत्रांत, उच्चारणस्थान एक असल्यामुळें होणारें स्थानसादृश्य प्रसिद्धच आहे (इ, ऊ, ऋ, लृ ह्यांचे जागीं यणादेश होतो असा ' इकोयणचि ' ह्या सूत्राचा अर्थ आहे; पण ' इ'चे जागीं ' य् ' च कां व्हावा, ' व् ' कां होऊं नये, ' उ ' चे जागीं ' व् ' च कां व्हावा ' र्, ल्. य् कां होऊं नये? ह्याचें कारण हेंच कीं, ' इ ' व ' य् ' ह्यांचे उच्चारणस्थान—' तालु '–एकच असल्यामुळें,' इ चें जागीं ' य् ' हाच आदेश होतो; व् र् ल् ह्यांचे उच्चारण स्थान भिन्न असल्यामुळें, ' इ 'चें जागीं ' व् ' किंवा ' ल् ' किंवा ' र् ' असा आदेश होत नाहीं. तसेंच ' उ ' चें उच्चारणस्थान ओष्ठ्य व ' व् ' चें उच्चारणस्थान दन्तोष्ठ असल्यामुळें व त्यांच्या उच्चारणस्थानांत ओष्ठस्थानरूपीं स्थानसादृश्य असल्यामुळें, उ' चे जागीं ' व् ' हाच आदेश होतो, ' य् ' किंवा ' ल् ' किंवा र् ' असा आदेश होत नाहीं. तसेंच ऋ, लृ संबंधानें समजावें. )

**अर्थतः पद्न्नित्यादौ । स्थान्यर्थाभिधानसमर्थस्यैवादेशतेति सिद्धान्ताद्यदर्थाभिधानसमर्थो यः स तस्यादेश इति तत्समानार्थतत्समानवर्णपाद्.दीनां ते ।**

' पद्दन्नोमास्हृन्निशसन् ' सू० २२८ ह्या सूत्रांत, स्थानी व आदेश ह्यांचे अर्थामुळें होणारें सादृश्य आहे. ( ह्मणजे पाद, दन्त. नासिका, मास, हृदय इत्यादिकांचे ठिकाणीं अनुक्रमें होणाऱ्या पद्, दत्, मास्, नस्, हृद् ह्या आदेशांचा जो अर्थ आहे तोच त्यांच्या स्थानींचा अर्थ आहे ) स्थानीचा जो अर्थ आहे तो सांगण्यास जो समर्थ असतो तोच त्याचा आदेश होऊं शकतो असा सिद्धान्त असल्यामुळें, ज्या स्थानीच्या अर्थाचें अभिधान करण्यास जो आदेश समर्थ आहे तोच आदेश त्या स्थानीचे जागीं

होऊं शकतो. ( ह्मणूनच 'पद्दन्नोमास्' ह्या सूत्रांत, ज्यांच्या जागीं 'पद्' 'दत्' इत्यादि आदेश सांगितले आहेत त्यां स्थानींचा निर्देश केलेला नाहीं तरी, ) अर्थ-सादृश्यामुळें व वर्णसादृश्यामुळें, हे आदेश 'पाद' 'दन्त' इत्यादिकांचे जागीं अनुक्रमें होतात. )

तृज्वत्क्रोष्टुरिति च ।

( कांहींच्या मतें 'पद्दन्नस्'–ह्या सूत्रांत सांगितलेले 'पद्, दत्, नस्, मास् इत्यादि आदेश नसून स्वतंत्र शब्द होत; कारण जर ते आदेश असते तर, ज्या स्थानींच्या जागीं ते व्हावयाचे, त्या स्थानींचाहि निर्देश पाणिनीनें सूत्रांत केला असता. सारांश 'पद्दन्' हें अर्थसादृश्याचें सर्वसंमत उदाहरण नसल्यामुळें, ग्रन्थकार अर्थ-सादृश्याचें दुसरें उदाहरण देतात. ) 'तृज्वत्क्रोष्टुः' सू० २७४ हें देखील अर्थसादृश्याचें उदाहरण आहे. ( 'क्रोष्टु' शब्दाचे जागीं सर्वनामस्थानांत तृजन्तासारखा आदेश होतो असा 'तृज्वत्क्रोष्टुः' ह्या सूत्राचा अर्थ आहे. आतां 'कर्तृ' 'भर्तृ' इत्यादि शब्द तृजन्त आहेत व 'क्रोष्टृ' शब्दहि तृजन्त आहे. 'क्रोष्टु' शब्दाच्या जागीं जर तृजन्ता-सारखा आदेश व्हावा असें आहे, तर मग 'क्रोष्टु' शब्दाचे जागीं 'कर्तृ' किंवा 'भर्तृ' अशा तृजन्तशब्दाचा आदेश कां होऊं नये ? ह्याला उत्तर हेंच कीं, 'कर्तृ' 'भर्तृ' शब्दांत व 'क्रोष्टु' शब्दांत अर्थसादृश्य नाहीं, 'क्रोष्टु' व 'क्रोष्टृ' शब्दांत अर्थ-सादृश्य आहे; कारण दोहोंचाहि अर्थ एकच—ह्मणजे 'कोल्हा' असा—आहे, व दोन्ही शब्द 'क्रुश आव्हाने रोदनेच' ह्या एकाच धातूपासून निघाले असून, एक 'क्रोष्टु' शब्द 'तुन्' प्रत्ययान्त व दुसरा 'क्रोष्टृ' शब्द 'तृच्' प्रत्ययान्त आहे. ह्या सादृश्या-मुळें, 'क्रोष्टू' चे जागीं 'क्रोष्टृ' असाच आदेश होतो )

गुणतो वाग्घरिरित्यादौ ।

गुणामुळें होणाऱ्या सादृश्याचें उदाहरण 'वाग्घरिः' इत्यादि आहेत. ( 'गुण' ह्मणजे धर्म. स्थान, अर्थ, गुण व प्रमाण हे सर्व वर्णांचे धर्मच आहेत. पण ज्याअर्थीं स्थान, अर्थ, व प्रमाण यांचा पृथक् निर्देश केला आहे त्या अर्थीं येथें 'गुण' ह्मणजे हे तीन धर्म सोडून इतर धर्म घ्यावे. ते इतर धर्म ह्मणजे प्रयत्न इत्यादि. प्रयत्न वास्तविक वर्णांचे ठिकाणीं नसून उच्चारणाऱ्याचे ठिकाणीं असतो; तथापि तो उच्चारणा-मुळें वर्णाच्या ठिकाणीं संक्रमित होत असतो असें मानून त्याला वर्णधर्म समजावा आतां 'वाच्+हरिः' ह्याचा सन्धि करितांना, 'चोः कुः' सू. ३७८ ह्यानें 'वाक्+हरि-असें होऊन, 'झलां जशोऽन्ते' सू० ८४ ह्या सूत्रानें 'वाग्+हरि' असें होतें. पुढें 'झयो होऽन्यतरस्याम्' सू० ११९ ह्या सूत्रानें झयाच्यापुढें असलेल्या 'ह्' ला विकल्पें-करून पूर्वसवर्ण आदेश पावला आहे. पूर्ववर्ण जो ग् त्याचे सवर्ण 'क् ख् घ् ङ्' आहेत. कवर्गांतलि पांचहि वर्णांचें हकाराशीं स्थानतः सादृश्य आहे हें 'अकुहविसर्जनीयानां कण्ठः' ह्या शिक्षावचनावरून स्पष्ट होतें. तर मग हे पांचहि वर्ण हकाराशीं स्थानतः सदृश असल्या-

मुळें, ह्यांच्यापैकीं कोणता वर्ण घ्यावा ? आभ्यन्तरप्रयत्नसाम्य पाहूं गेल्यास, हकारांत व कवर्गांत आभ्यन्तरप्रयत्नसाम्य नाहीं; कारण कवर्गाचा ' स्पृष्ट ' हा आभ्यन्तरप्रयत्न आहे व हकाराचा 'विवृत' हा आभ्यन्तरप्रयत्न आहे. बाह्यप्रयत्नसादृश्य पाहूं गेल्यास, जसा 'हवर्ण' घोष, नाद, संवार, व महाप्राण ह्या चार बाह्यप्रयत्नांनीं युक्त आहे तसा कवर्गांतील फक्त एकच वर्ण--म्हणजे घकार--आहे; इतर वर्णांचे बाह्य प्रयत्न भिन्न आहेत. म्हणून बाह्यप्रयत्नरूपी गुणसादृश्यामुळें, हकाराचे जागीं पूर्वसवर्ण ' घकार ' होऊन 'वाग्घरि:' असें वैकल्पिक रूप होतें. (पहा बालमनोरमा द्वितीयावृत्ति, पान ५-६)

**प्रमाणतो ऽ दसो ऽ सेरित्यादौ ।**

प्रमाणानें होणाऱ्या सादृश्याचें उदाहरण 'अदसो ऽसेः' सू० ४१९ इत्यादि होय. ( प्रमाणसादृश्यामुळेंच, ऱ्हस्व स्वराचे व व्यंजनाचे जागीं ऱ्हस्व ' उ', व दीर्घ स्वराचे जागीं दीर्घ 'ऊ' असा आदेश ' अदसोऽसेः' ह्या सूत्रान्वयें होतो; कारण त्यांच्यांत मात्रासादृश्य आहे. )

**' स्थाने ऽन्तरतम ' सूत्रे भाष्ये स्पष्टैषा ॥ १३ ॥**

'स्थाने ऽन्तरतमः' १-१-५० ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा १४

**ननु प्रोढवानित्यत्र ' प्रादूहोढे ' ति वृद्धिः स्यादत आह—**

' प्रादूहोढोढ्येषैष्येषु — सू० ७३ मधील वार्तिक— ह्या वार्तिकानें ' प्रौढवान् ' येथें वृद्धि व्हावी. ( ' प्र ' ह्या उपसर्गापुढें ' ऊह ', ' ऊढ ', ' ऊढि ', ' एष ' 'एष्य' आल्यास, पूर्वापर स्वरांचे जागीं वृद्धिरूप एकादेश होतो असें वार्तिक असल्यामुळें, ' प्र + ऊढ ' ह्याचा ' प्रौढ ' असा संधि होतो. आतां, 'प्र + ऊढवान्' येथें ' प्र ' ह्या उपसर्गापुढें ' ऊढवान् ' शब्दांत असणारा 'ऊढ' शब्द आहे. म्हणून ' प्रोढवान् ' असा सन्धि न होतां, वृद्धिरूप एकादेश होऊन ' प्रौढवान् ' असा सन्धि व्हावा; तसा सन्धि न व्हावा, ) म्हणून ही परिभाषा सांगतातः

**अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य ॥ १४ ॥**

"जेथें सूत्रांत अर्थवान् शब्दाचें ग्रहण केलें आहे तेथें त्या शब्दानें अनर्थक शब्दाचें ग्रहण होऊं शकत नाहीं."

**विशिष्टरूपोपादाने, उपस्थितार्थस्य शब्दं प्रति विशेषणतयान्वयसम्भवे त्यागे मानाभावो ऽस्या मूलम् ।**

सूत्रांत विशिष्ट शब्द उच्चारला असतां, त्याच्या बरोबर उपस्थित झालेला त्याचा अर्थ त्या शब्दस्वरूपाचें ( शब्दाचें ) विशेषण संभवत असतांना, तो विशेषणीभूत अर्थ

सोडून देण्यास कांहीं प्रमाण नाहीं, हेंच ह्या परिभाषेचें बीज होय (व त्यामुळें ती युक्ति सिद्ध समजावी. एखादा शब्द उच्चारला असतां जसा त्याचा वर्णानुक्रम लक्षांत येतो त्याचप्रमाणें त्या वर्णानुक्रमाबरोबरच त्याचा अर्थहि मनांत येतो. सारांश, शब्द उच्चारल्याबरोबर त्याची वर्णानुपूर्वी व त्याचा अर्थ या दोहोंचा एकेच वेळीं बोध होत असल्यामुळें व सूत्रनिर्दिष्ट कार्य अर्थाचे ठिकाणीं करणें संभवत नसल्यामुळें, अर्थ शब्दस्वरूपाचें विशेषण होतो, व अमुक अर्थाचा हा शब्द आहे असा बोध होतो. अशा तऱ्हेचा बोध होत असल्यामुळें, शब्दस्वरूपांत अन्वित–ह्मणजे संबद्ध–असलेल्या अर्थाकडे दुर्लक्ष करून केवळ शब्दस्वरूपाचें ग्रहण करणें अनुचित होय. याच न्यायाच्या पायावर ही परिभाषा रचली आहे, व त्यावरून हें सिद्ध होतें कीं, वर्णानुपूर्वीविशिष्ट अर्थवान् शब्दानें तशा अनर्थक शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं. ह्मणूनच ' प्रादूहोढ ' या वार्तिकांत कर्मणिक्तप्रत्ययान्त अथर्वान् 'ऊढ' शब्द उच्चारला असल्यामुळ, कर्तरिक्तवतुप्रत्ययान्त 'उढवत् या अर्थवाधू शब्दामध्यें जो अनर्थक 'ऊढ' हा भाग आहे, त्या भागाचें वार्तिकांत उच्चारलेल्या अर्थवान् 'ऊढ' शब्दानें ग्रहण करितां यत नाहीं. येथें हें लक्षांत ठेवावें कीं ' क्तवत् ' हा संपूर्ण कर्तरिप्रत्यय जरी अर्थवान् आहे तरी त्यांतील 'क्त' हा एकदेश अर्थवान् नाहीं. म्हणूनच 'वह्+क्त=ऊढ'यानें 'वह्+क्तवत्=ऊढवत्' यांतील 'ऊढ'चें ग्रहण करतां येत नाहीं, आणि त्यामुळें 'प्र+ऊढ' येथें जसा वृद्धिरूप एकादेश होऊन 'प्रौढ' असें रूप होतें तसें 'प्र+ऊढवान्' या स्थलीं 'प्र' या उपसर्गापुढें अर्थवान् 'ऊढ' शब्द नसून अनर्थक 'ऊढ' शब्द असल्यामुळें वरील वार्तिक लागूं पडत नाहीं, व वृद्धिरूप एकादेश न होतां 'आद्गुणः' सू. ६९ यानें गुणरूपी एकादेश होऊन 'प्रोढवान्' असें रूप होतें. )

**अत्रार्थः कल्पितान्वयव्यतिरेककल्पितः शास्त्रीयोऽपि गृह्यते इति सङ्ख्याया इति सुत्रे भाष्ये स्पष्टम् ।**

'संख्यायाः'–५-१-२२ या सूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होतें कीं, या परिभाषेंतील ' अर्थ ' या शद्वानें ( जसें अन्वयव्यतिरेकसिध्द लौकिक अर्थाचें ग्रहण होतें तसेंच ) व्याकरणशास्त्रांत प्रसिध्द असलेल्या अन्वयव्यतिरेकसिध्द शास्त्रीय अर्थाचें ग्रहण होतें. (लौकिकव्यवहारांत केवळ प्रकृति किंवा केवळ प्रत्यय यांचा कधींच उपयोग केला जात नाहीं. दोहोंचा मिळूनच उपयोग केला जातो आणि प्रकृति व प्रत्यय मिळून सिध्द झालेल्या अखंड शब्दानेंच अर्थबोध होतो, व ता अन्वयव्यतिरेकानें जाणला जातो. 'तत्सत्त्वे तत्सत्वम्' याला 'अन्वय' म्हणतात व 'तदसत्त्वे तदसत्वम्' याला 'व्यतिरेक' म्हणतात. 'अश्व' हा शब्द उच्चारल्यास घोड्याचा बोध होतो, न उच्चारल्यास तसा बोध होत नाहीं; म्हणून 'अश्व' हा शब्द 'घोडा' या अर्थाचा वाचक ठरतो. लौकिकव्यवहारांत केवळ प्रकृति किंवा केवळ प्रत्यय उच्चारला असतां जरी अर्थबोध होत नाहीं तरी व्याकरणशास्त्रांत प्रकृति व प्रत्यय यांचें भिन्न अर्थ

कल्पिलेले आहेत व प्रत्येक प्रत्ययाचा भिन्न अर्थ कल्पिलेला आहे. 'क्त' या प्रत्ययाचे अर्थाहून 'क्तवतु' या प्रत्ययाचा अर्थ भिन्न आहे. अशा प्रकारच्या कल्पित अर्थांचें देखील या परिभाषेंत ग्रहण केलें आहे; व या कल्पित अर्थांचा देखील वर सांगितल्याप्रमाणें अन्वयव्यतिरेकानेंच बाध होतो. जसें 'क्त' उच्चारला तरच त्याच्या कल्पित अर्थांचा बोध होतो, नाहींतर होत नाहीं. म्हणूनच 'क्तवत्' प्रत्ययान्तानें 'क्त' प्रत्ययान्ताचें ग्रहण होत नाहीं. )

**इयं वर्णग्रहणेषु नेति लस्येत्यत्र भाष्ये स्पष्टम् । अत एवैषा विशिष्टरूपोपादानविषयेति वृद्धाः । एतन्मूलकमेव येनविधिरित्यत्र भाष्ये पठ्यतेऽलैवानर्थकेन तदन्तविधिरिति ॥**

जेथें सूत्रांत वर्णाचें–ह्मणजे अलाचें–ग्रहण केलें आहे ( व त्या वर्णाला कार्य होणें सांगितलें आहे ) तशाठिकाणीं ही परिभाषा लागू पडत नाहीं असें ' लस्य ' ३-४-७७ या सूत्रांवरील भाष्यांत सांगितलें आहे. ( जसें ' इकोयणचि ' सू. ४७ या सूत्रांत इकाचें–ह्मणजे इक् प्रत्याहारांतील इ, उ, ऋ, लृ या वर्णांचें–ग्रहण केलें आहे व असें सांगितलें आहे कीं, 'इक्' प्रत्याहारांतील वर्णापुढें 'अच्' आल्यास त्याच जागीं यणादेश करावा. या सूत्रांत वर्णग्रहण केलें असल्यामुळें, अशा ठिकाणीं ही परिभाषा लावल्यास, जेथें अर्थवान् इकापुढें 'अच्' येतो तेथेंच यणादेश करावा, इतरत्र करूं नये, असा अनिष्ट सूत्रार्थ होईल, व त्यामुळें ' दधि+अत्र ' किंवा ' मधु+अत्र ' येथें यणादेश न होण्याची आपत्ति येईल; कारण 'दधि' व 'मधु' यांतील अन्त्य 'इक्' अर्थवान् नाहीं. तसेंच 'अत-इञ्' सू० १०९५ यांत अवर्णाचें ग्रहण केलें असल्यामुळें, येथें ही परिभाषा लावल्यास, ' अस्य=विष्णोः अपत्यम् इः' असें 'इञ्' प्रत्यय लागून रूप होईल; कारण ' अ ' हा ' विष्णु ' शद्बाचा वाचक असल्यानें अर्थवान् आहे; पण 'दशरथस्य अपत्यम् दाशरथिः' असें इष्टरूप सिद्ध होणार नाहीं, कारण ' दशरथ ' यांतील अन्त्य अकार अर्थवान् नाहीं. ही आपत्ति टाळण्याकरितांच ' इयं वर्णग्रहणेषु न ' असें ह्मटलें आहे.) ह्मणूनच प्राचीन वैयाकरणांनीं असें ह्मटलें आहे कीं, जेथें वर्णानुपूर्वीविशिष्ट ( वर्णसमुदायरूप ) शद्बस्वरूपाचें ग्रहण केलें आहे तेथेंच ही परिभाषा लागते ( व जेथें केवळ अलाचें ग्रहण केलें आहे तेथें ही परिभाषा लागत नाहीं. ) ' इयं वर्णग्रहणेषु न ' याच सिद्धान्ताच्या आधारावर ' येन विधिः' १-१-७२ या सूत्रावरील भाष्यांत ' अलैवानर्थकेन तदन्तविधिः' असें वार्तिक पठित केलें आहे ( व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं ' येन विधिः' या सूत्रान्वयें अनर्थकानें तदन्तविधि करणें असेल तर तो अनर्थक अलानेंच करावा. यावरून हें सिद्ध होतें कीं, जेथें वर्णसमुदायानें तदन्तविधि करणें असेल तेथें सार्थक वर्णसमुदायानेंच तदन्तविधि होऊं शकतो, व तशा सार्थक वर्णसमुदायानें अनर्थक वर्णसमुदायाचें, या परिभाषेप्रमाणें, ग्रहण करितां येत नाहीं. ह्मणूनच वरील वार्तिकाचें प्रयोजन काय आहे हें सांगतांना, भाष्यकार म्हणतात–'हन्ग्रहणे प्लीहन्ग्रहणं माभूत् । उद्ग्रहणे गर्मुद्ग्रहणम् ......' व त्याचा अर्थ असा आहे कीं, ' इन् हन् पूषार्यम्णां

शौ' सू० ३५६ या सूत्रांत 'हन्'–म्हणजे मारणारा–या सार्थक वर्णसमुदायानें तदन्तविधि केल्यास जसें 'वृत्रहन्' याचें ग्रहण होतें तसें 'प्लीहन्' याचें ग्रहण होऊं शकत नाहीं; कारण 'वृत्रहन्' येथें अर्थवान् 'हन्' अन्तीं आहे, पण 'प्लीहन्' येथें अर्थवान् 'हन्' अन्तीं नाहीं. म्हणून 'इन्हन्' हें निषेधसूत्र 'वृत्रहन्'ला लागूं पडतें आणि 'वृत्रहाणौ' असें रूप न होतां, 'वृत्रहणौ' असें रूप होतें; पण तें सूत्र 'प्लीहन्'ला लागत नाहीं व त्यामुळें 'प्लीहानौ' असें रूप होतें. तसेंच 'उदःस्थास्तम्भोः' सू० ११८ या सूत्रांत ऊर्ध्ववाचक 'उद्' या अर्थवान् वर्णसमुदायाचें ग्रहण केलें असल्यामुळें, तें सूत्र जसें 'उद्+स्थानम्' येथें लागूं पडते तसें 'गर्मुद्' यांतील 'उद्' अनर्थक असल्यामुळें त्याला लागूं पडत नाहीं, व त्यामुळें 'गर्मुद्+स्थास्यति' येथें 'स्था' यांतील सकाराचे जागीं पूर्वसवर्णादेश होत नाहीं. भाष्यांत या संबंधानें इतरहि उदाहरणें दिलीं आहेत, पण तीं विस्तारभयास्तव येथें दिलीं नाहींत. सारांश, या पंक्तीवरून देखील हें स्पष्ट होतें कीं, जेथें सूत्रांत अलाचें ग्रहण असेल तेथें ही परिभाषा लागत नाहीं व जेथें अर्थवान् वर्णानुपूर्वीविशिष्ट शब्दस्वरूपाचें ग्रहण असेल तेथेंच ही परिभाषा लागते ).

**किं च स्वं रूपमिति शास्त्रे स्वशब्देनात्मीयवाचिनाऽर्थो गृह्यते, रूपशब्देन स्वरूपम् एवं च, तदुभयं शब्दस्य संज्ञीति तदर्थः। तत्रार्थो न विशेष्यस्तत्र शास्त्रीयकार्यासम्भवात् किंतु शब्दविशेषणम्। एवं चार्थविशिष्टः शब्दः संज्ञीति फलितम्। तेनैषा परिभाषा सिध्देति भाष्ये स्पष्टम् ॥ १४ ॥**

आणि 'स्वं रूपं शब्दस्य' सू. २५ ह्या सूत्रांतील'आपलें' ह्या अर्थाचा वाचक जो'स्वम्' शब्द आहे त्याचा अर्थ'अर्थ'असा समजावा, व 'रूपम्'ह्या शब्दाचा अर्थ 'शब्दाचें स्वरूप' असा समजावा, म्हणजे शब्द व अर्थ हे दोन्ही मिळून 'संज्ञी' होतो असा त्या सूत्राचा अर्थ होतो. येथें अर्थ हा विशेष्य (व शब्दस्वरूप हें विशेषण ) समजूं नये. कारण सूत्रांत सांगितलेलीं कार्यें अर्थाचें ठिकाणीं होऊं शकत नाहींत. (तीं कार्यें शब्दालाच होऊं शकतात. म्हणून 'अर्थ' हा 'शब्दाचें' विशेषण मानावा.) अशा रीतीनें ह्या दोन शब्दांचा अर्थ केल्यास, 'अर्थविशिष्ट शब्दास संज्ञी म्हणावें' असा वरील सूत्राचा अर्थ होऊन ह्या सूत्रानेंच ही परिभाषा सिद्ध होते असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ('स्वं रूपं शब्दस्य संज्ञि' याचा 'अर्थविशिष्टं शब्दस्वरूपं संज्ञि स्यात्' असा भाष्यकारांनीं अर्थ केला आहे. त्यावरून हें स्पष्ट होतें कीं जेथें सूत्रांत एखाद्या शब्दाचें ग्रहण करून त्या शब्दाला कार्य होणें सांगितलें आहे तशा ठिकाणीं त्या अर्थविशिष्ट शब्दस्वरूपाचेंच ग्रहण करावें, अनर्थक शब्दस्वरूपाचें ग्रहण करूं नये. ही परिभाषा देखील हेंच सांगते; म्हणूनच 'स्वं रूपं शब्दस्य' या सूत्रावरून ही परिभाषा निघते असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे. परंतु भाष्यकारांनीं या सूत्राचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें ही परिभाषा सूत्रसिद्ध वाचनिकी मानतां येणार नाहीं म्हणून, ग्रन्थकारानें ही परिभाषा न्यायसिद्ध–म्हणजे युक्तिसिद्ध–आहे असें प्रथम म्हटलें आहे.)

---

# परिभाषा १५

**नन्वेवमपि महद्भूतश्चन्द्रमा इत्यत्रान्महत इत्यात्वापत्तिरत आह—**

' अर्थवद्ग्रहणे ' ही परिभाषा स्वीकारली तरी—म्हणजे परिभाषा नं० १४ असून देखील—'महद्भूतश्चन्द्रमाः' या उदाहरणांत ( 'महत्' यांतील अन्त्य तकाराचे जागीं ) आकारादेश होण्याची आपत्ति कायम राहतेच. ( ' अमहान् भूतः महद्भूतः' येथें 'अभूततद्भावे' या अर्थामध्यें 'कृभ्वस्तियोगे' सू० २११७ या सूत्रानें 'महत्' शब्दास 'च्वि' प्रत्यय होऊन व 'वेरपृक्तस्य' सू० ३७५ या सूत्रानें 'च्वि=व्' चा लोप होऊन व 'भूत' शब्दाशीं सामानाधिकरण्य होऊन, 'महद्भूतः' असें रूप सिद्ध झालें आहे. येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, 'महत्' हा शब्द अर्थवान् असल्यामुळें, 'आन्महतः' सू० ८०७ या सूत्रान्वयें जशीं महादेवः, महाबाहुः इत्यादि रूपें होतात त्याचप्रमाणें 'महाभूतः' असें रूप कां होऊं नये. या शंकेला उत्तर) म्हणून ही परिभाषा सांगतात.

## गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसम्प्रत्ययः ॥ १५ ॥

"सूत्रांत एखाद्या शब्दाला कार्य करणें सांगितलें असल्यास, जेव्हां तो शब्द मुख्यार्थवाचक असतो तेव्हांच त्याला तें कार्य करावें, ( तो शब्द गौणार्थवाचक असल्यास त्याला तें सूत्रनिर्दिष्ट कार्य करूं नये )"

('अमहान् महान् भूतः महद्भूतश्चन्द्रमाः' याचा अर्थ असा आहे कीं, चन्द्र वास्तविक मोठा नसून त्याचे ठिकाणीं महत्वाचा आरोप केला आहे; कारण तो कलंकयुक्त असल्यामुळें त्याला मोठा—म्हणजे महत्वयुक्त—आहे असें मानतां येत नाहीं. सारांश येथें 'महत्' शब्दाचा मुख्यार्थांत प्रयोग केला नसून गौणार्थामध्यें प्रयोग केला आहे. म्हणून ' आन्महतः ' हें सूत्र अशा गौणार्थवाचक ' महत् ' शब्दाला लागत नाहीं; व त्यामुळें त्याच्या अन्त्य तकाराचे जागीं आकारादेश होत नाहीं. ' महादेवः' ' महाबाहुः' या उदाहरणांत ' महत् ' शब्दाचा प्रयोग मुख्यार्थामध्यें केला असल्यामुळें, ' महत् ' शब्दाच्या तकाराचे जागीं आकारादेश होतो. )

**गुणादागतो गौणः । यथा गोशब्दस्य जाड्यादिगुणनिमित्तोऽर्थो वाहीकः । अप्रसिद्धश्च संज्ञादिरपि तद्गुणारोपादेव बुध्यते । मुखमिव प्रधानत्वान्मुख्यः प्रथम इत्यर्थः । गौणे ह्यर्थे शब्दः प्रयुज्यमानो मुख्यार्थारोपेण प्रवर्तते । एवं चाप्रसिद्धत्वं गौणलाक्षणिकत्वं चात्र गौणत्वम् ।**

( या परिभाषेंत ' गौणमुख्ययोः ' हा शब्द घातला आहे. म्हणून गौण कशास म्हणावें व मुख्य कशास म्हणावें हें आतां ग्रन्थकार सांगतात. ) ' गौणः ' ह्मणजे 'गुणामुळें आलेला' ( ' तत आगतः ' सू० १४५३ या सूत्रानें 'आगतः' या अर्थामध्यें ' गुण' शब्दास ' अण् ' प्रत्यय होऊन ' गौणः ' असें रूप झालें आहे. ) जसें ' गौर्वा-

हीकः' या स्थलीं ( मुख्यार्थवाचक गोशद्वाचें वाहीकाशीं सामानाधिकरण्य संभवत नाहीं; कारण 'वाहीक' हा पंचनददेशस्थ मनुष्य असून बैल नाहीं. असें असून देखील जेव्हां 'गौर्वाहीकः' असा सामानाधिकरण्यांत प्रयोग केला जातो तेव्हां अशा ठिकाणीं 'गो' शद्ब मुख्यार्थवाचक नसून–ह्मणजे 'गो' शद्वाचा अर्थ गोव्यक्ति नसून–तो शद्ब गौणार्थवाचक आहे व त्याचा अर्थ गुणसादृश्यामुळें होणाऱ्या लक्षणेनें 'गोनिष्ठबुद्धिमान्द्य-सदृशबुद्धिमान्द्यवान्' असा होतो. ह्मणून, ) गोनिष्ठजाड्यादिनिमित्तामुळें–ह्मणजे बैलांत जे बुद्धिमान्द्य इत्यादि गुण आहेत ते गुण वाहीकांत असल्यामुळें–'गौर्वाहीकः' असा सामानाधिकरण्यांत प्रयोग होतो व 'गो' शद्ब वाहीकाचा बोधक होतो. याचप्रमाणें अप्रसिद्ध संज्ञीचा बोध देखील ( प्रसिद्ध संज्ञीचे ठिकाणीं असणाऱ्या ) गुणांचा ( त्या अप्रसिद्धाचे ठिकाणीं ) आरोप केल्यामुळेंच होतो. ( येथें 'संज्ञादिः' या शद्वाचा 'संज्ञा आदि=प्रथमः=बोधकः यस्य सः संज्ञादिः=संज्ञी' असा अर्थ होतो. एखादा मुलगा जन्मल्यावर त्याचें नामकरण करतेवेळीं त्याचें नांव 'विष्णु' असें ठेविलें जातें. तो मुलगा साक्षात् विष्णु नव्हे, व विष्णूचे ठिकाणीं असणारे सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्व, इत्यादि गुण त्या मुलांत नाहींत; तथापि प्रसिद्ध विष्णूचे ठिकाणीं असणाऱ्या त्या गुणांचा या अप्रसिद्ध मुलाचे ठिकाणीं आरोप करून त्याचें नांव विष्णु असें ठेविलें जातें, व त्या नंतर तें नांव उच्चारलें असतां त्या मुलाचा–ह्मणजे अप्रसिद्ध संज्ञीचा–बोध होतो. सारांश संज्ञा–ह्मणजे नांव–ठेवतांना, व तसेंच 'गौर्वाहीकः' इत्यादि सामानाधिकरण्यांत प्रयोग करितांना, अर्थामध्यें गुणामुळेंच गौणत्व येत असतें; ह्मणूनच 'गुणादागतो गौणः' अशी गौणार्थाची ग्रन्थकारानें व्युत्पत्ति सांगितली आहे. 'गौण' या शब्दाचा अर्थ सांगून आतां ग्रन्थकार 'मुख्य' या शब्दाचा अर्थ सांगतात. ) 'मुखमिव मुख्यः' ( ह्मणजे 'सर्वेषु गात्रेषु मुखं प्रधानम्' ह्या ह्मणीप्रमाणें जसें सर्व गात्रांत मुख प्रधान आहे त्याचप्रमाणें सर्व अर्थामध्यें ) मुख्यार्थ प्रधान असल्यामुळें, ( शब्द उच्चारल्याबरोबर ) त्या मुख्यार्थाचा प्रथम बोध होतो. ह्मणून त्याला 'प्रथमः' असें ह्मटलें आहे. ('मुख्यः' या ठिकाणीं मुख शब्दाला 'शाखादिभ्यो यः=' सू० २०५८ या सूत्रानें 'य' प्रत्यय झाला आहे. ) जेव्हां एखाद्या मुख्यार्थवाचक शब्दाचा गौणार्थामध्यें प्रयोग केला जातो तेव्हां मुख्याचे ठिकाणीं असणाऱ्या गुणांचा आरोप करूनच तसा प्रयोग केला जातो. सारांश या परिभाषेंत जो 'गौण' शब्द वापरला आहे त्याचा अर्थ अप्रसिद्धत्व व गौणलाक्षणिकत्व एवढाच समजावा ( अप्रसिद्धत्व व गौणलाक्षणिकत्व या दोहोंत हा फरक आहे कीं, प्रथमस्थलीं अप्रसिद्धाचे–ह्मणजे संज्ञीचे–ठिकाणीं प्रसिद्धाचे गुण नसून देखील त्या गुणांचा त्याचे ठिकाणीं आरोप केला जातो; पण द्वितीय स्थलीं, ज्याचे ठिकाणीं ज्याच्या गुणांचा आरोप केला जातो त्याचे ठिकाणीं तत्सदृश गुण असतात, व गुणसादृश्यामुळें 'गौर्वाहीकः' असा सामानाधिकरण्यानें अभेदारोप केला जातो. )

**तेन प्रियत्रयाणामित्यादौ त्रयादेशो भवत्येव तत्र त्रिशब्दार्थस्येतर-विशेषणत्वेऽप्युक्तरूपगौणत्वाभावात् ।**

( या परिभाषेंतील ' गौण ' शब्दाचा अर्थ अप्रसिद्धत्व व गौणलाक्षणिकत्व एव-ढाच असल्यामुळें या शब्दाच्या अर्थामध्यें इतर प्रकारचें गौणत्व समाविष्ट होत नाहीं म्हणून ) ' प्रियत्रयाणाम् ' इत्यादि स्थलीं त्रयादेश होतोच. ( ' प्रियाः त्रयः यासां ताः प्रियत्रयः, तासां प्रियत्रयाणाम् ' या बहुव्रीहि समासांत ' त्रि ' हा शब्द उपसर्जन असून अन्यपदार्थांचें विशेषण आहे म्हणून एकारीतीनें या 'त्रि' शब्दाचे ठिकाणीं गौणत्व आहे. पण अशा प्रकारचें उपसर्जनरूपी गौणत्व या परिभाषेंतील 'गौण' या शब्दाच्या अर्थामध्यें समाविष्ट नसल्यामुळें 'त्रेस्त्रयः' सू० २६४ हें सूत्र लागून, 'आम्' प्रत्यय पुढें असतां, 'त्रि' शब्दाचे जागीं त्रयादेश होतो. जर या परिभाषेंतील 'गौण' शब्दाच्या अर्थामध्यें उपसर्जनरूपी गौणत्व समाविष्ट असतें तर, 'त्रेस्त्रयः' हें सूत्र लागलें नसतें व त्रयादेश झाला नसता. तसेंच समासांत उपसर्जनीभूत झाल्यानें प्राप्त झालेल्या गौणत्वाचें या परिभाषेनें ग्रहण झालें असतें तर, 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रावर 'संज्ञोपसर्जनप्रतिषेधः' हें वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती.)

**किं चायं न्यायो न प्रातिपदिककार्ये किंतूपात्तं विशिष्यार्थोपस्थापकं विशिष्टरूपं यत्र तादृशपदकार्य एव। परिनिष्ठितस्य पदान्तरसम्बन्धे हि गोर्वाहीक इत्यादौ गौणत्वप्रतीतिर्न तु प्रातिपदिकसंस्कारवेलायामित्यन्तरङ्गत्वाज्ञातसंस्कारबाधायोगः प्रातिपदिककार्ये प्रवृत्त्यभावे बीजम्।**

( 'गौण' व 'मुख्य' ह्या शद्बांचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ स्पष्ट केल्यानंतर, आतां ग्रन्थकार परिभाषेंतील ' कार्य ' ह्या शब्दाचा अर्थ सांगतात. त्यांच्या मताप्रमाणें ' कार्य ' ह्या शद्बाचा प्रातिपदिककार्य असा अर्थ नसून पदकार्य हा अर्थ आहे. प्राति-पदिकास स्त्रीप्रत्यय किंवा विभक्तिप्रत्यय लावतेवेळीं जें पाणिनीयसूत्रान्वयें कार्य होतें त्याला प्रातिपदिककार्य असें ह्मणतात; व प्रातिपदिकास विभक्तिप्रत्यय लावल्यावर जेव्हां त्याचें भाषेंत प्रयोग करण्यालायक परिनिष्ठित रूप—ह्मणजे पद—होतें तेव्हां तशा पदाचा पदान्तरांशीं सम्बन्ध झाला असतां किंवा त्या पदाहून प्रत्यय झाला असतां, त्या पदाला पाणिनीयसूत्रान्वयें जें कार्य होतें त्याला पदकार्य ह्मणतात. जसें — ' गो ' ह्या प्रातिपदिकास ' सु ' हा विभक्तिप्रत्यय लावला असतां ' गोतो णित् ' सू० २८४ ह्या सूत्रान्वयें जें णिद्वत् वृद्धिरूपकार्य होतें तें प्रातिपदिककार्य होय; पण ' अग्निः ' व ' सोमः ' ह्या दोन प्रसिद्ध देवतावाचक पदांचा द्वन्द्वसमास करते-वेळीं ' ईदग्नेः सोमवरुणयोः ' व ' अग्नेः स्तुत्स्तोमसोमाः ' सू० ९२३ व ९२४ ह्यां सूत्रांन्वयें जें ईत्व व षत्व कार्य होतें तें पदकार्य होय ). दुसरें असें कीं, प्रातिपदिकाला सूत्रांत सांगितलेलें कार्य करतेवेळीं ही परिभाषा लागत नाहीं. ( प्रातिपदिकाला कार्य करतेवेळीं जर ही परिभाषा लागली असती तर ' गौर्वाहीकः ' ह्या स्थलीं ' गो ' शद्बाचा मुख्यार्थामध्यें प्रयोग केला नसून गौणार्थामध्यें प्रयोग केला असल्यामुळें, ' गोतो णित् ' सू० २८४ ह्या सूत्रान्वयें सर्वनामस्थानांत णिद्वत्कार्य झालें

नसतें व 'गौः' असें रूप न होतां, 'गो+सु=गोः' असें रूप झालें असतें ). परंतु जेथें विशेष अर्थाचा बोध करणारें वर्णानुपूर्वीविशिष्ट शब्दस्वरूप सूत्रांत उच्चारलें आहे तशा शब्दस्वरूपास पदकार्य करतेवेळींच ही परिभाषा लागू पडते. प्रातिपदिकास कार्य करतेवेळीं ही परिभाषा लागू पडत नाहीं ह्याचें कारण हें आहे कीं (केवळ प्रकृति किंवा केवळ प्रत्यय ह्यांचा भाषेंत कधींच प्रयोग केला जात नसून पदसमूहरूप वाक्याचाच प्रयोग केला जात असतो, म्हणून ) भाषेंत प्रयोग करण्यालायक प्रातिपदिकाहून परिनिष्ठित रूप—म्हणजे पद–तयार झाल्यावर त्याचा जेव्हां इतर पदांशीं सम्बन्ध–म्हणजे अन्वय—होतो तेव्हांच त्या पदाचा गौणार्थामध्यें प्रयोग केला आहे हें ध्यानांत येतें; जसें 'गौर्वाहीकः' इत्यादि स्थलीं. ( 'गो' ह्या शब्दास विभक्तिप्रत्यय लावून त्याचा 'वाहीकः' ह्या पदान्तराशीं अन्वय केल्याशिवाय 'गो' शब्द हा गौणार्थामध्यें उपयोगांत आणला आहे हें कळूं शकत नाहीं ). म्हणून प्रातिपदिकास संस्कार करतेवेळीं—म्हणजे विभक्तिप्रत्यय लावून त्याचें पद करतेवेळीं—त्या प्रातिपदिकाला जीं कार्यें होतात तीं अन्तरङ्ग असल्यामुळें, तीं प्रथम झाल्यावर त्यांचा बाध होऊं शकत नाहीं. ('गो' ह्या प्रातिपदिकास विभक्तिप्रत्यय लावतेवेळीं लगेच पुढें असणाऱ्या विभक्तिप्रत्ययनिमित्तामुळें जें कार्य होतें तें अन्तरङ्ग कार्य आहे, व त्या प्रातिपदिकाला विभक्तिप्रत्यय लागून पद तयार झाल्यावर त्या पदाचा—म्हणजे 'गौः' ह्या पदाचा—'वाहीकः' ह्या पदान्तराशीं सम्बन्ध झाल्यानंतर उत्पन्न होणारें गौणत्व हें, त्या कार्याच्या अपेक्षेनें, बहिरङ्ग आहे. म्हणून अन्तरङ्ग कार्य प्रथम झाल्यावर व पुढें पदान्तराशीं अन्वय झाल्यावर जेव्हां बहिरङ्ग गौणत्व उत्पन्न होतें तेव्हांच ही परिभाषा लागू पडते, व ही परिभाषा पूर्वीं होऊन गेलेल्या अन्तरङ्ग कार्याचा नाश करूं शकत नाहीं. त्यामुळें 'गौर्वाहीकः' असाच पदप्रयोग होतो व 'गोर्वाहीकः' असा पदप्रयोग होत नाहीं ).

**श्वशुरसदृशस्यापत्यमित्यर्थके श्वाशुरिरित्यादावत इञः सिद्धये उपात्तमित्यादि । न च प्रातिपदिकपदं तादृशमिति वाच्यम् । तेन हि प्रातिपदिकपदत्वेनोपस्थितिरिति तस्य विशिष्यार्थोपस्थापकत्वाभावात् ।**

( 'श्वशुर' ह्या शब्दाचा मुख्य अर्थ 'सासरा' हा आहे, व त्याचा गौणार्थ, साक्षात् सासरा नसून नावनात्यानें किंवा इतर कांहीं कारणामुळें 'मानलेला सासरा' हा आहे. ) गौणार्थवाचक 'श्वशुर' शब्दास 'अत इञ्' सू० १०९५ हें सूत्र लावता यावें व त्याला अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय लागून 'श्वशुरसदृशस्यापत्यम् श्वाशुरिः' असें रूप व्हावें म्हणून वरील पङ्क्तींत 'उपात्तं विशिष्यार्थोपस्थापकं विशिष्टरूपं यत्र' हीं पदें घातलीं आहेत. ('राजश्वशुराद्यत्' सू० ११५३ ह्या सूत्रांत वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेष अर्थाचें—म्हणजे 'सासरा' ह्या अर्थाचें—वाचक 'श्वशुर' हें जें शब्दस्वरूप त्याचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या शब्दस्वरूपास पदकार्य करतेवेळीं ही परिभाषा लागू पडते; व मुख्यार्थवाचक 'श्वशुर' शब्दाहून अपत्यार्थक प्रत्यय करणें झाल्यास त्या सूत्रान्वयें 'यत्'

हाच प्रत्यय होतो; गौणार्थवाचक 'श्वशुर' शब्दाहून तो प्रत्यय, ह्या परिभाषेप्रमाणें, होऊं शकत नाहीं. तशा ठिकाणीं 'अत इञ्' ह्या सूत्रान्वयें ' इञ् ' प्रत्यय होऊन 'श्वाशुरि :' असें रूप सिद्ध होतें. ' अत इञ् ' ह्या सूत्रांत वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेष अर्थाचें वाचक अशा शब्दस्वरूपाचें ग्रहण केलें नसल्यामुळें, गौणार्थवाचक अदन्त शब्दाहून देखील अपत्यार्थकप्रत्यय ' इञ् ' करतेवेळीं हें सूत्र लागतें व ही परिभाषा तें सूत्र लागण्याच्या आड येत नाहीं. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, सुबन्ताहून तद्धितप्रत्ययोत्पत्ति होत असते–म्हणजे ' श्वशुरस्य=श्वशुर+ङस् ' ह्या पदाहून ' यत् ' किंवा ' इञ् ' हा अपत्यार्थकतद्धितप्रत्यय होतो, व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' सू० ६५० ह्या सूत्रान्वयें ' ङस् ' प्रत्ययाचा लुक् होऊन ' श्वशुर्यः ' व 'श्वाशुरिः ' हीं रूपें मुख्यार्थांत व गौणार्थांत अनुक्रमें सिद्ध होतात, व हीं रूपें करतेवेळीं होणारें कार्य पदकार्य होय; म्हणून अशा ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू पडते. आतां येथें शंकाकार अशी शंका करितो कीं, गौणार्थवाचक ' श्वशुर ' शब्दाहून अपत्यार्थक प्रत्यय करणें झाल्यास, 'अत इञ्' हें सूत्र देखील लावता येत नाहीं; कारण त्या सूत्रांत 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रांतील प्रातिपदिकात्' हें पद अनुवृत्त आहे, व तें पद वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेष अर्थाचें–म्हणजे प्रातिपदिक ह्या अर्थाचें–वाचक आहे. ह्या शङ्केवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ही शङ्का बरोबर नाहीं; कारण ' अत इञ् ' ह्या सूत्रांत अनुवृत्त असलेलें ) 'प्रातिपदिक' हें पद तशा प्रकारचें- म्हणजे वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेषार्थाचें वाचक–नाहीं; कारण तें पद उच्चारलें असतां विशिष्टार्थवाचक प्रातिपदिकाचा बोध होत नसून, ज्यांत प्रातिपदिकत्वरूपी सामान्यधर्म आहे अशा कोणत्याहि शब्दस्वरूपाचें त्या पदानें ग्रहण करिता येतें. ('अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू० १७८ ही 'प्रातिपदिक' शब्दाची व्याख्या आहे व ह्या व्याख्येवरून हें स्पष्ट होतें कीं, ' प्रातिपदिक ' ही संज्ञा विशेषवर्णानुपूर्वीयुक्त व विशिष्टार्थवाचक शब्दाला लागणारी नसून प्रत्यय, प्रत्ययान्त, व धातु खेरीज करून कोणत्याहि अर्थवान् शब्दास लागू पडणारी आहे, मग त्या शब्दाची वर्णानुपूर्वी कोणतीहि असो व त्याचा अर्थ कोणताहि असो. म्हणून ' अत इञ् ' या सूत्रांत वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेषार्थवाचक अशा शब्दाचें ग्रहण केलें नसल्यामुळें किंवा अशा शब्दाची अनुवृत्ति नसल्यामुळें, गौणार्थवाचक सुबन्ताहून अपत्यार्थक प्रत्यय करतेवेळीं तें सूत्र लावण्यांत कांहीं अडचण येत नाहीं व तें सूत्र लावण्याच्या आड ही परिभाषा येत नाहीं.)

**निपातपदं तु चादित्वेनैव चादीनामुपस्थापकमिति तदुद्देश्यककार्यविधायके ओदित्यादावतत्प्रवृत्त्या गोभवदित्यादौ दोषो न ।**

( आतां शङ्काकार अशी शङ्का करितो कीं, जसा ' प्रातिपदिक ' हा शब्द वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेषार्थवाचक शब्दास लागणारा नसून ज्या शब्दांत प्रातिपदिकत्वरूपी सामान्यधर्म आहे अशा सर्व शब्दांस लागू पडणारा सामान्यशब्द आहे,

तसाच ' निपात ' हा शब्द देखील आहे. ' प्राग्रीश्वरान्निपाताः ' सू० १९ हें निपात-संज्ञाविधायक सूत्र आहे. ह्या सूत्रांत देखील वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेषार्थवाचक शब्दाचें ग्रहण केलें नाहीं. म्हणून गौणार्थकवाचक निपाताला पदकार्य करतेवेळीं ही परिभाषा लागू नये. ह्या शङ्केवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं जसें ' प्रातिपदिक ' हें सामान्यधर्मवाचक पद आहे तसें ' निपात ' हें पद नाहीं; कारण ) ' निपात ' ह्या पदानें ('चादयोऽसत्वे' सू० २० ह्या सूत्रांत सांगितलेल्या) 'चादि' गणांत साक्षात् पठित जे ' च ' इत्यादि ( वर्णानुपूर्वीविशिष्ट व विशेषार्थवाचक ) शब्द आहेत यांचेंच ग्रहण होतें. म्हणून निपातांना उद्देशून कार्य सांगणाऱ्या ' ओत् ' सू० १०४ इत्यादि सूत्रांना ही परिभाषा लागते, व त्यामुळें ' गोभवत् ' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं दोष येत नाहीं. ( ' अगौः गौः अभवत्=गोऽभवत् '—म्हणजे वास्तवित बैल नसून बैलासारखा झाला— ह्या उदाहरणांत ' गो ' शब्द मुख्यार्थवाचक नसून ' गोगतधर्मसदृशधर्मवान् ' अशा गौणार्थाचा वाचक आहे. ' गो ' शब्दाहून ' कृभ्वस्तियोगे ' सू० ११७ ह्या सूत्रान्वयें अभूततद्भावार्थामध्यें ' च्वि=व् ' प्रत्यय होऊन व ' वेरपृक्तस्य ' सू० ३७५ ह्या सूत्रानें त्या प्रत्ययाचा लोप होऊन 'गोऽभवत्' असें रूप झालें आहे. येथें जरी ' च्वि ' प्रत्ययाचा लोप झाला आहे तरी ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू० २६२ ह्या सूत्रान्वयें ' गो ' शब्द च्विप्रत्ययान्त मानता येत असल्यामुळें ' ऊर्यादिच्विडाचश्च ' सू० ७६२ ह्या सूत्रानें त्याला निपातसंज्ञा प्राप्त झाली आहे, व तो ओदन्त निपात असल्यामुळें, ' ओत् ' सू० १०४ ह्या सूत्रान्वयें याला प्रगृह्य संज्ञा प्राप्त झाली आहे, व ' प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ' सू० ९० ह्या सूत्रान्वयें येथें संधि न होतां, प्रकृतिभाव कायम राहून ' गो अभवत् ' असें रूप व्हावें व ' गोभवत् ' असें रूप होऊं नये. परंतु ' गो ' हा च्व्यन्त शब्द गौणार्थवाचक असल्यामुळें, निपातास उद्देशून कार्य सांगणारें ' ओत् ' हें सूत्र, ह्या परिभाषेप्रमाणें, त्याला लागू पडत नाहीं, व त्यामुळें त्याला प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होत नसल्यामुळें, ' प्लुत-प्रगृह्या अचि नित्यम् ' हें सूत्र प्रवृत्त न होतां ' एङः पदान्तादति ' सू० ८६ ह्या सूत्रान्वयें पूर्वरूप एकादेश होऊन ' गोभवत् ' असें रूप सिद्ध होतें. )

**अग्नीषोमौ माणवकावित्यत्र प्रसिद्धदेवताद्वन्द्ववाच्यग्नीषोमपदस्य तत्सदृशपरत्वेऽन्तरङ्गत्वादीत्वषत्वे भवत एव। सदृशलाक्षणिकाग्निसोम-पदयोर्द्वन्द्वे तन्नामकावित्यर्थके च नेत्वषत्वे, आद्ये गौणलाक्षणिकत्वादन्त्येऽप्रसिद्धत्वात्। अत एवाग्निसोमौ माणवकावित्यत्र गौणमुख्यन्यायेन षत्ववारणपर ' मग्नेः स्तुत्स्तोमसोमा ' इति सूत्रस्थं भाष्यं सङ्गच्छते।**

' अग्नीषोमौ माणवकौ '— म्हणजे गुणसादृश्यामुळें प्रसिद्ध अग्नि व सोम ह्या देवतांसारखे दोन पुरुष— ह्या उदाहरणांत ( ' अग्निः ' व ' सोमः ' ह्या दोन देवता-वाचक पदांचा देवताद्वन्द्व करतेवेळीं ' ईदग्नेः सोमवरुणयोः ' सू० ९२३ या सूत्रानें

'ईत्व' व 'अग्नेः स्तुत्स्तोमसोमाः' सू० ९२४ ह्या सूत्रानें 'षत्व' करून सामासिक-पद तयार झाल्यावर तशा रीतीनें सिद्ध झालेल्या ) प्रसिद्धदेवताद्वन्द्ववाचक 'अग्नी-षोमौ' ह्या पदाचा, गुणसादृश्यामुळें अग्निसोमसदृश अशा दोन पुरुषांचें ठिकाणीं आरोप केल्यास, ( द्वन्द्वसमास करतेवेळीं गौणत्वाची प्रतीति नसल्यामुळें वरील दोन सूत्रान्वयें होऊन गेलेलें ) ईत्व व षत्व कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, ( नंतर उत्पन्न झालेल्या गौणत्वप्रतीतिरूप बहिरङ्गत्वानें त्याचा बाध न होतां ) तें कार्य जसेंचें तसेंच कायम राहतें ( परंतु जेथें 'अग्निः' व 'सोमः' ह्या दोन प्रसिद्ध देवतावाचक पदांचा द्वन्द्वसमास करण्यापूर्वींच गौणत्वाचा बोध झाला आहे व ) 'अग्नि' व 'सोम' ह्यांच्यासारख्या गुणांनीं युक्त अशा दोन पुरुषांचे ठिकाणीं सादृश्यमूलकलक्षणेनें त्या दोन देवतांचा आरोप केला जातो, किंवा जेथें एका पुरुषाचें व्यावहारिक नांव अग्नि व दुस-ऱ्याचें सोम असल्यामुळें द्वन्द्वसमास केला जातो, तशा ठिकाणीं (द्वन्द्वसमास करण्यापूर्वींच गौणत्वाचा बोध झाला असल्यामुळें ) ईत्व व षत्व होत नाहीं. ( व 'अग्निसोमौ' असें सामासिक रूप होतें. ह्या दोन उदाहरणांपैकीं ) पहिल्या उदाहरणांत सादृश्यमूलक गौणीलक्षणा आहे व दुसऱ्या उदाहरणांत अप्रसिद्धांचे ठिकाणीं प्रसिद्धांच्या गुणांचा आरोप केला आहे. असें आहे म्हणूनच, 'अग्निसोमौ माणवकौ' ह्या ठिकाणीं ( ह्या परिभाषेंत सांगितलेला ) गौणमुख्यन्याय लावून षत्वाचा बाध करणारें 'अग्नेः स्तुत्स्तो-मसोमाः' सू० ८–३ ८२ ह्या सूत्रांवरील भाष्य बरोबर जुळतें (ह्या पङ्क्तींत सांगित-लेल्या तीन उदाहरणांवरून हें स्पष्ट होतें कीं, जेव्हां गौणत्वाचा बोध होतो तेव्हांच ही परिभाषा लागू पडते व सूत्रनिर्दिष्टकार्य मुख्यालाच होतें, व गौणाला होत नाहीं. पण जेथें गौणत्वाचा बोध होण्यापूर्वींच सूत्रनिर्दिष्ट कार्य होऊन गेलें आहे तशा ठिकाणीं, पूर्वीं होऊन गेलेलें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें व नंतर उत्पन्न होणारें गौणत्व बहिरङ्ग असल्यामुळें, त्या अन्तरङ्ग कार्याचा बाध ही परिभाषा करूं शकत नाहीं व तें अन्तरङ्ग कार्य जसेंचें तसेंच कायम राहतें. म्हणूनच 'अग्निः' व 'सोमः' ह्या दोन देवतावाचक पदांचा देवताद्वन्द्व करतेवेळीं जर गौणत्वाचा बोध नसेल तर ईत्व व षत्व कार्य होऊन 'अग्नीषोमौ' असें रूप सिद्ध होतें, व असें रूप सिद्ध झाल्यानंतर त्या देवताद्वन्द्वाचा सादृश्यमूलकलक्षणेनें दोन पुरुषांचे ठिकाणीं आरोप करणें झाल्यास गौणत्वबोध होण्यापूर्वीं झालेलें ईत्वषत्व कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें नष्ट न होतां जसेंचें तसेंच कायम राहतें. पण जेथें 'अग्निः' व 'सोमः' ह्या दोन पदांचा द्वन्द्वस-मास करण्यापूर्वींच गौणत्वाचा बोध झाला असतो तेथें ही परिभाषा प्रवृत्त होऊन मुख्याचें ठिकाणीं होणारें ईत्वषत्व कार्य गौणाचे ठिकाणीं होऊं देत नाहीं; व त्यामुळें 'अग्निसोमौ' असें सामासिक रूप होतें. )

गां पाठयेत्यादौ मुख्यगोपदार्थस्य पाठनकर्मत्वासम्भवेन विभक्त्युत्प-त्तिवेलायां प्रयोक्तृभिर्गौणार्थत्वस्य प्रतीतावप्यपदस्याप्रयोगेण, बोद्धृभिः

सर्वत्र पदस्यैव गौणार्थकत्वस्य ग्रहेणाऽत्वं त्वं सम्पद्यते अमहान् महान् भूतस्त्वद्भवतीत्यादिभाष्यप्रयोगें त्वाद्यादेशदीर्घादीनां करणेन चास्य न्यायस्य पदकार्यविषयत्वमेवोचितम्। अन्यथा वाक्यसंस्कारपक्षे तेषु तदनापत्तिः ॥

( एखादा गृहस्थ आपल्या मुलास आचार्याजवळ नेऊन आचार्यास विनंति करितो कीं, ह्या माझ्या बैलासारख्या जडबुद्धीच्या मुलास आपण शिकवावें, तेव्हां तो ' गो ' ह्या गौणार्थवाचक शब्दाचें ' गाम् ' असेंच द्वितियेचें रूप करून ' गां पाठय ' असा पदप्रयोग करितो. अशा ठिकाणीं ) ' गां पाठय ' इत्यादि पदप्रयोग करितेवेळीं पदप्रयोग करणाऱ्या पुरुषास ' गो ' ह्या प्रातिपदिकास द्वितीया विभक्तीचा प्रत्यय लावून ' गाम् ' असें रूप करतेवेळीं जरी हें माहीत आहे कीं, ' गो ' शब्दाचा मुख्यार्थ जो ' बैल ' त्याला पढविणें असंभवनीय असल्यामुळें, ' गो ' शब्दाचा प्रयोग मी गौणार्थांत करीत आहे. तरी भाषेंत ( ' सुप्तिङन्तं पदम् ' ह्या सूत्रान्वयें ज्याला पदसंज्ञा प्राप्त झाली नाहीं अशा ) अपदाचा प्रयोग केला जात नसल्यामुळें ( आणि ' अपदं न प्रयुञ्जीत ' असा भाष्यसिद्धान्त देखील असल्यामुळें, भाषण करतेवेळीं—म्हणजे वाक्य उच्चारतेवेळीं—पदांचाच प्रयोग होत असल्यामुळें, व पदसमूहरूप वाक्य-प्रयोग केल्याशिवाय श्रोत्याला गौणार्थबोध होऊं शकत नसल्यामुळें, आणि जोपर्यंत श्रोत्याला गौणार्थबोध होत नाहीं तोपर्यंत ह्या परिभाषेची प्रवृत्ति होऊं शकत नसल्या-मुळें, ) जेव्हां वक्त्याकडून पदप्रयोग केला जातो तेव्हांच श्रोत्याला गौणार्थबोध होतो, असें असल्यामुळें आणि भाष्यकारांनीं भाष्यांत ' अत्वं त्वं सम्पद्यते, ' ' अमहान् महान् भूतः ' ' त्वद्भवति ' असे प्रयोग करतेवेळीं त्वादेश व दीर्घ आकारादेश इत्यादि केले असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, पदकार्य करतेवेळींच ही परिभाषा लावणें योग्य आहे ( प्रातिपदिक कार्य करतेवेळीं ही परिभाषा उपयोगांत आणू नये. ' अत्वं त्वं सम्पद्यते ' 'अमहान् महान् भूतः' ह्या दोन्हीं वाक्यांत ' त्वम् ' व 'महान्' हे शब्द गौणार्थवाचक आहेत. ' अत्वं त्वं सम्पद्यते '—म्हणजे तो, तूं नसून, तूं होतो—येथें ' तो ' हा ' तूं ' नसल्यामुळें, ' तूं ' होऊ शकत नाहीं. म्हणून ' त्वम् ' हा शब्द येथें ' त्वत्सदृश ' ह्या गौणार्थाचा वाचक आहे. असें असल्यामुळें, ही परिभाषा प्रातिपादिक कार्य करतेवेळीं लागते असें मानल्यास, मुख्यार्थवाचक 'युष्मद्' शब्दाला पाणिनीय सूत्रान्वयें जें कार्य सांगितलें आहे तें कार्य ह्या गौणार्थवाचक ' युष्मद् ' शब्दाला होऊं नये—म्हणजे ' त्वा हौ सौ ' व ' ङ प्रथमयोरम् ' सू० ३८४ व ३८२ हीं सूत्रें लागूं नयें व ' युष्मद् ' शब्दाच्या प्रथमेच्या एकवचनाचें ' त्वम् ' असें रूप होऊ नयें. पण भाष्य-कारांनीं तर ' अत्वं त्वं सम्पद्यत ' असा वाक्यप्रयोग करितांना त्वादेश करून ' त्वम् ' असा पदप्रयोग केला आहे तसेंच ' अमहान् महान् भूतः '—म्हणजे मोठा नसून मोठा झालेला—ह्या वाक्यांत ' महान् ' हा शब्द गौणार्थवाचक आहे. त्याचा अर्थ

' मोठा ' असा नसून ' महत्सदृश ' असा आहे. असें असल्यामुळें, ही परिभाषा प्रातिपदिककार्य करितांना लागतें असें मानल्यास. ' सान्तमहतः संयोगस्य ' सू० ३१७ हें सूत्र गौणार्थवाचक ' महत् ' शब्दाला लागू नये व ' महत् ' शब्दाच्या उपधेतील अकाराचा दीर्घ—म्हणजे ' आ '—होऊं नये; तरी पण भाष्यांत ' अमहान् महान् भूतः ' असा वाक्यप्रयोग केला आहे. तसेंच ' त्वद्भवति ' —म्हणजे जो तूं नाहीं तो तू होतो—या भाष्यांतील तिसऱ्या उदहरणांत ' युष्मद्+सु+च्वि+भवति ' येथें ' युष्मद् ' हें गौणार्थवाचक—म्हणजे ' त्वत्सदृश ' या अर्थाचें वाचक—प्रातिपदिक असून देखील ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' सू० १३७३ या सूत्रान्वयें ' युष्मद् ' च्या मपर्यंत जागीं त्वादेश करून भाष्यकारांनीं ' त्वद्भवति ' असा प्रयोग केला आहे वर दिलेल्या भाष्यांतील तीन्हीं उदाहरणांवरून हें स्पष्ट होतें कीं, प्रातिपदिकाला कार्य करतेवेळीं ही परिभाषा—म्हणजे गौणमुख्यन्याय—लागू पडत नाहीं). तसें न मानल्यास —म्हणजे प्रातिपदिकास कार्य करतवेळीं देखील ही परिभाषा लागू पडतें असें मानल्यास —वाक्यसंस्कारपक्षांत (' गां पाठय ' ' अत्वं त्वं संपद्यते, ' ' अमहान् महान् भूतः ') या ठिकाणीं आकारादेश, त्वादेश व उपधादीर्घ न होण्याची आपत्ति येईल. ( व्याकरणशास्त्रांत पदसंस्कारपक्ष व वाक्यसंस्कारपक्ष असे दोन पक्ष मानले आहेत. ' पदपर्यन्तं प्रकृतिप्रत्ययान् संस्थाप्य ततः संस्कारः पदसंस्कारः' ही पदसंस्कारपक्षाची व्याख्या आहे. व 'वाक्यपर्यन्तं प्रकृतिप्रत्ययान् संस्थाप्य ततः संस्कारः वाक्यसंस्कारः' अशी थोडक्यांत वाक्यसंस्कारपक्षाची व्याख्या आहे; व याचा अर्थ असा आहे कीं पदांतील प्रकृति व प्रत्ययांची मांडणी करून त्यांचे ठिकाणीं पद तयार होईपर्यंत व्याकरणसूत्रान्वयें संस्कार करणें याला पदसंस्कारपक्ष ह्मणतात, व तसेंच वाक्यांतील सर्व शब्दांच्या प्रकृतिप्रत्ययांची मांडणी करून संपूर्ण वाक्य तयार होईपर्यंत व्याकरणसूत्रान्वयें त्यांचे ठिकाणीं संस्कार करणें याला वाक्यसंस्कारपक्ष ह्मणतात. वाक्यसंस्कारपक्षांत पदांचा परस्पराशीं अन्वय होतेवेळीं, एखादा शब्द गौणार्थांत वापरला असल्यास त्याच्या गौणार्थाची लगेच प्रतीति होते व त्यामुळें तो शब्द मुख्यार्थांत वापरला असतां त्याला जीं सूत्रें लागू पडतात तीं सूत्रें तो गौणार्थांत वापरला असल्यामुळें त्याला लागू पडत नाहींत व त्यामुळें इष्टरूपसिद्धि होण्यांत अडचण येत नाहीं. जसें 'गांपाठय=गो+अम्+पठ्+णिच्+शप्+हि' या स्थलीं गो+अम्; याचा 'पठ्+णिच् +शप्+हि ' याशीं अन्वय करतेवेळीं , बैलाला पढविणें असंभवनीय असल्यामुळे, 'गो' हा शब्द गौणार्थामध्ये वापरला आहे असा एकदम बोध होतो व त्यामुळें ' गो ' हा शब्द मुख्यार्थांत वापरला असतां त्याला जीं सूत्रें लागू पडतात तीं या ठिकाणीं लावतां येणार नाहींत व ' गाम् ' असें इष्ट रूप सिद्ध न होतां विकृत रूप सिद्ध होईल. )

**किञ्च ' शुक्लामित्युक्ते कर्म निर्दिष्टं कर्ता क्रिया चानिर्दिष्टे ' इत्याशुक्त्वे ' हेदानीं गामभ्याज कृष्णां देवदत्तेत्यादौ सर्वं निर्दिष्टं, गामेव कर्म, देवदत्त एव कर्त्ता, अभ्याजैव क्रिये,' त्यर्थकेनार्थवत्सूत्रस्थभाष्येण कारका-**

द्विमात्रप्रयोगे योग्यसर्वक्रियाध्याहारे प्रसक्ते नियमार्थः क्रियावाचकादि-प्रयोग इत्येतत्तात्पर्यकेण, सामान्यतः क्रियाजन्यफलाश्रयत्वमात्रविवक्षायां द्वितीयादीनां साधुत्वान्वाख्यानमित्यर्थलाभेन, पाठनक्रियान्वयकाले पदस्यैव गौणार्थत्वप्रतीतिः प्रयोक्तुरापि ।

( मागें असें ह्मटलें आहे कीं, जरी 'गां पाठय' ह्या वाक्याचा प्रयोग करणाऱ्यास 'गो' ह्या प्रातिपदिकास द्वितीयाविभक्तीचा प्रत्यय लावतेवेळीं हें माहित असतें कीं, 'गो' शब्दाचा प्रयोग तो गौणार्थांत करीत आहे तरी, श्रोत्याला पदसमूहरूपी वाक्य उच्चारल्यानंतरच वाक्यांत गौणार्थवाचक 'गो' शब्दाचा प्रयोग केला आहे हें कळूं शकतें. आतां ग्रंथकार असें सिद्ध करूं इच्छितात कीं, जसा श्रोत्याला वाक्य उच्चारल्यानंतरच 'गो' शब्द गौणार्थांत वापरला आहे असें ज्ञान होतें, तसेंच प्रयोग करणाऱ्यास देखील तें ज्ञान वाक्य उच्चारल्यानंतरच होतें, पूर्वी होत नाहीं.) दुसरें असें कीं, 'गां पाठय' असा पदप्रयोग करणाऱ्यास देखील ( 'गो' ह्या प्रातिपदिकास द्वितीयाविभक्तीचा प्रत्यय लावून 'गाम्' असें पद तयार केल्यानंतर तें ) 'गाम्' हें पद 'पाठय' या क्रियापदाशीं अन्वित करतेवेळींच गौणार्थांत मी 'गो' शब्दाचा प्रयोग करीत आहे असें ज्ञान होतें. ( त्यापूर्वी त्याला असें ज्ञान होत नाहीं ) कारण 'अर्थवदधातुः-१-२-४५ ह्या सूत्रावरील भाष्यांत, 'शुक्लाम्' एवढेंच पद जेव्हां कोणी उच्चारतो तेव्हां तो केवळ कर्माचा निर्देश करतो, कर्ता व क्रिया यांचा निर्देश करीत नाहीं—असें ह्मणून भाष्यकार पुढें असें ह्मणतात कीं, 'गामभ्याज कृष्णां देवदत्त' ( हे देवदत्त, काळी गाय घेऊन ये) असा वाक्यप्रयोग कोणी केल्यास आतां आपणास ( कर्ता, कर्म व क्रियापद ह्या ) सर्वांचा निर्देश केला आहे—म्हणजे 'गाम्' हेंच कर्म, 'देवदत्त' हाच कर्ता, व 'अभ्याज' हेंच क्रियापद—असें कळतें. ह्या भाष्याचें तात्पर्य असें आहे कीं, केवळ कारकाचा प्रयोग केल्यास ( ह्मणजे प्रातिपदिकाला विभक्तिप्रत्यय लावून जें कारकरूपी पद सिद्ध होतें तेवढ्याचाच उच्चार केल्यास—ह्मणजे फक्त कर्ता किंवा कर्मच उच्चारल्यास ), अशा ठिकाणीं अनेक योग्य ( ह्मणजे आकांक्षा पूर्ण करण्यास समर्थ अशा ) क्रियापदांचा अध्याहार करणें संभवत असल्यामुळें, क्रियावाचक पदाचा प्रयोग करण्याचें हेंच प्रयोजन आहे कीं, त्या कारकाचा तेवढ्याच क्रियेशीं अन्वय व्हावा. ह्यावरून असा अर्थ निघतो कीं, क्रियेपासून उत्पन्न होणाऱ्या फलाचे आश्रय ( ह्मणजे कर्म ) एवढेंच सांगण्याची इच्छा असल्यास, तें कर्मपद उच्चारतांना, द्वितीयादि विभक्तींचा प्रयोग करूनच तें पद उच्चारणें योग्य आहे. ( ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, क्रियेशीं कर्मकारक अन्वित होण्यापूर्वीच त्याचें कर्म विभक्तीचें रूप तयार होतें. सारांश, प्रयोग करणाऱ्यास मी कर्माचा प्रयोग गौणार्थांत करतो आहे हें कळण्यापूर्वीच कर्मविभक्तीचें रूप तयार होत असल्यामुळें, प्रातिपदिकास उद्देशून कोणतेंहि सूत्रांत सांगितलेलें कार्य करितांना ही परिभाषा लागूं पडत नाहीं हें मानणें योग्य आहे. )

एवमेतन्मूलको "ऽभिव्यक्तपदार्था ये" इति श्लोकोऽपि पदकार्यविषयकः। ध्वनितं चेदं 'सर्वादीनीतिसूत्रे संज्ञाभूतानां प्रतिषेधमारभता वार्त्तिककृता, 'पूर्वपरे'ति सूत्रेऽसंज्ञायामिति वदता सूत्रकृता,' ऽन्वर्थसंज्ञया तत्प्रत्याख्यानं कुर्वता भाष्यकृता च ॥

( ज्याप्रमाणें ही परिभाषा पदकार्य करितांनाच लागू पडते व प्रातिपदिककार्य करितांना लागू पडत नाहीं) त्याचप्रमाणें "अभिव्यक्तपदार्था ये प्रसिद्धा लोकविश्रुताः। शास्त्रार्थस्तेषु कर्तव्यः शब्देषु न तदुक्तिषु ॥" ( ह्मणजे 'सूत्रांत शब्दाला उद्देशून कोणतेंहि कार्य सांगितलें असल्यास, त्या शब्दाचा प्रयोग लोकांत ज्ञात व प्रसिद्ध असलेल्या मुख्यार्थांत केला असेल व गौणार्थांत केला नसेल तेंव्हांच त्याला तें कार्य करावें') हा, ह्या परिभाषेच्या आधारावर रचलेला, श्लोक देखील पदकार्य करितांनाच लागू पडतो. गौणमुख्यन्याय पदकार्य करितांनाच लागतो हा नियम, वार्तिककारांनीं देखील, 'संज्ञोपसर्जनीभूतास्तु न सर्वादयः,' सू० २२२ वरील वार्तिक,—म्हणजे 'सर्वादि' शब्द संज्ञावाचक म्हणजे कोणाचें नांव असल्यास, किंवा उपसर्जनीभूत म्हणजे इतरांचे विषेषण होऊन आपल्या अर्थाचा बोध करणारें असल्यास, त्यांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं. असें प्रतिषेधात्मक वार्तिक करून, ध्वनित केला आहे; तसेंच सूत्रकार पाणिनीनें 'पूर्वपरावर' सू० २१८ ह्या सूत्रांत 'असंज्ञायाम्' हा शब्द वापरून हाच नियम सुचविला आहे. आणि तसेंच सर्वनामसंज्ञा अन्वर्थक आहे असें सांगून वरील वार्तिकाचें व 'पूर्वपरावर'—ह्या सूत्रांतील 'असंज्ञायाम्' ह्या पदाचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केल्यानें हाच नियम ध्वनित केला आहे. ( प्रातिपदिक कार्य करितांना ही परिभाषा लागत नाहीं व पदकार्य करितांनाच लागते हा नियम पाणिनीला व वार्तिककाराला मान्य असल्यामुळेंच पाणिनीला 'पूर्वपरावर-ह्या सूत्रांत 'असंज्ञायाम्' हें पद घालावें लागलें, व वार्तिककाराला वर सांगितलेलें वार्तिक करावें लागलें. असें जर त्यांनीं केलें नसतें तर संज्ञा अथवा उपसर्जन असतांना देखील 'सर्वादि' गणांत पठित असलेल्या प्रातिपदिकांना सर्वनामकार्य झालें असतें. तें इष्ट नव्हतें म्हणूनच ह्या परिभाषेचा अपवाद करणारीं वचनें त्यानां द्यावी लागलीं. भाष्यकारांनीं ह्या वचनांचें प्रत्याख्यान करितांना, 'सर्वनाम' शब्दाच्या मूळ अर्थाला धरूनच तें प्रत्याख्यान केलें आहे. 'सर्वनाम' म्हणजे सर्वांचें नांव होण्यास जें योग्य आहे तें. जेथें 'सर्वादि' शब्दांची, ते संज्ञावाचक किंवा उपसर्जनीभूत झाल्यामुळें ही योग्यता नष्ट होते, तेथें त्यांना 'सर्वनाम' म्हणताच येत नाहीं; आणि म्हणूनच सर्वनामाला उद्देशून जीं प्रातिपदिक कार्यें सांगितलीं आहेत, तीं त्यांना अर्थात्च होऊं शकत नाहींत. ह्या भाष्यकाराच्या व्याख्यानावरून देखील हेंच सिद्ध होतें कीं वरील नियम मुनित्रयास मान्य आहे.)

अर्थाश्रय एतदेवं भवति शब्दाश्रये च वृध्यात्त्वे इति ओत्सूत्रस्थभाष्यस्य लौकिकार्थवत्त्वयोग्यपदाश्रय एष न्यायस्तद्रहितशब्दाश्रये च ते इत्यर्थः।

गोतइति यथाश्रुतसूत्रे विशिष्टरूपोपादानसत्त्वेनोक्तरीत्यैवैतस्य भाष्यस्य व्याख्येयत्वादित्यलम् ॥१५॥

' ओत् ' सू० १-१-१'५ ह्या सूत्रावरील भाष्यांत ' अर्थाश्रये एतदेवं भवति, शब्दाश्रये च वृध्यात्वे ' असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ असा कीं, पद झाल्यावरच लोकप्रसिध्द अर्थ सांगण्याची योग्यता शब्दास येते. म्हणून (ह्या परिभाषेंत सांगितलेला गौणमुख्य) न्याय पदाच्याच ठिकाणीं लागतो व लौकिकार्थ सांगण्याची योग्यता नसणाऱ्या शब्दास (म्हणजे 'गो' ह्या प्रातिपदिकास) वृद्धि ('गौः') व आत्त्व ( गाम् ) होतात. भाष्याचा वर जसा अर्थ केला आहे तसाच करणें योग्य आहे; कारण 'गोतो णित्' सू २८४ ह्या सूत्रांत (ओतो णित्' असें सूत्र न करितां) विशिष्ट प्रातिपदिकाचें ('गो' ह्या विशिष्ट प्रातिपदिकाचें ) ग्रहण केलें आहे. ह्यापुढें जास्त विचार करण्याची गरज नाहीं.

---

# परिभाषा १६

अर्थवद्ग्रहणे इत्यस्यापवादमाह—

' अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य' प. १४ ह्या परिभाषेचा अपवाद असणारी ही परिभाषा सांगतात—

## अनिनस्मन्ग्रहणान्यर्थवता चानर्थकेन च तदन्तविधिं प्रयोजयन्ति ॥१६॥

'' कोणत्याहि सूत्रांत 'अन्' 'इन्' 'अस' किंवा 'मन्' ह्या प्रत्ययांसबंधानें कांहीं कार्य सांगितलें असल्यास, ( 'येन विधिस्तदन्तस्य' ह्या सूत्रानें ) तदन्तविधि करून तें कार्य अन्नन्त, इन्नन्त, असन्त, व मन्नन्त प्रातिपदिकांस करावें, मग तें 'अन्' इन्' 'अस्' 'मन्' हे अंश (व्याकरणदृष्ट्या) अर्थवान् असोत अथवा अर्थरहित असोत ( ते अर्थरहित असले तरी कार्य होऊं शकतें. )''

'येन विधि' रित्यत्र भाष्ये वचनरूपेण पठितैषा । तेन राज्ञा साम्नेत्यादावल्लोपो, दण्डी वाग्मीत्यादा 'विन्हन्नि'ति नियमः, सुपयाः सुस्रोताः इत्यादौ 'अत्वसन्तस्ये'ति दीर्घः, सुशर्म्मा सुप्रथिमेत्यादौ ' मनः ' इति ङीब्निषेधश्च सिद्धः ॥

' येन विधिस्तदन्तस्य'–१–१–७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा वचनरूपानें पठित आहे. ( म्हणून ही स्वतन्त्र वाचनिकी समजावी ). ह्या परिभाषेमुळें, 'राज्ञा' 'साम्ना' इत्यादि ठिकाणीं, ('अल्लोपोऽनः' सू० २३४ ह्या सूत्रानें) अल्लोप होतो ( जरी 'राजन' शब्द 'अन्' प्रत्ययान्त आहे व सामन' शब्द 'मन्' प्रत्ययान्त असून, त्या अर्थवान् ' मन्' प्रत्ययांतील 'अन्' हा अंश अर्थरहित आहे तरी दोन्हीं ठिकाणीं

अल्लोप होतो. ) तसेंच 'दण्डी' 'वाग्मी' इत्यादि ठिकाणीं, 'इन्हन्पूषार्यम्णां शौ' 'सौ च' सू. ३५६-३५७ हीं सूत्रें लागतात. ( जरी 'दण्ड' शब्दास 'अत इनिठनौ' सू० १९२२ ह्या सूत्रानें 'इनि' प्रत्यय लागून 'दण्डी' हा शब्द इन्नन्त आहे, व 'वाच्' शब्दास 'वाचो ग्मिनिः' १९३० ह्या सूत्रानें 'ग्मिन्' प्रत्यय लागून 'वाग्मिन्' हा शब्द 'ग्मिन्' प्रत्ययान्त आहे व त्या 'ग्मिन्' प्रत्ययांतील 'इन्' हा अंश अर्थ-रहित आहे तरी, दोहोंना 'सु' प्रत्यय पुढें असतां उपधादीर्घरूप कार्य होऊन, 'दण्डी' व 'वाग्मी' अशीं रूपें सिद्ध होतात. ) तसेंच 'सुपयाः' 'सुस्रोताः' इत्यादि ठिकाणीं, 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू० ४२५ ह्या सूत्रान्वयें उपधादीर्घ होतो, ( जरी 'सुपयाः' हा 'अस्' प्रत्ययान्त आहे व 'सुस्रोताः' हा 'तस्' प्रत्ययान्त–म्हणजे तुडागमसहित अस्प्रत्ययान्त–असून, त्यांतील 'अस्' हा अंश अर्थरहित आहे तरी, 'सु' प्रत्यय पुढें असतां, दोहोंचीहि उपधा दीर्घ होते ) तसेंच 'सुशर्मा' 'सुप्रथिमा' इत्यादि ठिकाणीं 'मनः' सू० ४५९ ह्या सूत्रानें 'ङीप्' होत नाहीं. ( जरी 'सुशर्मा' 'मन्' प्रत्ययान्त आहे व 'सुप्रथिमा' 'इमनिच्' प्रत्ययान्त असून, त्याचा अंश 'मन्' हा अर्थरहित आहे तरी, दोहोंनाहि स्त्रीवाचक अर्थांमध्यें 'ङीप्' प्रत्यय होत नाही.)

**अन्ये तु परिवेविषीध्वमित्यत्र ढत्वव्यावृत्तये क्रियमाणा 'इणः षीध्व' मित्यत्राङ्ग्रहणादर्थवत्परिभाषाऽनित्या तन्मूलकमिदमित्याहुः ॥**

कांहीं वैयाकरणांचें असें मत आहे कीं 'परिवेविषीध्वम्' ह्या ठिकाणीं 'ढत्व' होऊं नये म्हणून 'इणः षीध्वंलुङ्लिटां धोऽङ्गात्' सू० २२४७ ह्या सूत्रांत 'अङ्गात्' हें पद घातलें असल्यामुळें, 'अर्थवद्ग्रहणे' ही परिभाषा १४ अनित्य ठरते, व तिच्या अनित्यतेच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे. ( 'परिवेविषीध्वम्' हें जुहोत्यादिगणांतील परिपूर्वक 'विष्' धातूचें आत्मनेपदाचें विधिलिङाचें रूप आहे. 'परि+वेविष्+सीयुट्=सीय्+ध्वम्' अशा स्थितींत 'लिङः सलोपोऽनन्त्यस्य' सू० २२११ ह्या सूत्रानें 'सीयुट्' ह्यांतील 'स्' चा लोप व 'लोपो व्योर्वलि' सू० ८७३ ह्या सूत्रानें 'य्' चा लोप होऊन, 'परि+वेविष्+ई+ध्वम्=परिवेविषीध्वम्' हें रूप सिद्ध होतें. 'परिवेविषीध्वम्' येथें 'षीध्वम्' हा प्रत्यय नाहीं; कारण तो 'विष्' धातुचा 'ष्' 'सीयुट्' चा 'ई,' व 'ध्वम्' प्रत्यय हे तीन एकत्र मिळून झाला आहे. म्हणून तो अर्थवान् नाहीं, आणि 'अर्थवद्ग्रहणे' ही परि-भाषा असल्यामुळें, 'इणः षीध्वम्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या अर्थवान् 'षीध्वम्' प्रत्ययानें 'परिवेविषीध्वम्' यांतील अनर्थक 'षीध्वम्'चें ग्रहण होऊं शकत नाहीं. असें असतांना, 'इणः षीध्वम्' या सूत्रांत 'अङ्गात्' हें पद कां घातलें ? 'इणः षीध्वंलिङ्लुटांधः' एवढेंच सूत्र जरी असतें तरी अनर्थक 'षीध्वम्' यांतील धकारास, 'अर्थवद्ग्रहणे' या परिभाषेमुळें, ढत्व झालेंच नसतें. तरी पण ज्या अर्थी

पाणिनीनें त्या सूत्रांत ' अङ्गात् ' हें पद मुद्दाम घातलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं पाणिनीला ही जाणीव होती कीं, 'अर्थवद्ग्रहणे' ही परिभाषा अनित्य आहे, व ती अनित्य असल्यामुळें अनर्थक ' षीध्वम् ' यांतील धकारास देखील ढत्व होईल. तसें होणें इष्ट नसल्यामुळें पाणिनीनें ) 'इणः षीध्वम्' या सूत्रांत ' अङ्गात् ' हें पद घातलें आहे, व त्यामुळें त्या सूत्राचा अर्थ असा होतो कीं इण्णन्त अङ्गापुढें 'षीध्वम्' आल्यास तशाच ' षीध्वम् ' यांतील धकाराला ढत्व व्हावें. ' परिवेविषीध्वम् ' या उदाहरणांत ' वेविष् ' हें अङ्ग असून त्यापुढें ' ईध्वम् ' असून 'षीध्वम्' नसल्यामुळें त्याठिकाणीं ढत्व होऊं शकत नाहीं व अशारीतीनें 'इणःषीध्वम्' या सूत्रांतील ' अङ्गात् ' या पदाचें ग्रहण ' अर्थवद्ग्रहणे ' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें बोधक ठरतें. )

**' विभाषेटः ' इत्यत्रानर्थकस्यैव षीध्वमः सम्भवात्त्रापि तस्यैव ग्रहणमिति भ्रमवारणायाङ्गादिति परे ॥ १६ ॥**

दुसरे वैयाकरण असें ह्मणतात कीं, ' इणः षीध्वम् ' ह्या सूत्रांत ' अङ्गात् ' हें पद घालण्याचें कारण हें आहे कीं, ' विभाषेटः ' सू० २३२५ ह्या सूत्रांत जसें अर्थरहित ' षीध्वम् ' चें ग्रहण आहे, तसेंच ' इणःषीध्वम् ' ह्या सूत्रांतहि अर्थरहित ' षीध्वम् ' चें ग्रहण असलें पाहिजे, असा भ्रम उत्पन्न होऊं नये. ( ' आर्धधातुकस्येड्वलादेः ' सू० २१८४ ह्या सूत्रानें जेव्हां ' षीध्वम् ' ह्याला इडागम होतो तेव्हां ' यदागमाः '—परिभाषा ११—ह्या परिभाषेनें, ' इषीध्वम् ' असा प्रत्यय होतो. हा 'इषीध्वम्' अर्थवान् आहे; त्यांतील 'षीध्वम्' हा अंश अर्थवान् नाहीं. 'विभाषेटः' ह्या सूत्रांत जसें अर्थरहित ' षीध्वम् ' चें ग्रहण आहे, तसेंच ' इणः षीध्वम् ' ह्या सूत्रांतहि अर्थरहित ' षीध्वम् ' चें ग्रहण कां असूं नये असा भ्रम उत्पन्न झाल्यास, त्याच्या निवारणार्थ, ' इणःषीध्वम् ' ह्या सूत्रांत ' अङ्गात् ' हें पद घातलें आहे; व त्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, ' इण्णन्त ' अङ्गाच्या लगेंच पुढें अर्थवान् ' षीध्वम् ' प्रत्यय असल्यास, त्यांतील धकारास ' ढत्व ' होतें. सारांश, ' अङ्गात् ' हें पद ' अर्थवद्ग्रहणे ' ह्या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक होऊं शकत नाहीं—असें कांहीं वैयाकरण ह्मणतात व तेंच ग्रन्थकाराचें मत आहे. )

---

## परिभाषा १७

**ननु ' उश्च ' इत्यत्र ' लिङ्सिचौ ' इत्यत आत्मनेपदेष्वित्येव सम्बध्येतानन्तरत्वादत आह—**

' उश्च ' सू० २३६८ ह्या सूत्रांत ' लिङ्सिचावात्मनेपदेषु ' सू० २३०० ह्या पूर्वसूत्रांतील अव्यवहितपूर्व—ह्मणजे लगेंच पूर्वी असलेले—' आत्मनेपदेषु ' एवढेंच

पद अनुवृत्त होईल. ( व त्या पदाबरोबर ' लिङ्सिचौ ' ह्या पदाची अनुवृत्ति होणार नाहीं. तसें न व्हावें ) ह्मणून ही परिभाषा सांगतात.—

## एकयोगनिर्दिष्टानां सह वा प्रवृत्तिः सह वा निवृत्तिः ॥ १७ ॥

" एकाच ( पूर्व ) सूत्रांत उच्चारलेल्या व ज्यांचा अर्थ परस्परांशीं अन्वित आहे अशा सर्व पदांची मिळूनच अनुवृत्ति किंवा निवृत्ति ( परसूत्रांत ) होत असते. "

( ह्मणूनच ' लिङ्सिचावात्मनेपदेषु ' ह्या पूर्व सूत्रांतील ' लिङ्सिचौ ' व ' आत्मनेपदेषु ' हीं पदें परस्परांशीं अर्थामध्यें अन्वित असल्यामुळें, ' उश्च ' ह्या उत्तर-सूत्रांत अनुवृत्त होतात. ' आत्मनेपदेषु ' एवढ्याच पदाची त्या उत्तरसूत्रांत अनुवृत्ति करितां येत नाहीं. )

**वा शब्द एवार्थे । परस्परान्वितार्थकपदानां सहैवानुवृत्तिनिवृत्ती इत्यर्थः । एककार्यनियुक्तानां बहूनां लोके तथैव दर्शनादिति भावः ॥**

ह्या परिभाषेंतील 'वा' शब्दाचा 'एव' असा अर्थ आहे. परस्परांशीं अर्थामध्यें अन्वित असलेल्या पदांची, तशीं सर्व पदें मिळूनच, अनुवृत्ति किंवा निवृत्ति होत असते असा ह्या परिभाषेचा अर्थ समजावा. लौकिक व्यवहारांत देखील असाच न्याय दृष्टीस पडतो. एकाच कार्याकरितां नेमलेले पुरुष सर्वजण मिळूनच तें कार्य करण्यास प्रवृत्त होतात किंवा त्या कार्यापासून निवृत्त होतात. (सारांश, ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध आहे.)

**यत्त्वत्र ज्ञापकं ' नेड्वशीत्यत ' इडित्यनुवर्त्तमाने ' आर्द्धधातुकस्ये-डि'त्यत्र पुनरिड्ग्रहणं, तद्धि नेत्वस्यासंबन्धार्थमिति, तन्न । दीधीवेवी-टामिति सूत्रे भाष्ये तत्रत्येड्ग्रहणप्रत्याख्यानायेड्ग्रहणेऽनुवर्तमाने पुनरि-ड्ग्रहणस्येटो गुणरूपविकाराभावार्थकत्वस्योक्तत्वेन तद्विरोधात् । नञो निवृत्तिस्तु क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्त्तत इति न्यायेन सिद्धा ।**

कोणी असें ह्मणतात कीं, 'नेड्वशि कृति' सू० २९८१ ह्या पूर्वसूत्रांतून ' आर्ध-धातुकस्येड्वलादेः ' सू० २१८४ ह्या पुढील सूत्रांत ' इट् ' ची अनुवृत्ति करितां येत असून देखील, पुनः ' आर्धधातुकस्येट् ' ह्या सूत्रांत जें इट् ग्रहण केलें आहे तें ह्या परि-भाषेचें ज्ञापक होय. ( कारण 'आर्धधातुकस्येट्' ह्या सूत्रांत 'इट्' ग्रहण केलें नसतें तर, 'नेड्वशि कृति' ह्या सूत्रांतील अर्थामध्यें परस्परांशी अन्वित असलेलीं अशीं 'न इट्' हीं दोन्हीं पदें त्या सूत्रांत अनुवृत्त झालीं असतीं. तसें न व्हावें—ह्मणजे 'आर्धधातुकस्येट्' ह्या सूत्रांत 'न' या पदाची अनुवृत्ति न व्हावी—ह्मणूनच त्या सूत्रांत पुनः 'इट्' ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें इट् ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें.)—पण हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारणें तें भाष्यविरुद्ध आहे. ' दीधीवेवीटाम् ' १–१–६ ह्या सूत्रावरील भाष्यांत, ' दीधीवेवीटाम् ' ह्या सूत्रांत जें इट्ग्रहण केलें आहे त्याचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकार, ' आर्धधातुकस्येट् ' ह्या सूत्रांत जें इट्ग्रहण केलें आहे त्याची सार्थकता

अशा रीतीनें दाखवितात कीं, ' नेड्वशि ' ह्या सूत्रांतून इट् अनुवृत्त होतोच तरीपण ' आर्धधातुकस्येट् ' ह्या सूत्रांत पुनः जें इट्ग्रहण केलें आहे तें एवढ्यासाठींच त्या इट्ला गुणरूप विकार न होतां ( त्याचा गुण न होतां,) तो ' इट् ' तसाच राहावा. (सारांश, ' आर्धधातुकस्येट् इट् वलादेः ' असें सूत्र ह्मणावें, व त्याचा अर्थ असा समजावा कीं, वलादि आर्धधातुक प्रत्ययाला 'इट्' होतो, व तो 'इट्' इट्रूपानेंच राहतो–ह्मणजे त्याला गुण किंवा वृद्धि होत नाहीं. भाष्यकारांनीं 'नेड्वशि कृति' ह्या सूत्रांतून 'आर्धधातुकस्य' ह्या सूत्रांत केवळ ' इट् ' एवढ्याच पदाची अनुवृत्ति केली आहे व ' न ' ह्या पदाची अनुवृत्ति केली नाहीं,—हें ह्या परिभाषेच्या विरुद्ध आहे असें कोणी ह्मटल्यास, त्याला ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) ' क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्तते ' परिभाषा १८ ह्या परिभाषेनें ' न ' ह्या पदाची निवृत्ति केली आहे.

**वस्तुतस्तु ' दीधीवेवीटा ' मिति सूत्रस्थभाष्यमेकदेश्युक्तिः । ' आर्द्धधातुकस्येति ' सूत्रस्थेड्ग्रहणस्य ' नेड्वशि ' इति सूत्रे भाष्ये प्रत्याख्यानात् तत्करणेन गुरुतरयत्नमाश्रित्यैतत्प्रत्याख्यानस्यायुक्तत्वात् ॥ १७ ॥**

वास्तविक पाहिलें असतां, ' दीधीवेवीटाम् ' या सूत्रावरील भाष्य एकदेशीची उक्ति आहे ( सिद्धान्तीची उक्ति नव्हे; ) कारण ' नेड्वशि ' ७-२-८ या सूत्रावरील भाष्यांत ' आर्धधातुकस्येट् ' या सूत्रांत जें ' इट् ' ग्रहण केलें आहे त्याचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें आहे ( व 'दीधीवेवीटाम्' या सूत्रांतील ' इट् चें प्रत्याख्यान केलें नाहीं व तेंच योग्य आहे. ) असें असून देखील ( ' आर्धधातुकस्येट् ' या सूत्रांत ' नेड्वशि ' या सूत्रांतून 'इट्' ची ) अनुवृत्ति करणें आणि द्राविडी प्राणायाम करून ( ' दीधीवेवीटाम् ' या सूत्रांतील ) 'इट्' चें प्रत्याख्यान करणें अगदीं अयोग्य ठरतें. ( ' दीधीवेवीटाम् ' या गुणवृद्धिनिषेधक सूत्रानें ' इट् ' जसाचा तसाच कायम राहत असून देखील त्या सूत्रांतील 'इट्' चें प्रत्याख्यान करणें व ' इट्' ला गुण न होतां तो जसाचा तसाच कायम रहावा म्हणून ' आर्धधातुकस्येट्' या सूत्रांत ' इट्' ग्रहण असून देखील त्यांत पुनः ' नेड्वशि ' या सूत्रांतील ' इट् ' ची अनुवृत्ति करून, ' इट् इट् एव स्यात् ' असा अकृत्रिम अर्थ करणें हा व्यर्थ खटाटोप होय. यावरूनच हें सिद्ध होतें कीं, ' दीधीवेवीटाम् ' या सूत्रावरील भाष्य एकदेशीची उक्ति असून, 'आर्धधातुकस्येट्' या सूत्रांतील ' इट् ' चें प्रत्याख्यान करणारें ' नेड्वशि ' या सूत्रावरील भाष्य सिद्धान्तीची उक्ति आहे. तसें मानण्याचें कारण हें की ' नेड्वशि या सूत्रांतून ' इट् ' ची अनुवृत्ति होऊं शकत असतां, ' आर्धधातुकस्येट् , या सूत्रांत ' इट् ' ग्रहण करण्याची कांहींच गरज नाहीं व ' दीधीवेवीटाम् ' या सूत्रानें ' इट् ' जसाचा तसाच कायम राहूं शकतो. सारांश, ज्या अर्थीं भाष्यांत 'आर्धधातुकस्येट्' ह्या सूत्रांतील इटाचें प्रत्याख्यान केलें आहे व ' नेड्वशि ' ह्या सूत्रांतून 'इट्' ची अनुवृत्ति केली आहे त्याअर्थीं 'आर्धधातुकस्येट्' ह्या सूत्रांतील इड्ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं.)

---

# परिभाषा १८

नन्वलुगधिकारः प्रागनङ्‌ उत्तरपदाधिकारः प्रागङ्गाधिकारादित्यनुपपन्नमेकयोगनिर्दिष्टत्वात्। तथा दामहायनान्ताच्च इत्यादौ संख्याव्ययादेरित्यतः संख्यादेरित्यनुवर्तते‌ऽव्ययादेरिति निवृत्तमिति चानुपपन्नमत आह—

' अलुगुत्तरपदे ' हें अधिकारसूत्र असून ह्याचीं दोन्हीं पदें—' अलुक् ' व 'उत्तरपदे '—' आनङृतो द्वन्द्वे ' ह्या सूत्राच्या पूर्वसूत्रापर्यंत अनुवृत्त होतात; व ह्या ' अलुगुत्तरपदे ' सूत्रांतील एकच पद ' उत्तरपदे ' हे ' आनङृतो द्वन्द्वे ' ह्या सूत्रापासून अङ्गाधिकार सुरू होईपर्यंत ( म्हणजे षष्ठाध्यायाचा तृतीय पाद संपेपर्यंत ) अनुवृत्त होतें. ' अलुक् ' व ' उत्तरपदे ' हीं दोन्हीं पदें ( अर्थामध्यें परस्परांशीं अन्विता असून एकाच सूत्रांत उच्चारलीं असल्यामुळें, ( मागील परिभाषेप्रमाणें, ) दोहोंचीहि प्रवृत्ति किंवा निवृत्ति मिळून व्हावी. तसेंच 'दामहायनान्ताच्च' ह्या सूत्रांत, पूर्वसूत्र ' संख्याव्ययादेः ' ह्या सूत्रांतील ' संख्यादेः ' ह्याचीच अनुवृत्ति होते व 'अव्ययादेः ' ह्याची अनुवृत्ति होत नाहीं. हें देखील ( पूर्व परिभाषेप्रमाणें ) बरोबर नाहीं. ( अशी शंका उत्पन्न झाली असतां, ) ही परिभाषा सांगतात—

**क्वचिदेकदेशो‌ऽप्यनुवर्त्तते ॥ १८ ॥**

' कोठें कोठें एकदेशाचीहि अनुवृत्ति होते '

**एकत्रार्थे योगः सम्बन्धस्तेन निर्दिष्टयोः समुदायाभिधायिद्वन्द्वनिर्दिष्टयोरित्यर्थ इति पक्षात्तिरिति सूत्रे कैयटः ॥ तावन्मात्रांशे स्वरितत्वप्रतिज्ञाबलाल्लभ्यमिदम्। स्पष्टा चेयं दामहायनान्ताच्चेति सूत्रे औतो‌ऽम्शसोरिति सूत्रे च भाष्ये पूर्वा च ॥ १८ ॥**

' पक्षात्तिः ' ५-२-२५ ह्या सूत्रावरील भाष्याचें व्याख्यान करितांना, ' एकयोगनिर्दिष्टयोः ' ह्या शब्दाचा कैयटानें, अर्थामध्यें परस्परांशीं संबद्ध अशा रीतीनें निर्दिष्ट केलेले—म्हणजे समुदायरूपी अर्थाचा वाचक जो द्वन्द्व समास त्या समासांत निर्दिष्ट केलेले ( सांगितलेले )—असा अर्थ केला आहे. ( पण ' एकयोगनिर्दिष्ट ' या शब्दाचा ' द्वन्द्वसमासनिर्दिष्ट ' असा जो कैयटानें अर्थ केला आहे तो नागेशास पसंत नाहीं; कारण पूर्वसूत्रांत द्वन्द्वसमासांत निर्दिष्ट नसून देखील अर्थामध्यें परस्परांशीं आन्वित असलेलीं दोन किंवा अधिक पदें उत्तरसूत्रांत एकत्र अनुवृत्त किंवा निवृत्त होऊं शकतात. म्हणून नागेश म्हणतात का, वास्तविक पाहिलें असतां, 'स्वरितेनाधिकारः' ह्या सूत्रान्वयें ) जेवढ्याची अनुवृत्ति करावयाची आहे तेतढ्यास स्वरित केलें म्हणजे ( १७ व १८ परिभाषांत जें सांगितलें आहे ) तें सिद्ध होतें. 'दामहायनान्ताच्च' ४-१-२७ व ' औतोम्शसोः ' ६-१-९३ ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्या दोन्ही परिभाषा सांगितल्या आहेत.

# परिभाषा १९

**ननु 'त्यदादीनामः' इत्यादिनेममित्यादावनुनासिकः स्यादत आह—**

'त्यदादीनामः' सू० २६५ ह्या सूत्रानें 'इमम्' इत्यादि ठिकाणीं अनुनासिक होईल. ('इदम्' ह्या सर्वनामाचें द्वितीयाविभक्तीचें एकवचनाचें रूप करितांना, 'त्यदादीनामः' सू० २६५ ह्या सूत्रानें 'इदम्' ह्यांतलि अन्त्य मकाराचें जागीं 'अ' हा आदेश होऊन, व 'अतो गुणे' सू० १९१ ह्या सूत्रानें पररूप एकादेश होऊन, 'इदम्=इद+अ=इद' असें झाल्यावर, पुढें 'अम्' हा द्वितीयेचा प्रत्यय लावला म्हणजे 'दश्च' सू० ३४५ ह्या सूत्रानें 'द्' च्या जागीं 'म्' असा आदेश होऊन, 'अमि पूर्वः' सू० १९४ ह्या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन, 'इद+अम्=इम+अम्=इमम्' असें रूप सिद्ध होतें. आतां शंका अशी उत्पन्न होते कीं, 'त्यदादीनामः' ह्या सूत्रानें 'इदम्' ह्याच्या अन्त्य मकाराचे जागीं, 'म्' हा वर्ण अनुनासिक असल्यामुळें, अनुनासिक अकार व्हावा. तसें होत नाहीं ) म्हणून ही परिभाषा सांगतात—

## भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न ॥ १९ ॥

'पुढें ( प्रत्ययरूपानें, किंवा आदेशरूपानें किंवा आगमरूपानें सूत्रान्वयें) उत्पन्न होणारा वर्ण सवर्णांचें ग्रहण करीत नाहीं.'

( अनुनासिक अकार जरी निरनुनासिक अकाराचा सवर्ण आहे तरी 'त्यदादीनामः' ह्या सूत्रांत निरनुनासिक अकाराचें ग्रहण केलें असल्यामुळें, ह्या परिभाषेप्रमाणें त्या निरनुनासिक अकारानें अनुनासिक अकाराचें ग्रहण करितां येत नाहीं; म्हणून 'इदम् ह्यांतील अन्त्य मकाराचे जागीं अनुनासिक अकाराचा आदेश न होतां, निरनुनासिक अकाराचाच आदेश होतो. )

**अणुदित्सूत्रेऽप्रत्यय इत्यनेन सामर्थ्यात्सूत्रप्राप्तं जातिपक्षेण प्राप्तं गुणाभेदकत्वेन च प्राप्तं नेत्यर्थः । अत एवाणुदित्सूत्रे प्रत्ययादेशागमेषु सवर्णग्रहणाभावं प्रकारान्तरेणोक्त्वैवं तर्हि सिद्धे यदप्रत्यय इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयति भवत्येषा परिभाषा भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेति.**

'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' ह्या सूत्रांतील 'अप्रत्ययः' ह्या शब्दाचा जो अर्थ आहे त्या अर्थसामर्थ्यानें हें स्पष्ट होतें कीं, प्रत्ययांत असलेल्या वर्णानें सवर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं, मग तें सवर्णग्रहण 'अणुदित्' सूत्रानें प्राप्त झालें असो, जातिपक्ष स्वीकारल्यानें प्राप्त होवो, किंवा 'अभेदकाः गुणाः' ह्या परिभाषेनें प्राप्त होत असो. म्हणूनच 'अणुदित्' १-१-६९ ह्या सूत्रावरील भाष्यांत, प्रत्यय, आदेश, व आगम ह्यांत असलेल्या वर्णांनीं ( 'अणुदित्' सूत्रांत 'अप्रत्ययः' हा शब्द नसला तरी ) सवर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं असें इतर रीतीनें सिद्ध करून भाष्यकार म्हणतात

कीं, ' अणुदित् ' ह्या सूत्रांतील ' अप्रत्ययः ' हा शब्द अशा तऱ्हेनें व्यर्थ ठरत असून देखील त्या सूत्रांत पाणिनीनें ह्या शब्दाचें ग्रहण केलें आहे, व 'अप्रत्ययः' असा निषेध सांगितला आहे ह्यावरून ' भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न ' ही परिभाषा ज्ञापित होते. ( ' प्रत्याययति इति प्रत्ययः ' अशी 'प्रत्यय' शब्दाची व्युत्पत्ति आहे व त्याचा अर्थ हा कीं ज्यानें अर्थाचा बोध होतो तो प्रत्यय समजावा; म्हणूनच कैयटानें देखील म्हटलें आहे कीं, ' येनार्थं प्रतियन्ति स प्रत्ययः'. ह्यावरून हें स्पष्ट होतें कीं, प्रत्यय हा विशेष अर्थाचा बोधक असतो; त्यामुळें प्रत्ययांत असणाऱ्या वर्णानें सवर्णाचें ग्रहण केल्यास —म्हणजे ऱ्हस्वानें दीर्घाचें किंवा प्लुताचें ग्रहण केल्यास किंवा निरनुनासिकानें अनुनासिकाचें ग्रहण केल्यास—त्या प्रत्ययांत विशिष्टार्थबोधक जी विशिष्टवर्णानुपूर्वी आहे तींत फरक होईल व असा फरक झाल्यास तो प्रत्यय आपला सांकेतिक अर्थ सांगण्यास असमर्थ होईल. असें असल्यामुळें ' अणुदित् सवर्णस्य ' ह्या सूत्रांत पाणिनीला ' अप्रत्ययः ' हा निषेधवाचक शब्द घालण्याची कांहींच गरज नव्हती; कारण तो शब्द त्या सूत्रांत घातला नसता तरी, वर सांगितल्याप्रमाणें, प्रत्ययांत असलेल्या वर्णानें सवर्णाचें ग्रहण होऊंच शकलें नसतें. असें असून देखील त्या सूत्रांत 'अप्रत्ययः' हा शब्द पाणिनीनें घातला असल्यामुळें प्रकृत परिभाषा ज्ञापित होते; कारण ज्याअर्थी पाणिनीनें प्रत्ययांतील वर्णानें सवर्णाचें ग्रहण होत नाहीं असें सांगून प्रत्ययाच्या अंशांत एकदेशानुमति दर्शविली आहे व ज्या अर्थी प्रत्ययाच्या अंशांत लागू पडणारीं कारणें आगम व आदेश यांना देखील सारखींच लागू पडतात त्या अर्थी आगम व आदेश यांतील वर्णांनीं देखील सवर्णग्रहण होऊं शकत नाहीं हें ज्ञापित होतें. व अशा रीतीनें प्रकृत परिभाषा ' अणुदित ' या सूत्रांत ' अप्रत्ययः ' हा शब्द घातल्यामुळें ज्ञापित होते. अशी ही परिभाषा असल्यामुळेंच, दीक्षितांनीं ' प्रतीयते विधीयते इति प्रत्ययः=विधीयमानः' अशी प्रत्यय शब्दाची व्युत्पत्ति देऊन, ' प्रत्यय ' या शब्दानें प्रत्यय, आदेश व आगम या तिहींचेंहि ग्रहण होतें असें सुचविलें आहे, व ' अणुदित् ' या सूत्रांतील ' अप्रत्ययः' ह्या शब्दाचा 'अविधीयमानः' असा अर्थ करून, ' अविधीयमानः अण्, उदिच, सवर्णग्राहको भवति ' असा त्या सूत्राचा अर्थ केला आहे. )

**किञ्च ज्याद् ईयस इत्येवान्तर्यतो दीर्घे सिद्धे ज्यादादिति दीर्घोच्चारणमस्या ज्ञापकम् । अणुदित्सूत्रे ज्यादादितिसूत्रे च भाष्ये स्पष्टैषा ।**

दुसरें असें कीं, ' ज्याद ईयसः ' असें सूत्र जरी केलें असतें तरी ' ईयस् ' यांतील दीर्घ ' ई ' च जागीं ( 'स्थानेऽन्तरतमः ' ह्या सूत्रान्वयें ) अन्तरतम दीर्घ ' आ ' असा आदेश झालाच असता. परंतु पाणिनीनें ' ज्यादादीयसः ' सू० २०१२ असें सूत्र करून त्या सूत्रांत ' आ ' असें दीर्घोच्चारण केलें आहे तें ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ( ' ज्याद ईयसः ' एवढेंच सूत्र जरी असतें तरी त्याचा अर्थ,—' ज्य च ' सू० २०११ ह्या सूत्रानें ' प्रशस्य ' चे जागीं ' ज्य ' हा जो आदेश होतो त्या ' ज्य ' पुढें ' ईयस् '

प्रत्यय आल्यास, 'आदेः परस्य' सू० ४४ ह्या सूत्रान्वयें 'ईयस्'च्या आदिवर्णाचे जागीं 'अ' हा आदेश करावा—असा झाला असता, व ही परिभाषा नसती तर, 'अणुदित्सवर्णस्य' ह्या सूत्रान्वयें 'अ' नें अठराहि प्रकारच्या अकाराचें ग्रहण होत असल्यामुळें, 'स्थानेऽन्तरतमः' ह्या सूत्रानें दीर्घ ईकाराचे जागीं दीर्घ 'अ'—म्हणजे'आ'—असा आदेश झालाच असता. परंतु ही परिभाषा असल्यामुळें पाणिनीला हें माहीत होतें कीं, 'ई' चें जागीं पुढें होणाऱ्या 'अ' ह्या आदेशानें सवर्ण 'आ' चें ग्रहण होणार नाहीं. त्यामुळें 'ज्य+ईयस्=ज्य+अयस्' अशी स्थिति झाली असतां, 'अतो गुणे' सू० १९१ ह्या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'ज्ययस्' असें अनिष्ट रूप सिद्ध झालें असतें. तसें न व्हावें म्हणून त्याला 'ज्यादादीयसः' असें सूत्र करावें लागलें, व तसें सूत्र केल्यामुळें 'ज्य+ईयस्=ज्य+आयस् ज्यायस्' असें इष्ट रूप सिद्ध होतें, आणि अशा रीतीनें तें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें.) 'अणुदित्' १–१–६९ व तसेंच 'ज्यादादीयसः' ६–१–९३ ह्या सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

**'चोः कु' रित्यादौ भाव्यमानेनापि सवर्णग्रहणं विधेये उदिदुच्चारणसामर्थ्यात्। एतदेवाभिप्रेत्य भाव्यमानोऽण् सवर्णान्न गृण्हातीति नव्याः पठन्ति ॥ १९ ॥**

'चोः कुः' सू० ३७८ इत्यादि सूत्रांत विधेयाला उदित् केलें असल्यामुळें (व 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रान्वयें 'उदित्'—म्हणजे कु, चु, टु, तु, पु,—हा सवर्णांचा ग्राहक होत असल्यामुळें) अशा स्थलीं आदेशांतील उ वर्णानें सवर्णाचें ग्रहण होतें (व तशा सवर्णग्रहणाच्या आड ही परिभाषा येत नाहीं.) म्हणूनच 'भाव्यमानःअण् सवर्णान् न गृण्हाति' अशी परिभाषा नवीन वैयाकरण पठित करितात. (पण अशा रीतीनें ही परिभाषा भाष्यांत पठित नसल्यामुळें, हा पाठ नागेशास मान्य नाहीं आणि म्हणूनच भाष्यांत जशी ही परिभाषा पठित केली आहे त्यांच शब्दांत नागेशानें आपल्या ग्रन्थांत ही परिभाषा पठित केली आहे.)

---

# परिभाषा २०

**नन्वेवमदसोऽसेरित्यादिनाम् इत्यादौ दीर्घविधानं न स्यादत आह–**

(मागल्या परिभाषेप्रमाणें, जेथें सूत्रांत ऱ्हस्व उकार आदेश सांगितला आहे तेथें ऱ्हस्व उकाराचेंच ग्रहण होतें, व त्या उकारानें त्याच्या सवर्णांचें—ह्मणजे दीर्घ इत्यादि ऊकारांचें—ग्रहण होऊं शकत नाहीं). ह्यामुळें 'अदसोऽसेः' सू० ४१९ ह्या सूत्रानें होणाऱ्या 'अमू' ह्यांत दीर्घ होऊं नये. (जसें—'अदस्' शब्दाचें प्रथमेचें द्विवचन करितांना 'अदस्+औ' अशा स्थितींत, 'त्यदादीनामः' सू०२६५ व 'अतो गुणे' सू०

१९१ ह्या सूत्रांनीं ' अद्+औ ' होऊन, ' वृद्धिरेचि ' सू० ७२ ह्या सूत्रानें, ' अदौ ' असें होतें, व 'अदसोऽसेर्दादुदोमः' सू० ४१९ ह्या सूत्रानें ' अदौ ' ह्यांतील ' द् ' च्या जागीं ' म् ' व औच्या जागीं 'स्थानेऽन्तरतमः' ह्यानें दीर्घ ऊ होऊन ' अम्+ऊ=अमू असें शुद्ध रूप होतें; पण ' अदसोऽसेः ' ह्या सूत्रांत ऱ्हस्व उकाराचा निर्देश केला असल्यामुळें मागील परिभाषेप्रमाणें, सवर्ण दीर्घ ऊकाराचें ग्रहण करितां येत नाहीं; ह्मणून ' औ ' च्या जागीं ऱ्हस्व उकार व्हावा; व तसें झाल्यास ' अमु ' असें विकृत रूप सिद्ध होण्याची आपत्ति येणार. ती न यावी, ) ह्मणून ही परिभाषा सांगतात.—

## भाव्यमानोऽप्युकारः सवर्णान् गृण्हाति ॥ २० ॥

" ( सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ) पुढें उत्पन्न होणाऱ्या देखील उकारानें सवर्णांचें ग्रहण होतें. "

( ही परिभाषा असल्यामुळें ' औ ' या द्विमात्रक वर्णाचे जागीं ' स्थानेऽन्तरतमः ' या सूत्रानें दीर्घ ऊकारादेश होऊन ' अमू ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**' दिव उत् ' ' ऋत उत् ' इति तपरकरणमस्या ज्ञापकम् ॥ ' तित्स्वरित ' मिति सूत्रे भाष्ये स्पष्टैवा ॥ २० ॥**

' दिव उत् ' सू० ३३७ व ' ऋत उत् ' सू० २७९ ह्या सूत्रांतील तपरकरण ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ( ' उ ' हा तपर केला असल्यामुळें, ' तपरस्तत्कालस्य ' ह्या सूत्रानें, ऱ्हस्व उकाराचेंच ग्रहण होतें. जर ही परिभाषा नसती तर मागील परिभाषेनें, ' उ ' ह्यानें ' ऱ्हस्व ' उकाराचेंच ग्रहण झालें असतें व त्यामुळें तपरकरण व्यर्थ ठरलें असतें. पण ही परिभाषा असल्यामुळें, ' उ ' नें दीर्घ ऊकाराचें ग्रहण न व्हावें ह्मणून, ' दिव उत्, ' 'ऋत उत्' येथें तपरकरण करावें लागलें. ह्यावरून ही परीभाषा पाणिनीस मान्य होती हें सिद्ध होतें. ) ' तित्स्वरितम् ' ६–१–१८५ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा २१

**ननु गवे हितं गोहितमित्यादौ प्रत्ययलक्षणेनावाद्यादेशापत्तिरत आह—**

' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू० २६२ ह्या सूत्रामुळें, ' गवे हितम्=गोहितम् ' इत्यादि ठिकाणीं ' अव् ' इत्यादि आदेश होण्याची आपत्ति येणार. ( जसें–'गवे हितम =गो+ङे=ए+हितम् ' ह्यांचा समास करतेवेळीं, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' सू० ६५०

ह्या सूत्रानें विभक्तिप्रत्यय एकार ह्याचा लुक् झाला तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' ह्या सूत्रामुळें, तो 'एकार' जणुं काय कायमच आहे असें मानल्यास, 'गो' येथील 'ओ' चें जागीं 'एचोऽयवायाव:' सू० ६१ ह्या सूत्रानें 'अव्' असा आदेश होऊन, 'गव्हितम्' असें विकृत रूप सिद्ध होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति 'न लुमताऽङ्गस्य' सू. २६३ ह्या सूत्रानें टाळता येत नाहीं; कारण येथें प्रत्ययनिमित्तक अङ्गकार्य करणें नाहीं. ह्मणून ती आपत्ति टाळण्याकरितां,) ही परिभाषा सांगतात.

## वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् ॥ २१ ॥

"(पुढें असणाऱ्या) प्रत्ययांतील वर्णामुळें (त्याचें मागील) वर्णास कार्य करण्याचा प्रसङ्ग आला असतां, जर प्रत्ययाचा लोप झाला असेल तर, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं; व (वर्णाच्या निमित्तामुळें होणारें) तें कार्य होत नाही."

(ही परिभाषा असल्यामुळें, 'गोहितम्' हा समास करितांना, 'ए' ह्या प्रत्ययाचा लुक् झाल्यावर तो आहे असें मानता येत नाहीं, व त्यामुळें 'गो' येथील ओकाराचें जागीं अवादेश होत नाहीं.)

**वर्णप्राधान्यविषयमेतत् । तत्त्वं च 'प्रत्ययलोप' इति सूत्रे स्थानिवदित्यनुवृत्त्यैव सिद्धे प्रत्ययलक्षणग्रहणं प्रत्ययस्येतराविशेषणत्वरूपं यत्र प्राधान्यं तत्रैव प्रवृत्त्यर्थमित्येतत्सिद्धम् । वर्णप्राधान्यं च वर्णस्येतराविशेषणत्वरूपं प्रत्ययनिरूपितविशेष्यतारूपं च, तेन गोहितमित्यादाववादिर्न, चित्रायां जाता चित्रेत्यादावण्योऽकारस्तदन्तान्ङीबिति ङीप् च न ।**

ही परिभाषा, जेथें वर्णाला प्राधान्य देऊन वर्णविषयक—म्हणजे वर्णाला होणारें-कार्य सांगितलें आहे, तेथेंच लागू पडते. असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' ह्या सूत्रांत 'स्थानिवदादेश:' ह्या सूत्रांतील 'स्थानिवत्' ह्या शब्दाची अनुवृत्ति होऊं शकत होती, (व अशी अनुवृत्ति मानली असती तर 'प्रत्ययलोपे' एवढेंच सूत्र पुरें झालें असतें,) व सूत्रार्थ व्यक्त होऊं शकत होता; तरी पण 'प्रत्ययलक्षणम्' हा शब्द ह्या सूत्रांत घातला आहे; ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, जेथें प्रत्ययाला प्राधान्य आहे व प्रत्यय इतराचें विशेषण झाला नसून इतरास प्राधान्य नाहीं (म्हणजे जेथें प्रत्ययनिमित्तक कार्य करणें आहे व वर्णनिमित्तक कार्य करणें नाहीं) अशाच ठिकाणीं 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र लागू पडतें. 'वर्णप्राधान्य' म्हणजे (१) वर्ण इतरांचें विशेषण केलेला नसून स्वत: प्रधानत्वानें सूत्रांत निर्दिष्ट केला आहे (जसें 'इकोयणचि,' 'एचोऽयवायाव:' 'आद्गुण:' इत्यादि ठिकाणीं वर्ण कशाचेंहि विशेषण न होतां, त्याचा प्रधानरूपानें सूत्रांत निर्देश केला आहे) व (२) जेथें वर्ण, प्रत्ययाचें विशेष्य केला जाऊन तशा रीतीनें तो सूत्रांत निर्दिष्ट केला

आहे. ( हें वर्णप्राधान्य वर सांगितलेल्या दोन प्रकारचें असतें, व ही परिभाषा जेथें वर्गाला प्राधान्य असतें तेथेंच लागते. ) म्हणूनच, ' गोहितम् ' इत्यादि ठिकाणीं अवादेश होत नाहीं; व ' चित्रायां जाता चित्रा ' इत्यादि ठिकाणीं ' अण् ' प्रत्ययांतील जो अकार तदन्तप्रातिपदिकाहून प्राप्त झालेला ' ङीप् ' होत नाहीं. (' गोहितम् ' इत्यादि ठिकाणीं. ' एचोऽयवायावः ' ह्या सूत्रांत ' एच् ' कशाचाहि विशेषण नसून प्रधानरूपानें सांगितला आहे; म्हणून ही परिभाषा लागते; व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें ' गो+ङे. ( ए )+हितम् ' यांतील ' ए ' चा लोप झाल्यावर ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र लागत नाहीं व अवादेश होत नाहीं. ' गोहितम् ' हें पहिल्या प्रकारच्या वर्गप्राधान्याचें उदाहरण होय. आतां दुसऱ्या प्रकारच्या वर्णप्राधान्याचें उदाहरण ' चित्रायां जाता चित्रा ' हें देतात. ह्या दुसऱ्या उदाहरणांत, 'सन्धिवेलाद्यृतुनक्षत्रेभ्योऽण् ' सू. १३८७ ह्या सूत्रानें ' अण् ' प्रत्यय होऊन, 'चित्रारेवतीरोहिणीभ्यः स्त्रियामुपसंख्यानम् '–सू० १४०८ वरील वार्तिक–ह्या वार्तिकानें त्या 'अण्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे, व 'लुक् तद्धितलुकि' सू. १४०८ ह्या सूत्रानें ' चित्रा ' ह्यांतील स्त्रीप्रत्यय ' टाप् 'ह्याचा लुक् झाला आहे. ' अण् ' व स्त्रीप्रत्यय ' टाप् ' या दोहोंचा वर सांगितल्याप्रमाणें. लुक् झाल्यामुळें, ' चित्र ' असें अदन्त प्रातिपदिक शिल्लक राहतें. आतां ह्या प्रतिपदिकाहून ज्या ' अण् ' प्रत्ययाचा ' चित्रारेवतीरोहिणीभ्यः ' ह्या वार्तिकानें लुक् झाला आहे तो ' अण् ' कायमच आहे अशी बुद्धि ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' ह्या सूत्रान्वयें केल्यास, 'टिड्ढाणञ्' सू० ४७० ह्या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय पावतो; परंतु ' ङीप् ' प्रत्यय होत नाहीं व 'चित्री' असें रूप होत नाहीं. कारण ' टिड्ढाणञ् ' ह्या सूत्रानें सांगितलेला ङीप् प्रत्यय तेव्हांच होतो, जेव्हां प्रातिपदिकाचें अन्तीं असणारा ' अ ' हा ' अण् ' प्रत्ययाचा अवयव आहे. हेंच पारिभाषिक शब्दांत सांगणें झाल्यास असें म्हटलें पाहिजे कीं, जेथें ' अण्प्रत्ययनिरूपित ' अकार '—म्हणजे 'अण्' प्रत्ययाचा अवयव असलेला अकार—प्रातिपदिकाचें अन्तीं आहे, तेथें ' अण् ' प्रत्यय हा विशेषण व ' अ ' हा त्याचें विशेष्य होऊन प्रत्यय गुणीभूत झाल्यामुळें, वर्णास प्राधान्य येतें; अशा वर्णप्रधानस्थलांत ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र लागू पडत नाहीं, व ज्या ' अण् ' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो ' अण् ' कायमच आहे अशी बुद्धि करितां येत नाहीं. सारांश ' टाप् ' प्रत्यय निघून गेल्यावर बाकी राहिलेलें प्रातिपदिक जें ' चित्र ' त्याच्या अन्तीं ' अण् ' ह्यांतील ' अ ' आहे असें कोणत्याहि तऱ्हेनें मानतां येत नसल्यामुळें, ' टिड्ढाणञ् ' या सूत्रानें 'ङीप्' न होतां, ' अजाद्यतष्टाप् ' सू० ४५४ ह्या सूत्रानें ' टाप् ' प्रत्यय होऊन ' चित्रा ' असें रूप सिद्ध होतें. )

**इयमल्विधौ स्थानिवत्वाप्राप्तावपि प्राप्तप्रत्ययलक्षणविधेर्निषेधिकेति स्पष्टं भाष्ये ॥ २१ ॥**

अल्विधि करितांना—म्हणजे अलाला मानून कार्य करितांना जरी आदेशाला

( ' स्थानिवदादेशोऽनल्विधौ '—सूत्र ४९ ह्या सूत्रानें ) स्थानिवद्भाव प्राप्त होत नाहीं तरी ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' ह्या सूत्रामुळें स्थानिवद्भाव प्राप्त होण्याचा संभव होता त्याचें निवारण करण्याकरितां, ही परिभाषा सांगितली आहे असें ( ' प्रत्ययलोपे प्रत्यलक्षणम् ' १-१-६२ ह्या सूत्रावरील ) भाष्यांत म्हटलें आहे.

---

# परिभाषा २२

**नन्वतः कृकमीत्यत्र कमिग्रहणेन सिद्धे कंसग्रहणं व्यर्थमत आह—**

' अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य ' सू० १६० ह्या सूत्रांत 'कमि' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, पुनः ' कंस ' शब्दाचें ग्रहण व्यर्थ ठरतें. ( ' कमि ' ह्याचा अर्थ ' कम् ' धातूपासून निघालेला शब्द असा आहे. ' कंस ' हा शब्द देखील ' कम् ' धातूस उणादि ' स ' प्रत्यय लागून झाला आहे. म्हणून ' कमि ' ह्या शब्दानें ' कंस ' शब्दाचें ग्रहण होतेंच. मग पुनः ' कंस ' हा शब्द सूत्रांत घाल-, ण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. तरी तो शब्द कां घातला आहे ह्याचें कारण कळावें, ) म्हणून ही परिभाषा सांगतात.—

## उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥ २२ ॥

" उणादिप्रत्ययान्त प्रातिपदिकें अव्युत्पन्न आहेत असें समजावें. "

( तीं प्रातिपदिकें धातूला प्रत्यय लावून सिद्ध झालीं आहेत असें न मानतां, तीं स्वतःसिद्धच शब्द आहेत असें समजावें. ह्यामुळें, ' कंस ' हा शब्द ' कम् ' धातूस उणादि ' स ' प्रत्यय लागून सिद्ध झाला आहे असें न मानतां, तो स्वतः-सिद्धच शब्द आहे असें मानलें पाहिजे. आणि म्हणूनच, 'कृकमि' ह्या सूत्रांत, ' कमि ' शब्दाचें ग्रहण केलें असून देखील, पुनः ' कंस ' शब्द घातला आहे. )

**इदमेवास्या ज्ञापकमिति कैयटादयः। कंसेस्तु न कंसोऽनभिधानात्॥ ' प्रत्ययस्य लुगि ' त्यादौ भाष्ये स्पष्टा।**

कैयटादिकांच्या मतें ' अतःकृकमि ' हें सूत्रच ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ' कंस् ' धातूपासून ' कंस ' हा शब्द निघाला नाहीं; तसा तो निघाला आहे असें मानल्यास, 'कंस' शब्दाचा जो अर्थ आहे तो अर्थ सांगण्यास तो शब्द समर्थ होऊं शकत नाहीं. ' प्रत्ययस्य लुक् '—१-१-६८ इत्यादि सूत्रावरील भाष्यांत ह्या परि-भाषेचा उल्लेख केला आहे.

**'ण्वुल्तृचा' वित्यादौ भाष्ये व्युत्पन्नानीत्यपि। इदं शाकटायनादिरीत्या।**

पाणिनेस्त्वव्युत्पत्तिपक्ष एवेति शब्देन्दुशेखरे निरूपितम् ॥ 'आयनेयी' ति सूत्रे भाष्ये स्फुटमेतत् ॥ २२ ॥

'ण्वुल्तृचौ' ३-१-१३३ इत्यादि सूत्रावरील भाष्यांत, सर्व प्रातिपदिकें व्युत्पन्न असतात (म्हणजे धातुला प्रत्यय लागून सिद्ध झालेलीं असतात) असें म्हटलें आहे; पण तें शाकटायनादिकांच्या मताला धरून म्हटलें आहे. परंतु पाणिनीच्या मतें (उणादि सूत्रांनीं सिद्ध झालेल्या प्रातिपदिकांच्या विषयांत व्युत्पत्तिपक्ष ग्राह्य नसून) अव्युत्पत्तिपक्षच ग्राह्य आहे हें शब्देन्दुशेखरांत सिद्ध केलें आहे. 'आयनेयी' ७-१-२ ह्या सूत्रावरील भाष्यांत देखील हेंच सांगितलें आहे.

---

# परिभाषा २३

ननु देवदत्तश्चिकीर्षतीत्यादौ देवादेः सन्नन्तत्वप्रयुक्तधातुत्वाद्यापत्तिरत आह—

'देवदत्तश्चिकीर्षति' इत्यादि स्थलीं 'देव' या शब्दानें सुरू होणारा ('देवदत्तश्चिकीर्ष' हा) पूर्ण शब्दसमुदाय सन्नन्त असल्यामुळें, त्याला ('सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रान्वयें) धातु मानण्याची आपत्ति येईल. ('सनाद्यन्ता धातवः' या धातुसंज्ञाविधायक सूत्रान्वयें ज्याच्या अखेरीस सन्, क्यच्, काम्यच् इत्यादि बारा प्रत्ययांपैकीं कोणताहि एक प्रत्यय असतो तशा प्रत्ययान्त शब्दाला धातुसंज्ञा प्राप्त होते. 'देवदत्तश्चिकीर्ष' हा शब्दसमुदाय देखील सन्नन्त आहे; तर मग याला वरील सूत्रान्वयें धातुसंज्ञा प्राप्त कां होऊं नये—अशी शङ्काकार शङ्का करतो; व ही शङ्का बरोबर मानल्यास आणि 'देवदत्तश्चिकीर्ष' हा पूर्ण शब्दसमुदाय धातु मानल्यास, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू० ६५० या सूत्रान्वयें 'देवदत्तः' या शब्दापुढील 'सु' प्रत्ययाचा 'लुक' करावा लागेल; तसेंच लुङाचें रूप करणें झाल्यास, 'देवदत्तश्चिकीर्ष' या पूर्ण शब्दसमुदायापूर्वी अडागम करावा लागेल; आणि त्याचप्रमाणें 'सन्यङोः' सू० २३९५ या सूत्रान्वयें द्वित्व करण्याचा प्रसंग आल्यास, पूर्ण शब्दसमुदायाच्या प्रथम एकाचाचें—म्हणजे 'दे' चें—द्वित्व करावें लागेल. तसें न व्हावें) म्हणून ही परिभाषा सांगतात.

## प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम् ॥२३ ॥

"जेथें (सूत्रांत) प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें ज्याहून तो प्रत्यय विहित आहे—म्हणजे पाणिनीय सूत्रान्वयें होतो—त्या शब्दाच्या प्रारंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप असतें तें पूर्ण शब्दस्वरूप त्या प्रत्ययानें गृहीत केलें जातें"

(जसें—'सनाशंस भिक्ष उः' सू० ३१४८ या सूत्रांत 'सन्' प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे. 'धातोः कर्मणः समानकर्तृकादिच्छायाम् वा' सूत्र २६०८ या सूत्रानें

धातूहून ' सन् ' प्रत्यय होणें सांगितलें आहे. म्हणून ज्या कोणत्याहि धातूहून ' सन् ' प्रत्यय होतो त्या धातूच्या प्रारंभापासून ' सन् ' प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप असेल—म्हणजे 'कृ+सन्=चिकीर्ष'—तें शब्दस्वरूप ' सन् ' प्रत्ययानें गृहीत केलें जातें, व तशा शब्दस्वरूपास ' सनाशंस ' या सूत्रान्वयें ' उ ' प्रत्यय होतो. त्याचप्रमाणें देवदत्त-श्चिकीर्ष ' या प्रकृत उदाहरणांत, 'धातोः कर्मणः' या सूत्रान्वयें ' कृ ' धातूहून ' सन् ' प्रत्यय झाला असल्यामुळें, तो ' कृ ' आदि आहे ज्याच्या व ' सन् ' प्रत्यय अन्तीं आहे ज्याच्या अशाच शब्दसमुदायास—म्हणजे ' चिकीर्ष ' यालाच—' सनाद्यन्ता ' या सूत्रान्वयें धातुसंज्ञा, या परिभाषेप्रमाणें, प्राप्त होते, ' देवदत्तश्चिकीर्ष ' या पूर्ण शब्द-समुदायास धातुसंज्ञा प्राप्त होत नाहीं; कारण ' देवदत्त+सु+कृ ' या शब्दसमुदायाला ' सन् ' प्रत्यय झाला नसून केवळ ' कृ ' ला तो प्रत्यय झाला आहे. असें असल्यामुळें वर ज्या आपत्ति दाखविल्या आहेत त्या आपोआप टळतात. )

**'यस्मात्प्रत्ययविधि'रिति सूत्रे यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्यय इति योगो विभज्यते। गृह्यमाण उपतिष्ठत इति शेषः। तेन तदाद्यन्तांशः सिद्धः। तदन्तांशस्तु 'येन विधि'रित्यनेन सिद्धः। स च शब्दरूपं विशेष्यमादाय विशेष्यान्तरासत्वे।**

' यस्मात्प्रत्ययविधिः तदादि प्रत्ययेऽङ्गम् ' सू० १९९ या सूत्राचे दोन भाग करावे, व प्रथम भाग ' यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्यये ' हा समजावा व त्याच्यापुढें ' गृह्यमाणे उपतिष्ठते ' हे शब्द अध्याहृत करावे. असें केलें म्हणजे या परिभाषेचा 'तदादि ' या शब्दापर्यंतचा भाग सिद्ध होतो. ( 'यस्मात्प्रत्ययविधिः' या सूत्राचे वर सांगितल्याप्रमाणें दोन भाग करून प्रथम भागाला ' गृह्यमाणे उपतिष्ठते ' हीं अध्या-हृत पदें जोडल्यास, ' प्रत्यये गृह्यमाणे, यस्मात्प्रत्ययविधिः तदादि इति अंशः उपति-ष्ठते'—म्हणजे जेथें सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें ज्या शब्दाहून तो प्रत्यय होणें सांगितलें आहे त्या शब्दस्वरूपाच्या प्रारंभापासून प्रत्ययापर्यंत जें शब्दस्वरूप असेल त्याचें ग्रहण होतें—असा अर्थ होतो. असा अर्थ होत असल्यामुळें, 'भू+मि' अशा स्थितींत ' भू ' धातूला ' शप् ' विकरण लागून ' भू+अ+मि=भो+अ+मि=भव्+अ+मि=भव+मि ' अशी स्थिति झाली असतां, ' भू ' आहे आदि ज्याच्या असें मिप्रत्य-यापर्यंत जें शब्दस्वरूप—म्हणजे 'भव'—आहे त्याचें ग्रहण होतें, व त्यामुळें 'अतो दीर्घो यञि ' सू० २१७० या सूत्रानें 'भव' यांतील अन्त्य अकार दीर्घ होऊन 'भवामि' असें रूप सिद्ध होतें.) या परिभाषेचा उरलेला भाग 'येन विधिस्तदन्तस्य' सू० २६ या सूत्रानें सिद्ध होतो. (ही परिभाषा नीट समजण्याकरितां 'तदादि' म्हणजे काय, 'तदन्त' म्हणजे काय, व 'तदादितदन्त' म्हणजे काय हें जाणणें आवश्यक आहे. ' तदादि ' व ' तदन्त ' हे दोन्ही शब्द अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासानें बनलेले शब्द आहेत.'सः =यस्मात्प्रत्ययो विहितः सः शब्दः, आदिः यस्य शब्दस्वरूपस्य सः तदादिः,' व 'सः

प्रत्ययः अन्ते यस्य शब्दस्वरूपस्य सः तदन्तः,' असा या दोन शब्दांचा विग्रह आहे. वर दिलेल्या विग्रहावरून हें स्पष्ट होतें कीं, या ठिकाणीं 'शब्दस्वरूप' हा अन्यपदार्थ प्रधान —म्हणजे विशेष्य—आहे. या दोन शब्दांचा असा अर्थ असल्यामुळें, ज्या शब्दाहून प्रत्यय होणें सांगितलें आहे त्या शब्दाच्या प्रारंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप असेल तें 'तदादितदन्त' होय असा अर्थ सिद्ध होतो; व जेथें सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें ह्या परिभाषेप्रमाणें, त्या प्रत्ययानें अशा 'तदादितदन्त' शब्द स्वरूपाचें ग्रहण होतें. ) जेथें सूत्रांत कोणत्याहि विशेष्याचा निर्देश केला नसेल तशा ठिकाणीं तदन्तांश हा शब्दस्वरूपाचें विशेषण होतो. ( पण जेथें सूत्रांत विशेष्याचा निर्देश केला असेल तेथें तदन्तांश सूत्रांत निर्दिष्ट किंवा अनुवृत्त असलेल्या विशेष्याचें विशेषण होतो. जसें 'ष्यङः संप्रसारणम्' सू० १००३ ह्या सूत्रांत विशेष्य निर्दिष्ट किंवा अनुवृत्त नाहीं; तसेंच 'ङ्याप् प्रातिपदिकात्' सू० १८२ ह्या सूत्रांत देखील 'ङी' व 'आप्' ह्यांचें विशेष्य निर्दिष्ट किंवा अनुवृत्त नाहीं. म्हणून अशा ठिकाणीं 'ष्यङः' व 'ङ्याप्' ह्यांचा 'ष्यङन्तात्, ङीबन्तात्, आबन्तात् शब्दस्वरूपात्'—म्हणजे ज्याहून हे प्रत्यय झाले आहेत त्याच्या प्रारंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप होतें तें शब्दस्वरूप—असा अर्थ होतो, परंतु 'टिड्ढाणञ्' सू० ४७० व 'यञञोश्च' सू० ११०८ इत्यादि सूत्रांत ' ङ्याप् प्रातिपदिकात्' सू० १८२ या अधिकारसूत्रांतील 'प्रातिपदिकात्' हें पद अनुवृत्त असल्यामुळें अण्णन्तात् प्रातिपदिकात्, यञन्तात्, अञन्तात् प्रातिपदिकात् ' असा अर्थ होतो.)

**यत्तु प्रत्ययेन स्वप्रकृत्यवयवकसमुदायाक्षेपात्तद्विशेषणत्वेन तदन्तविधिरिति, तन्न । इयानित्यादौ तस्य तादृशसमुदायेन व्यभिचारेणाक्षेपासम्भवात् ॥**

( प्रत्ययाला कार्य होणें सांगितलें असल्यास, केवळ प्रत्ययाचा भाषेंत प्रयोग होत नसल्यामुळें, प्रकृतिसहित असलेल्या प्रत्ययालाच कार्य होणार आणि एतन्मूलकच तदन्तविधि होत असतो. ह्या परिभाषेचा तदन्तांश ह्या वरील न्यायानें—म्हणजे प्रत्ययानें प्रकृति आपोआपच आक्षिप्त होते ह्या न्यायानें—सिद्ध होत असल्यामुळें, 'येन विधिस्तदन्तस्य' ह्या सूत्राची मदत घेऊन तदन्तांश सिद्ध करण्याची गरज नाहीं—अशी शंकाकाराची शंका आहे व तो असें म्हणतो कीं, ) प्रत्ययानें, तो प्रत्यय, व ज्याहून तो प्रत्यय झाला आहे ती प्रकृति, या दोन्ही अवयवांच्या समुदायाचें आपोआप ग्रहण होत असल्यामुळें, अशा प्रकृतिप्रत्ययसमुदायरूप शब्दविशेषाचें ' तदन्त ' हा विशेषण होतो. ( पण ग्रन्थकार म्हणतात कीं. ) हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' इयान् ' इत्यादि उदाहरणांत प्रकृतिप्रत्ययसमुदायरूप शब्दस्वरूपाची उपस्थिति होत नसल्यामुळें—म्हणजे अशा ठिकाणीं प्रकृतीचा लोप होऊन केवळ प्रत्ययच बाकी राहत असल्यामुळें—वरील नियम व्यभिचरित होतो, व प्रत्ययानें प्रकृति आपोआप आक्षिप्त होते असें मानतां येत नाहीं. (आणि म्हणूनच शंकाकारानें दिलेल्या वरील न्यायाचें अवलंबन केल्यानें तदन्तांश सिद्ध होत नसल्यामुळें, ' येन विधिस्तदन्तस्य ' ह्या सूत्राच्या मदतीनेंच तो सिद्ध होतो. ' इयान् '

ह्या स्थलीं शंकाकारानें सांगितलेला साहचर्यनियम कसा व्यभिचरित होतो हें खालीं दिलेल्या प्रक्रियेवरून स्पष्ट होईल.—:' किमिदंभ्यां वो घः ' सू० १८४१ ह्या सूत्रानें ' इदम् ' शब्दास 'परिमाण ' ह्या अर्थामध्यें ' वतुप् ' प्रत्यय होऊन व त्या प्रत्ययांतील वकाराचे जागीं 'घ् ' म्हणजे ' इय् ' असा आदेश होऊन, ' इदम्+वत्= इदम्+घत =इदम्+इयत् ' अशी स्थिति होते, व ह्यानंतर 'इदं किमोरीश्की' सू० ११०८ ह्या सूत्रानें ' इदम् ' चे जागीं ' ई ' असा आदेश होऊन, ' ई+इयत् ' अशी स्थिति झाली असतां, ' यस्येति च ' सू० ३११ ह्या सूत्रानें ' ई ' चा लोप होऊन ' इयत् ' एवढा प्रत्ययच शिलक राहतो व प्रकृतीचा कोणताहि भाग शिलक राहत नाहीं. तसेंच ' अस्य अपत्यं इः=अ+इञ् ' ह्या स्थलीं देखील, ' यस्येति च ' ह्या सूत्रानें ' अ ' ह्या प्रकृतीचा लोप होऊन, ' इ ' हा प्रत्ययच बाकी राहतो. म्हणून प्रत्ययग्रहणानें प्रकृति आपोआप उपस्थित होते हा नियम स्वीकारतां येत नाहीं. )

**यत्र प्रत्ययो निमित्तत्वेनाश्रीयते तत्र तदादेरित्यन्तांशमात्रोपस्थिति-रिति ' अङ्गस्ये ' ति सूत्रे भाष्यकैयटयोः ।**

जेथें सूत्रांत प्रत्यय हा निमित्तरूपानें सांगितला आहे—ह्मणजे प्रत्यय व्हावा असें विधान केलें नसून प्रत्ययामुळें अङ्गाला कार्य होणें सांगितलें आहे—तेथें ह्या परिभाषेचा तदादि अंशच केवळ उपस्थित होतो असें ' अङ्गस्य ' ६–४–१ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारानें व कैयटानें ह्मटलें आहे ( त्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें खाली लिहिल्याप्रमाणें ह्मटलें आहेः—'यत्र प्रत्ययो निमित्तत्वेनोपादीयते तत्र पूर्वः कार्यित्वेन गृह्यमाणो यस्मात्स विहितस्तदादिर्गृह्यते । एतच्चाङ्गसंज्ञासूत्रे योगविभागेन साधितम् । यत्र तु प्रत्यय एव कार्यित्वेनोपादीयते तत्र तदन्तग्रहणमिति द्वे एते परिभाषे' । ह्या पङ्क्तीचें स्पष्टीकरण करण्यापूर्वीं हें सांगणें आवश्यक आहे कीं कोठें कोठें सूत्रांत प्रत्यय व्हावा असें विधान करण्याच्या हेतूनें प्रत्ययाचें ग्रहण विधेयांशांत केलें असतें; अशा ठिकाणीं ही परिभाषा लागू पडत नाहीं. परंतु जेथें प्रत्यय विधेय नसून उद्देश्य असतो—ह्मणजे प्रत्ययनिमित्तामुळें प्रत्ययाच्या पूर्वीं असणाऱ्यास कार्य सांगितलें आहे किंवा प्रत्ययास्च कार्य होणें सांगितलें आहे तेथें ह्या परिभाषेच्या कोणत्या भागाची उपस्थिति होते हें कैयटानें सांगितलें आहे. कैयटाचें ह्मणणें असें आहे कीं, जेथें सूत्रांत प्रत्ययनिमित्तक कार्य होण्याकरितां प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें प्रत्यायाच्या पूर्वीं असणाऱ्या शब्द-स्वरूपास कार्य होत असल्यामुळें, ह्या परिभाषेच्या तदादि अंशाचीच उपस्थिति होते व तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं. ह्याचा अर्थ असा कीं अशा ठिकाणीं प्रत्ययान्त शब्दस्वरूपाचें ग्रहण न होतां, प्रत्ययापर्यंतच्याच शब्दस्वरूपाचें ग्रहण होतें. जसें 'सुपि च' सू. २०२ 'ओसि च' सू० २०७ 'नामि' सू० २०९ इत्यादि स्थलीं प्रत्ययाचें ग्रहण सप्तमीविभक्तींत केलें असल्यामुळें, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ह्या सूत्रान्वयें तो प्रत्यय त्याच्या लगेच मागें असलेल्या शब्दस्वरूपास कार्य होण्याचें निमित्त होतो, व येथें प्रत्य-

याच्या निमित्तामुळें कार्य होणें असल्यामुळें, प्रत्ययान्ताचें ग्रहण न होतां, ज्या शब्दाहून प्रत्यय झाला आहे त्या शब्दाच्या प्रत्ययापर्यंतच्या भागाचेंच ग्रहण होतें; सारांश अशा स्थळीं तदादि अंशाचीच उपस्थिति होते, दोन्ही अंशांची उपस्थिति होत नाहीं. परंतु जेथें सूत्रांत प्रत्यय कार्यित्वानें निर्दिष्ट आहे—ह्मणजे जेथें सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण करून त्या प्रत्ययालाच कार्य होणें सांगितलें आहे—तेथें तदन्तांशाची उपस्थिति होते. जसें—'ष्यङः संप्रसारणम्' सू. १००३ ह्या सूत्रांत 'ष्यङ्' प्रत्ययाचें ग्रहण केलें असून त्या प्रत्ययालाच संप्रसारणरूप कार्य होणें सांगितलें आहे. अशा ठिकाणीं तदन्तांशाची उपस्थिति होते व ष्यङ्प्रत्ययान्त शब्दस्वरूपाचें ग्रहण होतें. प्रत्यय निमित्तरूपानें सूत्रांत निर्दिष्ट असल्यास जी तदादि अंशाची उपस्थिति होते, व कार्यित्वानें निर्दिष्ट असल्यास जी तदन्तांशाची उपस्थिति होते, ती षष्ठीविभक्तींत होते. जसें, 'सुपि परे अदन्ताङ्गस्य दीर्घः स्यात्, ओसि परे अदन्ताङ्गस्य एकारः स्यात्, नामि परे अजन्ताङ्गस्य दीर्घः स्यात्, ष्यङन्तस्य पूर्वपदस्य संप्रसारणं स्यात्,' इत्यादि.)

**एवं यत्रापि पञ्चम्यन्तात्परः प्रत्यय आश्रीयते तत्रापि तदादीत्यन्तांशोपस्थितिः, परन्तु तत्र पञ्चम्यन्तता। अत एवैङ्ह्रस्वादिति सूत्रे एङन्तादित्यर्थलाभः।**

(कैयटानें वर दिलेल्या उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं,—'यत्र तु प्रत्ययः कार्यित्वेनोपादीयते तत्र तदन्तग्रहणम्;' पण ह्याला देखील अपवाद आहे, व तो अपवाद ग्रन्थकार ह्या पङ्क्तींत सांगतात.) ह्याचप्रमाणें जेथें सूत्रांत पञ्चम्यन्त शब्द उच्चारला असून त्यानंतर प्रत्ययाचा उद्देश्यकोटींत निर्देश केला असेल तेथें देखील ह्या परिभाषेच्या केवळ तदादि अंशाचीच उपस्थिति होते. (व तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं—म्हणजे प्रत्ययान्त शब्दस्वरूप उपस्थित न होतां प्रत्ययापर्यन्तचेंच शब्दस्वरूप उपस्थित होतें.) परंतु अशा ठिकाणीं तदादि अंशाची पञ्चमीविभक्तींत उपस्थिति होते. (व हा उपस्थित झालेला तदादि अंश विशेष्य होऊन सूत्रांत निर्दिष्ट असलेली पञ्चम्यन्त पदें त्याचीं विशेषणें होतात, आणि त्यामुळें 'येन विधिस्तदन्तस्य' —म्हणजे 'विशेषणं तदन्तस्य संज्ञा स्यात्'—या सूत्रान्वयें त्या पञ्चम्यन्त पदांना तदन्तविधि होतो. जसें 'अतो भिस ऐस्' सू० २०३ किंवा 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू० २०८ या सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे व तें प्रत्ययाला कार्य होण्याकरितां केलें आहे. अशा स्थलीं पञ्चम्यन्त पदानंतर प्रत्यय उच्चारला असल्यामुळें, 'तस्मादित्युत्तरस्य' ह्या सूत्रान्वयें प्रत्यय कार्यी ठरतो, व प्रत्ययानें प्रत्ययान्ताचें ग्रहण न होतां, प्रत्ययाच्या अव्यवहितपूर्व भागाचें —म्हणजे ज्याहून तो प्रत्यय झाला आहे त्याच्या प्रत्ययापर्यंतच्या शब्दस्वरूपाचें—ग्रहण होतें व त्या शब्दस्वरूपाची पञ्चमी विभक्तींत उपस्थिति होते. जसें 'अदन्तात् अङ्गात् परस्य भिसः ऐस् स्यात्, ह्रस्वान्तात्, नद्यन्तात् आबन्तात् अङ्गात् परस्य आमः नुट् स्यात्' इत्यादि.) असें आहे म्हणूनच 'एङ्ह्रस्वात्सम्बुद्धेः' सू० १९३ ह्या सूत्रांतील

' एङ् ' ह्याचा ' एङन्तात् ' असा अर्थ होतो. ( या सूत्रांत सम्बुद्धिप्रत्ययाचें ग्रहण केलें आहे, व तें 'एङ्ह्रस्वात्' ह्या पञ्चम्यन्त पदानंतर केलें असल्यामुळें, तो कार्यी ठरतो व तदादि अंशाची पञ्चमींत उपस्थिति होऊन सूत्रांत असलेलीं पञ्चम्यन्त पदें त्याचीं विशेषणें होतात व त्यामुळें त्या सूत्राचा ' एङन्तात् ह्रस्वान्ताच्चाङ्गात् परस्य सम्बुद्धिप्रत्ययस्य लोपो भवति ' असा अर्थ होतो. सारांश जेथें सूत्रांत प्रत्ययाचें (१) निमित्तरूपानें ग्रहण केलें आहे, किंवा (२) 'कार्यी' ह्या रूपानें ग्रहण केलें असून तो प्रत्यय पञ्चम्यन्त पदानंतर उच्चारला आहे अशा दोन्ही ठिकाणीं ह्या परिभाषेच्या केवळ तदादि अंशाचीच उपस्थिति होते. पण दोहोंत फरक हाच कीं, प्रथमस्थलीं तदादि अंश षष्ठीविभक्तींत उपस्थित होतो व द्वितीय स्थलीं तो पञ्चमीविभक्तीत उपस्थित होतो. )

अस्याः परिभाषायाः प्रयोजनान्तरं ' येन विधि'रित्यत्र भाष्य उक्तं ' परमगार्ग्यायण ' इति, परमगार्ग्यस्यापत्यमिति विग्रहेऽपि गार्ग्यशब्दादेव प्रत्ययो न विशिष्टात्। निष्कृष्य तावन्मात्रेणैकार्थीभावाभावेऽपि वृत्तिर्भवत्येव। अत्र चेदं भाष्यमेव मानमित्यन्यत्र विस्तरः।

'येन विधिस्तदन्तस्य' १–१–७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्या परिभाषेचें दुसरेंहि प्रयोजन सांगितलें आहे व तें प्रयोजन हें आहे कीं, परमगार्ग्यायणः ' ह्या पदाचा ' परमगार्ग्यस्य अपत्यम् ' असा जरी विग्रह होतो तरी ' परमगार्ग्य ' ह्या शब्दांत असलेल्या ' गार्ग्य ' शब्दाहूनच (' फक् ') प्रत्यय व्हावा व ' परमगार्ग्य ' ह्या पूर्ण शब्दाहून तो प्रत्यय होऊं नये. परमगार्ग्य ' या शब्दसमुदायांतून ' गार्ग्य ' हा शब्द वेगळा काढल्यास त्या 'गार्ग्य' शब्दाशीं जरी ( अपत्यार्थक 'फक्' प्रत्यय याचा ) अर्थ जुळत नाहीं ( व परमगार्ग्यायण हा गार्ग्याचा अपत्य नसून, परमगार्ग्याचा अपत्य असल्यामुळें, वास्तविक अपत्यार्थक ' फक् ' प्रत्ययाचा अर्थ ' परमगार्ग्य ' या संपूर्ण शब्दाशींच जुळतो ). तरी ( ही परिभाषा असल्यामुळें ) केवळ ' गार्ग्य ' शब्दाहूनच ' फक ' प्रत्यय होतो, व याला वरील भाष्यच प्रमाण आहे असें इतर ग्रन्थांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे. ( ' गर्गादिभ्यो यञ्' सू० ११०७ या सूत्रानें ' गर्ग ' शब्दास ' यञ् ' प्रत्यय होऊन ' गार्ग्यः ' असें रूप होतें. ' गार्ग्य ' हा शब्द यञ्प्रत्ययान्त आहे, ' परमगार्ग्य ' हा शब्द यञ्प्रत्ययान्त नाहीं; कारण ' परमगर्ग ' शब्दाहून ' यञ ' प्रत्यय झाला नाहीं. ह्मणून ' यञिञोश्च ' सू० ११०३ या सूत्रान्वयें ' यञ् ' प्रत्ययान्त 'गार्ग्य' शब्दासच ' फक् ' प्रत्यय होतो. ही परिभाषा नसती तर ' परमगार्ग्य ' या शब्दांत ' गार्ग्य ' हा यञन्त शब्द अन्तीं असल्यामुळें त्या संपूर्ण शब्दाहून ' फक् ' प्रत्यय झाला असता व हा तद्धित ' फक् ' प्रत्यय ' कित् ' असल्यामुळें, ' किति च ' सू० १०७६ या सूत्रान्वयें आद्यचाला वृद्धि होऊन ' पारमगार्ग्यायणः ' असें विकृत रूप झालें असतें. पण ' यञिञोश्च ' या सूत्रांत ' यञ् ' प्रत्ययाचें कार्यित्वानें ग्रहण केलें असल्यामुळें, या परिभाषेप्रमाणें त्या प्रत्ययानें, ज्याहून तो प्रत्यय

झाला आहे त्या शब्दाच्या प्रारंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप—म्हणजे 'गर्ग+यञ् =गार्ग्य' एवढ्याचेंच, ग्रहण होतें, व त्याला 'फक्' प्रत्यय होऊन 'परम-गार्ग्यायणः' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. या परिभाषेचा तदादि अंश 'यस्मात्प्रत्ययविधिः' सू० १९९ या सूत्रानें सिद्ध होतो, व तदन्तांश 'येन विधिः' सू० २६ या सूत्रानें सिद्ध होतो असें वर सांगितलेंच आहे. त्यामुळें अशी शंका सहज उत्पन्न होते कीं, वर सांगितलेलीं दोन सूत्रें असतांना ही परिभाषा मानण्याची गरज काय ? या शंकेचें निरसन करण्याकरितां ग्रन्थकारानें वरील भाष्याचें प्रमाण दिलें आहे, व तें भाष्य असें सांगतें कीं जरी ही परिभाषा वरील दोन सूत्रांनीं सिद्ध होते तरी ती मानणें आवश्यक आहे; कारण ती न मानल्यास 'परमगार्ग्यायणः' इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. )

**प्रत्ययमात्रग्रहणे एषा न तु प्रत्ययाप्रत्ययग्रहण इति 'उगितश्चे' ति सूत्रे भाष्ये ॥ इयमङ्गसंज्ञासूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ २३ ॥**

जेथें सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें केवळ प्रत्ययाचेंच ग्रहण होत असेल (व प्रत्ययभिन्नाचें ग्रहण होत नसेल ) तशाच ठिकाणीं ही परिभाषा लागू पडते. परंतु जेथें सूत्रांत उच्चारलेला शब्द प्रत्यय व अप्रत्यय—म्हणजे प्रत्ययभिन्न शब्द—या दोहोंचाहि वाचक असेल तेथें ही परिभाषा लागत नाहीं, असें 'उगितश्च' ४–१–६ या सूत्रा-वरील भाष्यांत सांगितलें आहे. ( 'उगित्' याचा अर्थ ज्यांत 'उक्'—म्हणजे उ, ऋ, किंवा ऌ—इत् आहे, असा आहे. 'मतुप्' इत्यादि प्रत्ययांत उकार इत् असल्यामुळें ते प्रत्यय 'उगित्' आहेत. तसेंच सर्वादिगणांत पठित असलेल्या 'भवतु' या सर्व-नामांतील उकार इत् असल्यामुळें 'भवतु' हें प्रातिपदिक देखील 'उदित्' आहे. सारांश, 'उगितश्च' या सूत्रांतील 'उगित्' हा शब्द जसा प्रत्ययाला लागू पडतो तसा प्रत्ययभिन्नाला देखील लागू पडतो. म्हणून अशा ठिकाणीं ही परिभाषा लागत नाहीं, व त्यामुळें 'यवमती' व 'निर्यवमती' अशी रूपें सिद्ध होण्यांत अडचण येत नाहीं. वास्तविक 'यव+मतुप्=यवमत्' या स्थलीं 'यव' शब्दाहून 'मतुप्' प्रत्यय झाला असल्यामुळें, 'यवमत्' हा शब्द 'मतुप्' प्रत्ययान्त मानला जाऊं शकतो, पण 'निर्यव' या शब्दाहून 'मतुप्' प्रत्यय झाला नसल्यामुळें, 'निर्यव-मत्' हा शब्द 'मतुप्' प्रत्ययान्त मानतां येत नाहीं. त्यामुळें प्रकृत परिभाषेप्रमाणें 'ङीप्' प्रत्यय लागून 'यवमती' असें रूप होऊं शकेल, पण 'निर्यवमती' असें रूप होऊं शकणार नाहीं. परंतु जेथें सूत्रांत प्रत्यय व अप्रत्यय या दोहोंसहि लागू पडणारा असा उभयसाधारण शब्द उपयोगांत आणला आहे तेथें, वर सांगितल्याप्रमाणें, प्रकृत परिभाषा लागत नसल्यामुळें, जसें 'यवमती' हें रूप सिद्ध होतें तसें 'निर्यवमती' हें रूप देखील सिद्ध होतें. ) यस्मात्प्रत्ययविधिः १–४–१३ या अङ्गसंज्ञाविधायक सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

# परिभाषा २४

"येन विधिरिति सूत्रे भाष्य एतद्घटकतदन्तांशस्यापवादः पठ्यते–"

" 'येन विधिः' १–१–७२ या सूत्रावरील भाष्यांत, मागील परिभाषेंत जे दोन–म्हणजे तदादि व तदन्त—अंश सांगितले आहेत त्यापैकीं 'तदन्त' या अंशाचा अपवाद असणारी ही परिभाषा पठित केली आहे:—

## प्रत्ययग्रहणे चापञ्चम्याः ॥ २४ ॥

जेथें सूत्रांत पञ्चम्यन्त पद खेरीज करून इतर पदानंतर प्रत्ययाचें ग्रहण (प्रत्यय व्हावा या हेतूनें केलें नसून इतर कार्य होण्याकरितां) केलें आहे तशा ठिकाणीं तदन्त-विधि होतो (पण जेथें सूत्रांत पञ्चम्यन्त पदानंतर प्रत्ययाचा निर्देश केला आहे तेथें तदन्तविधि होत नाहीं).

**"यत्र पञ्चम्यन्तात्परः प्रत्ययः कार्यान्तरविधानाय परिगृह्यते तत्र तदन्तविधिर्नेत्यर्थः। यथा 'रदाभ्यां निष्ठातो नः' इत्यत्र, तेन दृषत्तीर्णेत्यादौ धातुतकारस्य न नत्वम्। तदन्तेत्यंशानुपस्थितावपि तदादीत्यंशस्योपस्थितौ रेफदान्तात्परस्य निष्ठातस्येत्यर्थ इति न दोषस्तदंशानुपस्थितौ मानाभावात्, तदन्तांशोपस्थितौ तूभयोरेकविषयत्वमेव स्यादिति दृषत्तीर्णेत्यादौ दोषः स्यादेव।**

('येन विधिः' या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा वार्तिकरूपानें पठित केली असून, ती 'प्रत्ययग्रहणं चापञ्चम्याः' या शब्दांत पठित केली आहे, व नागेशानें उद्योतांत तिचा अर्थ खालीं लिहिल्याप्रमाणें केला आहे:–' पञ्चम्यन्तात् परः प्रत्ययो यत्र कार्यान्तरविधानायानूद्यते तद्भिन्नस्थले प्रत्ययग्रहणं तदन्तविधेः प्रयोजनमिति वार्तिकार्थः' व या परिभाषेचा जो अर्थ वर दिला आहे तोच या पंक्तीचा अर्थ आहे.) जेथें सूत्रांत पञ्चम्यन्त पदानंतर प्रत्ययाचें ग्रहण केलें असतें व तें प्रत्ययग्रहण (प्रत्ययाच्या विधानाकरितां–म्हणजे प्रत्यय व्हावा असें सांगण्याच्या हेतूनें केलें नसून,) कांहीं तरी भिन्न कार्य सांगण्याच्या हेतूनें (उद्देश्यकोटींत) केलें असतें तेथें तदन्तविधि होत नाहीं. (म्हणजे प्रत्ययानें प्रत्यायान्ताचें ग्रहण न होतां केवळ प्रत्ययाचेंच ग्रहण होतें, व तशा ठिकाणीं 'प्रत्यय' हा प्रत्ययाचाच वाचक असतो, आणि 'प्रत्ययग्रहणे' या परिभाषेचा केवळ तदादि अंश उपस्थित होतो व तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं.) याचें उदाहरण 'रदाभ्यां निष्ठातो नः' सू० ३०१६ हें सूत्र आहे. (या सूत्रांत 'निष्ठा' प्रत्ययाचें–म्हणजे 'क्त' व 'क्तवत्' या प्रत्ययांचें—'रदाभ्याम्' या पञ्चम्यन्त पदानंतर ग्रहण केलें आहे, व तें

प्रत्ययाचें विधान करण्याच्या हेतूनें केलें नसून कार्यान्तरविधानाकरितां--म्हणजे निष्ठा प्रत्ययांतील तकाराचा नकार व त्याच्या लगेच पूर्वीं असणाऱ्या धातूंतलि दकाराचा नकार होण्याकरितां--केलें आहे. म्हणून या सूत्रांतलि ' निष्ठा ' या शब्दाचा, या परिभाषेप्रमाणें, निष्ठासंज्ञकप्रत्यय असाच अर्थ होतो; अशा ठिकाणीं तदन्तविधि होत नसल्यामुळें ' निष्ठान्त ' असा अर्थ होत नाहीं. ) त्यामुळें ' दृषत्तीर्णा ' इत्यादि स्थलीं धातूंत असलेल्या तकाराचें नत्व होत नाहीं ( व निष्ठासंज्ञकप्रत्ययांतील तकाराचेंच नत्व होतें.) ' प्रत्ययग्रहणे ' या परिभाषेच्या तदन्तांशाची उपस्थिति होत नसली तरी तदादि अंशाची उपस्थिति होत असल्यामुळें, 'रदाभ्यां निष्ठातो नः' या सूत्राचा 'रेफान्तापुढें किंवा दान्तापुढें असलेल्या निष्ठेंतील तकाराचा नकार होतो ' असा अर्थ होतो व त्यामुळें ' दृषत्तीर्णा ' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ( पञ्चम्यन्त पदानंतर प्रत्यय उच्चारला असल्यास जशी तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं तशी ) तदादि अंशाची (देखलि) उपस्थिति होत नाहीं असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. अशा ठिकाणीं तदन्तांशाचीहि उपस्थिति झाल्यास, तदादि व तदन्त हे दोन्ही अंश एकाच शब्दस्वरूपास-म्हणजे 'तॄ+क्त=तीर्+क्त' अशा शब्दस्वरूपास लागू पडतील, व त्यामुळें इष्ट रूप सिद्ध होण्यांत अडचण येईलच. ( ' दृषद्+तॄ+क्त ' येथें 'तॄ' धातूहून 'क्त' प्रत्यय झाला आहे. ' ऋत इद् धातोः ' सू० २३९० या सूत्रानें धातूंतील ऋकाराचे जागीं इकार होऊन, ' उरण् रपरः ' सू० ७० या सूत्रानें इकारापुढें रकार होऊन, व ' हलि च ' सू० ३५४ या सूत्रानें इकाराचा दीर्घ होऊन 'दृषद्+तीर्+क्त' अशी स्थिति होते व 'रदाभ्यां निष्ठातो नः ' सू० ३०१६ या सूत्रानें निष्ठाप्रत्यय जो तकार त्याचा नकार होऊन, 'रषाभ्यां नो णः ' सू० २३५ या सूत्रानें नकाराचा णकार होऊन, दृषत्तीर्ण ' असें रूप होतें. सारांश या स्थलीं ' रदाभ्याम् ' या पञ्चम्यन्त पदानंतर ' निष्ठा ' प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें, प्रकृत परिभाषेप्रमाणें तदन्तांशाची उपस्थिति होत नसून केवळ तदादि अंशाची उपस्थिति होत असल्यामुळें, ' यस्मात् निष्ठाप्रत्ययो विहितः तदादेः रेफदान्तात् शब्दस्वरूपात् परस्य निष्ठातकारस्य नकारः स्यात् ' असा ' रदाभ्याम् ' या सूत्राचा अर्थ होऊन ' दृषत्तीर्ण ' हें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. या स्थलीं जशी तदादि अंशाची उपस्थिति होते तशी तदन्तांशाचीहि उपस्थिति झाली असती व ' निष्ठा ' प्रत्ययानें निष्ठान्त शब्दस्वरूपाचें ग्रहण झालें असतें तर 'रदाभ्याम्' या सूत्राचा ' यस्मात् प्रत्ययो विहितः तदादेः तदन्तस्य=प्रत्ययान्तस्य यः तकारः सः रेफाद्दकारात् परश्चेत् तस्य नकारो भवति, पूर्वस्य दकारस्य च नकारो भवति ' असा अर्थ झाला असता, व ' दृषत्+तीर्+क्त ' या उदाहरणांत ' दृषद् ' यांतलि दकारापुढें, तदादितदन्त--म्हणजे ज्याहून 'क्त' प्रत्यय झाला आहे असा क्त प्रत्ययान्त--'तीर्+क्त' हा शब्द असल्यामुळें, ' तीर् ' यांतलि आदितकाराचा नकार व त्याच्या लगेच मागें असलेल्या ' दृषद् यांतील अन्त्य दकाराचा नकार होऊन ' दृषन्नीर्त ' असें विकृत रूप झालें असतें व ' दृषत्तीर्ण ' असें रूप सिद्ध होऊं शकलें नसतें. )

**'स्यातासी ऌलुटो' रित्यादौ ऌलुटोः परयोरित्यर्थे नियमेनावधिसाकाङ्क्षत्वेनोपस्थितधातोरित्यस्यावधित्वेनान्वयान्न तदन्तविधिः।**

( 'स्यतासी ऌलुटोः' या सूत्रांत 'ऌ' व 'लुट्' यांचा पञ्चम्यन्तपदानंतर निर्देश केला नसल्यामुळें, या सूत्रास प्रकृत परिभाषा लागू नये, व प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें तदादि व तदन्त या दोन्ही अंशांची उपस्थिति व्हावी, व ते दोन्ही अंश उपस्थित झाल्यास, 'यस्मात् ऌलुटौ विहितौ तदादौ ऌन्ते लुडन्ते वा शब्दस्वरूपे परे सति अव्यवहितपूर्वे स्यतासी स्तः'—ह्मणजे ज्याहून ऌ किंवा लुट् झाला आहे असा ऌन्त किंवा लुडन्त शब्द पुढें असल्यास त्याच्या लगेच मागें 'स्य' व 'तास्' अनुक्रमें होतात—असा 'स्यतासी ऌलुटोः' या सूत्राचा अर्थ होईल, व त्या अर्थान्वयें 'भू+ऌट्' अशा स्थितींत, ऌडन्त 'भू' धातूच्या मागें 'स्य' हें विकरण लावण्याची आपत्ति येईल. त्या आपत्तीचें निवारण कसें होतें हें ग्रन्थकार या पंक्तींत सांगतात.) 'स्यतासी ऌलुटोः' सू० २१८६ इत्यादि सूत्रांत 'ऌलुटोः' या निमित्तसप्तमीचा 'ऌ किंवा लुट्' पुढें असतां असा अर्थ होत असल्यामुळें, 'कशापुढें असतां' अशी आकांक्षा अवश्य उत्पन्न होते, व ती आकांक्षा पूर्ण करण्याकरितां ( 'धातोः एकाचः हलादेः' सू० २६२९ या पूर्वसूत्रांतून ) 'धातोः' या पञ्चम्यन्तपदाची अनुवृत्ति करावी लागते, व त्या पदाचा अवधिवाचक अर्थामध्यें 'ऌलुटोः' या पदाशीं अन्वय होत असल्यामुळें, अशा ठिकाणीं, या परिभाषेप्रमाणें, तदन्तविधि होत नाहीं. ( सारांश, सूत्रांत पञ्चम्यन्त पद उच्चारलें असल्यास किंवा अनुवृत्त असल्यास व त्यापुढें प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यास जसा तदन्तविधि होत नाहीं, त्याचप्रमाणें जेथें 'कशाच्या पुढें' अशा प्रकारच्या अवधीची आकांक्षा पूर्ण करण्याकरितां पञ्चम्यन्तपद आक्षिप्त—ह्मणजे अध्याहृत—करावें लागतें अशा ठिकाणीं देखील प्रकृत परिभाषा लागते, व तदन्तांशाची उपस्थिति न होतां, केवळ तदादिअंशाचीच उपस्थिति होते. त्यामुळें 'स्यतासी' या सूत्रांत अवधीची आकांक्षा पूर्ण करण्याकरितां 'धातोः' हें अवधिवाचक पञ्चम्यन्त पद आक्षिप्त करावें लागत असल्यामुळें व तशा आक्षिप्त पञ्चम्यन्तपदापुढें 'ऌ' 'लुट्' या प्रत्ययांचें ग्रहण केलें असल्यामुळें, येथें प्रकृत परिभाषा लागून तदन्तविधि होत नाहीं; व त्यामुळें 'धातोः ऌलुटोः परयोः धातोः स्यतासी स्तः' असा त्या सूत्राचा अर्थ होतो; व या अर्थान्वयें, धातुपुढें ऌ व 'लुट्' असल्यास धातूला 'स्य' व 'तास्' हीं विकरणें अनुक्रमें होऊन 'भू+स्य+ति=भू+इ+स्य+ति=भो+इ+स्य+ति=भविष्यति' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. मागील परिभाषेंत 'यत्र प्रत्ययो निमित्तत्वेनाश्रीयते तत्र तदादेरित्यन्तांशमात्रोपस्थितिः' असें ह्मटलें आहे. तशा ठिकाणीं केवळ तदादि अंशाची उपस्थिति कां होत असते याचें कारण या पंक्तींत सांगितलें आहे, व तें कारण हेंच आहे कीं अशा ठिकाणीं अवधिवाचक पञ्चम्यन्तपद आक्षिप्त करावें लागत असल्यामुळें प्रकृत परिभाषा प्रवृत्त होते, व तदन्तांशाची उपस्थिति न होतां, केवळ तदादि अंशाची उपस्थिति होते)

**' ङ्याब्भ्य ' इत्यादौ तु न दोषस्तत्र कस्मादिति नियतावध्याकाङ्क्षाया अभावेन पञ्चम्यन्तस्य प्रत्ययविशेषणत्वाभावात्**

' हल्ङ्याब्भ्यः ' सू० २३२ इत्यादि सूत्रांत ( ' ङ्याप्—ह्मणजे ङी ' व ' आप् ' —या प्रत्ययांचें ग्रहण केलें असल्यामुळें, अशा ठिकाणीं प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें—ह्मणजे परिभाषा २३ प्रमाणें—तदादितदन्तविधि करून ' ङ्यन्तात् ' आबन्तात् ' असा अर्थ करण्याच्या आड प्रकृत परिभाषा २४ येत नाहीं, व ) कोणतीहि अडचण उपस्थित होत नाहीं; कारण ह्या सूत्रांत ( ' ङी ' व ' आप् ' हे प्रत्यय नेहमी प्रातिपदिकांहूनच होणारे असल्यामुळें, 'हे प्रत्यय कशाच्यापुढें असतां' अशा प्रकारची) अवधीची आकांक्षा उत्पन्न होत नाहीं, ( व त्यामुळें पञ्चम्यन्त पद आक्षिप्त करण्याची गरज नसल्यामुळें ) ह्या प्रत्ययांचें विशेष्य होणारें असें पञ्चम्यन्त पद उपस्थित होत नाहीं· ( त्यामुळें अशा ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं. जर ' हल्ङ्याब्भ्यः ' ह्या सूत्रांत पञ्चम्यन्त पद निर्दिष्ट किंवा अनुवृत्त असतें व त्यानंतर ' ङी ' व ' आप् ' ह्या स्त्रीप्रत्ययांचें ग्रहण केलें असतें, किंवा अवधीची आकांक्षा असती, आणि ती पूर्ण करण्याकरितां पञ्चम्यन्त पद आक्षिप्त करण्याची गरज असती तर प्रकृत परिभाषा लागू पडली असती व तदन्तविधि होऊं शकला नसता. पण येथें तसें कांहींच नसल्यामुळें तदन्तविधि करण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. )

**अङ्गसंज्ञासूत्रे तु तदादेः प्रत्यये पर इत्यर्थे पञ्चम्यन्तस्य विशेषणत्वं स्पष्टमेव ।**

( ' यस्मात्प्रत्ययविधिः तदादि प्रत्ययेऽङ्गम् ' सू० १९९ या अङ्गसंज्ञाविधायकसूत्रांत ' प्रत्यये ' ह्या प्रत्ययवाचक शब्दाचें पञ्चम्यन्तपदानंतर ग्रहण केलें नसल्यामुळें, प्रकृत परिभाषा ह्या सूत्रास लागू पडूं शकत नाहीं व त्यामुळें तदन्तविधि करून 'प्रत्यय' ह्या शब्दाचा ' प्रत्ययान्त ' असा अर्थ केल्यास, ज्याहून जो प्रत्यय झाला आहे त्या प्रत्ययाच्या लगेच मागें असलेल्या शब्दस्वरूपास अङ्गसंज्ञा प्राप्त न होण्याची आपत्ति येईल. पण ग्रन्थकार म्हणतात कीं अशी आपत्ति येऊं शकत नाहीं; कारण ) अङ्गसंज्ञाविधायक सूत्रांतील ' प्रत्यये ' ह्या पदाचा ' तदादेः प्रत्यये परे ' असा अर्थ होत असल्यामुळें, ' तदादेः ' हें पञ्चम्यन्तपद प्रत्ययाचें विशेषण होतें हें अगदी उघड आहे. ( सारांश अङ्गसंज्ञाविधायक सूत्रांत 'प्रत्यये ' हें निमित्तवाचक सप्तम्यन्तपद उच्चारलें असल्यामुळें, त्याचा ' प्रत्यये परे सति ' असा अर्थ होतो, व तसा अर्थ होत असल्यामुळें, ' कस्मात्परे सति' अशी अवधीची आकांक्षा उत्पन्न होते, व ती आकांक्षा पूर्ण करण्याकरितां 'तदादेः' हें पञ्चम्यन्तपद आक्षिप्त करावें लागतें, व तें पद प्रत्ययाचें विशेषण होतें. अशारीतीनें आक्षिप्त केलेल्या पञ्चम्यन्त पदानंतर ' प्रत्यय ' शब्दाचें ग्रहण होत असल्यामुळें. प्रकृत परिभाषा लागू पडते, व त्यामुळें ' तदन्तविधि ' होत नाहीं, आणि ' प्रत्यय ' हा शब्द प्रत्ययान्ताचा वाचक न होतां, केवळ प्रत्ययाचाच वाचक होतो, व 'यस्मात् यस्य प्रत्य-

यस्य विधिः, तदादिः प्रत्यये परे तदादि अङ्गसंज्ञकं भवति ' असा त्या सूत्राचा अर्थ होतो. )

**अत एवोत्तमैकाभ्यामित्यादिनिर्देशाः सङ्गच्छन्ते ॥ २४ ॥**

( जेथें अवधीची आकांक्षा पूर्ण करण्याकरितां सूत्रांत पञ्चम्यन्त पद आक्षिप्त करावें लागतें तशा ठिकाणीं तदन्तांशाची उपस्थिति न होतां तदादि अंशच उपस्थित होतो व तो प्रत्ययाचें विशेषण होतो आणि त्यामुळें तशा ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू पडते असा नियम मानला आहे, ) म्हणूनच ' उत्तमैकाभ्यां च ' सू० ७९४ ह्या सूत्रांत ' उत्तमैकाभ्याम् ' असा केलेला निर्देश व अशा प्रकारचे इतर सूत्रांत केलेले निर्देश शुद्ध ठरतात. ( ' सुपि च ' सू० २०२ ह्या सूत्रांत निमित्तवाचक ' सुपि ' हें सप्तम्यन्त पद उच्चारलें असल्यामुळें त्याचा अर्थ ' सुपि परे सति ' असा होतो, व त्यामुळें ' कस्मात्परे सति ' अशी अवधीची आकांक्षा उत्पन्न होते, व ती आकांक्षा पूर्ण करण्याकरितां ' तदादेः ' हें पञ्चम्यन्त पद आक्षिप्त करावें लागतें, व ' यस्मात् सुप् प्रत्ययो विहितः तदादेः सुपि परे' असा सूत्रार्थ होतो व सुप् प्रत्यय प्रत्ययाचा वाचक होत असून सुबन्ताचा वाचक होत नाहीं. त्यामुळें ' उत्तम+सु+एक+सु+भ्याम् ' अशा स्थितींत, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' सू० ६५० ह्या सूत्रानें ' सु ' प्रत्ययाचा लुक् होऊन ' उत्तम+एक+भ्याम् ' अशी स्थिति झाली असतां, ' भ्याम् ' हा यञादि सुप् प्रत्यय ' उत्तम+एक=उत्तमैक ' ह्या प्रातिपदिकाहून झाला असल्यामुळें, ज्याला तो प्रत्यय झाला आहे त्या ' उत्तमैक ' ह्या अङ्गाचा अन्त्य अकार दीर्घ होऊन ' उत्तमैकाभ्याम् ' असें रूप सिद्ध होतें. येथें प्रत्यय प्रत्ययान्ताचा वाचक मानला तर ' उत्तम ' ह्यापुढें ' एक+भ्याम् ' असें सुबन्त असल्यामुळें, ' उत्तम ' ह्यांतील अन्त्य अकार दीर्घ होऊन ' उत्तमैकभ्याम् ' असें अनिष्ट रूप सिद्ध होण्याची आपत्ति येईल. )

---

## परिभाषा २५

**नन्वेवं कुमारी ब्राह्मणिरूपेत्यादौ घरूपेतिह्रस्वापत्तिरतआह—**

( परिभाषा २४ एवढीच परिभाषा २३ ची अपवाद मानल्यास, ) ' कुमारी ब्राह्मणिरूपा ' इत्यादि स्थलीं ' घरूप ' सू० ९८५ ह्या सूत्रान्वयें ह्रस्व होण्याची आपत्ति येईल ( ' प्रशंसायां रूपप् ' सू० २०२१ ह्या सूत्रानें होणाऱ्या ज्या ' रूपप् ' प्रत्ययाचा ' घरूप ' ह्या सूत्रांत निर्देश केला आहे त्याचा, प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें, तदन्तविधीनें ' रूपप्प्रत्ययान्त ' असा अर्थ करावा लागेल, व असा अर्थ केल्यास, ' कुमारी ' ह्या शब्दापुढें रूपप्प्रत्ययान्त ' ब्राह्मणिरूपा ' हा शब्द असल्यामुळें, ' कुमारी ' यांतील अन्त्य ईकाराचा ह्रस्व होईल, व ' कुमारि ब्राह्मणिरूपा ' असें विकृत रूप होईल. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात.

## उत्तरपदाधिकारे प्रत्ययग्रहणे न तदन्तग्रहणम् ॥ २५ ॥

" उत्तरपदाधिकारांतील सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यास, तो प्रत्यय प्रत्ययान्ताचा वाचक होत नाहीं ( व केवळ प्रत्ययाचाच वाचक असतो—म्हणजे ह्या ठिकाणीं तदन्तविधि होत नाहीं. ) "

( उत्तरपदाधिकार सहाव्या अध्यायाच्या तृतीय पादाच्या आरंभापासून सुरु होत असून त्या पादाच्या अखेरपर्यंत आहे. ' घरूपकल्पप् ' हें सूत्र त्या अधिकारांत सांगितलें असल्यामुळें, त्या सूत्रांत सांगितलेले प्रत्यय, ह्या परिभाषेप्रमाणें प्रत्ययान्ताचे वाचक न होतां केवळ प्रत्ययाचेच वाचक होतात. त्यामुळें, ' रूपप् ' हा प्रत्यय ' ब्राम्हणी ' ह्या शब्दाच्या पुढें असल्यामुळें त्या शब्दांतील ईकाराचा र्‍हस्व होतो; ' कुमारी ' ह्या शब्दापुढें जरी रूपप्प्रत्ययान्त शब्द आहे तरी, त्या ' कुमारी ' शब्दापुढें ' रूपप् ' प्रत्यय नसल्यामुळें, ' कुमारी ' ह्यांतील ईकाराचा र्‍हस्व हाते नाही. )

**' हृदयस्य हृल्लेखयदण्लासेष्वि ' त्यत्र लेखग्रहणात् । तत्र लेखेति न घञन्तमनभिधानात् । इयं च ' हृदयस्ये ' ति सूत्रे एव भाष्ये स्पष्टा ॥ २५ ॥**

' हृदयस्य हृल्लेखयदण्लासेषु सू० ९८९ ह्या सूत्रांत 'लेख' शब्दाचें ग्रहण केलें आहे. ( व तो शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे; कारण ' अण् ' प्रत्यय सूत्रांत सांगितलाच आहे. 'अण्' प्रत्ययानें जर प्रत्ययान्ताचें ग्रहण झालें असतें तर पुनः अण्णन्त ' लेख ' शब्द उच्चारण्याची पाणिनीला गरज नव्हती. परंतु ' अण् ' प्रत्यय व ' अण् ' प्रत्ययान्त ' लेख ' शब्द असें दोन्ही ह्या सूत्रांत उच्चारलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं उत्तरपदाधिकारांतील सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यास तो प्रत्यय प्रत्ययान्ताचा वाचक होत नसून प्रत्ययाचाच वाचक असतो व अशा रीतीनें ' अण् ' व ' लेख ' हे शब्द या परिभाषेचे ज्ञापक ठरतात. कोणी असें ह्मणेल कीं, सूत्रांतील ' लेख ' शब्द अण्णन्त नसून घञन्त आहे, ह्मणून त्या घञन्त ' लेख ' शब्दाचा सूत्रांत पृथक् निर्देश करावा लागला—पण हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ) तो ' लेख ' शब्द घञन्त आहे असें मानल्यास, योग्य अर्थबोध होणार नाहीं ( दुसरें असें कीं, ' लेख ' शब्द अण्णन्त नाहीं व घञन्त आहे असें मानल्यास, ज्ञापकपर भाष्याशीं विरोध येईल. घञन्त 'लेख' शब्द ' हृदय ' शब्दापुढें आल्यास, ' हृदयलेख ' असेंच रूप होईल व हृदादेश होणार नाहीं, असें कैयटानें आपल्या टीकेंत स्पष्ट ह्मटलें आहे.) 'हृदयस्य हृत् ' ६–३–५० ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. (येथें सहज अशी शंका उत्पन्न होते कीं, ' घरूप ' या सूत्रांत प्रत्ययांचा निमित्तसप्तमींत निर्देश केला असल्यामुळें—ह्मणजे त्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या प्रत्ययांचा निमित्तत्वानें आश्रय केला असल्यामुळें आणि ते प्रत्यय पुढें आले असतां त्यांच्या लगेंच मागें असलेल्या शब्दस्वरूपास सूत्रनिर्दिष्ट कार्य होतें असा अर्थ होत असल्यामुळें,—' यत्र प्रत्ययो निमित्तत्वेनाश्रीयते तत्र तदादेरित्यन्तांशमात्रोपस्थितिः ' ह्या भाष्योक्तन्यायान्वयें, व तसेंच अशा

ठिकाणीं ' कशापुढें असतां ' अशी उत्पन्न होणारी आकांक्षा पूर्ण करण्याकरितां पञ्चम्यन्तपद उपस्थित होत असल्यामुळें 'प्रत्ययग्रहणेचापञ्चम्याः' ह्या परिभाषेप्रमाणें देखील, तदादि अंशच उपस्थित होतो व तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं. त्यामुळें ही वेगळी परिभाषा करण्याची कांहींच गरज नव्हती. व ' प्रत्ययग्रहणे चापञ्चम्याः ' ह्या परिभाषेनें काम भागलें असतें—पण ही शंका बरोबर नाहीं व ह्या शंकेचें उत्तर भैरवींत पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे—'शब्दस्वरूपं विशेष्यमादाय प्राप्ततदन्तविधेस्तथा निषेधोऽपि उत्तरपदस्य विशेष्यत्वाद्यस्तदन्तविधिः प्राप्तस्तन्निषेधार्थमस्यावश्यकत्वात् ' व ह्या पङ्क्तीचा अर्थ असा आहे कीं, जेथें सूत्रांत निर्दिष्ट असलेला प्रत्यय पञ्चम्यन्त पदाचें विशेषण होतो तेथें ' येन विधिस्तदन्तस्य ' ह्या सूत्रान्वयें व प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें प्राप्त झालेल्या तदन्तविधीचें निवारण करण्याकरितां ' प्रत्ययग्रहणे चापञ्चम्याः ' ही परिभाषा सांगितली आहे. पण जेथें प्रत्यय उत्तरपदाधिकारांतील सूत्रांत अनुवृत्त असलेल्या उत्तरपदाचें विशेषण होतो व त्यामुळें ' येन विधिस्तदन्तस्य ' ह्या सूत्रान्वयें व प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें जी तदन्तविधीची प्राप्ति होते त्याचें निवारण परिभाषा २४ नें होऊं शकत नाहीं, व त्याचें निवारण होण्याकरितां प्रकृत परिभाषा आवश्यक आहे, व अशा रीतीनें ती व्यर्थ ठरत नाहीं. )

---

## परिभाषा २६

**" नन्वेवं परमकारीषगन्धीपुत्र इत्यत्रेवातिकारीषगन्ध्यापुत्र इत्यत्र ' ष्यङः सम्प्रसारणं पुत्रपत्यो ' रिति स्यादत आह—**

(परिभाषा २४ व २५ एवढ्याच प्रत्ययग्रहणपरिभाषेचा अपवाद आहेत असें मानल्यास, ) ज्याप्रमाणें ' परमकारीषगन्धीपुत्रः ' या स्थलीं 'ष्यङः सम्प्रसारणं पुत्रपत्योः ' सू० १००३ या सूत्रान्वयें ष्यङला सम्प्रसारण झालें आहे त्याचप्रमाणें ' अतिकारीषगन्ध्यापुत्रः ' या स्थलीं देखील वरील सूत्रान्वयें ष्यङला सम्प्रसारण होण्याची आपत्ति येते. ( कारण दोन्हीं उदाहरणांत उत्तरपद 'पुत्र' आहे. त्यामुळें वरील सूत्रान्वयें दोन्ही स्थलीं सम्प्रसारणकार्य प्राप्त होतें. ' अतिकारीषगन्ध्यापुत्रः या स्थलीं सम्प्रसारण कां होत नाहीं हें स्पष्ट करण्याकरितां ) ही परिभाषा सांगतातः—

### स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न ॥ २६ ॥

' सूत्रांत स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यास ( व त्या स्त्रीप्रत्ययाला कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास जरी तदन्तविधि होतो व स्त्रीप्रत्यय स्त्रीप्रत्ययान्ताचा वाचक होतो तरी ) स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यास तदादिनियम लागू पडत नाहीं. (पण स्त्रीप्रत्यय अप्रधान झाला असल्यास, तदादिनियम देखील लागू पडतो. )'

( सारांश, जेथें स्त्रीप्रत्यय उपसर्जनीभूत-म्हणजे अप्रधान—असेल तेथें प्रत्ययग्रहणपरिभाषा २३ प्रमाणें तदादि व तदन्त या दोन्ही अंशांची उपस्थिति होते, व ज्या शब्दाहून स्त्रीप्रत्यय झाला आहे त्याच्या आरंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप असेल तेवढ्याच शब्दस्वरूपाचें, त्या स्त्रीप्रत्ययानें, ग्रहण होतें. पण जेथें स्त्रीप्रत्यय प्रधान असेल तेथें तदादिनियम न लागतां, केवळ तदन्तनियमच लागतो, व त्यामुळें ज्या शब्दाहून स्त्रीप्रत्यय झाला आहे त्याच्यामागें इतर शब्द असल्यास देखील स्त्रीप्रत्ययाला जें कार्य होणें सांगितलें आहे तें होतें. वर दिलेल्या दोन्ही उदाहरणांत 'कारीषगन्ध्या ' हें पद समान असून, ' करीषगन्ध इव गन्धो यस्य सः करीषगन्धिः , तस्यापत्यं स्त्री करीषगन्ध्या' अशा रीतीनें तें सिद्ध झालें आहे. येथें 'उपमानाच्च' सू० ८७६ यानें इत्व होऊन, व ' तस्यापत्यम् ' सू० १०८८ यानें अपत्यार्थक ' अण् ' प्रत्यय होऊन, व ' अणिञोरनार्षयोः ' सू० ११९८ यानें ष्यङादेश होऊन, व ' यस्येति च ' सू० ३११ यानें इकारलोप होऊन, व ' यङश्चाप् ' सू० ५२८ यानें ' चाप्=आ ' प्रत्यय होऊन, व आद्यचाला वृद्धि होऊन, ' कारीषगन्ध्या ' हें रूप तयार झालें आहे. ' परमकारीषगन्ध्या ' हा शब्द 'परमा चासौ कारीषगन्ध्या' असा कर्मधारय समास होऊन बनला आहे. येथें ' कारीषगन्ध्य ' हा ष्यङ् प्रत्ययान्त शब्द आहे व जेथें ष्यङ् होतो तेथें नियमेंकरून ' चाप्=आ ' होत असल्यामुळें, ' कारीषगन्ध्या ' हा शब्द देखील एका रीतीनें ष्यङ्प्रत्ययान्त मानण्यास कांहीं हरकत नाहीं; व हा शब्द जेथें कशाचाहि उपसर्जन झाला नसून प्रधान आहे तेथें ष्यङ् प्रत्ययाला 'ष्यङः संप्रसारणम्' सू० १००३ ह्या सूत्रानें जें संप्रसारणरूपी कार्य सांगितलें आहे तें होतें, व तें कार्य जसें ज्याहून ष्यङ् झाला आहे अशा शब्द स्वरूपाच्या अन्तीं असणाऱ्या ' ष्यङ् ' प्रत्ययाला होतें त्याचप्रमाणें तें कार्य ज्याहून ष्यङ् झाला आहे त्याच्यापूर्वी इतर शब्द असले तरी तशा शब्दसमुदायाच्या अन्तीं असलेल्या ष्यङ् प्रत्ययास देखील होतें—म्हणजेच ह्याचा अर्थ असा कीं, जेथें स्त्रीप्रत्यय प्रधानत्वानें स्त्रीत्वाचा बोध करितो तेथें तदादिनियम लागत नाहीं ' परमकारीषगन्ध्यायाः पुत्रः= परमकारीषगन्धीपुत्रः' या उदाहरणांत जर तदादिनियम लागू पडला असता तर, ज्याअर्थी ' करीषगन्धि ' ह्या शब्दाहून ' अण् ' प्रत्यय होऊन ष्यङादेश झाला आहे व ' परमकरीषगन्धि ' ह्या शब्दाहून ' अण् ' प्रत्यय व ष्यङादेश झाला नाहीं त्याअर्थी, ' कारीषगन्ध्यायाः पुत्रः= 'कारीषगन्धीपुत्रः ' येथें संप्रसारण झालें असतें, पण ' परमकारीषगन्ध्यायाः पुत्रः ' येथें संप्रसारण झालें नसतें, व ' परमकारीषगन्ध्यापुत्रः' असें विकृतरूप झालें असतें; पण येथें तदादिनियम लागत नसल्यामुळें ' परमकारीषगन्धीपुत्रः ' असें इष्ट रूप सिद्ध होते. पण ' कारीषगन्ध्यामतिक्रान्ता अतिकारीषगन्ध्या, अतिकारीषगन्ध्यायाः पुत्रः ' येथें संप्रसारण न होतां ' अतिकारीषगन्ध्यापुत्रः ' असेंच रूप होतें. ह्याचें कारण हें आहे कीं ' कारीषगन्ध्यामतिक्रान्ता—अन्या काचित् स्त्री—अतिकारीषगन्ध्या ' ह्या ' अत्यादयः क्रान्ताद्यर्थे द्वितीयया '— सू० ७८० वरील

वार्तिक— या वार्तिकान्वयें झालेल्या तत्पुरुषसमासांत, अन्यपदार्थ—म्हणजे कारीषगन्ध्याहून भिन्न स्त्री–प्रधान आहे व ' कारीषगन्ध्या ' हा शब्द 'अति' ह्या शब्दाच्या अर्थाच्या—म्हणजे 'अतिक्रमण करणारी' ह्या अर्थाच्या–अपेक्षेनें अप्रधान आहे. सारांश ह्या उदाहरणांत ' ष्यङ् ' हा स्त्रीप्रत्यय ज्या शब्दाहून झाला आहे त्याच्या स्त्रीत्वाचा प्रधानत्वानें बोध करीत नसून गौणत्वानें बोध करीत असल्यामुळें, येथें तदादिनियम लागतो. त्यामुळें ' अतिकरीषगन्धि ' ह्याहून 'अण् ' प्रत्यय व त्या अणाचे जागीं ष्यङ् आदेश झाला नसल्यामुळें व ' करीषगन्धि ' एवढ्याच शब्दस्वरूपाहून तो प्रत्यय झाला असल्यामुळें, 'अतिकारीषगन्धीपुत्रः' असें रूप न होतां, 'अतिकारीषगन्ध्यापुत्रः ' असेंच रूप होतें. )

**विषयसप्तमीयम् । यः स्त्रीप्रत्ययः स्त्रियं प्राधान्येनाह तत्र तदादिनियमो न । यस्त्वप्राधान्येनाह तत्र तदादिनियमोऽस्त्येवेत्यर्थः ।**

ह्या परिभाषेंतील ' स्त्रीप्रत्यये अनुपसर्जने ' ही विषयसप्तमी आहे ( व ' अनुपसर्जने ' हें पद ' स्त्रीप्रत्यये ' याचें विशेषण असून त्या पदाचा अर्थ ' अनुपसर्जनस्त्रीप्रत्ययविषये '–ह्मणजे जेथें स्त्रीप्रत्यय प्रधान असतो तशा स्थलीं–असा आहे. ) जेथें स्त्रीप्रत्यय ज्याहून तो झाला आहे त्याच्या स्त्रीत्वाचा, प्रधानत्वानें बोध करित असेल–ह्मणजे स्त्रीप्रत्ययान्त शद्ब प्रधान असेल–तेथें तदादिनियम लागत नाहीं, पण जेथें स्त्रीप्रत्यय ज्याहून तो झाला आहे त्याच्या स्त्रीत्वाचा, गौणत्वानें बोध करीत असेल–ह्मणजे जेथें स्त्रीप्रत्ययान्त शद्ब उपसर्जनीभूत झाला असेल–तेथें तदादिनियम लागतोच असा ह्या परिभाषेचा अर्थ आहे.

**प्रत्यासत्त्या यस्य समुदायस्य स्त्रीप्रत्ययान्तत्वमानेयं तदर्थं प्रत्यनुपसर्जनत्वमेवैतत्परिभाषाप्रवृत्तौ निमित्तम्**

( ज्याहून स्त्रीप्रत्यय झाला आहे एवढाच स्त्रीप्रत्ययान्त शद्ब जर समासान्तर्गत —ह्मणजे समासाचा अवयव–झाला नसेल तर तो शद्ब नित्य प्रधानच असणार, व त्या शद्बाच्या अन्तीं असणारा स्त्रीप्रत्यय तशा स्थलीं प्रधानत्वानेंच स्त्रीत्वाचा बोध करणार. त्यामुळें अशा स्थलीं त्या शद्बाचें इतर शद्बांशीं सान्निध्य नसल्यामुळें तो शद्ब प्रधान आहे कीं नाहीं व तदादिनियम लागतो कीं नाहीं हा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. ह्मणून ग्रन्थकार ह्मणतात कीं, ज्याहून स्त्रीप्रत्यय झाला आहे अशा तदादिस्त्रीप्रत्ययान्त शद्बांशीं) इतर पदांचें सान्निध्य झाल्यानें ( सन्निध असलेल्या पदांशीं त्याचा समास होऊन जो सामासिक शद्बसमुदाय होतो तसा सामासिक ) शद्बसमुदाय स्त्रीप्रत्ययान्त मानावा किंवा नाहीं हें ठरविणें झाल्यास, ज्याहून वास्तविक स्त्रीप्रत्यय झाला आहे अशा तदादिस्त्रीप्रत्ययान्त शद्बाचा अर्थ पूर्ण ( सामासिक ) शद्बसमुदायाच्या अर्थामध्यें गुणीभूत झाला नसेल तशाच स्थलीं ही परिभाषा लागू पडते ( व तशाच स्थलीं तदादिनियम लागू पडत नाहीं. जसें:–'परमकारीषगन्ध्या' या उदाहरणांत ज्याहून वास्तविक स्त्रीप्र-

त्यय व्यङ् झाला आहे असा तदादि स्त्रीप्रत्ययान्त ‘ कारीषगन्ध्या ’ हा शब्द आहे. ह्याचा ‘ परमा ’ ह्या भिन्न शब्दाशीं समास होऊन त्या समासांत ‘ कारीषगन्ध्या ’ हा शब्द प्रधान आहे व पूर्ण सामासिक शब्द कारीषगन्ध्याचाच बोधक आहे; त्यामुळें ह्या स्थलीं तदादिनियम लागत नाहीं, व ‘ परमकारीषगन्ध्या ’ हा पूर्ण सामासिक शब्द, ह्या परिभाषेप्रमाणें, स्त्रीप्रत्ययान्त मानतां येतो; आणि ह्मणूनच अशा स्थलीं ‘ ष्यङः संप्रसारणम् ’ ह्या सूत्रान्वयें संप्रसारण होऊन व ‘ संप्रसारणस्य ’ सू० १००४ ह्यानें अन्त्य इकाराचा दीर्घ होऊन ‘ परमकारीषगन्धीपुत्रः ’ असें रूप सिद्ध होतें. पण जेव्हां ‘ कारीषगन्ध्या ’ या तदादिस्त्रीप्रत्ययान्त शब्दाचें ‘ अति ’ या शब्दाशीं सान्निध्य होऊन व दोहोंचा समास होऊन ‘ कारीषगन्ध्यामतिक्रान्ता अतिकारीषगन्ध्या ’ असा सामासिक शब्दसमुदाय होतो तेथें, वर सांगितल्याप्रमाणें ‘ कारीषगन्ध्या ’ या शब्दाचा अर्थ पूर्ण सामासिक शब्दाच्या अर्थामध्यें गुणीभूत होतो; कारण तो शब्दसमुदाय ‘ कारीषगन्ध्या ’ हिचा बोध करीत नसून तिचें अतिक्रमण करणाऱ्या अन्य स्त्रीचा बोध करितो. ह्मणून या स्थलीं तदादिनियम लागू पडतो व त्यामुळें ‘ अतिकारीषगन्ध्या ’ हा पूर्ण शब्द स्त्रीप्रत्ययान्त मानतां येत नाहीं, आणि ह्मणूनच पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ‘अतिकारीषगन्ध्यायाः पुत्रः’ येथें संप्रसारण न होतां ‘अतिकारीषगन्ध्यापुत्रः’ असेंच रूप होतें. )

**तेनातिराजकुमारिरित्यादौ राजकुमारीशब्दार्थस्यातिशब्दार्थं प्रत्युपसर्जनत्वेऽपि तदर्थं प्रत्यनुपसर्जनत्वात्तदादिनियमाभावेन ह्रस्वसिद्धिः ।**

वरील पङ्क्तींत जो नियम सांगितला आहे तसा नियम असल्यामुळें, ‘ अतिराजकुमारिः ’ इत्यादि स्थलीं, ‘ राजकुमारी ’ ह्या शब्दाचा अर्थ जरी ‘अति’ —ह्मणजे अतिक्रमण करणारी— या शब्दाच्या अर्थामध्यें गुणीभूत झाला आहे तरी, ‘राजकुमारी’ ह्या शब्दाच्या अर्थामध्यें ‘ कुमारी ’ या शब्दाचा अर्थ गुणीभूत झाला नसल्यामुळें, तदादिनियम लागू पडत नाहीं, व त्यामुळें ( ‘ कुमारी ’ ह्या शब्दांतील अन्त्य ईकार ‘ गोस्त्रियोरुपसर्जनस्य ’ सू० ६५६ या सूत्रान्वयें ) ऱ्हस्व होतो, ( ‘ वयसि प्रथमे ’ सू० ४७८ या सूत्रानें ‘ कुमार ’ या शब्दाला ‘ ङीप् ’ प्रत्यय होऊन ‘ कुमारी ’ हा शब्द बनला आहे. प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें ‘ कुमारी ’ एवढाच शब्द तदादिस्त्रीप्रत्ययान्त ठरतो. तथापि ‘ राज्ञः कुमारी=राजकुमारी ’ या उत्तरपदार्थप्रधान षष्ठीतत्पुरुषसमासांत स्त्रीप्रत्ययान्त ‘ कुमारी ’ शब्द प्रधान असल्यामुळें तदादिनियम लागू पडत नाहीं, व त्यामुळें ‘ राजकुमारी ’ हा पूर्ण सामासिक शब्द, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, स्त्रीप्रत्ययान्त मानतां येतो. पण ‘ राजकुमारीमतिक्रान्ता—अन्या काचित् स्त्री—अतिराजकुमारिः ’ येथें ‘ अति ’ व ‘ राजकुमारी ’ या दोन शब्दांचा समास होऊन जेव्हां ‘ अतिराजकुमारिः ’ असा सामासिक शब्द होतो तेव्हां ‘ राजकुमारी ’ ह्या शब्दाचा अर्थ ‘ अति ’ ह्या शब्दाच्या अर्थामध्यें गुणीभूत होतो; कारण ‘ अतिराजकुमारिः’ हा शब्द ‘ राजकुमारी ’ चा बोधक नसून तिचें अतिक्रमण करणाऱ्या अन्य स्त्रीचा बोधक

आहे. अशा रीतीनें ' राजकुमारी ' हा स्त्रीप्रत्ययान्त शब्द उपसर्जन झाला असल्यामुळें व ' अतिराजकुमारि ' ह्या प्रातिपदिकाच्या अन्तीं तो उपसर्जनीभूत झालेला शब्द असल्यामुळें, ' गोस्त्रियोरुपसर्जनस्य ' व ' अलोऽन्त्यस्य ' या सूत्रांनीं त्या प्रातिपदिकांतील अन्त्य ईकाराचा ऱ्हस्व होतो. )

**अत एवात्र परिभाषायां न शास्त्रीयमुपसर्जनत्वमसम्भवात्**

( ' स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न ' या परिभाषेंत ' अनुपसर्जने ' हा शब्द ' स्त्रीप्रत्यये ' ह्याचें विशेषण असल्यामुळें येथें केवळ स्त्रीप्रत्ययाचेंच ठिकाणीं उपसर्जनत्वाची विवक्षा आहे ) ह्मणून, या परिभाषेंतील ' उपसर्जन ' या शब्दाचा शास्त्रीय उपसर्जन असा अर्थ करितां येत नाहीं; कारण ( केवळ स्त्रीप्रत्ययाचें ठिकाणीं ) शास्त्रीय उपसर्जनत्व सम्भवतच नाहीं. ( समास शास्त्रांत उपसर्जन संज्ञाविधायक दोनच सूत्रें पठित आहेत व तीं ' प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनम् ' ' व एकविभक्ति चापूर्वनिपाते ' सू० ६५३ व ६५५ हीं होत. ' प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनम् ' ह्या सूत्रांत सांगितलेलें उपसर्जनत्व ' उपसर्जनं पूर्वम् ' सू० ६५४ ह्या सूत्रान्वयें समासांतील पूर्वपदासच संभवतें, व समासांत केवळ स्त्रीप्रत्यय पूर्वपद राहूंच शकत नाहीं. तसेंच ' एकविभक्ति चापूर्वनिपाते ' ह्या सूत्रानें सांगितलेलें उपसर्जनत्व समासांतील उत्तरपदासच संभवतें, व केवळ स्त्रीप्रत्यय समासांत उत्तरपद राहूंच शकत नाहीं. सारांश समासांत केवळ स्त्रीप्रत्यय पूर्वपद किंवा उत्तरपद राहणें असंभवनीय असल्यामुळें, या परिभाषेंत असलेल्या ' उपसर्जन ' शब्दाचा शास्त्रीय उपसर्जन असा अर्थ न करितां, लौकिक उपसर्जन असाच अर्थ करणें योग्य आहे. या पंक्तीवर टीकाकारांनीं बरीच टीका केली आहे व कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, या परिभाषेंतील ' स्त्रीप्रत्यये ' हा शब्द केवळ स्त्रीप्रत्ययाचा वाचक नसून स्त्रीप्रत्ययान्ताचा वाचक आहे व स्त्रीप्रत्ययान्ताचें ठिकाणीं शास्त्रीय उपसर्जनत्व संभवत असल्यामुळें त्या परिभाषेंतलि ' उपसर्जन ' शब्दाचा शास्त्रीय उपसर्जन हाच अर्थ करणें योग्य आहे. कित्येकांनीं असें ह्मटलें आहे कीं, ' अस्य स्त्री ई, याः निष्क्रान्ता निरिः ' ह्या ठिकाणीं ' यस्येति च ' या सूत्रान्वयें ' अ ' ह्या प्रकृतीचा लोप होऊन केवळ प्रत्ययच शिल्लक राहतो. ह्मणून केवळ प्रत्ययाचें ठिकाणीं शास्त्रीय उपसजनत्व संभवत नाहीं, हें ह्मणणें बरोबर नाहीं, व त्यांच्या मताप्रमाणें ह्या परिभाषेंतील ' उपसर्जन ' शब्दाचा लौकिक उपसर्जन व शास्त्रीय उपसर्जन असा दोन्ही प्रकारचा अर्थ करणें योग्य आहे.

**अस्याः ' प्रत्ययग्रहण ' इत्यस्यापवादत्वात्तदेकवाक्यतापन्नत्वाच्चात्रापि ग्रहणपदसम्बन्धेन स्त्रीप्रत्ययसामान्यग्रहणे तद्विशेषग्रहणे च प्रवृत्तिर्न तु स्त्रीप्रत्ययात्स्त्रीप्रत्ययग्रहणे । ध्वनितं चेदमर्थवत्सूत्रे भाष्ये ॥ इयं च वाचनिक्येव । ' ष्यङ ' इति सूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ २६ ॥**

ही परिभाषा ' प्रत्ययग्रहणे ' या परिभाषा २३ चा अपवाद असल्यामुळें व दोन्ही परिभाषा–म्हणजे ही परिभाषा व परिभाषा २३—एकवाक्यतापन्न होऊन त्यांचें एक महावाक्य होत असल्यामुळें, 'प्रत्ययग्रहणे' या परिभाषेंतील 'ग्रहण' हा शब्द या प्रकृत परिभाषेशीं अन्वित होतो. ( व त्यामुळें 'स्त्रीप्रत्ययग्रहणे सति अनुपसर्जनविषये तदादिनियमो न' असा ह्या परिभाषेचा अर्थ होतो.) म्हणून जेथें सूत्रांत ( जसें 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू० ६५६ या सूत्रांत ) सामान्य स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण केलें आहे, अथवा जेथें सूत्रांत विशेष स्त्रीप्रत्ययाचें (जसें 'आणिञोरनार्षयोः' सू० ११९८ या सूत्रानें ष्यङ् या विशेष स्त्रीप्रत्ययाचें) ग्रहण केलें असेल तेथेंच ही परिभाषा लागू पडते. परंतु जेथें सूत्रांत असा शब्द वापरला आहे कीं, जो स्त्रीप्रत्ययाचा व तसेंच स्त्रीप्रत्यय-भिन्नाचा वाचक आहे तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं असें 'अर्थवत्' १–२–४५ या सूत्रावरील भाष्यांत ध्वनित केलें आहे ( 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू० १७८ या सूत्रांत असलेला 'प्रत्यय' हा शब्द स्त्रीप्रत्ययाचा व तसेंच इतर प्रकारच्या प्रत्ययाचा—म्हणजे दोन्ही प्रकारच्या प्रत्ययांचा—वाचक आहे. त्यामुळें अशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं. ती कशी लागू पडत नाहीं हें नीट समजण्याकरितां भैरवींत ' राजकुमारी ' हें उदाहरण दिलें आहे. ' राजकुमारी ' ह्यांतील ' कुमारी ' हा शब्द ङीप्प्रत्ययान्त असून प्रधान आहे. तो उपसर्जनीभूत नसल्यामुळें, या परिभाषेप्रमाणें, तदादिनियम लागत नाहीं, आणि म्हणून 'राजकुमारी' हा सम्पूर्ण शब्द स्त्रीप्रत्ययान्त ठरतो. अशा रीतीनें तो शब्द प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू० १७८ ह्या सूत्रान्वयें त्याला 'प्रातिपदिक' मानतां येऊं नये; कारण त्या सूत्रांत ' अप्रत्ययः ' हा शब्द घातला आहे व त्याचा 'प्रत्ययं प्रत्ययान्तं च वर्जयित्वा' असा अर्थ आहे. 'राजकुमारी' या शब्दास प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होण्याकरितां, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू० १७९ या सूत्राचा आश्रय करणें भाग आहे. पण अशा रीतीनें त्या सूत्राचा उपयोग केल्यास, त्या सूत्रांतील 'समास' या शब्दाचें ग्रहण चरितार्थ होऊन विधायक ठरेल. पण भाष्यकारांनी तर 'अर्थवदधातु' १–२–४५ या सूत्रावरील भाष्यांत ' अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थं भविष्यति । समास एवार्थवतां समुदायानां प्रातिपदिकसंज्ञो भवति नान्य इति ॥ ' असें म्हटलें आहे व तें म्हणण्याचा हेतु हा कीं, अर्थवत्समुदायरूप वाक्याला—म्हणजे ' गामभ्याज कृष्णां देवदत्त ' अशा वाक्याला—प्रातिपादिकसंज्ञा प्राप्त होण्याचा सम्भव होता त्याचें निवारण व्हावें, व अर्थवत्समुदायाला जर प्रातिपदिक संज्ञा होणें असेल तर ती केवळ समासालाच व्हावी. म्हणून 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रांतील 'समास' शब्दाचें ग्रहण विधायक मानल्यास—म्हणजे त्या सूत्रानें समासाला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते असें मानल्यास,—वरील भाष्याशीं विरोध येतो; व तो विरोध टाळण्याकरितांच, ' नतु स्त्रीप्रत्ययाप्रत्ययग्रहणे ' असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे, व त्यामुळें ' अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपादिकम् ' या सूत्रांत स्त्रीप्रत्ययवाचक व स्त्रीभिन्न

प्रत्ययवाचक अशा उभयविधप्रत्ययवाचक ' प्रत्यय ' या सामान्य शब्दाचा उपयोग केला असल्यामुळें, त्या सूत्रास प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं; आणि याचा परिणाम हा होतो कीं ' राजकुमारी ' हा सम्पूर्ण शब्द जरी, या परिभाषेप्रमाणें, स्त्रीप्रत्ययान्त ठरतो तरी त्याला ' अप्रत्ययः ' हा प्रातिषेध लागू पडत नाहीं; व त्यामुळें तो शब्द स्त्रीप्रत्ययान्त असून देखील, ' अर्थवत् ' सू० १७८ या सूत्रान्वयें त्याला प्रातिपदिक-संज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. तसेंच ' स्त्रियां क्तिन् ' सू० ३२७२ या सूत्रानें होणारा ' क्तिन् ' प्रत्यय हा स्त्रीप्रत्यय व तसाच कृत्प्रत्यय असल्यामुळें आणि त्याचप्रमाणें ' यूनस्तिः ' सू० ५३१ या सूत्रानें होणारा ' ति ' प्रत्यय स्त्रीप्रत्यय व तसाच तद्धित प्रत्यय असल्यामुळें अशा प्रकारच्या उभयविध प्रत्ययास प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं व त्यामुळें, प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें, अशा प्रत्ययांना तदादिनियम लागू पडतो. ) ही परिभाषा वाचनिकी असून ' ष्यङः संप्रसारणम् ' ६–१–१३ या सूत्रावरील भाष्यांत पठित केली आहे.

---

# परिभाषा २७

**नन्वेवं ' तरप्तमपौ घ ' इत्यादिना तरबन्तादेः संज्ञा स्यादत आह—**

( प. २४ ते २६ पुवढ्याच प. २३ च्या अपवाद मानल्यास, प्रत्यय ग्रहणपरिभाषेप्रमाणें, ) ' तरप्तमपौ घः ' सू० २००३ इत्यादि सूत्रांनीं सांगितलेली संज्ञा तरबन्त इत्यादिकांना होईल ( व त्यामुळें ' गौरी ब्राह्मणितरा ' इत्यादि उदाहरणांत ' गौरी ' या शब्दापुढें ' ब्राह्मणितरा ' हा तरबन्त शब्द असल्यामुळें ' गौरी ' यांतील अन्त्य ईकाराचा, ' घरूप ' सू० ९८५ या सूत्रान्वयें ऱ्हस्व होईल व ' ब्राह्मणितरा ' यांतील ' ब्राह्मणी ' शब्दापुढें केवळ ' तरप् ' प्रत्यय असून तरबन्त शब्द नसल्यामुळें 'ब्राह्मणी' यांतील अन्त्य ईकाराचा ऱ्हस्व होणार नाहीं. अशी आपत्ति येऊं नये ) ह्मणून ही परिभाषा सांगतात—

**संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति ॥ २७ ॥**

" संज्ञेचें विधान करणाऱ्या सूत्रांत प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यास, तो प्रत्यय प्रत्ययान्ताचा वाचक होत नाहीं ( व केवळ प्रत्ययाचाच वाचक असतो ). "

( ' तरप्तमपौ घः ' हें संज्ञाविधायक सूत्र असल्यामुळें, ह्या सूत्रांत उच्चारलेले ' तरप् ' व ' तमप् ' प्रत्यय प्रत्ययान्ताचे वाचक न होतां, केवळ प्रत्ययाचेच वाचक होतात, व अशा ठिकाणीं प्रत्ययग्रहणपरिभाषेंतील तदन्तांशाची उपस्थिति होत नाहीं, व त्यामुळें ' गौरी ब्राह्मणितरा ' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. येथें हें सांगणें आवश्यक आहे कीं, ह्या परिभाषेंत सांगितलेला नियम अनेक पाणिनीय

संज्ञाविधायक सूत्रांत व्यभिचरित झालेला दिसतो. जसें—' कृत्तद्धितसमासाश्च ' सू० १७९ ह्या प्रातिपदिकसंज्ञाविधायक सूत्रांत ' कृत् ' व ' तद्धित ' प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे, व ह्या सूत्रास ही परिभाषा लावल्यास ' कृत् ' व ' तद्धित ' प्रत्ययांना प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येईल. ही आपत्ति टाळण्याकरितां भाष्यकार असें ह्मणतात कीं, ' अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम् ' ह्या पूर्वसूत्रांतून ' कृत्तद्धितसमासाश्च ' ह्या सूत्रांत ' अर्थवत् ' या पदाची अनुवृत्ति होते, व कृत् व तद्धित प्रत्यय यांचें ठिकाणीं लौकिकी अर्थवत्ता नसून कृदन्त व तद्धितान्त यांचेंच ठिकाणीं ती असल्यामुळें, कृत् व तद्धित या शब्दांनीं कृदन्त व तद्धितान्त यांचेंच ग्रहण करणें योग्य आहे. तसेंच 'बहुगणवतुडति संख्या' सू० २५८ या संख्यासंज्ञाविधायक सूत्रांत 'वतु' व 'डति' प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे. परंतु भाषेंत अशा केवळ प्रत्ययांचा प्रयोग होत नसल्यामुळें, ' वतु ' ह्मणजे वतुप्रत्ययान्त, व ' डति ' ह्मणजे डतिप्रत्ययान्त, असाच अर्थ केला पाहिजे. त्याचप्रमाणें ' सर्वादीनि सर्वनामानि ' सू० २१३ ह्या सर्वनामसंज्ञाविधायक सूत्रांत ज्या सर्वादिगणाचा निर्देश केला आहे त्या गणांत ' डतर ' व ' डतम ' हे प्रत्यय पठित आहत. त्या प्रत्ययांचा देखील भाषेंत कधीं प्रयोग होत नसल्यामुळें, त्या प्रत्ययांनीं देखील प्रत्ययान्तांचेंच ग्रहण केलें पाहिजे; आणि ह्मणूनच दीक्षितांनीं सू० २१७ च्या व्याख्येंत असें ह्मटलें आहे कीं, ' डतरडतमौ प्रत्ययौ । प्रत्ययग्रहणे तदन्ता ग्राह्याः । यद्यपि संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति, सुप्तिङन्तमिति ज्ञापकात् । तथापीह तदन्तग्रहणम् । केवलयोः संज्ञायाः प्रयोजनाभावात् । ' ).

सुप्तिङन्तमित्यन्तग्रहणमस्या ज्ञापकम् ।

' सुप्तिङन्तं पदम् ' सू० २९ या सूत्रांत जो ' अन्त' शब्द आहे तो या परिभाषेचा ज्ञापक होय. ( ' सुप्तिङ् पदम् ' एवढेंच सूत्र जरी केलें असतें तरी प्रत्ययग्रहणपरिभाषेनें प्रत्ययान्ताचें ग्रहण झालेंच असतें व ' सुबन्तं तिङन्तं च पदसंज्ञं स्यात् ' असा त्या सूत्राचा अर्थ झालाच असता. परंतु संज्ञाविधायकसूत्रांत उच्चारलेल्या प्रत्ययानें प्रत्ययान्ताचें ग्रहण होत नाहीं हा नियम पाणिनीला अवगत असल्यामुळें त्याला वरील सूत्रांत ' अन्त ' हा शब्द घालणें भाग पडलें. ' अन्त' हा शब्द सूत्रांत घातला नसता तर ' सुप् ' व ' तिङ् ' यांनाच पदसंज्ञा झाली असती. सारांश ही परिभाषा असल्यामुळें ' सुप्तिङन्तं पदम् ' या सूत्रांतील ' अन्त ' या शब्दाचें ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तो शब्द या परिभाषेचा ज्ञापक ठरतो ).

**न च प्रत्यययोः पदसंज्ञायामपि प्रत्ययग्रहणपरिभाषया तदन्तग्रहणसंभवाज्ज्ञापितेऽपि फलाभाव इति वाच्यम् । पदसंज्ञायाः स्वादिष्वितिविषये प्रकृतिनिष्ठतया पदग्रहणस्य प्रत्ययमात्रग्रहणत्वाभावात् । सुप्तिङन्तमिति सूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ २७ ॥**

(आतां शंकाकार अशी शंका करितो कीं, 'सुप्तिङ् पदम् ' एवढेंच सूत्र जरी असतें तरी ) जरी ' सुप् ' व ' तिङ् ' या प्रत्ययांना पदसंज्ञा प्राप्त झाली असती तरी प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें तदन्तविधि होऊन ' सुबन्त ' व ' तिङन्त ' यांना पदसंज्ञा प्राप्त झालीच असती. ( ह्मणून ' सुप्तिङन्तं पदम् ' ह्या सूत्रांत ' अन्त ' शब्द घातल्यानें ' सुप् ' व ' तिङ् ' यांना पदसंज्ञा प्राप्त होत नाहीं असें) जरी ज्ञापित होतें तरी तसें ज्ञापित केल्यानें कांहींच फायदा होत नाहीं. ( ' सुप्तिङ् पदम् ' एवढेंच जरी सूत्र केलें असतें तरी 'पद'–ह्मणजे ' सुप् ' व ' तिङ् ' हे प्रत्यय–अन्तीं आहेत ज्याच्या अशा शब्दांचें–म्हणजे सुबन्तांचें व तिङन्तांचें–प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें ग्रहण झालेंच असतें. हें खरें कीं, तसें सूत्र असतें तर ' सुप् ' व ' तिङ् ' यांना देखील पदसंज्ञा प्राप्त झाली असती. पण तसें झालें असतें तरी काय बिघडलें असतें ? कारण भाषेंत केवळ ' सुप् ' व ' तिङ् ' प्रत्ययांचा प्रयोग कधींच होत नाहीं. सुबन्ताला व तिङन्ताला पदसंज्ञा प्राप्त होणें, हें इष्ट आहे, व 'सुप्तिङ् पदम् ' एवढें सूत्र असूनहि प्रत्ययग्रहणपरिभाषेच्या मदतीनें तो इष्ट हेतु सिद्ध होऊं शकतो. म्हणून ' सुप्तिङन्तं पदम् ' ह्या सूत्रांत असलेला ' अन्त ' हा शब्द आपल्या अर्थाचें ठिकाणीं चरितार्थ ठरत नसल्यामुळें व ज्ञापकांचे ठिकाणीं जो धर्म असला पाहिजे–म्हणजे ' स्वांशे चारितार्थ्यम्– ' तो धर्म या शब्दाचें ठिकाणीं नसल्यामुळें, हा शब्द या परिभाषेचा ज्ञापक ठरूं शकत नाहीं — अशी शंकाकाराची शंका आहे. ह्यावर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ज्या प्रत्ययग्रहणपरिभाषेच्या आधारावर ही शंका उपस्थित केली आहे ती प्रत्ययग्रहणपरिभाषा ह्या ठिकाणीं मुळींच लागू पडत नाहीं, व त्यामुळें ही शंका व्यर्थ ठरते. प्रत्ययग्रहणपरिभाषा ह्या ठिकाणीं लागत नाहीं असें जें वर म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं,) 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू० २३० या सूत्रानें होणारी पदसंज्ञा प्रकृतीला—म्हणजे ज्याहून प्रत्यय होतो त्या प्रत्ययापर्यंतच्या भागाला–प्राप्त होत असल्यामुळें, 'पद' या शब्दानें केवळ प्रत्ययाचें ग्रहण होणार नाहीं. व पद शब्दानें 'सुप्' 'तिङ्' या प्रत्ययांचें व तसेंच असर्वनामस्थानांत ज्याहून ' सुप् ' प्रत्यय होतो तशा प्रकृतीचेंहि ग्रहण होईल व अशा रीतीनें पदसंज्ञा ही प्रत्ययाला व अप्रत्ययाला लागू पडणारी अशी प्रत्ययाप्रत्ययसाधारण ठरणार; त्यामुळें प्रत्ययग्रहणपरिभाषा अशा ठिकाणीं उपस्थित होऊं शकणार नाहीं, कारण ' प्रत्ययमात्रग्रहणे एषा न तु प्रत्ययाप्रत्ययग्रहणे' असा त्या परिभाषेबद्दल भाष्यकारांनीं सिद्धान्त सांगितला आहे. सारांश 'सुप्तिङ् पदम्' एवढेंच सूत्र केलें असतें तर 'सुप् ' व 'तिङ्' एवढ्यानांच पदसंज्ञा प्राप्त झाली असती, व वर सांगितल्याप्रमाणें त्या ठिकाणीं प्रत्ययग्रहणपरिभाषा लागू पडत नसल्यामुळें, सुबन्ताला व तिङन्ताला पदसंज्ञा प्राप्त होऊं शकली नसती. म्हणून ' अन्त ' शब्दाचें ग्रहण चरितार्थ ठरून तो शब्द प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरतो. )

' सुप्तिङन्तं पदम् '—१-४-१४ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा २८

**नन्ववतप्तेनकुलस्थितमित्यादौ नकुलस्थितशब्दस्य क्तान्तत्वाभावात्समासो न स्यादत आह—**

' अवतप्तेनकुलस्थितम् ' इत्यादि स्थलीं ' नकुलस्थितम् ' हा शब्द ( प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें ) क्तान्त ठरत नसल्यामुळें समास होऊं शकणार नाहीं. ( ' क्षेपे ' सू० ७२४ या सूत्रान्वयें सप्तम्यन्त पदाचा क्तान्त पदाशीं निन्दावाचक अर्थामध्यें समास होत असतो. ' अवतप्तेनकुलस्थितम् ' या उदाहरणांत ' अवतप्ते ' हें सप्तम्यन्त पद आहे, पण ' नकुलस्थितम् ' हें क्तान्त पद नाहीं; कारण ज्याहून ' क्त ' प्रत्यय झाला आहे असें तदादिक्तान्त ' स्थितम् ' एवढेंच पद आहे. ' नकुल ' हा शब्द त्या तदादिक्तान्त शब्दामागें असल्यामुळें ' नकुलस्थितम् ' या पदाचा ' अवतप्ते ' या पदाशीं ' क्षेपे ' या सूत्रान्वयें समास न होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम् ॥ २८ ॥

' जेथें सूत्रांत कृत् प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें ( परिभाषा २३ प्रमाणें कृदन्ताचें तर ग्रहण होतेंच, पण त्याशिवाय) त्या कृदन्तापूर्वी गति किंवा कारक असल्यास, गतिसहित व कारकसहित कृदन्ताचें देखील ग्रहण होतें. '

( ' नकुलेन स्थितम्=नकुलस्थितम् ' येथें ' स्थितम् ' हा भावे क्तान्त शब्द आहे व ' नकुलेन ' ही कर्तरि तृतीया आहे व ' कर्तृकरणे कृता बहुलम् ' सू० ६९४ या सूत्राने दोहोंचा समास होऊन 'नकुलस्थितम्' असा सामासिक शब्द झाला आहे. या शब्दांत ' नकुल ' हें कर्तरितृतीयारूप कारक असून ' स्थितम् ' हें क्तान्त—म्हणजे कृत् प्रत्ययान्त—आहे. म्हणून ह्या परिभाषेप्रमाणें ' नकुलस्थितम् ' हा कारकपूर्वकक्तान्त शब्द क्तान्त ठरतो, व त्यामुळें ' अवतप्ते ' या सप्तम्यन्त पदाशीं 'क्षेपे' या सूत्रान्वयें निंदावाचक अर्थामध्यें त्याचा समास होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं, व ' तत्पुरुषे कृति बहुलम् ' सू० ९७२ या सूत्रान्वयें सप्तम्यलुक् समास होतो. )

**' अस्याश्च कर्मणि क्तान्त उत्तरपदेऽनन्तरो गतिः प्रकृतिस्वर इत्यर्थके ' गतिरनन्तर ' इति सूत्रेऽनन्तरग्रहणं ज्ञापकम् । तद्ध्यभ्युद्धृतमित्यादावतिव्याप्तिवारणार्थम् । प्रत्ययग्रहणपरिभाषयोद्धृतस्य क्तान्तत्वाभावादेवाप्राप्तौ तद् व्यर्थं सदस्या ज्ञापकम् ॥ '**

'कर्मणि' क्तान्त उत्तरपद असल्यास त्याच्या लगेच पूर्वी असलेल्या गतीला प्रकृतिस्वर होतो अशा अर्थाच्या 'गतिरनन्तरः' सू. ३७८३ या सूत्रांत जें 'अनन्तर' शब्दाचें ग्रहण केलें आहे तें ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ' अभ्युद्धृतम् ' इत्यादि स्थलीं

'अभि' या गतीला तें सूत्र लागू नये व 'अभि' ला प्रकृतिस्वर होऊं नये ह्याकरितां त्या सूत्रांत 'अनन्तर' हा शब्द घातला आहे. प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें, 'उद्धृत' हा शब्द क्तान्त ठरत नसल्यामुळें अभि' ला प्रकृतिस्वर प्राप्त होऊंच शकत नाहीं, व त्यामुळें तो 'अनन्तर' शब्द व्यर्थ ठरतो, (पण ही परिभाषा असल्यामुळेंच तो चरितार्थ ठरतो, व अशा रीतीनें) तो शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक होतो. ('आद्युदात्तश्च' सू० ३७०८ या सूत्रान्वयें प्रत्यय हा आद्युदात्त असतो, व 'निपाता आद्युदात्ताः' फिट् सू० ८० या सूत्रान्वयें निपात देखील आद्युदात्त असतो, व 'उपसर्गाश्चाभिवर्जम्' फिट् सू० ८१ या सूत्रान्वयें 'अभि' खेरीज करून इतर उपसर्ग आद्युदात्त असतात व 'अभि' हा अन्तोदात्त असतो. म्हणून 'उद्' चा प्रकृतिस्वर आद्युदात्त आहे व 'अभि' चा प्रकृतिस्वर अन्तोदात्त आहे हें लक्षांत ठेवावें, म्हणजे स्वरप्रक्रियेसंबंधी पुढील ग्रन्थ नीट ध्यानांत येईल. 'उद्' चा 'हृतम्' ह्या क्तान्त पदाशीं 'कुगतिप्रादयः' सू० ७६१ या सूत्रान्वयें समास झाल्यावर 'समासस्य' सू० ३७२१ या सूत्रानें 'उद्धृतम्' हा पूर्ण समासिक शब्द अन्तोदात्त होत असल्यामुळें, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू० ३६५० या सूत्रान्वयें त्या शब्दांतील बाकीचे स्वर अनुदात्त होतात—ह्मणजे 'उद्' चा उदात्त प्रकृतिस्वर नष्ट होऊन अनुदात्त होतो. 'समासस्य' या सूत्राचें बाधक 'तत्पुरुषे तुल्यार्थ' सू० ३७३६ हें सूत्र आहे, व या सूत्रान्वयें 'उद्' या अव्ययाला प्रकृतिस्वर—ह्मणजे आद्युदात्त—होतो. पण या सूत्राचें 'गतिकारकोपपदात् कृत्' सू० ३८७३ हें बाधक सूत्र असल्यामुळें, 'उद्' या गतीपुढें असणाऱ्या 'हृत' या कृदन्ताला प्रकृतिस्वर— ह्मणजे अन्तोदात्त—होतो, व त्यामुळें 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' या सूत्रान्वयें 'उद्' अनुदात्त होतो. पण 'थाथघञ्' सू० ३८७८ हें वरील सूत्राचें बाधक सूत्र असल्यामुळें, या सूत्रान्वयें 'उद्धृत' हा अन्तोदात्त होतो, व त्यामुळें 'उद्' हा अनुदात्तच राहतो; पण ह्याचें देखील बाधक 'गतिरनन्तरः' सू० ३७८३ हें सूत्र आहे, व या सूत्रान्वयें 'उद्धृतम्' येथें क्तान्त उत्तरपद असल्यामुळें, त्याच्या लगेच मागे असणाऱ्या 'उद्' या गतीला प्रकृतिस्वर —ह्मणजे 'आद्युदात्त'—होतो, व त्या पदांतील बाकीचे सर्व स्वर अनुदात्त होतात. सारांश वर सांगितल्याप्रमाणें स्वर प्रातिक्रम असल्यामुळें, 'उद्धृत' हा शब्द आद्युदात्त ठरतो. आतां, 'गतिरनन्तरः' असें सूत्र न करितां पाणिनीनें 'गतिः' एवढेंच सूत्र केलें असतें तर, 'उद्' ह्या गतिसहित 'हृत' हा क्तान्त शब्द,—ह्मणजे 'उद्धृत' हा पूर्ण शब्द,—ह्या परिभाषेप्रमाणें, क्तान्त ठरत असल्यामुळें, त्याच्या लगेच मागे असलेल्या 'अभ्युद्धृतम्' यांतील 'अभि' या गतीला प्रकृतिस्वर—ह्मणजे अन्तोदात्त—झाला असता. तसें न व्हावें ह्मणून त्या सूत्रांत 'अनन्तरः' हा शब्द मुद्दाम घातला आहे. जर ही परिभाषा नसती तर, प्रत्ययग्रहणपरिभाषेप्रमाणें, ज्या धातूहून क्त प्रत्यय झाला आहे असा तदादिक्तान्त 'हृत' एवढाच शब्द क्तान्त ठरला असता, व 'गतिरनन्तरः' या सूत्रांत 'अनन्तरः' हा शब्द घालण्याची कांहींच गरज नव्हती;

कारण ' गति ' हा धातूच्या मागेच असणार व तशा मागें असणाऱ्या गतीला प्रकृति-स्वर झालाच असता, व ' अनन्तरः ' या शब्दाचें ग्रहण व्यर्थ झालें असतें. पण ही परिभाषा असल्यामुळें तो शब्द चरितार्थ ठरून ही परिभाषा ज्ञापित करितो ).

**न चाभ्युद्धृतमित्यादौ परत्वात् 'गतिर्गतौ' वित्यनेनाभेर्निघात एवेति वाच्यम्, पादादिस्थत्वेन पदात्परत्वाभावेन च तदप्राप्तेः । अनन्तर ग्रहणे कृते तु तत्सामर्थ्याद्गत्याक्षिप्तधातुनिरूपितमेवानन्तर्यं गृह्यत इति न दोषः ।**

' गतिरनन्तरः ' या सूत्राच्या मानानें ' गतिर्गतौ ' सू० ३९७७ हें परसूत्र असल्यामुळें, ( ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायान्वयें, तें परसूत्र प्रबल ठरतें व ) त्या सूत्रान्वयें ( ' अभि'च्या पुढें ' उद् ' असल्यामुळें ) ' अभि'ला अनुदात्त स्वर झालाच असता. ( व त्याचा प्रकृतिस्वर—अन्तोदात्त-नष्ट झालाच असता, व त्यामुळें 'उद्'चा प्रकृतिस्वर—आद्युदात्त—कायम राहिलाच असता. ह्मणून ' गतिरनन्तरः ' या सूत्रांत ' अनन्तरः ' हा शब्द घातल्यानें कांहींच फलनिष्पत्ति झाली नाहीं. अशा रीतीनें ' अनन्तरः ' हा शब्द व्यर्थ ठरत असल्यामुळें, तो ह्या परिभाषेचा ज्ञापक मानता येत नाहीं—अशी कोणी शंका केल्यास ग्रन्थकार ह्मणतात कीं, ही शंका बरोबर नाहीं; कारण ज्या सूत्राच्या—म्हणजे ' गतिर्गतौ ' या सूत्राच्या आधारावर ही शंका उपस्थित केली आहे तें सूत्र प्रकृत उदाहरणांत लागूच पडत नाहीं. कारण त्या सूत्रांत ' पदस्य ' सू० ४०१ व ' पदात् ' सू० ४०२ या अधिकारसूत्राची व तसेंच ' अनुदात्तं सर्वमपादादौ ' सू० ४०३ ह्या सूत्रांतील 'अपादादौ या शब्दाची अनुवृत्ति आहे, व त्यामुळें त्या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, गतीच्या पुढें गति असल्यास व तसा गतिसंज्ञक शब्द पादाचा आदि नसल्यास व कोणत्याहि पदापुढें नसल्यास, तो गतिसंज्ञक शब्द अनुदात्त होतो; पण ) ' अभ्युद्धृत ' हा शब्द पादाचा आदि शब्द असून कोणत्याहि पदापुढें नसल्यास तशा ठिकाणीं ' गतिर्गतौ ' हें सूत्र मुळींच लागू पडणार नाहीं. ( व 'गतिरनन्तरः' हेंच सूत्र लागू पडेल व त्या सूत्रांत ) 'अनन्तर' या शब्दाचें ग्रहण केल्यानें ('कशाच्या अनन्तर' अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां ) त्या 'अनन्तर' शब्दाच्या सामर्थ्यानें आपोआपच धातु आक्षिप्त होतो. ( कारण ' उपसर्गाः क्रियायोगे ' ' गतिश्च ' सू० २२ व २३ अशीं सूत्रें असल्यामुळें, उपसर्ग व गति हे नेहमीं धातूच्या पूर्वींच असतात, व ' गति ' असा शब्द उच्चारला कीं, तो धातूच्या मागेच असावयाचा ) व धातूच्या लगेच मागें असणें अशा प्रकारच्या आनन्तर्याचें ' अनन्तर ' या शब्दानें ग्रहण होतें व कांहीं अडचण येत नाहीं. ( ' अभ्युद्धृत ' या स्थलीं ' हृत ' याच्या लगेच मागे ' उद् ' आहे, ' अभि ' नाहीं; कारण ' अभि ' व ' हृत ' या दोहोंमध्यें ' उद् ' चें व्यवधान आहे. म्हणून ' गतिरनन्तरः ' या सूत्रांत ' अनन्तर ' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें,

' उद् ' ला प्रकृतिस्वर—आद्युदात्त—होतो, व ' अभि ' ला प्रकृतिस्वर—अन्तोदात्त—होत नाहीं. सारांश अशा रीतीनें ' अनन्तर ' शब्दाचें ग्रहण, ही परिभाषा असल्यामुळें, चरितार्थ ठरून तो शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. )

**न चाभ्युद्धृतमित्यादावाभिना समासेऽनन्तरस्योदः पूर्वपदत्वाभावेऽपि स्वरार्थं तदिति वाच्यम्, कारकद्दत्ते ' ति सूत्रे कारकादिति योगं विभज्य तत्र गतिग्रहणमनुवर्त्य कारकादेव परं गतिपूर्वपदं क्तान्तमन्तोदात्तमिति नियमेन थाथादिस्वराप्राप्त्या कृत्स्वरेणोद् उदात्तत्वसिद्धेः, तस्मादानन्तरग्रहणं व्यवहितनिवृत्त्यर्थमेवेति ज्ञापकमेव ।**

( आतां शंकाकार अशी शंका करितो कीं, 'गतिरनन्तरः' असें सूत्र न करितां ' गतिः ' एवढेंच सूत्र केलें असतें तर ' अभ्युद्धृतम् ' यांतील ' उद् ' ला प्रकृतिस्वर —उदात्तस्वर—झाला नसता; कारण ' बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम् ' सू० ३७३५ या पूर्वसूत्रांतील ' प्रकृत्या पूर्वपदम् ' हीं पदें ' गतिः ' ह्या सूत्रांत अनुवृत्त होऊन त्या सूत्राचा अर्थ असा झाला असतां कीं, क्तान्त उत्तरपद असून ' गति ' पूर्वपद असल्यास च त्या गतीला प्रकृतिस्वर व्हावा; व तसा अर्थ होत असल्यामुळें, ) ' अभ्युद्धृतम् ' इत्यादि स्थलीं ' अभि ' चा ' उद्धृतम् ' या शब्दांशीं ( ' कुगतिप्रादयः ' या सूत्रान्वयें ) समास झाल्यावर, ' उद् ' हें समासांत पूर्वपद राहत नाहीं. ( अभ्युद्धृतम्' या सामासिक शब्दांत 'अभि' हें पूर्व—म्हणजे प्रथम-पद होतें; त्यामुळें ' उद् '—ला प्रकृतिस्वर—आद्युदात्त-न होतां, ' थाथघञ् ' सू० ३८७८ या सूत्रान्वयें 'उद्धृत' हा शब्द अन्तोदात्त होईल. तसें न व्हावें म्हणून ' गतिरनन्तर; ' या सूत्रांत ' अनन्तर ' हा शब्द घातला आहे. सारांश, ) ' उद् ' ला प्रकृतिस्वर व्हावा म्हणून ' गतिरनन्तरः ' या सूत्रांत ' अनन्तर ' शब्द घातला आहे. ( व त्या हेतूनें तो शब्द त्या सूत्रांत घातला असल्यामुळें, या परिभाषेचा तो शब्द ज्ञापक होऊं शकत नाहीं—असें कोणी म्हटल्यास, ग्रन्थकार म्हणतात कीं, ही शंका बरोबर नाहीं; कारण ) ' कारकाद्दत्त ' सू० ३८८२ या सूत्राचा ' कारकात् ' असा योगविभाग करून व ' गतिकारकोपपदात्कृत् ' सू० ३८७३ या सूत्रांतून ' गति ' शब्दाची अनुवृत्ति करून त्या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, गतिपूर्वक क्तान्तपद कारकाच्या पुढें असलें तरच तें अन्तोदात्त होतें, व हें सूत्र ' थाथघञ् ' या सूत्राचें नियामक सूत्र असल्यामुळें, ' थाथघञ् ' या सूत्रानें होणारें अन्तोदात्तत्व ' अभ्युद्धृतम् ' या शब्दाला होऊं शकत नाहीं. ( कारण ' उद्धृत ' हा गतिपूर्वकक्तान्त शब्द कारकापुढें नसून, ' अभि ' या गतीपुढें आहे. सारांश ' थाथघञ् ' हें सूत्र येथें लागू पडत नसल्यामुळें ' गतिरनन्तरः ' असें सूत्र न मानतां ' गतिः ' एवढेंच सूत्र जरी मानलें तरी त्या सूत्रान्वयें ' उद्धृत ' हा शब्द आद्युदात्त ठरत असल्यामुळें, त्या शब्दाचा ' अभि ' याशीं समास झाल्यावर, ह्या परिभाषेप्रमाणें क्तान्त ठरत असलेल्या ' उद्धृत ' या शब्दाचा

प्रकृतिस्वर—आद्युदात्त—' गतिकारकोपपदात् कृत् ' या सूत्रानें कायम राहतो व अशा रीतीनें ) ' उद् ' ला आपोआपच प्रकृतिस्वर—म्हणजे आद्युदात्त स्वर—प्राप्त होतो. ( सारांश ' उद् ' ला उदात्त स्वराची प्राप्ति, वर सांगितल्याप्रमाणें, इतर रीतीनें सिद्ध होत असल्यामुळें, ' गतिरनन्तरः ' या सूत्रांत ' अनन्तर ' हा शब्द ' उद् ' ला उदात्तस्वर व्हावा म्हणून मुद्दाम घातला आहे हें म्हणणें चूक ठरतें. प्रकृत परिभाषेप्रमाणें ' उद्धृत ' हा पूर्ण शब्द क्तान्त ठरत असल्यामुळें, ' गतिः ' एवढेंच सूत्र असतें तर) ' अभि ' ला जो प्रकृतिस्वर झाला असता तो न व्हावा एवढ्याकरितांच ' अनन्तर ' हा शब्द ' गतिरनन्तरः ' या सूत्रांत घातला आहे, व ही परिभाषा असल्यामुळें तो शब्द चरितार्थ होऊन प्रकृत परिभाषेचा ज्ञापक ठरतो.

**यत्र गतिकारकसमभिव्याहृतं कृदन्तं तत्र कृद्ग्रहणे तद्विशिष्टस्यैव ग्रहणमपिशब्दात्तदसमभिव्याहृतस्य केवलस्यापीति तदर्थः। अन्यथाऽनया कृद्ग्रहणविषये परत्वात् प्रत्ययग्रहणपरिभाषया बाध एव स्यादित्यपि-ग्रहणम्।**

जेथें गतिसहित किंवा कारकासहित कृदन्त उच्चारला असेल तशा ठिकाणीं कृत्-प्रत्ययग्रहणानें तशा गतिविशिष्ट व कारकविशिष्ट कृदन्ताचें ग्रहण होतें; व या परिभाषेंत ' अपि ' शब्द घातला असल्यामुळें जेथें कृदन्तापूर्वी गति किंवा कारक उच्चारला नसेल तेथें कृत्प्रत्ययग्रहणानें केवळ कृदन्ताचें देखील ग्रहण होतें. या परिभाषेंत 'अपि' शब्द घातला नसता तर, ही परिभाषा पर असल्यामुळें, कृत्प्रत्ययाच्या विषयांत प्रत्ययग्रहणपरिभाषेची बाधक झाली असती. ( अष्टाध्यायींतील सूत्रपाठक्रमानुरोधानें सूत्रांचें परापरत्व ठरवितां येतें, पण परिभाषा अष्टाध्यायींत पठित नसल्यामुळें त्यांचें परापरत्व कसें ठरवावें हा प्रश्न सहजच उपस्थित होतो. त्या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, परिभाषांचें परापरत्व, ज्या सूत्रांनीं त्या ज्ञापित झाल्या आहेत त्या ज्ञापकसूत्रांच्या पाठक्रमानुरोधानें ठरविलें जातें. प्रत्ययग्रहणपरिभाषा २३ ही 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' व ' येन विधिस्तदन्तस्य ' या अष्टाध्यायीच्या प्रथमाध्यांत असलेल्या सूत्रांनीं सिद्ध झाली आहे, व प्रकृतपरिभाषा ' गतिरनन्तरः ' या षष्ठाध्यायांतील सूत्रानें ज्ञापित झाली आहे. म्हणून प्रकृत परिभाषा पर ठरते, व'विप्रतिषेधे परं कार्यम्' या न्यायान्वयें ती प्रत्ययग्रहणपरिभाषेची बाधक ठरते. म्हणून प्रकृतपरिभाषेंत ' अपि ' शब्द घातला नसता तर, जेथें जेथें सूत्रांत कृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें तेथें प्रकृतपरिभाषान्वयें गतिपूर्व किंवा कारकपूर्व कृदन्तांचेंच ग्रहण झालें असतें, व ज्याहून कृत्प्रत्यय झाला आहे एवढ्याच तदादितदन्त कृदन्ताचें जें परिभाषा २३ प्रमाणें ग्रहण होऊं शकतें तशा केवळ कृदन्ताचें ग्रहण झालें नसतें. तसें न व्हावें म्हणूनच, या परिभाषेंत ' अपि ' शब्द घातला आहे. )

अत एव साङ्कूटिनमिति ‘ गतिकारकोपपदाना’ मिति ‘ कृद्ग्रहण ’ इति च परिभाषाभ्यां कृदन्तेन समासे कृते विशिष्टादेवाणि सिध्यति न तु सङ्कौटिनमितीति ‘ पुंयोगादि ’ ति सूत्रे भाष्योक्तं सङ्गच्छते। अन्यथा तत्र केवलं कूटिन्नित्येतस्यापीनुणन्तत्वात्ततो ऽणि पाक्षिकदोषो दुर्वार एव स्यात्। स्पष्टं चेदं सर्वं ‘ समासे ऽनञ्पूर्वे इति सूत्रे भाष्यकैयटयोः।

( जेथें गतिपूर्व किंवा कारकपूर्व कृदन्त असेल तेथें तद्विशिष्ट कृदन्ताचेंच ग्रहण होत असून केवळ कृदन्ताचें ग्रहण होत नाहीं असा नियम आहे ) म्हणूनच, ‘ गतिकारकोपपदानाम् ’ परिभाषा ७६ व ही कृद्ग्रहणपरिभाषा २८ या दोन परिभाषांन्वयें (‘सम्’ या गतीचा, ‘अभिविधौ भावे इनुण्’ सू० ३२१८ या सूत्रानें ‘कूट’ शब्दास ‘इनुण्’ प्रत्यय झाल्यावर, इनुणन्त ‘कूटिन् या ) कृदन्ताशीं समास होऊन ‘सङ्कूटिन्’ अशा गतिविशिष्ट कृदन्तालाच (अणिनुणः’ सू० ३२२९ या सूत्रानें) ‘अण्’ प्रत्यय केल्यावर ( तद्धितेष्वचामादेः ’ सू० १०७५ या सूत्रानें आद्यचाला वृद्धि होऊन, ) ‘ साङ्कूटिनम् ’ असें रूप सिद्ध होत व ‘ सङ्कौटिनम् ’ असें रूप सिद्ध होत नाहीं असें जें ‘ पुंयोगात् ’ ४–१४८ या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे तें बरोबर जुळतें; नाहींतर ‘ कूटिन् ’ हा गतिरहित शब्द देखील इनुणन्त असल्यामुळें, तशा गतिरहित कृदन्ताला ‘ अण् ’ प्रत्यय केल्यानें ( कूटिन् यांतील आद्याचाला वृद्धि होऊन ) ‘ सङ्कौटिनम् ’ असें पाक्षिक अशुद्ध रूप सिद्ध होण्याचा प्रसंग आला असता व तो प्रसंग टाळणें अशक्य झालें असतें. ‘ समासेऽनञ्पूर्वे ’ ७–१–३७ या सूत्रावरील भाष्यांत व कैयटाच्या वृत्तींत हें सांगितलें आहे.

गतिरनन्तर ’ इत्यत्र तु गतेः पूर्वपदस्य क्तान्त उत्तरपदे परे कार्यविधानात्तत्समवधानेऽपि केवलस्य क्तान्तत्वेन ग्रहणं बोध्यम्।

परंतु ‘ गतिरनन्तरः ’ या सूत्रांत गति हें पूर्वपद व क्तान्त हें उत्तरपद असतांनाच कार्य सांगितलें असल्यामुळें, गतिविशिष्ट क्तान्त उच्चारला असला तरी ( तशा गतिविशिष्ट क्तान्ताचें ग्रहण न होतां, ) केवळ क्तान्ताचेंच त्या सूत्रान्वयें ग्रहण होतें हें जाणावें. (सारांश ‘गतिरनन्तरः’ या सूत्रास प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं, म्हणूनच त्या सूत्रान्वयें प्रकृतिस्वर करतेवेळीं गतिविशिष्ट क्तान्ताला क्तान्त न मानतां केवळ क्तान्ताला क्तान्त मानून, त्याच्या लगेच पूर्वी असलेल्या गतीला प्रकृतिस्वर करावा. )

इयं च कृद्विशेषग्रहणे कृत्सामान्यग्रहणे च न तु कृदकृद्ग्रहण इति ‘ अनुपसर्जनादि ’ ति सूत्रे भाष्ये स्पष्टम्॥ २८॥

‘ अनुपसर्जनात् ’ ४–१–१४ या सूत्रावरील भाष्यांत असें सांगितलें आहे कीं, जेथें सूत्रांत सामान्य कृत् प्रत्ययाचें अथवा विशेषकृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथेंच ही परिभाषा लागते. जेथें सूत्रांत अशा प्रकारच्या प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे

कीं, जो कृत्प्रत्यय असून कृत्भिन्नहि प्रत्यय आहे तशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं. ('कर्तृकरणे कृता बहुलम्' सू० ६९४ या सूत्रांत 'कृत्' हा शब्द उच्चारून सामान्यकृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे. त्यामुळे ही परिभाषा तशा सूत्रास लागते व 'विष्णुना सुकृतम्=विष्णुसुकृतम्' 'नखैः निर्भिन्नः=नखनिर्भिन्नः' इत्यादि समासांची सिद्धि होते. 'क्षेपे' सू० ७२४ या सूत्रांत 'क्त' या कृद्विशेषप्रत्ययाची अनुवृत्ति आहे. म्हणून तशा सूत्रास ही परिभाषा लागते व 'अवतप्तेनकुलस्थितम्' इत्यादि समासांची सिद्धि होते. पण 'णिनि' हा कृत्प्रत्यय असून तद्धितप्रत्ययहि आहे. 'सुप्यजातौ णिनिस्ताच्छिल्ये' 'व्रते' 'बहुलमाभीक्ष्ण्ये' सू० २९८८ ते २९९१ इत्यादि सूत्रांत 'णिनि' ह्या कृत्प्रत्याचें ग्रहण आहे, व तसेंच 'काश्यपकौशिकाभ्यामृषिभ्यां णिनिः' 'कलापिवैशम्पायनान्तेवासिभ्यश्च' सू० १४८३ व १४८४ इत्यादि सूत्रांत तद्धित 'णिनि' प्रत्ययाचें ग्रहण आहे; म्हणून ज्या सूत्रांत अशा कृदकृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं, आणि त्यामुळें 'बहुसुरागिणी नगरी' इत्यादि उदाहरणांत 'इनः स्त्रियाम्' सू० ८९० या सूत्रानें कप् प्रत्यय होत नाहीं. तसेंच 'अण्' प्रत्यय हा देखील तद्धित व तसाच कृत्प्रत्यय आहे व त्यामुळें त्या प्रत्ययाचें ज्या सूत्रांत ग्रहण केलें असेल तेथें देखील ही परिभाषा लागू पडत नाहीं.)

---

# परिभाषा २९

## पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च ॥ २९ ॥

"पदाधिकारांतील व अङ्गाधिकारांतील सूत्रांत प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असल्यास, त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य त्या सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिकाहून व तसेंच प्रातिपदिकान्ताहून देखील होतें."

**पदमङ्गं च विशेष्यं विशेषणेन च तदन्तविधिः। 'येन विधि' रित्यस्यायं प्रपञ्चः। तेनेष्टकचितं पक्वेष्टकचितमित्यादा 'विष्टकेषीकामालानां चिते' ति ह्रस्वो महान् परममहान् परमातिमहानित्यादौ 'सान्तमहत' इति दीर्घश्च सिद्धः।**

पद व अङ्ग हे शब्द विशेष्य समजावें व विशेषणानें तदन्त विधि करावा. सारांश ही परिभाषा 'येन विधिस्तदन्तस्य' ह्या सूत्राचा अर्थ व्यक्त करणारी (व त्या सूत्राचाच एक पोटभेद) आहे. (ग्रन्थकार पुढें लगेच सांगणार आहेत कीं, या परिभाषेंतील 'पद' शब्दानें पदाधिकाराचें व तसेंच उत्तरपदाधिकाराचें ग्रहण होतें. पदाधिकार अष्टाध्यायीच्या आठव्या अध्यायाच्या प्रथम पादाच्या

सोळाव्या सूत्रापासून सुरू झाला असून त्या अध्यायाच्या तृतीय पादाच्या ' अपदान्तस्य मूर्धन्यः ' या पंचावन्नाव्या सूत्रापर्यंत चालू आहे, व ह्या अधिकारांत 'पदस्य ' हें पद अनुवृत्त असून तें विशेष्य होतें. उत्तरपदाधिकार षष्ठाध्यायाच्या तृतीय पादाच्या आरंभापासून सुरू झाला असून त्या पादाच्या समाप्तीपर्यंत चालू आहे. ह्या अधिकारांत ' उत्तरपद ' हें अनुवृत्त असून विशेष्य होतें व पूर्वपद त्याचें विशेषण होतें. अङ्गाधिकार षष्ठाध्यायाच्या चतुर्थपादाच्या आरंभापासून सुरू झाला असून सप्तमाध्यायाच्या अखेरपर्यंत तो चालू आहे, व या अधिकारांत ' अङ्गस्य ' हें पद सर्वत्र अनुवृत्त असून विशेष्य होतें, व ज्याचा उच्चार करून सूत्रांत कांहीं कार्य होणें त्याला सांगितलें आहे तो त्याचें विशेषण होतो. ' येन विधिस्तदन्तस्य '—म्हणजे विशेषणं तदन्तस्य स्वस्य च संज्ञा स्यात् '—या सूत्रान्वयें विशेषण स्वतःचें व तदन्ताचें ग्राहक होतें ह्याच नियमाचा अनुवाद करणारी ही परिभाषा असल्यामुळें ती सूत्रसिद्धवाचनिकी समजावी. आतां ग्रन्थकार ह्या परिभाषेचीं उदाहरणें देतात.) ही परिभाषा असल्यामुळें ' इष्टकेषीकामालानां चिततूलभारिषु ' सू० १००६ या सूत्रानें जसा ' इष्टकचितम् ' या ठिकाणीं ऱ्हस्व होतो तसाच ' पक्वेष्टकाचितम् ' इत्यादि स्थलींहि ऱ्हस्व होतो. ( या सूत्रांत ' इष्टका, ' ' इषीका ' व ' माला ' हीं पूर्वपदें असून विशेषणें आहेत, म्हणून हीं विशेषणें स्वतःचीं व तदन्ताचीं बोधक होतात. त्यामुळें जशीं ' इषीकतूलम् ' ' मालभारि ' इत्यादिरूपें सिद्ध होतात त्याचप्रमाणें मुञ्जेषीकतूलम् ' व ' उत्पलमालभारि ' इत्यादि रूपें सिद्ध होतात. ) तसेंच ' सान्तमहतः संयोगस्य ' सू० ३१७ या सूत्रान्वयें जसें ' महान् ' या ठिकाणीं दीर्घ होतो तसेंच ' परममहान् ' ' परमातिमहान् ' इत्यादि महदन्त शब्दांची उपधा दीर्घ होते.

**अतएव तदुत्तरपदस्येति पाठोऽयुक्त इति भाष्ये स्पष्टम् । अत्र पदशब्देनोत्तरपदाधिकारः केवलपदाधिकारश्च ।**

( ' परमातिमहान् ' इत्यादिस्थलीं उपधा दीर्घ होत असल्यामुळें, या परिभाषेंतील 'तदन्तस्य ' या शब्दाचे जागीं ' तदुत्तरपदस्य ' हा शब्द घालून ह्या परिभाषेचा.) ' पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य ' असा पाठ करणें अयोग्य आहे हें भाष्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे. ( तसा पाठ मानल्यास जरी ' अतिमहान्, ' ' परममहान् ' यांतील उपधा दीर्घ होईल तरी 'परमातिमहान् ' यांतील उपधा दीर्घ होणार नाहीं; कारण येथें ' महत् ' हें समासांत उत्तरपद नसून ' अतिमहत् ' हें उत्तरपद आहे; परंतु 'तदन्तस्य' हा पाठ स्वीकारल्यास 'परमातिमहत्' इत्यादिरुपांची सिद्धि होऊं शकते.) या परिभाषेंतील ' पद ' शब्दानें केवळ पदाधिकार व तसेंच उत्तरपदाधिकार या दोहोंचेंहि ग्रहण होतें. ( ग्रन्थकारानें पदाधिकारांतील सूत्राचें उदाहरण दिलें नाहीं; तथापि ' अहन् ' सू० ४४३ व ' वसुस्रंसुध्वंस्वनडुहां दः ' सू० ३३४ हीं सूत्रें उदाहरणादाखल देतां येतील, व जसें वरील दोन सूत्रान्वयें ' अहोभ्याम् ' ' अनडुद्भ्याम् '

हीं रूपें होतात तसेंच ' परमाहोभ्याम् ' व 'परमानडुद्भ्याम् ' अशीं रूपें देखील सिद्ध होऊं शकतात. )

**पादस्य पदाज्यातीत्यत्र न तदन्तग्रहणं लक्ष्यानुरोधादिति सर्वं येन विधिरित्यत्र भाष्ये स्पष्टम् ॥ २९ ॥**

तथापि ' पादस्य पदाज्यातिगोपहतेषु ' सू० ९९० ह्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' पाद ' शब्दानें पादान्त प्रातिपदिकाचें ग्रहण करितां येत नाहीं. असें येथें तदन्त ग्रहण न करण्याचें कारण इष्ट रूपसिद्धि करणें हें आहे. ( ' पादस्य पदाज्याति ' हें उत्तरपदाधिकारांतील सूत्र आहे, व ह्या परिभाषेप्रमाणें ' पाद ' शब्दानें पादान्त शब्दाचें देखील ग्रहण व्हावें; पण भाष्यकार असें म्हणतात कीं, ह्या सूत्रांत केवळ प्रातिपदिकाचें ग्रहण करणें इष्ट आहे व प्रातिपदिकान्ताचें ग्रहण करणें योग्य नाहीं; कारण तसें केल्यास, इष्टरूपसिद्धि होणार नाहीं. इष्टरूप सिद्ध करणें हेंच परिभाषांचें मुख्य प्रयोजन असल्यामुळें, जेथें परिभाषा लावल्यानें इष्टरूप सिद्ध होत नाहीं व अशुद्ध रूप सिद्ध होण्याचा प्रसंग येतो तेथें ती मुळींच लावूं नये. व तिच्या मदतीशिवाय इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. ' पादस्य पदाज्यातिगोपहतेषु ' या सूत्रान्वयें, ' पादेन उपहतम् ' असा समास करितांना, 'पाद' शब्दाचें जागीं पदादेश होऊन ' पदोपहतम् ' असें रूप सिद्ध होतें; पण ' पाद ' शब्द आहे अन्तीं ज्याच्या अशा ' दिग्धपादेन ' या शब्दाचा ' उपहतम् ' या शब्दाशीं समास करितांना, ' पाद ' शब्दाचें जागीं पदादेश न होतां, ' दिग्धपादोपहतम् ' असेंच रूप होतें; ' दिग्धपदोपहतम् ' असें रूप होत नाहीं.) ' येन विधिस्तदन्तस्य ' १-१-७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत वर जें म्हटलें आहे तें स्पष्टपणें सांगितलें आहे.

---

## परिभाषा ३०

**नन्वेवमस्यापत्यमिरित्यादावदन्तप्रातिपदिकाभावादिञ् न स्यादत आह—**

( ' येन विधिस्तदन्तस्य ' सू० २६ या सूत्रान्वयें विशेषण हें नेहमीं तदन्ताचें वाचक होतें हा पक्ष स्वीकारल्यास ) ' अस्य अपत्यम् इः ' इत्यादि ठिकाणीं ' अ ' हें अदन्त प्रातिपदिक नसल्यामुळें, ( ' अत इञ् ' सू० १०९५ या सूत्रान्वयें ) 'अ' ला ' इञ् ' प्रत्यय होणार नाहीं. ( ' अत इञ् ' हें सूत्र ' ङ्याप् प्रातिपदिकात् ' या अधिकारांतील सूत्र असल्यामुळें, ह्या सूत्रांत ' प्रातिपदिकात् ' ह्या शब्दाची अनुवृत्ति होते व ' अतः प्रातिपदिकात् इञ् ' असा सूत्राचा अर्थ होतो, येथें ' अतः ' हें विशेषण व ' प्रातिपदिकात् ' हें विशेष्य आहे. ' अतः ' हें विशेषण असल्यामुळें, 'येन विधिस्तदन्तस्य ' ह्या सूत्रानें त्याचा अर्थ ' अदन्तात् ' असा होतो, व ' अतः इञ् '

ह्या सूत्राचा अर्थ ' अदन्तात् प्रातिपदिकात् इञ् स्यात् ' असा होतो. ' अदन्त '— म्हणजे ' अ ' आहे अन्तीं ज्या वर्णसमुदायाच्या—हा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि आहे. ' अस्य अपत्यं इः ' ह्यांतील ' अ '=विष्णु ह्या प्रातिपदिकांत केवळ 'अ' च आहे, अन्यपदार्थ नाहीं. म्हणून ' अ ' ला अदन्त कसें म्हणावें ? दुसरें असें कीं, 'अन्त' ह्या शब्दाचा अर्थ 'सत्यन्यस्मिन् यस्मात्परं नास्ति पूर्वमस्ति सोऽन्त इत्युच्यते' असा भाष्यांत दिला आहे—म्हणजे ज्या वर्णापूर्वी इतर वर्ण असून त्याच्यापुढें कोण-ताहि वर्ण नाहीं ही ' अन्त ' शब्दाची व्याख्या आहे. ही व्याख्या ' अ ' ला लागू पडत नाहीं; कारण त्याच्यापूर्वी कांहींच नाहीं. म्हणून त्याला अदन्त कसें म्हणता येईल व ' इञ्' प्रत्यय कसा व्हावा ? अशी शंका उपस्थित होत असल्यामुळें तिचें निवारण करण्याकरितां ) ही परिभाषा सांगतात.—

## व्यपदेशिवेदकस्मिन् ॥ ३० ॥

" कांहीं तरी निमित्त असल्यामुळें ज्याला मुख्य व्यवहार लागू पडतो अशा शब्दाला जें कार्य सांगितलें आहे तें कार्य, जो एकटा असल्यामुळें मुख्य व्यवहाराचा विषय होऊं शकत नाहीं, त्याला देखील होतें. "

**निमित्तसद्भावाद्विशिष्टोऽपदेशो मुख्यो व्यवहारो यस्यास्ति स. व्यपदेशी । यस्तु व्यपदेशहेत्वभावादविद्यमानव्यपदेशोऽसहायः स तेन तुल्यं वर्तते कार्यं प्रतीत्येकस्मिन्नसहायेऽपि तत्कार्यं कर्तव्यमित्यर्थः । तेनाकारस्याप्यदन्तत्वान्न क्षतिः ।**

कांहींतरी निमित्त असल्यामुळें जो मुख्य व्यवहाराचा विषय होतो—म्हणजे ज्याला मुख्य व्यवहार लागू पडतो—(जसें अनेक मुलें असणें, हें निमित्त असल्यामुळें, त्या सर्व मुलांत जो वडील त्याला ज्येष्ठ व जो धाकटा त्याला कनिष्ठ असें म्हणता येतें) तो ' व्यपदेशी ' होय. जेथें एकटाच असल्यामुळें त्या एकटेपणामुळें व कांहीं निमित्त नसल्यामुळें ज्याला मुख्य व्यवहार लागू पडत नाहीं, ( जसें, एखाद्या गृहस्थास एकच मुलगा असला व इतर मुलें नसलीं तर त्या मुलास ज्येष्ठ अथवा कनिष्ठ असें म्हणतां येत नाहीं ) तो देखील, सूत्रांत सांगितलेलें कार्य करितांना, व्यपदेशीप्रमाणेंच सम-जावा. म्हणून व्यपदेशीला जें कार्य सूत्रांत सांगितलें आहे तें अशा एकट्यालाहि करावें असा ह्या परिभाषेचा अर्थ आहे. म्हणून अकाराचे अन्तीं देखील ' अ ' असल्यामुळें, ( अदन्त प्रातिपदिकाला जें कार्य सांगितलें आहे तें, ह्या परिभाषेप्रमाणें, एकट्या 'अ' ला देखील होतें, व त्यामुळें, ' अस्य अपत्यं इः=अ+इञ् ' येथें ' यस्येतिच ' सू० ३११ या सूत्रानें ' अ ' चा लोप होऊन ' इः ' असें रूप होण्यांत ) कांहीं अडचण येत नाहीं.

**एकस्मिन्नित्युक्तेः सभासन्नयने आकारस्य नादित्वं, दरिद्राधातो**

**विकारस्य नान्तत्वम् । अन्यथा सभासन्नयने भव इत्यर्थे 'वृद्धाच्छः', दरिद्रातेरिवर्णान्तलक्षणोऽच् स्यात् । अत एव हरिष्वित्यादौ सोः पदत्वं न, लोकेऽपि बहुपुत्रसत्वे नैकस्मिन् ज्येष्ठत्वकनिष्ठत्वादिव्यवहारोऽयं मे ज्येष्ठः कनिष्ठो मध्यम इति, किंत्वेकपुत्रसत्व एव ।**

या परिभाषेंत 'एकस्मिन्' हा शब्द असल्यामुळें, 'सभासन्नयन' या शब्दांत असलेल्या आकाराला आदि मानतां येत नाहीं. व तसेंच 'दरिद्रा' या धातूंतील इकाराला अन्त्याक्षर मानतां येत नाहीं. (कारण 'सभासन्नयन' या शब्दांतील आकार, व तसेंच 'दरिद्रा' धातूंतील इकार, एकटा नसून वर्णसमुदायान्तर्गत–म्हणजे इतर वर्णांसह वर्तमान–आहे.) या परिभाषेंत 'असहाय' या अर्थाचा वाचक 'एकस्मिन्' हा शब्द नसता तर, 'सभासन्नयने भवः' या अर्थांमध्यें 'वृद्धाच्छः' सू० १३३७ या सूत्रानें 'छ' प्रत्यय झाला असता; (कारण 'सभासन्नयन' यांतील आकाराला आदिवर्ण मानला असता तर, 'वृद्धिर्यस्याच्आमादिस्तद्वृद्धम्' सू० १३३५ या सूत्रानें त्या शब्दाला 'वृद्ध' संज्ञा प्राप्त झाली असती व त्यामुळें 'वृद्धाच्छः' हें सूत्र लागू पडलें असतें.) तसेंच 'दरिद्रा' यांतील इकाराला अन्त्यवर्ण मानला तर, 'इ'वर्ण अन्तीं असतां 'एरच्' सू० ३२३१ या सूत्रानें होणारा, अच् प्रत्यय झाला असता. या परिभाषेंत 'एकस्मिन्' हा शब्द घातला आहे म्हणूनच 'हरिषु=हरि+सु' या ठिकाणीं 'सु' ला पदसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. (कारण 'सु' हा येथें एकटा नसून 'हरि' या वर्ण-समुदायासह आहे; म्हणून 'सु' हा एकटा असतांना जी त्याला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रान्वयें पदसंज्ञा प्राप्त करून देण्याचा प्रसंग आला असता तो प्रसंग 'सु' हा वर्ण-समुदायान्तर्गत असल्यामुळें येऊं शकत नाहीं.) लौकिक व्यवहारांत देखील, एखाद्या गृहस्थास अनेक पुत्र असल्यास, तो वाटेल त्या पुत्रास हा माझा ज्येष्ठ, मध्यम किंवा कनिष्ठ पुत्र आहे असा व्यवहार करीत नाहीं. (पण सर्वांत जो वडील त्यालाच ज्येष्ठ, सर्वांत जो धाकटा त्यालाच कनिष्ठ, व मधल्यास मध्यम म्हणतो;) परंतु त्याला एकच पुत्र असल्यास तो तसा व्यवहार त्या पुत्राच्या संबंधानें करितो. ( कारण त्याला एकच पुत्र असल्यामुळें, तोच जेष्ठ, तोच कनिष्ठ व तोच मध्यम, असें म्हणतां येतें.)

## अनेन चाशास्त्रीयस्याप्यतिदेशः

ही परिभाषा लौकिक व्यवहाराच्या आधारावर रचली गेली असल्यामुळें, या परिभाषेनें ( जसा शास्त्रीय—म्हणजे सूत्रविहित–कार्याचा अतिदेश होतो तसाच ) अशास्त्रीयाचा–म्हणजे सूत्रानें विहित नसलेल्याचा–देखील अतिदेश होतो. (एकाला जें कार्य सांगितलें आहे तेंच कार्य दुसऱ्यालाहि व्हावें असें विधान करणें याला अतिदश म्हणतात; व तो अतिदेश 'वति' प्रत्ययाचा किंवा सदृशार्थवाचक 'इव' इत्यादि शब्दांचा उपयोग करून केला जातो. प्रकृतस्थलीं 'व्यपदेशि' या शब्दाला 'तत्र तस्येव' सू. १७७९ या सूत्रानें ' वति ' प्रत्यय लावून अतिदेश सांगितला आहे, व त्याचा अर्थ असा होतो

कीं, मुख्याला जें कार्य होणें सांगितलें आहे तें कार्य एकट्याला देखील करावें. ज्या अर्थी ही परिभाषा लौकिक–म्हणजेच अशास्त्रीय–व्यवहाराच्या आधारावर रचली आहे त्याअर्थी ह्या परिभाषान्वयें अशास्त्रीयाचा देखील अतिदेश होतो. शास्त्रिय कार्य म्हणजे सूत्रांत विधेयरूपानें जें कार्य सांगितलें आहे तें होय. जें सूत्रांत कोठेंहि विधेयरूपानें सांगितलें नाहीं तें अशास्त्रीय होय. )

## अत एव इयायेत्यादावेकाच्त्वनिबन्धनद्वित्वसिद्धिः ।

ज्याप्रमाणें मुख्याला शास्त्रीय किंवा अशास्त्रिय कार्य होतें त्याचप्रमाणें तें कार्य असहायाला देखील व्हावें असा या परिभाषेनें कार्यातिदेश केला असल्यामुळें, 'इयाय' इत्यादिस्थलीं एकाच्त्वाच्या निमित्तामुळें होणारें द्वित्व होतें. ( ' लिटि धातोरनभ्यासस्य ' सू० २१७३ या सूत्रान्वयें, लिट् पुढें असतां, अनभ्यस्त धातूच्या अवयवास द्वित्व करावें असें सांगितलें आहे. हें द्वित्वकार्य विधेयप्रतिपादित असल्यामुळें, शास्त्रिय कार्य आहे, व हें कार्य ' एकाचो द्वे प्रथमस्य ' सू० २१७५ या सूत्रान्वयें धातूच्या प्रथम एकाचास होतें. 'एकाच्' या शब्दाचा अर्थ 'एक आहे अच् ज्या वर्णसमुदायांत' असा आहे, व हा शब्द अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि आहे. ' इ ' या धातूंत इतर वर्ण नसून एकटा ' इ ' हाच वर्ण आहे. तथापि, या परिभाषेप्रमाणें, इतर वर्णान्तर्गत एक अच् ज्या धातूंत आहे —जसें, ' गम् ', ' हन् ', ' वद् ' इत्यादि स्थलीं—तशा धातूंपुढें लिट् आला असतां, जसें प्रथम एकाचाला द्वित्व होतें, त्याचप्रमाणें ' इ ' धातूला, लिट्पुढें असतां द्वित्व होतें. द्वित्व कार्य जरी शास्त्रीय आहे तरी एकाच्त्व शास्त्रीय नाहीं कारण पाणिनीयसूत्रांत तें कोठेंहि विधेयरूपानें उपदिष्ट केलें नाहीं. 'यस्मात्प्रत्यविधिः,' ' येन विधिस्तदन्तस्य ' इत्यादि सूत्रांनीं ' तदादि ' ' तदन्त ' ' अङ्ग ' इत्यादि संज्ञांचें जसें विधान केलें आहे तसें एकाच्त्वाचें कोठेंहि विधान केलें नाहीं; असें असून देखिल ' गम् ' ' हन् ' ' वद् ' इत्यादि धातूंचे ठिकाणीं जें वास्तविक एकाच्त्व आहे याचा ' इ ' धातुचें ठिकाणीं अतिदेश केल्यानें, एकाच्त्वाच्या निमित्तामुळें होणारें द्वित्व कार्य ' इ ' धातूलाहि होतें. )

## अत एव भवतीत्यादौ भू इत्यस्याङ्गत्वम्,

ही परिभाषा असल्यामुळेंच ' भवति=भू+शप्+ति ' इत्यादि स्थलीं, (' शप् ' या प्रत्ययाला मानून ) ' भू ' ला अङ्गसंज्ञा होते. ( ' भू+शप्+ति=भव+ति ' या स्थलीं, ' भव ' हे ' तिप् ' प्रत्ययाचें अङ्ग आहे. ' भव ' हें 'भू'नें सुरू झालें असून त्यापुढें इतर वर्ण असल्यामुळें, त्याला तदादि म्हणतां येतें; पण शपाला मानून 'भू'-ला अङ्गसंज्ञा कशी प्राप्त व्हावी? कारण ' भू ' या स्थलीं, वर्णसमुदायामध्यें ' भू ' हा आदि नसून एकटाच आहे व ' सत्यन्यस्मिन् यस्मात् पूर्वं नास्ति परमस्ति स आदिरुच्यते ' अशी 'आदि' शब्दाची भाष्यकारांनीं व्याख्या दिली आहे. या व्याख्येप्रमाणें, ' भ ' ला अङ्गसंज्ञा वास्तविक प्राप्त होऊं शकत नाहीं; तथापि ह्या परिभाषेप्रमाणें तो

एकदा असल्यामुळें त्याला ही संज्ञा प्राप्त होते, व ' भू ' हें शपाचें अङ्ग मानण्यांत, ही परिभाषा असल्यामुळें, कांहीं अडचण येत नाहीं. )

**इयानित्यादौ कार्यकालपक्षे तद्धितान्तत्वनिबन्धनप्रातिपदिकत्वं च सिध्यति । अन्यथा यस्माद्विहितस्तदादित्वाभावान्न स्यात् ।**

तसेच ' इयान् ' इत्यादिस्थलीं, तद्धितान्तत्वामुळें होणारी प्रातिपदिकसंज्ञा कार्यकालपक्षांत ' इयत् ' ला होते. ही परिभाषा नसती तर ज्याहून तद्धित प्रत्यय झाला आहे ती प्रकृति ' इयत् ' या शब्दस्वरूपांत आदि नसल्यामुळें—म्हणजे प्रकृतीचा लोप होऊन प्रत्ययच बाकी राहिला असल्यामुळें—इयत्‌ला कार्यकालपक्षांत प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होऊं शकली नसती. (' कृत्तद्धितसमासाश्च ' सू. १७९ ह्या सूत्रानें तद्धितान्ताला प्रतिपदिकसंज्ञा होत असते ' तद्धितान्त ' या शब्दाचा अर्थ ' ज्या प्रकृतीहून तद्धितप्रत्यय झाला आहे असें प्रकृतिप्रत्ययसमुदायात्मक शब्दस्वरूप ' असा आहे. अशा समुदायांत प्रकृति आदि व प्रत्यय अन्तीं असला तरच तसें शब्दस्वरूप तद्धितान्त मानता येतें; पण ' इयत् ' या स्थलीं ज्या ' इदम् ' प्रकृतीहून ' वतुप् ' प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतीचा लोप होऊन व प्रत्ययाचें पाणिनीय सूत्रान्वयें ' इयत् ' असें रूपान्तर होऊन केवळ प्रत्ययच शिलक राहिला आहे हें प. २३ मध्यें प्रक्रियापूर्वक सिद्ध करून दाखविलें आहे. सारांश ' इयत् ' हा केवळ प्रत्यय असून त्याचयामागें प्रकृति नसल्यामुळें, त्याला तदादितद्धितान्त मानतां येत नाहीं, व त्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. तो प्रातिपदिक न मानता आल्यास, ' ङ्याप् प्रातिपदिकात् ' सू० १८२ या अधिकारसूत्रान्वयें त्याहून ' सु ' इत्यादि विभक्तिप्रत्यय होऊं शकणार नाहींत व 'इयान्' इत्यादि रूपांची सिद्धि होऊं शकणार नाहीं. पण ही परिभाषा असल्यामुळें जरी प्रकृतीचा लोप होऊन 'इयत्' हा केवळ प्रत्यय शिलक राहिला आहे तरी जशी प्रकृतिप्रत्ययसमुदायरूप तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकते तशी या असहाय—म्हणजे एकट्या—' इयत् ' ला देखील व्यपदेशिवद्भावानें होते, व त्यामुळें सुबुत्पत्ति होण्यांत व ' इयान् ' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कार्यकालपक्षांत देखील कांहीं अडचण येत नाहीं. ग्रन्थकारानें ह्या पंक्तीत ' कार्यकालपक्षे ' असा शब्द घातला आहे. त्याचें कारण हें कीं या पंक्तींत जी अडचण दाखवून तिचें निवारण केलें आहे ती अडचण यथोद्देशपक्षांत मुळींच उपस्थित होत नाहीं. ती केवळ कार्यकालपक्षांतच उपस्थित होते. यथोद्देशपक्षांत ' किमिदंभ्यां वो घः ' सू० १८४१ या सूत्रानें ' इदम् ' ला ' वतुप् ' हा तद्धित प्रत्यय होऊन ' इदम् + वतुप् ' अशी स्थिति होतांच, त्याला ' कृत्तद्धितसमासाश्च ' या सूत्रान्वयें लगेच प्रातिपदिकसंज्ञा होते, व ती संज्ञा ' इदम् + वतुप् ' याचें, अनेक सूत्रान्वयें संस्कार होऊन ' इयत् ' असें रूप सिद्ध होईपर्यंत कायम राहून, 'इयत्' ला स्थानिवद्भावानें ती प्राप्त होते. पण कार्यकालपक्षांत ' यदा कार्यं तदा संज्ञापरिभाषम् '

असा नियम असल्यामुळें, ' इयत् ' हें रूप सिद्ध झाल्यावर त्याहून सुबुत्पत्ति करते-वेळीं, हा ' इयत् ' प्रातिपदिक आहे कीं नाहीं हें ठरवितांना ही परिभाषा ' कृत्तद्धितसमासाश्च ' या सूत्राजवळ उपस्थित होते व जरी ' इयत् ' हें तदादितद्धितान्त नाहीं व केवळ प्रत्यय आहे तरी त्याला या परिभाषेप्रमाणें व्यपदेशिवद्भावानें प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते, व सुबुत्पत्ति होऊन ' इयान् ' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

**यत्तु योऽर्थवांस्तत्रार्थस्य त्यागोपादानाभ्यामेकाज्व्यपदेशो यथेयायेत्यादावर्थवतो धातोरयं वर्णरूप एकोऽजिति कैयटस्तन्न। तस्यैकपदा ऋगित्यत्र भाष्योक्तरीत्या मुख्यव्यवहारत्वात् । एकपदा ऋगित्यत्रार्थेन युक्तो व्यपदेश इति भाष्य उक्तम् । ऋक्त्वादेरर्थशब्दोभयवृत्तित्वेन तस्याः शब्दमात्ररूपं पदमेकोऽवयव इत्यर्थ इति तदाशयः ।**

कैयटाचें असें म्हणणें आहे कीं, ज्याला अर्थ असतो त्याच्या अर्थाचें एकदां ग्रहण व एकदां त्याग केला असतां, एकाच्त्वव्यवहार उपपन्न होतो; जसें 'इयाय' इत्यादि स्थलीं 'इ' या अर्थवान् धातूचा (अर्थाचा त्याग केला असतां) 'इ' हा जो एक वर्ण आहे त्याचें ठिकाणीं 'एकाच्' ही संज्ञा लागू पडते. ( मागें हें सांगितलेंच आहे कीं, 'एकः अच् यस्मिन् सः एकाच्' हा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि आहे. येथें अन्यपदार्थ वर्णसमुदाय आहे. म्हणून ज्या वर्णसमुदायांत एक अच् असतो तशाच वर्णसमुदायाला 'एकाच् ' ही संज्ञा लागू पडते. पण 'इ' या धातूंत वर्णसमुदाय नसून एकच वर्ण—म्हणजे 'इ'–आहे. तेव्हां या 'इ' ला एकाच् म्हणावें कसें ? यावर कैयटाचें असें म्हणणें आहे कीं, ज्या स्थलीं एकच वर्ण असून तो अर्थवान् आहे तशा स्थलीं तो वर्ण व त्या वर्णाचा अर्थ या दोहोंचा समुदाय अन्यपदार्थ मानल्यास व तशा वर्णार्थरूपी समुदायाचा तो वर्ण अवयव मानल्यास,'एकाच्' या बहुव्रीहि समासाची उपपत्ति लागते, व अशा रीतीनें 'इ' ला एकाच् म्हणतां येतें. पण ग्रन्थकार म्हणतात कीं) हें कैयटाचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण असें मानल्यास, भाष्यांत 'एकपदा ऋक्' ह्यांतील 'एकपदा' या शब्दाची अन्वर्थकता सिद्ध करण्याकरितां जें प्रतिपादन केलें आहे त्या तऱ्हेनें 'इ' ला एकाच् संज्ञा प्राप्त होते असें म्हणणें हें मुख्य व्यवहाराचें उदाहरण होईल. (व तें वास्तविक गौणव्यवहारांचें उदाहरण असून देखील, तें गौणव्यवहाराचें उदाहरण आहे असें मानतां येणार नाहीं.) 'एकपदा ऋक्' याचें व्याख्यान करितांना 'अर्थेन युक्तो व्यपदेशः' (अर्थामुळें व्यवहार योग्य ठरतो) असें भाष्यकारांनीं भाष्यांत म्हटलें आहे, व त्याचा अर्थ असा आहे कीं, ऋक्त्व हा धर्म अर्थ व शब्द या दोहोंचें ठिकाणीं राहणारा असल्यामुळें, त्या ऋचेंतील वर्णसमुदायरूपी एक पाद त्या ऋचेचा अवयव समजावा हा त्या भाष्याचा आशय आहे. ( शब्द व त्याचा अर्थ या दोहोंचा नित्य संबन्ध असल्यामुळें व अर्थ हा नेहमीं शब्दानेंच अभि-

व्यक्त होणारा असल्यामुळें, ऋक्त्वरूपी धर्म शब्द व अर्थ या दोहोंचें ठिकाणीं विद्यमान असतो. केवळ अर्थ ऋक् नव्हे किंवा केवळ वर्ण ऋक् नव्हे; वर्णार्थरूपसमुदाय ऋक् आहे, व अशा वर्णार्थरूपसमुदायाचा केवळ वर्णात्मक समुदाय अवयव मानल्यानें 'एकपदा' या बहुव्रीहि समासाची उपपत्ति लावतां येते असें भाष्यकाराचें ह्मणणें आहे. 'एकःपादःयस्यां सा एकपदा' असा समास होऊन 'एकपदा' हा शब्द 'संख्यासुपूर्वस्य,' 'पादःपत्' व 'टाबृचि' सू० ८७९, ४३४ व ४५८ हीं सूत्रें लावल्यानें सिद्ध होतो. जिच्यांत केवळ एक पाद आहे अशा ऋचेमध्यें— जसें 'भद्रंनो अपिवातय मनः' ह्या एकपदा ऋचेमध्यें—वास्तविक एक पादाशिवाय कोणताच अन्यपदार्थ नाहीं. मग 'एकपदा' या बहुव्रीहि समासाची उपपत्ति कशी लावावी ? तथापि भाष्यकारांनीं वर सांगितलेल्या तऱ्हेनें त्या समासाची उपपत्ति लावली आहे. पण 'एकपदा ऋक्' हें गौणव्यवहाराचें उदाहरण नसून मुख्यव्यवहाराचें उदाहरण आहे; कारण गौणव्यवहारांत जसा मुख्याचें ठिकाणीं असणाऱ्या धर्माचा गौणाचें—ह्मणजे असहायाचें—ठिकाणीं आरोप केला जातो तसा वरील उदाहरणांत आरोप केला नसून, ऋक् हीच 'व्यपदेशि'—ह्मणजे मुख्य व्यवहाराचा विषय—मानली आहे, व त्याचें कारण हें कीं, ऋचेंतील वर्ण व त्यांचा अर्थ या दोहोंत ऋक्त्वधर्म समान असल्यामुळें, या ठिकाणीं आरोप करण्याचें कामच पडत नाहीं. परंतु 'इ' या धातुला एकाच् मानतेवेळीं मुख्याचें ठिकाणीं—ह्मणजे 'गम्' 'हन्' 'वद्' इत्यादि वर्णसमुदायात्मक एकाच् धातूंत—असणाऱ्या एकाच्त्वरूपी धर्माचा त्या असहाय 'इ' धातूचे ठिकाणीं आरोप करावा लागत असल्यामुळें, तें गौणव्यवहाराचें उदाहरण ठरतें. अशा गौणव्यवहाराच्या उदाहरणाची उपपत्ति लावतांना, मुख्यव्यवहाराच्या उदाहरणाची उपपत्ति लावतेवेळीं ज्या प्रतिपादनशैलीचें अवलंबन भाष्यकारांनीं केलें आहे तिचें अवलंबन करणें अयोग्य आहे. कारण तसें केल्यास तें गौणव्यवहाराचें उदाहरण न होतां मुख्यव्यवहाराचें उदाहरण ठरेल व 'इ' हाच व्यपदेशि होईल. ह्मणून कैयटाचें ह्मणणें बरोबर आहे असें मानतां येत नाहीं हा ग्रन्थकाराचा आशय आहे. )

**तस्मादेकस्मिंस्तत्तद्धर्मारोपेण युगपद्यथा ज्येष्ठत्वादिव्यवहारो यथा च शिलापुत्रकस्य शरीरमित्यादावेकस्मिन्नारोपितानेकावस्थाभिः समुदायरूपत्वाद्यारोपेणैतस्य शरीरमित्यादिव्यवहारस्तथात्रैकाच्त्वादिव्यवहारोपपत्तिरिति लोकन्यायसिद्धेयम् ।**

**( गौणव्यवहारांत मुख्याचे ठिकाणीं असलेल्या धर्मांचा गौणाचे—ह्मणजे असहायाचे—ठिकाणीं आरोप केल्यानें गौणव्यवहाराची उपपत्ति लागते ) ह्मणूनच जेथें एखाद्या गृहस्थास एकच मुलगा असल्यास त्या मुलाचें ठिकाणीं ज्येष्ठत्व, मध्यमत्व, कनिष्ठत्व इत्यादि गुणांचा आरोप करून त्या पुत्राला ज्येष्ठ, मध्यम व कनिष्ठ असें एकाच वेळीं म्हणतां येतें, किंवा 'शिलापुत्रकस्य शरीरम्'**

( वरवंट्याचें शरीर ) या उदाहरणांत ( जरी वरवंटा, आपल्या शरीराहून भिन्न नाहीं तरी आडवा वरवंटा, उभा वरवंटा इत्यादि ) अवस्थाभेद कल्पून त्या अनेक अवस्थेंमध्यें असणाऱ्या वरवंट्याचें जें समुदायरूपी स्वरूप आहे तशा आरोपित समुदायस्वरूपी वरवंट्याचें शरीर—म्हणजे वर्तमानकालिकस्वरूप—असा व्यवहार होतो. त्याचप्रमाणें ' इ ' या एकवर्णात्मक धातूचे ठिकाणीं देखील ( मुख्याच्या ठिकाणीं असणाऱ्या एकाच्चवरूपी धर्माचा आरोप करून) जो एकाच्चत्वव्यवहार केला जातो त्याची (वर सांगितलेल्या लौकिकव्यवहारान्वयें) उपपत्ति लागते; व अशा रीतीनें ही परिभाषा लौकिकव्यवहाराच्या आधारावर रचली असल्यामुळें, ती लौकिकन्यायसिद्ध समजावी.

**न चासहाय एवैतत्प्रवृत्तौ भवतीत्यत्र भू इत्यस्याङ्गत्वानापत्तिः ससहायत्वादिति वाच्यम्, शपमादायाङ्गत्वे कार्ये यस्माद्विहितस्तदादित्वे तस्य ससहायत्वाभावाल्लोके विजातीयकन्यादिसत्वेऽप्येकपुत्रस्य तस्मिन्नेवायमेव ज्येष्ठ इत्यादिव्यवहारवत् ।**

जो असहाय——म्हणजे एकटा—आहे त्याचेंच ठिकाणीं ही परिभाषा प्रवृत्त होते ( असा जो सिद्धान्त वर सांगितला आहे तो बरोबर आहे ) असें मानल्यास, 'भवति' या स्थलीं ' भू ' हें ( शपाचें ) अङ्ग मानतां येणार नाहीं; कारण तो ' भू ' ( शप् लावतेवेळीं एकटा नसून त्याला तिबादिप्रत्ययांचें सहाय्य असल्यामुळें ) ससहाय आहे—असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ' भू ' हें शपाचें अङ्ग आहे अशी शपाला मानून 'भू'ची अङ्गसंज्ञा सिद्ध करतेवेळीं, ज्याहून शप् प्रत्यय झाला आहे त्याचा ' भू ' हा तदादि असल्यामुळें ( व ' भू 'च्या लगेंच पुढें तिप् प्रत्यय नसून दोहोंमध्यें शपाचें व्यवधान असल्यामुळें, ) ' भू ' हा ससहाय आहे असें मानतां येत नाहीं. ('भू+तिप्' अशी स्थिति झाली असतां, 'कर्तरि शप्' सू० २१६७ या सूत्रानें ' भू ' ला शप् विकरण लागतें. सारांश शप् विकरण लागतेवेळीं ' भू ' हा एकटा नसून त्याला तिप् प्रत्ययाचें सहाय्य असतें. म्हणून ' यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम् ' सू० १९९ या सूत्रान्वयें ' भू ' ला तदादि म्हणतां येत नाहीं. 'भू' जर एकटाच असता व त्याला तिप् प्रत्ययाचें सहाय नसतें तर प्रकृतपरिभाषेप्रमाणें त्याचे ठिकाणीं ' तदादि ' असा व्यवहार करता आला असता—अशी शंकाकाराची शंका आहे. त्यावर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ही शंका बरोबर नाहीं, कारण जरी शप् प्रत्यय लागतेवेळीं ' भू ' चे जवळ तिप् प्रत्यय आहे तरी तो तिप् प्रत्यय ' भू 'चा सजातीय नसून विजातीय आहे. 'भू' हा कार्यी आहे—म्हणजे शपाच्या निमित्तानें 'भू'ला कार्य होणें आहे,'तिप्'ला कार्य होणें नाहीं, व तसेंच शप् हें विकरण धातूच्या लगेंच पुढें लागत असल्यामुळें, ' भू ' धातु शपाच्या अपेक्षेनें तदादि ठरतो, व या परिभाषेप्रमाणें त्याचे ठिकाणीं तदादिसंज्ञा योग्य ठरते. ) जसें लौकिक व्यवहारांत एखाद्या गृहस्थास एकच पुत्र असून कांहीं कन्या असल्यास पुत्र व कन्या

यांच्यामध्यें सजातीयत्व नसून विजातीयत्व असल्यामुळें, तो गृहस्थ आपल्या पुत्राचे ठिकाणीं, त्याला कन्या असूनहि, ज्येष्ठ, कनिष्ठ, मध्यम इत्यादि व्यवहार करूं शकतो, त्याचप्रमाणें ' भू ' ह्याला, जरी त्याचे जवळ विजातीय तिप् प्रत्यय आहे तरी शपाच्या अपेक्षेनें अङ्गसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

**न चैवं ' निजौ चत्वार एकाच ' इति भाष्यासङ्गतिरिकारस्यासहायत्वाभावेन तत्रैकाच्त्वानुपपादनादिति वाच्यम्, एकस्मिन्नित्यस्यापर्यालोचनया तत्प्रवृत्तेः ।**

ही परिभाषा जो असहाय आहे त्यालाच लागू पडते असें मानल्यास, ' निजौ चत्वार एकाचः ' ( ह्मणजे ' निज् ' धातूंत चार एकाच्—निज्, इज्, नि, व इ—आहेत ) असें जें भाष्यांत ह्मटलें आहे त्याच्या विरूद्ध हें मत ठरतें; कारण ' निज् ' धातूंतील जो इकार एकाच् मानला आहे ( तो असहाय नसून न् व ज् या दोन वर्णांनीं युक्त असल्यामुळें व ' निज् ' या वर्णसमुदायांत समाविष्ट असल्यामुळें, ) तो ससहाय आहे. ( आणि ज्या अर्थी भाष्यांत अशा ससहाय इकाराला एकाच् संज्ञा लावली आहे त्याअर्थीं हें स्पष्ट होतें कीं, ही परिभाषा असहायासच लागते व ससहायास लागत नाहीं हें ह्मणणें चूक ठरतें—असें कोणी ह्मटल्यास, ग्रन्थकार ह्मणतात कीं, ) ही शंका बरोबर नाहीं; कारण ज्या भाष्याच्या आधारावर ही शंका उपस्थित केली आहे तें वर दिलेलें भाष्य प्रकृत परिभाषेंत असलेल्या ' एकस्मिन् ' या शब्दाच्या अर्थाचा विचार न करितां लिहिलें आहे. ( सारांश ' एकस्मिन् ' या शब्दाच्या अर्थाकडे दुर्लक्ष करून लिहिलेलें वरील भाष्य सिद्धान्तीची उक्ति आहे असें मानतां येत नाहीं. ती एकदेशीची उक्ति आहे असें समजून तिचा स्वीकार करूं नये, व तसें केल्यास, केवळ असहायासच ही परिभाषा लागते असा जो सिद्धान्त वर सांगितला आहे त्यांत कांहीं दोष येत नाहीं. )

**अर्थवता व्यपदेशिवद्भाव इत्यत्रार्थवत्पदेनाप्यसहायत्वमुपलक्ष्यते । अर्थबोधकेन शब्देन व्यपदेशिसदृशो भावः कार्यं लभ्यत इति तदर्थः ।**

( योऽर्थवांस्तत्रार्थस्य त्यागोपादानाभ्यामेकाज्व्यपदेशः' असें जें कैयटानें ह्मटलें आहे तें ' अर्थवता व्यपदेशिवद्भावः ' या भाष्यांतील वचनाला धरून असल्यामुळें, कैयटाचें ह्मणणें चूक नसून अगदीं बरोबर आहे—अशी कोणी शंका केल्यास त्यावर ग्रन्थकार असें ह्मणतात कीं, ) ' अर्थवता व्यपदेशिवद्भावः'—ह्मणजे जो अर्थवान् आहे त्याचे ठिकाणीं जसा मुख्याचे ठिकाणीं व्यवहार होतो तसा करावा—असें जें भाष्यांत ह्मटलें आहे त्यांतील ' अर्थवत् ' शब्दाचा लक्षणावृत्तीनें ' असहाय ' असा अर्थ होतो, व त्याचा अर्थ असा कीं, मुख्याचें ठिकाणीं जसें कार्य होतें तसेंच अर्थबोधक शब्दाचें ठिकाणीं कार्य होतें. ( सारांश ' अर्थवता व्यपदेशिवद्भावः ' यांतील ' अर्थवत् ' शब्दाचा अर्थ ' असहाय ' असा असल्यामुळें, ह्या परिभाषेचा जो अर्थ

आहे तोच त्या उक्तीचा अर्थ होतो, आणि ह्मणून कैयटाचें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं. जो अर्थवान् आहे त्याला आपला अर्थ सांगण्याकरितां दुसऱ्याच्या मदतीची गरज पडत नसल्यामुळें त्याला लक्षणावृत्तीनें 'असहाय' असें म्हणतां येतें.)

**प्रायो ऽसहाय एवार्थवत्वात् । कुरुते इत्यादौ तशब्दाकारोऽचामन्त्य इति व्यवहारे स आदिर्यस्येति व्यवहारे चासहाय एवेति तत्र व्यपदेशिवद्भावेन टिसंज्ञासिद्धिरित्यन्यत्र विस्तरः ॥ ३० ॥**

( मुख्य व्यवहाराचा विषय नसून ज्याला ह्या परिभाषेप्रमाणें व्यपदेशिवद्भावानें व्यवहाराचा विषय ठरविलें जातें तो अर्थवान्, ) त्याचे ठिकाणीं अर्थवत्ता असल्यामुळें, बहुधा असहाय्य असतो. ( पण क्वचित् स्थलीं जो व्यपदेशिवद्भावानें व्यवहाराचा विषय ठरविला जातो तो अर्थवान् नसतो. जसें—) ' कुरुते ' इत्यादि स्थलीं ' त ' या प्रत्ययांतील अकाराचे ठिकाणीं, हा अकार अचामधील अन्त्य अच् आहे व हा अकार वर्णसमुदायांत आदि आहे असे दोन व्यवहार करितांना तो अकार असहायच असतो· ह्मणून व्यपदेशिवद्भावानें त्याचें ठिकाणीं ' टि ' संज्ञा सिद्ध होते. ( ' कृ ' धातूचें आत्मनेपदाचें लटाचें प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रुप तयार करितांना ' कृ+उ+त ' अशी स्थिति झाली असतां, ' टित आत्मनेपदानां टेरे ' सू. २२३३ हें सूत्र प्रवृत्त होतें, व या सूत्रान्वयें ' टि ' ला एत्व होतें ' अचोऽन्त्यादि टि ' सू. ७९ हें टिसंज्ञाविधायक सूत्र आहे व त्याचा अर्थ 'अचां मध्ये योऽन्त्यः स आदिर्यस्य तट्टिसंज्ञं स्यात् ' —ह्मणजे शब्दांतील अचामध्यें जो अन्त्य अच् आहे तो अन्त्य अच् ज्या वर्णसमुदायाचा आदि आहे त्याला ' टि ' असें ह्मणतात—असा आहे ' त ' या प्रत्ययांत अनेक अच् नसून केवळ एक अच्—ह्मणजे ' अ '—आहे, व हा कोणत्याहि वर्णसमुदायाचा आदि नाहीं, कारण ह्याच्या पुढें कोणताहि वर्ण नाहीं. तसेंच तो अकार अर्थवान् देखील नाहीं; ' त ' प्रत्यय अर्थवान् आहे; पण त्यांतील ' अ ' याला कांहींच अर्थ नाहीं. तथापि तो जरी निरर्थक आहे तरी असहाय आहे—ह्मणजे अनेक अचांमधील अन्त्य अच् तो नाहीं व तसेंच कोणत्याहि वर्णसमुदायाचा आदि नाहीं. तरी तो असहाय असल्यामुळें, जरी तो अर्थरहित आहे तरी, या परिभाषेप्रमाणें मुख्याचें ठिकाणीं होणारा व्यवहार त्याचें ठिकाणीं होतो, व त्याला व्यपदेशिवद्भावानें ' अचां मध्ये अन्त्यः ' व ' वर्णसमुदायस्यादिः ' असें मानतां येतें, व त्यामुळें त्याला टिसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं.) ह्या विषयासंबन्धानें इतर ग्रन्थांत विस्तारपूर्वक चर्चा केली आहे. ( येथें सहजच असा प्रश्न उद्भवतो कीं, ' आद्यन्तवदेकस्मिन् ' सू. ३४८ हें अष्टाध्यायींत साक्षात् पठित सूत्र असल्यामुळें व ही परिभाषा त्या सूत्राचाच अर्थ सांगणारी असल्यामुळें, ही वेगळी परिभाषा मानण्याची गरज काय ? पण भाष्यकार ह्मणतात कीं, ' आद्यन्तवदेकस्मिन् ' हें सूत्र असहायाच्या— ह्मणजे एकट्याच्या—ठिकाणीं तदादि व तदन्त एवढेच व्यवहार करण्याच्या कामीं उपयोगी पड-

णारें सूत्र असल्यामुळें मर्यादित सूत्र आहे, व ' व्यपदेशिवदेकस्मिन् ' हा न्याय असहायाचे ठिकाणीं सर्व प्रकारचे व्यवहार लागू करण्याच्या कामी उपयोगी पडणारा असल्यामुळें व्यापक आहे. ह्मणून वास्तविक 'आद्यन्तवदेकस्मिन्' असा सूत्राचा पाठ न करितां ' व्यपदेशिवदेकस्मिन् ' असा त्या सूत्राचा पाठ करणें योग्य आहे; व असा पाठ केल्यासच, ' इ ', ' ऋ ' इत्यादि एकवर्णात्मक धातूंना एकाच् संज्ञा प्राप्त होऊं शकते. ही एकाच् संज्ञा ' आद्यन्तवदेकस्मिन् ' या सूत्रान्वयें तशा धातूंच्या ठिकाणीं प्राप्त होऊं शकत नाहीं. तसेंच ' आदेशप्रत्यययोः' सू. २१२ या सूत्रांतील ' आदेशप्रत्यययोः' ही अवयवषष्ठी असल्यामुळें, प्रत्ययांतील सकार वर्णसमुदायाचा अवयव असला तरच त्याला षत्व होऊं शकेल, पण तो सकार वर्णसमुदायांत नसून एकटाच असल्यास त्याला षत्व होणार नाहीं. ह्मणून व्यपदेशिवदेकस्मिन् ' असा व्यापक सूत्रपाठ असणेंच उचित आहे. पण अखेरीस भाष्यकार असें ह्मणतात कीं असें सूत्र असण्याची देखील कांहीं गरज नाहीं; कारण या सूत्रान्वयें होणारे सर्व व्यवहार लौकिकव्यवहारान्वयेंच सिद्ध होऊं शकतात; व जी गोष्ट लौकिकव्यवहारानें सिद्ध होऊं शकते तिच्या सिद्धीकरितां मुद्दाम सूत्र करण्याची कांहींच गरज नाहीं. सारांश ' आद्यन्तवदेकस्मिन् ' हें सूत्र न मानतां ' व्यपदेशिवदेकस्मिन् ' ही परिभाषा मानली ह्मणजे सर्व कांहीं कामें भागतील. )

---

## परिभाषा ३१

**ननु गर्गादिभ्यो विहितो यञ् तदन्तविधिना परमगर्गादिभ्योऽपि स्यादत आह ॥**

' गर्गादिभ्यो यञ् ' सू. ११०७ ह्या सूत्रानें सांगितलेला ' यञ् ' प्रत्यय जसा गर्गादिगणांत पठित असलेल्या प्रातिपदिकांना होतो तसाच ' येन विधिस्तदन्तस्य ' ह्या सूत्रान्वयें तो प्रत्यय तदन्तविधीनें गर्गादिप्रातिपदिकान्त शब्द ' परमगर्ग ' इत्यादिकांनाहि होईल ( तसा तो होऊं नये ) ह्मणून ही परिभाषा सांगतातः—

### ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति ॥ ३१ ॥

" सूत्रांत जर एखाद्या प्रातिपदिकाचा निर्देश करून त्याला प्रत्यय होणें सांगितलें असेल तर अशा ठिकाणीं तदन्तविधि होत नाहीं ( ह्मणजे प्रातिपदिकान्ताहून तो प्रत्यय न होतां सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिकाहूनच तो प्रत्यय होतो. ) "

( ' गर्गादिभ्यो यञ् ' या सूत्रांत गर्गादिगणांत साक्षात् पठित असलेल्या प्रातिपदिकांचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या प्रातिपदिकाहूनच ' यञ् ' प्रत्यय होतो, व ' परमगर्गाः' इत्यादि प्रातिपदिकान्ताहून तो प्रत्यय होऊं शकत नाहीं )

इयं च समासप्रत्ययविधौ प्रतिषेध उगिद्वर्णग्रहणवर्जमिति वार्तिकस्थप्रत्ययांशानुवादः । अत एवायं प्रत्ययाविधिविषय एव । अत एव येन विधिरिति सूत्रभाष्ये प्रत्ययविधिभिन्नेऽप्तृन्नित्यादौ गृह्यमाणप्रातिपदिकेनापि तदन्तविधिप्रतिपादनं स्वसा परमस्वसेत्याद्युदाहरणं च संगच्छते ॥ अत एव च तदन्तविधिसूत्रे भाष्ये समासेत्यादिनिषेधस्य कथनवदस्य न कथनम् । सोऽपि निषेधो विशिष्य तत्तद्रूपेण गृहीतप्रातिपदिकसूत्र एव । ध्वनितं चेदमसमासे निष्कादिभ्य इति सूत्रे भाष्ये ॥

'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः उगिद्वर्णग्रहणवर्जम्' ह्या वार्तिकांत 'प्रत्यय' शब्दाचें ग्रहण केलें आहे व ही परिभाषा त्या वार्तिकांतील 'प्रत्यय' एवढ्याच अंशाचा अर्थ सांगणारी आहे; ह्मणूनच ज्या सूत्रांत प्रत्यय होणें सांगितलें आहे त्यांनाच ही परिभाषा लागू पडते. ह्मणूनच 'येन विधिस्तदन्तस्य' १—१—७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत, प्रत्ययाचें विधान न करितां भिन्न विधान करणाऱ्या 'अप्तृन्' सू. २७७ इत्यादि सूत्रांत जरी प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे तरी तेथें तदन्तविधि होऊन 'स्वसा' 'परमस्वसा' इत्यादि रूपें सिद्ध होतात असें जें सांगितलें आहे तें योग्य आहे. ('अप्तृन्' या सूत्रांत प्रातिपदिकाहून प्रत्यय व्हावा असें विधान केलें नसून सर्वनामस्थानांत उपधादीर्घ व्हावा असें विधान केलें आहे, ह्मणून अशा ठिकाणीं तदन्तविधि होऊं शकतो, व त्यामुळें 'अप्तृन्' या सूत्रांत जरी 'स्वसृ' या प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे तरी सर्वनामस्थानांत जशी 'स्वसृ' यांतील उपधा दीर्घ होते तशीच 'स्वसृ' आहे अन्तीं ज्याच्या अशा 'परमस्वसृ' याची देखील उपधा दीर्घ होते.) आणि ह्मणूनच 'येन विधिः' या सूत्रावरील भाष्यांत 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' हें निषेधक वार्तिक सांगितलें आहे, पण ही परिभाषा सांगितली नाहीं. (कारण त्या वार्तिकांत प्रकृतपरिभाषेचा अर्थ अंतर्भूत होत असल्यामुळें, तिचा पृथक् निर्देश करण्याची भाष्यकारास गरज वाटली नाहीं.) 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' या वार्तिकांत सांगितलेला निषेध देखील अशाच सूत्रांना लागू पडतो कीं ज्यांमध्यें विशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे. ('उगितश्च' सू० ४५५ 'अत इञ्' सू० १०९५ 'यञिञोश्च' सू. ११०३ इत्यादि सूत्रांत जरी प्रत्यय व्हावा असें विधान केलें आहे तरी त्या सूत्रांत कोणत्याहि विशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण केलें नसल्यामुळें, तशा सूत्रांना तदन्तविधिनिषेध लागू पडत नाहीं, व उगिदन्त प्रातिपदिकांहून 'ङीप्' प्रत्यय होतो. तसेंच अदन्त प्रातिपदिकाहून 'इञ्' प्रत्यय, व ज्यांना गोत्रवाचक यञ् किंवा इञ् प्रत्यय झाला आहे अशा यञन्त व इञन्त प्रातिपदिकांहून फक् प्रत्यय होतो.) 'असमासे निष्कादिभ्यः' ५—१—२० या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे.

अत्र च ज्ञापकं सपूर्वाच्चेति सूत्रम् । अन्यथा पूर्वादिनिरित्यत्र तदन्तविधिनैव सिद्धे किं तेन ॥ ३१ ॥

' सपूर्वाच्च ' सू. १८८७ हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक आहे. जर ही परिभाषा नसती तर ' पूर्वादिनिः' सू. १८८६ या सूत्रानेंच तदन्तविधि केल्यानें काम भागू शकलें असतें, व ' सपूर्वाच्च ' हें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती ( 'पूर्वादिनिः' या सूत्रांत ' पूर्व ' या विशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे व त्या प्रातिपदिकाहून ' इनि ' प्रत्यय व्हावा असें विधान केलें आहे. येथें जर तदन्तविधि लागू पडला असता—म्हणजे ' पूर्व ' शब्द आहे अन्तीं ज्याच्या अशा प्रातिपदिकाहून देखील जर ' इनि ' प्रत्यय होऊं शकला असता—तर ' सपूर्वाच्च '—म्हणजे ' पूर्व ' शब्दापूर्वी इतर शब्द असला तरी तशा पूर्वशब्दान्त प्रातिपदिकाला देखील इनि प्रत्यय होतो— असें वेगळें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. पण ही परिभाषा असल्यामुळें ' सपूर्वाच्च ' हें सूत्र पाणिनीला मुद्दाम करावें लागलें; आणि अशा रीतीनें तें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

---

# परिभाषा ३२

नन्वेवं सूत्रान्ताट्ठक् दशान्ताड्ड एकगोपूर्वादित्यादेः केवलसूत्रशब्द-दशन्शब्दैकशब्दादिष्वपि प्रवृत्तिर्व्यपदेशिवद्भावात्स्यादत आह—

' सूत्रान्तात् ठक् ' सू० १२७०, ' दशान्तात् डः ' सू० १८४६, ' एकगो-पूर्वात् ठञ् ' सू. १९२५ इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय केवळ सूत्र, दशन्, एक, गो इत्यादि शब्दांस देखील व्यपदेशिवद्भावानें होतील. ( जेथें सूत्रांत विशिष्ट प्रातिप-दिकाचें ग्रहण केलें आहे तेथें तदन्तविधि होत नाहीं असें प. ३१ मध्यें सांगितलें आहे. पण त्या परिभाषेंत, जेथें विशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे तेथें ' व्यपदेशिवदे-कस्मिन् ' या परिभाषान्वयें मुख्याचें ठिकाणीं होणारा व्यवहार असहायाचे ठिकाणीं होत नाहीं असें सांगितलें नाहीं. त्यामुळें, ज्या प्रातिपदिकाच्या अन्तीं 'सूत्र' हा शब्द आहे अशा सूत्रान्त प्रातिपदिकाहून ठक् प्रत्यय व्हावा असें विधान करणाऱ्या 'सूत्रान्तात् ठक् ' या सूत्रान्वयें, केवळ ' सूत्र ' या असहाय प्रातिपदिकाहून देखील ठक् प्रत्यय होण्याची आपत्ति येते. तसेंच ' दशन् ' हा शब्द आहे अन्ती ज्याच्या अशा तदन्त-शब्दाहून जसा 'ड' प्रत्यय होतो तसाच केवळ ' दशन् ' शब्दाहून देखिल ' ड ' प्रत्यय होण्याची आपत्ति येते. तसेंच 'एक' शब्द किंवा ' गो ' शब्द आहे पूर्वी ज्याच्या अशा एकपूर्व किंवा गोपूर्व शब्दाहून जसा ठञ् प्रत्यय होतो तसाच तो प्रत्यय केवळ ' एक ' किंवा केवळ ' गो ' शब्दाहून होण्याची आपत्ति येते. ही आपत्ति व्यपदेशिवद्भाव मान-ल्यानें येते. ती टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन ॥ ३२ ॥

' व्यपदेशिवदेकस्मिन् ' ही परिभाषा ( जेथें सूत्रांत विशिष्ट प्रातिपदिकांचें ग्रहण करून त्यांना प्रत्यय होणें सांगितलें आहे तशा ) प्रातिपदिकांचे ठिकाणीं लागू पडत नाहीं ''

( ही परिभाषा असल्यामुळें, ज्या अर्थी वर दिलेल्या तीन सूत्रांत सूत्रान्त प्रातिपदिकाहून ठक् प्रत्यय व्हावा, दशान्त प्रातिपदिकाहून ' ड ' प्रत्यय व्हावा, व एकपूर्व किंवा गोपूर्व प्रातिपदिकाहून ' ठञ् ' प्रत्यय व्हावा असें सांगितलें आहे त्या अर्थी अशा सूत्रान्त, दशान्त, व एकपूर्व किंवा गोपूर्व प्रातिपदिकांच्या विषयांत व्यपदेशिवद्भाव लागू पडत नाहीं, व त्यामुळें केवळ सूत्र, दशन्, एक, व गो या प्रातिपदिकांहून त्या त्या सूत्रांत सांगितलेले प्रत्यय होऊं शकत नाहींत. )

**पूर्वात्सपूर्वादिनिरित्येकयोगे एव कर्त्तव्ये पृथग्योगकरणमस्या ज्ञापकम् ।**

' पूर्वात् सपूर्वादिनिः ' असें एक सूत्र न करितां ' पूर्वादिनिः, ' ' सपूर्वाच्च ' सू० १८८६ व १८८७ अशीं दोन वेगळीं सूत्रें केलीं आहेत हेंच या परिभाषेचें ज्ञापक होय. ( पूर्वात्सपूर्वादिनिः ' असें एकच सूत्र केलें असतें तर, ' पूर्वी कांहीं आहे ज्याच्या अशा पूर्वान्त प्रातिपदिकाहून इनि प्रत्यय व्हावा ' असा त्या सूत्राचा अर्थ झाला असता; व ही परिभाषा नसती तर, ' व्यपदेशिवदेकस्मिन् ' या परिभाषेप्रमाणें, केवळ ' पूर्व ' या प्रातिपदिकाहून देखील इनि प्रत्यय झाला असता. पण ही परिभाषा असल्यामुळें, तसें एकच सूत्र केलें असतें तर, केवळ ' पूर्व ' या प्रातिपदिकाहून इनि प्रत्यय होऊं शकला नसता. पण ' पूर्व ' या प्रातिपदिकाहून देखिल इनि प्रत्यय होणें इष्ट असल्यामुळें, पाणिनीला वर सांगितलेलीं दोन सूत्रें करावीं लागलीं, व अशा रीतीनें तीं दोन सूत्रें ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतात. )

**न चेष्टादिभ्य इति सूत्रेऽनुवृत्त्यर्थं तथा पाठोऽत एवानिष्टीत्यादिसिद्धिरिति वाच्यम् । ज्ञापकपरभाष्यप्रामाण्येनानिष्टीत्यादिप्रयोगाणामनिष्टत्वात् । एकयोगेऽपि तावत उत्तरत्रानुवृत्तौ बाधकाभावाच्च ।**

' इष्टादिभ्यश्च ' सू० १८८८ या उत्तरसूत्रांत ' सपूर्वाच्च ' या पूर्वसूत्राची अनुवृत्ति व्हावी ह्मणून पाणिनीनें दोन वेगळीं वरील सूत्रें केलीं, व अशी अनुवृत्ति असल्यामुळेंच, ' अनिष्टी ' इत्यादि रूपें सिद्ध होतात— असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण वरील दोन सूत्रें या परिभाषेचें ज्ञापक आहेत असें ज्या भाष्यांत सांगितलें आहे तें ज्ञापकपर भाष्य प्रमाण असल्यामुळें, ' अनिष्टी ' इत्यादि रूपें अशुद्ध आहेत असेंच मानलें पाहिजे. ( ' इष्टादिभ्यश्च ' या सूत्रांत ' सपूर्वाच्च ' या सूत्राची

अनुवृत्ति व्हावी म्हणून पाणिनीनें एक सूत्र न करितां दोन वेगळीं सूत्रें केलीं असें मानल्यास, योगविभाग चारितार्थ ठरेल व वरील दोन सूत्रें या परिभाषेचें ज्ञापक मानलीं जाऊं शकणार नाहींत पण ज्याअर्थीं भाष्यकारांनीं तीं दोन सुत्रें या परिभाषेची ज्ञापक मानलीं आहेत—व भाष्यकाराचें म्हणणें प्रमाण मानलेंच पाहिजे—त्याअर्थीं ' सपूर्वाच्च' हें सूत्र ' इष्टादिभ्यश्च ' या सूत्रांत अनुवृत्त होत नाहीं हें मानणें भाग आहे; व तसें मानलें असतां, ' नञ्+इष्ट+इनि=अनिष्टी ' हें रूप आपोआपच अशुद्ध ठरतें; कारण ' इष्ट ' इत्यादि प्रातिपदिकांहून इनि प्रत्यय होणें सांगितलें आहे, इष्टान्त शब्दाहून, इनि प्रत्यय होणें सांगितलें नाहीं, व प. ३१ प्रमाणें तदन्तविधि होऊं शकत नाहीं. ) दोन वेगळीं सूत्रें न करितां एकच सूत्र–म्हणजे ' पूर्वात्सपूर्वादिनिः ' एवढें एकच सूत्र—केलें असतें तरी ( ' क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्तते ' या परिभाषेप्रमाणें, ' सपूर्वात् ' एवढ्याच पदाची ' इष्टादिभ्यश्च ' या ) उत्तरसूत्रांत अनुवृत्ति करण्यांत कांहींच अडचण आली नसती. ( म्हणून अनुवृत्ति होण्याकरितां योगविभाग केला आहे हें मानणें अगदीं चूक ठरतें. ही परिभाषा असल्यामुळें, तसा योगविभाग करणें भाग पडलें, व अशा रीतीनें तो योगविभाग या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. )

**अत एव नान्तादसङ्ख्यादेरिति चरितार्थम् । अन्यथा पञ्चम इत्यादावपि व्यपदेशिवद्भावेन सङ्ख्यादित्वात्तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ॥**

ही परिभाषा असल्यामुळेंच ' नान्तादसङ्ख्यादेर्मट् ' सू० १८५० हें सूत्र चरितार्थ ठरतें. ही परिभाषा नसती तर ' पञ्चमः ' इत्यादि स्थलीं देखील, ' व्यपदेशिवदेकस्मिन् ' या परिभाषेप्रमाणें, ' पञ्चन् ' इत्यादि नान्त संख्यावाचक शब्दाला व्यपदेशिवद्भावानें संख्यादि मानतां येत असल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरलें असतें. ('तस्य पूरणे डट् ' सू० १८४९ या सूत्रानंतर ' नान्तादसंख्यादेर्मट् ' हें सूत्र आहे, व या उत्तरसूत्राचा अर्थ असा आहे कीं संख्यावाचक नकारान्त शब्दापूर्वीं संख्यावाचक शब्द नसल्यास, त्याला झालेल्या ' डट् ' प्रत्ययाला ' मट् ' आगम होतो. येथें जर व्यपदेशिवदेकस्मिन् ' ही परिभाषा लावली तर 'पञ्चन् ' अष्टन् ', 'दशन् ', इत्यादि नकारान्त संख्यावाचक शब्द देखील व्यपदेशिवद्भावानें ' संख्यादि ' म्हणतां यतील, व त्यामुळें ' नान्तादसंख्यादेः ' हें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थल सांपडणार नाहीं, व तें सूत्र व्यर्थ ठरेल. पण या परिभाषेप्रमाणें अशा ठिकाणीं व्यपदेशिवद्भावाचा प्रतिषेध केला असल्यामुळें, तें सूत्र चरितार्थ ठरतें. )

**इयं च प्रातिपदिकग्रहणे एव न तु प्रातिपदिकाप्रातिपदिकग्रहणे, तेनोगितश्चेत्यत्र न दोष इति तत्रैव भाष्ये स्पष्टम्**

ज्या सूत्रांत प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे तशाच सूत्राला ही परिभाषा लागते. पण जेथें सूत्रांत असा शब्द उच्चारला आहे कीं जो प्रातिपदिकास व त्याचप्रमाणें अप्रातिपदिकासहि लागू पडतो तेथें ही परिभाषा लागत नाहीं. म्हणूनच ' उगितश्च ' सू०

४५५ ( या सूत्रांत ' उगित् ' असा शब्द उच्चारला असल्यामुळें, त्याला ही परिभाषा लागत नाहीं व त्यामुळें इष्टरूपसिद्धि होण्यांत ) कांहीं अडचण येत नाहीं असें त्या सूत्रावरील भाष्यांतच ४-१-६ सांगितलें आहे. (' उक् ' प्रत्याहारांतील उ, ऋ, किंवा ऌ ज्यांत इत् आहेत त्याला ' उगित् ' असें ह्मणतात. प्रत्यय उगित् असूं शकतो, जसें मतुप्, शतृ इत्यादि. प्रातिपदिकहि ' उगित् ' असूं शकतें, जसें सर्वादिगणांत पठित असलेलें ' भवतु ' हें सर्वनाम. सारांश ' उगित् ' हा शब्द प्रातिपदिकास व तसेंच अप्रातिपदिकास लागणारा असल्यामुळें, त्याला ही परिभाषा लागू पडत नाहीं. ' उगितश्च ' या सूत्राचा ' उगितः प्रातिपदिकात् ङीप् स्यात् ' असा अर्थ करावा किंवा उगिदन्तात् प्रातिपदिकात् ङीप् स्यात् ' असा अर्थ करावा असा ' उगितश्च ' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं प्रश्न केला आहे, व ते ह्मणतात कीं, ' उगितः प्रातिपदिकात् ङीप् स्यात् ' असा अर्थ केला तर ' भवती ' ' महती ' अशीं रूपें सिद्ध होतील; पण ' अतिभवती,' ' अतिमहती ' अशीं रूपें सिद्ध होणार नाहींत. तशीं रूपें तदन्तविधीनें सिद्ध होऊं शकतील असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ' ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति ' अशी परिभाषा आहे. ' उगिदन्तात् प्रातिपदिकात् ङीप् स्यात् ' असा जर सूत्राचा अर्थ केला तर अतिभवती, अतिमहती अशीं रूप सिद्ध होतील, पण भवती, महती हीं रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. व्यपदेशिवद्भावानें तीं रूपें सिद्ध होऊं शकतील असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ' व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन ' ही परिभाषा आहे. पण भाषेंत तर भवती, अतिभवती व महती, अतिमहती अशीं दोन्हीं प्रकारचीं रूपें प्रचलित असून शुद्ध आहेत. मग हीं दोन्ही प्रकारचीं रूपें सिद्ध व्हावीं कशीं ? दोन्हींकडून अशा प्रकारची अडचण दाखवून त्या अडचणीचें निवारण करण्याकरितां भाष्यकार असें ह्मणतात कीं, ' उगित् ' हा शब्द केवळ प्रातिपदिकाचा बोधक नसून प्रातिपदिक व अप्रातिपदिक या दोहोंचाहि बोधक आहे. ह्मणून अशा ठिकाणीं वरील दोन्ही परिभाषा ३१ व ३२ लागत नाहींत–म्हणजे अशा ठिकाणीं तदन्तविधीचा किंवा व्यपदेशिवद्भावाचा प्रतिषेध लागू पडत नाहीं,—व त्यामुळें ' उगितश्च ' या सूत्राचा वर दिलेल्या दोन अर्थांपैकीं कोणताहि अर्थ केला तरी उभयविधरूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं.)

**इयं ग्रहणवतेति च परिभाषा प्रत्ययविधिविषयैवेत्यसमासे निष्कादिभ्य इति सूत्रे भाष्यकैयटयोः । तेन अह्नित्यादेः परमाहन्शब्दे केवलाहन्शब्दे च प्रवृत्तिरित्यन्यत्र विस्तरः ॥ ३२ ॥**

जेथें सूत्रांत ( विशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असून त्या प्रातिपदिकास ) प्रत्यय होणें सांगितलें आहे तशाच ठिकाणीं ही परिभाषा व ' ग्रहणवता प्रातिपदिकेन ' प. ३१ ही परिभाषा लागू पडते असें ' असमासे निष्कादिभ्यः' ५-१-२० या सूत्रा-

वरील भाष्यांत व तसेंच कैयटाच्या वृत्तींत सांगितलें आहे. असें आहे ह्मणूनच ' अहन् ' सू. ४४३ हें सूत्र केवळ ' अहन् ' शब्दाला व तसेंच ' परमाहन् ' शब्दाला लागू पडतें असें इतर स्थलीं विस्तारपूर्वक सांगितलें आहे. ( पदाच्या अन्तीं नकार असल्यास त्याला रुत्व होतें असें ' अहन् ' या सूत्रांत सांगितलें आहे. त्या सूत्रांत जरी ' अहन् ' या प्रातिपदिकाचें ग्रहण केलें आहे तरी त्या प्रातिपदिकाहून कोणताहि प्रत्यय होण्याचें विधान केलें नाहीं. ह्मणून अशा सूत्राला प. ३१ व ३२ लागू पडत नाहींत. त्यामुळें ' अहन्+भ्याम्=अहर्+भ्याम् ' अशा स्थितींत ' हशिच ' सू. १६६ या सूत्रानें रकाराचा उकार होऊन ' अह+उ+भ्याम्=अहोभ्याम् ' हें रूप जसें होतें तसेंच ' परमाहोभ्याम् ' हें रूप देखील होतें. येथें हें सांगणें जरूर आहे कीं, जेथें सूत्रांत अन्त, आदि, पूर्व, सह, किंवा त्यांच्या पर्यायशब्दांचा उपयोग करून सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिकान्ताहून किंवा सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिक आदि असतां समुदायाहून प्रत्यय होणें सांगितलें आहे तशाच ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू शकते हें उघड आहे; कारण तशाच ठिकाणीं व्यपदेशिवद्भाव होण्याचा संभव असतो. )

---

# परिभाषा ३३

**ननु वान्तो यीत्यादौ यादौ प्रत्यय इत्यर्थः कथमत आह ।**

' वान्तो यि प्रत्यये ' सू० ६३ इत्यादि सूत्रांत (तदन्तविधि करून 'यान्तप्रत्यय पुढें असतां ' असा अर्थ न होतां,) ' यकारानें सुरू होणारा प्रत्यय पुढें असतां ' असा अर्थ कां व्हावा ? म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे ॥ ३३ ॥

" सूत्रांत सप्तमीविभक्तींत कोणताहि ' अल् ' उच्चारून तो ' अल् ' पुढें असतांना जें कार्य सांगितलें आहे तें कार्य, ' अलादि पुढें असतांना ' असा अर्थ करून, करावें " ( ही परिभाषा असल्यामुळें, ' यि ' याचा अर्थ ' यादौ ' असा होतो. )

**तदन्तविधेरपवाद इयम् । वाचनिक्येषा येन विधिरित्यत्र भाष्ये पठिता । अस्याश्च स्वरूपसती सप्तमी निमित्तम् । अत एव नेड्वशि कृतीत्यादौ वशादेः कृत इत्याद्यर्थलाभः ॥**

ही परिभाषा 'येन विधिस्तदन्तस्य' या सूत्रानें होणाऱ्या तदन्तविधीचा अपवाद म्हणून सांगितली आहे ही वाचनिकी असून ' येन विधिस्तदन्तस्य ' १–१–७२ ह्या सूत्र वरील भाष्यांत पठित केली आहे जेथें सूत्रांत कोणताहि अल् उच्चारून त्या अलाचा

सप्तमीविभक्तीच्या रूपानें निर्देश केला आहे ( मग त्या सप्तमीचा अर्थ षष्ठी विभक्तींत करावा लागला तरी हरकत नाहीं, पण 'अल्' सप्तमीविभक्तींतच उच्चारला असला पाहिजे) तेथें ही परिभाषा लागू पडते. म्हणूनच ' नेड्वशि कृति ' सू० २९८१ इत्यादि सूत्रांत ' वशादेः कृतः ' असा अर्थ होतो ( ' वश् ' म्हणजे ' वश् ' प्रत्याहारांतील कोणताहि 'अल्;' 'नेड्वशि कृति' ह्या सूत्रांत अशा प्रकारचा अल् सप्तमी विभक्तींत उच्चारला आहे व त्या सप्तमी विभक्तींचा अर्थ जरी षष्ठी विभक्तिप्रमाणें होतो तरी ही परिभाषा लागू पडते, व त्यामुळें, ' वशादेः कृत्प्रत्ययस्य इट् न स्यात् ' असा अर्थ होतो. )

**इयं चार्द्धधातुकस्येडिति सूत्रे वलादेरित्यादिग्रहणसामर्थ्याद्विशेष्यविशेषणयोरुभयोः सप्तम्यन्तत्व एव प्रवर्तते। तेन डः सि धुडित्यादौ सादेः पदस्येति नार्थः ॥**

' आर्धधातुकस्येड् वलादेः ' सू० २१८४ ह्या सूत्रांत ' वलादेः ' ह्या ठिकाणीं ' आदि ' शब्दाचें ग्रहण केलें आहे. ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, जेथें सूत्रांत विशेषण व विशेष्य ह्या दोहोंचाहि निर्देश केला असून तीं दोन्हीं सप्तमी विभक्तींत उच्चारलीं असतील तेथेंच ही परिभाषा लागू पडते. ( ' आर्धधातुकस्येड् वलादेः ' ह्या सूत्रांत वल् प्रत्याहारांतील वर्ण ' वलि ' अशा रीतीनें सप्तमी विभक्तींत उच्चारला नसून षष्ठी विभक्तींत उच्चारला आहे व ' वलादेः ' हें विशेषण व ' आर्धधातुकस्य ' हें विशेष्य षष्ठी विभक्तींत उच्चारलीं आहेत. त्यामुळें, ह्या सूत्रास ही परिभाषा लागत नाहीं आणि म्हणूनच, ह्या सूत्रांत ' वलादेः ' ह्या ठिकाणीं ' आदि ' शब्दाचें ग्रहण केलें आहे. 'आर्धधातुके वलि' असें सूत्र असतें तर ही परिभाषा लागू पडली असती.) ह्मणूनच 'डः सि धुट्' सू० १३१–' डान्तस्य सस्य धुट् वा स्यात् '–इत्यादि स्थलीं, ' सादेः पदस्य ' असा अर्थ होत नाहीं. ( कारण येथें ' सि ' हें कशाचेंहि विशेषण नाहीं, व विशेषण आणि विशेष्य ह्यांचा ह्या सूत्रांत सप्तमीं विभक्तींत निर्देश केला नाहीं. ह्मणून येथें ही परिभाषा लागू पडत नाहीं. ' सादेः पदस्य ' असा अर्थ केल्यास, ' षड्+सु ' अशा स्थितींत, ' सु ' हा प्रत्यय असून पद नसल्यामुळें, त्याला ' धुट् ' होणार नाहीं, व ' षट्त्सु ' असें वैकल्पिक रूप सिद्ध होणार नाहीं )

**तीषसह, सेऽसिचीत्यादौ यथा तादेरित्याद्यर्थलाभस्तथा शब्देन्दुशखरे निरूपितम् ॥ ३२ ॥**

' तीषसहलुभरुषरिषः ' सू० २३४० व ' सेऽसिचि कृतचृतछृदतृदनृतः ' सू० २५०६ इत्यादि सूत्रांत ' तादेः ' ' सादेः ' असा अर्थ कसा होतो हें शब्देन्दुशेखरांत सांगितलें आहे. ( वरील दोन्हीं सूत्रांत ' आर्धधातुकस्य ' ह्या पदाची अनुवृत्ति आहे. ' तीषसह ' ह्या सूत्रांत ' ति ' ह्या सप्तम्यन्ताला मानून, 'आर्धधातुकस्य' हें विपरिणामानें सप्तम्यन्त केलें असतां, विशेषण ' ति ' व विशेष्य ' आर्धधातुके ' हीं दोन्हीं सप्तम्यन्त असल्यामुळें ही परिभाषा लागते, व ' ति ' ह्याचा ' तादेः ' असा अर्थ

होतो. तसेंच ‘ सेऽसिचि ’ ह्या सूत्रांत ‘ असिचि से ’ हें सप्तम्यन्त विशेषण असून ‘ आर्धधातुकस्य ’ हें अनुवृत्त पद सप्तम्यन्तांत विपरिणाम करून विशेष्य केल्यास, विशेषण व विशेष्य सप्तमी विभक्तींत असल्यामुळें, ‘ से ’ ह्याचा अर्थ ‘ सादेः ’ असा होतो. दोन्हीं सूत्रांत जरी सप्तमी षष्ठ्यर्थक आहे तरी अलूचा सप्तमी विभक्तींत निर्देश केला असल्यामुळें व विशेष्य विभक्तिविपरिणामानें सप्तमींत अनुवृत्त असल्यामुळें ही परिभाषा लागू पडण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

---

# परिभाषा ३४

घटपटं घटपटावित्यादिसिद्धय आह ॥

‘ घट ’ व ‘ पट ’ ह्या दोन व्यक्तिवाचक पदांचा समास केला असतां ‘घटपटम्’ व ‘ घटपटौ ’ अशीं दोन्हीं प्रकारचीं सामासिकरूपें ( विकल्पेकरून ) सिद्ध व्हावीं ह्या-करितां ही परिभाषा सांगतातः—

## सर्वो द्वन्द्वो विभाषयैकवद्भवति ॥ ३४ ॥

“ सर्व द्वन्द्व विकल्पेकरून एकवचनान्त ( समाहार द्वन्द्व ) होतात. ”

**द्वन्द्वश्च प्राणीत्यादिप्रकरणाविषयः सर्वो द्वन्द्व इत्यर्थः ॥ चार्थे द्वन्द्व इति सूत्रेण समाहारेतरेतरयोगयोरविशेषेण द्वन्द्वविधानान्न्यायसिद्धे-यम् ॥**

‘ द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम् ’ इत्यादि प्रकरणांत न येणारा द्वन्द्व असा ह्या परिभाषेंतील ‘ द्वन्द्व ’ शब्दाचा अर्थ समजावा. ( ‘ द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम् ’ ह्या सूत्रापासून ‘ गवाश्वप्रभृतीनि च ’ ह्या सूत्रापर्यंत जीं सूत्रें आहेत त्या सूत्रांनीं—सू० ९०६ तें ९१५—नियमेकरून एकवचनी नपुंसक होणाऱ्या समाहारद्वन्द्वास ही परिभाषा लागत नाहीं, व तेथें विकल्प न होतां, समाहारद्वन्द्वच होतो. ) ‘ चार्थे द्वन्द्वः ’ सू० ९०१ ह्या द्वन्द्वविधायक सूत्रांतील ‘ च ’ चे जे दोन अर्थ—ह्मणजे ‘ समाहार ’ व ‘ इतरेतर-योग ’—आहेत ह्या पैकीं कोणत्याहि अर्थांत द्वन्द्व समास करावा असें सांगितलें असल्यामुळें, त्या सूत्रपठितन्यायानें ही परिभाषा सिद्ध होते. ( सारांश ही परिभाषा ‘ चार्थे द्वन्द्वः ’ या सूत्राच्या अर्थाचा केवळ अनुवाद करणारी आहे. )

**तिष्यपुनर्वस्वोरिति सूत्रस्थं बहुवचनस्येतिग्रहणमस्या ज्ञापकम् तद्धीदं तिष्यपुनर्वस्वित्यत्र तद्व्यावृत्त्यर्थम् ॥**

‘ तिष्यपुनर्वस्वोर्नक्षत्रद्वन्द्वे बहुवचनस्य द्विवचनं नित्यम् ’ सू० ८२० या सूत्रां-तील ‘ बहुवचनस्य ’ हा शब्द या परिभाषेचा ज्ञापक आहे व तो शब्द ह्या सूत्रांत असा

करितां घातला आहे कीं, हें सूत्र ' तिष्यपुनर्वसु ' अशा ( नपुंसक एकवचनान्त समाहारद्वन्द्वरूपी ) सामासिक शद्वास लागू नये. ( तिष्य नक्षत्र एक, व पुनर्वसु नक्षत्र दोन असल्यामुळें, तिष्य व पुनर्वसु यांचा द्वन्द्व समास केला असतां, जर नित्य बहुवचनाचीच प्राप्ति असती तर ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांत ' बहुवचनस्य ' हा शद्व घालण्याची कांहींच गरज नव्हती व तो शद्व व्यर्थ ठरतो. पण ही परिभाषा असल्यामुळें द्वन्द्वसमास करतेवेळीं विकल्पानें समाहारद्वन्द्व होत असतो, व तिष्य आणि पुनर्वसु यांचा समाहार द्वन्द्व केला असतां जें एकवचनी सामासिकरूप होईल तशा एकवचनी रूपास ही परिभाषा लागू नये ह्मणून ' बहुवचनस्य ' हा शद्व त्या सूत्रांत घालणें भाग पडलें, व अशा रीतीनें तो शद्व चरितार्थ होऊन या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. पण येथें सहज असा प्रश्न उद्भवतो कीं, ' द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम् ' या प्रकरणांत ' जातिरप्राणिनाम् ' हें सूत्र पठित असल्यामुळें व त्या प्रकरणांत पठित असलेल्या सूत्रांनीं होणारा द्वन्द्व नियमेंकरून एकवचनी समाहारद्वन्द्वच होत असल्यामुळें, 'तिष्यपुनर्वस्वोः' हें सूत्रच व्यर्थ ठरतें; कारण तिष्य व पुनर्वसु हे प्राणि नसल्यामुळें ' जातिरप्राणिनाम् ' हें सूत्र त्यानां लागू पडून त्यांचा नियमानें एकवचनी समाहारद्वन्द्वच होणार व बहुवचनान्त इतरेतरयोगद्वन्द्व समास होणारच नाहीं. पण ' बहुवचनस्य ' हा शद्व वरील सूत्रांत घातला असल्यामुळें, हें स्पष्ट होतें कीं, तिष्य व पुनर्वसु यांचा विकल्पेंकरून एकवचनी समाहारद्वन्द्व होतो; व तसा समाहारद्वन्द्व अशाच ठिकाणीं होतो कीं, जेथें व्यक्ति प्राधान्येंकरून विवक्षित नसून जाति प्रधानत्वानें विवक्षित आहे; पण जेथें व्यक्ति प्रधानत्वानें विवक्षित आहे तेथें समाहारद्वन्द्व न होतां इतरेतरद्वन्द्व होतो. अशा रीतीनें व्यवस्थित विभाषेनें ' जातिरप्राणिनाम् ' या सूत्राचा अर्थ केला असतां, ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांतील ' बहुवचनस्य ' हा शद्व चरितार्थ ठरतो, व त्या शद्वाच्या सामर्थ्यानें हें ध्वनित होतें कीं, प्रत्येक द्वन्द्वसमास इतरेतरयोग व समाहार अशा दोन्ही रूपांत होऊं शकतो. )

**न चैवमप्यत्र जातिरप्राणिनामिति नित्यैकवद्भावेन बहुवचनाभावादिदं सूत्रं व्यर्थमिति वाच्यम् । तद्वैकल्पिकत्वस्याप्यनेन ज्ञापनात् ।**

' जातिरप्राणिनाम् ' सू० ९१० या सूत्रान्वयें ( जे प्राणि नाहींत त्यांचा ) नित्य एकवचनी समाहारद्वन्द्व होत असल्यामुळें ( व तिष्य व पुनर्वसु हे प्राणि नसल्यामुळें त्यांचा समास करतेवेळीं ) बहुवचनाची प्राप्तिच नाहीं म्हणून, ' तिष्यपुनर्वस्वोः ' हें सूत्र व्यर्थ ठरतें—असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ( ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांत ' बहुवचनस्य ' हा शद्व घातला असल्यामुळें ) त्या शद्वानें हें देखील ज्ञापित होतें कीं, ' जातिरप्राणिनाम् ' या सूत्रान्वयें विकल्पेंकरून दोन्हीं प्रकारचे द्वन्द्व समास होत असतात. ( सारांश जरी 'द्वन्द्वश्च प्राणितूर्य' या प्रकरणांत ' जातिरप्राणिनाम् ' हें सूत्र पठित आहे व जरी त्या प्रकरणांत पठित असलेल्या सूत्रांनीं

नियमेकरून एकवचनी समाहारद्वन्द्वच होतो तरी ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांत ' बहुवचनस्य ' हा शब्द घातला असल्यामुळें हें ज्ञापित होतें कीं, ' जातिरप्राणिनाम् ' या सूत्रानें होणारा द्वन्द्वसमास विकल्पानें इतरेतरयोगरूपीहि होऊं शकतो, व हा विकल्प व्यवस्थित विकल्प आहे हें मागील पंक्तींत सांगितलेंच आहे. )

**न चैते प्राणिन इति वाच्यम्। आपोमयः प्राण इति श्रुतेरद्भिर्विना म्लायमानप्राणानामेव प्राणित्वात् । स्पष्टं चेदं तिष्यपुनर्वस्वोरिति सूत्रे भाष्ये ॥**

तिष्य व पुनर्वसु हे प्राणी आहेत ( म्हणून ' जातिरप्राणिनाम् ' हें सूत्र त्यांना लागूच पडत नाहीं व ' तिष्यपुनर्वसु ' असा नपुंसक एकवचनान्त समाहारद्वन्द्व होऊंच शकत नाहीं. म्हणून या उदाहरणांत विकल्पेकरून दोन्ही प्रकारच्या द्वन्द्वाची प्राप्ति नसल्यामुळें, ' तिष्यपुनर्वस्वोः ' या सूत्रांतील ' बहुवचनस्य ' हा शब्द व्यर्थ ठरतो व तो शब्द या परिभाषेचा ज्ञापक मानता येत नाहीं )—असें कोणी म्हटल्यास ते म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' आपोमयः प्राणः ' ह्या श्रुतीवरून हें स्पष्ट होतें कीं, पाण्याशिवाय ज्यांचा प्राण राहूं शकत नाहीं त्यानांच प्राणी ही संज्ञा लागू पडते. ( तिष्य व पुनर्वसु हे पाण्याशिवाय देखील राहूं शकत असल्यामुळें, त्यांना प्राणी ही संज्ञा लागू पडत नाहीं; आणि म्हणून 'जातिरप्राणिनाम्' हें सूत्र त्यांचें ठिकाणीं लागू पडते व त्यांचा विकल्पेकरून समाहारद्वन्द्व होऊं शकतो, व तसेंच ' तिष्यपुनर्वस्वोः ' ह्या सूत्रान्वयें इतरेतरयोगद्वन्द्वहि होऊं शकतो; आणि ' तिष्यपुनर्वस्वोः ' हें सूत्र असें सांगतें कीं, जेथें इतरेतरयोगद्वन्द्व होऊन बहुवचनाची प्राप्ति आहे तेथें बहुवचनाचे जागीं द्विवचन करावें व जेथें विकल्पानें समाहारद्वन्द्व होऊन बहुवचनाची प्राप्ति नाहीं तशा ठिकाणीं या सूत्राची प्रवृत्तिच होत नाहीं. सारांश ' तिष्यपुनर्वस्वोः ' हें सूत्र व तसेंच त्या सूत्रांतील ' बहुवचन ' हा शब्द व्यर्थ ठरत नाहीं, व वर सांगितल्याप्रमाणें ' बहुवचनस्य ' हा शब्द या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. ) ' तिष्यपुनर्वस्वोः ' १–२–६३ या सूत्रांवरील भाष्यांत हें सर्व सांगितलें आहे.

**अत एव द्वन्द्वश्च प्राणीत्यादेः प्राण्यङ्गादीनामेव समाहार इति विपरीतनियमो न ॥ ३४ ॥**

म्हणूनच ' द्वन्द्वश्च प्राणितूर्य ' इत्यादि स्थलीं, ' प्राण्यङ्गानामेव समाहारः ' असा उलट नियम सिद्ध होत नाहीं. ( ह्या परिभाषेप्रमाणें सर्व द्वन्द्व विकल्पेकरून समाहारद्वन्द्व होतात. तथापि ' प्राणितूर्य ' या प्रकरणांत पठित असलेल्या सूत्रांच्या विषयांत समाहारद्वन्द्वच व्हावा व इतरेतरद्वन्द्व होऊं शकत नाहीं असा नियम करण्याकरितां तीं सूत्रें सांगितलीं आहेत. पण तेवढ्याच सूत्रांत सांगितलेल्या ठिकाणीं समाहारद्वन्द्व व्हावा व इतर ठिकाणीं तसा द्वन्द्व होऊं नये असा उलट नियम मानणें बरोबर नाहीं. )

---

## परिभाषा ३५

### सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते ॥ ३५ ॥

"(अष्टाध्यायीतील सूत्रांत सांगितलेले) सर्व नियम वेदांत विकल्पेकरून लागू पडतात"

**व्यत्ययो बहुलमिति सूत्रे भाष्ये बहुलमिति योगविभागेन षष्ठीयुक्तश्छन्दसीति सूत्रे वेति योगविभागेन चैषा साधिता । तेन प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यतीत्यादि सिद्धम् । युध्यत इति प्राप्नोति ॥ ३६ ॥**

'व्यत्ययो बहुलम्' ३-१-८५ ह्या सूत्रावरील भाष्यांत, 'बहुलम्' असा योगविभाग करून आणि ( पूर्व सूत्रांतून 'छन्दसि' ह्या शब्दाची अनुवृत्ति करून व अशा रीतीनें 'छन्दसि बहुलम्' असें योगविभागानें पृथक् सूत्र तयार करून ) आणि तसेंच 'षष्ठीयुक्तश्छन्दसि वा' १-४-९ ह्या सूत्रावरील भाष्यांत 'वा' ('छन्दसि वा') असा योगविभाग करून ही परिभाषा सिद्ध केली आहे. ही परिभाषा असल्यामुळेंच 'प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यति' इत्यादि सिद्ध होतें ( युध् ' हा दिवादिगणांतील धातु 'अनुदात्तेत्' असल्यामुळें, 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू० २१५७ ह्या सूत्रानें त्याला आत्मनेपदप्रत्यय पावले आहेत; परंतु सर्वच सूत्रें वेदांत विकल्पेकरून लागत असल्यामुळें, 'युध्यते' असें रूप न करितां, 'युध्यति' असें परस्मैपदाचें रूप केलें आहे. ) वास्तविक 'युध्यते' असा प्रयोग प्राप्त होता.

---

## परिभाषा ३६

**ननु क्षिय इत्यादावियङ्कथमत आह ॥**

'क्षियः' सू० ३३३८ इत्यादि सूत्रांत 'इयङ्' कशाच्या आधारें केला आहे? ('अचि श्नुधातुभ्रुवाम्' सू० २७१ ह्या सूत्रानें धातूच्या इकारास व उकारास, 'अच्' पुढें असतां, अनुक्रमेकरून इयङ् व उवङ् असे आदेश होतात. 'क्षियः' ह्या सूत्रांतील 'क्षि' हा धातु नसून ह्या शब्दानें धातुचें अनुकरण केलें आहे. म्हणून अचि श्नु' ह्या सूत्रानें त्या 'क्षि' शब्दांतील इकारास इयङादेश न व्हावा व 'क्षियः' असें रूप होऊं नये. तें कां होतें ह्याचें कारण स्पष्ट व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

### प्रकृतिवदनुकरणं भवति ॥ ३६ ॥

" प्रकृतीचें ( मूळशब्दाचें ) अनुकरण करणाऱ्या शब्दाचें जागीं प्रकृतीचे नियम लागतात. "

( म्हणूनच अनुकरण व त्याची प्रकृति ह्यांचीं एकसारखींच रूपें होतात. )

**क्षिय इतीयङ्निर्देशोऽस्या ज्ञापकः ॥ तत्रैव प्रातिपदिकत्वनिबन्धन- विभक्तिकरणादिनित्या चेयमिति क्षियो दीर्घादिति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥३६॥**

'क्षियः' ह्या जागीं केलेला इयङ् आदेश ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे 'क्षियः' असें रूप करितांना प्रातिपदिकास होणारा विभक्तिप्रत्यय लावला असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य आहे हें देखील सिद्ध होतें असें 'क्षियो दीर्घात्' ८-१-४६ ह्या सत्रा-वरील भाष्यांत सांगितलें आहे. ( मूळ 'क्षि' धातुचें अनुकरण करणाऱ्या 'क्षि' ह्या शब्दाची 'क्षि' धातूप्रमाणेंच वास्तविक, ह्या परिभाषेप्रमाणें, रूपें व्हावीं; 'अर्थ-वदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू. १७८ ह्या सूत्राप्रमाणें धातूला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होत नाहीं. म्हणून प्रातिपदिकास लागणारे विभक्तिप्रत्यय 'क्षि' ह्या शब्दास होऊं नयेत; तथापि तसे विभक्तिप्रत्यय लावून 'क्षियः' असें षष्ठीचें रूप केलें आहे. ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे. )

---

# परिभाषा ३७

**ननु रामावित्यादौ वृद्धौ कृतायां कार्यकालपक्षे कथं पदत्वमुभयत आश्रयणेऽन्तादिवत्वाभावाद्यस्माद्विहितस्तदादितदन्तत्वाभावादत आह ॥**

'रामौ' इत्यादि स्थलीं वृद्धि केल्यावर 'रामौ' या शद्बाला कार्यकालपक्षांत पदसंज्ञा कशी प्राप्त व्हावी ? कारण एकादेशाला एकेच वेळीं पूर्ववर्णाचा अन्त व उत्तर-वर्णाचा आदि, 'अन्तादिवच्च' या सूत्रान्वयें, मानतां येत नाहीं. त्या एकादेशास उत्तरवर्णाचा आदि मानल्यास, ज्याहून प्रत्यय झाला आहे ती प्रकृति प्रत्ययापूर्वी राहत नाहीं; त्या एकादेशास पूर्ववर्णाचा अन्त मानल्यास, तो शद्ब प्रत्ययान्त राहत नाहीं; अशा रीतीनें तदादि व तदन्त असा 'रामौ' हा शद्ब ठरत नसल्यामुळें, त्याला पद कसें म्हणावें ? ( 'रामौ पश्य' या उदाहरणांत 'तिङ् अतिङः' सू. ३९३५ या सूत्रान्वयें 'पश्य' या तिङन्ताला अनुदात्त स्वर करतेवेळीं, जर तें तिङन्त पद अति-ङन्त पदापुढें असेल तरच त्याला अनुदात्त स्वर हातो असा नियम असल्यामुळें, 'रामौ' हें पद आहे किंवा नाहीं ह्या संबंधानें विचार करितांना, कार्यकालपक्षांत 'तिङ् आतिङः' या सूत्राजवळ 'सुप्तिङन्तं पदम्' हें पदसंज्ञाविधायक सूत्र उपस्थित होतें. त्यावेळीं 'वृद्धि-रेचि' सू. ७२ या सूत्रान्वयें 'राम+औट्=रामौ' असा वृद्धिरूप एकादेश पुर्वीच होऊन गेलेला असल्यामुळें, व प्रकृति व प्रत्यय आपापल्या स्वरूपांत उपलब्ध नसल्यामुळें, 'रामौ' याला सुबन्त मानावें कसें ? कारण अन्तीं असलेला 'औट्' हा प्रत्यय एका-देशानें गिळंकृत केला आहे. 'औ' ह्या वृद्धिरूप एकादेशास जर एकेच वेळीं 'राम' या प्रकृतीचा अन्त व 'औट्' या प्रत्ययाचा आदि मानतां आलें तर 'रामौ' याल

पद मानतां येईल. पण ' उभयत आश्रयणे नान्तादिवत् ' असा भाष्य सिद्धान्त आहे. म्हणून तसें करितां येत नाहीं. ' औ ' या एकादेशास ' राम ' ह्या प्रकृतीचा अन्त मानतां येतें, किंवा औट् या प्रत्ययाचा आदि मानतां येतें ' औ ' ह्या एकादेशास ' राम ' ह्या प्रकृतीचा अन्त मानल्यास, पुढें प्रत्यय राहत नसल्यामुळें, ' रामौ ' याला सुबन्त मानतां येत नाहीं, व त्यामुळें त्याला पदसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. ' औ ' या एकादेशास ' औट् ' प्रत्ययाचा आदि मानलें तर ' राम्+औ ' अशी स्थिति होऊन, ज्याहून प्रत्यय झाला आहे ती प्रकृति—म्हणजे ' राम ' ही प्रकृति—न राहतां, 'राम्' अशी विकृतप्रकृति राहते. ' प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम् ' अशी परिभाषा असल्यामुळें, ज्याहून प्रत्यय झाला आहे त्या शब्दाच्या प्रारंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जें शब्दस्वरूप असतें तशा शब्दस्वरूपाचें, ' सुप्तिङन्तं पदम् ' या सूत्रांतील ' सुप् ' या प्रत्ययानें ग्रहण होतें व तशा प्रकृतिप्रत्ययसमुदायरूप शब्दासच पदसंज्ञा प्राप्त होते. तसें शब्दस्वरूप येथें उपलब्ध नसल्यामुळें ' रामौ ' याला पद मानावें कसें ? जर ' औ ' ह्या एकादेशास ' औट् ' प्रत्ययाचा आदि मानल्यानें ' राम् ' अशी जी प्रकृति होते त्या प्रकृतीस कोणत्या तरी शास्त्राच्या आधारें ही मूळ प्रकृतीच—म्हणजे ' राम '—आहे असें मानतां आलें, तरच ' रामौ ' याला कार्यकालपक्षांत पदसंज्ञा प्राप्त होऊं शकेल, व ही परिभाषा तसें आधारभूत शास्त्र आहे ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## एकदेशविकृतमनन्यवत् ॥ ३७ ॥

" ज्याच्या एक भागांत कांहीं बदल झाला आहे तो त्यामुळें आपल्या पूर्वरूपाहून भिन्न होत नाहीं. "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' औ ' या एकादेशास ' औट् ' या प्रत्ययाचा आदि मानल्यानें ' राम् ' अशी जी एकदेशविकृत प्रकृति होते तिला मूळ प्रकृति—म्हणजे ' राम '—मानतां येतें, व त्यामुळें ' रामौ ' याला कार्यकालपक्षांत पदसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. वर जी अडचण दाखविली आहे ती कार्यकालपक्षांतच उपस्थित होतें. अशी अडचण यथोद्देशपक्षांत येतच नाहीं; कारण त्या पक्षांत ' राम+औट् ' अशी स्थिति होतांच, 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रान्वयें पदसंज्ञा एकदम प्राप्त होते; व ' वृद्धिरेचि ' या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन ' रामौ ' असें रूप झाल्यावर देखील, स्थानिवद्भावानें ती पदसंज्ञा ' रामौ ' याला प्राप्त होतें. पण कार्यकालपक्षांत ' यदा कार्यं तदा संज्ञापरिभाषम् ' असा न्याय असल्यामुळें, वर दाखविलेली अडचण उपस्थित होते. )

**अनन्यवदित्यस्यान्यवन्नेत्यर्थः । तत्रान्यसादृश्यनिषेधेऽन्यत्वाभावः सुतराम् । अत एव तादृशादर्थबोधः । अन्यथा शक्ततावच्छेदकानुपूर्व्यज्ञानात्ततो बोधो न स्यात् ।**

या परिभाषांत असलेल्या ' अनन्यवत् ' या शब्दाचा, ' दुसऱ्यासारखा—म्हणजे भिन्न—होत नाहीं ' असा अर्थ आहे. ' अनन्यवत् ' या शब्दानें दुसऱ्याशीं सादृश्य असणें ह्याचा निषेध केला असल्यामुळें, ( एकदेशांत विकृत झालेल्या शब्दाला मूळ शब्द-स्वरूपाहून ) दुसरेपणा किंवा भिन्नत्व मुळींच प्राप्त होत नाहीं असें आपोआपच सिद्ध होतें. म्हणूनच नशः विकृत शब्दाहून अर्थबोध होतो. विकृतरूप मूळरूपाहून भिन्न मानल्यास, ज्या वर्णक्रमांत अर्थबोध करण्याची शक्ति असते ( त्या वर्णक्रमांत बदल झाला असल्यामुळें, तो वर्णक्रम आपल्यास दिसत नाहीं म्हणून ) त्या वर्णक्रमाचें ज्ञान होत नसल्यामुळें, त्या विकृत शब्दापासून अर्थाचा बोध होऊं शकणार नाहीं.

**एवं च रामिति मान्तस्य यस्माद्विहितस्तत्त्वमौ इत्यस्य परादिवत्वेन सुप्त्वमिति तदादितदन्तत्वमार्थसमाजग्रस्तम् । छिन्नपुच्छे शुनि श्वत्वव्यवहारवन्मान्ते तत्त्वं लोकन्यायसिद्धम् ।**

( शास्त्रीय कार्य केल्यानें मूळ शब्दाच्या एकदेशांत बदल पडला तरी तो विकृत शब्द मूळ शब्दच आहे असें ह्या परिभाषेप्रमाणें मानतां येतें ) म्हणून मान्त ' राम् ' शब्दाला, ज्या ' राम ' या मूळ प्रकृतीहून ' औट् ' प्रत्यय झाला आहे तीच ही प्रकृति आहे असें मानतां येत असल्यामुळें व ' औ ' या एकादेशास ' औट् ' प्रत्ययाचा आदि ( ' अन्तादिवच्च ' या सूत्रान्वयें ) मानतां येत असल्यामुळें, ' रामौ ' या स्थलीं तदादि व तदन्त या दोन्ही अंशांची उपपत्ति लागते—म्हणजे तदादि व तदन्त या दोन्ही शब्दांच्या अर्थांचा जो समुदाय त्यानें युक्त 'रामौ' हा शब्द आहे असें ज्ञान होतें व अशा रीतीनें ' रामौ ' याला सुबन्त मानतां येत असल्यामुळें, त्याचे ठिकाणीं पदसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ( सारांश ' राम+औट्=रामौ ' या स्थलीं ' वृद्धिरेचि ' या सूत्रान्वयें झालेल्या ' औ ' ह्या एकादेशास ' औ ' या प्रत्ययाचा आदि मानल्यानें, ' रामौ ' हा शब्द सुप्प्रत्ययान्त ठरतो; व असें केल्यानें जरी 'राम्' अशी विकृत प्रकृति होते तरी ही विकृत झालेली प्रकृति ज्या मूळ 'राम' प्रकृतीहून ' औट् ' प्रत्यय झाला आहे तीच ही प्रकृति आहे असें, ह्या परिभाषेप्रमाणें, मानतां येत असल्यामुळें, तदादि व तदन्त ह्या दोन्ही अंशांची सिद्धि होते व रामौ ' याला पदसंज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं दोष येत नाहीं. ) जसें एखाद्या कुत्र्याचें पुच्छ कापलें असल्यास देखील त्याला लोक कुत्रा असेंच म्हणतात त्याचप्रमाणें ' राम् ' या मान्त प्रकृतीला ही मूळप्रकृतीच—म्हणजे ' राम '—आहे असें लौकिकव्यवहारान्वयें मानतां येतें. ( सारांश ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध आहे. )

**अत एव प्राग्दीव्यत इति सूत्रे भाष्ये दीव्यतिशब्दैकदेशादीव्यच्छब्दानुकरणमिदमित्युक्त्वा किमर्थं विकृतनिर्देश एतदेव ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषैकदेशविकृतमनन्यवदित्युक्तम् । एतेनायं न्यायः शास्त्रीयकार्य एव शास्त्रीयविकार एवेत्यपास्तम् ।**

( ही परिभाषा लौकिकव्यवहाराच्या आधारावर रचली आहे ) म्हणूनच 'प्राग्दीव्यतोऽण्' ४–१–८३ या सूत्रावरील भाष्यांत, 'दीव्यत्' हा शब्द 'तेन दीव्यति' सू० १५५० या सूत्रांतील 'दीव्यति' या शब्दाच्या एकदेशाचें अनुकरण आहे असें सांगून भाष्यकार असा प्रश्न करितात कीं, असें ( इकाररहित ) विकृतरूप कां बरें ( पाणिनीनें ) उच्चारलें आहे ? ( व ह्या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकार असें म्हणतात कीं, ज्या अर्थी पाणिनीनें असें विकृत रूप उच्चारलें आहे ) त्यावरूनच 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा आहे असें आचार्य पाणिनि ज्ञापित करितात. म्हणूनच शास्त्रीय कार्य करितांनाच ही परिभाषा लागू पडते किंवा जेथें पाणिनीय सूत्र लावल्यानें मूळशब्दस्वरुपांत बदल झाला आहे तशा विकारालाच ही परिभाषा लागते-हें म्हणणें चूक ठरतें. ( कारण 'दीव्यति' ह्याचे 'दीव्यत्' असें जें पाणिनीनें विकृतरूप उच्चारलें आहे तें कोणत्याहि पाणिनीय सूत्रानें सिद्ध होत नसून स्वतंत्रेच्छ पाणिनीनें तें अशास्त्रीय रूप उच्चारलें आहे, व ज्याअर्थी भाष्यकारांनीं अशा अशास्त्रीय रूपास ही परिभाषा लावली आहे त्यावरूनच हें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा जशी शास्त्रीय कार्यास लागू पडते तशी अशास्त्रीय कार्यास देखील लागू पडते. )

**विकृतावयवनिबन्धनकार्ये तु नायं, छिन्नपुच्छे शुनि पुच्छवत्त्वव्यवहारवद्विकृतावयवव्यवहारस्य दुरूपपादत्वात् ॥**

पण विकृत अवयवाला ( तो अवयव विकृत होण्यापूर्वी जसा होता तसाच तो अवयव आहे असें मानून ) कार्य करणें झाल्यास ही परिभाषा लागू पडत नाहीं. ( जसें 'निर्गता जरा यस्मात् सः निर्जरः' या स्थलीं 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू० ६५६ या सूत्रान्वयें मूळचा आबन्त 'जरा' हा शब्द ह्रस्व–म्हणजे 'जर'—असा झाला आहे. सारांश ह्या स्थलीं 'आ' याचें 'अ' असें विकृत रूप झालें आहे. त्यामुळें 'निर्जर' या शब्दाला आकारान्त शब्द मानून आकारान्त शब्दाप्रमाणें चालवूं नयें, अकारान्त शब्दाप्रमाणेंच 'निर्जर' हा शब्द चालवावा. ) जसें एखाद्या कुत्र्याची शेपटी कापली असल्यास त्याला शेपटी आहे असा व्यवहार करितां येत नाहीं तसेंच जो अवयव विकृत झाला आहे तो विकृत झाला नाहीं असें प्रतिपादन करणें कधींहि बरोबर होऊं शकत नाहीं. ( जसें, 'मघवा बहुलम्' सू० ३६० ह्या सूत्रानें 'मघवन्' शब्दाच्या अन्त्य नकाराचे जागीं 'त्' असा विकल्पेंकरून आदेश होतो, व 'मघवत्' असा शब्द होऊन तो 'भगवत्' शब्दाप्रमाणें चालतो. ह्या एकदेश-विकृत 'मघवत्' शब्दास अन्नन्त 'मघवन्' च आहे असें मानता येत नाहीं, व 'श्वयुवमघोनामतद्धिते' सू० ३६२ ह्या सूत्रानें अन्नन्त 'मघवन्' शब्दाला सांगितलेलें संप्रसारण कार्य 'मघवत्' शब्दास करितां येत नाहीं. )

**एवमुक्तपरिमाणग्रहणेऽपि नायम्, उक्तयुक्तेः । एतत् येन विधिरित्यत्र भाष्यकैयटयोर्ध्वनितम् ॥**

वर सांगितलेल्या लौकिक न्यायावरून असेंहि सिद्ध होतें कीं, जेथें सूत्रांत वर्णानुपूर्वीविशिष्ट ( वर्णांचा विशेष क्रमानें उच्चार करून ) मोजकेच वर्ण उच्चारून त्या वर्णसमुदायास कांहीं कार्य सांगितलें आहे तशा ठिकाणीं, त्या वर्णसमुदायांतील वर्णांत कोणत्याहि कारणामुळें बदल झाला असल्यास, तशा विकृत वर्णसमुदायास देखील ही परिभाषा लागत नाहीं. ( जसें ' अल्लोपोऽनः सू० २३४ ह्या सूत्रांत, 'अन्' ह्यांतील अकाराचा लोप सांगितला आहे; 'राज्ञः क च' सू० १३६४ ह्या सूत्रानें, 'राजन्' शब्दांतील अन्त्य नकाराचे जागीं ककारादेश होतो असें सांगितलें असल्यामुळें, ' छ ' प्रत्यय लागण्यापूर्वी ' राजन् ' ह्याचें ' राजक् ' असें रूप होतें. अशा ठिकाणीं, मोजक्या दोन अक्षरांत उच्चारलेल्या वर्णानुक्रमविशिष्ट ' अन् ' ह्याला जें अल्लोपरूपी कार्य सांगितलें आहे तें कार्य, ' राजक् ' ह्यांत विकृतरूप पावलेल्या ' अक् ' ला, ह्या परिभाषेप्रमाणें, होत नाहीं—म्हणजे ' अक् ' ह्यांतील 'अ' चा लोप होत नाहीं व ' छ ' प्रत्यय लागून ' राजकीयम् ' असें रूप सिद्ध होतें. ) ' येन विधिः ' १—१—७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत व कैयटवृत्तींत हें ध्वनित केलें आहे.

**यत्र त्वर्द्धं तदधिकं वा विकृतं तत्र जातिव्यञ्जकभूयोऽवयवदर्शनाभावेन तत्त्वाप्रतीतौ कार्यसिद्ध्यर्थं विकृतानल्रूपावयवत्वप्रतीत्यर्थं च स्थानिवत्सूत्रम् ।**

जेथें अर्धें किंवा अर्ध्याहून अधिक शब्दस्वरूप बदलून गेलें आहे अशा ठिकाणीं जातिबोधक असा अवयवाचा बराच भाग नाहींसा झाल्यानें दिसत नसल्यामुळें, तोच हा शब्द आहे अशी बुद्धि होऊं शकत नाहीं; ह्मणून अशा स्थलीं कार्यसिद्धि होण्याकरितां व तसेंच विकृतावयवस्वरूप ( पूर्वशब्दस्वरूपाहून भिन्नस्वरूप ) असा जो 'अनल्' आदेश त्याचे ठिकाणीं स्थानिवत् बुद्धि (हा स्थानीच आहे अशी बुद्धि) होण्याकरितां, 'स्थानिवदादेशोऽनल्विधौ' सू ४९ हें सूत्र आहे. (अशा ठिकाणीं ही परिभाषा लागत नसून, ' स्थानिवदादेशः ' हेंच सूत्र लागतें. सारांश ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र ह्या परिभाषेमुळें व्यर्थ ठरत नाहीं व ही परिभाषा व तें सूत्र हीं दोन्हीं चरितार्थ ठरतात. ' यत्र त्वर्धं तदधिकं वा विकृतम् ' असें ग्रन्थकारानें लिहिलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, ह्या परिभाषेतील ' एकदेश ' शब्दाचा अर्थ ' अर्ध्यापेक्षां कमी ' असाच समजला पाहिजे. म्हणून ' एरुः ' सू० २१९६ ह्या सूत्रानें ' ति ' चे जागीं लोट् लकारांत 'तु' असा आदेश झाला असतां, येथें दोन अलांपैकीं, एका अलांत—म्हणजे ' त् ' व ' इ ' ह्यांपैकीं ' इ ' मध्यें—बदल झाल्यामुळें ही परिभाषा न लागतां, ' स्थानिवदादेशः ' हें सूत्र लागून ' भवतु ' ह्याला ' सुप्तिङन्तं पदम् ' ह्या सूत्रानें पदसंज्ञा प्राप्त होते तसेंच ' थासः से ' सू० २२३६ ह्या सूत्रानें ' थास् ' ह्याचें जागीं ' से ' असा सर्वादेश होतो; तेथेंहि ही परिभाषा न लागतां, ' स्थानिवत् ' सूत्र लागून ' लभसे ' ह्याला पदसंज्ञा प्राप्त होते. )

**क्वचित्तु लक्ष्यानुरोधान्न्यायानाश्रयणम् । तेनाभीयादित्यादिसिद्धिः ।**

कोठें कोठें शुद्धरूपाकडे लक्ष देऊन ही परिभाषा उपयोगांत आणली जात नाहीं. म्हणूनच 'अभीयात' इत्यादि रूपें सिद्ध होतात. ( 'अभि+इयात्' ह्या स्थलीं 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्रानें होणारा सवर्णदीर्घादेश 'ई' हा, 'अन्तादिवच्च' सू० ७५ ह्या सूत्रानें, 'इयात्' ह्या उत्तरपदाचा आदि मानल्यास, 'अभ्' असें पूर्वपद होतें, व तें, ही परिभाषा लावून 'अभि' च आहे असें मानल्यास, त्याला पदसंज्ञा प्राप्त होऊन 'झलां जशोऽन्ते' सू० ८४ ह्या सूत्रानें पदान्तीं असणाऱ्या 'भ्' चा 'ब्' होईल; पण शुद्धरूपाकडे नजर ठेवून अशा ठिकाणीं ही परिभाषा न लावल्यास, 'अभ्' ह्याला पदसंज्ञा प्राप्त होत नाहीं, व त्यामुळें 'भ्' चा 'ब्' न होतां, 'अभीयात्' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**स्पष्टं च क्वचिन्न्यायाप्रवृत्तिः प्रथमयोः पूर्वसवर्ण इत्यत्र कैयटेन दर्शितेत्यन्यत्र विस्तरः ॥ ३७ ॥**

'प्रथमयोः पूर्वसवर्णः' ६–१–१०२ ह्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत, ही परिभाषा क्वचित् स्थलीं लागत नाहीं, असें कैयटानें ह्मटलें आहे, व त्याचें विवरण दुसऱ्या ग्रन्थांत ( शब्देन्दुशेखरांत ) केलें आहे. ( 'श्रेयसि भवः=श्रायसः' ह्या ठिकाणीं. 'तत्र भवः' सू० १४२८ ह्यानें 'अण्' व 'देविकाशिंशपा' सू० १४३९ ह्या सूत्रानें एकाराचा आकार होऊन 'श्रायसः' असें रूप सिद्ध झालें आहे. आतां, 'श्रायस' शब्दास प्रथमाविभक्तीच्या द्विवचनाचा प्रत्यय 'औ' लावला असतां, 'श्रायस+औ= श्रायसौ' अशा स्थितींत, 'औ' हा वृद्धिरूप एकादेश 'अन्तादिवच्च' या सूत्रान्वयें प्रत्ययाचा आदि मानल्यास 'श्रेयस्+औ' अशी स्थिति होते, व अशा स्थितींत ही परिभाषा लावून 'श्रायस्' हा एकदेश विकृत शब्द 'श्रेयस्' शब्दच आहे असें मानल्यास. 'ईयसुन्' प्रत्ययान्त 'श्रेयस्' शब्द उगित् असल्यामुळें, 'उगिदचां सर्वनामस्थाने' सू० ३६१ ह्या सूत्रानें नुमागमाची प्राप्ति होते; पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें ती येथें न लावल्यास नुमागम न होतां, 'श्रायसौ' असेंच शुद्ध रूप सिद्ध होतें. )

प्रथम प्रकरण समाप्त.



### द्वितीयं प्रकरणम्

## परिभाषा ३८

### पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः ॥ ३८ ॥

" पूर्व, पर, नित्य, अन्तरङ्ग व अपवाद ह्यांत मागच्यापेक्षां पुढील अधिक बलवत्तर असतें. "

**पूर्वात्परं बलवत्, विप्रतिषेधशास्त्रात्पूर्वस्य परं बाधकमिति यावत् ॥३८॥**

पूर्वसूत्रापेक्षां परसूत्र अधिक बलवत् असतें. ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' सू. १७५ ह्या सूत्रामुळें परसूत्र पूर्वसूत्राचें बाधक होतें. ( जसें ' राम+भ्याम् ' अशा स्थितींत, 'सुपि च' सू० २०२ ह्या सूत्रानें अदन्त अङ्गाला दीर्घ होऊन ' रामाभ्याम् ' असें रूप होतें. पण ' राम+भ्यः ' अशा स्थितींत दीर्घ होऊन ' रामाभ्यः ' असें रूप होत नाहीं. कारण पूर्वसूत्र 'सुपि च' ह्याचें बाधक परसूत्र ' बहुवचने झल्येत् ' सू० २०५ हें असल्यामुळें, तें प्रवृत्त होऊन अकाराचे जागीं एकार होतो, व ' रामेभ्यः ' असें रूप होतें )

---

## परिभाषा ३९

**नन्वेवं भिन्धीत्यत्र परत्वात्तातङा बाधितो धिर्न स्यादत आह ॥**

( जर वर सांगितल्याप्रमाणें परसूत्रानें पूर्वसूत्र बाधित होतें तर मग ) ' भिन्धि ' इत्यादि स्थलीं ' धि ' हा आदेश तातङानें बाधित झाल्यामुळें, ' हि ' चा ' धि ' होऊं नये. ( ' सेर्ह्यपिच्च '—सू० २२०१ ह्या तृतीयाध्यायांतील सूत्रानें, ' सि '-च्या जागीं लोट् लकारांत ' हि ' असा आदेश होतो हें सांगितलें आहे. ह्याच्या नंतरचें ' हुझल्भ्यो हेर्धिः ' सू० २४२५ हें षष्ठाध्यायांत सूत्र आहे. ह्या सूत्रान्वयें, झलन्त धातुपुढें ' हि ' प्रत्यय आल्यास त्याचे जागीं ' धि ' असा आदेश होतो हें सांगितलें आहे. ह्या नंतर सप्तमाध्यायांतील ' तुह्योस्तातङ् ' सू० २१९७ ह्या पर-सूत्रानें ' हि ' चे जागीं विकल्पेंकरून ' तातङ् ' होतो असें सांगितलें आहे, व हें परसूत्र असल्यामुळें, ' हुझल्भ्यो हेर्धिः ' ह्या पूर्वसूत्राचें, मागील परिभाषेप्रमाणें, बाधक ठरतें; म्हणून, ' हि ' चे जागीं ' धि ' असा आदेश न होतां, ' तातङ् ' च व्हावा अशी परिस्थिति उत्पन्न होते. ही अडचण दूर व्हावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

**पुनः प्रसङ्गविज्ञानात्सिद्धम् ॥ ३९ ॥**

" पुनः प्रसङ्ग प्राप्त झाला असतां, बाधित सूत्रानें इष्टरूपसिद्धि होते "

( अशी परिभाषा असल्यामुळें जेव्हां विकल्पामुळें ' हि ' प्रत्यय राहतो तेव्हां ' हुझल्भ्यो हेर्धिः ' हें सूत्र पुनः प्रवृत्त होऊन ' हि ' चा ' धि ' होतो; मात्र जेथें परसूत्रानें ' तातङ् ' झाला आहे तेथें स्थानिवद्भावानें तो ' हि ' च आहे असें मानून त्या तातङाचे जागीं ' धि ' असा आदेश होत नाहीं. कारण परसूत्र पूर्वसूत्राचें बाधक असतें असें पूर्वी सांगितलेंच आहे. दुसरें असें कीं, ' तातङो हेः स्थानिवत्प्रतिषेधो वक्तव्यः ' ह्या वार्तिकानें स्थानिवत्त्वाचा निषेधहि केला आहे. )

---

## परिभाषा ४०

**नन्वेवं तिसृणामित्यत्र परत्वात्तिस्रादेशे पुनस्त्रयादेशः स्यादत आह ॥**

परिभाषा ३९ स्वीकारल्यास—म्हणजे बाधकशास्त्राची प्रवृत्ति झाल्यानंतर, बाध्य-शास्त्राचें निमित्त उपलब्ध असल्यास बाध्यशास्त्र देखील पुन्हा प्रवृत्त होतें हा नियम स्वीकारल्यास—' तिसृणाम् ' ह्या स्थलीं, ' त्रि ' चे जागीं परसूत्रानें ' तिसृ ' असा आदेश झाल्यावर, पुन्हा ( ' आम् ' प्रत्यय पुढें असतां, मागलि परिभाषेप्रमाणें) ' त्रि ' चे जागीं ' त्रय ' असा आदेश होईल. ( स्त्रीवाचक ' त्रि ' शब्दाचें षष्ठीचें बहुवचन करितांना, ' त्रि+आम् ' अशा स्थितींत, 'त्रेस्त्रयः' सू० २६४ व ' त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ ' सू० २९८ हीं दोन सूत्रें प्राप्त होतात. त्यापैकीं, ' त्रिचतुरोः ' हें परसूत्र असल्यामुळें, ' त्रि ' चें जागीं ' तिसृ ' असा आदेश होतो. हा आदेश स्थानिवद्भावानें 'त्रि' च आहे असें मानल्यास, 'आम्' प्रत्यय पुढें असतां, 'त्रेस्त्रयः' ह्या सूत्रानें ' त्रि ' चे जागीं त्रयादेश, मागील परिभाषेच्या आधारें, कां करूं नये ? ह्या शंकेचें निवारण व्हावें ) म्हणून हीं परिभाषा सांगतातः—

**सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव ॥ ४० ॥**

" दोन सूत्रांची एकेचवेळीं प्राप्ति झाली असतां, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या सूत्रान्वयें परसूत्रानें जें पूर्व सूत्र एकदां बाधित होतें, तें नेहमींकरितां बाधित होत असतें ( व बाधक सूत्रानें कार्य केल्यावर पुनः बाधित सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं, व तें बाधित सूत्र आपलें कार्य करूं शकत नाहीं. ) "

( ही परिभाषा आहे म्हणूनच, 'त्रेस्त्रयः' हें पूर्वसूत्र ' त्रिचतुरोः ' ह्या परसूत्रानें एकदां बाधित झाल्यामुळें, तें पुनः प्रवृत्त होऊं शकत नाहीं व ' आम् ' प्रत्यय पुढें असूनहि ' त्रि ' चे जागीं त्रयादेश होऊं शकत नाहीं. )

**तत्र क्वचिच्चरितार्थयोरेकस्मिन्युगपदुभयोः कार्ययोरसंभवेन बाधका-**

भावात्पर्यायेण तृजादिवच्छास्त्रद्वयप्रसङ्गे नियमार्थं विप्रतिषेधसूत्रमिति सकृद्गतिन्यायसिद्धिः ।

असंकीर्ण लक्ष्याचें ठिकाणीं—म्हणजे जेथें एकाच सूत्राची प्राप्ति आहे अशा उदाहरणाचे ठिकाणीं—आपापलीं सूत्रनिर्दिष्ट कार्यें करून चरितार्थ—म्हणजे सफल—झालेलीं दोन सूत्रें, जेथें दोन्हीं सूत्रांची प्राप्ति आहे अशा संकीर्ण उदाहरणाचें ठिकाणीं एकेच वेळीं प्राप्त झाल्यास, ( तीं सूत्रें परस्पर विरुद्ध कार्य करणारीं असल्यामुळें ) दोन्हीं सूत्रांनीं एकेच वेळीं आपापलें कार्य करणें असंभवनीय—म्हणजे अशक्य आहे; (व विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र नसल्यास व व्याकरणशास्त्रांत सांगितलेलीं सर्व सूत्रें सारखींच प्रमाणभूत मानल्यास, तशा ) दोन सूत्रांत बाध्यबाधकभाव मानतां येत नाहीं. त्यामुळें ज्याप्रमाणें 'ण्वुल्तृचौ' सू० २८९५ ह्या सूत्रानें एकदां धातूला ' ण्वुल् ' प्रत्यय होतो व नंतर विकल्पेंकरून ' तृच् ' प्रत्यय देखील होतो त्याचप्रमाणें अशा ठिकाणीं त्या दोन सूत्रांची पर्यायानें—म्हणजे एकामागून दुसरें अशा क्रमानें—प्रवृत्ति होण्याचा प्रसंग येईल. ( व तसें झाल्यास एकच इष्ट रूप सिद्ध न होतां दोन वैकल्पिक रूपें होण्याची आपत्ति येईल. ) अशा स्थलीं पर्यायानें दोन्ही सूत्रांची प्राप्ति न होतां परसत्रूच प्रवृत्त व्हावें असा नियम घालून देण्याकरितां ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें नियामक सूत्र केलें आहे, व अशा रीतीनें ३९ व ४० या दोन परिभाषांपैकीं ' सकृद्गतौ ' ही चाळीसावी परिभाषा ( तृजादिवत् शास्त्रीय दृष्टान्तानें ) सिद्ध होते (सारांश दोन सूत्रें परस्परविरुद्ध कार्य करणारीं असल्यास त्यापैकीं एकाचीच एखाद्या उदाहरणांत प्राप्ति होत असेल तर त्या सूत्रास आपलें कार्य करण्यास कोणतीच अडचण पडत नाहीं. जसें 'सुपि च' सू० २०२ व ' बहुवचने झल्येत् ' सू० २०५ हीं परस्परविरुद्ध कार्य करणारीं दोन सूत्रें आहेत. पहिलें सूत्र अदन्त अङ्गाच्या अन्त्यस्वराचा दीर्घ करतें व दुसरें सूत्र अन्त्य स्वराचें ठिकाणीं एत्व करतें. 'वृक्ष+भ्याम्' अशा स्थलीं ' भ्याम् ' हा यञादि सुप् प्रत्यय असून बहुवचनाचा प्रत्यय नसल्यामुळें, ' सुपि च ' एवढेंच सूत्र प्रवृत्त होऊन 'वृक्ष' यांतील अन्त्य अकाराचा दीर्घ होतो व 'वृक्षाभ्याम्' असें रूप होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. त्याचप्रमाणें 'वृक्ष+सु' ह्या स्थलीं 'सु' हा बहुवचनाचा झलादि प्रत्यय यञादि नसल्यामुळें. ' बहुवचने झल्येत् ' एवढेंच सूत्र प्रवृत्त होतें व 'वृक्षेषु' असें रूप होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण 'वृक्ष+भ्यः' या स्थलीं भ्यस्' हा बहुवचनाचा प्रत्यय झलादि व तसाच यञादि देखील आहे. म्हणून या ठिकाणीं वरील दोन्हीं सूत्रें एकेच वेळीं प्रवृत्त होऊं पाहतात. तेव्हां कोणत्या सूत्रानें कार्य करावें ? दोन्हीं सूत्रें पाणिनीय शास्त्रांत पठित असल्यामुळें सारखींच प्रमाणभूत आहेत. हीं दोन सूत्रें परस्परविरुद्ध कार्यें करणारी असल्यामुळें दोहोंनीं एकेच वेळीं कार्य करणें अशक्य आहे म्हणून ज्याप्रमाणें दोन परस्परविरोधक श्रुति असल्यास, त्या दोन्हीं सारख्याच प्रमाणभूत असल्यामुळें, त्यांच्यांत बाध्यबाधकभाव मानतां येत नाहीं म्हणून, मीमांसक

तशा ठिकाणीं विकल्प मानतात—जसें 'उदिते जुहोति,' 'अनुदिते जुहोति' किंवा 'अतिरात्रे षोडशिनं गृह्णाति' 'नातिरात्रे षोडशिनं गृह्णाति' इत्यादि ठिकाणीं विकल्प मानतात—त्याचप्रमाणें व्याकरणशास्त्रांतहि विकल्प मानावा लागेल. पण तसा विकल्प मानल्यास एकच इष्टरूप सिद्ध न होतां विकल्पानें पाक्षिक रूप सिद्ध होण्याची आपत्ति येईल—म्हणजे 'वृक्षेभ्यः' असें एकच इष्ट रूप सिद्ध न होतां, 'वृक्षेभ्यः' व 'वृक्षाभ्यः' अशीं दोन रूपें होतील. ही आपत्ति टाळण्याकरितांच 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें नियामक सूत्र केलें आहे, व तें सूत्र असा नियम घालून देतें कीं, जेथें एकाच उदाहरणांत दोन परस्परविरुद्ध कार्य करणारीं सूत्रें प्रवृत्त होतात तशा ठिकाणीं परसूत्रच प्रवृत्त व्हावें व पूर्वसूत्र मुळींच प्रवृत्त होऊं नयें. 'विधिरत्यन्तमप्राप्तौ नियमः पाक्षिके सति' अशी मीमांसकांनीं विधि व नियम यांची व्याख्या केली आहे, व 'व्रीहीन् अवहन्ति' हें नियमाचें प्रसिद्ध उदाहरण आहे. यज्ञाकरितां धानाचे तांदूळ करतेवेळीं धानांवरील टरफल उखळांत धान कांडून काढतां येतें किंवा नखांनीं देखील काढतां येतें. अशा ठिकाणीं श्रुति असा नियम करतें कीं, धानाचे तांदूळ करण्याचे जे अनेक उपाय आहेत त्यांपैकीं अवहनन हाच उपाय स्वीकारावा. तसेंच 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें नियामक सूत्र ठरून पर्यायाचा—म्हणजे विकल्पाचा-बाध करितें व अशा रीतीनें प. ४० सिद्ध होते.)

**यथा तुल्यबलयोरेकः प्रेष्यो भवति स तयोः पर्यायेण कार्यं करोति यदा तमुभौ युगपत्प्रेषयतो नानादिक्षु च कार्ये तदोभयोर्न करोति यौगपद्यासंभवात्तथा शास्त्रयोर्लक्ष्यार्थयोः क्वचिल्लक्ष्ये यौगपद्येन प्रवृत्त्यसंभवादप्रतिपत्तौ प्राप्तायामिदं परविध्यर्थं, तत्र कृते यदि पूर्वप्राप्तिरस्ति तर्हि तदपि भवत्येवेति पुनः प्रसङ्गविज्ञानसिद्धिरिति विप्रतिषेधसूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥**

जसें दोन सारख्या बलवान् पुरुषांचा एकच नौकर असला तर तो भिन्न भिन्न वेळीं त्या दोघांचेंहि कार्यं करूं शकेल (त्यांच्या हुकुमाची अंमलबजावणी करूं शकेल). पण त्या दोघांनींहि त्याला एकेचवेळीं हुकुम सोडला व एकानें त्याला एका दिशेस जावयास सांगितलें व दुसऱ्यानें त्याला उलट्या दिशेस जाण्यास सांगितलें तर, दोन भिन्न दिशेला त्याचें एकेच वेळीं जाणें अशक्य असल्यामुळें, तो दोघांचेंहि काम एकेच वेळीं करूं शकत नाहीं (व त्याला तटस्थ बसणें भाग पडतें.) त्याचप्रमाणें आपापल्या विषयांत चरितार्थ असलेलीं (परस्परविरुद्ध कार्य करणारीं) दोन सूत्रें एकेच वेळीं एकाच उदाहरणाचे ठिकाणीं उपस्थित झालीं असतां, दोन भिन्न कार्यें एकेच वेळीं होणें अशक्य असल्यामुळें दोहोंची निवृत्ति होण्याचा प्रसंग येईल. (म्हणजे एकहि सूत्र कार्य करण्यास प्रवृत्त होणार नाहीं.) अशा ठिकाणीं परसूत्र प्रवृत्त व्हावें असें विधान करण्याकरितांच, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र केलें आहे. परसूत्रानें कार्य केल्यानंतर जर पूर्वसूत्राची प्राप्ति होत असेल तर पुर्वसूत्र लावूनहि त्या सूत्रान्वयें कार्य करावें.

अशा रीतीनें ' पुनः प्रसङ्गविज्ञानात् सिद्धम् ' ही परिभाषा नं. ३९ सिद्ध होते हें विप्रतिषेधे परं कार्यम् ह्या १–४–२ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( सारांश जेथें परस्परविरुद्ध कार्य करणारीं दोन सूत्रें एकेच वेळीं एखाद्या संकीर्ण उदाहरणाचे ठिकाणीं प्राप्त होतात व त्या उदाहरणाची उपेक्षा करून आपल्या जागींच तटस्थ बसतात व त्यांची गति कुण्ठित होते तशा स्थलीं ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र वाट खुली करून देते व असें विधान करतें कीं, परसूत्रानें प्रवृत्त होऊन आपलें काम करून दिल्यानंतर जर पूर्वसूत्राचें निमित्त उपलब्ध असेल तर त्यानेंहि खुशाल प्रवृत्त व्हावें ह्या संबंधानें भाष्यकाराचें व्याख्यान खालीं दिलें आहे:–

" इह भवता द्वौ हेतू व्यपदिष्टौ—तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोतीति च, ' अप्रतिपत्तिरुभयोस्तुल्यबलत्वादिति च । तद्यदा तावदेष हेतुस्तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोतीति तदा ' विप्रतिषेधे परम् ' इत्यनेन किं क्रियते ? । नियमः—विप्रतिषेधे परमेव भवतीति । तदैतदुपपन्नं भवति–' सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव ' इति । यदात्वेष हेतुरप्रतिपत्तिरुभयोस्तुल्यबलत्वात् ' इति, तदा ' विप्रतिषेधे परम् ' इत्यनेन किं क्रियते ? । द्वारम्–विप्रतिषेधे परं तावद्भवति तस्मिन्कृते यदि पूर्वमपि प्राप्नोति तदपि भवति । तदैतदुपपन्नं भवति–' पुनः प्रसङ्गविज्ञानात् सिद्धमिति ॥ " )

**यत्तु कैयटादयो व्यक्तौ पदार्थे प्रतिलक्ष्यं लक्षणोपप्लवादुभयोरपि शास्त्रयोस्तत्तल्लक्ष्यविषययोश्चारितार्थ्येन पर्यायेण द्वयोरपि प्राप्तौ परमेवेति नियमार्थमिदमिति सकृद्गतिन्यायसिद्धिः । अत्र पक्ष एतन्नियमवशादेतल्लक्ष्यविषयकपूर्वशास्त्रानुपप्लव एव ।**

कैयटादिकांचें असें म्हणणें आहे कीं, शब्द हा व्यक्तीचा बोधक आहे असा पक्ष स्वीकारल्यास ( शब्द हा व्यक्तीचा वाचक असतो व तसाच जातीचाहि वाचक असतो; ' ब्राम्हण ' या शब्दानें ब्राम्हणव्यक्तीचा बोध होतो, व तसाच ब्राम्हणजातीचा बोध होतो. कित्येकांच्या मतें शब्द हा व्यक्तीचा वाचक आहे व कित्येकांच्या मतें तो जातीचा वाचक आहे. या दोन मतांपैकीं शब्द व्यक्तीचा वाचक आहे असा पक्ष स्वीकारल्यास, ) अनेक सारख्या उदाहरणांचें ठिकाणीं लागू पडणारें सूत्र प्रत्येक उदाहरणांत रूपसिद्धि करतेवेळीं नव्या नव्यानें उच्चारावें लागत असल्यामुळें, संकीर्ण उदाहरणांत जेथें दोन परस्परविरुद्ध सूत्रांची प्राप्ति आहे तेथें तीं दोन्हीं सूत्रें उच्चारलीं असतां, ( तीं सूत्रें परस्परविरुद्ध कार्य करणारीं असल्यामुळें, कार्य करण्यास असमर्थ होऊन ) व्यर्थ ठरूं पाहतात, व अशा ठिकाणीं ( दोन्हीं सूत्रें सारखींच प्रमाणभूत असल्यामुळें, मीमांसकरीत्या ) त्यांची पर्यायानें—म्हणजे विकल्पेंकरून—प्राप्ति होऊं पाहते; ( व अशा रीतीनें तीं दोन सूत्रें विकल्पेंकरून प्रवृत्त झाल्यास दोन रूपें सिद्ध होतील, असें न व्हावें ) म्हणून ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र असा नियम करून देतें कीं, अशा ठिकाणीं परसूत्रच प्रवृत्त व्हावें, ( व पूर्वसूत्र मुळींच प्रवृत्त होऊं नये, ) व अशा रीतीनें

'सकृद्गतौ' ही परिभाषा ४० सिद्ध होते. ह्या व्यक्तिपक्षांत असा नियम सांगितला असल्यामुळें, संकीर्ण उदाहरणाचें स्थलीं पूर्वसूत्र मुळींच उच्चारूं नयें. ( व परसूत्रच उच्चारावें व त्या सूत्रान्वयें कार्यसिद्धि करावी—म्हणजे असेंच सूत्र उच्चारावें कीं जें उच्चारलें असतां व्यर्थ ठरणार नाहीं व इष्टरूपसिद्धि करून चरितार्थ ठरेल. )

**जातिपक्षे तूद्देश्यतावच्छेदकाक्रान्ते क्वचिल्लक्ष्ये चरितार्थयोर्द्वयोः शास्त्रयोः, सत्प्रतिपक्षन्यायेन युगपदुभयासम्भवरूपविरोधस्थल उभयोरप्यप्राप्तौ परविध्यर्थमिदमिति पुनः प्रसङ्गविज्ञानासिद्धिरित्याहुस्तन्न ।**

शब्द हा जातीचा वाचक आहे असा पक्ष स्वीकारल्यास, (प्रत्येक रूपाची सिद्धि करतेवेळीं तशा रूपाची सिद्धि करण्याकरितां उपयोगी पडणारें सूत्र नव्यानव्यानें उच्चारण्याची गरज नाहीं व ह्या पक्षांत ) सूत्रांत सांगितलेलीं निमित्तें ज्यां उदाहरणांत उपलब्ध आहेत अशा उदाहरणांपैकीं कांहीं—म्हणजे असंकीर्ण–उदाहरणांत आपापलीं कार्यें करून चरितार्थ झालेलीं दोन सूत्रें, संकीर्ण उदाहरणांत, तीं परस्परविरुद्ध कार्य करणारी असल्यामुळें, ज्याप्रमाणें सत्प्रतिपक्ष हेत्वाभासांत दोन परस्पर विरुद्ध हेतु असल्यामुळें अनुमितीचा प्रतिबंध होतो–म्हणजे अनुमिति होऊं शकत नाहीं (जसें–'वेदः पौरुषेयः, वाक्यत्वात्, कालिदासादिवाक्यवत्;' व 'वेदः अपौरुषेयः सर्वजनसमादरणीयत्वे सति अस्मर्यमाणकर्तृकत्वात्' ह्या स्थलीं दोन परस्परविरुद्ध हेतु दिलेले असल्यामुळें वेद पौरुषेय किंवा अपौरुषेय आहेत हें ठरवितां येत नाहीं ) त्याचप्रमाणें दोन्हीं सूत्रांची अप्राप्ति झाल्यावर 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र परसूत्राचें विधायक ठरतें. ( म्हणजे अशा ठिकाणीं परसूत्रानें प्रवृत्त व्हावें असा विधि सांगतें; पण तें पूर्वसूत्राच्या प्रवृत्तीचा निषेध करीत नसल्यामुळें ) जर परसूत्रानें कार्य केल्यावर पूर्वसूत्राची प्राप्ति असेल तर तेंहि सूत्र प्रवृत्त होतें, व अशारीतीनें 'पुनः प्रसङ्गविज्ञानात् सिद्धम्' ही परिभाषा ३९ सिद्ध होते. ( वर सांगितलेल्या व्यक्तिपक्षांत व जातिपक्षांत हा फरक आहे कीं, व्यक्तिपक्षांत प्रत्येक व्यक्तीचें रूप सिद्ध करतेवेळीं तें रूप सिद्ध करण्याचे कामीं उपयोगीं पडणारें सूत्र नव्यानव्यानें उच्चारावें लागतें, व जरी असंकीर्ण उदाहरणांत वेगळे वेगळे वेळीं उच्चारलेलें सूत्र इष्टरूप सिद्ध करून चरितार्थ होतें तरी जेव्हां संकीर्ण उदाहरणाचे ठिकाणीं परस्परविरुद्ध कार्य करणाऱ्या दोन सूत्रांचा नव्यानें उच्चार केला जातो तेव्हां तशा स्थलीं उच्चारलेलीं तीं दोन सूत्रें चरितार्थ होऊं शकत नसल्यामुळें, आपली चरितार्थता करून घेण्याकरितां, तीं दोन्हीं सूत्रें प्रवृत्त होऊं पाहतात. तशा ठिकाणीं त्यांची युगपत् प्रवृत्ति अशक्य असल्यामुळें, पर्यायानें युगपत् प्रवृत्ति होण्याचा संभव येतो; व ह्या संभवाचें निवारण करण्याकरितां परसूत्रानेंच प्रवृत्त व्हावें व पूर्वसूत्रानें मुळींच प्रवृत्त होऊं नयें असा नियम घालून देण्याकरितां 'विप्रतिषेध' सूत्र केलें आहे. व्यक्तिपक्षांत जशीं संकीर्ण उदाहरणाचें स्थलीं नव्यानें उच्चारलेलीं दोन सूत्रें चरितार्थ होत नसल्यामुळें प्रवृत्त होऊं पाहतात तसें जातिपक्षांत होत नाहीं.

जातिपक्षांत आपापल्या लक्ष्यांची रूपसिद्धि करून सूत्रें चरितार्थ झालीं असतात, व जेव्हां संकीर्ण उदाहरणाचें स्थलीं परस्परविरुद्ध कार्य करणाऱ्या दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति होते तेव्हां तीं सूत्रें पूर्वी चरितार्थ झालीं असल्यामुळें, तीं दोन्हीं सूत्रें संकीर्ण उदाहरणाची उपेक्षा करून उदासीन व मंदप्रवृत्तिक होतात; व दोन्हीं सूत्रें अशी उदासीन झालीं असतां, अशा स्थलीं ' विप्रतिषेध ' सूत्र विधायक सूत्र बनतें, व असें विधान करतें कीं, अशा परस्परविरोधस्थलीं परसूत्रानें प्रवृत्त व्हावें. पण तें पुर्वसूत्राच्या प्रवृत्तीचा अजिबाद निषेध करीत नाहीं. असें आहे म्हणूनच कैयटादिकांनीं म्हटले आहे कीं, जातिपक्ष स्वीकारल्यानें परिभाषा ३९ व व्यक्तिपक्ष स्वीकारल्यानें परिभाषा ४० सिद्ध होते. पण हें मत ग्रन्थकारास मुळींच मान्य नाहीं. )

**व्यक्तिपक्षे सर्वं लक्ष्यं शास्त्रं व्याप्नोति न जातिपक्षे इत्यत्र मानाभावात्। न ब्राह्मणं हन्यादित्यादौ जात्याश्रयसकलव्यक्तिविषयत्वार्थमेव जातिपक्षाश्रयणस्य भाष्ये दर्शनात् । अत एव सरूपसूत्रे भाष्ये जातौ पदार्थेऽनवयवेन साकल्येन विधिप्रवृत्तेर्गौरनुबन्ध्य इत्यादौ सकलगवानुबन्धनासम्भवात्कर्मणो वैगुण्यमुक्तम् । द्रव्यवादे चासर्वद्रव्यावगतेर्गौरनुबन्ध्य इत्यादावेकः शास्त्रोक्तोऽपरोऽशास्त्रोक्त इत्युक्तम् ।**

पण हें कैयटादिकांचे म्हणणें बरोबर नाहीं. व्यक्तिपक्षांत सूत्र प्रत्येक लक्ष्यास—म्हणजे त्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या निमित्तांनीं युक्त अशा प्रत्येक उदाहरणास—लागू पडतें व जातिपक्षांत तें तसें लागू पडत नाहीं ( म्हणजे व्यक्तिपक्षांत सूत्र जसें प्रत्येक लक्ष्याचें ठिकाणीं आपली चरितार्थता करून घेण्याकरितां प्रवृत्त होऊं पाहातें तसें जातिपक्षांत सूत्र असंकीर्ण स्थलीं चरितार्थ झालें असल्यामुळें त्याचे ठिकाणीं संकीर्ण उदाहरणाचें स्थलीं प्रवृत्त होण्याबद्दल उदासीनता उत्पन्न होऊन तें तटस्थ राहतें ) असें म्हणण्यास कांहींच प्रमाण नाहीं. उलटपक्षीं ' न ब्राह्मणं हन्यात् ' इत्यादि स्थलीं जातिपक्ष स्वीकारून ब्राम्हणजातीमध्यें अंतर्भूत होणाऱ्या सर्व व्यक्तींना हें शास्त्र लागू पडतें असें ( ' सरूपाणामेकशेषः '—१–२–६४ या सूत्रावरील भाष्यांत ) भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ( त्या सूत्रावरील भाष्यांत ' धर्मशास्त्रं च तथा ' असें वार्तिक देऊन भाष्यकार म्हणतातः—" एवं च कृत्वा धर्मशास्त्रं प्रवृत्तम् । ब्राह्मणो न हन्तव्यः, सुरा न पेया इति ब्राम्हणमात्रं च न हन्यते, सुरामात्रं च न पीयते । यदि द्रव्यं पदार्थः स्यात्, एकं ब्राह्मणमहत्वा एकां च सुरामपीत्वाऽन्यत्र कामचारः स्यात् । " ) जातिवाचक शब्दानें त्या जातींत अंतर्भूत असणाऱ्या सर्व व्यक्तींचा बोध होत असल्यामुळेंच ' सरूपाणामेकशेषः '—१–२–६४ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, शब्द जातीचा वाचक आहे असें मानल्यास, ' गौरनुबन्ध्यः ' इत्यादि विधायकशास्त्रस्थलांत त्या विधायक शास्त्रान्वयें सकल ' गो ' व्यक्तींचें अनुबन्धन प्राप्त होतें; व तसें करणें अशक्य असल्यामुळें कर्मांत वैगुण्य येईल; परंतु शब्द हा व्यक्तीचा

वाचक आहे असा पक्ष स्वीकारल्यास ( 'गो' या शब्दानें ) सकल व्यक्तींचा बोध होत नसल्यामुळें ( व एकच व्यक्तीचा बोध होत असल्यामुळें, ) 'गौरनुबन्ध्यः' इत्यादि स्थलीं एकाच गोव्यक्तीचें अनुबन्धन करणें शास्त्रोक्त आहे. दुसऱ्या गोव्यक्तीचें अनुबन्धन करणें शास्त्रोक्त नाहीं—म्हणजे शास्त्रविरुद्ध आहे.

**किञ्च न हि भाष्योक्ततृजादिदृष्टान्तस्य व्यक्तिपक्ष एव सर्वविषयत्वं न जातिपक्ष इत्यत्र मानमस्ति ॥ अपि च व्यक्तिपक्षेऽप्यन्यव्यक्तिरूपविषयलाभेन चरितार्थयोरियं व्यक्तिर्विरोधात्स्वविषयकत्वं न कल्पयतीति वक्तुं शक्यम्। जातिपक्षेऽपि तज्जात्याश्रयतद्व्यक्तिविषयकत्वमेव नैतद्व्यक्तिविषयकत्वमित्यत्र विनिगमकाभावः ॥ तत्र लक्ष्यानुसारात् क्वचिच्छास्त्रीयदृष्टान्ताश्रयणं क्वचिल्लौकिकदृष्टान्ताश्रयणमिति भाष्यसंमतमार्ग एव युक्त इति बोध्यम् ॥**

( कैयटादिकांचें म्हणणें बरोबर नाहीं हें मानण्यास ) दुसरें कारण असें आहे कीं, भाष्यकारांनीं, 'ण्वुल्तृचौ' हा जो शास्त्रीय दृष्टान्त दिला आहे तो व्यक्तिपक्षांत सर्व व्यक्तींना लागू पडतो व जातिपक्षांत सर्व व्यक्तींना लागू पडत नाहीं असें म्हणण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं. ( सारांश पर्यायाची प्राप्ति व्यक्तिपक्षांतच होते व जातिपक्षांत होत नाहीं हें म्हणणें अगदीं निराधार आहे. दोन्हीं पक्षांत विकल्पाची प्राप्ति होऊं शकते. ) तसेंच व्यक्तिपक्षांत देखील असें म्हणतां येणें शक्य आहे कीं, आपापल्या विषयांत—म्हणजे असंकीर्ण उदाहरणांचे जागीं—आपापलीं कार्यें करून चरितार्थ झालेलीं दोन परस्परविरुद्ध कार्य करणारीं सूत्रें जेव्हां एखाद्या संकीर्ण उदाहरणाचे जागीं प्राप्त होतात तेव्हां तीं परस्परविरुद्ध कार्य करणारीं असल्यामुळें तें संकीर्ण उदाहरण त्यांची प्राप्ति होऊं देत नाहीं. ( सारांश जसें जातिपक्षांत दोन परस्परविरुद्ध कार्य करणाऱ्या सूत्रांची संकीर्ण उदाहरणाचे ठिकाणीं, तीं असंकीर्ण उदाहरणाचे ठिकाणीं चरितार्थ झाल्यामुळें, निवृत्ति होते असें म्हटलें आहे, तसें व्यक्तिपक्षांत देखील म्हणतां येतें, व कैयटानें जातिपक्ष व व्यक्तिपक्ष स्वीकारून जो मतभेद उपस्थित केला आहे त्याला कांहीं प्रमाण नसल्यामुळें तो ग्राह्य नाहीं. ) तसेंच जातिपक्षांत जातींत अंतर्भूत असलेल्या कांहीं व्यक्तींना सूत्र लागू पडतें व इतर व्यक्तींना तें लागू पडत नाहीं असा भेद सुचविणारें कोणतेंच प्रमाण उपलब्ध नाहीं. म्हणून इष्टरूप सिद्ध करणें हा ( व्याकरण शास्त्राचा ) मुख्य उद्देश लक्षांत बाळगून इष्टरूप सिद्ध होण्याकरितां कोठें कोठें 'तृजादिवत्' या शास्त्रीय दृष्टान्ताचा उपयोग करावा—म्हणजे प. ४० उपयोगांत आणावी, व कोठें कोठें इष्टरूपसिद्धिकरितां 'तुल्यबलयोः' या लौकिकदृष्टान्ताचें अवलंबन करावें—म्हणजे प. ३९ उपयोगांत आणावी—हा जो भाष्यकारांना संमत मार्ग आहे तोच योग्य आहे असें समजावें.

**द्वयोः कार्ययोर्यौगपद्येनासंभव एव विप्रतिषेधशास्त्रोपयोगि। इद्मिको गुणेति सूत्रे कैयटे स्पष्टम्। यथा शिष्टादित्यादौ तातङ्शाभावयोर्यु-**

गपत्प्रवृत्तौ स्वस्वनिमित्तानन्तर्यासम्भवः। यद्यपि तातङादेः स्थानिवद्भावेनास्त्येव तत् तथाप्यादेशप्रवृत्त्युत्तरमेव स, न तु तत्प्रवृत्तिकाले।

जेथें दोन सूत्रांनीं सांगितलेलीं दोन परस्परविरुद्ध कार्यें एकेच वेळीं होणें असम्भवनीय आहे तशाच ठिकाणीं 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र लागू पडतें. (जेथें एखाद्या संकीर्ण उदाहरणांत परस्परविरुद्ध कार्य करणारीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात तशाच ठिकाणीं विप्रतिषेधसूत्र उपयोगांत आणावें.) 'इको गुणवृद्धी' या सूत्राच्या भाष्यावरील टीकेंत कैयटानें हें स्पष्ट सांगितलें आहे. जसें 'शिष्टात्' इत्यादि स्थलीं, ('हि' चे जागीं) 'तातङ्' हा आदेश व ('शास्'चे जागीं) 'शा' असा आदेश एकेच वेळीं करूं लागल्यास, ते दोन आदेश होण्याकरितां त्यांना जें आपापल्या निमित्तांचें आनन्तर्य–म्हणजे निमित्त लगेंच मागें किंवा पुढें असणें–आवश्यक आहे तें आनन्तर्य राहूं शकत नाहीं. स्थानिवद्भाव मानल्यास, 'तातङ्' व 'शा' यांना आपापल्या निमित्तांचें आनन्तर्य आहे असें जरी मानतां येतें तथापि आदेश झाल्यावरच स्थानिवद्भाव मानतां येतो; आदेश होत असतांना––म्हणजे आदेश होण्यापूर्वीं––स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. ('शास्+हि' या स्थलीं दोन भिन्न स्थानींचे जागीं दोन भिन्न आदेश पावले आहेत. 'शा हौ' सू २४८७ या सूत्रानें, 'हि' प्रत्यय पुढें असतां, 'शास्' चे जागीं 'शा' असा आदेश पावला आहे, व तसेंच 'तुह्योस्तातङ्' सू० २१९७ या सूत्रानें 'हि' चे जागीं 'तातङ्' हा आदेश पावला आहे. 'शास्' चे जागीं 'शा' हा आदेश होण्याकरितां 'हि' प्रत्यय पुढें असणें या निमित्ताची आवश्यकता आहे, व 'हि' चे जागीं 'तातङ्' हा आदेश होण्याकरितां 'शास्' धातु लगेंच मागें असणें हे निमित्त आवश्यक आहे. हे दोन्हीं आदेश एकेचवेळीं करूं गेल्यास, 'शास्' चे जागीं 'शा' हा आदेश केल्यानें 'हि' चे जागीं 'तातङ्' आदेश होऊं शकत नाहीं; कारण 'तातङ्' आदेश होण्याकरितां लगेंच मागें 'शास्' धातु असणें हें जें निमित्त आवश्यक आहे तें निमित्त कायम राहत नाहीं, व 'हि' चे जागीं 'तातङ्' केल्यास 'शास्' चे जागीं 'शा' असा आदेश होऊं शकत नाहीं, कारण तो आदेश होण्याकरितां ज्या निमित्ताची–म्हणजे 'हि' प्रत्यय पुढें असणें या निमित्ताची––आवश्यकता आहे तो 'हि' प्रत्यय कायम राहत नाहीं. सारांश, एक आदेश केल्यानें दुसरा आदेश होण्याचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें, दोन्ही आदेश एकेच वेळीं करणें अशक्य आहे. 'हि' चे जागीं 'तातङ्' हा आदेश करण्याचेवेळीं, 'हि' प्रत्यय पुढें असल्यामुळें 'शास्' चे जागीं 'शा' असा जो आदेश होतो तो आदेश 'शास्' च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं; त्याचप्रमाणें 'हि' चे जागीं 'तातङ्' हा आदेश झाल्यावर 'शास्' चे जागीं 'शा' असा आदेश करण्याचेवेळीं, 'तातङ्' हा 'हि' च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं. कारण स्थानीचे जागीं आदेश झाल्यानंतरच 'स्थानिवदादेशः' सू० ४९ हें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें. जेथें आदेश होऊं घातला आहे तेथें आदेश होत असतांना व

तो होण्यापूर्वीं तें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं अशा स्थितींत प्रकृतउदाहरणांत परस्पर-विरूद्ध कार्य करणारीं व एकमेकांची निमित्तें नष्ट करणारीं दोन सूत्रें एकेचवेळीं प्रवृत्त होऊं पाहात असल्यामुळें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हा न्याय लागू पडतो, व त्या न्यायान्वयें ' तुह्योस्तातङ् ' हें परसूत्र असल्यामुळें तें प्रथम प्रवृत्त होऊन ' शास्+हि =शास्+तातङ् ' अशी स्थिति झाली असतां, ' शास इदङ्हलोः ' सू २४८६ या सूत्रानें ' शास् यांतील उपधेच्या जागीं इकार होऊन, व ' शासिवसिघसीनां च ' सू० २४१० या सूत्रानें षत्व होऊन, व ' ष्टुना ष्टुः ' सू० ११२ यानें तकाराचा टकार होऊन ' शिष्टात् ' असें रूप सिद्ध होतें. ' तातङ् ' हा आदेश विकल्पेकरून होत असल्यामुळें, जेव्हां तो होत नाहीं तेव्हां ' शा हौ ' हें पूर्वसूत्र प्रवृत्त होऊन ' शास्+हि= शा+हि ' अशी स्थिति झाली असतां, 'हुझल्भ्यो हेर्धिः' सू० २४२५ या सूत्रानें 'हि' च्या जागीं ' धि ' असा आदेश होऊन ' शाधि ' असें वैकल्पिक रूप सिद्ध होतें. )

**एवं नुम्तृज्वत्वयोः प्रियक्रोष्टूनीत्यादौ युगपदसम्भवो, यदागमा इत्यस्य नुम्प्रवृत्त्युत्तरं प्रवृत्तेः ।**

त्याचप्रमाणें ' प्रियक्रोष्टूनि ' इत्यादि स्थलीं, ( 'प्रियक्रोष्टु' शब्दाचें नपुंसकाचें प्रथमेचें बहुवचन करितांना, नुमागम व तृज्वद्भाव हीं दोन्हीं कार्यें एकेचवेळीं होणें अशक्य आहे; कारण नुमागम झाल्यावरच ' यदागमाः ' ही परिभाषा लागू शकते. ('प्रियक्रोष्टु+शि' अशा स्थितींत ' नपुंसकस्य झलचः ' सू० ३१४ यानें नुमागम, व ' तृज्वत्क्रोष्टुः ' सू २७४ यानें ' 'क्रोष्टु' चे जागीं 'क्रोष्टृ ' असा ऋकारान्त आदेश पावला आहे. हीं दोन्हीं कार्यें युगपत् प्राप्त झालीं आहेत, व हीं कार्यें एकेच वेळीं करूं गेल्यास, एक कार्य दुसऱ्या कार्यांच्या निमित्ताचा नाश करणारें असल्यामुळें, दोन्हीं कार्यें एकेंचवेळीं होणें शक्य नाहीं. नुमागम केल्यास, ' मिदचोऽन्त्यात्पर ' सू० ३७ या सूत्रान्वयें तो अन्त्य स्वारला होऊन उकारान्त अङ्ग नाहींसें होईल व त्याचे जागीं ' प्रियक्रोष्टुन् ' असें हलन्त अङ्ग होईल. त्यामुळें. ' क्रोष्टु ' हा शब्द अङ्गाच्या अन्तीं राहत नसल्यामुळें ' क्रोष्टु ' चे जागीं क्रोष्टृ ' असा आदेश होऊं शकणार नाहीं. ' क्रोष्टु' चे जागीं ' क्रोष्टृ ' असा आदेश केल्यास, ज्या उकारान्त अङ्गाला नुमागम करणें आहे तें अङ्ग ऋकारान्त होईल. सारांश कोणतेंहि एक कार्य केलें कीं त्याच वेळीं दुसरें कार्य करणें अशक्य होतें. नुमागमसहित ' प्रियक्रोष्टुन् ' हा शब्द यदागमपरिभाषेप्रमाणें ' प्रियक्रोष्टु 'च आहे असें मानून ' क्रोष्टुन् ' चें जागीं ' क्रोष्टृ ' असा आदेश करतां येईल –असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण आगम झाल्यावरच यदागमपरिभाषेचा उपयोग करितां येतो; आगम करितेवेळीं आगम होण्यापूर्वींच ती परिभाषा लागू पडत नाहीं. तसेंच ' क्रोष्टु ' चे जागीं ' क्रोष्टृ असा आदेश करून तो आदेश ' स्थानिवदादेशः ' या सूत्रान्वयें, ' क्रोष्टु ' च आहे असें देखील माननां येत नाहीं. कारण आदेश झाल्यावरच स्थानिवद्भाव होऊं शकतो.

नुमागम कार्य व तृज्वद्भाव हीं दोन कार्ये वर सांगितल्याप्रमाणें एकेचवेळीं होऊं शकत नसल्यामुळें, अशा ठिकाणीं 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हा न्याय लागू पडतो व या न्यायान्वयें, तृज्वद्भावाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें, वास्तविक तृज्वद्भावच व्हावा; परंतु 'वृद्ध्यौत्वतृज्वद्भावगुणेभ्यो नुम् पूर्वविप्रतिषेधेन'—सू० ३२० वरील वार्तिक–असें वार्तिक असल्यामुळें, नुमागमाचें सूत्र पूर्वसूत्र असून देखील तें तृज्वद्भावाचा बाध करतें, व त्यामुळें तृज्वद्भाव न होतां, नुमागम होऊन 'प्रियक्रोष्टुन्+इ' अशी स्थिति झाली असतां, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू० २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'प्रियक्रोष्टूनि' असें रूप सिद्ध होतें.)

**एवं भिन्द्धीत्यत्र तातङ्धिभावयोर्युगपदेकस्थानिसम्बन्धस्याङ्गरूपनिमित्तानन्तर्यस्य चासंभवो बोध्यः ।**

ह्याचप्रमाणें 'भिन्द्धि' ह्या स्थलीं, एकच 'स्थानी' जो 'हि' प्रत्यय त्याचे जागीं एकेच वेळीं 'तातङ्' व 'धि' असे दोन आदेश होऊं शकत नाहींत, (व एका नंतर दुसरा असे दोन्ही आदेश एकेच वेळीं केल्यास–ह्मणजे 'भिन्द्+तातङ्+धि' असें केल्यास–पुढच्या) आदेशाला अङ्गाचे ('भिन्द्' ह्याचें) आनन्तर्य–ह्मणजे लगेच मागें असणें–राहूं शकत नाहीं. ('भिन्द्+हि' अशा स्थितींत, 'तुह्योस्तातङ्' व 'हुझल्भ्यो हेर्धिः' ह्या दोन सूत्रांनीं 'हि' ह्या प्रत्ययाचें जागीं एकेच वेळीं 'तातङ्' व 'धि' असे दोन आदेश होऊं पाहतात. एका स्थानीच्या जागीं एकेच वेळीं दोन आदेश होणें शक्य नाहीं. हे दोन आदेश एका पुढें एक केल्यास, अङ्गाच्या लगेच पुढें प्रत्यय असला पाहिजे असें जें अङ्गाचें आनन्तर्य आवश्यक आहे, तें पुढच्या प्रत्ययास राहूं शकत नाहीं. त्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ह्या सूत्राची प्रवृत्ति होते; व तातङादेशाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें, तें सूत्र प्रथम लागून 'भिन्तात्' असें रूप होतें; नंतर 'अन्यतरस्याम्' ह्या विकल्पामुळें 'धि' आदेशाचें पूर्वसूत्र प्रवृत्त होतें व 'हि' चे जागीं 'धि' असा आदेश होऊन, 'भिन्द्धि' असें रूप होतें.)

**नुम्नुटोरपि नुट्यजादिविभक्त्यानन्तर्यबाधो नुमि ह्रस्वान्ताङ्गबाध इत्यसंभवाद्विप्रतिषेधः ॥**

('विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ हें सूत्र जसें एकेचवेळीं परस्परविरुद्ध आदेश होतेवेळीं लागू पडतें तसेंच तें सूत्र एकेचवेळीं परस्परविरुद्ध आगम होतेवेळीं देखील लागू पडतें याचें उदाहरण आतां ग्रन्थकार देतात.) नुमागम व 'नुट्' आगम देखील परस्परविरोधि आहेत. कारण (प्रत्ययास) 'नुट्' आगम केल्यास, (अङ्गापुढें) अजादि विभक्तिप्रत्यय राहत नाहीं; 'नुम्' आगम केल्यास, ह्रस्वान्त अङ्ग राहत नाहीं. (जसें—'वारि+आम्' अशा स्थितींत, 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू० २०८ ह्या सूत्रानें 'आम्' प्रत्ययास 'नुट्' आगम पावला आहे व 'इकोऽचि विभक्तौ' सू० ३२० ह्या सूत्रानें 'वारि' ह्या इगन्त क्लीब अङ्गाला 'नुम्' आगम

पावला आहे. नुमागम व नुडागम हीं दोन्हीं कार्यें एकेचवेळीं केल्यास, 'आम्' प्रत्ययास 'नुट्' आगम केला असतां. 'आद्यन्तौ टकितौ' सू० ३६ ह्या सूत्रान्वयें, 'आम्' प्रत्यय 'न्+आम्=नाम्' असा होतो–म्हणजे तो प्रत्यय अजादि न राहतां हलादि प्रत्यय होतो.—आणि त्यामुळें अङ्गाला नुमागम करण्यास अजादि प्रत्यय पुढें असला पाहिजे हें जें निमित्त, तें राहत नाहीं. अङ्गास नुमागम केल्यास, ह्रस्वस्वरान्त अङ्ग राहत नाहीं, 'वारिन्' असें हलन्त अङ्ग होतें, व त्यामुळें 'आम्' प्रत्ययाला 'नुट्' आगम होऊं शकत नाहीं. अशा तऱ्हेनें परस्परविरोधक हीं दोन सूत्रें एकेच वेळीं लावल्यास, तीं आपापलीं कार्यें निमित्ताच्या अभावामुळें करूं शकत नाहींत; म्हणून 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र प्रवृत्त होऊन, नुमागमाचें सूत्र पर असल्या-मुळें, नुमागम हा नुडागमाचा बाधक होतो. परंतु 'नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् पूर्व-विप्रतिषेधेन'–सू० २८० वरील वार्तिक–असें वार्तिक असल्यामुळें, नुडागम नुमाग-माचा बाधक होतो, व नुडागम होऊन, 'वारि+नाम्' असें होऊन, 'नामि' सू० २०९ ह्या सूत्रानें दीर्घ होऊन, व 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू० १९७ ह्या सूत्रानें णत्व होऊन 'वारीणाम्' असें रूप होतें. )

**क्वचिदिष्टानुरोधेन पूर्वशास्त्रे स्वरितत्वप्रतिज्ञाबलात् स्वरितेनाधिकं कार्यमित्यर्थात्पूर्वमेव भवति । तेन सर्वे पूर्वविप्रतिषेधाः संगृहीता इति स्वरितेनेति सूत्रे भाष्ये । विप्रतिषेधसूत्रस्थपरशब्दस्येष्टवाचित्वात्तत्संग्रह इति विप्रतिषेधसूत्रे भाष्ये ॥ ४० ॥**

( जरी 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १८५ ह्या सूत्रानें पूर्वसूत्रापेक्षां परसूत्र बलवत्तर मानलें आहे तरी, ) कोठें कोठें इष्ट रूप सिद्ध करण्याकरितां, पूर्वसूत्र परसू-त्रापेक्षां बलवत्तर मानावें लागतें. ( व पूर्वसूत्रान्वयें कार्य करावें लागतें. ) 'स्वरिते-नाधिकारः' सू० ४६ ह्या सूत्राचा भाष्यांत, 'स्वरितत्वामुळें अधिक कार्य करण्याचें सामर्थ्य येतें' असा अर्थ केला असल्यामुळें, स्वरितत्वाच्या सहाय्यानें जेथें पूर्वसूत्र प्रबल ठरतें तशा ठिकाणीं पूर्वसूत्र लावून इष्टरूपासिद्धि करावी. ( वास्तविक 'विप्र-तिषेधे परं कार्यम्' ह्या सूत्रान्वयें पूर्वसूत्र परसूत्राच्या मानानें दुर्बल ठरतें. परंतु 'स्व-रितेनाधिकारः' ह्या अतिप्रबल अधिकारसूत्राच्या सहाय्यानें पूर्वसूत्र दुर्बल असून देखील परसूत्रापेक्षां प्रबलतर ठरतें. जसें एखादें राष्ट्र दुर्बल असूनहि त्याला जर अति-प्रबल राष्ट्राचें सहाय्य मिळालें तर तें राष्ट्र आपल्या प्रबलसूत्राचा नाश करण्यास समर्थ होतें, तसेंच ह्या स्थलींहि होतें. ) 'स्वरितेनाधिकारः' ह्या सूत्राचा भाष्यकारांनीं असा अर्थ केला असल्यामुळें, पूर्वविप्रतिषेधाच्या संबंधाचीं जीं वार्तिकें वार्तिककारांनीं केलीं आहेत, त्यांची गरजच राहत नाहीं हें 'स्वरितेनाधिकारः' १–३–११ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. 'विप्रतिषेधे परं कार्यम्'–१–४–२ ह्या सूत्रावरील भाष्यांत, ह्या सूत्रांतील 'परम्' शब्दाचा अर्थ 'इष्टम्' असा केला आहे; ( म्हणजे इष्टरूप

सिद्ध करण्याकरितां जें सूत्र इष्ट सूत्र असेल—मग तें सूत्र पुर्वसूत्र असो किंवा परसूत्र असो—तें सूत्र लावून इष्टरूपसिद्धि करावी, ) व असा अर्थ केल्यास, पूर्वसूत्र प्रबल ठरतें व पूर्वविप्रतिषेधासंबंधाच्या वार्तिकांची गरज राहत नाहीं, हें त्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे.

---

## परिभाषा ४१

**नन्वेवमेधते इत्यादौ परत्वाद्विकरणेऽनुदात्तङित इत्यादिनियमानुपपत्तिस्तेन व्यवधानादत आह ।**

'एधते' इत्यादि स्थलीं विकरणाचीं सूत्रें परसूत्रें असल्यामुळें, विकरणाचें व्यवधान झाल्यानें, 'अनुदात्तङितः' सू. २१५७ इत्यादि नियामक सूत्रें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. ( कोणत्या धातूंना आत्मनेपदिप्रत्यय व्हावे याचें नियामक सूत्र 'अनुदात्तङितः' हें आहे; कोणत्या धातूंना परस्मैपदिप्रत्यय व्हावे याचें नियामक सूत्र 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' सू. २१५९ हें आहे. या प्रकरणांत इतर सूत्रेंहि पठित आहेत. या सर्व सूत्रांच्या अपेक्षेनें 'कर्तरि शप्' सू० २१६७ इत्यादि विकरणविधायक सूत्रें परसूत्र आहेत. ह्मणून 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायान्वयें, 'एध्+लट्' अशा स्थितींत, 'एध' हा धातु अनुदात्तेत् असल्यामुळें, 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' व 'कर्तरि शप्' हीं जीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात त्यापैकीं 'कर्तरि शप्' हें परसूत्र असल्यामुळें, लटाचे जागीं आत्मनेपदिप्रत्ययांचे आदेश प्रथम न करितां विकरण प्रथम केल्यास, 'एध्+शप्=अ+लट्' अशी स्थिति होईल. 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेली 'अनुदात्तङितः' ही पञ्चमी परपञ्चमी—ह्मणजे दिग्योगलक्षणा पञ्चमी—मानल्यास, 'अनुदात्तेतःङितश्च धातोः परस्य लस्य स्थाने आत्मनेपदिप्रत्ययादेशा भवन्ति' असा 'अनुदात्तङितः' या सूत्राचा अर्थ होतो, व या अर्थान्वयें 'एध्+शप्+लट्' अशा स्थितींत, 'एध्' या धातूच्या लगेंच पुढें लट् नसून दोहोंमध्यें शपाचें व्यवधान असल्यामुळें, लटाचे जागीं आत्मनेपदिप्रत्ययांचे आदेश होऊं शकणार नाहींत व 'अनुदात्तङितः' हें नियामक सूत्र व त्याचप्रमाणें इतर नियामक सूत्रें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) ह्मणून ही परिभाषा सांगतातः—

### विकरणेभ्यो नियमो बलीयान् ॥ ४१ ॥

"विकरणविधायक सूत्रांपेक्षां ( प्रत्ययादेशासंबन्धाचीं ) नियामक सूत्रें बलवत्तर असतात."

( ही परिभाषा असल्यामुळें, लकाराचे जागीं प्रत्ययांचे आदेश प्रथम होतात व नंतर धातूला विकरण लागतें. सारांश, 'पूर्वात्परं बलवत्' या परिभाषेचा अपवाद ही परिभाषा आहे )

**अत्र वृद्भ्यः स्यसनोरिति सूत्रेण स्ये विभाषाऽतङ्विधानं ज्ञापकम् । अन्यथा स्यव्यवधाने नियमाप्रवृत्तौ सामान्यशास्त्रेणोभयसिद्धौ विकल्पविधानं व्यर्थं स्यात् ।**

'वृद्भ्यःस्यसनोः' सू. २३४७ या सूत्रांत, वृतादि पांच धातूंच्या पुढें 'स्य' हें विकरण लागलें असतां, 'ल' चे जागीं विकल्पेंकरून परस्मैपदिप्रत्ययांचे आदेश व्हावे असें जें विधान केलें आहे तें या परिभाषेचें ज्ञापक होय. ही परिभाषा नसती तर 'स्य' चे व्यवधान झाल्यामुळें, 'अनुदात्तङितः' या नियामक सूत्राची प्रवृत्ति होऊं शकलीच नसती, व ( 'तिप्तस्झि' सू० २१५७ या ) सामान्यशास्त्रान्वयें दोन्ही पदांचे—ह्मणजे परस्मैपदाचे व आत्मनेपदाचे—प्रत्यय आपोआप झालेच असते, व 'वृद्भ्यः स्यसनोः' या सूत्रांत केलेलें विकल्पाचें विधान व्यर्थ ठरलें असतें. (वृत्. वृध्, शृध् स्यन्द् व कृप् या पांच धातु अनुदात्तेत् आहेत. या धातूंच्या पुढें ऌट् लकार आल्यास, 'स्यतासी ऌलुटोः' सू. २१८६ या सूत्रान्वयें धातूच्या लगेंच पुढें 'स्य' हें विकरण लागतें, व 'वृत् + स्य + ऌट्' अशी स्थिति झाली असतां, धातु व ऌट् या दोहोंत 'स्य' चें व्यवधान झाल्यामुळें, 'अनुदात्तङितः' या सूत्राचा वर जो अर्थ दिला आहे त्या अर्थान्वयें त्या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकलीच नसती, व त्यामुळें 'तिप्तस्झि' या सामान्यसूत्राची प्रवृत्ति होऊन ऌटाचें जागीं उभयविध प्रत्ययांचे आदेश झालेच असते, व अशा रीतीनें 'अनुदात्तङितः' या सूत्रांत जें विकल्पाचें विधान केलें आहे तें व्यर्थ ठरलें असतें. पण 'वृद्भ्यःस्यसनोः' हें सूत्र मुद्दाम पाणिनीनें केलें असल्यामुळें हें ज्ञापित होतें का विकरणाचें सूत्र जरी परसूत्र आहे तरी तें प्रथम प्रवृत्त न होतां, 'अनुदात्तङितः' हें नियामक पूर्वसूत्र प्रथम प्रवृत्त होतें, व त्यानंतर विकरण लागतें. अशा स्थितींत वृतादि पांच धातूंना केवळ आत्मनेपदाचे प्रत्यय झाले असते पण 'स्य' विकरण पुढें असतां तसें न व्हावें व दोन्ही प्रकारचे प्रत्यय व्हावें ह्मणून पाणिनीला, ही परिभाषा असल्यामुळ 'वृद्भ्यःस्यसनोः' या सूत्रांत विकल्पाचें विधान करावें लागलें, व अशा रीतीनें तें विकल्पाचें विधान या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**अत्रार्थे ज्ञापिते तु स्य इति तत्र विषयसप्तमी बोध्येत्यनुदात्तङित इत्यत्र भाष्यकैयटयोः स्पष्टम् ॥**

'वृद्भ्यःस्यसनोः' या सूत्रानें ही परिभाषा ज्ञापित केली असल्यामुळें—ह्मणजे धातूस विकरण प्रथम न लागतां धातुपुढील लकाराचे जागीं प्रत्ययादेश प्रथम होतात असें ज्ञापित केलें असल्यामुळें—'वृद्भ्यःस्यसनोः' या सूत्रांतील 'स्ये' ही ( निमित्तसप्तमी न मानतां ) विषयसप्तमी समजावी, असें 'अनुदात्तङितः' १–३–१२ या सूत्रावरील भाष्यांत व कैयटवृत्तींत सांगितलें आहे. ( 'स्ये' ही विषयसप्तमी मानली म्हणजे असा अर्थ होतो कीं 'स्य' च्या विषयांत—म्हणजे जेथें 'स्य' हे विकरण लागणार आहे तशा ठिकाणीं—ऌटाचे जागीं विकल्पेंकरून परस्मैपदिप्रत्ययांचे आदेश

करावे. या पक्षान्वयें धातूला विकरण प्रथम न लागतां धातूपुढील लकाराचे जागीं प्रत्ययांचे आदेश प्रथम होतात. सारांश जरी विकरणसूत्रें पर आहेत तरी तीं प्रथम प्रवृत्त न होतां, नियामकसूत्रें, पूर्वसूत्रें असून देखील, प्रथम प्रवृत्त होतात. ह्या प्रथम पक्षांत ' स्ये ' ही विषयसप्तमी मानावी लागत असल्यामुळें व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्राचा बाध होत असल्यामुळें हा पक्ष दोषयुक्त आहे म्हणून आतां ग्रन्थकार द्वितीय पक्ष सांगतात )

**विकरणव्यवधानेऽपि नियमप्रवृत्तेरिदं ज्ञापकमिति शदेः शित इत्यत्र भाष्ये ध्वनितम् ॥**

विकरणाचें व्यवधान असून देखील नियामक सूत्रें प्रवृत्त होतात याचें ' वृद्भ्यः स्यसनोः' हें सूत्र ज्ञापक आहे असें ' शदेः शितः ' १–३–६० या सूत्रावरील भाष्यांत ध्वनित केलें आहे. ( त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–' अथ वा यद्यपि तावदेतदन्यत्र भवति विकरणेभ्यो नियमो बलीयान् इति । इहैतन्नास्ति । विकरणो हीहाश्रीयते ' शितः' इति । ' भाष्यकाराचे म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ' वृद्भ्यः स्यसनोः ' ' शदेः शितः ' इत्यादि सूत्रांना प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं. कारण सूत्रांत जें कार्य होणें सांगितलें आहे तें विकरणाच्या निमित्तामुळें होणारें कार्य आहे. म्हणून, अशा ठिकाणीं त्या सूत्रांच्या सामर्थ्यानें विकरण प्रथम होतें. सारांश, या द्वितीय पक्षांत जरी धातूला विकरण प्रथम लागतें व त्यामुळें धातु व लकार या दोहोंत जरी विकरणाचें व्यवधान होतें तरी त्या व्यवधानास न जुमानतां लकाराचे जागीं नियामकसूत्रान्वयें प्रत्ययादेश होतातच. या पक्षांत प्रकृत परिभाषेचा अर्थ असा समजावा कीं ' विकरणव्यवधानेपि नियमः प्रवर्तते'–म्हणजे विकरणसूत्रें पर असल्यामुळें जरी धातूस विकरण प्रथम लागतें तरी नियामक सूत्रें बलवत्तर ठरून तीं विकरणाकडे दुर्लक्ष करितात व त्यांच्या सामर्थ्यानें लकाराचे जागीं अनुरूप प्रत्ययादेश होतात. )

**वस्तुतोऽस्माज्ज्ञापकादनुदात्तङित इत्यादि प्रकरणं तिबादिविध्येकवाक्यतया विधायकम् । तत्र धातोरिति विहितपञ्चमी तत्समानाधिकरणमनुदात्तङित इत्यादि विहितविशेषणमेव । एवं च लावस्थायां स्येऽपि तद्व्यवधाने तङ्सिद्धिः । शबादिभ्यस्तु पूर्वमेव नियमः ।**

( वर सांगिलेल्या दोन्ही पक्षांत 'अनुदात्तङितः' इत्यादि सूत्रें नियामक सूत्रें मानलीं आहेत. पण ' विधिनियमसम्भवे विधिरेव ज्यायान्–' म्हणजे जेथें एखादें सूत्र विधायक व तसेंच नियामक मानतां येतें तेथें तें सूत्र विधायक सूत्र मानावें हा अधिक श्रेयस्कर पक्ष आहे–अशी परिभाषा नं. १०९ असल्यामुळें ' अनुदात्तङितः ' इत्यादि सूत्रांना नियामक सूत्रें मानण्यांत गौरव असून, तीं विधायक सूत्रें मानण्यांत लाघव आहे. दुसरें असें कीं 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व ' तस्मादित्युत्तरस्य ' व ' विप्रतिषेधे परं कार्यम् या अष्टाध्यायींत साक्षात् पठित असलेल्या सूत्रांच्या विरुद्ध प्रकृत आनुमानिक परिभाषा

जात असल्यामुळें तीं न मानतां जर इष्ट कार्य होऊं शकतें तर तीं मानण्यांत कांहीं फायदा नाहीं या अर्थाचा तृतीय पक्ष आतां ग्रन्थकार सांगतात. व हाच सिद्धान्त पक्ष होय. ) वास्तविक, ' वृद्भ्यः स्यसनोः ' या ज्ञापक सूत्रावरून हें सिद्ध होतें कीं 'अनुदात्तङितः ' व या प्रकरणांत पठित असलेल्या इतर ( प्रत्ययादेशविधायक ) सूत्रांची 'तिप्तस्झि' या विधिसूत्राशीं एकवाक्यता करून हीं सूत्रें त्या सूत्राशीं एकवाक्यतापन्न झाल्यानें तयार झालेलें एक सूत्र विधायकसूत्र मानावें; व ' तिप्तस्झि ' या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या ' धातोः ' सू. २८२९ या अधिकारसूत्रांतील ' धातोः ' ही ( दिग्योगलक्षणापञ्चमी न मानतां ) विहितपञ्चमी–म्हणजे ' धातोः विहितस्य ' अशा अर्थाची पञ्चमी–समजावी व 'धातोः' या पदाशीं सामानाधिकरण्यांत–म्हणजे 'धातोः' या पदाची जी विभक्ति आहे त्याच विभक्तींत–असणारीं ' अनुदात्तङितः ' इत्यादि ( त्या प्रकरणांत पठित असलेलीं ) पञ्चम्यन्तपदें ( जीं ' धातोः ' या पदाचीं विशेषणें होत त तीं सर्व पदें ) धातूहून जो विहित ( लकार ) आहे त्याची–म्हणजे ' लस्य ' सू. २१५३ याची–विशेषणेंच समजावीं ( व तीं पदें ' विहितस्य ' या शब्दांत अन्वित करावीं. अशा रीतीनें ' अनुदात्तङितः ' या आत्मनेपदप्रत्ययविधायक सूत्राची ' धातोः विहितस्य लस्य स्थाने तिङादेशा भवन्ति ' याशीं एकवाक्यता केल्यास त्या एकवाक्यतापन्न सूत्राचा अर्थ असा होतो कीं ' धातोः विहितस्य लस्य स्थाने तिङादेशा भवन्ति किन्तु अनुदात्तेतः ङितश्च धातोः विहितस्य लस्य स्थाने तादृशा आदेशा भवन्ति येषां आत्मनेपदसंज्ञा भविष्यति', अशा रीतीनें लावस्थेंतच-म्हणजे लकाराचे जागीं प्रत्ययादेश होण्यापूर्वींच–जरी ' स्य ' हें विकरण लागतें व त्यामुळें धातु व लकार या दोहोंत 'स्य'-चें व्यवधान होतें तरी लकाराचे जागीं तङादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं ( कारण एकवाक्यतापन्न झालेलें सूत्र असें सांगतें कीं धातूहून विहित जो लकार त्याचे जागीं अनुरूप प्रत्ययादेश करावा; व या अर्थान्वयें धातूंत व लकारांत विकरणाचें व्यवधान होत असलें तरी तङादेश होण्यांत कांहीं हरकत येत नाहीं) परंतु शबादि विकरणें लावण्यापूर्वींच लकाराचे जागीं प्रत्ययादेश होतात ( याचें कारण हें आहे कीं ' कर्तरि शप्' सू० २१६७ या सूत्रांत ' कर्तरि '–म्हणजे ' कर्त्रर्थे सार्वधातुके प्रत्यये परे ' या अर्थाचें-हें पद घातलें आहे; व ' दिवादिभ्यः श्यन् ' ' स्वादिभ्यः श्नुः ' ' तनादिकृञ्भ्य उः,' ' क्र्यादिभ्यः श्ना ' इत्यादि विकरणविधायक सूत्रें शपाची अपवादसूत्रें असल्यामुळें, त्या सर्व सूत्रान्वयें , कर्तरि सर्वधातुक प्रत्यय पुढें असतांच, विकरणें लागतात, त्या पूर्वीं तीं लागत नाहींत. म्हणून अशा ठिकाणीं शबादि विकरणें लागण्यापूर्वींच त्या त्या सूत्रांच्या सामर्थ्यानें लकाराचें जागीं कर्तरि प्रत्ययादेश करणें भाग पडतें. परंतु ' स्यतासी लृलुटोः ' सू. २१८६ या सूत्रान्वयें ' लृ ' व ' लुट् ' हीं निमित्तें पुढें असल्यासच धातूला ' स्य ' व ' तास् ' हीं अनुक्रमें विकरणें लागत असल्यामुळें, ' लृ ' व ' लुट् ' यांचे जागीं प्रत्ययादेश प्रथम केल्यास, तीं विकरणें लागण्याचें निमित्त नष्ट होईल व तीं विकरणें लागू शकणार नाहींत. म्हणून त्या ठिकाणीं लकाराचे जागीं प्रत्ययादेश होण्या-

पूर्वी धातूस विकरण लावावें लागतें. पण लकाराचे जागीं प्रत्ययादेश होण्यापूर्वी किंवा प्रत्ययादेश झाल्यानंतर जरी धातूस विकरणें लागलीं तरी, ' अनुदात्तङितः ' या सूत्रान्वयें लकाराचे जागीं आत्मनेपद प्रत्ययादेश होण्यांत कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं व विकरणाचें व्यवधान असलें तरी विधायकसूत्रान्वयें तसें आदेश होतात. )

**यद्वा लमात्रापेक्षत्वादन्तरङ्गा आदेशा लकारविशेषापेक्षत्वात्स्यादयो बहिरङ्गा इति दिग्योगलक्षणपञ्चम्यामपि न दोषः । अत्र पक्षे वृद्भ्यः स्येति सूत्रं स्यविषय इति व्याख्येयम् । आत्मनेपदशब्दादौ भाविसंज्ञाऽऽश्रयणीयेति तत्त्वम् ।**

( आतां ग्रन्थकार कैयटादिकांनीं मानलेला चवथा पक्ष सांगतात ). अथवा (' तिप्तस्झि ' या सूत्रान्वयें ) सामान्य लकारास मानून—ह्मणजे कोणताहि लकार पुढें असल्यास-लकाराचे जागीं होणारे प्रत्ययादेश अन्तरङ्ग ठरतात व त्यांच्या मानानें लकार-विशेष पुढें असतांना होणारीं विकरणें बहिरङ्ग ठरतात. (जसें ' ऌ ' किंवा ' लुट् ' हे विशेष लकार पुढें असल्यासच ' स्य ' व ' तास् ' हीं विकरणें अनुक्रमें धातूस लागतात, व तसेंच ' लुङ् ' हा विशेष लकार पुढें असल्यासच धातूला ' च्लि=सिच् ' लागतो; व ' सामान्यापेक्षमन्तरङ्गम्, विशेषापेक्षं बहिरङ्गम् ' असा प्राचीन वैयाकरणांनीं नियम मानला असल्यामुळें, विशेष लकाराला मानून होणारीं कार्यें बहिरङ्ग समजलीं जातात; व ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही परिभाषा असल्यामुळें, अशीं कार्यें असिद्ध ठरून तीं प्रथम न होतां अन्तरङ्ग कार्यें प्रथम होतात व नंतर बहिरङ्ग कार्य होतें—ह्मणजे लकाराचे जागीं प्रत्ययादेश प्रथम होऊन नंतर विकरण लागतें. ह्मणून ' धातोः लस्य ' यांतील ' धातोः ' ही पूर्वींप्रमाणें विहितपञ्चमी न मानतां ) दिग्योगलक्षणापञ्चमी मानली तरी कांहीं अडचण येत नाहीं. (कारण धातूच्या लगेच पुढें जो लकार आहे त्याचे जागीं ' तस्मादित्युत्तरस्य ' या सूत्रान्वयें अनुरूप प्रत्ययादेश होण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं.) या पक्षांत ' वृद्भ्यः स्यसनोः ' या सूत्रांतील ' स्ये ' ही ( निमित्तसप्तमी न मानतां ) विषयसप्तमी मानून त्या सूत्राचा अर्थ करावा ( व तसें केलें ह्मणजे त्या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, जेथें वृतादि पांच धातूंस ' स्य ' हे विकरण लागणार आहे तशा स्थितींत ' ऌ ' च जागीं उभयविध प्रत्ययादेश विकल्पेंकरून करावे. असा अर्थ केला ह्मणजे लकाराचे जागीं प्रत्ययादेश करतेवेळीं 'स्य' हें विकरण धातूचे पुढें असण्याची गरज नाहीं. आतां येथें अशी शंका उत्पन्न होते कीं, 'ल' च्या जागीं झालेल्या तिबादि आदेशांना, ते आदेश झाल्यानंतरच परस्मैपद किंवा आत्मनेपद संज्ञा प्राप्त होते. जोंपर्यंत ते प्रत्यय लकाराचे जागीं झाले नाहींत तोंपर्यंत त्यांना अशी संज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. मग आत्मनेपदप्रत्ययाचे किंवा परस्मैपदप्रत्ययाचे आदेश करावे असें जें वर ह्मटलें आहे ते ह्मणणें कसें योग्य ठरतें ? या शंकेवर असें उत्तर देतात कीं, ) अशा स्थलीं आत्मनेपद इत्यादि शब्दांचा प्रयोग, लकाराचें जागीं

आदेश झाल्यानंतर पुढें उत्पन्न होणारी जी संज्ञा, त्या संज्ञेला धरून केला आहे असें समजावें. ( एखाद्या विणकरास सांगितलें कीं तूं मजकरितां लुगडें वीण तर अशा ठिकाणीं असा अर्थ केला पाहिजे कीं, तूं मजकरितां तें वीण कीं जें विणून तयार झाल्यानंतर ' लुगडें ' या संज्ञेस प्राप्त होईल; कारण ' लुगडें वीण ' अशी आज्ञा करितेवेळीं लुगडें अस्तित्वांतच नाहीं. मग जें अस्तित्वांत नाहीं तें तो कसें विणणार ? सारांश, अशा ठिकाणीं भाविसंज्ञेच्या आधारानेंच शब्दप्रयोग केला जातो. भाष्याची निर्णयसागराची प्रत, भाग २, पान १५१ पहा त्याचप्रमाणें 'अनुदात्तङितः धातोः परस्य लस्य स्थाने आत्मनेपदादेशा भवन्ति ' याचा ' अनुदात्तङितः धातोः परस्य लस्य स्थाने तादृशाः आदेशाः भवन्ति येषां जातानां 'तङानावात्मनेपदम् ' इति सूत्रेण आत्मनेपद संज्ञा भविष्यति ' असा अर्थ भाविसंज्ञेचा आश्रय करूनच करावा लागतो. हा जो चवथा पक्ष येथें सांगितला आहे तो सिद्धान्तपक्ष आहे असें मुळींच समजूं नये. तिसरा पक्ष हाच सिद्धान्तपक्ष होय. ' सामान्यापेक्षमन्तरङ्गं विशेषापेक्षं बहिरङ्गम् ' या न्याया-च्या आधारावर हा चवथा पक्ष कैयटादिकांनीं प्रस्थापित केला आहे. पण परिभाषा ५० मध्यें ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत कीं, वर दिलेला न्याय भाष्यांत कोठेंहि आढळत नसल्यामुळें तो स्वीकारार्ह नाहीं, व असें मानलें कीं हा पक्ष चूक ठरतो. )

**भिन्नवाक्यतया सामान्यशास्त्रविहितानां नियमे तु लुगादिनेव नियमेन जातनिवृत्तिरङ्गीकार्या । भुक्तवन्तं प्रति मा भुङ्क्था इति ब्रूयात् किं तेन कृतं स्यादिति न्यायस्तु नात्र शास्त्र आश्रयितुं युक्तो, नियमादिशास्त्राण वैयर्थ्यापत्तेः । ध्वनितं चेदं स्थानेऽन्तरतम इति सूत्रे भाष्ये । शास्त्रानर्थक्यं तु वृद्धिसंज्ञासूत्रे भाष्ये तिरस्कृतम् ।**

(पूर्वी ग्रन्थकारानीं एकवाक्यतापक्ष हाच सिद्धान्तपक्ष आहे असें सांगितलें आहे. भिन्नवाक्यतापक्ष स्वीकारल्यास–म्हणजे ' तिप्तस्झि ' हें सामान्यशास्त्र व ' अनुदात्त-ङितः ' इत्यादि विशेषशास्त्रें भिन्न भिन्न व स्वतंत्र आणि परस्पर निरपेक्ष वाक्यें मानून त्यांनीं सांगितलेलीं कार्यें पृथक् पृथक् केल्यास काय दोष येतात व भिन्नवाक्यतापक्ष कसा गौरवयुक्त पक्ष ठरतो हें आतां ग्रन्थकार सांगतात.) भिन्नवाक्यतापक्ष स्वीका-रल्यास, ज्याप्रमाणें प्रत्ययाचा ' लुक् ' होऊन झालेल्या प्रत्ययाची निवृत्ति होते ( जसें, अव्ययें हीं अर्थवान् असून धातु नसल्यामुळें, ' अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू० १७८ या सूत्रान्वयें त्यानां प्रातिपदिकसंज्ञा आहे, व ' ङ्याप् प्रातिपदिकात् ' या अधि-कारसूत्रान्वयें त्यानां विभक्तिप्रत्यय व स्त्रीप्रत्यय होतात, पण ' अव्ययादाप्सुपः ' सू० ४५२ या सूत्रान्वयें त्या प्रत्ययांचा ' लुक् ' होतो–म्हणजे झालेले प्रत्यय नाहींसे होतात ) त्याचप्रमाणें ' तिप्तस्झि ' या सामान्यशास्त्रान्वयें उभयविध–म्हणजे पर-स्मैपदाचे व आत्मनेपदाचे–प्रत्यय झाल्यावर त्या दोन प्रकारच्या रूपांपैकीं एक प्रकार-च्या रूपांची–म्हणजे परस्मैपदाच्या नवरूपांची किंवा आत्मनेपदाच्या नवरूपांची–अनु-

दात्तङितः ' इत्यादि विशेषशास्त्रान्वयें निवृत्ति होते असें मानलें पाहिजे. ('तिप्तस्झि' या सामान्यशास्त्रान्वयें प्रत्येक धातूस प्रत्येक लकारांत परस्मैपदाचे व आत्मनेपदाचे प्रत्यय लागून अठरा रूपें तयार होतील. धातु आत्मनेपदि असल्यास ' अनुदात्तङितः ' इत्यादि विशेषशास्त्रान्वयें परस्मैपदाचीं प्रत्येक लकाराचीं नव रूपें नाहींशीं करून बाकीचीं आत्मनेपदाचीं रूपें कायम ठेवावीं लागतील; तसेंच धातु परस्मैपदि असल्यास, ' शेषः परस्मैपदम् ' इत्यादि विशेषशास्त्रान्वयें आत्मनेपदाचीं नव रूपें नाहींशीं करून परस्मैपदाचीं नव रूपेंच कायम ठेवावीं लागतील. अशा रीतीनें या पक्षांत सामान्यशास्त्रान्वयें झालेल्या कांहीं रूपांची विशेषशास्त्राच्या आधारें निवृत्ति केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. आतां कोणी अशी शंका करील कीं, वर सांगितल्याप्रमाणें जीं अठरा रूपें एकदां तयार होऊन चुकलीं आहेत त्यांपैकीं नव रूपें नाहींशीं कशीं होऊं शकणार ? कारण जें एकदां होऊन गेलें आहे त्याला तूं होऊं नकोस असें म्हटल्यानें फायदा काय ? जसें, एखाद्याचें जेवण झाल्यावर त्याला तूं जेऊं नकोस हें म्हणणें निरर्थक आहे त्याचप्रमाणें जीं रूपें होऊन चुकलीं आहेत त्यांना होऊं नका हें म्हणणें व्यर्थ आहे. या शंकेवर असें उत्तर देण्यांत येतें कीं, ) ' भुक्तवन्तं प्रति मा भुङ्क्था इति ब्रूयात् किं तेन कृतं स्यात् '– म्हणजे ज्याचें जेवण झालें आहे त्याला तूं जेऊं नकोस असें म्हटल्यानें फायदा काय होणार–हा लौकिकन्याय व्याकरणशास्त्रांत लावणें योग्य नाहीं, कारण तो न्याय लावल्यास नियम घालून देणारीं विशेष सूत्रें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल असें ' स्थानेऽन्तरतमः ' १–१–५० या सूत्रावरील भाष्यांत ध्वनित केलें आहे, व ' वृद्धिरादैच् ' १–१–१ या वृद्धिसंज्ञाविधायक सूत्रावरील भाष्यांत, जे कोणी अष्टाध्यायींतील कोणतेंहि सूत्र निरर्थक ठरवूं पाहतात त्यांचा भाष्यकारांनीं धिक्कार केला आहे. ( भाष्यकार म्हणतात ' प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणिः शुचावकाशे प्राङ्मुख उपविश्य महता प्रयत्नेन सूत्राणि प्रणयति स्म । तत्राशक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुम्, किं पुनरियता सूत्रेण । ' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं सामान्यशास्त्र व विशेषशास्त्र हीं दोन्हीं सार्थक मानलींच पाहिजेत, व तसें मानलें म्हणजे दोन्हीं शास्त्रें आपापलीं कार्यें स्वतंत्र रीतीनें करणारच. फरक एवढाच कीं सामान्यशास्त्रानें जीं दोन प्रकारचीं रूपें तयार झालीं आहेत त्यांपैकीं एक प्रकारचीं रूपें विशेषशास्त्र नाहींशीं करून बाकीचीं स्वतःला अनुकूल अशीं रूपें कायम ठेवतें. )

**सामान्यशास्त्रेणोत्पत्तिस्तु सरूपसूत्रस्थकैयटरीत्या प्रधानानुरोधेन गुणभेदकल्पनात्तावत्प्रकृतिकल्पनया कार्या प्रत्ययनिवृत्तौ च तत्कल्पितप्रकृतेरपि निवृत्तिः कल्प्येति गौरवमित्यन्यत्र विस्तरः ॥ ४१ ॥**

सामान्यशास्त्रान्वयें ( प्रत्येक लकारांत धातूचीं अठरा प्रकारचीं रूपें ) सिद्ध करण्याकरितां, ' सरूपाणामेकशेषः ' १–२–६४ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें म्हटल्याप्रमाणें, प्रधानाच्या–म्हणजे प्रत्ययाच्या–अनुरोधानें वेगळ्या वेगळ्या

—म्हणजे जितके प्रत्यय आहेत तितक्या—प्रकृति कल्पाव्या लागतील व एक प्रकारच्या प्रत्ययाचीं रूपें (विशेषशास्त्रान्वयें) नाहींशीं केल्यावर जितक्या प्रकृतींस ते प्रत्यय झाले आहेत तितक्या प्रकृति ( प्रत्ययांसह ) नाहींशा कराव्या लागतील. अशा तऱ्हेनें हा भिन्नवाक्यतापक्ष गौरवयुक्त ठरतो असें इतर ग्रन्थांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे. ( प्रत्येक लकाराचें परस्मैपदाचें नव प्रत्यय व आत्मनेपदाचे नव प्रत्यय असे एकंदर अठरा प्रत्यय आहेत. ' प्रकृत्यपेक्षया प्रत्ययः प्रधानम् ' या न्यायान्वयें प्रकृतीच्या मानानें प्रत्यय हा प्रधान समजला जातो. म्हणून प्रत्येक प्रत्यय होण्याकरितां एकेक वेगळी प्रकृति कल्पावी लागते. अशा रीतीनें प्रत्येक लकारांत अठरा प्रत्यय होण्याकरितां अठरा प्रकृति कल्पाव्या लागतील, व प्रकृतीला प्रत्यय लागून अठरा रूपें तयार झाल्या-वर, विशेषशास्त्रान्वयें नव प्रत्यय व ज्या प्रकृतींस ते प्रत्यय झाले आहेत त्या नव प्रकृति पुसून काढाव्या लागतील. सारांश, प्रथम अठरा रूपें तयार करून मग नव रूपें नाहींशीं करण्याचा खटाटोप करणें यांत गौरव आहे. पण एकवाक्यतापक्ष स्वीकारल्यास नवच प्रकारचीं रूपें तयार होत असल्यामुळें, त्या पक्षांत लाघव आहे म्हणून तोच सिद्धान्त-पक्ष समजावा. )

---

# परिभाषा ४२

## परान्नित्यं बलवत् ॥ ४२ ॥

" परसूत्रापेक्षां नित्यकार्य करणारें सूत्र बलवत्तर असतें. "

( वास्तविक पाहतां परिभाषा नं. ३८ मध्यें हें सांगितलेंच आहे; म्हणून अशी पुनरुक्ति करणारी परिभाषा न देतां ' कृताकृतप्रसङ्गि नित्यम्, तद्विपरीतमनित्यम् ' अशी ' नित्य ' व ' अनित्य ' ह्यांचें लक्षण सांगणारी परिभाषा दिली असती तर अधिक योग्य झालें असतें. )

**कृताकृतप्रसङ्गित्वात् । तत्राक्लृप्ताभावकस्याभावकल्पनापेक्षया क्लृप्ता-भावकस्यैव तत्कल्पनमुचितमिति नित्यस्य बलवत्त्वे बीजम् । तदाह-कृता-कृतप्रसाङ्गि नित्यं तद्विपरीतमनित्यम् ।**

परसूत्रानें कार्य केलें किंवा न केलें तरी जें कार्य अवश्य होतें तें नित्यकार्य होय. असें असल्यामुळें, ( नित्यकार्य करणारें सूत्र परसूत्रापेक्षां बलवत्तर असतें ) असें म्हटलें आहे. ज्याचा अभाव ( बाध ) कधीं होत नाहीं त्याचा अभाव ( बाध ) मानण्यापेक्षां ज्याचा अभाव ( बाध ) होतो त्याचा बाध मानणें उचित आहे हें या परिभाषेचें बीज होय. (' अक्लृप्तः=न संजातः, अभावः=बाधः, यस्य तादृशस्य;' नित्यसूत्र असें असतें कीं, परसूत्रानें तुम्ही कार्य केलें अथवा न केलें तरी, तें प्रवृत्त होऊन आपलें कार्य केल्या-

शिवाय राहत नाहीं. परंतु परसूत्र असें आहे कीं, नित्यसूत्र त्याचा बाध करतें. ह्या लाघवन्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली असल्यामुळें, ती युक्तिसिद्ध आहे हें जाणावें ) म्हणूनच असें म्हटलें आहे कीं, इतर सूत्र लागलें किंवा न लागलें तरी जें सूत्र अवश्य लागतें तें नित्य होय; तसें नसणारें सूत्र अनित्य होय. ( आणि खरोखर हीच नित्य व अनित्य कार्यांचें लक्षण सांगणारी परिभाषा मानणें उचित आहे. )

**अत एव तुदतीत्यादौ परादपि गुणान्नित्यत्वात् शप्रत्ययादिर्भवति ।.४२॥**

म्हणूनच ' तुदति ' इत्यादि स्थलीं, गुणविधायक सूत्र जरी परसूत्र आहे तरी, ' श ' विकरण होण्याचें सूत्र नित्य असल्यामुळें तें प्रवृत्त होतें. ( ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ हें गुणविधायक सूत्र असून परसूत्र आहे. ' तुदादिभ्यःशः ' सू० २५३४ हें तुदादिगणांतील धातूंना शपाचे ऐवजीं ' श ' हें विकरण होतें असें सांगणारें पूर्वसूत्र आहे. पूर्वसूत्रापेक्षां परसूत्र बलवत्तर असतें असें पूर्वी सांगितलेंच आहे. म्हणून 'तुद+लट्=तुद्+तिप्' अशा स्थितींत, ' तिप् ' प्रत्यय ' पित् ' असल्यामुळें, 'पुगन्तलघूपधस्य च ' ( या परसूत्रानें ' तुद् ' ह्यांतील उपधाउकाराला गुण होऊन ' तोद्+ति ' असें व्हावें; व नंतर ' श ' विकरण लागावें, म्हणजे ' तोदति ' असें रूप व्हावें. परंतु तसें रूप होत नाहीं. ह्याचें कारण हें कीं, 'तुदादिभ्यः शः ' हें जरी पूर्वसूत्र आहे तरी, तें नित्य असल्यामुळें, परसूत्राचा बाध करून कार्य करण्यास प्रवृत्त होतें. तें सूत्र नित्य आहे हें म्हणण्याचें कारण असें कीं गुण होवो अथवा न होवो, ' श ' विकरण धातूस लागणारच—म्हणजे ' तुद्+ति ' अथवा ' तोद्+ति ' अशी कोणतीहि स्थिति असली तरी धातूला ' श ' विकरण लागल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून तें विकरण गुण होण्यापूर्वीं लागतें व 'तुद्+अ+ति' अशी स्थिति होते; अशा स्थितींत 'तुद् ' ह्या पुढें अकार आल्यामुळें, ' तुद् ' धातूंतील उकार उपधा राहत नाहीं, आणि म्हणून 'तिप्' प्रत्यय 'पित्' असूनहि त्या प्रत्ययाला मानून गुण होत नाहीं व 'तुदति' असें रूप होतें; ' श ' प्रत्ययाला मानून ' तुद् ' ह्यांतील उपधेचा 'क्ङिति च' सू० २२१७ या निषेधसूत्रामुळें गुण होत नाहीं. )

---

## परिभाषा ४३

**यद्यद्व्यक्तिसम्बन्धितया पूर्वं प्रवृत्तिस्तद्व्यक्तिसम्बन्धितयैव पुनः प्रवृत्तौ कृताकृतप्रसङ्गित्वमित्याशयेनाह—**

( मागील परिभाषेंत असें सांगितलें आहे कीं, पूर्वसूत्र नित्य असल्यास, तें परसूत्रापेक्षां बलवत्तर ठरतें. व 'नित्य' ह्या शब्दाची व्याख्या ' कृताकृतप्रसङ्गि ' एवढीच त्या परिभाषेंत दिली आहे. पण आतां जी परिभाषा सांगणार आहेत तिच्यायोगानें ती

व्याख्या जास्त संकुचित केली जाते. ) ज्या शब्दस्वरूपास अनुलक्षून दोन सूत्रांपैकीं ज्या सूत्राची प्रथम प्रवृत्ति होते, त्याच शब्दस्वरूपास अनुलक्षून, दुसरें सूत्र लावल्यानंतरहि, जर त्या प्रथम सूत्राची प्रवृत्ति होत असेल तरच त्या सूत्रानें होणारें कार्य कृताकृतप्रसङ्गि—म्हणजे परसूत्रानें कार्य केलें किंवा न केलें तरी होणारें—समजावें. हा आशय मनांत धरून ही परिभाषा सांगतातः—

## शब्दान्तरस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति ॥ ४२ ॥

" ( एखाद्या उदाहरणांत दोन सूत्रें एकेच वेळीं प्राप्त झालीं असतां, त्यांपैकीं कोणतेंहि एक सूत्र प्रथम लावल्यास ) त्या सूत्रान्वयें ज्या शब्दस्वरूपास कार्य होतें त्याहून भिन्न शब्दस्वरूपाला, ( दुसऱ्या सूत्रानें कार्य केल्यानंतर, त्या प्रथम सूत्रान्वयें ) कार्य होत असेल तर तें सूत्र अनित्य समजावें. "

**इदं शदेः शित इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । तत्र हि न्यविशतेत्यत्र विकरणे कृते तदन्तस्याडकृते धातुमात्रस्येत्यडनित्य इत्युक्तम् ॥ ४२ ॥**

ही परिभाषा ' शदेः शितः ' १–३–६० ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितली आहे, व तेथें असें म्हटलें आहे कीं, ' न्यविशत ' ह्या स्थलीं, धातूला विकरण लावलें असतां, विकरणान्त धातूला अडागम होतो, व विकरण न लावतां अडागम केल्यास, तो केवळ धातूलाच होतो, म्हणून अडागम अनित्य आहे. ('नेर्विशः ' सू० २६८२ ह्या सूत्रानें 'नि' या उपसर्गपूर्वक ' विश् ' धातूस आत्मनेपद झालें आहे. 'नि+विश्+लङ्' अशा स्थितींत ' तुदादिभ्यः शः ' सू० २५३४ ह्यानें 'श' विकरण पावलें आहे व ' लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः सू० २२०६ ह्यानें अडागम पावला आहे. अडागमाचें सूत्र परसूत्र आहे. दोन्हीं सूत्रें नित्य आहेत. कारण दोन्हीं कार्यें अवश्य होणारीं आहेत.—म्हणजे एक झालें अथवा न झालें तरी दुसरें होणारच अशा प्रकारचीं तीं कार्यें आहेत. तरी पण विकरण प्रथम लावल्यास ' विश्+अ=विश ' अशा स्थितींत ' विश ' ह्याला अडागम होणार, व विकरण न लावतां अडागम केल्यास तो केवळ ' विश् ' धातूस होणार. सारांश विकरण प्रथम लावलें असतां ज्या ' विश ' ह्या शब्दस्वरूपास अडागम होतो तें शब्दस्वरूप, विकरण न लावतां अडागम केल्यास, दुसरेंच—म्हणजे ' विश् '—असें असतें. म्हणून, ह्या परिभाषेप्रमाणें, अडागम अनित्य समजावा. पण येथें हें सांगणें जरूर वाटतें कीं, अशा रीतीनें ' श ' विकरणाचें सूत्र देखील अनित्य ठरवितां येईल; कारण अडागम प्रथम केल्यास, ' यदागमाः ' ह्या परिभाषेप्रमाणें, अडागमसहित ' विश् ' —म्हणजे अ+विश्—हा ' विश् ' च आहे असें मानल्यास, ' अ+विश् ' ला विकरण लागणार, व अडागम न करितां विकरण लावल्यास, तें विकरण भिन्न शब्दस्वरूपास —म्हणजे केवळ ' विश् ' लाच—होणार. तथापि कैयटानें असें म्हटलें आहे कीं, ' विकरणास्तु शब्दान्तरादपि प्राप्नुवन्तो नानित्याः ' व ह्या करितांच परिभाषा ४६ सांगितली आहे. म्हणून विकरण लावण्याचें कार्य नित्य मानावें. ह्या परिभाषेचें दुसरें उदाहरण

भैरवी टीकेंत दिलें आहे. तें असें:—' इष् ' धातूचें सनाचें रुप करितांना, ' सन्यङोः ' सू० २३९५ ह्या सूत्रानें द्विर्वचन पावलें आहे व ' आर्धधातुकस्येड्वलादेः ' सू० २१८४ ह्या सूत्रानें ' सन् ' ला इडागम पावला आहे. दोन्हीं सूत्रें नित्य आहेत. 'इष्+सन् ' अशा स्थितींत, ' सन् ' ला इडागम न करितां द्विस्व प्रथम केल्यास, ' अजादेर्द्वितीयस्य ' सू० २१७६ ह्या सूत्रान्वयें ' इष्+स ' ह्यांतील 'स' ला द्विस्व प्राप्त होतें, व इडागम प्रथम केल्यास, ' इष्+इ+स=इषिष ' अशा स्थितींत, शब्दान्तराला—म्हणजे ' षिष् ' ला—द्विस्व प्राप्त होतें, म्हणून येथें द्विर्वचन अनित्य समजावें, व इडागम प्रथम करून मग द्विस्व करावें. )

---

## परिभाषा ४४

एतत्तुल्यन्यायेनाह—

( ' यद्व्यक्तिसम्बन्धितया पूर्वं प्रवृत्तिः तद्व्यक्तिसम्बन्धितयैव पुनः प्रवृत्तौ कृताकृतप्रसङ्गित्वम्' हा जो न्याय मागल्या परिभाषेंत सांगितला आहे त्याच ) पूर्वोक्त न्यायाला धरून ही देखील परिभाषा असल्यामुळें, ही परिभाषा सांगतातः—

**शब्दान्तरात् प्राप्नुवतः शब्दान्तरे प्राप्नुवतश्चानित्यत्वम् ॥ ४४ ॥**

" ( दोन सूत्रें युगपत् प्राप्त झालीं असतां त्यापैकीं कोणतेंहि एक सूत्र प्रथम लावल्यास त्या सूत्रानें ) ज्या शब्दस्वरूपानंतर किंवा ज्या शब्दस्वरूपापूर्वी कार्य होतें तशा ठिकाणीं द्वितीय सूत्र लावल्यानंतर पुनः प्रथम सूत्र लावल्यास, जर तें कार्य भिन्न शब्दस्वरूपानंतर किंवा भिन्न शब्दस्वरूपापूर्वीं होत असेल तर तें सूत्र अनित्य समजावें "

(ह्या परिभाषेच्या स्पष्टीकरणार्थ ग्रन्थकारानें एकहि उदाहरण दिलें नाहीं. तथापि भैरवी टीकेंत ह्या परिभाषेचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांपैकीं दोन उदाहरणें ह्या परिभाषेचा अर्थ नीट ध्यानांत यावा ह्मणून खालीं सांगितलीं आहेत.

( १ ) ' शब्दान्तरात्प्राप्नुवतः विधेरनित्यत्वम् ' ह्याचें उदाहरण ' मा भवान् उजिहत् ' असें दिलें आहे. 'ऊह् वितर्के ' ह्या भ्वादिगणांतील धातूचा णिच् करून णिजन्ताचें लुङाचें रूप करितांना, ' णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ् ' सू. २३१२ ह्या सूत्रानें ' च्लि ' च्या जागीं ' चङ् ' होतो; ह्मणजे ' ऊह्+णिच्+चङ्=ऊह्+इ+अ ' अशी स्थिति होते. अशा स्थितींत ' चङि ' सु० २३१५ ह्या सूत्रानें द्विस्व पावलें आहे, व ' णौ चङि उपधाया ह्रस्वः' सू० २३१४ ह्या सूत्रानें उपधाह्रस्व पावला आहे. ' ऊह्+इ+अ =ऊहि+अ ' अशा स्थितींत, ' अजादेर्द्वितीयस्य ' सू० २१७६ ह्या सूत्रानें ' ऊहि ' ह्यांतील ' ऊ ' शब्दापुढें असणाऱ्या द्वितीय एकाचाला—ह्मणजे ' हि ' ला—द्विस्व होईल. पण ' णौ चङि ' ह्या सूत्रानें उपधाह्रस्व केल्यास, ' उ ' शब्दानंतर असलेल्या ' हि '

ह्या द्वितीय एकाचास द्विस्व हें ईल. सारांश ज्या शब्दस्वरूपानंतर ह्मणजे ' ऊ ' नंतर प्रथमतः ' हि ' आहे तें शब्दस्वरूप, ' णौ चङि ' हें सूत्र लावल्यावर, बदलून ' उ ' असें भिन्न शब्दस्वरुप होतें. ह्मणून द्विस्वकार्य ज्या ' हि ' ला करणें आहे तो ' हि ' ' णौ चङि ' हें सूत्र लावल्यावर, भिन्न शब्दस्वरूपानंतर येत असल्यामुळें, द्विस्वकार्य ह्या परिभाषेप्रमाणें, अनित्य समजावें. त्यामुळें तें द्विस्वकार्य प्रथम न करितां उपधा-न्हस्व प्रथम करावा व नंतर द्विस्व करावें, ह्मणजेच 'उजिहत्' असें रूप सिद्ध होईल, द्विस्व प्रथम केल्यास, ' ऊजिहत् ' असें विकृत रूप होईल.

(२) ' शब्दान्तरे प्राप्नुवतो विधेरनित्यत्वम् ' ह्याचें उदाहरण ' करिष्यते ' हें दिलें आहे. ' कृञ्+लट् ' अशा स्थितींत, ' स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले ' सू. २१५८ ह्या सूत्रानें लटाचें जागीं आत्मनेपदी तङादेश पावला आहे व ' स्यतासी ललुटोः ' सू० २१८६ ह्या सूत्रानें धातूला ' स्य ' हें विकरण पावलें आहे. लटाचे जागीं आत्मनेपदप्रत्ययाचे आदेश करण्यापूर्वी, धातूला ' स्य ' लावल्यास, तो लटापूर्वी येईल, व प्रत्ययादेश केल्यानंतर लावल्यास, तो ' ते ' ह्या प्रत्ययापूर्वी येईल. सारांश ज्या शब्दस्वरूपापूर्वी–म्हणजे ' लट् ' च्या पूर्वी–प्रथम ' स्य ' येतो तें शब्दस्वरूप, आत्मनेपदप्रत्ययादेश केल्यानंतर, बदलत असल्यामुळें, ' स्यतासी ' या सूत्रानें होणारें कार्य अनित्य ठरतें; म्हणून प्रथम प्रत्ययादेश केल्यानंतर धातूला ' स्य ' लावावा. )

---

## परिभाषा ४५

**एतन्मूलकमेवाह—**

–वरील न्यायाला धरूनच ही परिभाषा सांगतात.

### लक्षणान्तरेण प्राप्नुवन्विधिरनित्यः ॥ ४५ ॥

"( दोन सूत्रें युगपत् प्राप्त झालीं असतां, त्या दोन सूत्रांपैकीं एका सूत्रानें कार्य केल्यावर दुसऱ्या सूत्रानें कार्य करणें झाल्यास, जर तें दुसरें सूत्र तें कार्य ) तिसऱ्या सूत्राची अथवा भिन्न निमित्ताची मदत मिळाली तरच करूं शकत असेल तर, अशा दुसऱ्या सूत्रानें सांगितलेलें कार्य अनित्य समजावें "

( ह्या परिभाषेचें देखील ग्रन्थकारानें एकहि उदाहरण दिलें नाहीं. तथापि कैयटानें ह्या परिभाषेचें ' कुर्वः ' हें उदाहरण दिलें आहे. ' कृञ् ' धातूस ' तनादिकृञ्भ्य उः ' सू. २४६६ ह्या सूत्रानें ' उ ' लागल्यावर ' कृ+उ+वस् ' अशा स्थितींत, ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ व ' नित्यं करोतेः ' सू० २५४८ ह्या दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात. 'नित्यं करोतेः' ह्या पूर्व सूत्रानें, ' वस् ' प्रत्यय पुढ असल्यामुळें, उकाराचा लोप होतो. ' उ ' या आर्धधातुकप्रत्ययाला मानून ' कृ ' यांतील अन्त्य ऋकाराचा

गुण केला तरी उलोप होणारच, न केला तरी होणारच; म्हणून हा उलोप ' कृताकृतप्रसङ्गि ' असल्यामुळें नित्य आहे. आणि म्हणून जरी तो पूर्वसूत्रानें प्राप्त आहे तरी प्रथम होतो. उलोप झाल्यावर, ' उ ' प्रत्यय पुढें असल्यामुळें ' कृ ' ह्यांतील अन्त्य ऋकारास ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' ह्या परसूत्रानें होणारा गुण, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू० २६२ ह्या तिसऱ्या सूत्राची मदत घेतल्याशिवाय–म्हणजे ' उ ' प्रत्ययाचा लोप जरी झाला आहे तरी तो कायम आहेच असें मानल्याशिवाय –करितां येत नाहीं. म्हणून ह्या परिभाषेप्रमाणें, गुणकार्य अनित्य ठरतें. त्यामुळें उलोप प्रथम करावा व नंतर गुणकार्य करावें. मग ' अत उत्सार्वधातुके ' सू. २४६७ ह्या सूत्रानें ' कर् ' ह्यांतील अकाराचा उकार करावा म्हणजे ' कुर्वः ' असें रूप सिद्ध होतें. ह्या परिभाषेचें उदाहरण ' अजरांसि कुलानि ' असें भैरवी टीकेंत दिलें आहे. ' न विद्यते जरा येषां तानि ' येथें ' नञ् ' व ' नलोपो नञः ' सू० ७५६ व ७५७ व 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू० ६५६ ही सूत्रें लागून, आणि ' जश्शसोः शिः ' सू. ३१२ हें सूत्र लागून, ' अजर ' +शि(इ) ' अशी स्थिति झाली असतां, ' जराया जरस् ' सू० २२७ व 'नपुंसकस्य झलचः ' सू. ३१४ हीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात. ' एकदेशविकृतमनन्यवत् ' ह्या परिभाषेप्रमाणें ' अजर ' येथील ' जर ' ' जरा ' च आहे असें समजून त्याचें जागीं ' जरस् ' आदेश पावला आहे. ' जरस् ' आदेश केला अथवा न केला तरी अङ्गाला नुमागमाची प्राप्ति असल्यामुळें, ' कृताकृतप्रसङ्गि ' नुमागम, परिभाषा ४२ प्रमाणें आपाततः नित्य ठरतो; व तो नित्य ठरत असल्यामुळें प्रथम केल्यास, ' अजर+नुम्+इ=अजरन् +इ ' असें रूप होणार, व तसें रूप झाल्यावर ' जरा ' शब्द न राहिल्यामुळें, ' जरस् ' हा आदेश, ' जरन् ' ह्या नुमागमयुक्त अङ्गाचें ठिकाणीं नुम्चें व्यवधान झाल्यामुळें, होणार नाहीं. परंतु ' लक्षणान्तरेण प्राप्नुवन् विधिरनित्यः ' ही परिभाषा असल्यामुळें, पूर्वी अजन्तत्व लक्षणामुळें, व ' जरस् ' आदेश झाल्यावर झलन्तत्व ह्या भिन्न लक्षणामुळें, होणारा नुमागम देखील अनित्य ठरतो. म्हणून ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ह्या न्यायानें, ' जराया जरस् ' हें परसूत्र प्रवृत्त होऊन प्रथम ' जरस् ' आदेश होतो; व नंतर ' नपुंसकस्य झलचः ' ह्या पूर्वसूत्रानें सांगितलेला ' नुमागम ' होतो. तो ' मिदचोऽन्त्यात्परः ' सू० ३७ ह्या सूत्रानें अन्त्य स्वरानंतर होऊन ' अजरन्+स्+इ ' अशी स्थिति झाली असतां, ' सान्तमहतः संयोगस्य ' सू. ३१७ ह्या सूत्रानें उपधादीर्घ होऊन, व ' नश्चापदान्तस्य ' सू. १२३ ह्या सूत्रानें ' न् ' चा अनुस्वार होऊन, ' अजरांसि ' असें रूप सिद्ध होतें )

## अतिदेशविषये इयमसिद्धवत्सूत्रे कैयटेनोक्ता ॥ ४५ ॥

' असिद्धवदत्राभात् ' ६–४–२२ ह्या सूत्रावरील भाष्याचा टीकेंत कैयटानें ही परिभाषा, (' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' ह्या सूत्रान्वयें होणाऱ्या ) अतिदेशासंबंधानें उल्लेख करितांना, सांगितली आहे.

---

# परिभाषा ४६

**यदा तु शास्त्रव्यतिरेकेण तद्विधेयकार्ययोरेव नित्यत्वादिविचारो यदापि व्यक्तिविशेषाश्रयणाभावस्तदाह—**

जेथें सूत्रांचा विचार न करितां, त्या सूत्रांनीं सांगितलेलीं कार्यें नित्य आहेत कीं अनित्य आहेत एवढाच विचार करणें आहे व जेथें शब्दस्वरूप पूर्वी जसें होतें तसें नसून शब्दान्तरास कार्य होतें ह्याबद्दल देखिल विचार करणें नाहीं तेथें ही परिभाषा लावतात. :—

## क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता ॥ ४६ ॥

" कोठें कोठें ( शुद्ध रूपाची सिद्धि करण्याकरितां ) इतर सूत्रानें आपलें कार्य केलें अथवा न केलें तरी ज्या सूत्राच्या प्राप्तीचा केवळ संभव असतो त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य नित्य समजावें. "

**कृते द्वितीये नित्यत्वेनाभिमतस्य पुनः प्रसङ्गमात्रं नित्यत्वव्यवहारे प्रयोजकं, न तु बाधकाबाधितफलोपहितप्रसङ्गोऽपि तथेति भावः ॥ ४६ ॥**

इतर सूत्रानें कार्य केल्यावर, नित्य म्हणून मानलेल्या सूत्रानें सांगितलेल्या कार्याच्या पुनः प्राप्तीचा संभव असल्यास, असा प्राप्तीचा संभवच त्या सूत्रानें सांगितलेल्या कार्यास नित्य मानण्यास कारणीभूत होतो. ( ज्या दोन कार्यांच्या नित्यानित्यत्वाचा विचार करणें आहे त्यापैकीं एक कार्य असें असलें कीं, दुसरें कार्य होण्यापूर्वी किंवा तें कार्य झाल्यानंतर देखील ज्याच्या प्राप्तीचा केवळ संभव आहे तें कार्य नित्य समजावें. तें कार्य इतर बाधकसूत्रामुळें अखेरीस जरी होऊं न शकलें तरी तें नित्य मानण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, ) बाधक सूत्रानें ज्याचें फलजननसामर्थ्य नष्ट झालें नाहीं —म्हणजे ज्याची फल उत्पन्न करण्याची शक्ति नष्ट न होतां जशीची तशीच कायम आहे—अशाच सूत्रानें सांगितलेलें कार्य नित्य असतें असा कांहीं नियम नाहीं. ( प. ४२ मध्यें जी कार्यांच्या नित्यत्वाची व्याख्या दिली होती त्या व्याख्येमध्यें प. नं. ४२ तें ४५ ह्यांनीं जो फेरबदल केला आहे त्याकडे दुर्लक्ष करून प. नं. ४६ ते ४८ सांगितल्या आहेत. ह्या परिभाषा सांगतांना ग्रन्थकारानें ' शास्त्रव्यतिरेकेण ' असें म्हटलें आहे, व तसें म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ज्या कार्यांची नित्यता ठरविणें आहे त्या कार्याच्या प्राप्तिचा, इतर सूत्रानें कार्य केल्यानंतर देखील, जर सम्भव असेल तर, तें कार्य सूत्रान्तरानें बाधित झाल्यामुळें जरी होऊं शकत नसेल. किंवा सूत्रान्तरानें त्याचें निमित्त नष्ट झाल्यामुळें जरी तें होऊं शकत नसेल. किंवा सूत्रान्तराची मदत घेतल्याशिवाय जरी तें होऊं शकत नसेल तरी, या गोष्टींचा विचार न करितां, तें कार्य, या परिभाषेप्रमाणें लक्ष्यानुसार नित्य मानावें. असें आहे म्हणूनच 'प्रसङ्गमात्रम्'—म्हणजे प्राप्तीचा

सम्भव असणें—असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे, व ' प्रसङ्गमात्रम् ' या शब्दांत 'मात्रम' हा जो शब्द वापरला आहे त्याची अन्वर्थकता दर्शविण्याकरितांच ' न तु बाधकाबाधितफलोपहितप्रसङ्गोऽपि तथा ' हे शब्द मुद्दाम पुढें घातले आहेत; व त्या पङ्क्तीचा अर्थ असा आहे कीं, बाधकसूत्रानें फल उत्पन्न करण्याची शक्ति जरी नाहींशी होण्याचा प्रसङ्ग आला असला तरी कार्य नित्य मानण्यास कांहीं हरकत नाहीं. प. नं. ४६ व ४७ चें स्पष्टीकरण करितांना जीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत त्यांच्यायोगानें वर दिलेला अर्थ स्पष्टपणें ध्यानांत येईल. सारांश, एक सूत्र दुसऱ्या सूत्रानें बाधित झालें आहे व त्यामुळें त्याचें सूत्रविहित कार्य करण्याचें सामर्थ्य नष्ट झालें आहे इत्यादि बाध्यबाधकभावादिकांचा विचार न करितां तें कार्य लक्ष्यानुसार नित्य मानावें. तसेंच ' यद्यपि व्यक्तिविशेषाश्रयणाभावः ' असें ग्रन्थकारानें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, कोणत्याहि सूत्रानें सांगितलेलें कार्य प्रथम ज्या शब्दस्वरूपास होत असेल त्याहून भिन्न शब्दस्वरूपास नंतर तें होत असलें तरी तें कार्य लक्ष्यानुसार नित्य मानावें. सारांश प. नं. ४३ ते ४५ अनित्य आहेत हें दाखविण्याकरितां वरील शब्द उपयोगांत आणिले आहेत, व त्या परिभाषांच्या विरुद्ध प. नं. ४६ ते ४८ या परिभाषा सांगितल्या आहेत, व इष्टरूप सिद्धि करण्याकरितां केव्हां त्यांचा व केव्हां ह्यांचा उपयोग करावा. प. नं. ४६ चें उदाहरण भैरवी टीकेंत ' तुदति ' हें दिलें आहे. ' तुद्+ति ' अशा स्थितींत, ' तुदादिभ्यः शः ' सू० २५३४ व ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ ह्या दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति होते. ह्या दोन कार्यांपैकीं विकरण कार्य नित्य आहे; कारण तें गुण झाला तरी होणार व न झाला तरी होणार. पण गुण हा अनित्य आहे. कारण जरी तो विकरण लावण्यापूर्वीं होऊं शकतो तरी विकरण लावल्यानंतर, ' तुद्+अ+ति ' अशा स्थितींत, उपधेंत उकार राहत नसल्यामुळें, तो होऊं शकत नाहीं. म्हणून विकरण नित्य असल्यामुळें प्रथम लागतें. गुण प्रथम न केल्यास, विकरण ' तुद् ' ला होतें व गुण प्रथम केल्यास विकरण ' तोद् ' ला होतें हें खरें; व ह्यामुळें प. ४४ प्रमाणें तें विकरण कार्य देखील अनित्य ठरतें; व दोन्हीं कार्यें अनित्य मानल्यास, गुणविधायक सूत्र परसूत्र असल्यामुळें तें प्रथमप्रवृत्त होऊन, ' तोदति ' असें विकृत रूप सिद्ध होईल. तें न व्हावें म्हणून ही परिभाषा सांगितली आहे; ह्या परिभाषेप्रमाणें गुण प्रथम केल्यास जरी शब्दान्तरास विकरण होण्याचा संभव आहे तरी ' स्थानिवदादेशः ' सू० ४९ ह्या सूत्रान्तराची मदत घेतल्यास ' तोद् ' हा ' तुद् ' च आहे असें मानतां येत असल्यामुळें, व तसें मानल्यानें विकरण होऊं शकत असल्यामुळें, जरी प. ४५ प्रमाणें तें अनित्य ठरतें तरी तें विकरणकार्य प्रकृत परिभाषेप्रमाणें अनित्य समजूं नये, व तें प्रथम करावें म्हणजे ' तुदति ' असें इष्टरूप सिद्ध होतें. )

---

## परिभाषा ४७

तदाह—

( बाधक सूत्रानें ज्याचें फलजननसामर्थ्य नष्ट होत नाहीं, तेंच नित्य समजावें असा कांहीं आग्रह नाहीं ह्या विधानाचें समर्थन करण्याकरितां ) ही परिभाषा सांगतात:—

### यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम् ॥ ४७ ॥

"( दोन कार्यें युगपत् प्राप्त झालीं असतां, ) एखाद्या भिन्न सूत्रानें ज्या कार्याचें निमित्त नष्ट होतें तें कार्य एवढ्याचमुळें अनित्य समजूं नये."

(ग्रन्थकारानें ह्या परिभाषेचें उदाहरण दिलें नाहीं. ह्या परिभाषेचा अर्थ नीट लक्षांत यावा ह्मणून खालीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. पहिलें उदाहरण 'ऊढ' असें आहे. 'वह्+क्त' अशा स्थितींत, 'हो ढः' सू. ३२४ ह्या सूत्रानें 'वह्' ह्यांतील 'ह्' चा 'ढ्' झाल्यावर 'झषस्तथोर्धोऽधः' सू. २२८० ह्यानें क्त प्रत्ययांतील तकाराचा धकार होतो, व 'ष्टुना ष्टुः' यानें ध चा ढ होतो, व 'ढो ढे लोपः' सू. २३३५ ह्या सूत्रानें पूर्व 'ढ' चा लोप होऊन 'वढ' अशी स्थिति प्राप्त झाली असतां 'वचिस्वपियजादीनां किति' सू. २४०९ व 'सहिवहोरोदवर्णस्य' सू. २३५७ ह्या दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति होते. 'वचिस्वपि' ह्या सूत्रानें पावलेलें संप्रसारण कार्य नित्य आहे; कारण ओत्व करण्यापूर्वी 'वढ' ह्या स्थितींत तें होणारच, व ओत्व केल्यावर 'वोढ' ह्या स्थितींत देखील तें होणारच. तसेंच 'सहिवहोः' ह्या सूत्रानें सांगितलेलें ओत्व कार्यहि नित्य आहे. कारण संप्रसारण केलें तरी 'उ+अढ' अशा स्थितींत अकाराला ओत्व पावतेंच, संप्रसारण न केलें तरी 'व्+अढ' अशा स्थितींतहि ओत्व पावतेंच. तथापि प्रथम संप्रसारण करून, 'संप्रसारणाच्च' सू० ३३० हें सूत्रान्तर लावल्यास, ओत्व कार्य होण्याचें निमित्त–म्हणजे ज्याचा 'ओ' करणें आहे तो 'अ' नष्ट होतो. असें आहे तरी, ह्या परिभाषेमुळें, ओत्वकार्य अनित्य मानूं नये. सारांश संप्रसारण कार्य व ओत्व कार्य हीं दोन्हीं कार्यें नित्य समजावीं. पण ओत्व विधायक 'सहिवहोः' हें सूत्र परसूत्र असल्यामुळें, प्रथम ओत्व करावें. म्हणजे 'व्+अढ=व्+ओढ' असें होतें. नंतर संप्रसारण करावें म्हणजे 'उ+ओढ' असें होतें; मग 'संप्रसारणाच्च' सू. ३३० ह्या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'उढ' असें झाल्यावर, 'ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः' सू० १७४ ह्या सूत्रानें 'ऊढ' असें रूप सिद्ध होतें. ह्या परिभाषेचें दुसरें उदाहरण 'त्वापयति' हें आहे. 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' ह्या गणसूत्रानें 'युष्मद्' ह्या प्रातिपदिकास 'णिच्' केल्यास, 'मपर्यन्तस्य' सू. ३८३ व 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' सू. १६७३ ह्या सूत्रांनीं 'त्व+अद्+णिच्' अशी स्थिति झाल्यावर, 'टेः' सू. १७८६ व 'अतो गुणे' सू० १९१ हीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात. त्यापैकीं टिलोपकार्य

नित्य आहे; कारण 'अतो गुणे' ह्यानें पररूप एकादेश केला अथवा न केला तरी 'त्वद्' किंवा 'त्व+अद्' अशा दोन्हीं स्थितींत टिलोप होणारच. पण 'टिलोप' प्रथम केल्यास 'त्व' अशा स्थितींत 'अतो गुणे' हें सूत्र प्रवृत्तच होऊं शकत नाहीं. म्हणून तें अनित्य आहे; परंतु 'अतो गुणे' ह्या सूत्रानें प्रथम पररूप एकादेश करून 'त्व+अद्=त्वद्' असें रूप केल्यावर, 'प्रकृत्यैकाच्' सू. २०१० ह्या सूत्रान्तराची प्रवृत्ति होऊन जरी टिलोप बाधित होतो तरी, ह्या परिभाषेमुळें, टिलोपाचें नित्यत्व; टिलोपाचें निमित्त —म्हणजे प्रकृतीचें 'अनेकाच्त्व'—नष्ट झालें आहे एवढ्यामुळें, नष्ट होत नाहीं. म्हणून टिलोप प्रथम होतो व 'त्व+अद्=त्व+०' असें झाल्यावर 'अचो ञ्णिति' सू० २५४ ह्या सूत्रानें वृद्धि होऊन 'त्वा' असें झाल्यानंतर, 'अर्तिह्री' सू० २५७० ह्या सूत्रानें पुगागम होऊन 'त्वाप्+इ+अ+ति=त्वापि+अ+ति=त्वापे+अति=त्वापयति' असें रूप सिद्ध होतें.)

---

# परिभाषा ४८

क्वचित्तु बाधकाबाधितफलोपहितप्रसङ्ग एव गृह्यते । तदाह—

(इष्टरूपसिद्धि करण्याकरितां, लक्ष्यानुसार) कोठें कोठें बाधकसूत्रानें फल उत्पन्न करण्याची शक्ति नष्ट झाल्यास बाध्यसूत्राचें नित्यत्व कायम राहत नाहीं हें दर्शविण्याकरितां ही परिभाषा सांगतात.:—

## यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते तदप्यनित्यम् ॥ ४८ ॥

"(दोन कार्यें युगपत् प्राप्त झालीं असतां) भिन्नसूत्रानें ज्या कार्याचें निमित्त नष्ट होतें त्या कार्याला (कोठें कोठें लक्ष्यानुसार) अनित्य देखील मानतात."

**सप्तमे कैयटेनैतदुपष्टम्भकं लोकव्यवहारद्वयमुदाहृतम् । वालिसुग्रीवयोर्युध्यमानयोर्भगवता वालिनि हतेऽपि सुग्रीवस्य वालितः प्राबल्यं न व्यवहरन्ति । भगवत्सहायैः पाण्डवैर्जये लब्धेऽपि पाण्डवानां प्राबल्यं व्यवहरन्ति चेति । सर्वं चेदं लक्ष्यानुरोधाद्व्यवस्थितम् ॥ ४८ ॥**

सप्तमाध्यायांत ('स्वमोर्नपुंसकात्' ७–१–२३ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत ४७ व ४८ ह्या दोन परस्परविरुद्ध) परिभाषांच्या समर्थनार्थ कैयटानें दोन लौकिक दृष्टान्ताचीं उदाहरणें दिलीं आहेत. वाली व सुग्रीव यांचें युद्ध चालू असतांना, भगवान् श्रीरामचंद्रानें वालीचा प्राण घेतला, तथापि सुग्रीव वालीपेक्षां जास्त प्रबल होता असें लोक ह्मणत नाहींत; परंतु भगवान् श्रीकृष्णाच्या सहाय्यामुळेंच पांडवांना (भारतीय युद्धांत) जय मिळाला तरी पांडव (कौरवांपेक्षां) जास्त प्रबल होते असें लोक ह्मणतात. (जसे हे दोन परस्परविरुद्ध लोकव्यवहार प्रचलित आहेत त्याचप्रमाणें

४७ व ४८ ह्या परस्परविरुद्ध दोन परिभाषा व्याकरणशास्त्रांत प्रचलित आहेत व त्या लौकिकन्यायसिद्ध आहेत). वरील परस्परविरुद्ध परिभाषा लक्ष्यानुसार-ह्मणजे इष्टरूपाची सिद्धि करण्याकरितां-उपयोगांत आणून त्यांची व्यवस्था लावावी. ( ह्या परिभाषेचें उदाहरण तत्त्वप्रकाशिकेंत 'स्योन' हें दिलें आहे. 'सिव्' धातूला उणादि 'न' प्रत्यय लावल्यास, 'सिव्+न' अशा स्थितींत, 'च्छ्वोः शूठ्' सू. २५६१ व 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ ह्या दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति होते. ह्या दोन कार्यांपैकीं, 'ऊठ्' कार्य नित्य आहे; कारण प्रथम गुण केला तरी 'सेव्+न' अशा स्थितींत व गुण न केला तरी 'सिव्+न' अशा स्थितींत 'ऊठ्' होणारच. पण गुणकार्य अनित्य आहे; कारण 'ऊठ्' प्रथम केल्यास 'सि+ऊ+न' अशा स्थितींत 'इको यणचि' सू. ४७ ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊन 'स्यू+न' असें झालें असतां, गुण यण्कार्यानें बाधित झाल्यामुळें-ह्मणजे ज्याला गुण व्हावयाचा तो 'सिव्' ह्यांतील इकार नष्ट झाल्यामुळें-गुणकार्य ह्या परिभाषेप्रमाणें अनित्य ठरतें. ह्मणून 'ऊठ्' कार्य प्रथम करावें. तें प्रथम केल्यास 'सिव्+न=सि+ऊ+न=स्यू+न' असें झाल्यानंतर 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें गुण होऊन 'स्योन' असें रूप सिद्ध होतें ).

---

## परिभाषा ४९

लुटः प्रथमस्येति सूत्रे भाष्ये इति पठ्यते ॥

'लुटः प्रथमस्य' २-४-८५ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे-

### स्वरभिन्नस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति ॥ ४९ ॥

"( एखाद्या स्थलीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त झाल्यावर, त्यापैकीं एक सूत्र प्रथम ) ज्या स्वरयुक्त शब्दस्वरूपास लागू पडतें त्याहून भिन्नस्वरयुक्त शब्दस्वरूपास तें सूत्र ( दुसऱ्या सूत्रानें कार्य केल्यानंतर ) लागू पडत असल्यास त्या सूत्रानें होणारें कार्य अनित्य समजावें."

( परिभाषा ४३ प्रमाणेंच ही परिभाषा आहे व या परिभाषेवरून हें स्पष्ट होतें कीं स्वरांत बदल झाल्यास शब्दाला भिन्न स्वरूप प्राप्त होतें. म्हणूनच 'स्वरोऽपि शब्दान्तरत्वसम्पादकः' असें भैरवींत म्हटलें आहे. या परिभाषेचें उदाहरण ग्रन्थकारानें मुळींच दिले नाहीं. तथापि भाष्यांत 'कुमार्यै' हें उदाहरण दिलें आहे व भैरवींत 'दध्योदकम्' हें उदाहरण दिलें आहे 'कुमारी+ङे(ए)' अशा स्थितींत 'इको यणचि' सू० ४७ या सूत्रानें यणादेश केल्यावर 'कुमार्य्+ए' अशी स्थिति झाली असतां, 'आण्नद्याः' सू० २६८ या सूत्रानें 'ङे=ए' या प्रत्ययास आट् आगम पावला आहे व तसेंच 'उदात्तयणो हल्पूर्वात्' सू० ३७२० या सूत्रानें 'ए' या प्रत्ययाला उदात्त स्वर पावला आहे. येथें आट् आगम प्रथम करावा कीं उदात्तस्वर प्रथम करावा?

दोन्हीं कार्यें, एक केलें तरी दुसरें होणारच अशीं असल्यामुळें, कृताकृतप्रसङ्गि आहेत; 'पण आट् आगम प्रथम केल्यास, ' आटश्च ' सू० २६९ या सूत्रानें वृद्धि झाल्यावर ' ऐ ' ला उदात्तस्वर होईल; आडागम न केल्यास, ' ए ' ला उदात्तस्वर होईल. म्हणून परिभाषा ४३ प्रमाणें उदात्तस्वरकार्य अनित्य ठरतें. तसेंच ' उदात्तयणो हल्पूर्वात् ' या सूत्रानें उदात्तस्वर प्रथम केल्यास, उदात्त ' ए ' ला आडागम पावतो; पण उदात्तस्वर न करितां आडागम केल्यास, तो आडागम 'अनुदात्तौ सुप्पितौ' सू० ३७०९ या सूत्रान्वयें मूळचय अनुदात्त असणाऱ्या ' ए ' प्रत्ययाला होईल. म्हणून तो प्रकृत परिभाषेप्रमाणें अनित्य ठरतो. सारांश, आडागम व उदात्तस्वर होणें हीं दोन्हीं कार्यें अनित्य ठरत असल्यामुळें व ' आण्नद्याः ' हें परसूत्र असल्यामुळें, आडागम प्रथम करावा असें भाष्यांत सांगितलें आहे. आतां आपण ' दध्युदकम् ' हें उदाहरण घेऊं. ' नब्विषयस्यानिसन्तस्य ' फिट् सू० २६ या सूत्रान्वयें ' दधि ' हा नपुंसकलिंगी शब्द आद्युदात्त आहे; व त्यामुळें ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' सू० ३६५० या सूत्रान्वयें 'दधि' यांतील अन्त्य इकार अनुदात्त आहे. या शब्दाचा ' उदकम् ' या शब्दाशीं समास करून सामासिक शब्द तयार करतेवेळीं ' दधि+उदकम् ' अशी स्थिति झाली असतां ' इको यणचि ' सू० ४७ या सूत्रानें यणादेश व ' उदकेऽकेवले ' सू० ३८३० या सूत्रानें समासांतील पूर्वपदाला—म्हणजे ' दधि ' या पदाला—अन्तोदात्तत्व होणें, या दोन कार्यांची युगपत् प्राप्ति होते. यणादेश कृताकृतप्रसङ्गि आहे—म्हणजे ' उदकेऽकेवले ' या सूत्रानें प्रथम कार्य केलें किंवा मागून कार्य केलें तरी होणारा आहे. तथापि यणादेश प्रथम केल्यास, ' दधि ' यांतील अनुदात्त इकारास यणादेश पावतो, व ' उदकेऽकेवले ' या सूत्रानें प्रथम कार्य केल्यास, स्वरभिन्न इकारास—म्हणजे उदात्त इकारास—यणादेश पावतो. म्हणून तो या परिभाषेप्रमाणें अनित्य ठरतो. त्यामुळें ' उदकेऽकेवले ' हें परसूत्र प्रथम प्रवृत्त होतें, व उदात्त इकाराचे जागीं यणादेश झाल्यामुळें पुढील उकार ' उदात्तस्वरितयोर्यणः ' सू० ३६५७ या सूत्रान्वयें स्वरित होतो.)

**यत्र त्वेकस्यैव कार्यस्य परत्वं नित्यत्वं च तत्रेच्छयान्यतरत्तदुभयं वा तस्य बलवत्वे नियामकमुल्लेख्यम् । अत एव तत्र तत्र परत्वान्नित्यत्वाच्चेति भाष्ये उच्यते । वस्तुतस्तत्र परत्वादित्युक्तिरेकदेशिनः । स्पष्टं चेदं विप्रतिषेधसूत्रे कैयटे ।**

जर एखादें कार्य ( परसूत्रानें सांगितलें असल्यामुळें ) पर असून नित्यहि आहे तर तशा स्थितींत इच्छेनुसार त्या कार्याचें परत्व अथवा नित्यत्व हें एकच कारण, किंवा परत्व व नित्यत्व हीं दोन्हीं कारणें, तें कार्य बलवत्तर आहे हें सांगण्याकरितां, दर्शविलीं जातात. म्हणूनच भाष्यांत ठिकठिकाणीं ' पर व तसेंच नित्य असल्यामुळें ' ( अमुक कार्य बलवत्तर ठरतें ) असा प्रयोग आढळतो. वास्तविक तशा ठिकाणीं ' परत्वात् ' ही ( सिद्धान्तीची उक्ति नसून ) एकदेशीची उक्ति आहे असें समजावें.(कारण एक सूत्रानें

सांगितलेलें कार्य नित्य व दुसऱ्या सूत्रानें सांगितलेलें कार्य अनित्य असल्यास दोन्हीं तुल्यबल ठरत नसल्यामुळें, तशा ठिकाणीं ‘ विप्रतिषेधे परं कार्यम् ’ हें सूत्र लागू पडत नाहीं. म्हणून तशा ठिकाणीं ‘ परत्वात् ’ हा हेतु देणें बरोबर नाहीं. ‘ नित्यत्वात् ’ एवढाच हेतु देणें बरोबर आहे.) ‘विप्रतिषेधे परं कार्यम् ’ १–४–२ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें हें स्पष्ट सांगितलें आहे ( व असें म्हटलें आहे कीं, ‘ कार्यम् ’ येथें अर्हार्थे कृत्यप्रत्यय झाला असल्यामुळें ‘ कार्यम् ’ या शब्दाचा अर्थ ‘ करणार्हम् ’ असा होतो, व दोन तुल्यबलशास्त्रेंच करणार्ह ठरतात. त्यामुळें जेथें एक सूत्र नित्यकार्य करणारें व दुसरें अनित्यकार्य करणारें आहे, किंवा जेथें एक सूत्र सामान्यशास्त्र असून दुसरें सूत्र अपवादशास्त्र आहे, किंवा जेथें एक सूत्र अन्तरङ्गकार्य करणारें असून दुसरें सूत्र बहिरङ्गकार्य करणारें आहे तशा ठिकाणीं दोन्हीं सूत्रें तुल्यबल नसल्यामुळें—म्हणजे एक प्रबल व दुसरें दुर्बल असल्यामुळें–विप्रतिषेधन्याय लागू पडत नाहीं. )

**णौ चङीति ह्रस्वापेक्षया नित्यत्वान्तरङ्गत्वप्रयुक्तद्वित्वस्य प्रथमतः प्रवृत्तौ नित्यत्वादित्येव भाष्य उक्तम् ।**

‘ णौ चङि ’ ७-४-१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं उपधाऱ्हस्वकार्यापेक्षां (‘चङि’ या सूत्रानें होणारें) द्वित्वकार्य नित्य व अन्तरङ्ग असूनहि त्या द्वित्वकार्याच्या प्रथमप्रवृत्तीचें कारण ( ‘ नित्यत्वादन्तरङ्गत्वाच्च ’ किंवा ‘ अन्तरङ्गत्वात् ’ असें न देतां ) ‘नित्यत्वात्’ एवढेंच दिलें आहे. (‘अट्+णिच्+चङ्’ अशा स्थितींत, ‘अत उपधायाः’ सू० २२८२ या सूत्रानें उपधेंतील अकारास वृद्धि होऊन ‘ आट् +णिच्+चङ् ’ अशी स्थिति झाली असतां, ‘चङि’ सू० २३१५ या सूत्रानें द्वित्वकार्य व ‘णौ चङि उपधाया ऱ्हस्वः ’ सू० २३१४ या सूत्रानें उपधाऱ्हस्व होणें हीं दोन कार्यें युगपत् प्राप्त होतात. तेव्हां द्वित्व प्रथम करावें कीं उपधाऱ्हस्व प्रथम करावा? उपधाऱ्हस्व प्रथम केला किंवा न केला तरी द्वित्व होणारच, म्हणून द्वित्वकार्य कृताकृतप्रसङ्गि असल्यामुळें नित्य आहे. द्वित्व प्रथम केल्यास उपधाऱ्हस्व पावतच नाहीं. म्हणून उपधाऱ्हस्वकार्य अनित्य आहे. तसेंच द्वित्वकार्य केवळ चङ्निमित्तामुळें होणारें असून उपधाऱ्हस्वकार्याला णिच् व चङ् या दोन निमित्तांची गरज आहे, म्हणून उपधाऱ्हस्वकार्याच्या अपेक्षेनें द्वित्वकार्य अन्तरङ्ग ठरतें. सारांश द्वित्वकार्य नित्य असून अन्तरङ्ग देखील आहे, म्हणून द्वित्वकार्य प्रथम प्रवृत्त होतें. पण भाष्यकारांनीं द्वित्वकार्याची प्रथम प्रवृत्ति होण्याकरितां ‘ नित्यत्वात् ’ एवढाच हेतु दिला आहे, ‘ अन्तरङ्गत्वात् ’ हा हेतु बलवत्तर असून देखील तो दिला नाहीं. याचें कारण हें कीं जें निमित्त–म्हणजे कारण–प्रथम उपस्थित होतें तेवढेंच कारण देखील एखादें कार्य बलवत्तर आहे हें सांगण्यास पुरें आहे. म्हणूनच भैरवींत म्हटलें आहे कीं, ‘ यद्यप्युभयं बलवत्वप्रयोजकं भवति तथापि प्रथमोपस्थितत्यागो नोचित इत्याशयेन नित्यत्वादित्येवोक्तमिति भावः ’ )

**एवं नित्यान्तरङ्गयोर्बलवत्वमपि यौगपद्यासम्भव एवेति बोध्यम् ॥ ४९ ॥**

याचप्रमाणें नित्यकार्य सांगणारें सूत्र व अन्तरङ्गकार्य सांगणारें सूत्र हीं सूत्रें पर-सूत्र व नित्यसूत्र यांच्यापेक्षां अनुक्रमें तेव्हांच बलवत्तर समजावीं कीं, जेव्हां तशीं दोन सूत्रें एखाद्या उदाहरणांत युगपत् प्राप्त झालीं असतां तीं सूत्रें आपापलीं कार्यें एकेचवेळीं करूं शकत नाहींत.

---

# परिभाषा ५०

नित्यादप्यन्तरङ्गं बलीयोऽन्तरङ्गे बहिरङ्गस्यासिद्धत्वात् । तदाह—

नित्यकार्य सांगणाऱ्या सूत्रापेक्षां देखील अन्तरङ्गकार्य सांगणारें सूत्र बलवत्तर असतें; कारण अन्तरङ्गकार्याच्या दृष्टीनें बहिरङ्गकार्य ( अन्तरङ्गकार्य अनित्य असून व बहिरङ्गकार्य नित्य असून देखील ) असिद्ध—म्हणजे नाहींच—असें समजलें जातें. या अर्थाची ही परिभाषा सांगतातः—

## असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ ५० ॥

"अन्तरङ्गकार्य सांगणाऱ्या सूत्राच्या दृष्टीनें बहिरङ्गकार्य सांगणारें सूत्र असिद्ध ठरतें ( म्हणजे बहिरङ्गकार्य पूर्वीं झालें असल्यास तें झालेंच नाहीं असें समजून अन्तरङ्गकार्य होतें, किंवा दोन्हीं प्रकारचीं कार्यें एकाच स्थलीं युगपत् प्राप्त झालीं असल्यास अन्तरङ्गकार्य प्रथम होतें. )"

अन्तर्मध्ये बहिरङ्गशास्त्रीयनिमित्तसमुदायमध्येऽन्तर्भूतान्यङ्गानि निमित्तानि यस्य तदन्तरङ्गम् । एवं तदीयनिमित्तसमुदायाद्बहिर्भूताङ्गकं बहिरङ्गम् । एतच्च खरवसानयोरिति सूत्रेऽसिद्धवत्सूत्रे च भाष्यकैयटयोः स्पष्टम् ।

( आतां ग्रन्थकार अन्तरङ्ग व बहिरङ्ग या दोन शब्दांचा अर्थ सांगतात. हे दोन्ही शब्द अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि समास होऊन बनलेले आहेत, व या ठिकाणीं 'शास्त्र' हा अन्य पदार्थ आहे. ) 'अन्तः' या शब्दाचा अर्थ 'मध्ये' असा आहे. बहिरङ्गशास्त्र प्रवृत्त होण्याकरितां ज्या निमित्तसमुदायाची अपेक्षा आहे त्या निमित्तसमुदायामध्यें ज्याचीं निमित्तें अन्तर्भूत आहेत तें अन्तरङ्ग होय. त्याचप्रमाणें अन्तरङ्गशास्त्राची प्रवृत्ति होण्याकरितां ज्या निमित्तसमुदायाची अपेक्षा आहे त्याच्या बाहेर किंवा पलीकडे ज्याचें निमित्त आहे तें बहिरङ्ग होय. 'खरवसानयोः' ८-३-१५ व 'असिद्धवदत्राभात्' ६-४-२२ या दोन सूत्रावरील भाष्यांत व कैयटाच्या टीकेंत हें स्पष्टपणें सांगितलें आहे.

अत्राङ्गशब्देन शब्दरूपं निमित्तमेव गृह्यते शब्दशास्त्रे तस्यैव प्रधानत्वात् । तेनार्थनिमित्तकस्य न बहिरङ्गत्वम् । अत एव न तिसृचतसृ इति

**निषेधश्चरितार्थः । अन्यथा स्त्रीत्वरूपार्थनिमित्तकतिस्रपेक्षयान्तरङ्गत्वात् त्रयादेशे तदसङ्गतिः स्पष्टैव । अत एव त्रयादेशे स्रन्तस्य प्रतिषेध इति स्थानिवत्सूत्रस्थभाष्यवार्तिकादि सङ्गच्छते ॥**

येथें ( अन्तरङ्ग व बहिरङ्ग या शब्दांतील ) ' अङ्ग ' शब्दाचा अर्थ ' शब्दरूप-निमित्त ' असाच केला पाहिजे; कारण व्याकरणशास्त्रांत शब्दस्वरूपालाच प्राधान्य आहे. ( येथें शब्दरूपनिमित्त म्हणजे वर्णरूप किंवा वर्णसमुदायरूपनिमित्त जें सूत्रांत पञ्चमी किंवा सप्तमी विभक्तींत निर्दिष्ट केलें असतें तेंच समजावें. जसें ' इको यणचि ' या सूत्रांत यणादेश होण्याचें निमित्त ' अच् ' हा वर्ण सप्तमीविभक्तींत निर्दिष्ट केला आहे. तसेंच ' एङ्ह्रस्वात्संबुद्धेः ' सू० १९३ या सूत्रांत संबुद्धिलोप होण्याचें शब्दरूप-निमित्त पञ्चमीविभक्तींत निर्दिष्ट केलें आहे. सारांश, ' अङ्ग ' या शब्दाचा ' शब्दरूप-निमित्त ' एवढाच अर्थ केला असल्यामुळें, ) अर्थरूपनिमित्तामुळें बहिरङ्गत्व येत नाहीं, आणि त्यामुळेंच ' न तिसृचतसृ ' सू० ३०० हें निषेधसूत्र चरितार्थ ठरतें. अर्थरूपनि-मित्तामुळें बहिरङ्गत्व येत असतें तर स्त्रीत्वरूपी अर्थाच्या निमित्तामुळें ' त्रि ' चे जागीं होणाऱ्या ' तिसृ ' या आदेशाच्या अपेक्षेनें ' त्रय ' हा आदेश अन्तरङ्ग ठरून तो प्रथम झालाच असता, व ' न तिसृचतसृ ' हें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. ( ' त्रेस्त्रयः ' सू० २६४ या सूत्रान्वयें ' त्रि ' या शब्दापुढें ' आम् ' हा षष्ठीच्या बहु-वचनाचा प्रत्यय आला असतां ' त्रि ' चे जागीं ' त्रय ' असा आदेश होतो. ' त्रिच-तुरोः स्त्रियां तिसृचतसृ ' सू. २९८ या सूत्रान्वयें स्त्रीवाचक ' त्रि ' शब्दापुढें कोणताहि विभक्तिप्रत्यय आला असतां त्या ' त्रि ' चे जागीं ' तिसृ ' असा आदेश होतो. ' नामि ' सू. २०९ या सूत्रान्वयें ' नाम् ' हा प्रत्यय पुढें असतां अजन्त अङ्गाचा अन्त्य स्वर दीर्घ होतो असें सांगितलें आहे, व त्याचा निषेध करणारें ' न तिसृचतसृ ' सू० ३०० हें सूत्र आहे, व या सूत्रान्वयें ' नाम् ' प्रत्यय पुढें आला असतां ' तिसृ ' व ' चतसृ ' यांतील अन्त्य स्वर दीर्घ होत नाहीं. आतां स्त्रीवाचक ' त्रि ' या शब्दापुढें ' आम् ' प्रत्यय आला असतां, ' त्रि+आम् ' अशा स्थितींत, 'त्रेस्त्रयः' व ' त्रिचतुरोः ' या दोन्ही सूत्रांची युगपत् प्राप्ति होते. ' त्रि ' चे जागीं त्रयादेश होण्याकरितां ' आम् ' प्रत्यय पुढें असणें एवढ्या एकाच निमित्ताची गरज आहे. पण ' त्रि ' चे जागीं ' तिसृ ' हा आदेश होण्या-करितां दोन निमित्तांची गरज आहे—म्हणजे ( १ ) ' त्रि ' शब्द स्त्रीवाचक असला पाहि-जे, व ( २ ) त्या शब्दापुढें विभक्तिप्रत्यय असला पाहिजे. ' अर्थ ' हें निमित्त एखाद्या सूत्रानें सांगितलेलें कार्य बहिरङ्ग ठरविण्यास कारणीभूत होतें असें मानल्यास, ' त्रि ' चे जागीं होणारा ' तिसृ ' हा आदेश हें बहिरङ्गकार्य ठरतें, कारण त्याला दोन निमि-त्तांची अपेक्षा आहे; व ' त्रि ' चे जागीं त्रयादेश होण्याकरितां एकच निमित्ताची अपे-क्षा असल्यामुळें त्रयादेश अन्तरङ्ग ठरतो, व प्रकृत परिभाषेप्रमाणें त्रयादेशच झाला पाहिजे व ' तिसृ ' हा आदेश पावतच नाहीं. सारांश, ' तिसृ ' हा आदेश बहिरङ्ग ठरत अस-

त्यामुळें जर तो आदेश केव्हांहि 'त्रि' चे जागीं होणें शक्य नाहीं तर मग ' तिसृ ' च्या पुढें 'नाम्' प्रत्यय आला असतां त्यांतील अन्त्य स्वर दीर्घ होऊं नये या अर्थाचें 'न तिसृचतसृ' असें निषेधसूत्र करण्याची काय गरज होती? पण ज्याअर्थीं पाणिनीनें हें निषेधसूत्र मुद्दाम केलें आहे त्यावरून हें सिद्ध होतें कीं कोणतेंहि कार्य बहिरङ्ग ठरविण्यास 'अर्थ' हें निमित्त कारणीभूत होत नाहीं. त्यामुळें जसा त्रयादेश होण्यास एकच निमित्ताची-म्हणजे ' आम् ' प्रत्यय पुढें असण्याची–गरज आहे त्याचप्रमाणें ' तिसृ ' हा आदेश होण्यास एकच निमित्ताची–म्हणजे कोणता तरी विभक्तिप्रत्यय पुढें असण्याची–गरज आहे असें सिद्ध होतें; व दोन्हीं कार्यें समाननिमित्तक असल्यामुळें एक कार्य अन्तरङ्ग व दुसरें बहिरङ्ग मानतां येत नाहीं. पण ' त्रिचतुरोः ' हें परसूत्र असल्यामुळें, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायान्वयें तें सूत्र प्रवृत्त होऊन वरील उदाहरणांत त्रयादेश न होतां ' तिसृ ' असाच आदेश होतो, व तो आदेश झाला असतां, 'नामि' या सूत्रानें 'तिसृ' यांतील अन्त्यस्वर दीर्घ होऊं नये म्हणून मुद्दाम केलेलें ' न तिसृचतसृ ' हें निषेधसूत्र चरितार्थ ठरतें. ) असें आहे म्हणूनच ' त्रयादेशे स्रन्तप्रतिषेधः ' असें जें वार्तिक ' स्थानिवदादेशः ' १-१-५६ या सूत्रावरील भाष्यांत पठित केलें आहे ( व त्या वार्त्तिकाचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकारांनीं जें म्हटलें आहे ) तें बरोबर जुळतें. ( वरील वार्त्तिकाचा अर्थ असा आहे कीं, ' सृ ' आहे अन्तीं ज्याच्या अशा ' तिसृ ' या आदेशाचें ठिकाणीं त्रयादेश करण्याचा प्रसंग आला असतां, तो ' तिसृ ' आदेश ' त्रि ' च आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करूं नये–म्हणजे अशा ठिकाणीं स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे. तसा निषेध करण्याचें कारण हें कीं ' तिसृ ' हा आदेश ' त्रि ' च आहे असें स्थानिवद्भावानें मानल्यास, ' त्रेस्त्रयः ' या सूत्रानें ' तिसृ ' चे जागीं त्रयादेश होण्याची आपत्ति आली असती. ती टाळण्याकरितां वरील वार्त्तिक मुद्दाम केलें आहे. जर अर्थरूप निमित्तामुळें ' तिसृ ' हा आदेश बहिरङ्ग व असिद्ध ठरत असता तर तसें वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती. पण तें वार्त्तिक केल्यामुळें हें सिद्ध होतें कीं, अर्थरूप निमित्तामुळें बहिरङ्गत्व येत नसतें. भाष्यकारांनीं या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे हें खरें आहे, पण तसें प्रत्याख्यान करतेवेळीं भाष्यकारांनीं असें मुळींच म्हटलें नाहीं कीं, ' तिसृ ' हा आदेश अर्थरूपनिमित्तामुळें बहिरङ्ग व असिद्ध ठरत असल्यामुळें, तसें वार्त्तिक करण्याची गरज नव्हती. उलट ' त्रि ' चे जागीं झालेला ' तिसृ ' हा आदेश बहिरङ्ग नाहीं असें मानूनच भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, ' त्रिचतुरोः ' हें परसूत्र असल्यामुळें, विप्रतिषेधन्यायान्वयें त्रयादेशाचा बाध करून ' तिसृ ' असा आदेश झाल्यावर ' सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव ' प ४० या परिभाषेप्रमाणें ज्या त्रयादेशाचा एकदां बाध झाला तो नेहमीकरितां झाला असल्यामुळें, वरील उदाहरणांत त्रयादेश होऊंच शकत नाहीं, आणि म्हणून तो न व्हावा याकरितां वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती. ' प्राप्तस्यैव निषेधः ' या न्यायान्वयें जें प्राप्त आहे त्याचाच निषेध करणें आवश्यक आहे. पण जें प्राप्तच नाहीं तें होऊं नये हें सांगण्याकरितां

वार्त्तिक करण्याची गरज काय ? सारांश, वरील वार्त्तिक व भाष्य या दोहोंवरून हें स्पष्ट होतें कीं, अर्थरूपनिमित्त एखाद्या कार्यास बहिरङ्ग ठरविण्यास कारण मानतां येत नाहीं.)

**एतेन गौधेरः पचेदित्यादावेयादीनामङ्गसंज्ञासापेक्षत्वेन बहिरङ्गतयाऽसिद्धत्वाद्वलि लोपो न स्यादिति परास्तम् । एयादेशादेरपरनिमित्तकत्वेनान्तरङ्गत्वाच्च ॥**

( शब्दरूपनिमित्तच कोणत्याहि कार्याचें बहिरङ्गत्व ठरविण्यास कारणीभूत होत असल्यामुळें, कोणतेंहि कार्य बहिरङ्ग आहे असें ठरवितांना इतर कोणत्याहि प्रकारच्या निमित्ताचा आश्रय करितां येत नाहीं ) म्हणूनच ' गौधेरः ' ' पचेत् ' इत्यादि स्थलीं अङ्गसंज्ञानिमित्तामुळें झालेले एयादि आदेश बहिरङ्ग व असिद्ध ठरत असल्यामुळें, 'वल्' प्रत्याहारांतील वर्ण पुढें आला असतां देखील यकाराचा लोप न होण्याची आपत्ति येईल असें जें कित्येक वैयाकरण म्हणतात तें म्हणणें चूक ठरतें. ( ' गोधायाः अपत्यं गौधेरः ' येथें ' गोधायाः ढ्रक् ' सू. ११३५ या सूत्रानें ' गोधा ' याला अपत्यार्थी ' ढ्रक् ' प्रत्यय होऊन, व ' किति च ' सू० १०७६ या सूत्रानें ' गोधा ' यांतील आद्यच् ' ओ ' याची वृद्धि होऊन, व ' आयनेयीनीयियः ' सू० ४७५ या सूत्रानें ' ढ्रक् ' प्रत्ययाचा आदि जो ' ढ् ' त्याचे जागीं ' एय् ' असा आदेश होऊन, 'गौधा+एय्+र्+अक्' अशी स्थिति झाली असतां, ' यस्येति च ' सू० ३११ या सूत्रानें आकारलोप होऊन, ' गौध्+एय्+र्+अक् ' अशा स्थितींत ' य् ' च्या पुढें वल्प्रत्याहारांतील ' र् ' हा वर्ण आल्यामुळें, ' लोपो व्योर्वलि ' सू० ८७३ या सूत्रानें ' य् ' चा लोप होऊन ' गौधेरः ' असें रूप झालें आहे. त्याचप्रमाणें ' पच्+विधिलिङ्=पच्+शप्+यासुट्+त् ' या स्थलीं ' यासुट् परस्मैपदेषु ' सू० २२०९ या सूत्रानें प्रत्ययास ' यासुट् ' आगम होऊन, व ' लिङः स लोपोऽनन्त्यस्य ' सू० २२११ या सूत्रानें ' यासुट्=यास् ' यांतील सकाराचा लोप होऊन, आणि ' अतो येयः ' सू० २२१२ या सूत्रानें ' यासुट् ' यांतील बाकी राहिलेल्या 'या' चे जागीं 'इय्' असा आदेश होऊन ' पच्+अ+इय्+त् ' अशी स्थिति झाली असतां, 'लोपो व्योर्वलि' सू० ८७३ या सूत्रानें, यकारापुढें वल्प्रत्याहारांतील 'त्' हा वर्ण असल्यामुळें, ' य् ' लोप होऊन ' पचेत् ' असें रूप सिद्ध होतें. वरील उदाहरणांत ' आयनेयी ' व 'अतो येयः' हीं जीं दोन सूत्रें लावून ' ढ् ' चे जागीं ' एय् ' व ' या ' चे जागीं ' इय् ' आदेश केले आहेत तीं दोन्हीं सूत्रें अङ्गाधिकारांतील सूत्रें आहेत व ' अङ्गस्य ' हें पद त्यांत अनुवृत्त आहे. म्हणून ' आयनेयी ' या सूत्राचा ' अङ्गस्य=अङ्गसम्बन्धिनां प्रत्ययादिनां फढखछघामायनेयीनीयियः ' असा अर्थ होतो—म्हणजे अङ्गापुढें फ्, ढ्, ख्, छ्, घ्, आले असल्यास व ते प्रत्ययाचे आदिवर्ण असल्यास त्यांचे जागीं अनुक्रमें आयन्, एय्, ईन् ईय् व इय् असे आदेश करावे. सारांश ' ढ् ' चे जागीं ' एय् ' असा आदेश होण्याकरितां अङ्गसंज्ञा व प्रत्ययसंज्ञा या दोन संज्ञांची गरज आहे, व ' य् ' लोप होण्याकरितां वल्प्रत्याहारांतील वर्ण पुढें असणें एवढ्याच निमि-

त्ताची गरज आहे. म्हणून 'यू' लोपाच्या अपेक्षेनें एयादेश बहिरङ्ग ठरतो. तसेंच 'अतो येयः' या सूत्राचा 'अतः परस्य सार्वधातुकावयवस्य या इत्यस्य इय् स्यात्' असा अर्थ असल्यामुळें, 'या' चे जागीं इयादेश होण्याकरितां तो 'या' अदन्त अङ्गापुढें असून सार्वधातुकप्रत्ययाचा आगमरूपानें अवयव असला पाहिजे. सारांश 'या' चे जागीं इयादेश होण्याकरितां अदन्ताङ्गसंज्ञा, सार्वधातुकसंज्ञा, व यासुट्संज्ञा या तीन संज्ञांची गरज असल्यामुळें, तो आदेश संज्ञात्रयापेक्ष ठरतो, आणि त्यामुळें 'यू' लोपकार्याच्या मानानें तो बहिरङ्ग ठरतो. म्हणून शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं एयादेश व इयादेश होण्याकरितां जास्त निमित्तांची गरज असल्यामुळें व त्यामुळें ते यूलोपकार्याच्या मानानें बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ते आदेश असिद्ध–म्हणजे झालेच नाहींत–असें समजलें पाहिजे, व तसे आदेश झालेच नाहींत असें मानल्यास, जर 'यू' च नाहीं तर यूलोपाची प्राप्ति कशी होणार ? सारांश प्रकृतपरिभाषा मानल्यास, 'गौधेरः' व 'पचेत्' या उदाहरणांत यूलोप न होण्याची आपत्ति येते. या शंकेवर ग्रन्थकाराचें उत्तर हें आहे कीं, शद्बरूपनिमित्त एवढ्याच प्रकारचें निमित्त कोणतेंहि कार्य बहिरङ्ग ठरविण्यास कारणीभूत होत असल्यामुळें, अर्थ किंवा संज्ञा इत्यादि अवान्तर निमित्तांमुळें कार्यास बहिरङ्गत्व येत नाहीं. म्हणून एयादेश व इयादेश बहिरङ्ग मानतां येत नाहींत. दुसरें असें कीं ) ते आदेश होण्याकरितां पुढें कोणतेंहि शद्बरूपनिमित्त असण्याची आवश्यकता नाहीं ( पण यूलोप होण्याकरितां वल्प्रत्याहारांतील वर्ण पुढें असण्याची गरज आहे.) म्हणून ते आदेश अन्तरङ्ग ठरतात. (व त्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें यूलोप होण्यांत व 'गौधेरः' व 'पचेत्' अशी इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. )

ननु येन विधिस्तदन्तस्येति सूत्रे भाष्ये इको यणचीत्यादावपि तदन्तविधौ स्योन इत्यत्रान्तरङ्गत्वाद्यणो गुणबाधकत्वमिष्यते तन्न सिद्ध्येत् ऊनशब्दमाश्रित्य यणादेशो नशब्दमाश्रित्य गुण इत्यन्तरङ्गत्वाद्गुण एव स्यादित्युक्तम् । अत्र कैयटः । सिवेर्बाहुलकादौणादिके नप्रत्यये गुणवलोपोठां प्रसङ्गे ऊठ् अपवादत्वाद्वलोपं बाधते । गुणं त्वन्तरङ्गत्वाद्बाधते । गुणो ह्यङ्गसम्बन्धिनीमिग्लक्षणां लघ्वीमुपधामार्द्धधातुकं चाश्रयति । ऊठ् तु वकारान्तमङ्गमनुनासिकादिं च प्रत्ययमित्यल्पापेक्षत्वादन्तरङ्गः । तत्र कृते यण्गुणौ प्राप्नुत इति । एवं च संज्ञापेक्षस्यापि बहिरङ्गत्वं स्पष्टमेवोक्तमिति चेत्, न । तदन्तविधावपि बहुपदार्थापेक्षत्वरूपबहिरङ्गत्वस्य गुणे सत्वेन तत्र दोषकथनपरभाष्यासङ्गतेः। बहिरङ्गान्तरङ्गशब्दाभ्यां बह्वपेक्षत्वाल्पापेक्षत्वयोः शब्दमर्यादयाऽलाभाच्च तथा सत्यसिद्धं बह्वपक्षमल्पापेक्ष इत्येव वदेत् ।

( आतां शंकाकार असें म्हणतो कीं, या परिभाषेंतील 'अङ्ग' शद्बानें शद्बरूपनिमित्तांचेंच ग्रहण होतें व इतर कोणत्याहि प्रकारच्या निमित्ताचें ग्रहण होत नाहीं हें

म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' येन विधिस्तदन्तस्य ' या सूत्रावरील भाष्य योग्य रीतीनें लावण्याकरितां शब्दरूपनिमित्ताहून भिन्न निमित्ताचें-म्हणजे संज्ञारूपनिमित्ताचें-ग्रहण करणें आवश्यक आहे. संज्ञारूपनिमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येतें असें मानल्य शिवाय तें भाष्य बरोबर लावतां येणें शक्य नाहीं, व तें भाष्य योग्य रीतीनें लावण्याकरितां कैयटानें संज्ञारूपनिमित्ताचा आश्रय घेतला आहे. तें भाष्य कोणतें आहे व कैयटानें तें कसें लावलें आहे हें आतां शंकाकार सांगतो. ) ' येन विधिस्तदन्तस्य ' १-१-७२ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार असें म्हणतात कीं, ' इको यणचि ' इत्यादि सूत्रांचा देखील तदन्तविधि करून अर्थ केल्यास, ' स्योन ' असें इष्ट रूप सिद्ध करतेवेळीं, आन्तरङ्गत्वामुळें यणादेश गुणरूपीकार्याचा बाधक व्हावा असें जें इष्ट आहे तें इष्ट साध्य होऊं शकणार नाहीं; कारण यणादेशाचें ' ऊन ' हें एवढें शब्दरूपनिमित्त होईल, व ( त्या ' ऊन ' शब्दांत अन्तर्भूत असलेला केवळ ) ' न ' हा शब्द गुणाचें निमित्त होईल व त्यामुळें गुणकार्य अन्तरङ्ग ठरून गुणच होण्याची आपत्ति येईल. ( ' इको यणचि ' इत्यादि सूत्रांचा तदन्तविधि लावून अर्थ केल्यास कोणते दोष येतील हें सांगण्याकरितां वरील भाष्य लिहिलें आहे. त्या भाष्यांत तदन्तविधि हें तदादिविधींचें देखील उपलक्षण आहे व भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ' येन विधिस्तदन्तस्य ' सू० २६ व ' यस्मिन्विधिस्तदादौ ' प. ३३ यांचा आधार घेऊन तदादितदन्तविधीनें ' इको यणचि ' इत्यादि सूत्रांचा अर्थ करूं नये. तसा अर्थ केल्यास ' इगन्तस्य स्थाने यणन्तो भवति अजादौ परे सति ' असा ' इको यणचि ' या सूत्राचा अर्थ होईल व तसा अर्थ केल्यास, 'सिव्+न' अशा स्थितींत ' च्छ्वोः शूडनुनासिके च ' सू० २५६१ या सूत्रानें वकाराचे जागीं ' ऊठ् ' केल्यास ' सि+ऊ+न ' अशी स्थिति झाली असतां, ' सि ' या इगन्त शब्दास, ' ऊन ' हा अजादि शब्द पुढें असल्यामुळें, ' स्य् ' असा यणन्त आदेश पावतो; व ' न ' हा आर्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ या सूत्रानें ' सिव् ' यांतील उपधा इकारास गुण पावतो. ' ऊन ' यांत अन्तर्भूत असलेल्या ' न ' या निमित्तामुळें गुणकार्य होणारें असल्यामुळें व ' ऊन ' हा अजादि शब्द पुढें असल्यामुळें यण्कार्य होणारें असल्यामुळें, गुणकार्य अन्तरङ्ग ठरतें व त्याच्या मानानें यण्कार्य बहिरङ्ग ठरतें. म्हणून गुणकार्य प्रथम होईल व तें कार्य प्रथम केल्यास, ' से+ऊन ' अशी स्थिति होईल, व तशा स्थितींत ' इक् ' राहत नसल्यामुळें यणादेशाची प्राप्ति होत नाहीं व त्यामुळें ' स्योनः ' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) या भाष्यावर टीका करितांना कैयटानें असें म्हटलें आहे कीं, ( ' उणादयो बहुलम् ' सू० ३१६९ या सूत्रांत ' बहुलम् ' हा शब्द वापरला असल्यामुळें, जरी ' सिवेष्टेर्यू च ' उणादि सू० २८९ या उणादि सूत्रानें ' सिव् ' धातूच्या ' टि ' चे जागीं ' यू ' असा आदेश झाल्यावर ' न ' प्रत्यय होतो व ' स्यूनः ' असें रूप होतें तरी ' टि ' चे जागीं ' यू ' असा आदेश न करितां ' सिव् ' धातूला एकदम ' न ' प्रत्यय करिता येतो.

म्हणूनच दीक्षितांनीं म्हटलें आहे कीं, ' बाहुलकात्केवलो नः', अशा रीतीनें ) ' सिव् ' धातूहून औणादिक ' न ' प्रत्यय केला असतां ( ' सिव्+न ' अशी स्थिति होते व अशा स्थितींत ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ या सूत्रानें गुण, 'लोपो व्योर्वलि' सू० ८७३ या सूत्रानें व्लोप व ' च्छ्वोः शूडनुनासिके च ' सू० २५६१ या सूत्रानें ' ऊठ् ' अशीं ) गुण, व्लोप व ऊठ् हीं तीन कार्ये प्राप्त होतात. ऊठ्कार्य अपवादत्वामुळें यलोपकार्याचें बाधक ठरतें. (कारण जेथें जेथें ऊठ्कार्य होऊं पाहतें तेथें तेथें 'लोपो व्योर्वलि ' या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहे, व त्यामुळें ऊठ्कार्य होण्यास कोणतेंहि स्थळ मिळणें शक्य नाहीं, म्हणून 'येन नाप्राप्ते यो विधिरारभ्यते स तस्य बाधको भवति ' प. ५८ या न्यायान्वयें ऊठ्कार्य वलोपाचें बाधक ठरतें ) व तें ऊठ्कार्य अन्तरङ्गत्वामुळें गुणकार्याचें बाधक ठरतें. ( गुणकार्याच्या मानानें ऊठ्कार्य कसें अन्तरङ्ग ठरतें हें सांगतांना कैयटानें असें म्हटलें आहे कीं ) गुणकार्य अङ्गसंज्ञा, इक्संज्ञा, लघुसंज्ञा, उपधासंज्ञा, व आर्धधातुकसंज्ञा या पांच संज्ञांच्या आश्रयानें होणारें कार्य आहे. ( ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रान्वयें अङ्गापुढें सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय आल्यास व अङ्गाच्या उपधेंत लघु इक्-म्हणजे इ, उ, ऋ, किंवा ऌ-असल्यास तशा इकाला गुण होतो. यावरून हें स्पष्ट होतें कीं गुण होण्याकरितां ' यस्मात्प्रत्ययविधिः ' सू० १९९ या सूत्रानें होणाऱ्या अङ्गसंज्ञेची, ' आर्धधातुकं शेषः ' सू० २१८७ या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या आर्धधातुकप्रत्ययसंज्ञेची, अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' सू० २४९ या सूत्रानें होणाऱ्या उपधासंज्ञेची, ' ह्रस्वं लघु ' सू० ३१ या सूत्रानें होणाऱ्या लघुसंज्ञेची व ' आदिरन्त्येन सहेता ' सू० २ या सूत्रानें होणाऱ्या इक्संज्ञेची अपेक्षा आहे. ) पण ' ऊठ् ' होण्याकरितां वकारान्त अङ्ग, त्यापुढें प्रत्यय असणें, व तो अनुनासिक वर्णानें सुरू होणारा असणें एवढ्याचीच गरज आहे-म्हणजे अङ्ग, प्रत्यय, व ( मुखनासिकावचनोऽनुनासिकः' सू० ९ या सूत्रानें होणाऱ्या ) अनुनासिकसंज्ञेची त्याला अपेक्षा आहे. म्हणून संज्ञात्रयापेक्ष ऊठ्कार्य पञ्चसंज्ञापेक्ष गुणकार्याच्या मानानें अन्तरङ्ग ठरतें व त्यामुळें गुण होण्यापूर्वी 'ऊठ्'होतो. ऊठ् प्रथम झाल्यावर ('सि+ऊ+न' अशी स्थिति झाली असतां ) यणादेश व गुणकार्य यांची युगपत् प्राप्ति होते ( म्हणजे ' सि ' यांतील अन्त्य इकारापुढें ' ऊ ' असल्यामुळें ' इको यणचि ' या सूत्रानें यणादेश, व ' न ' हा आर्धधातुक औणादिक प्रत्यय पुढें असल्यामुळें त्याच इकारास ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रान्वयें गुण प्राप्त होतो असें कैयटानें म्हटलें आहे. सारांश वरील भाष्याचें व्याख्यान करितांना कैयटानें जी वृत्ति लिहिली आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं ) संज्ञारूपनिमित्तामुळें देखील कार्यास बहिरङ्गत्व येतें. ( शंकाकारानें अशी शंका उपस्थित केली असतां त्या शंकेचें निरसन करितांना ग्रन्थकार असें म्हणतात कीं ) ही शंका बरोबर नाहीं; कारण ' इको यणचि ' या सूत्राचा तदादितदन्तविधीनें अर्थ केला असतां तशा स्थितींत देखील ( यणादेश हा इगन्त शब्द व त्यापुढें अजादि शब्द या दोनच निमित्तांमुळें होणारा असल्यामुळें, आणि वर सांगितल्याप्रमाणें गुणकार्य पञ्चसंज्ञानिमित्तक असल्या-

मुळें, यणादेशरूपी कार्याच्या मानानें ) बहुनिमित्तापेक्ष गुणकार्य बहिरङ्ग ठरतें. ( आणि अशा रीतीनें यणादेश अन्तरङ्ग व गुणकार्य बहिरङ्ग मानल्यास, तदादितदन्तविधीनें ‘ इको यणचि ’ या सूत्राचा अर्थ केला असतां कसे दोष उत्पन्न होतात हें सांगणाऱ्या ) दोषकथनपर भाष्याशीं विरोध येतो. ( कारण भाष्यकारांनीं त्या दोषकथनपर भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, ‘ऊनशब्दमाश्रित्य यणादेशो, नशब्दमाश्रित्य गुण इत्यन्तरङ्गत्वाद्गुण एव स्यात्.’ म्हणून ज्या कैयटोक्तिच्या भरंवशावर प्रकृत शंका उपस्थित केली आहे ती कैयटोक्ति भाष्याविरूद्ध असल्यामुळें, ती शंका चूक ठरते. दुसरें असें कीं जें कार्य होण्याकरितां जास्त निमित्तांची गरज असते तें कार्य बहिरङ्ग, व जें कार्य होण्याकरितां कमी निमित्तांची गरज असते तें कार्य, तशा कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग असतें असा अन्तरङ्ग व बहिरङ्ग या शब्दांचा अर्थ करून त्या अर्थाच्या आधारावर वरील शंका उपस्थित केली आहे; पण ) बहिरङ्ग म्हणजे बव्हपेक्ष व अन्तरङ्ग म्हणजे अल्पापेक्ष असा, बहिरङ्ग व अन्तरङ्ग या शब्दांत अर्थप्रकाशन करण्याची जी शक्ति–म्हणजे सामर्थ्य–आहे त्या शब्द-शक्तीनें, त्या दोन शब्दांचा वर दिलेला अर्थ मुळींच होऊं शकत नाहीं; ( कारण ‘बहिः ’ या शब्दाचा अर्थ ‘ बहु ’ व ‘ अन्तः ’ या शब्दाचा अर्थ ‘ अल्प ’ केव्हांहि होऊं शकत नाहीं. ) बव्हपेक्षकार्य बहिरङ्ग व अल्पापेक्ष कार्य अन्तरङ्ग असतें तर ( ‘ असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे’ अशी परिभाषा पठित न करितां, भाष्यकारांनीं) ‘असिद्धं बव्हपेक्षमल्पापेक्षे’ अशी परिभाषा पठित केली असती. ( पण तशी परिभाषा पठित केली नसल्यामुळें, ‘ बहिरङ्ग ’ या शब्दाचा अर्थ ‘ बव्हपेक्ष ’ व ‘ अन्तरङ्ग ’ या शब्दाचा अर्थ ‘ अल्पापेक्ष ’ असा करणें बरोबर नाहीं. )

**अत एव विप्रतिषेधसूत्रभाष्ये गुणाद्यणादेशोऽन्तरङ्गत्वादित्यस्य स्योन इत्युदाहरणं, न तु गुणादूडन्तरङ्गत्वादित्युक्तम् । त्वद्रीत्या तदपि वक्तुमुचितम् । प्राथम्यात्तदेव वा वक्तुमुचितम् । मम त्वन्तरङ्गपरिभाषया तद्वारणासंभवान्नोक्तम् ॥ किं च सिद्धान्ते नित्यत्वात् गुणात् पूर्वमूठ् गुणस्तु ऊठि यणां बाधित्वादनित्यः । ऊनशब्दमाश्रित्येत्यादिभाष्येण च परिभाषायामङ्गशब्देन सप्तम्याद्यन्ततयोपात्तं शब्दरूपं निमित्तमेव गृह्यत इति स्पष्टमेवोक्तम् ॥**

( ‘ बहिरङ्ग ’ व ‘ अन्तरङ्ग ’ या शब्दांचा अर्थ ‘ बव्हपेक्ष ’ व ‘ अल्पापेक्ष ’ असा होऊं शकत नाहीं, व संज्ञारूपनिमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येत नाहीं, ) म्हणूनच ‘ विप्रतिषेधे परं कार्यम् ’ १–४–२ या सूत्रावरील भाष्यांत, गुणकार्यापेक्षां यणादेशकार्य अन्तरङ्ग ठरत असल्यामुळें यणादेश प्रथम होतो हें म्हणणें सिद्ध करण्याकरितां भाष्यकारांनीं ‘ स्योनः ’ हें उदाहरण दिलें आहे, व तें उदाहरण देतांना, गुणकार्यापेक्षां ऊठ्कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें ऊठ्कार्य प्रथम होतें असें भाष्यकारांनीं म्हटलें नाहीं. ( ‘ संज्ञाकृतमपि बहिरङ्गत्वम् ’ हा जो पक्ष कैयटानें प्रतिपादित केला आहे तो भाष्य-

कारास मान्य असता तर ) भाष्यकारांनीं तसें देखील ह्मणावयास पाहिजे होतें. ( कारण वर सांगितल्याप्रमाणें कैयटानें असें ह्मटलें आहे कीं ऊठ्कार्य संज्ञात्रयापेक्ष व गुणकार्य पञ्चसंज्ञापेक्ष असल्यामुळें गुणकार्याच्या मानानें ऊठ्कार्य अन्तरङ्ग ठरतें; व संज्ञारूपनिमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येते हा पक्ष जर भाष्यकारास मान्य असता तर 'स्योनः' या उदाहरणांत जसें गुणकार्य व यणादेशकार्य प्राप्त आहे तसेंच ऊठ्कार्य देखील प्राप्त असल्यामुळें, ज्याप्रमाणें यणादेशकार्य गुणकार्यापेक्षां अन्तरङ्ग ठरतें असें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे त्याचप्रमाणें गुणकार्यापेक्षां ऊठ्कार्य देखील अन्तरङ्ग ठरतें असें भाष्यकारांनीं अवश्य ह्मटलें असतें. एवढेंच नाहीं तर 'सिव्+न' अशा स्थितींत यणादेशाची मुळींच प्राप्ति नसून गुणकार्य व ऊठ्कार्य या दोन कार्यांचीच प्रथमतः प्राप्ति असल्यामुळें ) पहिल्यानें भाष्यकारांनीं तसेंच–ह्मणजे गुणकार्यापेक्षां ऊठ्कार्य अन्तरङ्ग ठरत असल्यामुळें ऊठ्कार्य प्रथम होतें असेंच–ह्मणावयास पाहिजे होतें. पण आमच्या–ह्मणजे ग्रन्थकाराच्या-मताप्रमाणें भाष्यकारांनीं तसें ह्मटलें नाहीं याचें कारण हें आहे कीं, अन्तरङ्गपरिभाषेचा–ह्मणजे प्रकृत परिभाषेचा–उपयोग करून गुणकार्याचें निवारण करणें शक्य नव्हतें ( कारण 'सिव्+न' अशा स्थितींत 'न' हा अनुनासिकादि व तसाच आर्धधातुकप्रत्यय असल्यामुळें तोच प्रत्यय ऊठ्कार्याचें व तसेंच गुणकार्याचें निमित्त ठरतो. ह्मणून अशा ठिकाणीं एक कार्य अन्तरङ्ग व दुसरें कार्य बहिरङ्ग आहे असें मुळींच मानतां येत नाहीं. 'संज्ञापेक्षं बहिरङ्गत्वम्' हा नियम मानला असता तरच ऊठ्कार्य अन्तरङ्ग व गुणकार्य बहिरङ्ग ह्मणतां आलें असतें. पण तो नियम भाष्यांत कोठेंहि सांगितला नसल्यामुळें स्वीकारतां येत नाहीं. ) दुसरें असें कीं सिद्धान्तपक्षामध्यें ऊठ्कार्य गुणापूर्वीं होतें असें मानलें आहे, पण त्याचें कारण हें आहे कीं ऊठ्कार्य नित्य आहे ( कारण गुणकार्य प्रथम केलें किंवा न केलें तरी–ह्मणजे 'सिव्+न' व 'सेव्+न' अशा दोन्हीं स्थितींत–ऊठ्कार्याची प्राप्ति आहेच. ह्मणून ऊठ्कार्य कृताकृतप्रसङ्गि असल्यामुळें नित्य ठरतें व तें नित्यकार्य असल्यामुळें, जरी गुणकार्य परसूत्रानें पावलें आहे तरी, 'परान्नित्यं बलवत्' परिभाषा ४२ या परिभाषेप्रमाणें ऊठ्कार्य प्रथम होतें ) पण ऊठ्कार्य प्रथम केल्यास, गुण यणादेशानें बाधित होत असल्यामुळें गुणकार्य अनित्य ठरतें ( कारण 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रानें ऊठ्कार्य प्रथम केल्यास 'सि+ऊ+न' अशी स्थिति झाली असतां, 'ऊ' या अलीकडच्या निमित्तामुळें यणादेश प्राप्त होत असल्यामुळें व 'न' या पलीकडच्या निमित्तामुळें गुणकार्य प्राप्त होत असल्यामुळें, यणादेश अन्तरङ्ग ठरून गुणकार्याचा बाध करतो. ह्मणून गुणकार्य कृताकृतप्रसङ्गि नसल्यामुळें, 'यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते तदप्यनित्यम्' परिभाषा ४८ या परिभाषेप्रमाणें तें अनित्य ठरतें, व गुणकार्य प्रथम न होतां यणादेश प्रथम होतो. यणादेशकार्य प्रथम होऊन 'स्यू+न' अशी स्थिति झाल्यावर 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू० २१६८ या सूत्रानें 'स्यू' यांतील अन्त्य स्वराला गुण होऊन 'स्योनः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. ) 'ऊनशब्दमाश्रित्य यणादेशो नशब्दमाश्रित्य गुणः' असें भाष्य-

कारांनीं ह्मटलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, प्रकृत परिभाषेंत असलेल्या 'अङ्ग' शद्वानें, सूत्रांत सप्तमी इत्यादि विभक्तींत निर्दिष्ट असलेल्या शद्वरूपनिमित्ताचेंच ग्रहण होतें. ( व अर्थरूप किंवा संज्ञारूपनिमित्ताचें ग्रहण होत नाहीं व तशा निमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येत नाहीं. )

**यत्तु कैयटेन तदन्तविधिपक्षे परत्वाद्गुणः प्राप्नोतीत्युक्तं तत्तूनशब्द-माश्रित्येत्यादिभाष्यासङ्गत्या चिन्त्यम् ॥**

( 'येन विधिस्तदन्तस्य' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें ह्मटलें आहे कीं 'यदि च इको यणचीत्यत्र तदादितदन्तविधी स्यातां तदा यणादेशस्यान्तरङ्ग-त्वाभावात् परत्वाद्गुणादेशः स्यात्'–ह्मणजे 'इको यणचि' या सूत्राचा तदादितदन्त-विधीनें अर्थ केल्यास, यणादेश अन्तरङ्ग ठरत नसल्यामुळें व गुणकार्य परसूत्रानें होणारें असल्यामुळें, गुणकार्य प्रथम होण्याची आपत्ति येईल. ग्रन्थकार ह्मणतात कीं ) तदन्तविधिपक्ष स्वीकारल्यास, परत्वामुळें गुणकार्याची प्रथम प्राप्ति होईल असें जें कैय-टानें ह्मटलें आहे तें 'ऊनशद्वमाश्रित्य यणादेशः' इत्यादि भाष्याच्या विरुद्ध असल्या-मुळें ग्राह्य नाहीं. ( कारण भाष्यकारांनीं स्पष्ट ह्मटलें आहे कीं ऊठ्कार्य प्रथम झाल्या-वर 'सि+ऊ+न' अशी स्थिति झाली असतां, 'ऊन' या पूर्ण शद्वनिमित्तामुळें यणा-देश पावत असल्यामुळें व त्या 'ऊन' शद्वांत अन्तर्भूत असलेल्या केवळ 'न' या शद्वनिमित्तामुळें गुणकार्य प्राप्त होत असल्यामुळें, यणादेशाच्या मानानें गुणकार्य अन्त-रङ्ग ठरून गुणकार्य प्रथम होण्याची आपत्ति येईल. यामुळें 'यणादेशस्यान्तरङ्गत्वाभावात् परत्वाद्गुणादेशः स्यात्' असें जें कैयटानें ह्मटलें आहे तें भाष्याच्या विरुद्ध जातें आणि ह्मणून तें ह्मणणें बरोबर मानतां येत नाहीं. )

**वलि लोपेऽन्तरङ्गपरिभाषा न प्रवर्तत इति तु न युक्तम् तत्सूत्र-भाष्य एव व्रश्चादिषु लोपातिप्रसङ्गमाशङ्क्योपदेशसामर्थ्यान्न । न च वृश्चतीत्यादौ चारितार्थ्यम्, बहिरङ्गतया सम्प्रसारणस्यासिद्धत्वेन पूर्व-मेव तत्प्राप्तेरिति भाष्योक्तेः ।**

( कित्येक वैयाकरणांचें असें मत आहे कीं प्रकृतपरिभाषा 'लोपो व्योर्वलि' या सूत्रास लागू पडत नाहीं, व त्यांचें म्हणणें बरोबर आहे हें सिद्ध करण्याकरितां ते 'चेले क्नोपेः' सू० ३३५४ या सूत्रांतील 'क्नोपेः' या निर्देशाचा आधार दाखवितात. 'क्नूयी शद्बे उन्दने च' या भ्वादिगणांतील 'क्नय्' धातूहून णिच् केला असतां, 'क्नूय्+णिच्' अशा स्थितींत, 'अर्तिन्ही' सू० २५७० या सूत्रानें पुगागम होऊन 'क्नूय्+प्+इ' अशी स्थिति होते. वल्प्रत्याहारांतील वर्ण पुढें असल्यास वलोप होत असल्यामुळें, व पुगागम होण्यास 'क्नूय्' धातु व त्यापुढें 'णिच्' असणें या दोन निमित्तांची गरज असल्यामुळें, पुगागमरूपी कार्य, वलोपकार्याच्या मानानें, बहिरङ्ग ठरतें; व पुगागम बहिरङ्ग ठरत असल्यामुळें तो प्रकृत परिभाषेप्रमाणें असिद्ध–म्हणजे

झालाच नाहीं–असें मानल्यास–म्हणजे ' क्नूय् ' यांतील यकारापुढें वल्प्रत्याहारांतील पकार नाहींच असें मानल्यास–वलोप पावतच नाहीं. तरी पण पाणिनीनें ' क्नूय् ' यांतील यकाराचा लोप करून ' क्नोपि ' असें रूप केलें आहे व त्या रूपाचा वरील सूत्रांत ' क्नोपेः ' असा षष्ठीविभक्तींत निर्देश केला आहे. जर प्रकृतपरिभाषा वलोपास लागू पडली असती तर पाणिनीनें ' क्नोपेः ' असा निर्देश केला नसता. पण तसा निर्देश केला असल्यामुळें हें सिद्ध होतें कीं ' लोपो व्योर्वलि ' या सूत्रानें वलोप किंवा यलोप करतेवेळीं प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं, व त्यामुळें ' गौधेरः, ' ' पचेत् ' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असें कैयटादि प्राचीन वैयाकरणांचें मत आहे. पण ग्रन्थकार म्हणतात कीं हें मत भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं. ) वल्प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतां वलोप किंवा यलोप करतेवेळीं अन्तरङ्ग परिभाषा लागू पडत नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' लोपो व्योर्वलि ' ६-१-६६ या सूत्रावरील भाष्यांतच ' व्रश्च ' इत्यादि स्थलीं वलोप होण्याची आपत्ति येईल अशी शंका उपस्थित करून, उपदेशांत–म्हणजे धातुपाठांत–' व्रश्च ' अशा तऱ्हेनें धातु पठित केला असल्यामुळें वलोप करतां येत नाहीं अशा रीतीनें भाष्यकारांनीं त्या शंकेचें निरसन केलें आहे. ( ' व्रश्च ' असा धातु उच्चारताक्षणींच त्या धातूंतील वकारापुढें वल्प्रत्याहारांतील रकार हा वर्ण असल्यामुळें. ' लोपो व्योर्वलि ' या सूत्रानें वकाराचा लोप पावतो व वलोप केल्यास ' रश्च ' असें धातूचें रूप होईल; पण ज्याअर्थी धातुपाठांत ' व्रश्च ' असा वकारयुक्त धातु पाणिनीनें पठित केला आहे त्याअर्थी त्या पाठसामर्थ्यावरून हें सिद्ध होतें कीं पाणिनीचा हेतु हा होता कीं, ' व्रश्च ' असाच धातु समजावा आणि वलोप करून ' रश्च ' असा धातु मानूं नये; नाहीं तर त्यानें ' व्रश्च ' असा धातु पठित करण्याची रिकामी खटपट न करितां, ' रश्च ' असाच धातु धातुपाठांत पठित केला असता. ) ' वृश्चति ' इत्यादि रूपें सिद्ध व्हावीं म्हणून धातुपाठांत ' व्रश्च ' असा धातु पठित केला आहे व त्यामुळें तसा पाठ चरितार्थ ठरतो हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग असल्यामुळें असिद्ध ठरतें, व तें प्राप्त होण्यापूर्वीच वलोपाची प्राप्ति होते असें भाष्यांत म्हटलें आहे. ('ओव्रश्चू छेदने' हा तुदादिगणांतील धातु असल्यामुळें, ' तुदादिभ्य शः ' सू० २५३४ या सूत्रानें त्याला ' श ' हें विकरण लागलें असतां, ' व्रश्+श (अ)+ति ' अशा स्थितींत, ' श ' हा प्रत्यय ' सार्वधातुकमपित् ' सू० २२३४ या सूत्रान्वयें ङित् असल्यामुळें, ' ग्रहिज्यावयि ' सू० २४१२ या सूत्रानें ' व्रश्च् ' यांतील रकारास सम्प्रसारण पावलें आहे. सम्प्रसारणाचें निमित्त ' श ' हें वलोपाचें निमित्त जो वल्प्रत्याहारांतील ' र् ' त्याच्या मानानें पलीकडे असल्यामुळें, वलोप अन्तरङ्ग ठरतो व सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग ठरतें. म्हणून वलोपकार्य प्रथम प्राप्त होतें. वलोप प्रथम केल्यास व नंतर प्राप्त झालेलें सम्प्रसारणकार्य मागून केल्यास ' ऋश्चति ' असें अनिष्टरूप सिद्ध होण्याची आपत्ति येते. परंतु धातुपाठांत 'व्रश्च' असा धातु पठित असल्यामुळें, उपदेशसामर्थ्यामुळें वलोप होत नाहीं, व त्यामुळें वकार कायम राहतो

व ' वृश्चति ' असें इष्टरूप सिद्ध होतें. सारांश वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं ' लोपो व्योर्वलि ' या सूत्रानें वलोप किंवा यलोप करतेवेळीं ही परिभाषा लागते; तसें नसतें तर, सम्प्रसारण बहिरङ्ग असल्यामुळें व वलोप अन्तरङ्ग असल्यामुळें ' लोपो व्योर्वलि ' या सूत्रानें वलोप प्रथम प्राप्त होतो अशी शंका भाष्यकारांनीं उपस्थित केलीच नसती; आणि ' उत्तरोत्तरं मुनीनां प्रामाण्यम् ' या न्यायान्वयें भाष्यमत प्रमाण मानलेंच पाहिजे. )

**यत्तु नलोपस्य षट्संज्ञायामसिद्धत्वात्पञ्चेत्यत्र नषडिति निषेध इति. तच्चिन्त्यम् । नलोपस्य हि पदसंज्ञासापेक्षत्वेन बहिरङ्गत्वं वाच्यम् तच्च न, संज्ञाकृतबाहिरङ्गत्वस्यानाश्रयणात् । पञ्चेत्यत्र निषेधस्तु स्त्रियां यत् प्राप्नोति तन्नेति व्याख्यानसामर्थ्येन भूतपूर्वषट्त्वमादायेति बोध्यम् ॥**

' पञ्च ' या शब्दास ' षट् ' संज्ञा करतेवेळीं नलोप असिद्ध ठरत असल्यामुळें, ' न षट्स्वस्रादिभ्यः ' सू० ३०८ हें निषेधसूत्र त्या ' पञ्च ' शब्दाला लागू पडतें असें जें ( कैयटानें ) म्हटलें आहे तें बरोबर मानतां येत नाहीं. नलोप (असिद्ध ठरविण्याकरितां ) तो पदसंज्ञेमुळें होणारा असल्यामुळें बहिरङ्ग ठरतो असें म्हणावें लागेल; पण तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण संज्ञानिमित्तामुळें कार्य बहिरङ्ग ठरतें हा पक्ष स्वीकारार्ह नाहीं. ( ' पञ्च ब्राम्हण्यः ' या स्थलीं, ' पञ्च ' हें ' ब्राम्हण्यः ' या प्रथमेच्या स्त्रीलिंगबहुवचनान्त शब्दाचें विशेषण आहे. ' पञ्चन्+जस् ' येथें ' पञ्चन् ' हा संख्यावाचक शब्द नकारान्त असल्यामुळें ' ष्णान्ता षट् ' सू० ३६९ या सूत्रान्वयें तो षट्संज्ञक आहे व त्यामुळें ' षड्भ्यो लुक् ' सू० २६१ या सूत्रानें ' जस् ' चा लुक् होऊन ' पञ्चन् ' एवढेंच रूप बाकी राहतें, व ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' सू० २२६ या सूत्रानें ' पञ्चन् ' यांतील अन्त्य नकाराचा लोप होऊन ' पञ्च ' असें रूप होतें येथें हें सांगणें अवश्य आहे कीं, ' पञ्चन्+जस् ' अशा स्थितींत ' षड्भ्यो लुक् ' या सूत्रानें ' जस् ' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर देखील ' पञ्चन् ' याची पदसंज्ञा, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू० २६२ हें सूत्र असल्यामुळें, नष्ट होत नाहीं. ' न लुमताङ्गस्य ' सू० २६३ हा निषेध वरील उदाहरणास लागू पडत नाहीं; कारण ' जस् ' प्रत्ययाच्या निमित्तामुळें अङ्गास कोणतेंहि अङ्गाधिकारोक्त कार्य करणें नाहीं. ह्मणूनच बालमनोरमेंत या सूत्राच्या वृत्तींत ह्मटलें आहे कीं ' अङ्गस्य इत्यनुक्तौ पञ्च सप्त इत्यादौ सुप्तिङन्तमिति पदसंज्ञा न स्यात्, जश्शसोर्लुका लुप्तत्वात् । ततश्च न लोपः प्रातिपदिकान्तस्य इति नलोपो न स्यात् । अतोऽङ्गस्येत्युक्तम् । ' सारांश ' जस् ' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर देखील ' पञ्चन् ' याची पदसंज्ञा नष्ट होत नसल्यामुळें. ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य '—ह्मणजे प्रातिपदिकसंज्ञकम् यत्पदं तदन्तस्य नकारस्य लोपः स्यात्—या सूत्रान्वयें नलोप झाला आहे. आतां येथें प्रश्न असा कीं हा नलोप कशाच्या आधारावर असिद्ध मानावा? ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' हें असिद्धकांडांतील सूत्र असल्यामुळें, सिद्धकांडांतील सूत्रा-

न्वयें कार्य करणें झाल्यास, 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रान्वयें नलोप असिद्ध ठरतो–असें कोणी ह्मटल्यास तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण 'नलोपः सुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति' सू० ३५३ हें नियामक सूत्र असल्यामुळें, त्या सूत्रांत सांगितलेले विधि करितांनाच नलोप असिद्ध ठरतो; इतर ठिकाणीं तो नलोप असिद्ध ठरत नाहीं. येथें कोणी असें ह्मणेल कीं, 'पञ्च' या शब्दाला षट्संज्ञा करणें असल्यामुळें त्या सूत्रान्वयेंच नलोप असिद्ध ठरतो–ह्मणजे तो झालाच नाहीं असें मानतां येतें. पण हें ह्मणणें देखील बरोबर नाहीं; कारण त्या सूत्रावरील भाष्यावरून असें सिद्ध होतें कीं 'शेषो घ्यसखि' सू० २४३ या सूत्रान्वयें घिसंज्ञा करतेवेळींच नलोप असिद्ध ठरतो, इतर संज्ञा करतेवेळीं तो नलोप असिद्ध ठरत नाहीं. ह्मणूनच या परिभाषेवरील विजया टीकेंत असें ह्मटलें आहे कीं, 'ननु नलोपः सुबित्यादिना षट्संज्ञादृष्ट्या नलोपासिद्धत्वं किन्न स्यादिति चेन्न, तत्र संज्ञापदेन घिसंज्ञाया एव ग्रहणस्य तत्सूत्रस्थभाष्यतो लाभात्.' सारांश 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' किंवा 'नलोपः सुप्स्वरसंज्ञा' या दोन्हीं सूत्रांनीं नलोप असिद्ध ठरत नाहीं. तर मग तो असिद्ध कसा मानावा? तो असिद्ध न ठरल्यास, 'अजाद्यतष्टाप्' सू० ४५४ या सूत्रान्वयें 'पञ्च' शब्दाला 'टाप्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते. यावर कैयटाचें असें ह्मणणें आहे कीं, पदसंज्ञानिमित्तामुळें 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रान्वयें नलोप झाला असल्यामुळें, षट्संज्ञा प्राप्त करून देणें या अन्तरङ्गकार्याच्या दृष्टीनें तो नलोप बहिरङ्ग व असिद्ध ठरतो, व नलोप झालाच नाहीं असें मानल्यास–ह्मणजे 'पञ्च' हा शब्द नकारान्त संख्यावाचक 'पञ्चन्' शब्दच आहे असें मानल्यास–त्याला षट्संज्ञा प्राप्त होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. परंतु ग्रन्थकार ह्मणतात कीं संज्ञानिमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येत नाहीं हा सिद्धान्त बरोबर नाहीं असें पूर्वीच सिद्ध केलें असल्यामुळें, पदसंज्ञेमुळें झालेला नलोप बहिरङ्ग व असिद्ध ठरूं शकत नाहीं. पण जर तो असिद्ध ठरूं शकत नाहीं तर 'ऋन्नेभ्यो ङीप्' सू० ३०६ या सूत्रान्वयें ङीप् प्रत्यय होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति कशी टाळतां येते हें ग्रन्थकार आतां सांगतात. ) 'पञ्चन्' यांतील ( 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नलोप होण्यापूर्वीं, 'ष्णान्ता षट्' हा सूत्रान्वयें त्याला जी षट्संज्ञा होती त्या ) भूतपूर्व–ह्मणजे पूर्वीं असलेल्या–षट्संज्ञेचा आश्रय घेऊन–ह्मणजे 'पञ्च' हा स्थानिवद्भावानें 'पञ्चन्' च आहे असें मानल्यास–'पञ्च' हा षट्संज्ञकच शब्द आहे असें मानण्यांत कांहीं अडचण येत नाहीं व तसें मानलें ह्मणजे, 'न षट्स्वस्रादिभ्यः' सू० ३०८ हें निषेधात्मक सूत्र 'पञ्च' शब्दास लागू पडतें, आणि स्त्रिलिंगाचे जे प्रत्यय प्राप्त होतात त्यांपैकीं कोणताहि प्रत्यय होत नाहीं असा त्या सूत्राचा ( भाष्यकारांनीं ) अर्थ केला असल्यामुळें, त्या व्याख्यानाच्या सामर्थ्यानें 'पञ्च' शब्दास कोणताहि स्त्रीप्रत्यय –ह्मणजे ङीप् किंवा टाप्–होऊं शकत नाहीं ( व त्यामुळें 'पञ्च ब्राह्मण्यः' हा प्रयोग शुद्ध ठरतो. )

अत एव कृति तुग्ग्रहणं चरितार्थम् । वृत्रहभ्यामित्यादौ पदत्वनिमित्तकत्वेऽपि नलोपस्य बहिरङ्गत्वाभावात् । भ्यामः पदसंज्ञानिमित्तत्वेऽपि नलोपस्य तन्निमित्तकत्वाभावात् । परम्परया निमित्तत्वमादाय बहिरङ्गत्वाश्रयणे तु न मानम् । ध्वनितं चेदं नलोपः सुप्विति सूत्रे भाष्य इति तत्रैव भाष्यप्रदीपोद्योते निरूपितम् ॥

( संज्ञासापेक्ष बहिरङ्गत्व नसतें–म्हणजे संज्ञेचा आश्रय घेऊन कांहीं कार्य केल्यास त्या कार्याला बहिरङ्ग मानतां येत नाहीं–) म्हणूनच,('नलोपःसुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति' सू० ३५३ ह्या सूत्रांत 'कृति तुग्विधौ'-'कृति प्रत्यये परे सति यः तुग्विधिः तत्र विषये'–हें जें पाणिनीनें सांगितलें आहे तें ) ' कृति तुक् ' ग्रहण चरितार्थ ठरतें; कारण ' वृत्रहभ्याम् ' इत्यादि स्थलीं, पदसंज्ञेमुळें जरी ' न् ' लोप होतो तरी तो बहिरङ्ग ठरत नाहीं. ( संज्ञानिमित्तक कार्य–म्हणजे संज्ञेचा आश्रय घेऊन केलेलें कार्य–बहिरङ्ग व असिद्ध ठरतें हा पक्ष जर पाणिनीस मान्य असता तर, ' वृत्र+हन्+क्विप्+भ्याम् ' अशा स्थलीं, ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' ( पदस्य ) ह्या सूत्रान्वयें, ' प्रातिपदिक ' व ' पद ' ह्या दोन संज्ञांचा आश्रय घेऊन त्यामुळें झालेला ' न् ' लोप आपोआपच बहिरङ्ग व असिद्ध ठरला असता, व ' ह्रस्वस्य पिति कृति तुक् ' सू० २८५८ ह्या सूत्रानें 'क्विप्' ह्या प्रत्ययाला मानून होणारें ' तुक् ' कार्य जरी अन्तरङ्ग आहे तरी ' वृत्रहन् ' ह्यांतील नलोप असिद्ध ठरत असल्यामुळें,तो शब्द ह्रस्वस्वरान्त मानला जाऊं शकत नसल्यामुळें तें सूत्र प्रवृत्त झालें नसतें व तुगागम झाला नसता, आणि त्यामुळें ' वृत्रहद्भ्याम् ' असें रूप झालें नसतें. तरी पण ज्याअर्थी ' न लोपः सुप्स्वर ' सू० ३५३ ह्या सूत्रांत पाणिनीनें ' कृति तुक् ' ग्रहण केलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, संज्ञानिमित्तामुळें होणारें कार्य बहिरङ्ग व असिद्ध असतें हा पक्ष पाणिनीला मुळींच मान्य नव्हता आणि म्हणूनच त्यानें ' कृति तुग्ग्रहण ' केलें आहे व तें अशा तऱ्हेनें चरितार्थ ठरतें. तो पक्ष पाणिनीस मान्य असता तर ' कृति तुक् ' ग्रहण व्यर्थ ठरलें असतें. ) ' भ्याम् ' हा विभक्तिप्रत्यय जरी पदसंज्ञा होण्यास कारणीभूत आहे तरी तो साक्षात् 'न' लोपाचें कारण नाहीं. परंपरेनें ठरत असलेल्या कारणामुळें बहिरङ्गत्व येतें असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ( ' वृत्र+हन्+क्विप्+भ्याम् ' ह्या स्थलीं, अलीकडचा ' क्विप् ' हा प्रत्यय ' ह्रस्वस्य पिति कृति तुक् ' ह्या सूत्रान्वयें होणाऱ्या तुगागमाचें निमित्त आहे, व ' भ्याम् ' ह्या पलीकडे असलेल्या प्रत्ययामुळें ' वृत्रहन् ' ह्या प्रातिपदिकास ' स्वादिष्वसर्वनामस्थाने ' सू० २३० ह्या सूत्रानें पदसंज्ञा प्राप्त होते; व पदसंज्ञा प्राप्त झाल्यावर ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' ह्या सूत्रानें ' न् ' लोप होत असल्यामुळें, ' भ्याम् ' हा प्रत्यय ' न ' लोपाचें निमित्त ठरतो. तुकाचें निमित्त ' क्विप् ' व ' न् ' लोपाचें निमित्त ' भ्याम् ' ह्या दोन निमित्तांपैकीं, ' क्विप् ' हा ' भ्याम् ' च्या मानानें अधिक जवळ असल्यामुळें, तुक्कार्य अन्तरङ्ग ठरतें, व ' न् ' लोपकार्य बहि-

रङ्ग ठरतें; ह्मणून ' न लोपः सुप्स्वर ' सू० ३५३ ह्या सूत्रांतील ' कृति तुक् ' ग्रहण व्यर्थ ठरतें:—अशी शंका कोणी केल्यास, ग्रन्थकार त्या शंकेला असें उत्तर देतात कीं, ' भ्याम् ' हें ' न् ' लोपाचें निमित्त नसून प्रातिपदिकांस केवळ पदसंज्ञा होण्याचें निमित्त आहे. ह्यावर शंकाकार पुनः असें ह्मणतो कीं, ' भ्याम् ' प्रत्यय पुढें असल्यामुळें ' स्वादिष्वसर्वनामस्थाने ' ह्या सूत्रानें पदसंज्ञा प्राप्त होते, व तशी संज्ञा प्राप्त झाल्यामुळेंच, ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' ह्या सूत्रानें नलोप होतो. ह्मणून ' भ्याम् ' हें परंपरेनें नलोपाचें निमित्त ठरतें व अशा पलीकडे असलेल्या निमित्तानें झालेला नलोप बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, ' नलोपः सुप्स्वर ' ह्या सूत्रांत ' कृति तुक् ' ग्रहण व्यर्थ ठरतें. ह्या शंकेला ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, साक्षात् कारण नसून परंपरेनें कारण होणाऱ्या निमित्तामुळें झालेलें कार्य बहिरङ्ग ठरतें असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ) ' न लोपः सुप्स्वर '–८–२–२ ह्या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे. व तेथेंच प्रदीपांत व उद्योतांत ह्या विषयाचें निरूपण केलें आहे.

अन्तरङ्गे कर्तव्ये जातं तत्कालप्राप्तिकं च बहिरङ्गमसिद्धमित्यर्थः। वृश्चत्यादिषु पदसंस्कारपक्षे समानकालत्वमेव द्वयोरिति बोध्यम्। एतेनान्तरङ्गं बहिरङ्गाद्बलीय इति परिभाषान्तरमित्यपास्तम्। एतामाश्रित्य विप्रतिषेधसूत्रे भाष्ये तस्याः प्रत्याख्यानाच्च ॥

( वाक्याचा अर्थ बरोबर समजण्याकरितां त्या वाक्यांतील पदांचा अर्थ प्रथम नीट समजला पाहिजे. म्हणून ग्रन्थकारांनीं प्रथम या परिभाषेंतील अङ्ग, अन्तरङ्ग, बहिरङ्ग इत्यादि शब्दांचा अर्थ विशद केल्यावर ते आतां परिभाषेचा अर्थ सांगतात. ) अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, पूर्वीं होऊन गेलेलें किंवा युगपत् प्राप्त झालेलें बहिरङ्ग कार्य असिद्ध ठरतें —म्हणजे पूर्वीं झालेलें कार्य झालेंच नाहीं किंवा युगपत् प्राप्त झालेलें कार्य प्राप्तच नाहीं असें समजून अन्तरङ्गकार्य प्रवृत्त होतें—असा या परिभाषेचा अर्थ आहे. ( हा जो परिभाषेचा अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें जरी पूर्वीं होऊन गेलेलें किंवा युगपत् प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरतें तरी भविष्यत्—म्हणजे पुढें होणारें—बहिरङ्गकार्य असिद्ध ठरत नाहीं. पण भाष्यकारांनीं तर ' वृश्चति ' इत्यादि स्थलीं वलोपरूपी अन्तरङ्गकार्याच्या अपेक्षेनें पुढें होणारें सम्प्रसारणरूपी बहिरङ्गकार्य देखील असिद्ध ठरविलें आहे. म्हणून वर दिलेला या परिभाषेचा अर्थ भाष्याशीं जुळत नाहीं—अशी कोणी शंका केल्यास ग्रन्थकार म्हणतात कीं, ) 'वृश्चति' इत्यादि स्थलीं पदसंस्कारपक्षांत अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यांची एकेच वेळीं प्राप्ति आहे हें जाणावें. ( सारांश ' लोपो व्योर्वलि ' या सूत्रावरील ' वृश्चति ' या संबंधानें भाष्यकारांनीं जें म्हटलें आहे तें पदसंस्कारपक्षाचा आश्रय धरूनच म्हटलें आहे असें समजावें, व तसें मानल्यास, या परिभाषेचा वर जो अर्थ दिला आहे तो, भाष्यविरुद्ध न जातां, भाष्याशीं बरोबर जुळतो. पदसंस्कारपक्ष म्हणजे काय हें परिभाषा १५ मध्यें पूर्वींच सांगितलें आहे. वास्तविक 'व्रश्च्' असा धातु उच्चा-

रताक्षणींच, वकारापुढें वल्प्रत्याहारांतील रकार असल्यामुळें वलोप एकदम पावतो. त्यावेळीं ' व्रश्च् ' धातूपुढें कोणताहि ङित् प्रत्यय नसल्यामुळें सम्प्रसारणकार्य प्राप्त होतच नाहीं. पण पदसंस्कारपक्षांत ' वृश्चति ' हें पद सिद्ध करतेवेळीं ' व्रश्च् ' या प्रकृतीपुढें प्रत्ययांची मांडणी करून पाणिनीय सूत्रान्वयें संस्कार करण्याचा जेव्हां प्रसंग येतो तेव्हां ' व्रश्च्+श+ति ' अशा स्थितींतच पूर्वोपस्थितनिमित्त जो रकार त्याला मानून वलोपरूपी अन्तरङ्गकार्याची व तसेंच ' श ' या पलीकडे असणाऱ्या ङित् प्रत्ययाला मानून सम्प्रसारणरूपी बहिरङ्गकार्याची युगपत् प्राप्ति होते. अशा स्थितींत वास्तविक या परिभाषेप्रमाणें वलोपरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम झालें पाहिजे. पण धातुपाठांत ' व्रश्च् ' असा धातु पठित केला असल्यामुळें, वलोपरूपी अन्तरङ्गकार्य न होतां, बहिरङ्ग सम्प्रसारणकार्यच होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. सारांश ' वृश्चति ' या संबंधानें जें भाष्य लिहिलें आहे तें पदसंस्कारपक्षाला धरूनच लिहिलें आहे. असें मानल्याशिवाय त्या भाष्याची उपपत्ति लागत नाहीं; पण तें भाष्य पदसंस्कारपक्षविषयक मानलें म्हणजे, अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यें युगपत् प्राप्त होतात हें वर दिलेल्या प्रक्रियेवरून स्पष्ट होतें.) या परिभाषेचा ' जातं तत्कालप्राप्तिकं च बहिरङ्गमसिद्धम् ' असा अर्थ केला असल्यामुळें,' अन्तरङ्गं बहिरङ्गाद्बलीयः ' ही वेगळी परिभाषा मानण्याची कांहीं गरज राहत नाहीं, आणि म्हणूनच ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' १-४-२ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं प्रकृत परिभाषेचा स्वीकार करून त्या वेगळ्या परिभाषेचें प्रत्याख्यान केलें आहे. ( ' वाह ऊठ् ' सूं० ३२९ हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे असें ग्रन्थकार लगेच पुढें सांगणार आहेत. तें सूत्र पूर्वीं झालेलें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरतें एवढयाचेंच ज्ञापक असल्यामुळें, ' अन्तरङ्गे कर्तव्ये जातं बहिरङ्गमसिद्धम् ' एवढाच प्रकृतपरिभाषेचा अर्थ मानला पाहिजे. पण तसें मानल्यास, युगपत् प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरणार नाहीं. तें देखील असिद्ध ठरणें इष्ट असल्यामुळें, ' अन्तरङ्गं बहिरङ्गाद्बलीयः ' अशी वेगळी परिभाषा प्राचीन वैयाकरणांनीं मानली आहे. पण प्रकृतपरिभाषेच्या आधारें दोन्ही प्रकारचें— म्हणजे पूर्वीं होऊन गेलेलें व तसेंच युगपत् प्राप्त असलेलें—बहिरङ्गकार्य असिद्ध ठरूं शकत असल्यामुळें ती वेगळी परिभाषा मानण्याची कांहीं गरज नाहीं असें म्हणून, भाष्यकारांनीं त्या वेगळ्या परिभाषेचें प्रत्याख्यान केलें आहे. )

**अन्तरङ्गशास्त्रत्वमस्या लिङ्गम् ॥ इयं च त्रिपाद्यां न प्रवर्तते त्रिपाद्या असिद्धत्वात् । अस्याञ्च वाह ऊठ्सूत्रस्थमूठ्ग्रहणं ज्ञापकमित्येषा सपादसप्ताध्यायीस्था । अन्यथा सम्प्रसारणमात्रविधानेन लघूपधगुणे वृद्धिरेचीति वृद्धौ विश्वौह इत्यादिसिद्धेस्तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव । सत्यां ह्येतस्यां बहिरङ्गसंप्रसारणस्यासिद्धत्वाल्लघूपधगुणो न स्यात् ।**

जेथें अन्तरङ्ग कार्य करणाऱ्या सूत्राची प्राप्ति होते तेथेंच ही परिभाषा उपस्थित होते. ही परिभाषा त्रिपादीस लागू पडत नाहीं; कारण सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें

त्रिपादी असिद्ध आहे. ' वाह ऊठ् ' सू० ३२९ या सूत्रांतील ऊठ्ग्रहण या परिभाषेचें ज्ञापक असल्यामुळें ही परिभाषा सपादसप्ताध्यायींत आहे असें मानलें पाहिजे. (' अन्तरङ्गशास्त्रत्वमस्या लिङ्गम् ' असें म्हटलें असून ' बहिरङ्गशास्त्रत्वमस्या लिङ्गम् ' किंवा ' अन्तरङ्गकार्यत्वमस्या लिङ्गम् ' असें म्हटलें नाहीं याचें कारण हें कीं बहिरङ्गशास्त्र प्रवृत्त होतेवेळीं किंवा अन्तरङ्गकार्य होतेवेळीं ही परिभाषा उपस्थित न होतां, जेथें अन्तरङ्गशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथेंच ही परिभाषा उपस्थित होते. बहिरङ्गकार्यसंपादकसूत्र प्रवृत्त होतेवेळीं ही परिभाषा उपस्थित झाल्यास, ती त्या बहिरङ्गशास्त्रास आपलें कार्य करूं देणार नाहीं व त्यामुळें जेथें बहिरङ्गकार्य झाल्यावर अन्तरङ्गकार्याची प्राप्ति आहे तेथें अन्तरङ्गकार्य प्राप्तच होऊं शकणार नाहीं व त्यामुळें इष्ट रूप सिद्ध होणें अशक्य होईल. अन्तरङ्गकार्य करतेवेळीं ही परिभाषा उपस्थित होते असें मानल्यास, अन्तरङ्गकार्य करणारें त्रिपादीस्थ सूत्र सापादिकशास्त्रदृष्ट्या, ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें, असिद्ध असून देखील तसें अन्तरङ्गकार्य प्रथम होण्याची आपत्ति येईल. म्हणूनच ' अन्तरङ्गशास्त्रत्वमस्या लिङ्गम् ' असें म्हटलें आहे, व त्याचा अर्थ असा होतो कीं बहिरङ्गशास्त्रानें आपलें बहिरङ्गकार्य केल्यावर जेव्हां अन्तरङ्गकार्य करणारें शास्त्र—म्हणजे सूत्र—प्रवृत्त होतें तेव्हांच झालेलें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरविण्याकरितां किंवा युगपत् प्राप्त झालेल्या बहिरङ्गशास्त्राची प्रवृत्ति होऊं न देण्याकरितां व अन्तरङ्गशास्त्रान्वयें प्रथम कार्य व्हावें या करितां ही परिभाषा उपस्थित होते. वास्तविक अन्तरङ्ग व बहिरङ्ग हे परस्परसापेक्ष शब्द आहेत आणि भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं ' बहिरङ्गमन्तरङ्गमिति च प्रतिद्वन्द्विभाविनावेतावर्थौ । कथम् । सत्यन्तरङ्गे बहिरङ्गं सतिच बहिरङ्गेऽन्तरङ्गम् ॥ ' म्हणून जेथें अन्तरङ्गशास्त्राला बहिरङ्गशास्त्र दिसतें व बहिरङ्गशास्त्राला अन्तरङ्गशास्त्र दिसतें तेथेंच तीं शास्त्रें—म्हणजे सूत्रें—परस्परांच्या अपेक्षेनें अन्तरङ्ग व बहिरङ्ग म्हटलीं जातात. जेथें त्रिपादींतील सूत्रानें होणारें कार्य अन्तरङ्ग आहे व सपादसप्ताध्यायींतील सूत्रानें होणारें कार्य बहिरङ्ग आहे तेथें, सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध—म्हणजे नाहींच असें—असल्यामुळें, सापादिक बहिरङ्गशास्त्रास त्रिपादीस्थ सूत्रानें होणारें अन्तरङ्गकार्य दिसत नाहीं व त्यामुळें सापादिक सूत्रानें होणाऱ्या कार्यास बहिरङ्गत्व न येतां तें कार्य होतें. पण जेथें कांहीं विशेष कारणामुळें त्रिपादीस्थ सूत्रास 'पूर्वत्रासिद्धम्' हें सूत्र लागू पडत नाहीं व त्रिपादीस्थ सूत्रानें होणारें कार्य सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें असिद्ध ठरत नाहीं तेथें अन्तरङ्गशास्त्र प्रवृत्त होतेवेळीं ही परिभाषा लागू पडते. जसें, ' आगच्छ हे पयोद ' या स्थलीं ' पयस्+द ' अशा स्थितींत ' ससजुषो रुः ' सू० १६२ या सूत्रानें ' पयस् ' यांतील सकाराला रुत्व होऊन ' पयर्+द ' अशी स्थिति झाली असतां, ' हशि च ' सू० १६६ या सिद्धकांडांतील सूत्राची व तसेंच ' गुरोरनृतोऽनन्त्यस्य ' सू० ९७ या असिद्धकांडांतील सूत्राची युगपत् प्राप्ति होते. ' हशि च ' या सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादींतील रुत्वप्रकरणसंबंधाचीं व प्लुतप्रकरणसंबंधाचीं सूत्रें असिद्ध नाहींत. ' अतो रोरप्लुतादप्लुते ' सू० १६३ या सूत्राच्या टीकेंत दीक्षितांनीं म्हटलें आहे कीं ' उत्वं प्रति

त्त्वस्यासिद्धत्वं तु न भवति । त्त्वमनूद्योत्वविधेः सामर्थ्यात् ॥ ' व तसेंच ' नादिचि ' सू० १६५ या सूत्राच्या टीकेंत त्यांनीं म्हटलें आहे कीं ' अप्लुतात् इति विशेषणे तु तत्सामर्थ्यान्नासिद्धत्वम्. ' वरील उदाहरणांत उत्वकार्य वर्णाश्रयाच्या निमित्तानें होणारें असल्यामुळें अन्तरङ्ग आहे व प्लुतकार्य वाक्याच्या आश्रयानें होणारें असल्यामुळें बाहिरङ्ग आहे. या स्थलीं प्रकृतपरिभाषा प्रवृत्त न झाल्यास प्लुताचें सूत्र पर असल्यामुळें, ' पूर्वात्परं बलवत् ' या न्यायान्वयें प्लुत होईल आणि उत्व होणार नाहीं व त्यामुळें ' पयोद ' हें इष्ट रूप सिद्ध होणार नाही. पण अन्तरङ्गशास्त्राची प्रवृत्ति होतेवेळीं ही परिभाषा उपस्थित होते असें मानलें असल्यामुळें, ही परिभाषा उपस्थित होऊन ' गुरोरनृतः ' या सूत्रानें होणारें प्लुतरूपी बहिरङ्गकार्य होऊं न देतां 'हशि च' या सूत्रानें अन्तरङ्गकार्य होऊं देते. जेथें त्रिपादींतील सूत्र ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें किंवा त्रिपादींतील पूर्वसूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतें तेथें त्या सूत्रानें होणाऱ्या कार्यास–मग तें कार्य अन्तरङ्ग असो किंवा बहिरङ्ग असो– ही परिभाषा लागत नाहीं. जसें, ' राज्ञः=राजन्+शस् ' येथें ' अल्लोपोऽनः ' सू० २३४ या सापादिक सूत्रानें झालेला शस्प्रत्ययनिमित्तक बहिरङ्ग अल्लोप, ' स्तोः श्चुना श्चुः ' सू० १११ या त्रैपादिक सूत्रान्वयें अन्तरङ्ग कार्य करण्याचा प्रसंग आला असतां, असिद्ध ठरत नाहीं. तसेंच ' अभिषेणयति ' या स्थलीं ' उपसर्गात्सुनोति ' सू० २२७० या पूर्व सूत्रान्वयें होणारें षत्वकार्य पदद्वयनिमित्तक असल्यामुळें बहिरङ्ग आहे व 'अट्कुप्' सू० १९७ या उत्तर सूत्रानें होणारें णत्वकार्य एकपदनिमित्तक असल्यामुळें अन्तरङ्ग आहे. तरी पण दोन्हीं कार्यें त्रिपादीस्थ सूत्रांनीं होणारीं असल्यामुळें व या परिभाषेला तीं सूत्रें दिसत नसल्यामुळें, अशा ठिकाणीं ही परिभाषा प्रवृत्त होत नाहीं व त्यामुळें षत्व पूर्वी होऊन णत्व होतें. ही परिभाषा जरी अष्टाध्यायींत पठित नाहीं तरी ' वाह ऊठ् ' हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक असल्यामुळें ही परिभाषा त्या सूत्राजवळच पठित आहे असें मानलें पाहिजे व अशा रीतीनें ती सपादसप्ताध्यायीस्थ ठरत असल्यामुळें तिच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे व त्यामुळें ती त्रिपादीस लागू पडत नाहीं असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे. ) जर ही परिभाषा नसती तर, केवळ सम्प्रसारण व्हावें असें सांगितलें असतें तरी लघूपधगुण होऊन व नंतर ' वृद्धिरेचि ' सू० ७२ या सूत्रानें वृद्धि होऊन ' विश्वौहः ' इत्यादि रूपें सिद्ध झालींच असतीं व ' वाह ऊठ् ' या सूत्रांतील ऊठ्ग्रहण व्यर्थ ठरलें असतें. परंतु ही परिभाषा असल्यामुळें बहिरङ्गसम्प्रसारणकार्य असिद्ध ठरून लघूपधगुण झाला नसता. ( व ' विश्वौहः ' असें रूप सिद्ध झालें नसतें. ' वाह ऊठ् ' या सूत्रांतील ' ऊठ् ' ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे हें सिद्ध करण्याकरितां वरील पंक्ति आहे. ही परिभाषा नसती तर केवळ ' वाहः ' एवढेंच सूत्र पुरें होतें; व पाणिनीनें तेवढेंच सूत्र केलें असतें. ह्या सूत्रापूर्वीं ' वसोः सम्प्रसारणम् ' हें सूत्र आहे, व त्या सूत्रांतील ' सम्प्रसारणम् ' ह्या शब्दाची ' वाहः ' येथें अनुवृत्ति झाली असती, व त्यायोगानें ' वाहः ' या सूत्राचा अर्थ ' भस्य वाहः सम्प्रसारणं स्यात् '

असा झाला असता, व ह्या सूत्रानें संप्रसारण होऊन ' विश्वौहः ' असें रूप, ही परिभाषा नसती तर, सिद्ध झालेंच असतें. तें कसें सिद्ध झालें असतें हें खालीं दिलेल्या प्रक्रियेवरून स्पष्ट होईल. ' वहश्च ' सू० ३४१० ह्या सूत्रानें ' वह् ' धातूला ' ण्वि ' प्रत्यय होऊन, ' अत उपधायाः ' सू० २२८२ ह्या सूत्रानें उपधादीर्घ होऊन, ' विश्व + वाह् + ण्वि + शस् ' अशी स्थिति झाली असतां, ' वाहः ' ह्या सूत्रानें ' व् '-चें संप्रसारण होऊन, ' विश्व + उ + आह् + ण्वि + शस् ' असें होऊन, व नंतर ' सम्प्र-सारणाच्च ' सू० ३३० ह्या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन, ' विश्व+उह् + ण्वि + शस् ' असें झालें असतें; नंतर ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ ह्या सूत्रानें ' उह् ' यां-तील ' उ ' ह्या उपधेचा गुण होऊन, ' विश्व + ओह् + ण्वि ( व् ) + शस् ' अशी स्थिति झाली असतां, ' वेरपृक्तस्य ' सू० ३७५ ह्या सूत्रानें ' ण्वि ' म्हणजे ' व् 'चा लोप होऊन, व ' वृद्धिरेचि ' सू० ७२ ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन, ' वि-श्वोह् + ० + शस् = विश्वौह् + अस् = विश्वौहः ' असें रूप सिद्ध झालें असतें. परंतु ही परिभाषा असल्यामुळें, ' वाह ऊठ् ' असें ऊठ्विधायक सूत्र जर नसतें व केवळ ' वाहः ' एवढेंच सम्प्रसारणविधायक सूत्र असतें तर, ' विश्वौहः ' हें रूप सिद्ध होऊं शकलें नसतें; कारण ' विश्व+वाह्+ण्वि+शस् ' अशा स्थितींत, ' शस् ' प्रत्ययाला मानून होणारें संप्रसारण बहिरङ्ग व असिद्ध ठरलें असतें; व तें, ह्या परिभाषेप्रमाणें झालेंच नाहीं—ह्मणजे वाह् ह्याचें ' उ+आह्=उह् ' असें रूप झालेंच नाहीं, व तें ' वाह् ' असेंच आहे—असें मानणें भाग पडलें असतें; आणि त्यामुळें, ' ण्वि ' प्रत्ययामुळें ' पुगन्तलघूपधस्य च ' ह्या सूत्रानें होणारा उपधेचा गुण होऊं शकला नसता, व ' विश्व+उह्+शस्=विश्वोहः ' असें ' अद्गुणः ' सू० ६९ ह्या सूत्रानें रूप सिद्ध झालें असतें. पण ' वाह् ऊठ् ' ह्या सूत्रांत ' ऊठ् ' ग्रहण केलें असल्यामुळें, ' विश्वौहः ' असें रूप सिद्ध होण्यास कांहींच अडचण पडत नाहीं हें खालील दिलेल्या प्रक्रियेवरून स्पष्ट होईल. ' विश्व+वाह्+ण्वि + शस् ' ह्या स्थितींत, ' वाह ऊठ् ' ह्या सूत्रानें ' ऊठ् ' होऊन, ' विश्व+ऊ+आह्+ण्वि+शस् ' अशी स्थिति झाली असतां, ऊठ् ह्याला संप्रसारणसंज्ञा असल्यामुळें, ' सम्प्रसारणाच्च ' सू० ३३० ह्या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन, आणि ' वेरपृक्तस्य ' सू० ३७५ ह्या सूत्रानें ' ण्वि=व् ' लोप होऊन व नंतर ' एत्येधत्यूठ्सु ' सू० ७३ ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन ' विश्वौहः ' असें रूप सिद्ध होतें. यावर कित्येक वैयाकरण असें ह्मणतात कीं, ' विश्वौहः ' या ठिकाणीं शस्प्रत्ययनिमित्तक सम्प्रसारण बहिरङ्ग असलें तरी ' सम्प्रसारणाच्च ' सू ३३० या सूत्रान्वयें होणाऱ्या पूर्वरूपएकादेशानें तें सम्प्रसारण कायम राहत नसल्यामुळें व पूर्वरूपएकादेश बहिरङ्ग व असिद्ध नसल्यामुळें, ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रानें ' उह् ' यांतील उकाराला गुण होऊन व ' वृद्धिरेचि ' या सूत्रानें वृद्धि होऊन ' विश्वौहः ' हें रूप सिद्ध होण्यांत अडचण येत नाहीं. पण हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ' हलः ' सू० २५५९ या सूत्राचा ' अङ्गावयवाद्धलः परं यत्सम्प्रसारणं तदन्ताङ्गस्य दीर्घःस्यात् '

असा अर्थ असल्यामुळें, पूर्वरूपएकादेश संप्रसारणतुल्य मानला आहे हें स्पष्ट होतें. म्हणून जसें संप्रसारण बहिरङ्ग व असिद्ध ठरतें त्याचप्रमाणें एकादेश देखील बहिरङ्ग व असिद्ध ठरतो. इतर वैयाकरण या शंकेचें अशा रीतीनें निरसन करितात कीं, 'संप्रसारणाच्च' या सूत्रान्वयें संप्रसारणापुढें असणाऱ्या अचाचीच केवळ निवृत्ति सांगितली आहे. त्यामुळें संप्रसारणापुढील अच् निवृत्त होऊन संप्रसारण जसेंचें तसेंच कायम राहतें, व तें शस्प्रत्ययनिमित्तक संप्रसारण बहिरङ्ग व असिद्ध असल्यामुळें, गुणकार्य होऊं शकत नाहीं म्हणून 'वाह ऊठ्' या सूत्रांतील ऊठ्ग्रहण चरितार्थ होऊन या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. आतां दुसरी शंका अशी कीं वरील उदाहरणांत जें संप्रसारण होतें तें शस्प्रत्ययाच्या निमित्तामुळें होत नसून भसंज्ञेच्या निमित्तामुळें होतें, व 'संज्ञानिमित्तकं बहिरङ्गत्वन्न' आणि तसेंच 'परंपरया निमित्तत्वमादाय बहिरङ्गत्वाश्रयणे तु न मानम्' असे दोन सिद्धांत नुकतेच वर सांगितले असल्यामुळें, परंपरेनें शस्निमित्तामुळें झालेलें पण वास्तविक भसंज्ञेमुळें झालेलें संप्रसारण बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं आणि त्यामुळें लघूपधगुण व वृद्धि होऊन 'विश्वौहः' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'विश्व+वाह्+शस्' या स्थलीं 'विश्व' हें कर्मणि उपपद व त्यापुढें 'वह्' धातूचें ण्विप्रत्ययान्त रूप या दोन पदांना मानून भसंज्ञा होणारी असल्यामुळें आणि भसंज्ञा होण्याकरितां निमित्त अवश्य आक्षित करावें लागत असल्यामुळें, भसंज्ञानिमित्तक संप्रसारणकार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरविलें आहे. म्हणून संप्रसारणकार्य बहिरङ्ग व असिद्ध नाहीं हें म्हणणें चूक ठरतें. )

**न च पुगन्तेतिसूत्रेनिमित्तमिको विशेषणमत एव भिनत्तीत्यादौ न गुणः, एवं च नाजानन्तर्य्य इति निषेधात्कथं परिभाषाप्रवृत्तिरिति-वाच्यम् । प्रत्ययस्याङ्गांश उत्थिताकाङ्क्षत्वेन तत्रैवान्वयात् । पुगन्तेत्यादौ कर्मधारयाश्रयणेनप्रत्ययपराङ्गावयवलघूपधारूपेको गुण इतीको गुणवृद्धी इति सूत्रभाष्यसम्मतेऽर्थे भिनत्तीत्यादावदोषाच्च ॥**

( शङ्काकार अशी शङ्का करितो कीं ) 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ या सूत्रांत ( सार्वधातुकार्धधातुकप्रत्ययरूपी ) निमित्त 'इक्' याचें विशेषण आहे, आणि म्हणूनच 'भिनत्ति' इत्यादि स्थलीं गुण होत नाहीं आणि अशा रीतीनें 'नाजानन्तर्ये' ( प. ५१ ) ही परिभाषा असल्यामुळें, ( 'विश्वौहः' या उदाहरणांत ) प्रकृत परिभाषा लागूच पडूं शकत नाहीं. ( 'ऊठ्' ग्रहण या परिभाषेचें ज्ञापक आहे व 'वाह ऊठ्' या सूत्रांत 'ऊठ्' ग्रहण नसतें तर 'विश्वौहः' हें रूप सिध्द होऊं शकलें नसतें असें वर सांगितलें आहे. यावर शङ्काकार अशी शङ्का करितो कीं 'वाह ऊठ्' या सूत्रांत 'ऊठ्' ग्रहण नसतें तरी 'विश्वौहः' असें रूप सिद्ध होऊं शकलें असतें. म्हणून 'वाह ऊठ्' या सूत्रांतील 'ऊठ्' ग्रहण या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं; कारण 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रांत 'सार्वधातुकार्धधातुकयोः' या पूर्वसू-

त्राची अनुवृत्ति आहे, व या पूर्वसूत्राचा अर्थ ' सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतां ' असा आहे. असा प्रत्यय पुढें असणें हें जें निमित्त तें, अङ्गाचें विशेषण नसून इक् चें विशेषण आहे व ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रांतील ' पुगन्त व ' लघूपध ' हे शब्द बहुव्रीहि समासानें तयार झालेले सामासिक शब्द असून ते अङ्गाचीं विशेषण आहेत म्हणून ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, ' पुगन्तं वा लघूपधं यदङ्गं तदवयवभूतस्य सार्वधातुकार्धधातुकप्रत्ययपरकस्य इकः गुणः स्यात् '— म्हणजे पुगन्त किंवा लघूपध अङ्ग असून त्या अङ्गाचा अवयव इक् असल्यास व त्या इकापुढें सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय हें निमित्त असल्यास, त्या इकाला गुण होतो. अशा तऱ्हेचा या सूत्राचा अर्थ केल्यास ' भिनत्ति ' इत्यादि स्थलीं इकारास गुण होत नाहीं; कारण 'भिनद्+तिप्' या ठिकाणीं 'भिनद्' हें अङ्ग असून व 'भि' यांतील इकार त्या अङ्गाचा अवयव असून देखील, त्या इकारापुढें ' तिप् ' हा सार्वधातुक प्रत्यय नाहीं. इकार व ' तिप् ' प्रत्यय या दोहोंत एकपेक्षां अधिक वर्णांचें व्यवधान आहे व ' येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि परनिमित्तकं कार्यं भवति ' असा न्याय असल्यामुळें, जेथें लघूपधेचा गुण होणें सांगितलें आहे तशा ठिकाणीं केवळ एक वर्णाचेंच व्यवधान सहन करितां येते; जास्त वर्णांचें व्यवधान असल्यास, गुण होऊं शकत नाहीं, व त्यामुळें ' भिनत्ति ' या अङ्गांतील इकाराला गुण होत नाहीं. आणि ' नाजान तर्ये ' ही निषेधात्मक परिभाषा असल्यामुळें व त्या परिभाषेचा अर्थ अचाच्या अनन्तर—म्हणजे लगेंच पुढें असणाऱ्या—निमित्तामुळें होणारें कार्य करतेवेळीं पूर्वी झालेलें बहिरङ्ग कार्य बहिरङ्ग ठरत नाहीं असा असल्यामुळें, ' विश्वौहः ' या स्थलीं, प्रकृतपरिभाषा लागूच पडत नाहीं; कारण ' विश्व+वाह् +ण्वि+शस्=विश्व+उ+आह्+ण्वि+शस्=विश्व+उह्+ण्वि+शस् ' अशा स्थितींत ज्यांत लघूपधाभूत अच् जो उकार आहे तशा ' उह् ' या अङ्गापुढें ' ण्वि ' हा आर्धधातुक प्रत्यय असल्यामुळें, त्या प्रत्ययरूपी निमित्तानें ' उह् ' यांतील उपधाभूत उकारास गुण कार्य करितांना, पुढें असलेल्या ' शस् ' प्रत्ययरूपी निमितामुळें ' वाह् ' यांतील वकारास झालेलें उकाररूपी सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग मानतां येत नाहीं, व त्यामुळें उकारास गुण होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं; व गुण झाला म्हणजे ' विश्व +ओह्+ण्वि+शस् ' अशी स्थिति होऊन व ' वेरपृक्तस्य ' या सूत्रानें ' ण्वि '—म्हणजे व्—चा लोप होऊन व ' वृद्धिरेचि ' या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन ' विश्वौहः ' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण ग्रन्थकार म्हणतात कीं,) हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण प्रत्ययाला अङ्गाची आकांक्षा असल्यामुळें म्हणजे प्रत्यय हा नेहमी अङ्गास लागत असून, प्रत्यय म्हटला कीं, अङ्गाची अवश्य उपस्थिति होत असल्यामुळें प्रत्ययाचा अङ्गाचे ठिकाणीं अन्वय होणें-म्हणजे प्रत्यय इकाचें विशेषण न होतां अङ्गाचें विशेषण होणें—हेंच योग्य आहे. दुसरें असें कीं ' इको गुणवृद्धी ' १–१–३ या सूत्रावरील भाष्यांत सांगितल्याप्रमाणें पुगन्त व लघूपध या शब्दांचा (बहुव्रीहि समास न करितां) कर्मधारय समास केला असतां, ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्राचा सार्वधा-

तुकार्धधातुकप्रत्ययपरकं यदङ्गं तदवयवस्य लघूपधारूपस्य इको गुणो भवति ' असा अर्थ होऊन 'भिनत्ति' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. (' सार्वधातुकार्धधातुकयोः ' व ' पुगन्तलघूपधस्य च ' हीं अङ्गाधिकारांतील सूत्रें आहेत. त्या अधिकारांत पठित असलेल्या सर्व सूत्रांत ' अङ्गस्य ' हें अधिकारसूत्र अनुवृत्त होतें व अङ्ग आणि प्रत्यय यांना परस्परांची आकांक्षा असल्यामुळें प्रत्यय याचा अङ्गांत अन्वय करणें—म्हणजे प्रत्ययाला इकाचें विशेषण न मानतां अङ्गाचें विशेषण मानणें—हेंच योग्य ठरतें. त्याचप्रमाणें 'पुक् अन्ते यस्य तत्पुगन्तम्' व 'लघ्वी उपधा यस्य तत् लघूपधम्' असा 'पुगन्त' व 'लघूपध' या दोन शब्दांचा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि समास करून त्यांना अङ्गाचें विशेषण न मानतां त्यांचा 'पुकि अन्तः पुगन्तः, लघ्वी उपधा लघूपधा, तयोः समाहारः पुगन्तलघूपधम् ' अशा तऱ्हेनें भाष्यकारांनीं जो समास केला आहे तसाच समास करणें इष्ट आहे. तसें केलें असतां ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रांत ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' व ' अङ्गस्य ' हीं दोन सूत्रें अनुवृत्त होत असल्यामुळें त्या सूत्राचा, सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय ज्या अङ्गाच्या पुढें येतो त्या अङ्गाच्या उपधाभूत इकाला गुण होतो असा अर्थ होतो; व असा अर्थ केला म्हणजे लगेंच पुढें सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय असणें हें इकाच्या गुणाचें साक्षात् निमित्त न ठरतां परंपरेनें निमित्त ठरतें व त्यामुळें ' नाजानन्तर्यें , ही परिभाषा ' विश्वौहः ' या उदाहरणांत उपधाभूत उकाराचा गुण करतेवेळीं लागू पडत नाहीं. ती परिभाषा अशाच ठिकाणीं लागू पडते कीं ज्या अचाला कार्य करणें आहे त्या अचाला कार्य होण्याचें सूत्रनिर्दिष्टनिमित्त त्या अचाच्या लगेंच पुढें आहे. तशी स्थिति वर सांगितल्याप्रमाणें प्रकृतउदाहरणांत उपलब्ध नसल्यामुळें पूर्वीं झालेल्या संप्रसारण कार्याचें बहिरङ्गत्व नष्ट होऊं शकत नाहीं व त्यामुळें उकारास गुण होऊं शकत नाहीं, आणि ' विश्वौहः ' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. म्हणून ' वाह ऊठ् ' हें सूत्र आवश्यक आहे आणि वर सांगितल्याप्रमाणें त्या सूत्रांतील ऊठ्ग्रहण या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. पण हें नागेशाचें म्हणणें पुष्कळ टीकाकारांस मान्य नसून ते असें म्हणतात कीं ' पुगन्तलघूपधस्य च ' या सूत्रान्वयें उपधेंतलि इकाला गुण होण्याकरितां, ज्याप्रमाणें ' येन नाव्यवधानम् ' या न्यायान्वयें एकवर्णाचें व्यवधान सह्य मानलें आहे तसें ' नाजानन्तर्यें ' ही परिभाषा लागण्याकरितां एकवर्णाचें व्यवधान सहन करण्याकरितां कोणतेंच प्रमाण नाहीं अशा रीतीनें वास्तविक नागेशानें वरील शंकेचें समाधान करावयास पाहिजे होतें; व तशा रीतीनें नागेशानें वरील शंकेचें उत्तर दिलें असतें तर ' विश्व+उह्+ण्वि+शस् ' या स्थलीं ज्या उकाराला गुण होणें आहे त्या उकारांत व ण्वि प्रत्ययांत हकाराचें व्यवधान असल्यामुळें वकारास झालेल्या उकाररूपी संप्रसारण कार्याचें बहिरङ्गत्व नष्ट होत नाहीं व त्यामुळें उकारास गुण होऊं शकत नाहीं. म्हणून ' वाह ऊठ् ' या सूत्रांतील ऊठ्ग्रहण चरितार्थ होऊन या परिभाषेचें ज्ञापक ठरतें.)

अकारान्तोपसर्गेऽनकारान्ते चोपपदे वहेर्वाहेर्वा ण्विविचावनभिधाना-न्न स्त एव । वार्यूहेत्यादि तूहतेः क्विपि बोध्यम् । धातूनामनेकार्थत्वान्नार्था-सङ्गतिः । प्रौह इत्याद्यसाध्वेव वृद्धेरप्राप्तेः अस्योहस्यानर्थक्यान्न प्रादूहोढो ढ्यस्यापि प्रवृत्तिः ॥

( आतां शंकाकार अशी शंका करतो कीं 'प्र' इत्यादि उपसर्गांपुढें किंवा 'वारि' इत्यादि अनकारान्त उपपदांपुढें 'वह्' धातूचें ण्विप्रत्ययान्त रूप किंवा 'वाह्' धातूचें विच्प्रत्ययान्त रूप आलें असतां 'प्रौहः' व 'वार्यूहा' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां 'वाह ऊठ्' या सूत्रांत ऊठ्ग्रहण केलें आहे, व तशा रीतीनें तें ऊठ्ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. शंका-कार ह्मणतो कीं जर 'वाह ऊठ्' हें सूत्र नसतें तर 'प्रवाह्' या शद्वाच्या द्विती-येच्या बहुवचनाचें 'प्रौहः' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, 'प्रोहः' असें विकृत रूप झालें असतें; जसें 'ऊठ्' न करितां संप्रसारण केलें असतें तर 'प्र+वह्+ण्वि+शस् =प्रवाह्+ण्वि+शस्=प्र+उ+अ.ह्+ण्वि+शस्=प्र+उह्+ण्वि+शस्=प्र+ओह्+० +अस्' अशी स्थिति होऊन, 'एङि पररूपम्' सू० ७८ या सूत्रानें पररूप एकादेश केल्यावर 'प्रोहः' असें रूप झालें असतें. पण 'वाह ऊठ्' हें सूत्र असल्यामुळें 'प्र+वाह्+शस् =प्र+ऊ+आह्+शस्=प्र+ऊह्+अस्' अशी स्थिति होऊन 'एत्येधत्यूठ्सु' सू० ७३ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'प्रौहः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. तसेंच 'वारि +वाह्+विच्+टा' अशा स्थितींत ऊठ् न करितां संप्रसारण केल्यास, 'वारि+उ+आह विच्+टा=वारि+उह्+विच्+टा' अशी स्थिति झाली असतां, 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रानें 'उह्' यांतील लघूपधाभूत उकारास गुण होऊन 'वारि+ओह्+०+आ' अशी स्थिति झाल्यावर, 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश होऊन 'वार्योहा' असें विकृत रूप सिद्ध झालें असतें. पण ऊठ् केल्यास, 'वारि+वाह्+विच्+टा=वारि +ऊ +आह्+विच्+टा=वारि+ऊह्+विच्+टा' अशा स्थितींत 'ऊह्' यांतील उपधा ऱ्हस्व नसल्यामुळें, 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रानें गुण न होतां, 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश होऊन 'वार्यूहा' असें इष्ट रूप सिद्ध होतें. या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) अकारान्त उपसर्गांपुढें किंवा अनकारान्त उपपदापुढें 'वह्' धा-तूचें ण्विप्रत्ययान्त किंवा 'वाह्' धातूचें विच्प्रत्ययान्त रूप येतच नाहीं; कारण भाषेंत अशा शद्वांचा प्रयोग कोठेंहि केलेला आढळत नाहीं. ( 'वार्यूहा' या शद्वाचा प्रयोग भाषेंत आढळतो हें खरें ) पण अशा प्रकारचे शद्वप्रयोग 'ऊह्' धातूला क्विप्प्रत्यय लागून सिद्ध झाले आहेत असें समजावें ( 'वाह्' धातूला विच्प्रत्यय लागून तशीं रूपें सिद्ध झालीं आहेत असें समजूं नये. 'ऊह्' धातूचा 'ऊह् वितर्के' असा अर्थ आहे तरी ) प्रत्येक धातूचे अनेक अर्थ असल्यामुळें, व धातूपाठांत धातूचे सर्व अर्थ न देतां केवळ प्रसिद्ध अर्थ दिले असल्यामुळें, 'ऊह्' धातूचा अर्थ 'ऊह् प्रापणे'

असा केल्यास, ' वार्यूहा ' इत्यादि शब्दांचा वास्तविक जो अर्थ आहे त्या ) अर्थाचा बोध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ' प्रौहः ' इत्यादि रूपें अशुद्धच आहेत; कारण अशा स्थलीं ( ' ऊठ् ' च्या अभावामुळें ) कोणत्याहि सूत्रानें वृद्धीची प्राप्ति नाहीं. तसेंच ' प्रौहः ' इत्यादि स्थलीं ' ऊह ' हा शब्द अनर्थक असल्यामुळें ' प्रादूहोढोढ्येषैष्येषु '–सू० ७३ वरील वार्तिक–या वार्तिकाची देखील प्राप्ति नाहीं ( ' प्र+ऊह्+क्विप् +शस्=प्र+ऊह्+०+अस् ' येथील ' ऊह ' शब्द अनर्थक आहे; कारण तो शस्प्रत्ययाचा एकदेश ' अ ' व ' ऊह् ' या दोहोंचा संधि होऊन तयार झाला आहे. हा ' ऊह ' शब्द घञन्त ' ऊह ' शब्दाप्रमाणें अर्थवान् नाहीं. म्हणून ' अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य '–परिभाषा १४–या परिभाषेप्रमाणें वरील वार्तिकांत सांगितलेल्या ' ऊह ' या अर्थवान् शब्दानें, वर सांगितल्याप्रमाणें संधीनें बनलेल्या ' ऊह ' या अनर्थक शब्दाचें, ग्रहण होऊं शकत नाहीं; आणि त्यामुळें ' प्र+ऊह ' येथें वरील वार्तिकान्वयें वृद्धिरूप एकादेश होऊं शकत नाहीं आणि ' प्रौहः ' असें रूप कोणत्याहि तऱ्हेनें सिद्ध होऊं शकत नाहीं )

**न च कार्य्यकालपक्षे त्रिपाद्यामेतत्प्रवृत्तिर्दुर्वारेति वाच्यम् । पूर्वं प्रति परस्यासिद्धत्वादन्तरङ्गाभावेन पूर्वस्य तन्निरूपितबहिरङ्गत्वाभावात्तया तस्यासिद्धत्वप्रतिपादनासम्भवात् । न चानया पूर्वस्यासिद्धत्वात्तदभावेन तं प्रति परासिद्धत्वं पूर्वत्रेत्यनेन वक्तुमशक्यमिति वाच्यम् । एवं हि विनिगमनाविरहादुभयोरप्यप्रवृत्त्यापत्तेः । किं च पूर्वत्रेत्यस्य प्रत्यक्षत्वेन तेनानुमानिक्या अस्या बाध एवोचितः । अतः कार्यकालपक्षेऽपि त्रिपाद्यामस्या अनुपस्थितिरेव ॥**

( शंकाकार अशी शंका करतो कीं, जरी ही परिभाषा यथोद्देशपक्षांत त्रिपादीस लागू पडत नाहीं तरी ) कार्यकालपक्षांत परिभाषेची त्रिपादीमध्यें प्रवृत्ति बंद करणें अशक्य आहे–पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ( ' पूर्वत्रासिद्धम् ' सू० १२ या सूत्रान्वयें ) सपादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें त्रिपादींतील परसूत्र असिद्ध ठरत असल्यामुळें ( परसूत्र अन्तरङ्गकार्य करणारें असलें व पूर्वसूत्र बहिरङ्गकार्य करणारें असलें तरी बहिरङ्गकार्य करणाऱ्या सापादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें अन्तरङ्गकार्य करणारें त्रिपादींतील परसूत्र असिद्ध ठरतें व त्यामुळें त्रिपादींतील परसूत्रानें होणाऱ्या अन्तरङ्गकार्याला ) अन्तरङ्गत्व येऊं शकत नाहीं, व त्या त्रैपादिक परसूत्राच्या दृष्टीनें सापादिक पूर्वसूत्रानें होणाऱ्या कार्याला बहिरङ्गत्व येऊं शकत नाहीं; आणि प्रकृतपरिभाषेनें त्या बहिरङ्गकार्य करणाऱ्या सापादिक पूर्वसूत्रास असिद्ध ठरवितां येणें अशक्य आहे. ( आतां शंकाकार अशी शंका करतो कीं ) या परिभाषेच्या आधारें बहिरङ्गकार्य करणारें सापादिक पूर्वसूत्र अन्तरङ्गकार्य करणाऱ्या त्रैपादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध–म्हणजे तें विद्यमानच नाहीं असें–ठरत असल्यामुळें, ' पूर्वत्रासिद्धम् ' या सूत्रांतील ' पूर्वत्र ' या शब्दानें त्या बहिरङ्गकार्य करणाऱ्या सापादिक पूर्वसूत्राचें ग्रहणच होऊं शकणार नाहीं व अशा रीतीनें बहिरङ्गकार्य करणारें सापा-

दिक पूर्वसूत्र अन्तरङ्गकार्य करणाऱ्या त्रैपादिक परसूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरेल. ( व बहिरङ्गकार्य करणाऱ्या सापादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें अन्तरङ्गकार्य करणारें त्रैपादिक परसूत्र असिद्ध ठरूं शकणार नाहीं. पण ग्रन्थकार म्हणतात कीं ) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण या परिभाषेप्रमाणें अन्तरङ्गकार्य करणाऱ्या त्रैपादिक परसूत्राच्या दृष्टीनें बहिरङ्गकार्य करणारें सापादिक पूर्वसूत्र असिद्ध ठरणार, व ' पूर्वत्रासिद्धम् ' या सूत्रान्वयें सापादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें त्रैपादिक परसूत्र असिद्ध ठरणार. अशा रीतीनें एकमेकांच्या दृष्टीनें एकमेक असिद्ध ठरल्यामुळें व दोहोंतून कशाचें ग्रहण करावें ( व कोणत्या सूत्रास सिद्ध व कोणत्या सूत्रास असिद्ध मानावें ) हें ठरविण्याचें कोणतेंहि साधन उपलब्ध नसल्यामुळें, प्रकृतपरिभाषा व ' पूर्वत्रासिद्धम् ' हें सूत्र हीं दोन्हीं प्रवृत्त होऊं शकणार नाहींत. ( व त्यामुळें कोणतें सूत्र सिद्ध व कोणतें असिद्ध हें ठरवितां येणें अशक्य होणार. ) दुसरें असें कीं ' पूर्वत्रासिद्धम् ' हें सूत्र अष्टाध्यायींत प्रत्यक्ष पठित असल्यामुळें व प्रकृतपरिभाषा केवळ अनुमानाच्या आधारावर रचली असल्यामुळें—म्हणजे ' वाह ऊठ् ' या सूत्रांतील ऊठ् ग्रहणरूपी ज्ञापकाच्या आधारें मानली असल्यामुळें—प्रत्यक्ष पठित सूत्रानें—म्हणजे ' पूर्वत्रासिद्धम् ' या सूत्रानें—प्रकृत आनुमानिकी परिभाषेचा बाध होणें हेंच योग्य ठरतें. म्हणूनच कार्यकालपक्षांत देखील ही परिभाषा त्रिपादींत मुळींच उपस्थित होत नाहीं असेंच मानलें पाहिजे ( आणि असें आहे म्हणूनच जेथें एखाद्या स्थलीं अन्तरङ्गकार्य करणाऱ्या त्रैपादिक सूत्राची व बहिरङ्गकार्य करणाऱ्या सापादिक सूत्राची युगपत् प्राप्ति होते तेथें ही परिभाषा मुळींच लागू पडत नाहीं व 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रान्वयें त्रैपादिक सूत्र अन्तरङ्गकार्य करणारें असून देखील असिद्ध ठरतें व बहिरङ्गकार्य करणारें सापादिक सूत्रच प्रवृत्त होतें. जसें ' मनोरथ=मनस्+रथ ' या उदाहरणांत ' ससजुषो रुः ' या सूत्रानें रुत्व होऊन ' मनर्+रथ ' अशी स्थिति झाली असतां, अन्तरङ्गकार्य करणाऱ्या ' रो रि ' सू० १७३ या त्रैपादिक सूत्राची व तसेंच बहिरङ्गकार्य करणाऱ्या ' हशि च ' सू० १६६ या सापादिक सूत्राची युगपत् प्राप्ति होते. ' हशि च ' या सूत्राच्या दृष्टीनें ' रो रि ' हें सूत्र असिद्ध ठरत असल्यामुळें, ' रो रि ' हें सूत्र प्रवृत्त न होतां ' हशि च ' हें सूत्र प्रवृत्त होऊन ' मनोरथ ' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

**अत एव कार्यकालपक्षमेवोपक्रम्योक्तयुक्तीरुक्त्वाऽयुक्तोऽयं परिहारो न वा बहिरङ्गलक्षणत्वादित्युक्तं विसर्जनीयसूत्रे भाष्ये सिद्धान्तिना । त्रिपादीस्थेऽन्तरङ्गे कर्तव्येऽयं परिहारो न युक्त इति तदर्थः । किं तु वचनमेवारब्धव्यमिति तदाशयः ॥**

( यथोद्देशपक्षांत व तसेंच कार्यकालपक्षांत ही परिभाषा त्रिपादीस लागू पडत नाहीं, ) ह्मणूनच, ' खरवसानयोर्विसर्जनीयः ' ८–३–१५ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं कार्यकालपक्षाचा उपक्रम करून व वर सांगितलेल्या युक्तींचा अनुवाद करून (' विसर्जनीयोऽनुत्तरपदे ' हें वार्तिक अवश्य आहे काय ह्या संबं-

धानें विचार करितांना जेव्हां अशी शंका निघाली कीं, हें वार्तिक असण्याची मुळींच गरज नाहीं, कारण वृद्धि बहिरङ्ग ठरत असल्यामुळें रेफाचा विसर्जनीय होऊंच शकत नाहीं; तेव्हां ह्या शंकेचें उत्तर देतांना ) भाष्यकार सिद्धान्तपक्ष सांगतेवेळीं असें ह्मणतात कीं, अशा रीतीनें ( वृद्धीच्या ) बहिरङ्गत्वामुळें वार्तिक व्यर्थ ठरविणें अयोग्य आहे. ह्या भाष्याचा आशय हा आहे कीं, त्रिपादींत पठित असलेल्या सूत्रानें जेथें अन्तरङ्ग कार्य करणें आहे तेथें ( अन्तरङ्गपरिभाषेचा आधार घेऊन, ) आलेल्या अड-चणीचा परिहार करणें योग्य नाहीं व वरील वार्तिकाचें अवश्य पठण केलें पाहिजे. (' नृपतेः अपत्यं पुमान् नार्पत्यः ' ह्या उदाहरणांत, ' दित्यदित्यादित्युपत्युत्तर-पदाण्ण्यः ' सू० १०७७ ह्या सूत्रानें अपत्यार्थें ' ण्य ' प्रत्यय होऊन, ' तद्धितेष्वचा-मादेः' सू० १०७५ ह्या सूत्रानें आद्यच् ' ऋ ' ला वृद्धि होऊन व ' यस्येति च ' सू० ३११ ह्यानें इकाराचा लोप होऊन, ' नार्पत्यः ' असें रूप होतें; जसें– 'नृपति+ ण्य = नार्पति + ण्य = नार् + पत् + ण्य ( य ) = नार्पत्यः '. ह्या उदाहरणांत प्रश्न असा निघतो कीं, ' नार् ' ह्या पदांत पदान्तीं असलेल्या ' र् 'चा ' खरव-सानयोर्विसर्जनीयः ' सू० ७६ ह्या सूत्रानें विसर्ग कां होऊं नये ? वास्तविक या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन, ' विसर्जनीयस्य सः ' सू० १३८ ह्या सूत्रानें विसर्गाचा सकार झाला पाहिजे. असें न व्हावें ह्मणून वार्तिककारांनीं ' विसर्जनीयोऽनुत्तरपदे ' असें वार्तिक मुद्दाम केलें आहे. ह्या वार्तिकान्वयें पुढें उत्तरपद असल्यामुळें, रेफाचा विसर्ग न होतां, तो जसाचा तसाच राहतो. ह्यावर शंकाकार अशी शंका करतो कीं, हें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं; कारण ' ण्य ' प्रत्ययाला मानून ऋका-राची वृद्धि ' आर् ' झालेली असल्यामुळें, ती ह्या परिभाषेप्रमाणें बहिरङ्ग व असिद्ध ठरते व ती झालीच नाहीं असेंच मानलें पाहिजे. ह्मणजे मग रेफ नाहींच असें मान-ल्यास ' खरवसानयोर्विसर्जनीयः ' ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. ह्या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात कीं, ' खरवसानयोर्विसर्जनीयः ' हें त्रिपादींतील सूत्र आहे. ह्या सूत्रानें अन्तरङ्ग कार्य–ह्मणजे रेफाचा विसर्जनीय–करतेवेळीं, सापादिक वृद्धि-रूप बहिरङ्गकार्य असिद्ध मानतां येत नाहीं; कारण अन्तरङ्ग परिभाषा त्रिपादीस लागू पडत नाहीं. त्यामुळें सापादिक वृद्धिरूप बहिरङ्गकार्याला त्रिपादीनें होणारें अन्तरङ्ग-कार्य दिसत नसल्यामुळें तें बहिरङ्ग ठरूं शकत नाहीं व तें प्रथम होतें व त्या-नंतर रेफाचा विसर्ग होणें हें कार्य थांबवितां येत नाहीं. पण तें कार्य न व्हावें ह्मणून वरील वार्तिकाची आवश्यकता आहे. सारांश, भाष्यकारांच्या ह्या व्याख्यानावरून हें स्पष्ट होतें कीं, त्यांच्या मतें ही परिभाषा कार्यकालपक्षांत देखील त्रिपादीस लागत नाहीं. )

**अत एव निगाल्यते इत्यादौ लत्वार्थं तस्य दोष इति वचनमेवारब्धम् । अन्यथान्तरङ्गत्वाण्णिलोपात्पूर्वं वैकल्पिकलत्वे तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ।**

( त्रिपादीस ही परिभाषा लागत नाहीं ) म्हणूनच, ' निगाल्यते ' इत्यादि स्थलीं, लत्व होण्याकरितां, ' तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु ' असें वार्तिक (' न पदान्त ' १-१-५८ ह्या सूत्रावरील भाष्यांत ) मुद्दाम सांगितलें आहे. जर ही परि-भाषा त्रिपादीस लागू पडत असती तर हें वार्तिक व्यर्थ ठरलें असतें; ( व तें भाष्यका-रांनीं सांगण्याचें कांहीं कारण नव्हतें; ) कारण वैकल्पिक लत्व अन्तरङ्ग असल्यामुळें तें, बहिरङ्ग णिलोपापूर्वी, होऊं शकलें असतें. ( ' निगाल्यते ' हें नि+' गॄ निगरणे ' ह्या तुदादिगणांतील धातूच्या णिजन्ताचें कर्मणि रूप आहे. ' नि+गॄ+णिच्+यक्+ते ' ह्या स्थितींत ' अचो ञ्णिति ' सू० २५४ ह्या सूत्रानें, णिच् प्रत्यय पुढें असल्यामुळें ' गॄ ' ह्यांतील ' ॠ ' ची ' आर् ' अशी वृद्धि होऊन व नंतर ' णेरनिटि सू० २३१३ ह्या सूत्रानें ' णि ' लोप होऊन, ' निगार्यते ' हें रूप सिद्ध होतें आणि ' निगाल्यते ' हें वैकल्पिक रूप ' अचि विभाषा ' सू० २५४१ ह्या असिध्दकाण्डांतील सूत्रानें होतें. येथें ' णिच् ' ला-म्हणजे ' इ ' या अचाला-मानून होणारें वैकल्पिक ' लत्व ' अन्तरङ्ग-कार्य आहे, व पुढें असणाऱ्या ' यक् ' प्रत्ययामुळें होणारा ' णि ' लोप हें बहिरङ्गकार्य आहे. ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ह्या परिभाषेप्रमाणें, अन्तरङ्गकार्य प्रथम केल्यास, ' णि '-म्हणजे ' इ '-पुढें असल्यामुळें, ' अचि विभाषा ' ह्या सूत्रान्वयें वैकल्पिक लत्व होऊन ' निगार्यते ' व ' निगाल्यते ' अशीं रूपें सिद्ध होतील. पण ' पूर्वत्रासिद्धम् ' ह्या साक्षात् पठित सूत्रान्वयें, ' णेरनिटि ' ह्या सिद्धकाण्डांतील सूत्रानें णिलोपकार्य प्रथम केल्यास, ' गार् ' ह्या पुढें ' णि ' राहत नाहीं. म्हणून ' अचि विभाषा ' हें सूत्र लाग-णार नाहीं, व वैकल्पिक लत्व होणार नाहीं. णिलोपरूपी अजादेश स्थानिवत् मानून ' अचि विभाषा ' हें सूत्र लावतां येत नाहीं; कारण ' पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत् ' असें वार्तिक आहे, व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, त्रिपादींत सांगितलेल्या सूत्रा-न्वयें कार्य करितांना, आदेश स्थानिवत् मानूं नये. मग ' निगाल्यते ' हें रूप सिद्ध होणार नाहीं; म्हणून भाष्यकार म्हणतात कीं, ' तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु '-म्हणजे ' पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत् इति वार्तिकस्य दोषः=बाधः=अप्रवृत्तिः, संयोगादिलोपे लत्वे णत्वे च कर्तव्ये. ' सारांश ' स्कोः संयोगाद्योः ' यानें संयोगादि लोप करितांना, ' अचि विभाषा ' ह्यानें लत्व करितांना, व ' रषाभ्यां नो णः ' ह्यानें णत्व करितांना, ' पूर्वत्रा-सिद्धे न स्थानिवत् ' हें वरील वार्तिक न मानतां, आदेश स्थानिवत् मानून संयोगा-दिलोप, लत्व, व णत्व करावें; व ह्या भाष्याच्या आधारें, णिलोपरूपी अजादेश स्थानिवत् मानल्यानें, ' निगाल्यते ' असें वैकल्पिकरूप होतें. ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, ही अन्तरङ्ग परिभाषा त्रिपादीस लागू पडत नाहीं; कारण ती त्रिपादीस लागू पडती तर, ' लत्व ' हें अन्तरङ्ग कार्य असल्यामुळें, प्रथम झालेंच असतें, व णिलोप बहिरङ्ग असल्यामुळें मागून झाला असता, व मग पूर्वत्रासिध्दे न स्थानिवत् ' ह्या वार्तिकांत दोष दाखविण्याची भाष्यकारास कांहींच गरज नव्हती. )

**येऽपि लक्ष्यानुरोधादानुमानिक्याप्यन्तरङ्गपरिभाषया प्रत्यक्षसिद्ध-स्य पूर्वत्रेत्यस्य बाधं वदन्ति तेऽपि लक्षणैकचक्षुर्भिर्नादर्तव्या इति दिक् ॥**

जे कोणी ( वैयाकरण भाषेंत प्रचलित असलेल्या इष्ट रूपांची सिद्धि करण्या-करितां ) लक्ष्यानुसार, ही अन्तरङ्ग परिभाषा आनुमानिकी असूनहि, ती साक्षात् पठित ' पूर्वत्रासिद्धम् ' ह्या सूत्राचा बाध करूं शकते असें समजतात व ह्या परिभाषे-नें इष्टरूपसिद्धि करून घेतात ते पाणिनीय सूत्रांत जसें सांगितलें आहे तशाच तऱ्हेनें कार्य करणाऱ्यांच्या आदरास पात्र नाहींत हें लक्षांत ठेवावें. ( सारांश परिभाषा अष्टा-ध्यायींत साक्षात् पठित असलेल्या सूत्रांचा बाध करूं शकत नाहीं; म्हणून पठित सूत्रा-नेंच कार्य करावें, व परिभाषा आड येत असल्यास तिच्याकडे लक्ष देऊं नये, आणि ह्या अन्तरङ्ग परिभाषेचा त्रिपादींत उपयोग करूं नये. )

**अत एव ओमाङोश्चेत्याङ्ग्रहणं चरितार्थम् । तद्धि खट्वा आ ऊढे-त्यत्र परमपि सवर्णदीर्घं बाधित्वान्तरङ्गत्वाद्गुणे कृते वृद्धिप्राप्तौ पर-रूपार्थम् । साधनबोधकप्रत्ययोत्पत्त्यनन्तरं पूर्वं धातोरुपसर्गयोगे पश्चात् खट्वाशब्दस्य समुदायेन योगाद्गुणस्यान्तरङ्गत्वमिति संप्रसारणाच्चेति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥**

( मागें ग्रन्थकारानें ' अन्तरङ्गे कर्तव्ये जातं तत्कालप्राप्तिकं च बहिरङ्गमसिद्धम् ' असा ह्या परिभाषेचा अर्थ केला आहे; त्यांतील प्रथमांश म्हणजे ' जातम् ' हा कसा ज्ञापकसिद्ध आहे ह्याचें आतांपर्यंत विवेचन करून, द्वितीयांश म्हणजे ' तत्कालप्राप्ति-कम् ' हा अंश देखील पाणिनीला संमत आहे हें सांगतात. युगपत् प्राप्त बहिरङ्गकार्य देखील ह्या परिभाषेप्रमाणें असिद्ध ठरतें, ) म्हणूनच, ' ओमाङोश्च ' सू० ८० ह्या सूत्रां-तील ' आङ् ' ग्रहण योग्य ठरतें. ' खट्वा+आ+ऊढ ' अशा स्थितींत, ( ' अकः सवर्णे दीर्घः ' सू० ८५ ह्या परसूत्रानें होणारें सवर्णदीर्घकार्य बहिरङ्ग असल्यामुळें, व ' आद्-गुणः ' सू० ६९ ह्या पूर्वसूत्रानें होणारें गुणादेशकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें ) गुणादेश-रूपी अन्तरङ्गकार्य पूर्वसूत्रानें होणारें असून देखील, परसूत्रानें होणाऱ्या बहिरङ्ग सवर्ण-दीर्घकार्याचा बाध करितें. ( व प्रथम होतें आणि त्यामुळें ' खट्वा+ओढः ' अशी स्थिति झाली असतां, ) ' वृद्धिरेचि ' सू० ७२ ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेशाची प्राप्ति होते. वृद्धिरूप एकादेश न होतां, पररूप एकादेश व्हावा ( व अशा रीतीनें ' खट्वोढः ' असें इष्ट रूप सिद्ध व्हावें ) म्हणून, ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रांत ' आङ् 'ग्रहण केलें आहे. ( व तें आङ्ग्रहण वर सांगितलेल्या ' तत्कालप्राप्तिकम् ' ह्या द्वितीयांशाचें—म्हणजे अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्य युगपत् प्राप्त झाल्यास, बहिरङ्गकार्य असिद्ध ठरून अन्तरङ्ग-कार्य प्रथम होतें ह्याचें—ज्ञापक आहे. ' खट्वोढः ' ह्या उदाहरणांत, सवर्णदीर्घरूपी बहि-रङ्गकार्य व गुणरूपी अन्तरङ्गकार्य युगपत् प्राप्त झालीं असतां, गुणरूपी अन्तरङ्ग-कार्याच्या दृष्टीनें सवर्णदीर्घरूप बहिरङ्गकार्य असिद्ध ठरून तें न होतां, गुणरूपी अन्तरङ्ग

कार्य प्रथम होतें हें ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रांतील ' आङ् 'ग्रहणानें ज्ञापित होतें. गुण-कार्य अन्तरङ्ग कां व सवर्णदीर्घकार्य बहिरङ्ग कां हें आतां ग्रन्थकार सांगतात. ) क्रिया-वाचक प्रत्ययाचा प्रथम धातूशीं संधि झाल्यावर ( म्हणजे ' वह्+क्त=ऊढ ' असा संधि केल्यावर, ) नंतर उपसर्गाशीं संधि करावा, ( म्हणजे ' आ+ऊढ=ओढ ' असा सन्धि करावा ) व त्यानंतर ' खट्वा ' ह्या शब्दान्तराशीं ' ओढ ' ह्या समुदायाचा संधि करावा,—अशा रीतीनें गुण अन्तरङ्ग ठरतो असें ' संप्रसारणाच्च ' ६-१-१०८ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( ' प्रथमं धातुः साधनेन युज्यते, पश्चादुपसर्गेण पश्चात्शब्दान्तरेण ' असा नियम असल्यामुळें, पूर्व पूर्व कार्य उत्तरोत्तर कार्याच्या अपेक्षेनें अन्तरङ्ग ठरतें व उत्तरोत्तर कार्य बहिरङ्ग ठरतें; म्हणून ' आ+ऊढ ' ह्याचें संधिरूप कार्य, ' खट्वा+आ ' ह्या संधिरूप कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग असल्या-मुळें, तें कार्य प्रथम होऊन गुणरूपी एकादेश होतो. ह्या मुळें गुणरूपी कार्य अन्तरङ्ग व सवर्णदीर्घ कार्य बहिरङ्ग आहे असें भाष्यांत म्हटलें आहे. वास्तविक ' खट्वा+आ +ऊढ , अशा स्थितींत सवर्णदीर्घकार्य प्रथम केल्यास ' खट्वा+ऊढ ' अशी स्थिति होऊन व नंतर ' आद्गुणः ' यानें गुणादेश होऊन ' खट्वोढः ' असें रूप सिद्ध होऊं शकलें असतें. परंतु प्रकृतपरिभाषा पाणिनीस मान्य असल्यामुळें त्याला हें माहीत होतें कीं गुणादेशरूपी अन्तरङ्गकार्य सवर्णदीर्घरूपी बहिरङ्गकार्याचा बाध करून प्रथम होईल व ' खट्वा+ओढ ' अशी स्थिति होईल आणि तशा स्थितींत ' वृद्धिरेचि ' या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन ' खट्वौढः ' असें अनिष्ट रूप सिद्ध होईल. तसें न व्हावें म्हणून त्याला ' ओमि आङि च आत् परे पररूपमेकादेशः स्यात् ' या अर्थाचें ' ओमाङोश्च ' हें सूत्र मुद्दाम करावें लागलें व अशा रीतीनें त्या सूत्रांतील आङ्ग्रहण या परिभाषेच्या द्वितीयांशाचें ज्ञापक ठरतें. )

**एहीत्यनुकरणस्य शिवादिशब्दसंबन्धे तु नास्य प्रवृत्तिर्ज्ञापकपरसं-प्रसारणाच्चेति सूत्रस्थभाष्यप्रामाण्येनानित्यं प्रकृतिवदनुकरणमित्यतिदेश-मादाय लब्धाङ्त्वे एतद्प्रवृत्तेः ।**

( शंकाकार अशी शंका करितो कीं, ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रांतील ' आङ् ' ग्रहण ' तत्कालप्रासिकम् ' ह्या द्वितीयांशाचें ज्ञापक होऊं शकत नाहीं; कारण ' शिव एहि इति स आह ' अशा स्थलीं, अनुकरणरूपा ' शिव एहि ' ह्या दोन शद्बांचा ' वृद्धिरेचि ' ह्या सूत्रान्वयें ' शिवैहि ' असा संधि न होतां ' शिवेहि' असा संधि व्हावा ह्मणून ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रांत ' आङ् ' ग्रहण केलें आहे, व तें अशा रीतीनें चरितार्थ ठरतें. ग्रन्थकार ह्या शंकेचें असें उत्तर देतात कीं, ) 'एहि' ह्या अनुकरणरूपी शद्बाचा ' शिव ' इत्यादि शद्बांशीं संधि करतेवेळीं, ' ओमा-ङोश्च ' हें सूत्र लागत नाहीं; कारण ' संप्रसारणाच्च ' ६-१-१०८ ह्या सूत्रावरील भाष्यांत जेथें ' आङ् ' ग्रहण ह्या परिभाषेचें वर सांगितल्याप्रमाणें, ज्ञापक मानलें आहे त्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें ( ' आङ् ' मूळचा नसून, ) ' प्रकृति

वदनुकरणं भवति ' प. ३६ ह्या अनित्य व अतिदेशविधायक परिभाषेमुळें आङ्ला आङ्त्व प्राप्त झालें आहे, तेथें ' ओमाङोश्च ' हें सूत्र लागत नाहीं. ( ' ओमाङोश्च ' हें सूत्र तेव्हांच लागू पडतें कीं जेव्हां ' शिव + आ + इहि ' अशी स्थिति आहे. पण ' शिव एहि इति स आह ' अशा अनुकरणस्थलीं, ' एहि ' हा शब्द ' आ + इहि ' ह्यांचा संधि होऊन झालेला शब्द नसून, तशा संधि होऊन झालेल्या शब्दाचा अनुकरण करणारा शब्द आहे. सारांश अशा अनुकरणस्थलीं, ' एहि ' हा शब्द ' आ+इ ' ह्यानें सुरू होणारा शब्द नसल्यामुळें, ह्या ठिकाणीं ' ओमाङोश्च ' हें सूत्र लागूं शकत नाहीं. ह्मणून अशा ठिकाणीं पररूप संधि होण्याकरितां हें सूत्र चरितार्थ ठरतें हें ह्मणणें बरोबर नाहीं, व तें सूत्र द्वितीयांशाचें ज्ञापक आहे असें जें वर सांगितलें आहे तेंच बरोबर आहे. )

**यत्तु पूर्वं धातुरुपसर्गेण युज्यते पश्चात्साधनेन । उपसर्गेण तत्संज्ञकशब्देन साधनेन कारकेण तत्प्रयुक्तकार्येण च । अत एवानुभूयत इत्यादौ सकर्मकत्वात् कर्मणि लकारसिद्धिरिति, तन्न । क्रियायाः साध्यत्वेन बोधात्साध्यस्य च साधनकाङ्क्षतया तत्सम्बन्धोत्तरमेव निश्चितक्रियाबोधेन साधनकार्यप्रवृत्त्युत्तरमेव क्रियायोगनिमित्तोपसर्गसंज्ञकस्य संबन्धौचित्यात् । अत एव सुट्कात्पूर्व इति सूत्रे पूर्वं धातुरुपसर्गेणेत्युक्त्वा नैतत्सारं पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेणेत्युक्त्वोक्तयुक्त्यास्यैव युक्तत्वमुक्तं, साधनं हि क्रियां निर्वर्तयतीत्यादिना भाष्ये ।**

कोणी असें ह्मणतात कीं, प्रथम धातूचा उपसर्गाशीं—ह्मणजे ' उपसर्गाः क्रियायोगे ' ह्या संज्ञाविधायक सूत्रान्वयें ज्या शब्दांना ' उपसर्ग ' अशी संज्ञा प्राप्त होते तशा शब्दांशीं—संयोग होतो; नन्तर कारकवाचक ( तिप् इत्यादि ) प्रत्ययांशीं, व त्या प्रत्ययांच्या निमित्तामुळें होणाऱ्या ( ' सार्वधातुके यक् , कर्तरि शप् ' इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या ' यक् ' इत्यादि विकरणरूपी ) कार्यांशीं संयोग होतो. असा नियम असल्यामुळेंच, ' अनुभूयते ' इत्यादि स्थलीं, ( ' भू ' हा धातु जरी अकर्मक आहे तरी त्याचा ' अनु ' ह्या उपसर्गाशीं प्रथम संयोग झाल्यामुळें, ) सकर्मकत्व येतें; व धातु सकर्मक झाल्यामुळें, कर्मणि लकारांत होणारे प्रत्यय ( ' ते इते अन्ते इ० व ' यक् ' ) होतात —पण हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण क्रिया ही साध्य असल्यामुळें, ती साध्य आहे असाच बोध होतो. ( व साधनाशिवाय साध्य सिद्ध होऊं शकत नसल्यामुळें, ) साध्याला—ह्मणजे क्रियेला—साधनाची—ह्मणजे कारकाची—आकांक्षा असते. ह्मणून क्रियेशीं कारकवाचक ( 'तिप् 'इत्यादि ) प्रत्ययांचा संयोग झाल्यानंतरच, ही क्रिया कोणत्या प्रकारची आहे ( ह्मणजे कर्तरि किंवा कर्मणि आहे ) हें निश्चयात्मक ज्ञान होऊं शकतें. आणि साधन—ह्मणजे कारकवाचक ' तिप् ' इत्यादि प्रत्यय—लागल्यावर, त्या प्रत्ययनिमित्तामुळें होणारें कार्य ( —ह्मणजे प्रत्यय ज्या अर्थांत असेल तदनु-

रूप ' यक्, शप् ' इ० विकरण लावण्याचें कार्य– ) केल्यानंतर, आणि त्यांचा क्रियेशीं संयोग घडल्यानंतर, ' उपसर्गाः क्रियायोगे' ह्या सूत्रान्वयें उपसर्गसंज्ञा प्राप्त होणाऱ्या शब्दाशीं संबंध होणें उचित आहे. ह्मणूनच, ' सुट्कात्पूर्वः ' ६-१-१३५ ह्या सूत्रावरील भाष्यांत ' प्रथम धातूचा उपसर्गाशीं संबंध होतो ' असा पक्ष सांगून असें ह्मटलें आहे कीं,' हा पक्ष बरोबर नाहीं. प्रथम, धातूचा प्रत्ययाशीं संयोग होतो; नंतर उपसर्गाशीं संयोग होतो;' व भाष्यकारांनीं, वर सांगितलेलीं कारणें देऊन, हाच द्वितीय पक्ष बरोबर आहे, कारण साधनामुळें क्रिया सिध्द होते, असें ह्मटलें आहे.

उपसर्गद्योत्यार्थान्तर्भावेण धातुनैवार्थाभिधानादुक्तेषु कर्मणि लकारादिसिद्धिः । पश्चाच्छ्रोतुर्बोधाय द्योतकोपसर्गसंबन्धः ॥

धातूंत सर्व अर्थांचें प्रकाशन करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें, व उपसर्गानें ज्ञात होणारा अर्थ धातूंत अन्तर्भूत असल्यामुळें, वर सांगितलेल्या ( ' अनुभूयते सुखं मया ' इत्यादि ) उदाहरणांत, कर्मणि लकाराचीं रूपें सिद्ध होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. मूळ धातूस लकार लावल्यानंतर, वाक्यप्रयोग करणारा पुरुष ज्या विशिष्ट अर्थासाठीं धातूचा प्रयोग करूं इच्छितो तो धातूंत अन्तर्भूत असलेला अर्थ वाक्य श्रवण करणाऱ्या श्रोत्यास स्पष्ट कळावा ह्मणून अभिप्रेत अर्थाचा द्योतक उपसर्ग धातूमागें लावतो.

एवं चान्तरङ्गतरार्थकोपसर्गनिमित्तः सुट् संकृतीत्यवस्थायां द्वित्वादितः पूर्वं प्रवर्तते ततो द्वित्वादि ॥

अन्तरङ्ग कार्य प्रथम होत असल्यामुळें, ' सम्+कृ+ति ' अशा स्थितींत (' संपरिभ्यां करोतौ भूषणे ' सू० २५५० ह्या सूत्रानें ' सुट् ' आगम व ' लिटि धातोरनभ्यासस्य ' सू० २१७७ ह्या सूत्रानें द्विर्वचन अशीं दोन कार्ये, लिटाचें रूप करितांना, युगपत् प्राप्त झालीं असतां, ) ' सुट् ' प्रथम होतो व द्विर्वचन नंतर होतें; कारण ' सुट् ' आगमाचें निमित्त ' सम् ' हा उपसर्ग अन्तरङ्गतर अर्थाचा द्योतक आहे. ( अन्तरङ्गत्वामुळें धातूचा प्रत्ययाशीं प्रथम संबंध होतो व नंतर उपसर्गाशीं संबंध होतो असें मागें सांगितलें आहे. पण जेथें कांहीं विशेष कारणामुळें धातूचा व उपसर्गाचा संबन्ध अन्तरङ्गतर ठरत असेल तेथें, धातु उपसर्गाशीं प्रथम संयुक्त करावा. प्रकृत उदाहरणांत, 'सम् ' ह्या उपसर्गापुढें ' कृ ' धातु आला असतां, भूषणरूप अर्थविशेषांत ' संपरिभ्यां करोतौ भूषणे ' ह्या सूत्रानें ' सुट् ' आगम होतो. अशा ठिकाणीं, उपसर्गाची भूषणरूप अर्थविशेषद्योतकता ' सुट् ' आगम होण्यास निमित्त होते. भूषणरूप अर्थ ' कृ ' धातूंत अन्तर्भूत आहे खरा; पण तो अर्थ जेव्हां ' सम् ' ह्या उपसर्गानें प्रकाशित होतो तेव्हांच ' सुट् ' होतो, व अर्थद्योतकता प्रधान व अत्यन्त अन्तरङ्ग असल्यामुळें, अशा ठिकाणीं, धातूचा, प्रत्ययाशीं संबंध होण्यापूर्वीं, उपसर्गाशीं संबंध होतो; व नंतर लिटाचें रूप करितांना, तिपाचे जागीं ' णल् ' आदेश होऊन, ' णल् ' निमित्तक द्वित्व होतें. सारांश, ' सम् + कृ + ति ' अशी स्थिति

पाहतांच, भूषणरूप अर्थ एकदम प्रथम मनांत येत असल्यामुळें, त्या अर्थाच्या निमित्तामुळें होणारा ' सुट् ' आगम, णलादेशनिमित्तक द्वित्व कार्यापेक्षां, अधिक अन्तरङ्ग ठरतो. )

**अत एव प्रणिदापयतीत्यादौ णत्वं यदागमा इति न्यायेन समाहितं भाष्ये ॥**

( धातूचा प्रथम प्रत्ययांशीं व नंतर उपसर्गांशीं सम्बन्ध होतो) ह्मणूनच 'यदागमाः ' प० ११ ही परिभाषा लावून, ' प्रणिदापयति ' ह्यांतील णत्व भाष्यांत सिध्द केलें आहे. ( प्र + नि + दा + णिच् ' अशा स्थितींत ' अर्तिन्ही ' सू० २५७० ह्या सूत्रानें, ' णिच् ' पुढें असल्यामुळें, पुगागम होऊन, ' प्र+ नि+ दाप् + णिच् ' अशी स्थिति होते. येथें मूळचा ' दा ' धातू नसून पुगागमसहित ' दाप् ' आहे. ह्मणून ' नेर्गदनद ' सू० २२८५ ह्या सूत्राची प्रवृत्ति कशी व्हावी असा संशय आला असतां, त्या संशयाचें ' यदागमाः ' ही परिभाषा लावून — ह्मणजे आगमसहित ' दाप् ' हा ' दा ' च समजावा असें सांगून, भाष्यकारांनीं निराकरण केलें आहे. ' णिच् ' प्रत्ययाशीं सम्बन्ध होण्यापूर्वीं व ' णिच् ' निमित्तामुळें पुगागम होण्यापूर्वीं, जर धातूचा उपसर्गांशीं सम्बन्ध झाला असता तर, ' प्रनिदा ' अशा स्थितींतच ' दा ' धातु जसाचा तसाच–म्हणजे आगमरहित-असल्यामुळें, ' नेर्गदनद ' ह्या सुत्रानें एकदम णत्व झालें असतें; व यदागम परिभाषा लावण्याची कांहीच गरज नव्हती. ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, धातूचा प्रथम प्रत्ययाशीं व प्रत्ययनिमित्तक कार्याशीं सम्बन्ध होतो, व नंतर उपसर्गांशीं संयोग होतो. )

**अत एव प्रत्येति प्रत्यय इत्यादिसिद्धिः । अन्यथान्तरङ्गत्वात्सवर्णदीर्घे रूपासिद्धिः ॥**

( धातूचा प्रथम प्रत्ययाशीं व नंतर उपसर्गांशीं सम्बन्ध होतो ) म्हणूनच. ' प्रत्येति ' ' प्रत्ययः ' इत्यादि रूपें सिद्ध होतात; तसें नसतें–म्हणजे उपसर्गांशीं प्रथम सम्बन्ध झाला असता तर,–सवर्णदीर्घरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें प्रथम झालें असतें, व तशीं रूपें सिद्ध झालीं नसतीं. ( ' प्रति+इ+तिप् ' अशा स्थितींत धातूचा प्रथम उपसर्गांशीं संधि होऊन नंतर प्रत्ययाशीं सम्बन्ध झाला असता तर, ' अकः सवर्णे दीर्घः ' सू० ८५ ह्या सूत्रानें सवर्णदीर्घ होऊन ' प्रती+तिप् ' अशी स्थिति झाली असती, व नंतर ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ ह्या सूत्रानें ' तिप् ' प्रत्ययनिमित्तामुळें गुणकार्य होऊन, ' प्रतेति ' असें विकृत रूप झालें असतें. तसेंच प्रति +इ+अच् ' येथें, ' एरच् ' सू० ३२३१ ह्या सूत्रानें ' अच् ' प्रत्यय लागला असतां, सवर्णदीर्घ होऊन, नंतर ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' ह्यानें गुण होऊन, व नंतर ' एचोऽयवायावः ' ह्यानें अयादेश होऊन, ' प्रति+इ+अच्=प्रती+अच्=प्रते+अच् =प्रतय्+अच् =प्रतयः ' असें विकृत रूप झालें असत. )

यदुपसर्गनिमित्तकं कार्यमुपसर्गार्थाश्रितं विशिष्टोपसर्गनिमित्तकत्वात्तदन्तरङ्गम्। यत्तु न तथा, तत्र पूर्वागतसाधननिमित्तकमेवान्तरङ्गम्। अत एव न धात्विति सूत्रे प्रेद्ध इत्यत्र गुणो बहिरङ्ग इति भाष्य उक्तम् ॥

जेथें उपसर्ग विशेष अर्थाचा द्योतक असून तशा उपसर्गामुळें जर धातूस कांहीं कार्य होत असेल ( जसें–‘ सम्+कृ ’ अशा स्थितींत ‘ सम् ’ हा उपसर्ग भूषणरूप अर्थाचा द्योतक असल्यामुळें, ‘ संपरिभ्यां करोतौ भूषणे ’ ह्या सूत्रानें धातूला ‘ सुट् ’ आगमरूपी कार्य होतें ) तशाच स्थलीं तें कार्य, विशिष्टार्थद्योतक उपसर्गाच्या निमित्तानें होणारें असल्यामुळें, अन्तरङ्ग ठरतें ( व धातुचा उपसर्गाशीं प्रथम संयोग होतो, व नंतर प्रत्ययाशीं, आणि नंतर प्रत्ययनिमित्तक कार्याशीं, सम्बन्ध होतो. पण हा अपवाद आहे हें लक्षांत असूं द्यावें. ) पण जेथें उपसर्गाच्या विशिष्ट अर्थामुळें धातूला कांहीं कार्य सांगितलें नसेल तेथें, प्रत्ययामुळें होणारें कार्य अन्तरङ्ग समजावें; कारण (उपसर्गाशीं धातूचा सम्बन्ध होण्यापूर्वींच,) धातुपुढें प्रत्यय उपस्थित झालेला असतो. ह्मणूनच, ‘ न धातुलोप ’ १–१–४ ह्या सूत्रावरील भाष्यांत, ‘ प्रेद्धः ’ ह्या स्थलीं, गुण बहिरङ्ग आहे असें ह्मटलें आहे. ( ‘ प्र + इन्ध् + क्त ’ अशा स्थितींत, ‘ अनिदितां हल उपधाया क्ङिति ’ सू० ४१५ ह्या सूत्रानें, ‘ क्त ’ हा प्रत्यय कित् असल्यामुळें, नलोप झाल्यावर ‘ प्र + इध् + क्त ’ अशी स्थिति झाली असतां, ‘ न धातुलोपे ’ सू० २६५६ ह्या सूत्रानें गुणैकादेशाचा निषेध पावला आहे व तसेंच ‘ आद्गुणः ’ सू० ६९ ह्या सूत्रानें गुणैकादेश पावला आहे. हीं दोन्ही कार्यें युगपत् प्राप्त झालीं असतां, भाष्यकार असें ह्मणतात कीं, गुणैकादेशनिषेधरूपीकार्य अन्तरङ्ग आहे व गुणैकादेशरूपीकार्य बहिरङ्ग आहे. कारण प्रथम कार्य धातु व प्रत्यय यांच्या संबंधामुळें होणारें असून द्वितीय कार्य धातु व उपसर्ग यांच्या संबंधामुळें होणारें आहे. भाष्यकारांच्या या ह्मणण्यावरून हें स्पष्ट होतें कीं, धातूचा व प्रत्ययाचा सम्बन्ध प्रथम होतो व त्यामुळें तो व तन्निमित्तक कार्य अन्तरङ्ग ठरतात, आणि नंतर धातूचा उपसर्गाशीं सम्बन्ध होतो व त्यामुळें तो व तन्निमित्तक कार्य बहिरङ्ग ठरतात, आणि ह्मणूनच, ‘ प्र + इध् + क्त ’ या स्थितींत, ‘ प्र + इध् ’ यांचा संधि प्रथम न होतां, ‘ इध् + क्त= इद्ध ’ असें रूप झाल्यावर ‘ प्र + इद्ध ’ यांचा सन्धि होऊन ‘ प्रेद्ध ’ असें रूप होतें. ‘ प्र + इध् ’ यांचा प्रथम संबंध केल्यास गुणरूपी एकादेश होऊं शकणार नाहीं; कारण ‘ इन्ध् ’ धातूचा नकाराचा लोप करणारा आर्धधातुक ‘ क्त ’ प्रत्यय पुढें आहे, व तो प्रत्यय पुढें असल्यामुळें जें गुणरूपी किंवा वृद्धिरूपीकार्य प्राप्त होतें तें ‘ न धातुलोपे ’ या सूत्रामुळें होऊं शकत नाहीं. परंतु ‘ इध् + क्त ’ यांचें अन्तरङ्गकार्य प्रथम केल्यास, क्त प्रत्यय आपलें गुणनिषेधरूपी कार्य करून चरितार्थ होत असल्यामुळें, ‘ प्र + इध् ’ यांचें बहिरङ्गकार्य करतेवेळीं गुणरूपी एकादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

**किं च पूर्वमुपसर्गयोगे धातूपसर्गयोः समासे एकस्वर्याद्यापत्तिरित्युपपदमतिङिति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ।**

दुसरें असें कीं, धातु व उपसर्ग यांचा सम्बन्ध प्रथम केला तर (' कुगतिप्रादयः ' सू० ७६१ ह्या सूत्रानें ) धातु व उपसर्ग यांचा समास होऊन दोहोंना मिळून एकच स्वर होण्याची आपत्ति येईल, असें ' उपपदमतिङ् ' २-२-१९ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( उपसर्गांचे स्वर भिन्न आहेत; ' उपसर्गाश्चाभिवर्जम् ' फिट् सू० ८१ ह्या सूत्रान्वयें त्यांना आद्युदात्त स्वर सांगितला आहे, व ' धातोः ' सू० ३६७१ ह्या सूत्रान्वयें धातु अन्तोदात्त असतो. पण दोहोंचा समास केल्यास त्यांचे भिन्न स्वर नष्ट होऊन ' समासस्य ' सू० ३७३४ ह्या सूत्रान्वयें एकच सामासिक स्वर—ह्मणजे अन्तोदात्त स्वर—होईल. )

**भावार्थप्रत्ययस्यापि पूर्वमेवोत्पत्तिः । अत एव णेरध्ययने इति निर्देशः सङ्गच्छते ।**

भाववाचक प्रत्यय पुढें असला तरी, तो धातुशीं प्रथम अन्वित होतो. (नंतर धातूचा उपसर्गाशीं सम्बन्ध होतो.) ह्मणूनच, ' णेरध्ययने वृत्तम् ' सू०३०६६ ह्या सूत्रांत ' अध्ययने ' असा उच्चारलेला शब्द योग्य ठरतो. ( प्रथमं धातुः साधनेन युज्यते, पश्चादुपसर्गेण ' ह्या नियमानुसार जेथें कारकवाचक—ह्मणजे कर्तरि, कर्मणि, अधिकरणे इत्यादि अर्थांचा वाचक–प्रत्यय पुढें येतो तेथेंच हा नियम लागू पडावा, पण जेथें धातूपुढें क्रियावाचक प्रत्यय येतो तेथें हा नियम लागू पडूं नये, अशी कोणी शंका केल्यास, ग्रन्थकार ह्मणतात कीं, धातूपुढें कारकवाचक प्रत्यय आला असतां, जसा धातूचा व प्रत्ययाचा प्रथम सम्बन्ध होतो, त्याचप्रमाणें धातूपुढें क्रियावाचक प्रत्यय आला असतां देखील, त्या दोहोंचा सम्बन्ध प्रथम होतो; व हें ' णेरध्ययने वृत्तम् ' ह्या सूत्रांतील ' अध्ययने ' ह्या रूपावरुन सिद्ध होतें. ' अध्ययनम् ' येथें ' ल्युट् ' प्रत्यय कारकवाचक नसून भाववाचक— ह्मणजे क्रियावाचक— आहे; तरी पण त्या क्रियावाचक प्रत्ययाचा धातूशीं प्रथम सम्बन्धकेला तरच ' अध्ययनम् ' असें रूप सिद्ध होऊं शकतें. धातूचा प्रथम उपसर्गाशीं सम्बन्ध करून मग प्रत्ययाशीं सम्बन्ध केला तर, ' अध्ययन ' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं; कारण ' अधि + इङ् + भावे ल्युट् ' अशा स्थितींत, ' युवोरनाकौ ' सू० १२४७ ह्या सूत्रानें ' ल्युट् ' चें जागीं ' अन ' असा आदेश होऊन ' अधि + इ+-अन ' अशी स्थिति झाली असतां, धातु व उपसर्ग ह्यांचा प्रथम संधि केल्यास, ' अकः सवर्णे दीर्घः ' ह्या सूत्रान्वयें सवर्णदीर्घ होऊन ' अधी + अन ' असें होईल, व नंतर ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' ह्या सूत्रानें गुण होऊन, ' अधे + अन ' असें होऊन, नंतर ' एचोऽयवायावः ' ह्या सूत्रानें अयादेश होऊन ' अधय् + अन=अधयन ' असें विकृत रूप होईल. पण धातूचा प्रत्ययाशीं प्रथम, व नंतर उपसर्गाशीं,

सम्बन्ध केल्यास, ' इ + ल्युट् = इ + अन ' अशा स्थितींत ' सार्वधातुकार्धधातुकयोः' ह्या सूत्रानें इकाराचा गुण होऊन ' ए + अन ' अशी स्थिति झाल्यावर, 'एचोऽयवायावः ' ह्या सूत्रानें अयादेश होऊन ' अय् + अन=अयन ' असें रूप होतें, व नंतर ' अधि ' ह्या उपसर्गाशीं ' अयन ' ह्याचा संधि केल्यास, ' इको यणचि ' ह्या सूत्रानें यणादेश होऊन ' अध्य् + अयन=अध्ययन ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. ह्यावरून हें स्पष्ट होतें कीं, धातूच्या पुढें क्रियावाचक प्रत्यय आला तरी, धातूचा व प्रत्ययाचा प्रथम सम्बन्ध होऊन नंतर उपसर्गाशीं सम्बन्ध होतो व पाणिनीनें वरील सूत्रांत उच्चारलेला ' अध्ययन ' हा शब्द ह्याचें ज्ञापक आहे. )

**इदं च सामान्यपेक्षं ज्ञापकं भावतिङोऽपि पूर्वमुत्पत्तेः । अन्यथा तत्र समासापत्तिः ।**

( 'अध्ययन' येथें भाववाचक कृत् प्रत्यय ' ल्युट् ' पुढें आहे, ह्मणून 'अध्ययन' हा शब्द एवढ्याचेंच ज्ञापक व्हावा कीं, धातुपुढें क्रियावाचक ' कृत् ' प्रत्यय आल्यास धातूचा व प्रत्ययाचा प्रथम सम्बन्ध होऊन नंतर उपसर्गाशीं सम्बन्ध होतो; पण धातूपुढें भाववाचक ' तिङ् ' प्रत्यय आल्यास, धातूचा व त्या प्रत्ययाचा प्रथम सम्बन्ध होतो, व नंतर उपसर्गाशीं सम्बन्ध होतो ह्याचें ज्ञापक ' अध्ययन ' हा शब्द होऊं शकत नाहीं, अशी कोणी शंका केल्यास ग्रन्थकार ह्मणतात कीं, ' णेरध्ययने वृत्तम् ' ह्यांतील ' अध्ययन ' हा शब्द केवळ ' कृत् ' प्रत्ययाचा ज्ञापक नसून, ) तो सर्व प्रकारच्या प्रत्ययांचा ज्ञापक आहे; कारण क्रियावाचक ' तिङ् ' प्रत्यय पुढें असला तरी, धातूचा व प्रत्ययाचा प्रथम सम्बन्ध होतो. तसा सम्बन्ध प्रथम न केल्यास–ह्मणजे धातूचा प्रथम उपसर्गाशीं सम्बन्ध केल्यास–त्यांचा समास होईल. ( व वर सांगितल्याप्रमाणें त्या दोहोंचा मिळून एक सामासिक शब्द झाल्यानें ' ऐकस्वर्याद्यापत्ति ' रूप दोष येईल. )

**तिङ्ङिवातिङिति निषेधान्न तत्र दोषो यदि भावतिङ्युपसर्गयोगोऽस्तीत्यलम् ।**

पण धातूपुढें भाववाचक ' तिङ् ' प्रत्यय आला असतां, अशा धातूपूर्वी उपसर्ग येत असेल तर, धातूचा उपसर्गाशीं सम्बन्ध होण्यापूर्वी 'तिङ्' प्रत्ययाशीं सम्बन्ध होतो असें मानलें ह्मणजे, ' उपपदमतिङ् ' सू० ७८२ या सूत्रांतील ' अतिङ् ' या निषेधान्वयें तिङन्ताचा व उपसर्गाचा समास होत नसल्यामुळें, ऐकस्वर्यादिदोष येऊं शकत नाहींत. ( ग्रन्थकाराच्या ह्मणण्याचा आशय असा आहे कीं, जेथें धातुपुढें भाववाचक–ह्मणजे क्रियावाचक–' तिङ् ' प्रत्यय येतो तेथें धातूपूर्वी उपसर्ग येण्याचा संभव नसतो; कारण भाववाचक ' तिङ् ' प्रत्यय क्रियेचा अर्थ सांगतोच व त्याहून जास्त अर्थ सांगणें जेथें अभिप्रेत आहे तेथेंच धातूपूर्वी उपसर्ग लावण्याची गरज पडते. पण अशा ठिकाणीं देखील उपसर्ग धातूमागें लावला असल्यास, धातु व भाववाचक ' तिङ् ' प्रत्यय यांचा प्रथम सम्बन्ध केला व नंतर तशा तिङन्त धातूशीं उपसर्गाचा सम्बन्ध केला ह्मणजे,

तिङन्त धातूचा व उपसर्गाचा 'उपपदमतिङ्' या निषेधान्वयें समास होत नसल्यामुळें ऐकस्वर्यादिदोष मुळींच येऊं शकत नाहींत.) एवढें विवेचन पुरें आहे.

**यत्तु विशेषापेक्षात्सामन्यापेक्षमन्तरङ्गं विशेषापेक्षे विशेषधर्मस्याधिकस्य निमित्तत्वात्। यथा रुदादिभ्यः सार्वधातुक इत्यत्र रुदादित्वं सार्वधातुकत्वं च। तत्र सार्वधातुकत्वज्ञानाय प्रकृतेर्धातुत्वज्ञानं प्रत्ययस्य प्रत्ययत्वज्ञानं चावश्यकमिति यासुडन्तरङ्गः।**

कोणी असें म्हणतात कीं, ज्याला विशेष निमित्ताची अपेक्षा आहे त्याच्या मानानें, ज्याला सामान्य निमित्ताची अपेक्षा आहे तें अन्तरङ्ग समजावें; कारण ज्याला विशेष निमित्ताची अपेक्षा असते ( त्याला सामान्य निमित्ताची अपेक्षा असतेच ) व त्याहून अधिक–म्हणजे विशेष–निमित्ताची अपेक्षा असते. ( म्हणून सामान्य+विशेष अशा दोन निमित्तांची ज्या कार्याला अपेक्षा आहे तें कार्य, ज्या कार्याला केवळ सामान्य निमित्ताची अपेक्षा आहे त्याच्या मानानें, बहिरङ्ग ठरतें.) जसें रुदादिभ्यः सार्वधातुके' सू० २४७४ ह्या सूत्राप्रमाणें, ( प्रत्ययाला इडागम होण्याकरितां, ) दोन निमित्तांची अपेक्षा आहे:—(१) तो प्रत्यय सार्वधातुक असला पाहिजे व (२) प्रकृति, रुदादि पांच धातूंपैकीं, धातु असला पाहिजे ( व तो प्रत्यय देखील 'वलादि' असला पाहिजे तेव्हांच इडागम होतो. ) अशा ठिकाणीं 'रुदादिभ्यः सार्वधातुके' या सूत्रांत विवक्षित असलेल्या सार्वधातुकाचें ज्ञान होण्याकरितां रुदादि पञ्च धातूंपैकीं प्रकृतीहून तो प्रत्यय झाला आहे आणि तसेंच तो वलादि सार्वधातुकप्रत्यय आहे या ज्ञानाची आवश्यकता आहे. (सारांश 'अट्,इट्, ईट्' हे आगम होण्याकरितां प्रकृति रुदादि पञ्च धातूंपैकीं एक धातु असून त्यापुढें सार्वधातुक वलादि प्रत्यय आहे हें ज्ञान आवश्यक आहे. पण यासुट् होण्याकरितां तशा ज्ञानाची आवश्यकता नाहीं; कारण तो विशेष प्रकृतीहून होणारा नसून कोणत्याहि धातूहून कोणत्याहि सार्वधातुक किंवा आर्धधातुक परस्मैपदी लिङाच्या प्रत्ययाला होणारा आगम आहे ) म्हणून यासुट् अन्तरङ्ग ठरतो. ( 'यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च' सू० २२०९ ह्या सूत्रानें लिङाच्या परस्मैपद प्रत्ययांना 'यासुट्' आगम सांगितला आहे. 'रुदादिभ्यः सार्वधातुके' सू० २४७४ ह्या सूत्रानें 'रुदादि' परस्मैपदी पांच धातूंपुढें वलादि सार्वधातुक प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययाला इडागम सांगितला आहे; तसेंच 'रुदश्च पञ्चभ्यः' व 'अट् गार्ग्यगालवयोः' सू० २४७५–२४७६ ह्या सूत्रांनीं, रुदादि पांच परस्मैपदी धातूंपुढें हलादि सार्वधातुक अपृक्त प्रत्यय आल्यास, तशा प्रत्ययाला 'ईट्' व विकल्पेंकरून 'अट्' आगम सांगितला आहे. तेव्हां 'रुद्+लिङ्' अशा स्थितींत, लिङादेश 'त्' प्रत्यय होऊन 'रुद्+त्' अशी स्थिति झाली असतां, 'त्' ह्या अपृक्त हलादि सार्वधातुक प्रत्ययाला 'यासुट्' आगम प्रथम करावा कीं 'ईट्' आगम प्रथम करावा ? 'अट् गार्ग्यगालवयोः' ह्या सूत्रावरील वृत्तींत भट्टोजी दीक्षित असें म्हणतात कीं, 'प्रकृतिप्रत्ययविशेषापेक्षाभ्यामडीड्भ्यामन्तरङ्गत्वात् यासुट्'–म्हणजे अट् व ईट् हे आगम होण्याकरितां

रुदादि पञ्च धातु प्रकृतिविशेष, व हलादि अपृक्त सार्वधातुकप्रत्ययविशेष ह्यांची अपेक्षा असल्यामुळें व ' यासुट् ' आगम होण्याकरितां तशी अपेक्षा नसल्यामुळें, ' यासुट् ' अन्तरङ्ग ठरतो, व प्रथम होतो. ' यासुट् ' आगम प्रथम झाल्यावर, प्रत्यय वलादि किंवा अपृक्त राहत नाहीं. म्हणून ' इट् ' ' ईट् ' अथवा ' अट् ' आगम प्रत्ययास होऊं शकत नाहीं. हें भट्टोजी दीक्षितांचें म्हणणें ग्रन्थकारास मान्य नाहीं; म्हणून ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत कीं, हें म्हणणें बरोबर नाहीं. )

**एतेन यदनुदात्तङित इति सूत्रे कैयटेनोक्तं लमात्रापेक्षयाऽन्तरङ्गास्तिबादयो लकारविशेषापेक्षत्वाद्बहिरङ्गाः स्यादय इति, तत्परास्तम्। विशेषापेक्षत्वेऽपि तस्य सामान्यधर्मनिमित्तकत्वाभावेन तत्वस्य दुरुपपादत्वात्। परनिमित्तकत्वेन स्यादीनां बहिरङ्गत्वाच्च।**

' अनुदात्तङितः ' १-३-१२ ह्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें म्हटलें आहे कीं, तिबादि प्रत्ययांना केवळ सामान्य लकाराची अपेक्षा असल्यामुळें व ' स्य ' इत्यादींना लकारविशेषाची अपेक्षा असल्यामुळें, ' तिप् ' इत्यादि प्रत्यय ' स्य ' इत्यादिकांच्या मानानें अन्तरङ्ग ठरतात व ' स्य ' इत्यादि बहिरङ्ग ठरतात. पण हें कैयटाचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ( ' स्यतासी ऌलुटोः ' सू० २१८६ ह्या सूत्रान्वयें ' स्य ' इत्यादि होण्याकरितां ) जरी त्यांना विशेष लकाराची अपेक्षा आहे तरी त्यांना सामान्य लकाराची अपेक्षा नसल्यामुळें, त्यांना बहिरङ्गत्व येऊं शकत नाहीं. ( कारण तिबादि आदेश होण्यास जशी एकच निमित्ताची—म्हणजे केवळ सामान्य लकाराची—अपेक्षा आहे तसेंच, ' स्य ' ' तासि ' होण्याकरितां देखील एकच निमित्ताची—म्हणजे ऌट् ऌङ् व लुट् ह्या विशेष लकारांची—अपेक्षा आहे. सारांश दोहोंनाहि एकच निमित्ताची अपेक्षा असल्यामुळें, ' स्य, तासि, ' हे बहिरङ्ग ठरूं शकत नाहींत. जर ' स्य ' ' तासि ' ह्यांना सामान्य लकाराची व तसेंच विशेष लकाराची अशा दोन निमित्तांची अपेक्षा असती तरच ते बहिरङ्ग ठरले असते. ग्रन्थकार म्हणतात कीं, आम्हांस देखील हें मान्य आहे कीं, ' स्य ' ' तासि ' हे तिबादेशाच्या मानानें बहिरङ्ग आहेत. पण आम्हीं असें मानतो त्याचें कारण कैयटानें दिलेल्या कारणाहून अगदी भिन्न आहे, व तें कारण हें कीं, तिबादि आदेश होण्याकरितां त्यांना परनिमित्ताची—म्हणजे त्यांच्यापुढें कांहीं निमित्त असण्याची—गरज नाहीं; पण ) ' स्य ' इत्यादि आदेश होण्याकरितां पुढें निमित्त असण्याची—म्हणजे ऌट् , ऌङ् व लुट् पुढें असण्याची—आवश्यकता आहे. म्हणून ते बहिरङ्ग आहेत. ( ' लस्य ' 'तिप्तझि' सू० २१५३-२१५४ ह्या सूत्रान्वयें लकाराचें जागीं तिबादि आदेश होतात व तसे आदेश होण्याकरितां पुढें कोणतेंहि निमित्त असण्याची गरज नसल्यामुळें ते, ' स्य ' ' तासि ' ह्यांच्या मानानें, अन्तरङ्ग ठरतात. )

**इति, तन्न विशेषस्य व्याप्यत्वेन व्यापकस्यानुमानेनोपस्थितावपि तस्य निमित्तत्वे मानाभावेनाधिकधर्मनिमित्तकत्वानुपपादनात्। भाष्ये एवं विधान्तरङ्गबहिरङ्गभावस्य काप्यनुल्लेखाच्च।**

( ' इति तन्न ' ह्याचा अन्वय ' इति यासुट् अन्तरङ्गः ' ह्याशीं करावा–म्हणजे ग्रन्थकार जें कारण सांगणार आहेत, तें भट्टोजी दीक्षितांच्या मताचें खण्डन करणारें आहे असें समजावें; व ह्या कारणानें कैयटाच्या मताचें देखील खण्डन होतें हें सांगण्याकरितां ग्रन्थकारांनीं मागील पंक्तींत 'एतेन' म्हणजे-वक्ष्यमाणप्रकारेण-हा शब्द घातला आहे. ) वर जें ( दीक्षितांनीं ) म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. विशेष हें व्याप्य ( व सामान्य हें व्यापक ) असल्यामुळें, जेथें जेथें विशेष असतें तेथें तेथें सामान्याचें अस्तित्व अनुमानानें सिद्ध होतें हें जरी खरें आहे ( जसें–जेथें जेथें आम्रवृक्ष, वटवृक्ष, पिप्पलवृक्ष आहेत तेथें तेथें ' वृक्षत्व ' आहे हें अनुमानानें सिद्ध होतें ) तरी, ( जशी विशेषाला निमित्तता आहे–म्हणजे ' स्य ' ' तासि ' होण्यास जशी त्यांना विशेषलकाररूप विशेषनिमित्ताची अपेक्षा असल्यामुळें विशेषाचें ठिकाणीं निमित्तत्व असतें,–तशी ) सामान्याचें ठिकाणीं निमित्तता असते हें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ( म्हणजे ' स्य ' ' तासि ' होण्यास सामान्यलकाराचीहि गरज आहे असें मानण्यास कांहींच आधार नाहीं. ) म्हणून विशेषाचे ठिकाणीं अधिक ( सामान्य+विशेष ) निमित्त असतें असें प्रतिपादन करणें बरोबर नाहीं. आणि भाष्यांत सामान्यापेक्ष कार्य अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष कार्य बहिरङ्ग असतें असा कोठेंहि उल्लेख केला नाहीं. ( सारांश सामान्यापेक्ष अन्तरङ्ग व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असें जें दीक्षितांनीं व कैयटानें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. अट्, इट्, ईट्, हे आगम होण्यापूर्वीं यासुट् होतो हें खरें आहे; पण त्याचें खरें कारण हें आहे कीं, यासुट् हा नित्य आहे–म्हणजे आगम झाले तरी तो होतो व न झाले तरी तो होतो. पण यासुट् प्रथम झाल्यावर आगमांची प्राप्तीच नाहीं. म्हणून ते अनित्य आहेत. तत्त्वप्रकाशिकेंत म्हटलें आहे कीं, ' नित्यत्वाद्यासुट् । अडिटोस्तु यासुटि न प्राप्तिरपृक्तत्वाभावादिति बोध्यम् ' )

यत्तु मतुप्सूत्रे भाष्ये पञ्च गावो यस्य सन्ति स पञ्चगुरित्यत्र मतुप्प्राप्तिमाशङ्क्य प्रत्येकमसामर्थ्यात्समुदायादप्रातिपदिकत्वात्समासात्समासेनोक्तत्वादिति सिद्धान्तिनोक्ते, नैतत्सारमुक्तेऽपि हि प्रत्ययार्थे उत्पद्यते द्विगोस्तद्धितो, यथा पाञ्चनापितिरिति पूर्वपक्ष्युक्तिर्भाष्ये । द्विगोर्लुगनपत्य इति लुग्विधानात्तद्धितार्थाद्विगोस्तद्धितो भवति पञ्चगुशब्दश्च द्विगुरिति तदाशयं कैयटः । ततो द्वैमातुरः पाञ्चनापितिः पञ्चसु कपालेषु संस्कृत इत्यादौ सावकाशद्विगोर्बहुव्रीहिणा प्रकृते परत्वाद्बाध इत्याशयेन, नैष द्विगुः कस्तर्हि बहुव्रीहिरिति सिद्धान्तिनोक्ते, तमवकाशमजानानोऽपवादत्वाद्द्विगुः प्राप्नोतीति पूर्वपक्षी । अन्यपदार्थे सुबन्तमात्रस्य विधीयमानबहुव्रीहेः संख्यायास्तद्धितार्थे विधीयमानो द्विगुर्विशेषविहितत्वाद्बाधकः प्राप्नोतीति कैयटः । ततः सिद्धान्त्येकदेश्याह । अन्तरङ्गत्वाद्बहुव्रीहिः। कान्तरङ्गता । अन्यपदार्थे बहुव्रीहिर्विशिष्टेऽन्यपदार्थे द्विगुस्तस्मिंश्चास्य

**तद्धितेऽस्तिग्रहणं क्रियत इति। अधिकारस्त्यर्थापेक्षमत्वर्थनिमित्तो द्विगुर्बहिरङ्ग इति कैयट इति। नैषा सिद्धान्त्युक्तिरेतावताप्यपवादत्वाहानेः। अच्सामान्यापेक्षयणो विशिष्टसवर्णाजपेक्षदीर्घेण बाधदर्शनात्।**

( शंकाकार म्हणतो कीं, सामान्यपेक्ष अन्तरङ्ग व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असा भाष्यांत उल्लेख आहे व तो उल्लेख कोठें आहे हें तो सांगतो. ) ' तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् ' ५-२-९४ ह्या मतुप्सूत्रावरील भाष्यांत, 'पञ्च गावो यस्य सन्ति स पञ्चगुः ' ह्या ठिकाणीं ' मतुप् ' प्रत्ययाची प्राप्ति आहे ( कारण ' पञ्च गावः सन्ति यस्य ' येथें ' तदस्यास्ति ' ह्या सूत्रांत सांगितलेला अर्थ स्पष्ट दिसतो. म्हणून ' पञ्चगुः ' असें रूप न होतां, ' मतुप् ' प्रत्यय लागून ' पञ्चगोमान् ' असें रूप व्हावें ) अशी शंका उपस्थित झाली असतां, सिद्धान्ती म्हणतो कीं ' पञ्चगोमान् ' असें मतुप्प्रत्ययान्त रूप होऊं शकत नाहीं. कारण ' पञ्च गावः सन्ति यस्य ' ह्या उदाहरणांत ' पञ्च ' व ' गो ' हे दोन शब्द परस्परनिरपेक्ष नसून परस्परसापेक्ष आहेत. ) म्हणून त्या दोन शब्दांपैकीं कोणत्याहि एका शब्दाला ' मतुप् ' प्रत्यय लावला असतां ' पञ्चगोमान् ' ह्या शब्दानें ज्या अर्थाचा बोध होतो त्या अर्थाचा बोध ' पञ्चवान् ' किंवा ' गोमान् ' ह्या शब्दांनीं होऊं शकत नाहीं—म्हणजे तसा बोध करून देण्याचें त्यां दोन शब्दांत सामर्थ्य नाहीं. तसेंच ' पञ्च ' व ' गावः ' ह्या दोन शब्दांचा ' पञ्च गावः ' असा जो समुदाय ) त्या समुदायाहूनहि ' मतुप् ' प्रत्यय होऊं शकत नाहीं; कारण तो शब्दसमुदाय प्रातिपदिक नाहीं. ( सुबन्त समुदाय आहे, व ' ङ्याप्प्रातिपदिकात् ' ह्या अधिकारसूत्रान्वयें प्रातिपदिकाहून ' मतुप् ' प्रत्यय होऊं शकतो. ) तसेंच ( ' पञ्च गावः सन्ति यस्य सः ' असा बहुव्रीहि ) समास केल्यावर ' पञ्चगु ' ह्या सामासिकशब्दाहून ' मतुप् ' प्रत्यय करण्याचें कांहीं प्रयोजन राहत नाहीं; कारण बहुव्रीहिसमासानें, मतुप्प्रत्ययानें होणारा अर्थ सांगितलाच आहे. असें सिद्धान्तीनें म्हटल्यावर, ( शंकाकार म्हणतो कीं, सिद्धान्तीचें ) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ( द्विगु ) समासानें प्रत्ययाचा अर्थ सांगितला असला तरी, द्विगूहून तद्धित प्रत्यय होऊं शकतो—जसें ' पाञ्चनापितिः ' ह्या स्थलीं द्विगुसमासाहून अपत्यार्थक तद्धित ' इञ् ' प्रत्यय झाला आहे. ) हें वरील भाष्य पूर्वपक्षीची उक्ति आहे. कैयट म्हणतो कीं, पूर्वपक्ष करणाऱ्याचा आशय हा आहे कीं, ' द्विगोर्लुगनपत्ये ' सू० १०८० ह्या सूत्रांत, तद्धितप्रत्ययाचा लुक् होतो असें विधान केलें असल्यामुळें, त्या सूत्रावरून हें स्पष्ट होतें कीं, तद्धितार्थ द्विगूहून तद्धित प्रत्यय होतो व ' पञ्चगु ' हा द्विगुसमास आहे. ( बहुव्रीहि समास नाहीं; म्हणून ' पञ्चगु ' शब्दाहून ' मतुप् ' प्रत्यय होण्यास कांहीं हरकत नाहीं. वास्तविक, सिद्धान्तीच्या म्हणण्याप्रमाणें, ' पञ्चगु ' हा बहुव्रीहि समास आहे; पण पूर्वपक्षी ह्याकडे लक्ष न देतां, तो द्विगुसमास आहे असें धरून वरील शंका करितो. ह्या शंकेवर सिद्धान्ती पुनः असें उत्तर देतो कीं, ) ' द्वैमातुरः, ' ' पाञ्चनापितिः, ' ' पञ्चसु कपालेषु संस्कृतः ' इत्यादि स्थलीं, सावकाश—म्हणजे चरि-

तार्थ–झालेला द्विगु, प्रकृत उदाहरणांत–म्हणजे ' पञ्च गावः सन्ति यस्य सः पञ्चगुः ' ह्या उदाहरणांत–बहुव्रीहीनें, परत्वामुळें, बाधित होतो. ( पूर्वसूत्रापेक्षां परसूत्र बलवत्तर ठरण्याकरितां, दोन्हीं सूत्रें तुल्यबल–म्हणजे आपापल्या विषयांत चरितार्थ– असलीं पाहिजेत. ' संख्यापूर्वो द्विगुः ' व ' तद्धितार्थोत्तरपदे समाहारे च ' सू० ७३० व ७२८ हीं द्विगुविधायक सूत्रें ' द्वैमातुरः, ' ' पाञ्चनापितिः ' ' पञ्चकपालः ' इत्यादि स्थलीं तद्धितप्रत्यय पुढें होण्याकरितां केलेल्या द्विगूंत चरितार्थ आहेत; तसेंच ' शेषो बहुव्रीहिः ' व ' अनेकमन्यपदार्थे ' सू० ८२९ व ८३० हीं बहुव्रीहिविधायक सूत्रें ' पीताम्बरः ' ' चक्रपाणिः , ' इत्यादि ठिकाणीं चरितार्थ आहेत. ' पञ्च गावः सन्ति यस्य ' ह्या उदाहरणांत, संख्या प्रथम असल्यामुळें ' संख्यापूर्वो द्विगुः ' ह्या सूत्रानें द्विगु पावला आहे, व ' अनेकमन्यपदार्थे 'ह्यानें बहुव्रीहि पावला आहे. ' अनेकमन्यपदार्थे ' हें सूत्र परसूत्र असल्यामुळें, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ह्या न्यायानें द्विगूचा बाध होऊन बहुव्रीहि होतो. ) हा वरील अर्थ मनांत धरून सिद्धान्ती म्हणतो कीं, ' पञ्चगुः ' हा द्विगुसमास नव्हे. तर मग हा कोणता समास आहे? ( असें पूर्वपक्षीनें विचारलें असतां, सिद्धान्ती उत्तर देतो कीं,) हा बहुव्रीहि समास आहे.('संख्यापूर्वो द्विगुः'हें सूत्र'षाण्मातुरः' 'द्वैमातुरः' इत्यादि ठिकाणीं चरितार्थ आहे अशी त्या सूत्राची) चरितार्थता न जाणल्यामुळें, पूर्वपक्षी उत्तर देतो कीं, प्रकृत उदाहरणांत, द्विगु हा बहुव्रीहिचा अपवाद असल्यामुळें, द्विगूची प्राप्ति आहे. कैयट म्हणतो कीं, अपवादत्वामुळें द्विगु समास होतो असें म्हणण्याचा पूर्वपक्षीचा आशय हा आहे कीं, तद्धित प्रत्यय लागण्याकरितां सांगितलेला संख्यापूर्व द्विगु विशिष्ट स्थलीं होत असतो असें विधान केलें असल्यामुळें, अन्यपदार्थांत केवळ सुबन्तांहून होणाऱ्या बहुव्रीहीचा तो द्विगु बाधक होतो. ( सारांश, पूर्वपक्षीच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं द्विगुविधायकसमासशास्त्र विशेषशास्त्र असल्यामुळें व बहुव्रीहिसमासविधायकशास्त्र सामान्यशास्त्र असल्यामुळें, ' येन नाप्राप्ते ' परिभाषा ५८ या न्यायान्वयें द्विगु हा बहुव्रीहीचा अपवाद ठरून त्याचा बाध करितो.) ह्यावर ( सिद्धान्तीचा अभिप्राय पूर्णपणें न जाणणारा ) सिद्धान्त्येकदेशी म्हणतो कीं, प्रकृत उदाहरणांत, बहुव्रीहि अन्तरङ्ग असल्यामुळें बहुव्रीहि समास होतो. (द्विगु बहिरङ्ग असल्यामुळें येथें द्विगु समास होऊं शकत नाहीं. ) बहुव्रीहि समास अन्तरङ्ग कसा ? ( असा पूर्वपक्षीनें एकदेशीला प्रश्न केला असतां, तो एकदेशी म्हणतो कीं, ) बहुव्रीहि सामान्य अन्यपदार्थाचा वाचक असतो व द्विगु हा विशिष्ट प्रकारच्या अन्यपदार्थाचा वाचक असतो; कारण ('तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् ' ह्या द्विगूहून होणाऱ्या ' मतुप्विधायक ' सूत्रांत ) ' अस्ति ' ह्या अधिक शब्दाचें ग्रहण केलें आहे. कैयट म्हणतो कीं, एकदेशीचा आशय हा आहे कीं, ' अस्ति ' हा अधिक अर्थ दाखविणारा व ' मतुप् ' प्रत्यय लागण्याकरितां (' तद्धितार्थोत्तरपदे समाहारे च ' व ' संख्यापूर्वो द्विगुः ' ह्या सूत्रांनीं ) होणारा द्विगु बहिरङ्ग होय. ( बहुव्रीहि समास केवळ ' यस्य ' ह्या अर्थाचा वाचक आहे. पण मतुप्प्रत्ययनिमित्तामुळें–म्हणजे ' मतुप् ' प्रत्यय

लागण्याकरितां—होणारा द्विगु ' यस्य अस्ति ' ह्या अर्थाचा सांगणारा आहे. म्हणून ' पञ्च गावः सन्ति यस्य ' हा अधिक अर्थ सांगणारा द्विगु, ' पञ्च गावः यस्य ' असा कमी अर्थ सांगणाऱ्या बहुव्रीहिसमासाच्या मानानें, बहिरङ्ग ठरतो. शंकाकार असें म्हणतो कीं ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, सामान्यापेक्ष अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें. ह्यावर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं,) वरील भाष्य सिद्धान्तीची उक्ति नाहीं, (एकदेशीची उक्ति आहे, व ती एकदेशीची उक्ति आहे हें म्हणण्याचें कारण हें कीं,) त्या उक्तीनें देखील ( पूर्वपक्षीनें जो दोष दिला होता कीं, द्विगु हा बहुव्रीहीचा अपवाद असल्यामुळें बहुव्रीहीचा बाध करतो ) त्या अपवादरूपी दोषाचें निराकरण होत नाहीं. कारण ( सामान्यशास्त्राचा विशेष शास्त्रानें बाध होत असतो असा नियम आहे. जसें–) ' इको यणचि ' ह्या केवळ अचाची अपेक्षा करणाऱ्या सामान्यशास्त्राचा, ' अकः सवर्णेदीर्घः ' ह्या विशेष अचाची—म्हणजे सवर्ण अचाची —अपेक्षा करणाऱ्या, विशेष शास्त्रानें, बाध होतो. ( तसेंच ' अनेकमन्यपदार्थे ' ह्या सामान्यशास्त्रानें होणाऱ्या बहुव्रीहीचा, तद्धितार्थ संख्यापूर्व, विशिष्ट अर्थांत होणारा द्विगु, बाधक होतो. सारांश पूर्वपक्षीनें, दिलेल्या दोषाचें वरिल भाष्यानें निराकरण होत नसल्यामुळें, तें एकदेशि भाष्य आहे असें सिद्ध होतें; व अशा एकदेशि भाष्यांत सामान्यापेक्ष अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असा जो नियम सांगितला आहे तो नियम सिद्धान्तीनें सांगितला नसल्यामुळें, प्रमाण मानतां येत नाहीं. )

किञ्चोक्तरीत्या परत्वेन बाधसिद्धेः ।

दुसरें असें कीं, ( ' अपवादत्वात् द्विगुः प्राप्नोति '– ह्मणजे द्विगु हा बहुव्रीहीचा अपवाद असल्यामुळें ' पञ्चगुः ' या उदाहरणांत द्विगूची प्राप्ति आहे व बहुव्रीहि समास न होतां द्विगु समास झाला पाहिजे—असें जें पूर्वपक्षीचें ह्मणणें आहे तें देखील मुळींच बरोबर नाहीं. कारण दोन्ही समास, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, आपापल्या विषयांत चरितार्थ असल्यामुळें, एक दुसऱ्याचा अपवाद होऊं शकत नाहीं. उलट दोन्ही समास तुल्यबल असल्यामुळें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायान्वयें बहुव्रीहि समास पर असल्यामुळें ) तोच पूर्वी सांगितल्याप्रमाणें परत्वामुळें द्विगूचा बाधक ठरतो.

**किं चात्राधिकापेक्षत्वेनैव बहिरङ्गत्वम् । न केवलविशेषापेक्षत्वेनेति नैतद्भाष्यारूढं विशेषापेक्षस्य बहिरङ्गत्वम् । अत एव सुबन्तसामान्यापेक्षो बहुव्रीहिस्तद्विशेषापेक्षो द्विगुरिति नोक्तं भाष्ये ।**

दुसरें असें कीं ( वरील एकदेशिभाष्यांत ) द्विगु हा अधिकनिमित्तापेक्ष आहे असें सांगून बहिरङ्ग मानला आहे; केवळ विशेषनिमित्तामुळें तो होणारा आहे असें सांगून त्याला बहिरङ्ग मानलें नाहीं. ( सारांश सामान्यापेक्ष अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असें भाष्यांत कोठेंहि सांगितलें नाहीं. आणि ह्मणूनच दोन सुबन्तांमुळें

होणारा बहुव्रीहि समान्यापेक्ष आहे व द्विगु हा ( संख्यापूर्वक असून तद्धित प्रत्यय होण्याकरितां केला असल्यामुळें ) विशेषापेक्ष आहे असें वरील भाष्यांत ह्मटलें नाहीं.

**न चार्थकृतबहिरङ्गत्वस्यानाश्रयणादिदमयुक्तम् । एकदेश्युक्तित्वेनादोषात् ।**

( आतां शंकाकार ग्रन्थकारास असें म्हणतो कीं तुम्ही स्वतःच कबूल करिता कीं, अधिक अर्थाची अपेक्षा करणारें कार्य बहिरङ्ग असतें व कमी अर्थाची अपेक्षा करणारें कार्य अन्तरङ्ग असतें हें भाष्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे, व तुम्ही तर पूर्वी असें म्हटलें होतें. कीं, अधिक अर्थापेक्ष बहिरङ्ग व अल्पअर्थापेक्ष अन्तरङ्ग असतें हा नियम आह्मांस मुळींच मान्य नाहीं. ह्मणून निदान हें तुमचें ह्मणणें भाष्यविरुद्ध ठरतें. या शंकेचें ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, आम्हास हें कबूल आहे कीं अधिक अर्थापेक्ष बहिरङ्ग व अल्पअर्थापेक्ष अन्तरङ्ग असतें हा नियम आम्हास मान्य नाहीं असें आम्ही पूर्वी म्हटलें आहे. पण हें आमचें ह्मणणें भाष्यविरुद्ध आहे हें सिद्ध करण्याकरितां तुह्मी ज्या भाष्याचें प्रमाण देतां तें भाष्य सिद्धान्तीची उक्ति नसून ) एकदेशीची उक्ति आहे व त्यामुळें आह्मी जो नियम पूर्वी सांगितला आहे ( तो भाष्यविरुद्ध ठरत नाहीं व ) त्यांत कोणताहि दोष येत नाहीं.

**अत एवास्तिग्रहणं नोपाध्यर्थं किं त्वस्तिशद्बान्मतुबर्थमिति त्वदभिमतं बहिरङ्गत्वमपि द्विगोर्नास्तीति प्रतिपाद्य सिद्धान्तिना मत्वर्थे द्विगोः प्रतिषेधो वक्तव्य इति वचनेनैतत्सिद्धमित्युक्तम् ।**

( अधिक अर्थापेक्ष बहिरङ्ग असतें व अल्पार्थापेक्ष अन्तरङ्ग असतें ही एकदेशीची उक्ति असल्यामुळें ग्राह्य नाहीं म्हणूनच, सर्व तऱ्हेच्या शंका काढून, अखेरीस सिद्धान्त सांगतेवेळीं, भाष्यांत ) सिद्धान्ती असें ह्मणतो कीं, ' तदस्यास्मिन्निति मतुप् ' ह्या मतुप्विधायक सूत्रांत केलेलें ' अस्ति ' शद्बाचें ग्रहण उपाधिचें—ह्मणजे निमित्ताचें—द्योतक आहे असें समजूं नयें (– ह्मणजे ' मतुप् ' प्रत्ययाचा अर्थ प्रकाशित करण्याकरितां ' तदस्य अस्ति ' ' तदस्मिन्नस्ति ' अशा तऱ्हेचें ग्रहण सूत्रांत केलें आहे असें समजूं नये. ) परंतु ' अस्ति ' शद्बाहून ' मतुप् ' प्रत्यय व्हावा ( व ' अस्तिमान् ' असें रूप व्हावें, ) ह्मणन त्या सूत्रांत ' अस्ति ' शद्बाचें ग्रहण केलें आहे. ह्मणूनच तुला अभिमत असलेलें बहिरङ्गत्व देखील द्विगु समासांत नाहीं, ( ' मतुप् ' प्रत्यय करण्याकरितां केलेल्या द्विगुसमासांत ' अस्ति ' ह्या अधिक शब्दाचा अर्थ असल्यामुळें, तूं—ह्मणजे एकदेशी—द्विगुला बहिरङ्ग ठरवूं पाहत होतास, पण तें बरोबर नाहीं; कारण जसें बहुव्रीहि समासांत ' अस्ति ' शद्बाचें ग्रहण नसतें, तसेंच द्विगु समासांतहि ' अस्ति ' शद्बाचें ग्रहण नसतें; दोन्ही समास वास्तविक बरोबरीचा अर्थ सांगणारे असल्यामुळें, तुझें—ह्मणजे एकदेशीचें—ह्मणणें बरोबर

नाहीं, ) असें प्रतिपादन करून अखेरीस सिद्धान्ती असें सांगतो कीं, ' मतुप् ' प्रत्यय लावण्याकरितां द्विगु समास करूं नये; व असें वचन असल्यामुळें, ( ' पञ्च गवः सन्ति यस्य सः ' येथें ' मतुप् ' प्रत्यय लावण्याकरितां द्विगु समास करूं नये, आणि ' पञ्चगोमान् ' असें रूप करूं नये. बहुव्रीहि समासच करावा; व तो समास केल्यास, ' गोस्त्रियोरुपसर्जनस्य ' सू० ६५६ ह्या सूत्रानें उपसर्जन ' गो ' शब्दाचा ऱ्हस्व होऊन, ' एच इग्घ्रस्वादेशे ' सू० ३२३ ह्या सूत्रान्वयें ' पञ्चगुः ' असें ) रूप सिद्ध होतें.

अत एव तदोः सः सावनन्त्ययोरिति सूत्रेऽनन्त्ययोरिति चरितार्थम्। अन्यथा प्रत्ययसामान्यापेक्षत्वेनान्तरङ्गत्वादन्त्यस्यात्वेऽनन्त्यस्यैव सत्वे सिद्धे तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ॥ पादः पदिति सूत्रे भाष्यकैयटयोरप्येतदन्तरङ्गत्वाभाव एव सूचित इति सुधियो विभावयन्तु ॥

ह्मणूनच, ' तदोः सः सौ अनन्त्ययोः ' सू० ३८१ ह्या सूत्रांत. ' अनन्त्ययोः ' ह्या शब्दाचें ग्रहण चरितार्थ ठरतें ( सामान्यापेक्ष अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असें न मानल्यासच, वरील सूत्रांत ' अनन्त्ययोः ' हा शब्द चरितार्थ ठरतो;) नाहीं तर प्रत्ययसामान्यापेक्ष–ह्मणजे कोणत्याहि विभक्तीचा प्रत्यय पुढें असतां होणारें–'अत्व' अन्तरङ्ग ठरेल व त्यामुळें. अन्तीं नसलेलाच तकार किंवा दकार राहील आणि मग ' अनन्त्ययोः ' ह्या शब्दाचें ग्रहण व्यर्थ ठरेल ( सामान्यापेक्ष अन्तरङ्ग असतें व विशेषापेक्ष बहिरङ्ग असतें असें मानल्यास, 'त्यदादीनामः ' सू० २६५ ह्या सूत्रानें, कोणत्याहि विभक्तीचा प्रत्यय पुढें आला असतां अन्त्य दकाराचे जागीं होणारा अकारादेश सामान्यापेक्ष असल्यामुळें, अन्तरङ्ग ठरेल, व हें कार्य प्रथम होईल; आणि त्यामुळें ' त्यद् ' इत्यादि सर्वनामांचे अखेरीस तकार किंवा दकार न राहतां, अकारच राहील. नंतर ' तदोः सः सौ ' हें विशेषापेक्ष—ह्मणजे ' सु ' प्रत्यय पुढें असतांनाच होणारें–कार्य सांगणारें सूत्र बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, तें मागून प्रवृत्त होईल. तें सूत्र प्रवृत्त होतेवेळीं अनन्त्य – ह्मणजे अन्तीं नसलेल्या– ' त् ' अथवा ' द् ' चे जागींच सकारादेश होणार; कारण ' अ ' हा आदेश अन्त्य ' त् ' अथवा ' द् ' चे जागीं झाल्यामुळें, अन्तीं ' त् ' किंवा ' द् ' राहणारच नाहीं. मग ' अनन्त्ययोः' हें पद सूत्रांत घातलें कशाला ? हें पद सूत्रांत घातलें आहे ह्यावरूनच हें स्पष्ट होतें कीं, सामान्यापेक्ष अन्तरङ्गत्व असतें व विशेषापेक्ष बहिरङ्गत्व असतें हें ह्मणणें बरोबर नाहीं. ) ' पादः पत् ' ६-४-१३० ह्या सूत्रावरील भाष्यांत व ह्या भाष्यावरील कैयटाच्या टीकेंत देखील, सामान्यापेक्ष अन्तरङ्ग व विशेषापेक्ष बहिरङ्ग होत नाहीं असें सुचविलें आहे, हें विद्वान् लोकांनीं समजावें. ( ' पादःपत् ' ह्या सूत्रावरील भाष्यांत, ' तस्थस्थमिपां तांतंतामः ' सू० २१९९ ह्या सूत्रानें होणारे आदेश अन्तरङ्ग आहेत व 'रुदादिभ्यः सार्वधातुके' सू० २४७४ हें परसूत्र आहे तरी त्या सूत्रानें होणारा इडागम बहिरङ्ग आहे असें ह्मटलें आहे; कारण इडागमाचें निमित्त रुदादि धातु हा तांतंतामादेश

होणाऱ्या निमित्ताच्या बहिर्भूत आहे. जसें– ' अ + रुद् + तस् ' येथें, ' तस् ' चे जागीं ' ताम् ' आदेश होण्याचें निमित्त केवळ ' तस् ' प्रत्ययच आहे, पण इडागमाचें निमित्त ' तस् ' हा वलादि सार्वधातुक प्रत्यय व त्याच्या बहिर्भूत असलेला ' रुद् ' धातुहि आहे. ह्मणून तामादेशकार्य अन्तर्भूतनिमित्तक व इडागमकार्य बहिर्भूतनिमित्तक असल्यामुळें, तामादेश अन्तरङ्ग ठरून प्रथम होतो, व नंतर इडागमरूपी बहिरङ्ग कार्य होतें. इडागम प्रथम केल्यास, यदागमपरिभाषेनें ' इ + तस् ' ह्याचें जागीं तामादेश होऊन विकृत रूप सिद्ध होईल. सारांश तेथें अन्तरङ्गत्व व बहिरङ्गत्व निमित्तापेक्ष मानलें आहे, सामान्यविशेषापेक्ष मानलें नाहीं. )

**नन्वेवमसुस्रुवदित्यत्र लघूपधगुणादुवङोऽल्पनिमित्वाभावादुवङ् न स्यादिति चेत् । न । तत्रान्तःकार्यत्वरूपान्तरङ्गत्वसत्त्वात् । अन्तःकार्यत्वं च पूर्वोपस्थितनिमित्तकत्वमङ्गशब्दस्य निमित्तपरत्वात् ।**

( ' णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ् ' सू० २३१२ ह्या सूत्रानें ' स्रु ' धातूला लुङांत ' च्लि ' चे जागीं ' चङ् ' झाला असतां, ' चङि ' सू० २३१५ ह्या सूत्रानें द्वित्व होऊन, ' असुस्रु+चङ्(अ)+त् ' अशी स्थिति झाली असतां, ' त् ' ह्या ' पित् ' प्रत्ययामुळें ' स्रु ' ह्यांतील, ' अ ' पुढें असल्यामुळें लघूपध झालेल्या, उकारास ' पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ ह्या सूत्रानें गुण पावला आहे. तसेंच ' स्रु ' ह्यांतील ' उ ' च्या पुढें ' अ ' असल्यामुळें, ' अचि श्नुधातुभ्रुवां ' सू० २७१ ह्या सूत्रानें ' उवङ् ' प्राप्त झाला आहे; तर कोणतें कार्य प्रथम करावें? ) ' असुस्रुवत् ' इत्यादि स्थलीं, लघूपधगुण होण्यास जें निमित्त आहे त्यापेक्षां ' उवङादेश ' होण्यास असणारें निमित्त अल्प–ह्मणजे कमी–नसल्यामुळें, ' उवङ् ' होऊं नये, ( व लघूपधगुण व्हावा; कारण ' पुगन्तलघूपधस्य च ' हें परसूत्र आहे व ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' असा नियम आहे. ) –असें कोणी ह्मटल्यास, हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण येथें अन्तःकार्यत्वरूप अन्तरङ्गता आहे ' अन्तःकार्यत्व ' ह्मणजे ' ज्याचें निमित्त पहिल्यानें उपस्थित होतें तें ' समजावें; कारण ( ह्या परिभाषेंतील ' अन्तरङ्ग ' व ' बहिरङ्ग ' ह्या शद्बांत असणाऱ्या ) ' अङ्ग ' ह्या शद्बाचा निमित्त ' असा अर्थ आहे. ( ' अ+सुस्रु+अ+त् ' ह्या उदाहरणांत, लघूपधगुणाचें ' त् ' हा पित् प्रत्यय एवढें एकच निमित्त आहे; तसेंच ' उ ' चे जागीं उवङादेश होण्यास. ' अ ' हा अच् एकच निमित्त आहे. सारांश, दोन्हीं कार्यें समाननिमित्तक आहेत. एक कार्य अल्पनिमित्तक व दुसरें बहुनिमित्तक अशी स्थिति प्रकृत उदाहरणांत नाहीं. मग कोणतें कार्य प्रथम करावें? लघूपधगुणच प्रथम व्हावा, कारण तो परसूत्रानें सांगितला आहे. पण हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण लघूपधगुणकार्याच्या मानानें उवङ् कार्य अन्तरङ्ग आहे. ह्याचें कारण असें कीं, उवङ् होण्याचें निमित्त ' अ ', लघूपधगुणाच्या निमित्ताच्या मानानें–ह्मणजे ' त् ' प्रत्ययाच्या मानानें–पूर्वोपस्थित–ह्मणजे प्रथम आलेलें किंवा अलीकडे–आहे, व 'त्' प्रत्यय, ' अ ' च्या मानानें,

परोपस्थित–ह्मणजे नंतर आलेला किंवा पलीकडे–आहे. ह्मणून अलीकडील निमित्तामुळें होणारें कार्य प्रथम उपस्थित होत असल्यामुळें, तें कार्य अन्तरङ्ग समजावें. ह्या परिभाषेंतील ‘ अन्तरङ्ग ’ शद्बाचा अर्थ ‘ ज्याचें निमित्त अलीकडे, आंत किंवा जवळ आहे तें कार्य ’ असा समजावा, व ‘ बहिरङ्ग ’ शद्बाचा अर्थ ‘ ज्याचें निमित्त पलीकडे बाहेर, किंवा दूर आहे तें कार्य ’ असा समजावा. )

इदमन्तरङ्गत्वं लोकन्यायसिद्धमिति मनुष्योऽयं प्रातरुत्थाय स्वशरीरकार्याणि करोति ततः सुहृदां ततः संबन्धिनामर्थानामपि जातिव्यक्तिलिङ्गसंख्याकारकाणां बोधक्रमः शास्त्रकृत्कल्पितस्तत्क्रमेणैव च तद्बोधकशब्दप्रादुर्भावः कल्पित इति तत्क्रमेणैव तत्कार्याणीति पट्व्येत्यादावन्तरङ्गत्वात्पूर्वं पूर्वयणादेशः परयणादेशस्य बहिरङ्गतयाऽसिद्धत्वादित्यनेनाचः परस्मिन्निति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥

( वर सांगितल्या प्रकारचें ) हें अन्तरङ्गत्व लौकिकन्यायसिद्ध आहे—म्हणजे लोकव्यवहाराला धरूनच आहे. जसें–कोणीहि मनुष्य सकाळीं उठल्यानंतर, प्रथम स्वतः संबंधीं कार्यें करितो, मग मित्रांचीं, व नंतर आपल्या सम्बन्धिजनांचीं कार्यें करितो. त्याच लौकिकनियमानुसार, व्याकरणशास्त्रकार पाणिनीनें, शद्बापासून ज्ञात होणारा अर्थ, प्रथम जाति, नंतर व्यक्ति, नंतर लिङ्ग, नंतर संख्या, व नंतर कारक, अशा क्रमानें जाणला जातो, असें मानून, त्या क्रमानुसार तीं तीं कार्यें व्हावीं असा नियम मानला आहे. ( जसें ‘इन्द्राण्यै’ ह्या उदाहरणांत, ‘इन्द्र’ हें मूळ प्रातिपदिक आहे. त्यानें प्रथम जातीचा व नंतर व्यक्तीचा बोध होतो. जातिनिमित्तक व व्यक्तिनिमित्तक कांहीं कार्य येथें सांगितलें नसल्यामुळें, आपण तन्निमित्तक कांहीं कार्य करीत नाहीं. पण नंतर लिङ्गबोध होण्याकरितां, ‘इन्द्रवरुणभव’ सू० ५०५ ह्या सूत्रान्वयें आपण ‘ङीप्’ प्रत्यय लावतो व ‘आनुक्’ आगम करितो; नंतर संख्येचा व कारकाचा बोध होण्याकरितां, चतुर्थी विभक्तीच्या एकवचनाचा ‘ङे’ प्रत्यय लावतो व तो प्रत्यय लावतांना ‘आण्नद्याः’ सू० २६८ ह्या सूत्रान्वयें ‘आट्’ आगम करून ‘आटश्च’ सू० २६९ ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश करितो. सारांश शद्बापासून ज्या क्रमानें अर्थबोध होतो त्या क्रमानुसारच प्राप्त होणारें कार्य करावें असा पाणिनीनें नियम मानला आहे; आणि असा नियम मानला आहे ) म्हणूनच, ‘पट्व्या’ इत्यादि स्थलीं, पूर्वयणादेश प्रथम होतो, परयणादेश बहिरङ्ग असल्यामुळें असिद्ध ठरतो व म्हणून तो मागून होतो, असें ‘अचः परस्मिन्’ १–५–१७ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( पटु+ङीप्+टा=पटु + ई+आ’ अशा स्थितींत, ‘ इको यणचि’ ह्या सूत्रान्वयें, ‘पटु’ ह्यांतील उकारास प्रथम यणादेश करावा किंवा ‘ई’ ला प्रथम यणादेश करावा ? ई ला प्रथम यणादेश केल्यास, ‘ई+आ=या’ असें होऊन ‘उ’ ला यणादेश प्राप्त होणार नाहीं, व ‘पटुया’ असें विकृत रूप होईल. ‘ङीप्’ प्रत्यय लिङ्गबोधक

असल्यामुळें, त्या निमित्तामुळें होणारें यणादेशकार्य, पूर्वोक्त नियमानुसार, प्रथम करावें, म्हणजे, 'पटु+ई=पट्वी' असें होतें; नंतर संख्याकारकबोधक 'टा' प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य करावें, म्हणजे 'पट्वी+आ='पट्व्या' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**तदपि युगपत्प्राप्तौ पूर्वप्रवृत्तिनियामकमेव, यथा पट्व्येत्यत्र पट्स्य विभज्यान्वाख्याने, न तु जातस्य बहिरङ्गस्य तादृशेऽन्तरङ्गेऽसिद्धतानियामकं, प्रागुक्तलोकन्यायेन तथैव लाभादिति वाह ऊठ् सूत्रे कैयटे स्पष्टम् ।**

जेथें अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यें एकेच वेळीं प्राप्त झालीं असतील तेथेंच, पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गत्वम्'—म्हणजे 'ज्या कार्याचें निमित्त प्रथम उपस्थित होतें तें कार्य अन्तरङ्ग समजून—प्रथम करावें,'—हा नियम लावावा. जसें 'पट्व्या' ह्या सिद्धरूपाचें अन्वाख्यान करितांना—म्हणजे व्याकरणरीत्या तें रूप कसें सिद्ध झालें आहे हें सांगतांना,—आपण त्या सिद्ध रूपाची 'पटु+ई+आ' अशी शकलें पाडतों, व अशा वेळीं, पूर्वोपस्थित 'ई' ह्या निमित्तामुळें होणारें यण् कार्य प्रथम करितों व नंतर परोपस्थित—म्हणजे पलीकडे असणाऱ्या—'आ' ह्या निमित्तामुळें होणारें यण् कार्य करितो. जेथें बहिरङ्ग कार्य झाल्यानंतर अन्तरङ्ग कार्य करण्याचा प्रसङ्ग येतो तेथें, 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गत्वम्' हा नियम लावूं नये, व पूर्वी होऊन गेलेलें बहिरङ्ग कार्य असिद्ध—म्हणजे झालें नाहीं असें—मानूं नये. कारण वर दिलेल्या लौकिकन्यायानें हें सिद्ध होतें, असें 'वाह ऊठ्' ६—४—१३२ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें म्हटलें आहे ( कारण तो लौकिकन्याय जेथें दोन कार्यें युगपत् प्राप्त झालीं आहेत तेथेंच लागू पडतो. सारांश जेथें 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गत्वम्' हा न्याय लावून कार्याचें अन्तरङ्गत्व व बहिरङ्गत्व ठरविणें आहे तेथें 'जातमपि बहिरङ्गमसिद्धं भवति' हा नियम लागू पडत नाहीं. )

**अत एव वाय्वोरित्यादौ वलि लोपो यणः स्थानिवत्त्वेन वारितोऽचः परस्मिन्नित्यत्र भाष्यकृता ।**

म्हणूनच 'अचः परस्मिन् १-१-५७ ह्या सूत्रावरील भाष्यांत, 'वाय्वोः' इत्यादि स्थलीं, भाष्यकारांनीं 'व्' लोपाचें निवारण, यणादेश स्थानिवत् मानून, केलें आहे. ( 'वायु+ओस्' ह्या स्थितींत, 'इको यणचि' ह्या सूत्रानें यणादेश होऊन 'वाय्व्+ओस्' अशी स्थिति झाली असतां, 'लोपो व्योर्वलि' सू० ८७३ ह्या सूत्रानें, 'य्' पुढें 'व्' असल्यामुळें, 'य्' लोप प्राप्त झाला आहे. पण हें 'य्' लोपकार्य, 'इको यणचि' ह्या सूत्रानें यणादेश झाल्यानंतरच प्राप्त झालें आहे. सारांश यणादेश व 'य्' लोप हीं दोन्हीं कार्यें युगपत् प्राप्त झालीं नाहींत. यणादेशाचें निमित्त 'ओ' पलीकडे आहे व 'य्' लोपाचें निमित्त 'व्' अलीकडे आहे; म्हणून 'य्' लोपकार्य अन्तरङ्ग ठरतें व यणादेशकार्य बहिरङ्ग ठरतें; हें जरी खरें आहे तरी, अशा ठिकाणीं दोन्हीं कार्यें

युगपत् प्राप्त झालीं नसल्यामुळें, ‘ पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गत्वम् ’ हा नियम लागू पडत नाहीं. हा नियम जर अशा ठिकाणीं लागू पडला असता तर, भाष्यकारांनीं ‘ वाय्वोः ’ येथील यलोपाचें निवारण करितांना हा नियम लावला असता, व असें ह्मटलें असतें कीं, ‘ य् ’ लोप कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें कार्य करण्याचा प्रसङ्ग आला असतां, ‘ ओ ’ ह्या पलीकडच्या निमित्तामुळें झालेला ‘ उ ’ चा ‘ व् ’ बहिरङ्ग व असिद्ध आहे ह्मणून ‘ य् ’ लोप होऊं शकत नाहीं; पण अशा रीतीनें ‘ य् ’ लोपाचें निवारण न करितां, ‘ अचः परस्मिन् ’ सू० ५० हें सूत्र लावून भाष्यकारांनीं ‘ य् ’ लोपाचें निवारण केलें आहे. त्याचा अर्थ असा कीं, ‘ वायु ’ ह्या शब्दांत ‘ उ ’ च्या पूर्वी असलेल्या ‘ य् ’ चा लोप करण्याचा प्रसङ्ग आला असतां, ‘ ओ ’ ह्या निमित्तामुळें ‘ वायु ’ ह्यांतील ‘ उ ’ चे जागीं झालेला ‘ व् ’ हा आदेश स्थानिवत् मानावा —ह्मणजे तो ‘ उ ’ च आहे असें मानावें—आणि तसें मानल्यास, ‘ य् ’ लोपाची प्राप्ति होऊंच शकत नाहीं. सारांश ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यें युगपत् प्राप्त होतात तेथेंच वरील नियम लागू पडतो )

क्रमेणान्वाख्याने तूक्तोदाहरणे पूर्वप्रवृत्तिकत्वमन्तरङ्गत्वं बहिरङ्गस्यासिद्धत्वमपि निमित्ताभावादप्राप्तिरूपं बोध्यम् ॥

वरील ‘ पट्व्या ’ ह्या उदाहरणांत क्रमानें अन्वाख्यान केल्यास, ( ह्मणजे प्रथम ‘पटु+ङीप्=पट्वी’ एवढेंच रूप साधून नंतर त्याचें तृतीयेचें एकवचन करितांना‘पट्वी+आ= पट्व्या ’ असें रूप केल्यास, ) जें कार्य पूर्वी प्रवृत्त होतें तें अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, ज्या कार्याचें निमित्त उपस्थितच होत नाहीं ( कारण ‘ पटु+ङीप्=पटु+ई=पट्वी ’ हें रूप साधतेवेळीं, उत्तरयणादेशाचें निमित्त ‘ टा ’ प्रत्यय अस्तित्वांतच नाहीं. ‘ पट्वी ’ असें रूप प्रथम सिद्ध झाल्यानंतरच तो ‘ टा ’ प्रत्यय लावला जाणार आहे. ह्मणून पुढें उपस्थित होणारें ) तें कार्य बहिरङ्ग व असिद्ध समजावें.

यत्त्वेवंरीत्या पूर्वस्थानिकमप्यन्तरङ्गमिति, तच्चिन्त्यम् । स्रजिष्ठ इत्यादौ विन्मतोर्लुकि टिलोपस्यापवादविन्मतोर्लुक्प्रवृत्त्या जातिपक्षाश्रयणेन वारणप्रयासस्य प्रकृत्यैकाजिति सूत्रप्रयोजनखण्डनावसरे भाष्यकृत्कृतस्य नैष्फल्यापत्तेः । त्वदुक्तरीत्या विन्मतोर्लुको बहिरङ्गासिद्धत्वेनानायासतस्तद्वारणात् । भाष्य ईदृशरीत्या बहिरङ्गासिद्धत्वस्य क्वाप्यनाश्रयणाच्च ॥ परिभाषायामङ्गशब्दस्य निमित्तपरत्वाच्च ॥

अशाच रीतीनें पूर्वस्थानीला पावलेलें कार्य अन्तरङ्ग ( व त्याच्या पुढच्या स्थानीला पावलेलें कार्य बहिरङ्ग ) समजावें,—असें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण तें बरोबर मानल्यास, ‘ स्रजिष्ठः ’ इत्यादि स्थलीं, ( ‘ स्रज्+विन् ’ येथें ‘ अस्मायामेधास्रजो विनिः ’ सू० १९२८ ह्या सूत्रानें ‘ विन् ’ प्रत्यय होऊन ‘ स्रग्वी ’ असें रूप सिद्ध झाल्यावर, ‘ अतिशयेन स्रग्वी=स्रग्वी+इष्ठन् ’ अशा स्थितींत, ‘ विन्मतोर्लुक् ’ सू०

२०२० ह्या सूत्रानें, 'इष्ठन्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'विन्' प्रत्ययाचा लुक् होतो, व 'स्रज् + विन् + इष्ठन् = स्रज् + ० + इष्ठन्' अशी स्थिति होते; अशा स्थितींत, 'टेः' सू० १७८६ ह्या सूत्रानें, 'इष्ठन्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, टिलोप पावला आहे.) 'विन्मतोर्लुक्' हें टिलोपाचें अपवादात्मक सूत्र असल्यामुळें, प्रथम 'विन्' लोप झाल्यावर, 'टि' लोपाची प्राप्ति झाली असतां भाष्यकारांनीं, 'प्रकृत्यैकाच्' ६-४-१६३ ह्या सूत्रावरील भाष्यांत त्या सूत्राचें प्रत्याख्यान करतेवेळीं, तो 'टि' लोप टाळण्याकरितां, जातिपक्षाचा आश्रय धरून जो प्रयास केला आहे तो व्यर्थ ठरणार; कारण तुमच्या ह्मणण्याप्रमाणें, 'स्रग्विन्' ह्यांतील 'विन्' लोप, पुढें असणाऱ्या स्थानीला झाला असल्यामुळें, तो बहिरङ्ग व असिद्ध ठरतो, व तो झाला नाहीं असें समजून पूर्वस्थानी जो 'स्रज्' त्याच्या टिलोपाचा अनायासेंच बाध होतो. (पूर्वस्थानीला होणारें कार्य अन्तरङ्ग व पुढच्या स्थानीला होणारें कार्य बहिरङ्ग व असिद्ध असतें असें जें तुमचें —शंकाकाराचें—ह्मणणें आहे तें जर बरोबर असतें तर, तुमच्या मताचा आश्रय करून भाष्यकारांना टिलोप सहज टाळतां आला असता व त्यांनीं असें ह्मटलें असतें कीं, 'विन्' लोपरूप कार्य पुढच्या स्थानीला—ह्मणजे 'स्रग्विन्' ला—झालें असल्यामुळें, तो 'विन्' लोप, पूर्वस्थानी 'स्रज्' याला टिलोप करण्याचा प्रसंग आला असतां, झालाच नाहीं असें समजावें ह्मणजे टिलोपाची प्राप्तिच होत नाहीं. पण असें न ह्मणतां, भाष्यकारांनीं जातिपक्षाचा आश्रय धरुन टिलोप टाळण्याची—ह्मणजे 'विन्मतोर्लुक्' ह्या अपवादात्मक सूत्रानें एकदा जो 'टि' लोपाचा बाध झाला तो पुढें प्राप्त होणाऱ्या सर्व 'टि' लोपांचा बाधक होतो असा जातिपक्ष स्वीकारून टिलोपनिवारण करण्याचा—प्रयास केला आहे. तुमचें ह्मणणें जर भाष्यकारास कबूल असतें तर त्यांनां एवढा खटाटोप करण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें.) भाष्यामध्यें अशा प्रकारचें बहिरङ्गत्व व असिद्धत्व कोठेंहि मानलें नाहीं, व ह्या परिभाषेंतील 'अङ्ग' शब्दाचा अर्थ 'निमित्त' असा केला आहे. ('स्थानी' असा अर्थ केला नाहीं व स्थानी केव्हांहि निमित्त मानला जाऊं शकत नाहीं. ह्यामुळें तुमचें मत त्याज्य आहे.)

**इयं चोत्तरपदाधिकारस्थबहिरङ्गस्य नासिद्धत्वबोधिकेतीच एकाचो-मिति सूत्रे भाष्ये पूर्वपक्ष्युक्तिरिति सा नादर्तव्या। परन्तप इत्यादावनुस्वारे नासिद्धत्वं मुमभिप्रायां तदप्रवृत्तेः॥**

'अलुगुत्तरपदे' ह्या उत्तरपदाधिकारांत जें बहिरङ्ग कार्य सांगितलें आहे, तें ह्या परिभाषेनें असिद्ध ठरत नाहीं, असें 'इच एकाचोऽम् प्रत्ययवच्च' ६-३-६८ ह्या सूत्रावरील भाष्यांत ह्मटलें आहे; पण ती पूर्वपक्षीची उक्ति असल्यामुळें, आदरास पात्र नाहीं. 'परंतपः' इत्यादि स्थलीं, 'मुम्' चे जागीं अनुस्वार करतेवेळीं,

'मुम्' असिद्ध ठरत नाहीं; कारण ही परिभाषा त्रिपादीस लागत नाहीं. ('परान् तापयति इति परंतपः' ह्या स्थलीं, 'द्विषत्परयोस्तापेः' सू० २९५४ ह्या सूत्रानें 'खच्' प्रत्यय होऊन, 'खचि ऱ्हस्वः' सू० २९५५ ह्या सूत्रानें ऱ्हस्व होतो, व 'अरुर्द्विषदजन्तस्य मुम्' सू० २९४२ ह्या उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें मुमागम होतो. त्यामुळें 'पर+ताप+खच्=पर + तप + खच्=परम्+तप+खच्' अशी स्थिति झाली असतां, 'परम्' येथील 'म्', पदाच्या अन्तीं असल्यामुळें 'मोऽनुस्वारः' सू० १२२ ह्या सूत्रानें मकाराचा अनुस्वार होण्याची प्राप्ति झाली आहे. परन्तु खिदन्त शब्द पुढें असल्यामुळें व अजन्त शब्द मागें असल्यामुळें, 'पर' शब्दास निमित्तद्वयामुळें झालेला परनिमित्तक मुमागम बहिरङ्ग आहे, व 'मोऽनुस्वारः' ह्या सूत्रानें 'मुम् = म्' चा अनुस्वार होणें हें अन्तरङ्ग कार्य आहे; कारण अनुस्वार होण्यास पदाच्या अन्तीं असणें एवढें एकच निमित्त आवश्यक आहे. ह्मणून हें अनुस्वाररूपी अपरनिमित्तक अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं बहिरङ्ग 'मुम्', ह्या परिभाषेप्रमाणें, असिद्ध ठरत असल्यामुळें, तो झालाच नाहीं असें मानलें पाहिजे; व तसें मानल्यास, 'मुम = म्' चा अनुस्वार होऊं शकत नाहीं.—ह्या शंकेवर भाष्यांत असें उत्तर दिलें आहे कीं, उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें झालेलें बहिरङ्ग कार्य असिद्ध ठरत नाहीं, व त्यामुळें 'मुम्' चा अनुस्वार होऊं शकतो. पण हें भाष्यांतील उत्तर सिद्धान्तीचें नसून पूर्वपक्षीचें उत्तर असल्यामुळें, तें स्वीकारूं नये. खरें उत्तर हें समजावें कीं, ही परिभाषा त्रिपादीस लागत नसल्यामुळें व 'मोऽनुस्वारः' हें त्रिपादींतील सूत्र असल्यामुळें, त्या सूत्रान्वयें होणारें अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, 'अरुर्द्विषदजन्तस्य मुम्' ह्या सिद्धकाण्डांतील सूत्रानें झालेला मुमागम असिद्ध ठरत नाहीं, व त्यामुळें त्याचा अनुस्वार होतो.)

**नव्यमतेऽपि यथोद्देशपक्षाश्रयणेनान्यथासिद्धोदाहरणदानेन तस्य तदुक्तित्वमावश्यकमित्याहुः।**

(यथोद्देशपक्षांतच ही परिभाषा त्रिपादीस लागत नाहीं, परंतु कार्यकालपक्षांत ती त्रिपादीस लागते असें जें भट्टोजी दीक्षित इत्यादि) नवीन वैयाकरणांचें मत आहे तें स्वीकारलें तरी, (त्यांच्याच मताप्रमाणें ही परिभाषा, निदान यथोद्देशपक्षांत, त्रिपादीस लागत नसल्यामुळें,) जीं रूपें इतर रीतीनें सिद्ध होऊं शकत नाहींत तीं यथोद्देशपक्षाचा आश्रय घेवून सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, वरील उक्ति — ह्मणजे 'इयं चोत्तरपदाधिकारस्थबहिरङ्गस्य न असिद्धत्वबोधिका' ही उक्ति—पूर्वपक्षीचीच उक्ति आहे असें मानिलें पाहिजे असें (भाष्याचें खरें मर्म जाणणाऱ्या कित्येक) विद्वान वैयाकरणांचें मत आहे. ('अलुगुत्तरपदे' हें षष्ठाध्यायाच्या तृतीय पादाचें प्रथम सूत्र आहे. येथून उत्तरपदाधिकार सुरू होत असून तो त्या पादाच्या अखेरपर्यंत चालू आहे. या उत्तरपदाधिकारांतील सूत्रान्वयें झालेल्या बहिरङ्ग कार्यास प्रकृत परिभाषा लागत नाहीं व तें कार्य असिद्ध

ठरत नाहीं असें जें 'इच एकाचोऽम्' या सूत्रावरील भाष्यांत ह्मटलें आहे तो सिद्धान्त असून पूर्वपक्षीची उक्ति नव्हे असें दीक्षितादि नवीन वैयाकरणांचें मत आहे ते ह्मणतात कीं, प्रकृत परिभाषा उत्तरपदाधिकारांतील सूत्रांनीं होणाऱ्या बहिरङ्गकार्यास लावली तर ' द्विषन्तपः ' इत्यादि रूपें सिद्ध होणार नाहींत. ' द्विषत्परयोस्तापेः ' सू० २९५४ या सूत्रानें, ' द्विषत् ' शब्द कर्मणि उपपद असतां ' तापि ' या णिजन्त धातूस 'खच्' प्रत्यय होऊन, ' खचि ह्रस्वः ' सू० २९५५ यानें ह्रस्व झाल्यावर, उत्तरपद खिदन्त असल्यामुळें, ' द्विषत् ' शब्दास ' अरुर्द्विषदजन्तस्य मुम् ' सू० २९४२ या सूत्रानें मुमागम होतो व ' मिदचोऽन्त्यात्परः ' सू० ३७ या सूत्रान्वयें तो अन्त्य अचाला होत असल्यामुळें ' द्विषमुत् ' असें रूप होतें. ' द्विषमुत् ' या पदांतील तकार संयोगान्त असल्यामुळें, ' संयोगान्तस्य लोपः ' सू० ५४ या सूत्रानें त्याचा लोप पावला आहे हें लोपरूपी कार्य अन्तरङ्ग आहे; कारण हें कार्य होण्यास पुढें कांहीं निमित्त असण्याची गरज नाहीं. पण ' अरुर्द्विषदजन्तस्य मुम् ' या उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें झालेलें मुमागमरूपी कार्य, खिदन्त उत्तरपदाच्या निमित्तामुळें झालेलें असल्यामुळें, बहिरङ्ग आहे, व ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही प्रकृत परिभाषा उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें झालेल्या बहिरङ्ग कार्यास लावल्यास, मुमागम असिद्ध ठरून तो झालाच नाहीं असें मानलें पाहिजे व तसें मानल्यास ' द्विषमुत् ' यांतील तकार संयोगान्त ठरणार नाहीं, व त्याचा लोप होणार नाहीं, आणि इष्टरूप सिद्ध होणार नाहीं. तसेंच ' परन्तपः ' या उदाहरणांत ' पर ' शब्दाला झालेला मुमागम, वर सांगितल्याप्रमाणें, बहिरङ्ग आहे व ' मोऽनुस्वारः ' स० १२२ या सूत्रानें होणारें अनुस्वाररूपी कार्य अन्तरङ्ग आहे या ठिकाणीं प्रकृत परिभाषा लावल्यास, मुमागमरूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध ठरेल व मुमागम झालाच नाहीं असें मानावें लागेल. तसें मानल्यास, ' परम् ' हें मुमागमसहित रूप मकारान्त आहे असें मानतां येणार नाहीं, व त्यामुळें मकाराचा अनुस्वार होणार नाहीं. तसेंच 'श्रियमात्मानं मन्यते इति श्रिमन्यं ब्राह्मणकुलम् ' असें जें ' इच एकाचोऽम् ' या सूत्रावरील भाष्यांत ह्मटलें आहे तें बरोबर ठरणार नाहीं, व 'श्रियंमन्यं ब्राह्मणकुलम् ' असें रूप होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति कशी येते हें पुढील प्रक्रियेवरून स्पष्ट होईल. ' श्रियमात्मानं मन्यते ' या स्थलीं ' आत्ममाने खश्च ' सू० २९९३ या सूत्रानें ' मन् ' धातूस ' खश् ' प्रत्यय होतो. ' श्री ' शब्द जरी नित्यस्त्रीलिङ्ग शब्द आहे तरी ' कुले लक्षणया वृत्तेः नपुंसकत्वम्–लक्षणेति पूर्वलिङ्गपरित्यागात् नपुंसकलिङ्गत्वमेवाश्रीयते ' असें ' इच एकाचोऽम् ' या सूत्रावरील बालमनोरमेंत ह्मटलें आहे. अशा रीतीनें ' श्री ' शब्द नपुंसकलिङ्गी मानल्यास, 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य ' सू० ३१८ या सूत्रानें ' श्री ' हें प्रातिपदिक ह्रस्व होऊन त्याला खिदन्त उत्तरपद पुढें असल्यामुळें 'इच एकाचोऽम्' सू० २९९४ ह्या सूत्रानें अमागम होतो, व त्या अमागमास प्रत्ययवत् मानावें लागत असल्यामुळें, ' श्रि + अम् ' अशा स्थितींत ' स्वमोर्नपुंसकात् ' सू०

३१९ या सूत्रानें ' अम् ' चा ' लुक् ' पावला आहे. पण अमागमरूपी कार्य, खिदन्त उत्तरपद पुढें असतां होणारें असल्यामुळें, बहिरङ्ग आहे, व ' स्वमोर्नपुंसकात् ' या सूत्रानें होणारें ' लुक् ' कार्य अन्तरङ्ग आहे. ह्मणून प्रकृतपरिभाषेप्रमाणें अमागमरूपी कार्य असिद्ध ठरतें, व तें झालेंच नाहीं असें मानलें पाहिजे. तसें मानल्यास, ' अम्' चा लुक् पावतच नाहीं, व तो लुक् न झाल्यास, ' अचि श्नुधातु ' सू० २७१ या सूत्रानें ' इयङ् ' होऊन ' श्रियंमन्यं ब्राह्मणकुलम् ' असें रूप होईल. पण ' इच एकाचोऽम् ' या उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें झालेल्या बहिरङ्गकार्यास प्रकृतपरिभाषा लागत नाहीं असें मानलें ह्मणजे, अमागमरूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध ठरत नाहीं, व तो अमागम प्रत्ययवत् असल्यामुळें, ' स्वमोर्नपुंसकात् ' या सूत्रानें ' ' अम् 'चा लुक् होऊन, ' श्रिमन्यं ब्राह्मणकुलम् ' असें जें भाष्यांत म्हटलें आहे तें सिद्ध होतें. यावर नागेशाचें असें म्हणणें आहे कीं, ' नैषा परिभाषेहोत्तरपदाधिकारे शक्या विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । द्विषन्तपः परन्तप इति । संयोगान्तलोपो न स्यात् । तस्माच्छ्रिमन्यमित्येव भवितव्यम्'—म्हणजे ही परिभाषा या उत्तरपदाधिकारांत लावणें बरोबर नाहीं; कारण ती लावल्यास, 'द्विषन्तपः' ' परन्तपः ' हीं रूपें सिद्ध होणार नाहींत, संयोगान्तलोप होणार नाहीं; म्हणून ' श्रिमन्यम् ' हेंच रूप शुद्ध समजावें—असें जें ' इच एकाचोऽम् ' या सूत्रावरील भाष्यांत ह्मटलें आहे तें सिद्धान्तीचें वचन नसून पूर्वपक्षीची उक्ति आहे. आणि ती पूर्वपक्षीची उक्ति आहे हें मानण्यास कारण असें आहे कीं, प्रकृत परिभाषा उत्तरपदाधिकारांत लावल्यास देखील, 'द्विषन्तपः' 'परन्तपः' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. 'द्विषन्तपः ' या उदाहरणांत जरी, मुमागम कार्य बहिरङ्ग आहे व संयोगान्तलोपरूपी कार्य अन्तरङ्ग आहे तरी, प्रकृत परिभाषा त्रिपादीस लागत नसल्यामुळें,'संयोगान्तस्य लोपः' या त्रिपादींतील सूत्रानें होणाऱ्या संयोगान्तलोपरूपी अन्तरङ्ग कार्याच्या दृष्टीनें सापादिक शास्त्रानें झालेलें मुमागमरूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध ठरत नाहीं, व त्यामुळें संयोगान्त तकाराचा लोप होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. तसेंच ' परन्तपः' या स्थलीं ' मोऽनुस्वारः ' या त्रिपादींतील सूत्रानें होणाऱ्या अन्तरङ्गकार्याच्या दृष्टीनें सापादिक सूत्रानें झालेला मुमागम असिद्ध ठरत नसल्यामुळें, अनुस्वार होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. त्याचप्रमाणें, ' श्रिमन्यं ब्राम्हणकुलम् ' ही पूर्वपक्षीची उक्ति असून ' श्रियंमन्यमिति भवितव्यम् ' हीच सिद्धान्तीची उक्ति होय. सारांश प्रकृत परीभाषा उत्तरपदाधिकारांतील सूत्रांनीं होणाऱ्या बहिरङ्ग कार्यास लागत नाहीं हें ह्मणणें नागेशाच्या मताप्रमाणें, बरोबर नाहीं )

**आभीयेऽन्तरङ्गे आभीयस्य बहिरङ्गस्य समानाश्रयस्य नानेनासिद्धत्वमसिद्धत्वादित्यसिद्धवत्सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥**

आभीय अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, समानाश्रय आभीय बहिरङ्ग कार्य ह्या परिभाषेनें असिद्ध ठरत नाहीं; कारण तीं दोन्हीं कार्यें ' असिद्धवदत्राभात् ' सू० २१८३ ह्या

सूत्रानेंच परस्परांच्या दृष्टीनें असिद्ध ठरतात, असें त्या सूत्रावरील ६-४-२२ भाष्यांत सांगितलें आहे. ( ' आभीय ' अधिकार ' असिद्धवदत्राभात् ' ह्या सूत्रापासून सुरु होतो व षष्ठाध्यायाच्या चतुर्थपादाच्या समाप्तिपर्यंत तो अधिकार चालू आहे, व त्या अधिकारांत सांगितलेलीं समानाश्रय कार्यें करतेवेळीं, ही अन्तरङ्ग परिभाषा लागू पडत नाहीं; कारण ' असिद्धवदत्राभात् ' ह्या सूत्रांतच त्या अधिकारांतील एका सूत्रानें सांगितलेलें कार्य, दुसऱ्या सूत्रानें समानाश्रय कार्य करतेवेळीं, असिद्ध समजावें असें सांगितलें आहे. जसें ' पा+लिट् ' येथें ' क्वसुश्च ' सू० ३०९५ या सूत्रानें लिटाचें जागीं ' क्वसु=वस् ' असा आदेश होऊन व द्वित्व होऊन ' पपा+वस्+शस् ' अशी स्थिति झाली असतां ' सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् ' प० १२८ या न्यायान्वयें, ' वस्वेकाजाद्धसाम् ' सू० ३०९६ या सूत्रानें प्राप्त झालेल्या इडागमाचा बाध करून ' वसोः सम्प्रसारणम् ' सू० ४३५ या नित्य सूत्रानें प्रथम सम्प्रसारण झाल्यावर, व ' सम्प्रसारणाच्च ' सू० ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश झाल्यावर 'पपा+उस्+अस्' अशी स्थिति झाली असतां, ' आतो लोपः ' सू० २३७२ या आभीय अधिकारांतील सूत्रानें, अजादि आर्धधातुक ' उस् ' प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' पपा ' यांतील अकाराचा लोप पावला आहे व हें कार्य अन्तरङ्ग आहे. तसेंच पलीकडे असलेल्या ' शस् ' प्रत्ययाच्या निमित्तामुळें ' वसोः सम्प्रसारणम् ' या आभीय अधिकारांतील सूत्रानें झालेलें सम्प्रसारण कार्य बहिरङ्ग आहे, व अशा ठिकाणीं प्रकृत परिभाषा लावल्यास, तें सम्प्रसारण कार्य असिद्ध ठरतें, व ' वस् ' चा ' उस् ' झालाच नाहीं व तो ' वस् ' च आहे असें मानावें लागेल. तसें मानल्यास, अजादि आर्धधातुकप्रत्यय पुढें राहत नसल्यामुळें, आकारलोप होणार नाहीं, व ' पपुषः ' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. परन्तु प्रकृत परिभाषा आभीय अधिकारांतील ' वाह ऊठ् ' या सूत्रांत पठित असल्यामुळें, ती आभीय अधिकारांतील इतर सूत्रांनीं समानाश्रय कार्य करतेवेळीं ' असिद्धवदत्राभात् ' सू० २१८३ या सूत्रानें असिद्ध ठरत असल्यामुळें, ती येथें प्रवृत्त होऊं शकत नाहीं. त्यामुळें, सम्प्रसारण कार्य बहिरङ्ग असून देखील असिद्ध ठरत नाहीं, व आकार लोप होऊन ' पपुषः ' हें इष्ट रूप सिद्ध होतें. या विषयासम्बंधानें चित्रप्रभेंत खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटलें आहे:— ' आभीयेष्वाल्लोपादिष्वन्तरङ्गेषु कर्तव्येष्वाभीयाया असिद्धं बहिरङ्गमिति परिभाषाया असिद्धवदित्यसिद्धत्वान्न तेष्वन्तरङ्गेषु प्रवर्तत इति भावः । न चासिद्धं बहिरङ्गमिति परिभाषाया आल्लोपादीनां च समानाश्रयत्वाभावादसिद्धवदिति न प्रवर्तत इति वाच्यम् । सम्प्रसारणे कृते ह्यजाद्याश्रयेणाल्लोपादीनि प्रवर्तन्ते, कर्तव्येषु च तेषु सम्प्रसारणस्यासिद्धत्वाय तद्विषये बहिरङ्गपरिभाषापि प्रवर्तत इति तेषां समानाश्रयत्वेन तत्प्रवृत्तेर्दुर्वारत्वात् । )

एवं सिचिवृद्धेर्येननाप्राप्तिन्यायेनान्तरङ्गबाधकत्वमूलकं न सिच्यन्तरङ्गमस्तीतीको गुणेति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥ ५० ॥

याचप्रमाणें ' इकोगुणवृद्धी ' १-१-३ या सूत्रावरील भाष्यांत, ' येन नाप्राप्ते यो विधिरारभ्यते स तस्य बाधको भवति ' प० ५८ या न्यायान्वयें, अपवाद अन्तरङ्ग कार्यांचा बाधक ठरत असल्यामुळें, त्या न्यायाच्या आधारावर 'न सिच्यन्तरङ्गमास्ति' असें म्हटलें आहे (स्वादिगणांतील ' चिञ् चयने ' या धातूचें लुङाचें परस्मैपदाचें रूप करितांना, ' अस्ति सिचोऽपृक्ते सू० २२२५ या सूत्रानें ' त् ' प्रत्ययास ईडागम होऊन ' अ+चि +सिच्+ई+त् ' अशी स्थिति झाली असतां, अलीकडे असलेल्या आर्धधातुक ' सिच् ' प्रत्ययामुळें ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ या सूत्रानें पावलेला गुण अन्तरङ्ग कार्य आहे, व सिचापुढें परस्मैपदी प्रत्यय असल्यास 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' सू० २२९७ या सूत्रान्वयें निमित्तद्वयामुळें—सिच् व त्यापुढें परस्मैपदी प्रत्यय असणें या दोन निमित्तांमुळें—पावलेलें वृद्धिरूप बहिरङ्ग कार्य असिद्ध मानल्यास, व तें न करितां अन्तरङ्ग गुणकार्य केल्यास, ' अचैषीत् ' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, ' अचेषीत् ' असें विकृत रूप सिद्ध होईल. तसें न व्हावें म्हणून, ' न सिचि अन्तरङ्गमास्ति ' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे, व त्याचा अर्थ असा आहे कीं, 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु ' या सूत्रानें वृद्धि करतेवेळीं, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही परिभाषा लागत नाहीं, व त्यामुळें गुण कार्य अन्तरङ्ग असून देखील, तें न होतां, बहिरङ्ग वृद्धिकार्य होतें. असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' हें सामान्यशास्त्र आहे व ' सिचि वृद्धिः परस्मैपदेषु ' हें विशेषशास्त्र आहे. जेथें जेथें ' सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' हें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहे, कारण ' सिच् ' हा आर्धधातुक प्रत्यय असल्यामुळें सर्वत्र गुण होऊं पाहणारच, व त्यामुळें 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु ' हें विशेषशास्त्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थल मिळूं शकणार नाहीं, व तें सूत्र व्यर्थ ठरणार. अशा ठिकाणीं ' येन नाप्राप्ते ' या न्यायान्वयें विशेषशास्त्र अपवादत्वामुळें सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां बाधक ठरून, सामान्यशास्त्रास प्रवृत्त होऊं न देतां, स्वतःच प्रवृत्त होतें, व म्हणूनच ' अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान् '—प० ५७—असें म्हटलें आहे. सारांश ( १ ) त्रिपादीतील सूत्रांनीं कार्य करतेवेळीं, ( २ ) आभयाधिकारांतील सूत्रांनीं समानाश्रय कार्य करतेवेळीं व ( ३ ) 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु ' या सूत्रानें कार्य करतेवेळीं प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं हें ध्यानांत ठेवावें.)

टीप-असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' या परिभाषेंत 'बहिरङ्ग' व 'अन्तरङ्ग' हे शब्द आले असल्यामुळें व हे दोन्ही शब्द सापेक्ष असल्यामुळें, कोणत्या कार्यास बहिरङ्ग म्हणावें व त्याच्या अपेक्षेनें कोणतें कार्य अन्तरङ्ग ठरतें या विषयासंबन्धानें चर्चा करितांना, ग्रन्थकारानें 'बहिरङ्ग' शब्दाच्या प्राचीन वैयाकरणांनीं ज्या अनेक व्याख्या दिल्या आहेत त्यांचें विस्तारपूर्वक खण्डन केलें आहे. त्या सर्व व्याख्या लक्षांत राहव्या म्हणून थोडक्यांत खालीं दिल्या आहेत:— ( १ ) ' अर्थनिमित्तकस्य न बहिरङ्गत्वम् '—ज्या कार्याचें अर्थ निमित्त आहे तें बहिरङ्ग कार्य होय व त्याच्या अपेक्षेनें ज्या कार्याचें अर्थ निमित्त नाहीं तें अन्तरङ्ग कार्य होय

असें जें प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं. ( २ ) ' बह्वपेक्षं बहिरङ्ग-मल्पापेक्षमन्तरङ्गम् '–जें कार्य जास्त निमित्तांमुळें होतें तें बहिरङ्ग व जें कार्य कमी निमित्तांमुळें होतें तें त्याच्या अपेक्षेनें अन्तरङ्ग समजावें असें जें प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं: ( ३ ) ' संज्ञापेक्षं बहिरङ्गत्व '—ज्या कार्याला संज्ञेची अपेक्षा आहे तें कार्य बहिरङ्ग व त्याच्या मानानें ज्या कार्याला संज्ञेची अपेक्षा नाहीं तें कार्य अन्तरङ्ग होय असें जें प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं. ( ४ ) ' परम्परया निमित्तत्वमादाय बहिरङ्गत्वाश्रयणे तु न मानम् '–परम्परेनें होणाऱ्या निमित्तामुळें कार्यास बहिरङ्गत्व येतें असें जें कित्येक प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं. ( ५ ) ' विशेषापेक्षं बहिरङ्ग सामान्यापेक्षमन्तरङ्गम् '–ज्याला विशेषनिमित्ताची अपेक्षा आहे तें कार्य बहिरङ्ग व त्याच्या मानानें ज्या कार्याला सामान्यानिमित्ताची अपेक्षा आहे तें कार्य अन्तरङ्ग होय असें जें कित्येक प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं. ( ६ )' पूर्वस्थानिककार्यमन्तरङ्गं परस्थानिककार्यं बहिरङ्गम् ' पुढच्या स्थानीला होणारें कार्य बहिरङ्ग व त्याच्या मानानें पूर्व स्थानीला होणारें कार्य अन्तरङ्ग होय असें जें कित्येक प्राचीन वैयाकरणांचें मत आहे तें बरोबर नाहीं. ( ७ ) ' पूर्वोपस्थितनिमित्तक-मन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्, ' अथवा ' बहिरङ्गनिमित्तसमुदायान्तर्भूतं यस्य निमित्तं तदन्तरङ्गम्, अन्तरङ्गकार्यनिमित्तसमुदायाद्बहिर्भूतं यस्य निमित्तं तद्बहिरङ्गम् ' किंवा ' अपरनिमित्तकमन्तरङ्गम् परनिमित्तकं बहिरङ्गम् ' ह्याच अन्तरङ्ग व बहिरङ्गकार्याच्या व्याख्या योग्य होत हें ग्रन्थकाराचें मत आहे असें दिसून येतें.

---

## परिभाषा ५१

नन्वेवमक्षद्यूरित्यादौ बहिरङ्गस्योठोऽसिद्धत्वादन्तरङ्गो यण् न स्यादत आह—

असें जर आहे तर–ह्मणजे वरील परिभाषा नं ५० स्वीकारल्यास–' अक्षद्यूः ' इत्यादि उदाहरणांत, ' ऊठ् ' बहिरङ्ग असल्यामुळें असिद्ध मानल्यास, अन्तरङ्ग यणादेश होणार नाहीं. ( ' अक्ष+दिव्+क्विप्+सु ' येथें, ' क्विप् ' प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' च्छ्वोः शूठ् अनुनासिके च ' सू० २५६१ ह्या सूत्रानें ' दिव् ' ह्यांतील ' व् ' चे जागीं ' ऊठ् ' होऊन, ' अक्ष+दिऊ+क्विप्+सु ' अशी स्थिति झाली असतां, ' दि ' ह्यांतील इकाराला, ' ऊ ' हा अच् पुढें असल्यामुळें, ' इको यणचि ' सू० ४७ ह्या सूत्रानें यणादेश पावला आहे. ' ऊठ् ' हें बहिरङ्ग कार्य असून, यणादेश हें अन्तरङ्ग कार्य आहे; कारण यणादेश कार्य पूर्वी असलेल्या ' ऊ ' निमित्तानें पावलें असून, ' ऊठ् ' कार्य पुढें असलेल्या ' क्विप् ' निमित्तामुळें पावलें आहे. ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ह्या परिभाषेप्रमाणें, अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, बहिरङ्ग कार्य झालेंच नाहीं असें समजावें

लागतें ह्मणून यणादेशरूपी अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, बहिरङ्ग ऊठ् झालाच नाहीं व तो 'व्' च आहे असें मानणें भाग आहे; आणि असें मानल्यास, यणादेशाची प्राप्तीच नाहीं, व 'दि+ऊ' ह्याचा 'द्यू' असा संधि होऊं शकणार नाहीं. तसें होऊं नये ) ह्मणून ही परिभाषा सांगतात.—

## नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः ॥ ५१ ॥

" अचाच्या लगेंच पुढें असणाऱ्या निमित्तामुळें अन्तरङ्गकार्य करणें प्राप्त झाल्यास, पूर्वी झालेलें बहिरङ्गकार्य बहिरङ्ग व असिद्ध मानूं नये "

( ही परिभाषा असल्यामुळें, ऊठ् कार्य जरी बहिरङ्ग आहे तरी 'दि' ह्यांतील अचाच्या लगेंच पुढें प्राप्त झालेल्या 'ऊ' ह्या निमित्तामुळें अन्तरङ्ग यणादेशरूपी कार्याची प्राप्ति झाली असतां तो यणादेश करतेवेळीं, बहिरङ्ग 'ऊठ्' असिद्ध आहे—ह्मणजे 'व्' चे जागीं 'ऊ' झालाच नाहीं—असें समजूं नये, व 'इ' ला यणादेश करावा. तसें केलें ह्मणजे 'अक्ष+दि+ऊ+क्विप्=०+सु=अक्षद्यूः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

अत्र षत्वतुकोरिति सूत्रस्थं तुग्ग्रहणं ज्ञापकम् । अन्यथाधीत्य प्रेत्येत्यादौ समासोत्तरं ल्यप्प्रवृत्त्या पूर्वं समासे जाते तत्र संहिताया नित्यत्वाल्ल्यबुत्पत्तिपर्यन्तमप्यसंहितयावस्थानासंभवेनैकादेशे ल्यपि तुगपेक्षया पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्षैकादेशस्य बहिरङ्गतयासिद्धत्वेन तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ।

'षत्वतुकोरसिद्धः' सू० ३३३३ या सूत्रांतील तुक्ग्रहण या परिभाषेचें ज्ञापक होय. ही परिभाषा नसती तर तें तुक्ग्रहण व्यर्थ ठरलें असतें; कारण 'अधीत्य, प्रेत्य' इत्यादि स्थलीं समास झाल्यावरच ( क्त्वाचे जागीं ) ल्यबादेश होऊं शकत असल्यामुळें, व समास प्रथम केल्यानंतर समासांतील पदांचा सन्धि होणें नित्य असल्यामुळें —ह्मणजे सन्धि टाळतां येणें अशक्य असल्यामुळें—आणि ल्यबादेश होईपर्यंत धातु व उपसर्ग यांचें, सन्धि न होतां, पृथक् स्थितींत—ह्मणजे सन्धिशिवाय—राहणें असंभवनीय असल्यामुळें, एकादेश प्रथम झालाच असता; व एकादेश झाल्यावर तो एकादेश-दोन भिन्न पदांतील दोन वर्णांच्या आश्रयानें होणारा असल्यामुळें, ( केवळ ल्यप् प्रत्याला मानून होणाऱ्या ) तुगागमाच्या मानानें, बहिरङ्ग व असिद्ध ठरलाच असता. ( व तो झालाच नाहीं असें मानून तुगागमरूपी अन्तरङ्गकार्य करतां आलेंच असतें. ह्मणून तुगागम करतेवेळीं पूर्वी झालेला एकादेश असिद्ध समजावा असें सांगण्याची कांहींच गरज नव्हती. (ही परिभाषा नसती तर 'षत्वतुकोरसिद्धः' या सूत्रांत तुक्ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती असें जें ग्रन्थकारानें ह्मटलें आहे तें खालीं दिलेल्या प्रक्रियेवरून स्पष्ट होईल. 'अधि+इ+क्त्वा,' अथवा 'प्र+इ+क्त्वा' अशा स्थलीं, 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू० ३३३२ ह्या सूत्राप्रमाणें, धातु व उपसर्ग ह्यांचा समास झाल्याशि-

वाय 'क्त्वा' चे जागीं 'ल्यप्' होऊं शकत नाहीं. ह्मणून 'ल्यप्' होण्याकरितां, धातु व उपसर्ग ह्यांचा समास करणें आवश्यक आहे. समास केला तर धातु व उपसर्ग ह्यांचा सन्धि होणें टाळतां येत नाहीं; कारण 'संहितैकपदे नित्या, नित्या धातूपसर्गयोः। नित्या समासे, वाक्ये तु सा विवक्षामपेक्षते' असा सन्धीच्या संबन्धानें नियम आहे. म्हणून 'अधि+इ' ह्या ठिकाणीं 'अकः सवर्णे दीर्घः' सू० ८५ ह्या सूत्रानें सवर्ण-दीर्घरूप एकादेश व तसेंच 'प्र+इ' ह्या ठिकाणीं 'आद्गुणः' सू० ६९ ह्या सूत्रानें गुणरूप एकादेश केलाच पाहिजे. तसा एकादेश केल्यास, 'अधि+इ=अधी' व 'प्र+इ=प्रे' अशीं रूपें होणार. ह्या दोन्हीं रूपांत अन्तीं ऱ्हस्व स्वर नसल्यामुळें 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' सू० २८५८ ह्या सूत्राप्रमाणें तुगागम होऊं शकणार नाहीं, व 'अधीय,' 'प्रेय' अशीं अशुद्ध रूपें होतील. एकादेश असिद्ध—म्हणजे झालाच नाहीं—असें मानलें तरच तुगागम होऊं शकतो. तो एकादेश होण्यास दोन पदांत असणाऱ्या दोन वर्णांची गरज आहे—म्हणजेच तो पदद्वयसंबन्धिवर्णद्वयसापेक्ष आहे. पण तुगागम केवळ 'ल्यप्' प्रत्ययामुळें होणारा आहे; ह्मणून तुगागम अन्तरङ्ग व त्याच्या मानानें एकादेश बहिरङ्ग ठरतो; व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा लावल्यास पूर्वी झालेला एकादेश बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, तुगागमरूपी अन्तरङ्ग कार्य करते-वेळीं, तो एकादेश झालाच नाहीं—ह्मणजे 'इ' असें ऱ्हस्वान्तच रूप आहे—असें मानल्यास, तुगागम आपोआपच होऊं शकतो. असें असून मग पाणिनीनें 'षत्वतु-कोरसिद्धः'—ह्मणजे षत्व किंवा तुक्विधि करितांना एकादेश असिद्ध समजावा,—हें सूत्र कशास केलें? अन्तरङ्ग परिभाषा—प० ५०—असल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. पण अचाच्या लगेच पुढें असलेल्या निमित्तामुळें कार्य करणें झाल्यास, पूर्वी झालेल्या बहिरङ्ग कार्यास बहिरङ्गत्व व असिद्धत्व येत नाहीं; ही परिभाषा ५१ पाणिनीस मान्य असल्यामुळें, बहिरङ्ग एकादेशाला असिद्धत्व आलें नसतें. तें यावें ह्मणून, पाणिनीला 'षत्वतुकोरसिद्धः' ह्या सूत्रांत तुक्ग्रहण करणें भाग पडलें, व अशा रीतीनें तें 'तुक्' ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें.)

**पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्षं बहिरङ्गमिति प्रेद्ध इत्यादौ गुणो बहिरङ्ग इति ग्रन्थेन न धातुलोप इति सूत्रे संयोगान्तस्य लोप इति सूत्रे च भाष्ये स्पष्टम् ।**

(पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्ष एकादेश बहिरङ्ग आहे असें जें वर ह्मटलें आहे त्याला ग्रन्थकार भाष्याचें प्रमाण देतात.) दोन पदें एका पुढें एक आलीं असतां, पहिल्या पदांतील अन्त्य वर्णाचा पुढच्या पदाच्या आद्य वर्णाशीं होणारा एकादेशरूप सन्धि पदद्वयसंबन्धि वर्णद्वयापेक्ष असल्यामुळें, तो बहिरङ्ग ठरतो; ह्मणूनच 'प्रेद्धः' इत्यादि स्थलीं गुणरूपी एकादेश बहिरङ्ग समजावा असें 'न धातुलोप आर्धधातुके' १–१–४ ह्या सूत्रावरील भाष्यांत व तसेंच 'संयोगान्तस्य लोपः' ८-२-२३ ह्या

सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ' ञिइन्धी दीप्तौ ' ह्या रुधादिगणांतील प्रपूर्वक ' इन्ध ' धातूस ' क्त ' प्रत्यय करितांना ' प्र + इन्ध् + क्त ' अशा स्थितींत, ' अनिदितां हल उपधाया क्ङिति ' सू० ४१५ ह्या सूत्रानें ' न् ' चा लोप होऊन ' प्र + इध् + क्त ' असें रूप होतें. अशा स्थितींत, ' न धातुलोप आर्धधातुके ' सू० २६५६ ह्या सूत्राप्रमाणें, धातूचा अंश नकार ह्याचा लोप करणारा आर्धधातुक ' क्त ' प्रत्यय पुढें असल्यामुळें, गुणरूपी एकादेश ' ए ' होऊं नये. पण भाष्यकार ह्मणतात कीं, धातु व प्रत्यय ह्यांचे अन्तरङ्ग कार्य केल्यावर, पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्ष सन्धिरूप—ह्मणजे गुणरूपएकादेश हें—बहिरङ्ग कार्य करण्यास हरकत नाहीं. ह्मणून ' प्र + इध् + क्त = प्रेद्धः ' असें रूप होतें. तसेंच, 'दधि+अन्न' ह्या ठिकाणीं ' इको यणचि ' ह्या सूत्रानें ' दध्य् + अन्न ' असें झाल्यावर, ' संयोगान्तस्य लोपः ' सू० ५४ ह्या सूत्रानें ' दध्य् ' ह्यांतील अन्त्य ' य् ' चा लोप पावला आहे ' यणः प्रतिषेधो वाच्यः ' ह्या वार्तिकामुळे ' य् ' लोप होत नाहीं. पण भाष्यकार ' य् ' लोप टाळण्यासाठीं वरील वार्तिक सांगून पुढें असेंहि म्हणतात कीं ' न वा वक्तव्यम् किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वाद्वा । अथवा बहिरङ्गो यणादेशः । अन्तरङ्गो लोपः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । ' म्हणजे हें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं. कारण यणादेश बहिरङ्ग असून लोपरूपी कार्य अन्तरङ्ग आहे, व ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही परिभाषा असल्यामुळें अन्तरङ्गलोपरूपी कार्य करण्याचा प्रसङ्ग आला असतां, यणादेशरूपी बहिरङ्गकार्य आपोआपच असिध्द ठरतें, व त्यामुळें लोप होऊं शकत नाहीं. हें खरें कीं 'संयोगान्तस्य लोपः' हें त्रिपादींतील सूत्र असल्यामुळें व परिभाषा नं. ५० पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्रिपादीस लागू पडत नसल्यामुळें, संयोगान्तलोपरूपी कार्य, अन्तरङ्ग असून देखील सिध्दकांडांतील सूत्रानें होणाऱ्या यणादेशाच्या दृष्टीनें, ' पूर्वत्रासिद्धम् ' या सूत्रान्वयें, असिध्दच ठरतें, व त्यामुळें संयोगान्त लोप होऊं शकत नाहीं. तथापि भाष्यकारांनीं संयोगान्तलोप टाळण्याकरितां वर सांगितलेली दुसरी युक्ति सुचवली आहे. )

**यत्तु षत्वग्रहणमपि ज्ञापकम् अन्यथा । कोऽसिचदित्यादौ पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्षत्वेन बहिरङ्गस्यैकादेशस्यासिद्धत्वेन षत्वाप्रवृत्तौ किं तेनेति। तन्न । इणः पूर्वपदसंबन्धित्वेन षत्वस्यापि पदद्वयसंबन्धिवर्णद्वयापेक्षत्वेनोभयोः समत्वात् । एकादेशस्य परादित्वेनौसिचदित्यस्य पदत्वेन सस्य पदादित्वाभावान्न सात्पदाद्योरित्यनेन निषेधः । त्रैपादिकेऽन्तरङ्गे कार्याकालपक्षेऽपि बहिरङ्गपरिभाषाया अप्रवृत्तेः पूर्वमुपपादितत्वाच्च ॥**

( कांहीं वैयाकरण असें ह्मणतात कीं, जसें ' षत्वतुकोरसिद्धः ' ह्या सूत्रांतील ' तुक् ' ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे, तसेंच ह्या सूत्रांतील ) षत्वग्रहण देखील ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. तसें न मानल्यास, ' कोऽसिचत् ' इत्यादि स्थलीं, दोन

पदांतील दोन वर्णांचे जागीं होणारा एकादेश ( प० ५० प्रमाणें ) बहिरङ्ग व असिद्ध ठरत असल्यामुळें, ( तो झालाच नाहीं असें मानल्यास ), षत्वाची प्राप्तीच होत नाहीं, व त्यामुळें षत्वग्रहण व्यर्थ पडेल. ( क+सु+असिचत् ' येथें, ' ससजुषो रुः ' सू० १६२ ह्या सूत्रानें ' स् ' चा ' र् ' होऊन, ' अतो रोरुः ' सू० १६३ ह्या सूत्रानें रकाराचा उकार होऊन ' क+उ + असिचत् ' अशी स्थिति झाल्यावर, आद्गुणः ' सू० ६९ ह्यानें ' क ' यांतील ' अ ' व त्यापुढील ' उ ' ह्यांचे जागीं ' ओ ' असा गुणरूपी एकादेश होऊन ' को+असिचत् ' अशी स्थिति होते, व ' एङः पदान्तादति ' सू० ८६ ह्या सूत्रानें पूर्ववर्णरूपी एकादेश होऊन 'कोऽसिचत्' असें रूप होतें. आतां येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, ' को ' ह्यांतील ओकारापुढें 'सिचत्' ह्यांतील ' स् ' आल्यामुळें व हा सकार ' षिच क्षरणे ' ह्या तुदादिधातूंतील षकाराचें जागीं ' धात्वादेः षः सः. सू० २२६४ ह्या सूत्रान्वयें आदेश झाला असल्यामुळें, 'इण्कोः' 'आदेशप्रत्यययोः' सू' २२१ व २१२ ह्या सूत्रांप्रमाणें सकाराचा षकार व्हावा. परंतु पदद्वयांत असणाऱ्या ' ओ ' व ' अ ' ह्या दोन वर्णांचा पूर्ववर्णरूपी एकादेश ' ओ ' पदद्वयसम्बन्धि-वर्णद्वयाश्रित असल्यामुळें, तो बहिरङ्ग ठरतो, व 'सिचत्' ह्या एकपदांतील 'स्' ह्या वर्णास होणारें षत्वरूपी अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, तो ' ओकार ' अन्तरङ्ग परिभाषे-प्रमाणें असिद्ध ठरत असल्यामुळें, षत्व होऊंच शकत नाहीं. असें असल्यामुळें ' षत्वतु-कोरसिद्धः ' ह्या सूत्रांतील षत्वग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. परंतु ' नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्र-क्लृप्तिः' ही परिभाषा असल्यामुळें, ' ओ ' हा पूर्ववर्णरूपी एकादेश बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं, व त्यामुळें षत्व प्राप्त होतें. तें षत्व टाळण्याकरितां,पाणिनीनें 'षत्वतुकोः' ह्या सूत्रांत मुद्दाम षत्वग्रहण केलें आहे. ह्मणून तें षत्वग्रहण देखील ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें असें कैयटादिकांचें ह्मणणें आहे. परंतु हें मत नागेशास मान्य नसल्यामुळें त्या मताचें खण्डन करितांना ते असें ह्मणतात कीं,—) हें वरील ह्मणणें बरोबर नाहीं. कारण पूर्वसवर्णरूपी ' ओ ' हा एकादेश जसा दोन भिन्न पदांच्या दोन वर्णांच्या जागीं झाला आहे, तसेंच षत्व देखील दोन भिन्न पदांच्या (—'को ' व सिचत् ' ह्या दोन पदांच्या—) दोन वर्णांना ( - ' ओ ' व ' स् ' ह्या दोन वर्णांना-)मानून होणारें कार्य आहे व दोन्हीं कार्यें सारखींच आहेत. ( ह्मणून दोन्हीं कार्यें समाननि-मित्तक असल्यामुळें व त्यामुळें एककार्य अन्तरङ्ग व दुसरें कार्य बहिरङ्ग ठरत नस-ल्यामुळें, अशा ठिकाणीं अन्तरङ्ग परिभाषा लागू पडत नाहीं. ह्यावर शंकाकार असें ह्मणतो कीं, असें जर आहे तर, ' सिचत् ' येथील सकारास षत्व कां होऊं नये ? ह्या शंकेचें उत्तर असें आहे कीं, ' अन्तादिवच्च ' सू० ७५ ह्या सूत्रान्वयें, एकादेश ' ओ ' ह्याला पूर्वपदाचा अन्त्यावयव मानल्यास, उत्तरपद ' सिचत् ' असें राहत असल्यामुळें, ' सात्पदाद्योः ' सू० २१२३ ह्या सूत्रामुळें, आदि सकारास षत्व होऊं शकत नाहीं. पण ) एकादेश ' ओ ' ह्याला ' अन्तादिवच्च ' ह्या सूत्रान्वयें, उत्तरपदाचा आद्यवयव मानल्यास – ह्मणजे ' ओसिचत् ' असें एक पद मानल्यास

' इण् ' प्रत्याहारांतील ' ओ ' ह्याच्यापुढें सकार असल्यामुळें व सकार पदाचा आदि नसल्यामुळें ' सात्पदाद्योः ' ह्या सूत्रानें षत्वनिषेध होऊं शकत नाहीं. ( सारांश होणाऱ्या षत्वाचें निवारण करण्याकरितां ' षत्वतुकोरसिद्धः ' ह्या सूत्रांतील षत्व-ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें षत्वग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं.) दुसरें असें कीं, कार्यकालपक्षांत देखील, त्रिपादींत सांगितलेलें अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, अन्तरङ्ग परिभाषा—नं० ५०—लागू पडत नाहीं हें मागेंच सिद्ध केलें आहे. ( ह्मणून षत्वकार्य जरी अन्तरङ्ग मानलें तरी, तें त्रैपादिक कार्य असल्यामुळें तशा ठिकाणीं अन्तरङ्गपरिभाषा लागू पडत नाहीं; व त्यामुळें सापादिक कार्य बहिरङ्ग असून देखील प्रथम होतें, व तें त्रैपादिकें अन्तरङ्ग कार्याच्या दृष्टीनें, बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं, व तें कार्य झाल्यावर त्रैपादिक षत्वरूपी अन्तरङ्ग कार्य करणें प्राप्त झालें असतां, षत्वाचें निवारण करण्याकरितां ' षत्वतुकोरसिध्दः' ह्या सूत्रांतील षत्वग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें ह्या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. )

**परिभाषार्थस्त्वचोऽन्यानन्तर्यनिमित्तकेऽन्तरङ्गे कर्तव्ये जातस्य बहि-रङ्गस्य बहिष्ट्वप्रक्लृप्तिर्न । बहिस्पदेन बहिरङ्गम् । तस्य भावो बहिरङ्ग-त्वम् । तत्प्रयुक्तासिद्धत्वस्य न प्रक्लृप्तिः न प्राप्तिरिति ।**

परिभाषेचा अर्थ असा आहे कीं, अचाच्या लगेच पुढें असलेल्या दुसऱ्या कोण-त्याहि निमित्तामुळें अन्तरङ्ग कार्य करणें प्राप्त झाल्यास, पूर्वीं झालेलें बहिरङ्ग कार्य बहि-रङ्ग समजूं नये. ' बहिष्ट्व ' ह्यांतील ' बहिः ' ह्या शब्दाचा अर्थ ' बहिरङ्ग ' सम-जावा, त्याचा भाव ह्मणजे बहिरङ्गत्व; त्या बहिरङ्गत्वामुळें (प० ५० प्रमाणें) येणाऱ्या असिद्धत्वाची प्रक्लृप्ति, ह्मणजे प्राप्ति, होत नाहीं. ( सारांश तें बहिरङ्ग कार्य असिद्ध मानूं नये. )

**असिद्धं बहिरङ्गमित्युक्त्वा नाजानन्तर्य इति वक्ष्यामीति भाष्योक्त्या तत्रत्यस्याऽन्तरङ्ग इत्यस्याऽनुवृत्तिसूचनात् ॥ तेन पचावेदमित्यादौ न दोषः । अन्तरङ्गस्याचूस्थानिककार्यस्यैत्वस्यान्यानन्तर्यनिमित्तकत्वा-भावात् ॥**

भाष्यकार ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही परिभाषा सांगून नंतर म्हणतात कीं, ' नाजानन्तर्ये ' ही परिभाषा मी पुढें सांगणार आहे. ह्यावरून अन्तरङ्ग परिभा-षेंतील ' अन्तरङ्गे ' ह्या शब्दाची प्रकृत परिभाषेंत अनुवृत्ति करावी हें सुचविलें आहे. ( आणि त्यामुळें ' अचोऽन्यानन्तर्यनिमित्तके अन्तरङ्गे कर्तव्ये ' असा या परिभाषेंतील ' अजानन्तर्ये' या शब्दाचा अर्थ होतो ) म्हणूनच, ' पचावेदम् ' इत्यादि स्थलीं, कांहीं दोष येत नाहीं; कारण अच् जो ' ए ' त्याला ' ऐ ' रूपी जें अन्तरङ्ग कार्य करणें आहे तें पुढें असणाऱ्या निमित्ताला मानून होत नसणारें कार्य आहे. ( ' पचाव+इदम् ' ह्या

ठिकाणीं, 'आद्गुणः' सू० ६९ ह्या सूत्रानें गुणरूपी एकादेश होऊन 'पचावेदम्' असें झालें आहे. येथें शंकाकार असें म्हणतो कीं, 'अन्तादिवच्च' सू० ७५ ह्या सूत्राप्रमाणें, 'ए' ह्या एकादेशास पूर्वपदाचा अन्त्यावयव मानल्यास, 'एत ऐ' सू० २२५३ ह्या सूत्राप्रमाणें, 'पचावे' ह्यांतील अन्त्य 'ए' चा 'ऐ' होऊन 'पचावै' असें रूप कां होऊं नये ? ह्या शंकेचें उत्तर हें कीं, 'पचाव' व 'इदम्' ह्या दोन पदांत असणाऱ्या 'अ' व 'इ' ह्या दोन वर्णांना मानून होणारा एकादेश बहिरङ्ग असल्यामुळें व 'ए' चा 'ऐ' होणें हें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, ह्या ठिकाणीं 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा लागू पडते. म्हणून 'ए' हा बहिरङ्ग एकादश झालाच नाहीं, असें समजलें पाहिजे. त्यामुळें 'एत ऐ' हें सूत्र येथें लागू पडत नाहीं, व 'ए' चा 'ऐ' होत नाहीं. 'नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः' ही अपवादात्मक परिभाषा देखील ह्या वरील उदाहरणांत लागू पडत नाहीं; कारण अच् जो 'ए' त्याला 'ऐ' रूपी जें कार्य करणें आहे तें कार्य पुढें असणाऱ्या निमित्तामुळें होणारें कार्य नसून, तें 'ए'-लाच मानून होणारें कार्य आहे. आणि म्हणूनच मागल्या परिभाषेप्रमाणें, बहिरङ्ग कार्य 'ए' हें असिद्ध ठरत असल्यामुळें, 'ए' चा 'ऐ' हें अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, तें पूर्वीं झालेलें एकादेशरूपी कार्य झालेंच नाहीं असें मानलें पाहिजे, व 'ए' झालाच नाहीं असें मानलें म्हणजे ऐत्वाची प्राप्तीच होत नाहीं. )

**जातस्य बहिरङ्गस्येत्युक्तथायजे इन्द्रं धियतीत्यादौ बहिरङ्गदीर्घगुणादेरसिद्धत्वं सिद्धम् ।**

('अचोऽन्यानन्तर्यनिमित्तकेऽन्तरङ्गे कर्तव्ये जातस्य बहिरङ्गस्य बहिष्ट्वप्रक्लृप्तिर्न' असा ह्या परिभाषेचा अर्थ करितांना,) 'जातस्य बहिरङ्गस्य' असें म्हटलें असल्यामुळें, 'अयजे इन्द्रम्' 'धियति' इत्यादि स्थलीं सवर्णदीर्घरूप एकादेश व गुणरूप एकादेश, बहिरङ्ग असल्यामुळें, असिद्ध ठरतात. ( 'अ+यज्+शप् ( अ )+इट्+इन्द्रम्= अयज+इ+इन्द्रम्' ह्या स्थलीं, 'अ' व 'इ' ह्यांचा गुणैकादेशरूपी सन्धि, आणि तसेंच 'इ' व 'इ' ह्यांचा सवर्णदीर्घरूपी सन्धि युगपत् प्राप्त झाला आहे. ह्या दोन कार्यांपैकीं धातु व प्रत्यय ह्यांचा सन्धि अन्तरङ्ग कार्य असून, प्रत्यय व शब्दान्तर 'इन्द्र' ह्यांचा सन्धि बहिरङ्ग कार्य आहे. म्हणून, मागल्या परिभाषेप्रमाणें, अशीं दोन कार्यें युगपत् प्राप्त झालीं असतां, अन्तरङ्ग कार्य प्रथम होत असल्यामुळें, 'अयजे +इन्द्रम्' असें होतें. 'जातस्य बहिरङ्गस्य' असें म्हटलें असल्यामुळें व येथें बहिरङ्गकार्य पूर्वीं झालेलें नसल्यामुळें, प्रकृत परिभाषा—नं. ५१—लागू पडत नाहीं. तसेंच तुदादि परस्मैपदी 'धि धारणे' ह्या धातूचें प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रूप करितांना, 'धि+श+ति=धि+अ+ति' अशा स्थितींत, 'अचि श्नुधातुभ्रुवाम्' सू० २७१ ह्या सूत्रानें 'इयङ्' पावला आहे, व 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ ह्या सूत्रानें गुण पावला आहे, व दोन्हीं कार्यें युगपत् पावलीं आहेत. त्यापैकीं 'इयङ्' कार्य होण्याचें

निमित्त ' अ ' हा अधिक जवळ असल्यामुळें, तें कार्य अन्तरङ्ग ठरतें, व गुणरूपी कार्य होण्याचें निमित्त ' तिप् ' प्रत्यय पलीकडे असल्यामुळें, तें कार्य बहिरङ्ग ठरतें; म्हणून मागल्या परिभाषेप्रमाणें, दोन्हीं कार्यें युगपत् प्राप्त झालीं असतां, अन्तरङ्ग कार्य प्रथम होऊन–म्हणजे इयङादेश होऊन–' धियति ' असें रूप होतें. येथें देखील ' जातस्य बहिरङ्गस्य ' असें म्हटलें असल्यामुळें, व बहिरङ्ग कार्य पूर्वीं झालें नसल्यामुळें, प्रकृत परिभाषा–नं० ५१–लागू शकत नाहीं. )

अत एवेण्ङिशीनामाद्गुणः सवर्णदीर्घत्वाच्छचङन्तस्यान्तरङ्गत्वादित्यादि सङ्गच्छते ।

( ' जातस्य बहिरङ्गस्य ' असें म्हटलें आहे ) म्हणूनच, ' इट् ', 'ङि,' व 'शि' ह्यांनां सवर्णदीर्घ न होतां, 'आद्गुणः' ह्या सूत्रान्वयें गुण होतो असें जें ( 'विप्रतिषेधे परं कार्यम् ' १–४–२ ह्या सूत्रावरील भाष्यांत ) सांगितलें आहे आणि तसेंच शान्त व चङन्त अन्तरङ्ग असल्यामुळें, ( गुण न होतां, इयङ्, उवङ् आदेश होतात ) इत्यादि जें ( क्ङिति च ' १–१–५ ह्या सूत्रावरील भाष्यांत ) सांगितलें आहे तें ठीक जुळतें. (' इट् 'चें उदाहरण 'अग्रज+इट्+इन्द्रम्' हें नुकतेंच वर दिलें आहे. सप्तमीविभक्तीचा एकवचनाचा प्रत्यय ' ङि ' ह्याचें उदाहरण ' ग्राम+ङि+इह=ग्राम+इ+इह=ग्रामे+इह ' हें आहे. ' जश्शसोः शिः ' सू० २१२ ह्या सूत्राप्रमाणें होणाऱ्या 'शि' प्रत्ययाचें उदाहरण, ' सर्व+शि+इत्थम्=सर्व+इ+इत्थम्= सर्वे + इत्थम् ' हें आहे. ह्या वरील तिन्हीं उदाहरणांत, सवर्णदीर्घादेश–ह्मणजे ' इ + इ ' ह्यांचे ठिकाणीं होणारा पदद्वय-संबन्धिवर्णद्वयनिमित्तक ' ई ' हा आदेश, बहिरङ्ग असल्यामुळें, तो न होतां, प्रकृति व प्रत्यय यांचें ठिकाणीं ' आद्गुणः ' ह्या सूत्रानें होणारा गुणरूपी एकादेश अन्तरङ्ग असल्यामुळें, तो एकादेश होतो. ' श् ' आहे अन्तीं ज्याच्या अशा शान्ताचें उदाहरण ' धि+श+ति ' असें वर नुकतेंच दिलें आहे, व तेथें ' इयङ् ' आदेशाचें निमित्त जवळ असल्यामुळें, तो अन्तरङ्ग ठरतो व लघूपध गुणाचें निमित्त ' ति ' पलीकडे असल्यामुळें, तो बहिरङ्ग ठरतो; ह्मणून लघूपध गुण न होतां, 'इयङ्' आदेश होऊन ' धियति ' असें रूप होतें. ' चङ् ' आहे अन्तीं ज्याच्या अशा चङन्ताचें उदाहरण 'असुस्रुवत्' हें मागें दिलेंच आहे. ' असुस्रु+चङ्+त्=असुस्रु+अ+त् ' अशा स्थितींत, ' अचि श्नुधातु ' ह्या सूत्रानें ' उवङ् ' पावला आहे व तसेंच ' पुगन्तलघूपधस्य च ' ह्या सूत्रानें ' उ ' ला गुण पावला आहे. पण गुणाचें निमित्त ' त् ' प्रत्यय पलीकडे व ' उवङ् ' चें निमित्त ' अ ' अलीकडे असल्यामुळें, ' उवङ् ' अन्तरङ्ग व गुण बहिरङ्ग ठरतो; ह्मणून लघूपधगुण न होतां, उवङादेश होऊन ' असुस्रुवत् ' असें रूप होतें. वरील दिलेल्या सर्व उदाहरणांत, अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यें युगपत् प्राप्त झालीं असल्यामुळें व बहिरङ्ग कार्य पूर्वीं झालें नसल्यामुळें, प्रकृतपरिभाषा न लागतां, अन्तरङ्ग परिभाषा लागते. )

अत एवओमाङोश्चेत्याङ्ग्रहणं चरितार्थम्। तद्धि शिव आ इहीति स्थिते परमपि सवर्णदीर्घं बाधित्वा धातूपसर्गकार्यत्वेनान्तरङ्गत्वाद्गुणे वृद्धिबाधनार्थम् ॥

आणि ( ' जातस्य बहिरङ्गस्य ' असें ह्मटलें आहे ) ह्मणूनच, ' ओमाङोश्च ' सू० ८० ह्या सूत्रांतील आङ्ग्रहण चरितार्थ ठरतें. तें आङ्ग्रहण अशा करितां केलें आहे कीं, ' शिव+आ+इहि ' अशा स्थितींत, सवर्णदीर्घादेशाचें ('अकःसवर्णे दीर्घः' हें ) सूत्र जरी पर आहे तरी त्याचा बाध होऊन, धातु व उपसर्ग ह्यांचें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें ' आद्गुणः ' ह्या सूत्रानें, अन्तरङ्गकार्य प्रथम झाल्यावर, ('शिव+एहि ' अशी स्थिति प्राप्त झाली असतां, ' वृद्धिरेचि ' ह्या सूत्रान्वयें प्राप्त झालेल्या ) वृद्धीचा बाध व्हावा. ( ह्मणजे वृद्धि न होतां, पररूप एकादेश व्हावा ह्मणून ' आङ् ' ग्रहण केलें आहे; व तें कसें चरितार्थ ठरतें हें खालीं दिलेल्या प्रक्रियेवरून ध्यानांत येईल. ' शिव+आ + इहि ' अशा स्थितींत जर ' अकः सवर्णे दीर्घः ' ह्या सूत्रानें दीर्घादेश प्रथम करून ' शिवा + इहि ' असें केलें तर, ' आद्गुणः ' ह्या सूत्रानें ' शिवेहि ' असें रूप आपोआपच सिद्ध होऊन, ' आङ् ' ग्रहण व्यर्थ ठरतें. पण सूत्रकार पाणिनीला ही जाणीव होती कीं, धातु व उपसर्ग ह्यांचें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, सवर्णदीर्घादेश न होतां, तें अन्तरङ्ग कार्य प्रथम होऊन, ' शिव+एहि ' अशी स्थिति होईल, व तशी स्थिति झाल्यानंतर ' वृद्धिरेचि ' ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन ' शिवैहि ' असें रूप होईल. तसा वृद्धिरूप एकादेश न व्हावा ह्मणून ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रांत ' आङ् ' ग्रहण मुद्दाम केलें आहे. ह्यावरून देखील हें स्पष्ट होतें कीं, जेथें अन्तरङ्ग व बहिरङ्ग अशीं दोन्हीं कार्यें युगपत् प्राप्त होतात, तेथें प्रकृत परिभाषा- नं० ५१- न लागतां, अन्तरङ्ग परिभाषा- नं० ५०- लागते. व बहिरङ्ग कार्य न होतां, अन्तरङ्ग कार्य होतें. )

न चाक्षद्यूरित्यत्र यणि कृते ऊठोऽसिद्धत्वाद्वलि लोपापत्तिरिति वाच्यम्। अचोऽन्यानन्तर्यनिमित्तकेऽन्तरङ्गे कर्तव्ये कृते च तस्मिन्यदन्तरङ्गं प्राप्नोति तत्र च कर्तव्ये नासिद्धत्वमिति तदर्थात्। असिद्धपरिभाषाया अनित्यत्वेन तद्वारणे त्वस्या वैयर्थ्यं तेनैव सिद्धेः ॥

( ह्या परिभाषेचा वर दिलेला अर्थ बरोबर मानल्यास, ) 'अक्षद्यूः' ह्या स्थलीं यणादेश झाल्यावर, वल् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असल्यामुळें ' य् ' लोप होण्याची आपत्ति येईल, कारण ऊठ्कार्य असिद्ध आहे—असें कोणीं ह्मटल्यास, तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ह्या परिभाषेचा अर्थ असा आहे कीं अचाच्या लगेच पुढें असलेल्या निमित्तामुळें अन्तरङ्ग कार्य करण्याची प्राप्ति झाली असतां, तें अन्तरङ्ग कार्य केल्यानंतर जर दुसरें अन्तरङ्ग कार्य करण्याची प्राप्ति झाली तर, पूर्वीं झालेलें बहिरङ्ग कार्य असिद्ध—म्हणजे झालेंच नाहीं असें—मानूं नये. ( ' अक्ष + दिव् + क्विप् + सु '

अशा स्थितींत, ' क्विप् ' हा कित् प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' च्छ्वोः शूठनुनासिके च ' सू० २५६१ ह्या सूत्रानें ' दिव् ' ह्यांतील ' व् ' चे जागीं ' ऊठ् ' होऊन, ' अक्ष+दि+ऊ+क्विप्+सु ' अशी स्थिति झाली असतां, क्विप् प्रत्ययामुळें झालेला ' ऊठ् ' बहिरङ्ग व असिद्ध–ह्मणजे झालाच नाहीं– व तो ' व् ' च आहे असें मानलें पाहिजे, व ' ऊ ' पुढें आल्यामुळें ' दि ' ह्यांतील इकाराचे जागीं ' इको यणचि ' ह्या सूत्रानें यणादेश केल्यावर, ' अक्ष+द्य्+ऊ+०+सु ' अशा स्थितींत, ' य् ' पुढें ' ऊ ' नसून ' व् ' च आहे असें मानल्यास, ' लोपो व्योर्वलि ' सू० ८७३ ह्या सूत्रानें ' य् ' चा लोप प्राप्त होतो व तो केल्यास, ' अक्षद्यूः ' असें इष्टरूप सिद्ध होणार नाहीं अशी शंकाकार शंका करितो. ग्रन्थकार ह्मणतात कीं, ही शंका बरोबर नाहीं; कारण ' अक्ष+दिव्+क्विप्+सु ' येथें ऊठ्रूपी बहिरङ्ग कार्य केल्यानंतर यणादेशरूपी अन्तरङ्ग कार्य प्राप्त झालें आहे. तें कार्य केल्यानंतर ऊठ्रूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध—ह्मणजे झालेंच नाहीं व ' य् ' पुढें ' ऊ ' नसून ' व् ' च आहे असें—मानल्यास, ' य् ' लोपरूपी दुसरें अन्तरङ्ग कार्य प्राप्त होतें. हें दुसरें अन्तरङ्ग कार्य करणें झाल्यास देखील, पूर्वीं झालेलें ऊठ्रूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध मानूं नये असा प्रकृत परिभाषेचा अर्थ आहे; आणि असा अर्थ असल्यामुळें, येथें ' य् ' लोप होऊं शकत नाहीं. ) ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ही परिभाषा अनित्य मानून ' य् ' लोपाचें निवारण करणें बरोबर नाहीं; तशा रीतीनें ' य् ' लोपाचें निवारण केल्यास, ही परिभाषा–नं० ५१–व्यर्थ ठरेल; कारण अन्तरङ्ग परिभाषा अनित्य मानल्यानेंच, ' य् ' लोपाचें निवारण होऊं शकेल. ( सारांश, ही परिभाषा व्यर्थ ठरूं नये ह्मणून तिचा वर दिलेला अर्थ बरोबर मानून त्या अर्थाच्या आधारें, ' य् ' लोपाचें निवारण करणें योग्य आहे. )

**अत एव नलोपः सुबिति सूत्रे कृति तुग्ग्रहणं चरितार्थम्। अन्यथा वृत्रहभ्यामित्यादौ बहिर्भूतभ्याम्निमित्तकपदत्वाश्रयत्वेन बहिरङ्गतया नलोपस्यासिद्धत्वेनसिद्धे स्तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव। मम तु तुक्यजानन्तर्यसत्वान्नदोषः॥**

( ही परिभाषा आहे ) ह्मणूनच, ' नलोपः सुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति ' सू० ३५३ ह्या सूत्रांत जें ' तुक् ' ग्रहण केलें आहे तें चरितार्थ ठरतें. ही परिभाषा नसती तर, ' वृत्रहभ्याम् ' इत्यादि स्थलीं, अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताच्या पलीकडे असणाऱ्या 'भ्याम्' ह्या प्रत्ययामुळें 'वृत्रहन्' ह्याला पदसंज्ञा प्राप्त होऊन व त्यामुळें नूलोप होऊन तो नूलोप, बहिरङ्ग व असिद्ध ठरत असल्यामुळें, झालाच नाहीं असें मानल्यास, 'तुक्' ग्रहण व्यर्थ ठरलें असतें. ('वृत्र+हन्+क्विप्+भ्याम्' अशा स्थितींत, 'स्वादिष्वसर्वनामस्थाने'सू. २३० ह्या सूत्रानें ' भ्याम् ' प्रत्यय पुढें असल्यामुळें ' वृत्रहन् ' ह्याला पदसंज्ञा प्राप्त होते; व नंतर तशी पदसंज्ञा प्राप्त झाल्यामुळें, ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' सू० २३६ ह्या सूत्रानें ' न् ' लोप होतो. तो नूलोप ' भ्याम् ' ह्या पलीकडे असणाऱ्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें पदसंज्ञा प्राप्त होऊन झाला असल्यामुळें, बहिरङ्ग व असिद्ध ठरतो–ह्मणजे

'वृत्रह' असें पद नसून 'वृत्रहन्' असेंच पद आहे असें मानलें पाहिजे; आणि असें मानल्यास, 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' सू० २८५८ ह्या सूत्रानें, ऱ्हस्व स्वर अन्तीं नसल्यामुळें, तुगागम पावतच नाहीं. मग पाणिनीला 'न लोपः सुप्स्वर' सू० ३५३ ह्या सूत्रांत 'कृति तुग्विधौ नलोपः असिद्धः' असें सांगण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें.) परंतु आमच्या मतें 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा असल्यामुळें, कांहीं दोष येत नाहीं. (कारण, लगेंच पुढें असलेल्या 'क्विप्' प्रत्यय निमित्तामुळें 'अ'ला होणारें तुक्‌रूपी अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं, पलीकडे असलेल्या 'भ्याम्' ह्या प्रत्ययामुळें झालेला बहिरङ्ग 'न्' लोप, ह्या परिभाषेप्रमाणें असिद्ध ठरूं शकत नसल्यामुळें, तुगागमरूपी कार्य करतेवेळीं तो असिद्ध समजला जावा म्हणून मुद्दाम 'नलोपः सुप्स्वर' ह्या सूत्रांत केलेलें 'तुक्' ग्रहण चरितार्थ ठरून वर केलेली शंका व्यर्थ ठरते.)

**न चैवं सति ह्रस्वस्य पितीति सूत्रस्थभाष्यविरोधः। तत्र हि ग्रामणिपुत्र इत्यत्रेको ह्रस्वोऽङ्य इति ह्रस्वे कृते तुकमाशङ्क्य ह्रस्वस्य बहिरङ्गासिद्धत्वेन समाहितम्। नाजानन्तर्य इत्यस्य सत्वे तत्र तदप्राप्तेरसंगतिः स्पष्टैवेति वाच्यम्। तेन भाष्येणास्या अनावश्यकत्वबोधनात्। एतज्ज्ञापकेनान्तरङ्गपरिभाषाया अनित्यत्वबोधनस्यैव न्याय्यत्वात्॥**

'नाजानन्तर्ये' ही परिभाषा मानल्यास, 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' ६-१-७१ ह्या सूत्रावरील भाष्य असंगत ठरतें, कारण त्या भाष्यांत 'इको ऱ्हस्वोऽङ्यो गालवस्य' सू० ९९९ ह्या सूत्रानें 'ग्रामणिपुत्रः' असें जेव्हां (विकल्पेकरून) ऱ्हस्व रूप केलें जातें तेव्हां ('ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' सू० २८५८ ह्या सूत्रान्वयें,) 'तुक्'कां न व्हावा अशी शंका करून, ऱ्हस्वकार्य बहिरङ्ग व असिद्ध आहे असें सांगून, त्या शंकेचें भाष्यकारांनीं समाधान केलें आहे. (ग्राम+नी+क्विप्+सु+पुत्रः =ग्रामणीपुत्रः ग्रामणिपुत्रो वा' ह्या उदाहरणांत जेव्हां विकल्पेकरून 'ग्रामणिपुत्रः' असें रूप होतें तेव्हां 'तुक्' आगम कां न व्हावा अशी शंका भाष्यांत काढली आहे. पण त्या शंकेचें समाधान भाष्यकार अशा रीतीनें करितात कीं, लगेच पुढें असलेल्या 'क्विप्' प्रत्ययाला मानून 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' ह्या सूत्रानें होणारें तुगागमरूपी कार्य अन्तरङ्ग आहे व पुढें असणारें उत्तरपद 'पुत्र' ह्याला मानून 'इको ऱ्हस्वोऽङ्यो गालवस्य' ह्या उत्तरपदाधिकारांतील सूत्रानें होणारें ऱ्हस्वरूपी कार्य बहिरङ्ग आहे; म्हणून, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ह्या परिभाषेप्रमाणें, ऱ्हस्वरूपी बहिरङ्ग कार्य असिद्ध—म्हणजे झालेंच नाहीं—असें मानलें पाहिजे; आणि अशा रीतीनें ऱ्हस्व झालाच नाहीं असें मानल्यास, तुगागमरूपी कार्य पावतच नाहीं.) पण 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा असल्यामुळें, 'ग्रामणिपुत्रः' ह्या वरील उदाहरणांत अन्तरङ्गपरिभाषा लागूच पडत नाहीं, म्हणून वरील भाष्य असंगत ठरतें—असें कोणी म्हटल्यास, हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण त्या भाष्यानें प्रकृत परिभाषा आवश्यक नाहीं हें ज्ञापित होतें. (वास्तविक पाहिलें असतां,

' ग्रामणिपुत्रः ' ह्या उदाहरणांत, ' नाजानन्तर्ये ' हीच परिभाषा लागू पडते. याचें कारण असें कीं, त्या उदाहरणांत ऱ्हस्वरूपी बहिरङ्गकार्य झाल्यावरच ऱ्हस्व इकारास, 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' ह्या सूत्रान्वयें तुगागमरूपी अन्तरङ्गकार्याची प्राप्ति होते. ऱ्हस्व-कार्य जरी बहिरङ्ग आहे तरी, ऱ्हस्व इकाराला लगेच पुढें असलेल्या ' क्विप् ' प्रत्यय-रूपी निमित्तामुळें तुगागमकार्य प्राप्त झालें असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, पूर्वी झालेलें बहिरङ्ग ऱ्हस्वकार्य बहिरङ्ग व असिद्ध नाहीं असेंच मानलें पाहिजे. व त्यामुळें तुगागम टाळतां येत नाहीं, आणि ' नाजानन्तर्ये ' ही परिभाषा अन्तरङ्ग परिभाषेचा अपवाद असल्यामुळें, जेथें ती परिभाषा–म्हणजे परिभाषा नं० ५१–लागू पडते तेथें अन्तरङ्गपरिभाषा बाधित होत असल्यामुळें, तिची–म्हणजे अन्तरङ्गपरि-भाषेची–प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. असें असून देखील प्रकृत उदाहरणांत भाष्यकारांनीं ' नाजानन्तर्ये ' ह्या परिभाषेचा उल्लेख देखील केला नाहीं व ती परिभाषा उपयोगांत आणली नाहीं. उलटें अन्तरङ्गपरिभाषेचा उपयोग करून ' ग्रामणिपुत्रः ' ह्या स्थलीं तुगागम होत नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ' नाजानन्तर्ये ' ही परिभाषा मानल्यास, वरील भाष्य खरोखरच, असंगत ठरतें. मग तें सुसंगत कसें ठरवावें ? ह्या प्रश्नाचें ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, जर ' नाजानन्तर्ये ' ही परिभाषा भाष्य-काराच्या मतें आवश्यक असती व त्यांना मान्य असती तर, 'ग्रामणिपुत्रः' या उदाहर-णांत त्यांनीं तिचा उल्लेख केला असता व तिचा उपयोग करून तुगागम टाळण्याचा अन्य प्रयत्न केला असता. पण ज्या अर्थी त्यांनीं तिचा उल्लेख देखील केला नाहीं, व उलटें अन्तरङ्गपरिभाषेचा उपयोग करून तुगागमाचें निवारण केलें, त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, ही परिभाषा भाष्यकारांनीं अनावश्यक आहे असें मानून ती स्वीकारली नाहीं. सारांश ही परिभाषा भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केली असल्यामुळें ती स्वीकारार्ह नाहीं. पण ही परिभाषा न मानली तर ' अक्षद्यूः ' इत्यादि रूपें सिद्ध कशीं व्हावीं हा प्रश्न सहजच उपस्थित होतो. ह्या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, अन्तरङ्गपरिभाषा अनित्य मानली म्हणजे सर्व अडचणी दूर होतात, व ' अक्षद्यूः ' इत्यादि रूपें सिद्ध करण्यांत कांहीं हरकत येत नाहीं. जेथें अन्तरङ्गपरिभाषा लावल्यास इष्ट रूप सिद्ध होत नाहीं तेथें ती अनित्य समजून उपयोगांत आणूं नये व इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. ) 'षत्वतु-कोरसिद्धः ' ह्या सूत्रांतील जें तुग्ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक मानलें आहे त्या ज्ञाप-काच्या आधारें, अन्तरङ्गपरिभाषा अनित्य आहे असें मानणेंच रास्त ठरतें. ( कारण अन्तरङ्गपरिभाषा जर नित्य असती तर 'षत्वतुकोरसिद्धः' ह्या सूत्रांत तुग्ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती. पण ती अनित्य असल्यामुळें त्या सूत्रांत तुग्ग्रहण करणें भाग पडलें व अशा रीतीनें तें तुग्ग्रहण अन्तरङ्गपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें. )

**अत एवाचः परस्मिन्निति सूत्रे भाष्ये पटु ई आ इत्यत्र परयणादेश-स्यानयाऽसिद्धत्वात्पूर्वयणादेशः साधितः । अत एवैषा परिभाषा भाष्ये पुनः क्वापि नोल्लिखिता ।**

( ही परिभाषा अनावश्यक आहे व भाष्यकारांनीं ती प्रत्याख्यात केली आहे ) म्हणूनच ' अचः परस्मिन् ' १–१–५७ ह्या सूत्रावरील भाष्यांत, ' पटु+ई+आ ' ह्या स्थलीं, अन्तरङ्गपरिभाषेप्रमाणें, परयणादेश असिद्ध ठरत असल्यामुळें, पूर्वयणादेश साधला आहे. ( वास्तविक ' पटु+ई+आ ' या उदाहरणांत ' नाजानन्तर्ये ' ही परिभाषा लागू पडते. पण भाष्यकारांनीं तिचा उल्लेख देखील न करितां, अन्तरङ्गपरिभाषेचा उपयोग करून पूर्वयणादेशाची सिद्धि करून दाखविली आहे. पूर्वयणादेश कसा सिद्ध होतो हें मागील परिभाषेंत सांगितलेंच आहे. सारांश, या भाष्यावरून देखील हेंच सिद्ध होतें कीं भाष्यकारास प्रकृत परिभाषा संमत नव्हती, व ती त्यांना मान्य नव्हती, ) म्हणूनच भाष्यांत या परिभाषेचा पुनः कोठेंहि उल्लेख केला नाहीं. ( जर ही परिभाषा भाष्यकारास आवश्यक वाटली असती व त्यानीं मान्य केली असती तर त्यांनीं तिचा ठिकठिकाणीं इष्टरूपसिद्धि करण्याकरितां अवश्य उपयोग केला असता )

**अत एवान्तरङ्गपरिभाषामुपक्रम्य विप्रतिषेधसूत्रेऽस्या बहूनि प्रयोजनानि सन्ति तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या, प्रतिविधेयं च दोषेषु इत्युक्तं सम्प्रसारणाच्चेति सूत्रे भाष्ये प्रतिविधानं च परिभाषाविषयेऽनित्यत्वाश्रयणमेवेति ध्वनितमित्यलम् ॥ ५१ ॥**

(आणि हा परिभाषा भाष्यकारास संमत नाहीं ) ह्मणूनच ' संप्रसारणाच्च ' ६–१–१०८ ह्या सूत्रावरील भाष्यांत अन्तरङ्ग परिभाषेचा उपन्यास करून असें म्हटलें आहे कीं, 'विप्रतिषेधे परं कार्यम् ' १–४–२ ह्या सूत्रावरील भाष्यांत या अन्तरङ्ग परिभाषेची अनेक प्रयोजनें दर्शविलीं आहेत, व त्यामुळें ही अन्तरङ्ग परिभाषा मानणें आवश्यक आहे. परंतु जेथें (ही अन्तरङ्ग परिभाषा मानल्यानें इष्टरूपसिद्धि न होतां ) अनिष्टरूपसिद्धि होत असेल तेथें उपायान्तरानें दोषाचें निवारण करावें. ह्या वरील भाष्यावरून हें ध्वनित होतें कीं, ज्या स्थलीं अन्तरङ्ग परिभाषा लागू पडते तशा स्थलीं ( ती लावल्यानें अनिष्ट रूप सिद्ध होत असल्यास ) ती अनित्य मानून, उत्पन्न होणाऱ्या दोषाचें निवारण करावें. ( सारांश जेथें इष्टरूपसिद्धि होत असेल तेथें अन्तरङ्ग परिभाषा लावावी. जेथें अनिष्टरूप सिद्ध होत असेल तेथें ती परिभाषा अनित्य मानून उपयोगांत आणू नये व ती नाहीं असें समजून इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. परिभाषा नं. ५१ स्वीकारण्याचें कांहीं कारण नाहीं. ) आतां विस्तार पुरे.

---

# परिभाषा ५२

**नन्वेवं गोमत्प्रिय इत्यादौ पदद्वयनिमित्तकसमासाश्रितत्वेन बहिरङ्गं लुक बाधित्वान्तरङ्गत्वाद्धल्ङ्याब्भ्यादिलोपे नुमादयः स्युरत आह—**

( त्रिपादींत, आभीयाधिकारांत, व परस्मैपदपरक सिचाला मानून वृद्धि करणें झाल्यास, अन्तरङ्ग परिभाषा लागत नाहीं व इतर सर्वत्र ती लागते आणि परिभाषा

नं ५१ एवढीच तिचा अपवाद आहे, ) असें जर मानलें तर, 'गोमत्प्रियः' इत्यादि स्थलीं, दोन पदांच्या निमित्तामुळें होणाऱ्या समासामुळें होणारा 'सु' लुक् बहिरङ्ग व 'हल्ङ्याब्भ्यो' सू० २५२ ह्या सूत्रान्वयें होणारा 'सु' लोप अन्तरङ्ग असल्यामुळें, अन्तरङ्ग सुलोप बहिरङ्ग लुकाचा बाध करून, अन्तरङ्ग सुलोप होईल, व नुमादि कार्यें होतील. ( 'गोमान् प्रियः यस्य=गोमत्+सु+प्रिय+सु' अशा स्थितींत, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू० ६५० ह्या सूत्रानें, 'गोमत्+सु' येथील 'सु' प्रत्ययाचा लुक् पावला आहे; पण हें सुप्रत्ययलुक्रूपी कार्य बहिरङ्ग आहे. कारण समास दोन पदांशिवाय होत नसतो व पदद्वयनिमित्तामुळें होणाऱ्या समासास मानून होणारा 'सु' प्रत्ययाचा लुक् बहिरङ्ग ठरतो. पण 'हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्' सू० २५२ ह्या सूत्रानें होणारा सुलोप त्याच्यामागें असणाऱ्या 'गोमत्' ह्या एकच हलन्ताङ्गनिमित्तामुळें होणारा असल्यामुळें अन्तरङ्ग ठरतो, व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ह्या परिभाषेच्या आधारें बहिरङ्ग सुलुक्चा बाध होऊन अन्तरङ्ग सुलोप होईल व तसें झाल्यास 'न लुमताङ्गस्य' सू० २६३ हें निषेध सूत्र प्रवृत्त होणार नाहीं व 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू० २६२ हें सूत्र प्रवृत्त होईल, व प्रत्यय पुढें असतां जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं, प्रत्ययलोप झाला आहे तरी, होतील; व त्यामुळें, 'उगिदचां सर्वनामस्थाने' सू० ३६१ ह्या सूत्रानें नुमागम, 'अत्वसन्तस्य चाधातोः' स० ४२५ ह्या सूत्रानें उपधादीर्घ, व 'संयोगान्तस्य लोपः' सू० ५४ ह्या सूत्रानें 'त्' चा लोप होऊन, 'गोमत्प्रियः' असें रूप न होतां, गोमान्प्रियः' असें अनिष्ट रूप होईल. तसें अनिष्ट रूप न व्हावें ) ह्मणून ही परिभाषा सांगतातः—

## अन्तरङ्गानपि विधीन्बहिरङ्गो लुग्बाधते ॥ ५२ ॥

"लुक् जरी बहिरङ्ग असला तरी तो अन्तरङ्गकार्यविधायक सूत्राचा देखील बाधक होतो."

( सारांश ही परिभाषा, परिभाषा ५० चा अपवाद आहे, व ही परिभाषा असल्यामुळें, बहिरङ्ग सुलुक् अन्तरङ्ग सुलोपाचा बाधक ठरून तो होतो, आणि त्यामुळें 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र प्रवृत्त न होतां 'न लुमताङ्गस्य' हें निषेधसूत्र प्रवृत्त होतें, व त्यामुळें नुमागमादि कार्यें न होतां 'गोमत्प्रियः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. या परिभाषेंत 'अपि' शब्द घातला असल्यामुळें, जसा बहिरङ्ग सुलुक् अन्तरङ्गकार्यविधायक सूत्राचा बाधक होतो तसाच पर व नित्य सूत्रांचा देखील बाधक होतो हें आपोआपच सिद्ध होतें; कारण अन्तरङ्गकार्यविधायक सूत्राच्या मानानें पर व नित्य सूत्रें दुर्बल असतात असें परिभाषा ३८ मध्यें सांगितलेंच आहे. ग्रन्थकारानें या परिभाषेंत बहिरङ्ग सुलुक् अन्तरङ्गकार्यविधायक सूत्राचा बाधक होतो याचीं उदाहरणें दिलीं आहेत, पण सुलुक् पर व नित्य सूत्रांचा बाधक होतो याचीं उदाहरणें दिलीं नाहींत. म्हणून तीं खालीं दिलीं आहेत. 'ह्यः' 'श्वः' इत्यादि असन्त अव्ययांना 'सु' हा विभक्ति-

प्रत्यय लावला असतां, ' हल्ङ्याभ्यः ' सू० २५२ या सूत्रानें सुलोप व 'अव्ययादाप्सुपः' सू० ४५२ या सूत्रानें सुलुक् पावला आहे. सुलोपाचें सूत्र परसूत्र आहे व सुलुक्चें सूत्र पूर्वसूत्र आहे. असें असून देखील या परिभाषेप्रमाणें सुलुक् सुलोपाचा बाधक होऊन सुलुक् होतो व सुलोप होत नाहीं. सुलोप जर परसूत्रानें झाला असता तर 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र असल्यामुळें, ' अत्वसन्तस्य चाधातोः' सू० ४२५ या सूत्रान्वयें उपधा दीर्घ होण्याची आपत्ति आली असती. तसेंच ' ब्रम्हिष्ठ=ब्रम्हन् +ङस्+इष्ठ' अशा स्थितींत ' टेः ' सू० १७८६ हें पर व तसेंच नित्य सूत्र असून देखिल टिलोप प्रथम न होतां, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' सु० ६५० या पूर्वसूत्रानें सुलुक् प्रथम होतो, व तो प्रथम झाल्यामुळें, ' ब्रम्हन् ' यांतील ' अन् ' या टीचा लोप होऊन ' ब्रम्हिष्ठ ' असें रूप सिद्ध होतें. )

**अत्र च प्रत्ययोत्तरपदयोश्चेतिसूत्रं ज्ञापकम् । त्वत्कृतमित्यादौ लुगपेक्षयान्तरङ्गत्वाद्विभक्तिनिमित्तकेन त्वमावेकवचन इत्यनेन सिद्धे इदं व्यर्थं सत्तज्ज्ञापकम् ॥**

' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' सू० १३७३ हें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ' त्वत्कृतम् ' इत्यादि स्थलीं, विभक्तिप्रत्ययरूपी निमित्त पुढें असल्यामुळें ' त्वमावेकवचने ' सू० २८९ ह्या सूत्रानें ( ' युष्म् ' व 'अस्म् ' ) ह्यांचे जागीं ' त्व ' व ' म ' आदेश होणें हें कार्य, लुक्रूपी कार्याच्या अपेक्षेनें, अन्तरङ्ग कार्य ठरत असल्यामुळें, व अन्तरङ्ग परिभाषेप्रमाणें, तें प्रथम होऊन ) रूपसिद्धि होउं शकत असल्यामुळें, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें ( ' त्वया कृतम् + त्वत्कृतम् ' असा समास करतेवेळीं, ' युष्मद् + टा + कृतम् ' अशा स्थितींत, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू० ६५० ह्या सूत्रानें होणारा ' टा ' प्रत्ययाचा लुक्, मागें सांगितल्याप्रमाणें, पदद्वयनिमित्तक समासाच्या आश्रयानें होणारा असल्यामुळें, बहिरङ्ग कार्य आहे; व केवळ ' टा ' ह्या विभक्तिप्रत्ययाला मानून ' त्वमावेकवचने ' सू० ३८९ ह्या सूत्रान्वयें ' युष्मद् ' येथलि मपर्यन्त जागीं होणारा ' त्व ' हा आदेश अन्तरङ्ग कार्य आहे. ह्मणून असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ह्या परिभाषेप्रमाणें, अन्तरङ्ग कार्य प्रथम होऊन–म्हणजे ' युष्म् ' चे जागीं ' त्व ' हा आदेश होऊन–' युष्मद् + टा + कृतम् = त्व+अद् +टा+कृतम् = त्वद् + टा+कृतम् ' अशी स्थिति झाल्यावर, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' ह्या सूत्रानें बहिरङ्ग कार्य- म्हणजे ' टा ' प्रत्ययाचा लुक्–होऊन, ' त्वत्कृतम् ' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें. मग ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र पाणिनीनें कशास केलें ? तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. परंतु ही परिभाषा पाणिनीस मान्य असल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरत नाहीं. कारण ह्या परिभाषेप्रमाणें, लुक् जरी बहिरङ्ग असला तरी तो अन्तरङ्ग कार्याचा बाध करून प्रथम होतो. म्हणून येथें, प्रकृत परिभाषेप्रमाणें, ' टा ' प्रत्ययाचा लुक् प्रथम होतो; व तो प्रथम केला म्हणजे विभक्तिप्रत्यय पुढें राहत नसल्यामुळें, ' त्वमावेकवचने ' ह्या सूत्रानें ' युष्म् 'चे जागीं ' त्व ' हा आदेश होऊं शकणार नाहीं;

कारण, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् सू० २६२ हें सूत्र 'न लुमताङ्गस्य' सू० २६३ ह्या सूत्रामुळें, अशा ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकत नाहीं. म्हणून विभक्तिप्रत्यय खेरीज करून इतर प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां देखील, ' युष्म् ' व 'अस्म्' ह्यांचें जागीं एक-वचनांत ' त्व ' व ' म , असे अनुक्रमें आदेश व्हावे हें सांगण्याकरितां पाणिनीला ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र, ही परिभाषा असल्यामुळें, करणें भाग पडलें. सारांश ही परिभाषा असल्यामुळें, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र व्यर्थ ठरत नाहीं,) व तें ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

ननु तव पुत्रस्त्वत्पुत्र इत्यादौ तवममादिबाधनार्थं तदावश्यकमिति चेत् । एवं तर्ह्यत्रत्यमपर्यन्तग्रहणानुवृत्तिस्तज्ज्ञापिकेति भाष्यकृतः ॥

' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र 'तवपुत्रः त्वत्पुत्रः' इत्यादि स्थलीं, (' युष्म्' व ' अस्म् ' ह्यांचें जागीं ' तवममौ ङसि ' सू० ३९८ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या ) 'तव' व ' मम ' इत्यादि आदेशांच्या निवारणार्थ—म्हणजे प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां युष्म् व अस्म् यांचे जागीं तव व मम इत्यादि आदेश न होतां ' त्व ' व ' म ' असेच आदेश व्हावे या करितां—चरितार्थ आहे ( म्हणून तें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं ) असें कोणी म्हटल्यास, भाष्यकार म्हणतात कीं तर मग ' प्रत्ययोत्तरपद-योश्च ' या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' सू० ३८३ या सूत्राची जी अनुवृत्ति आहे ती अनु-वृत्ति या परिभाषेची ज्ञापिका मानावी. ( प्रकृत परिभाषा नसल्यास जर ' प्रत्ययोत्तर-पदयोश्च ' हें सूत्र व्यर्थ ठरत असेल व ती असल्यासच जर तें सूत्र चरितार्थ ठरत असेल तरच तें सूत्र प्रकृत परिभाषेचें ज्ञापक मानतां येतें. शंकाकार अशी शंका करितो कीं, प्रकृतपरिभाषा नसली तरी ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र आवश्यक आहे व तें सूत्र आवश्यक ठरत असल्यामुळें या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. ही परिभाषा नसून देखील तें सूत्र कसें चरितार्थ व आवश्यक ठरतें हें आतां शंकाकार सांगतो. ' तव पुत्रः त्वत्पुत्रः, तव अयं त्वदीयः, तुभ्यम् हितं त्वद्धितम्' इत्यादि स्थलीं 'युष्मद्+ङस्+पुत्रः' युष्मद्+ङस्+छ, युष्मद् + ङे + हितम् ' अशा स्थितींत, प्रकृत परिभाषा नसल्यास, विभक्तिप्रत्ययाचा लुक् प्रथम होणार नाहीं, व विभक्तिप्रत्यय पुढें कायम राहिल्यामुळें, विभक्तिप्रत्ययाला मानून ' तव', ' मम ' असे आदेश होणें हें कार्य अन्तरङ्ग, व विभ-क्तिप्रत्ययाचा लुक् होणें हें कार्य, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र नसल्यास, 'तव' व 'तुभ्य' असे आदेश प्रथम झाल्या-वर विभक्तिप्रत्ययाचा लुक् होईल आणि ' तव ' व ' तुभ्य ' हे आदेश जसेचे तसेच कायम राहतील व विकृत रूप होण्याची आपत्ति येईल. 'त्वमावेकवचने' या सामान्य-शास्त्राचे बाधक ' तवममौ ङसि ' व ' तुभ्यमह्यौ ङयि ' हीं विशेषशास्त्रें असल्यामुळें, ' त्वमावेकवचने ' हें शास्त्र प्रवृत्त होऊं शकणार नाहीं, व त्यामुळें युष्मद्चे जागीं 'त्व' असा आदेश होऊं शकणार नाहीं. तसा आदेश होण्याकरितां ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें

सूत्र मुद्दाम केलें आहे, व अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्याला या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. अशी शंका शंकाकारानें केल्यावर भाष्यकार असें म्हणतात कीं, जर 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' हें सूत्र अशा रीतीनें चरितार्थ ठरतें तर तें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक न मानतां, त्या सूत्रांत असलेली 'मपर्यन्तस्य' या सूत्राची अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका मानावी. भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' हें सूत्र प्रकृतपरिभाषा असून देखील जर आवश्यक आहे तर तें सूत्र 'तवममौ ङसि' 'तुभ्यमह्यौ ङयि' इत्यादि सूत्रांचें बाधक—म्हणजे अपवाद सूत्र मानलें पाहिजे व तसें मानल्यास, 'उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' असा न्याय असल्यामुळें, 'तवममौ ङसि' इत्यादि उत्सर्गसूत्रांनीं होणारे आदेश जसे युस्मद्, अस्मद् यांच्या मपर्यंत जागीं होतात तसेंच 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' या सूत्रानें होणारे 'त्व' व 'म' हे आदेश देखिल, वरील न्यायान्वयें, त्याच स्थानीचे जागीं आपोआप होतील व त्यामुळें 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' या सूत्रांत केलेली 'मपर्यन्तस्य' या सूत्राची अनुवृत्ति व्यर्थ ठरते; आणि ती व्यर्थ ठरत असून देखलि ज्या अर्थी केली आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं पाणिनीला ही परिभाषा मान्य होती. आणि अशा रीतीनें ती अनुवृत्ति, ही परिभाषा असल्यामुळें, चरितार्थ होऊन या परिभाषेची ज्ञापिका ठरते. ती कशी ज्ञापिका ठरते हें ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत.)

**युष्मदादिभ्य आचारक्विप् तु न, संपूर्णसूत्रस्य ज्ञापकतापरभाष्यप्रामाण्याग्रस्त्वनद्याप इति नुड्विधायकसूत्रस्थभाष्यप्रामाण्येन हलन्तेभ्य आचारक्विबभावाच्च । एवमेवैकार्थकाभ्यां प्रातिपदिकाभ्यां प्रातिपदिकणिचोऽप्यनभिधानं बोध्यम् । एतेन तत्रादेशार्थं प्रत्ययग्रहणं चरितार्थमित्यपास्तम् ॥**

('प्रत्ययोत्तरपदयोश्च' हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक ठरतें असें पूर्वी सांगितलें आहे. यावर शंकाकार असें म्हणतो कीं, तें सूत्र इतर रीतीनें आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. हें खरें कीं, सुबन्ताहून तद्धित प्रत्यय होत असल्यामुळें 'युष्मद्' व 'अस्मद्' या केवळ प्रातिपदिकांहून तद्धित प्रत्यय होऊं शकत नाहीं. हेंहि खरें कीं, 'अलिङ्गे युष्मदस्मदी' असें 'शेषे लोपः' सू० ३८५ या सूत्राच्या वृत्तींत दीक्षितांनीं सांगितल्याप्रमाणें त्या प्रातिपदिकांहून स्त्रीप्रत्यय देखील होऊं शकत नाहीं. 'ङ्याप् प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रान्वयें त्या प्रातिपदिकांहून विभक्तिप्रत्यय होतात व ते प्रत्यय पुढें असल्यास युष्मद् व अस्मद्चे जागीं कोणते आदेश व्हावे हें पाणिनीय सूत्रांत सांगितलें आहे. पण जसे त्या प्रातिपदिकांहून विभक्तिप्रत्यय होतात तसेच 'सर्वप्रातिपदिकेभ्यः क्विब्वा वक्तव्यः'—सू० २६६५ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें त्या प्रातिपदिकांहून क्विप् प्रत्यय होऊं शकतो, व तसेंच 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वयें त्यांना णिच् प्रत्ययहि होऊं

शकतो. त्या प्रातिपदिकांहून क्विप् किंवा णिच् प्रत्यय होतेवेळीं त्यांच्यापुढें कोणताहि विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, ' त्वमावेकवचने, तवममौ ङसि ' इत्यादि सूत्रांची प्राप्ति होऊं शकत नाहीं. म्हणून ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांपुढें आचार क्विप् किंवा णिच् प्रत्यय आल्यास त्यांच्या मपर्यन्त जागीं ' त्व ' व ' म ' हे आदेश अनुक्रमें व्हावे या करितां ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांतील ' प्रत्यय ' शब्दाचें ग्रहण आवश्यक व चरितार्थ ठरतें, व अशा रीतीनें तें चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्या सूत्रांतील निदान ' प्रत्यय ' हा शब्द या परिभाषेचा कोणत्याहि रीतीनें ज्ञापक मानतां येत नाहीं—या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांहून जर आचारक्विप् किंवा णिच् प्रत्यय होऊं शकत असेल तरच वरील शंका उपपन्न ठरते. ) पण भाष्यकारांनीं ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें संपूर्ण सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानलें असल्यामुळें, युष्मद् इत्यादि प्रातिपदिकांहून आचारक्विप् होतच नाहीं. एवढेंच नव्हें तर ' ह्रस्वनद्यापो नुट् ' ७-१-५४ या नुटाचें विधान करणाऱ्या सूत्रावरील भाष्यान्वयें कोणत्याहि हलन्त प्रातिपदिकाहून आचारक्विप् होत नाहीं. तसेंच एकवचनवाचक ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांहून णिच् प्रत्यय देखील होऊं शकत नाहीं. असें असल्यामुळें ( ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांपुढें क्विप् किंवा णिच् प्रत्यय आल्यास त्यांच्या मपर्यन्त जागीं ' त्व ' व ' म ' हे ) आदेश होण्याकरितां ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांतील ' प्रत्यय ' शब्दाचें ग्रहण चरितार्थ ठरतें हें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं. (कारण ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांहून जर आचारक्विप किंवा णिच् होत असता तर भाष्यकारांनीं असें म्हटलें असतें कीं ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांतील ' प्रत्यय ' शब्दाचें ग्रहण, ' युष्मद् ' व ' अस्मद् ' यांचे मपर्यन्त जागीं ' त्व ' व ' म ' हे आदेश होण्याकरितां आवश्यक ठरत असल्यामुळें, तें संपूर्ण सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं; पण तसें न म्हणतां भाष्यकारांनीं मपर्यन्तानुवृत्तिसहित तें संपूर्ण सूत्र या परिभाषेचें ज्ञापक ठरविलें आहे, व भाष्यकाराचें म्हणणें बरोबर नाहीं असें म्हणण्याचा कोणासहि अधिकार नाहीं. सारांश, भाष्यकारांनीं ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें संपूर्ण सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या प्रातिपदिकांहून आचारक्विप् किंवा णिच् प्रत्यय होत नसतो.)

**ननु मपर्यन्तानुवृत्तिरपि सर्वादेशत्ववारणाय चरितार्था। न चोत्सर्गसमानदेशा अपवादा इति न्यायेनासिद्धवत्सूत्रस्थभाष्यसम्मतेन मपर्यन्तस्यैवादेशे सिद्धे तदनुवृत्तिर्व्यर्थेति वाच्यम्, तस्य श्नम्बहुजकजादौ व्यभिचारादिति चेत्। न। श्नमि भित्त्वेन बहुचि पुरस्ताद्ग्रहणेनाकचि प्राक्टेर्ग्रहणेन तस्य बाधेऽप्यत्रोत्सर्गस्य त्यागे मानाभावात्॥ अत एव तस्मिन्नणिचेत्यनेन युष्माकास्माकादेशविधानं चरितार्थम्। अन्यथाऽकजादेशमेव विदध्यात्। आक-**

ङि तवकाद्यादेशयोरेतदपवादयोरुक्तन्यायेनान्त्यादेशन्यापत्तिरतस्तद्विधानम् । इदमेव च तज्ज्ञापकम् ।

( ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत असलेली ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति देखिल या परिभाषेची ज्ञापिका मानली आहे.या संबंधानें शंकाकाराचें असें ह्मणणें आहे कीं ती अनुवृत्ति देखिल या परिभाषेची ज्ञापिका मानतां येत नाहीं; कारण ज्या न्यायाच्या आधारावर ती अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका मानली जाऊं शकते तो न्याय मुळींच बरोबर नाहीं, व तो न्यायच जर चूक आहे तर त्याच्या आधारावर रचलेली ज्ञापकता आपोआपच चूक ठरते. दुसरें असें कीं, ती अनुवृत्ति इतर रीतीनें आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें तिला या परिभाषेची ज्ञापिका मानतां येत नाहीं. ती अनुवृत्ति कशी आवश्यक आहे हें आतां शंकाकार सांगतो–ज्याप्रमाणें ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र इतर रीतीनें आवश्यक व चरितार्थ ठरतें त्याचप्रमाणें ) ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति देखील सर्वादेश होण्याची आपत्ति टाळण्याकरितां चरितार्थ ठरते. ( ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति न केल्यास, सर्वादेश होण्याची–ह्मणजे ' त्व ' व ' म ' हे आदेश अनेकाल् असल्यामुळें ' अनेकाल्शित्सर्वस्य ' सू० ४५ या सूत्रान्वयें संपूर्ण ' युष्मद् ' व ' अस्मद् ' या शब्दांचे जागीं ते आदेश होतील आणि ' युष्म् ' व ' अस्म् ' एवढ्याच जागीं ते आदेश होणार नाहींत. ही आपत्ति टाळण्याकरितां ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति आवश्यक असल्यामुळें चरितार्थ ठरते, आणि म्हणून ती अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका मानतां येत नाहीं. ही अनुवृत्ति ह्या परिभाषेची ज्ञापिका आहे हें म्हणणें सिद्ध करण्याकरितां, जर सिद्धान्ती असें म्हणेल कीं, ) ' असिद्धवदत्राभात् ' ६–४ : २ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलेल्या व भाष्यकारास संमत असलेल्या ' उत्सर्गसमानदेशा अपवादाः ' ह्या न्यायानें, ' मपर्यन्तस्य ' ह्या सूत्राची ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ह्या सूत्रांत अनुवृत्ति करण्याची गरज नव्हती, ( कारण जेवढ्या प्रदेशास सामान्य नियम लागतो तेवढ्याच प्रदेशास अपवाद लागतो असा न्याय आहे व तो भाष्यकारांना संमत आहे, व ' त्वमावेकवचने ' ह्या सामान्य नियमाप्रमाणें, ' युष्म् ' व ' अस्म् ' एवढ्याच जागीं ' त्व ' व ' म ' हे आदेश होत असल्यामुळें, आणि ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें त्या सूत्राचें अपवादात्मक सूत्र असल्यामुळें ' उत्सर्गसमानदेशा अपवादाः ' ह्या न्यायाप्रमाणें, प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां, ' युष्म् ' व ' अस्म् ' एवढ्याच जागीं ' त्व ' आणि ' म ' हे आदेश अनुक्रमें होणारच म्हणून ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ह्या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' ह्या सूत्राची अनुवृत्ति करण्याची गरज नव्हती; पण ती केली आहे, ह्यावरून ती अनुवृत्ति ह्या परिभाषेची ज्ञापिका ठरते-असें सिद्धान्तीनें ह्मटल्यास, त्यावर शंकाकार असें ह्मणतो कीं, ) हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण वर सांगितलेला न्याय ( सर्व ठिकाणीं लागू पडणारा नसून, ' श्नम् ', ' बहुच्, ' ' अकच् ' इत्यादि

स्थलीं त्या न्यायाचा व्यभिचार–ह्मणजे न लागू पडणें–स्पष्ट दिसून येतो. ( कारण ‘ श्नम् ’ हा ‘ शप् ’चा अपवाद असून देखील, दोहोंचा प्रदेश समान नाहीं. ‘ शप् ’ हें विकरण धातूच्या पुढें लागतें व ‘ श्नम् ’ हें विकरण, शपाप्रमाणें धातूच्या पुढें न लागतां, धातूच्या अन्त्य अचापुढें लागतें. तसेंच ‘ बहुच् ’ हा प्रत्यय कल्पप्, देश्य, देशीयर् ह्या प्रत्ययांचा अपवाद असूनहि, तो त्यांच्याप्रमाणें शब्दापुढें न होतां, ‘ विभाषा सुपो बहुच् पुरस्तात्तु ’ सू० २०२३ ह्या सूत्रान्वयें, शब्दापूर्वी होतो; सारांश दोहोंचे प्रदेश समान नाहींत. आणि त्याचप्रमाणें ‘ क ’ प्रत्ययाचा अपवाद ‘ अकच् ’ हा प्रत्यय, ‘ क ’ प्रत्ययाप्रमाणें शब्दापुढें न होतां, ‘ अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक्टेः ’ सू० २०२६ ह्या सूत्रान्वयें, ‘ टि ’च्या पूर्वी होतो. येथपर्यंत शंकाग्रन्थ आहे. ह्या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) ही शंका बरोबर नाहीं. कारण ‘ श्नम् ’ हा मित् असल्यामुळें(व ‘ मिदचोऽन्त्यात्परः सू० ३७ असें सूत्र असल्यामुळें, ) तसेंच ‘ बहुच्’ चे ठिकाणीं ‘ पुरस्तात् ’ ह्या शब्दाचें ( ‘ विभाषा सुपो बहुच् पुरस्तात्तु ’ ह्या सूत्रांत ) ग्रहण केलें असल्यामुळें, आणि तसेंच ‘ अकच् ’ प्रत्यय लागतेवेळीं, ( ‘ अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक्टेः ’ ह्या सूत्रांत ) ‘प्राक्टेः’ ह्या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, जरी वर सांगितलेला न्याय वर दिलेल्या तीन ठिकाणीं लागू पडत नाहीं, तरी त्या न्यायाचा इतर ठिकाणीं त्याग करण्यास कांहींच प्रमाण नाहीं ( सारांश, ज्या सूत्रांत विरुद्ध प्रकारचें विधान केलें असेल तेवढींच सूत्रें खेरीज करून, इतर सर्वत्र ‘ उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ’ हा सामान्य नियम लागू पडतो, व हा सामान्य नियम प्रकृत स्थलीं लावल्यास, ‘ त्वमावेकवचने ’ ह्या सूत्राचें ‘ प्रत्ययोत्तरपदयोश्च ’ हें अपवादात्मक सूत्र असल्यामुळें, दोहोंचा प्रदेश समान मानणें भाग आहे; व तसें मानल्यास, ज्या प्रमाणें ‘ त्वमावेकवचने ’ ह्या सूत्रानें, एकवचनांत ‘ युष्मद् ’ व ‘ अस्मद् ’ ह्या स्थलीं मपर्यन्तचे जागीं ‘ त्व ’ व ‘ म ’ हे आदेश सांगितले आहेत त्याचप्रमाणें, ‘ प्रत्ययोत्तरपदयोश्च ’ ह्या अपवादात्मक सूत्रानें देखील, प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां, एकवचनांत मपर्यन्तचे जागींच ‘ त्व ’ आणि ‘ म ’ हे आदेश होतील; ‘ युष्मद् ’ व ‘ अस्मद् ’ ह्या संपूर्ण शब्दाचे जागीं ते आदेश मुळींच होणार नाहींत. म्हणून ‘ मपर्यन्तस्य ’ ह्या सूत्राची अनुवृत्ति ‘ प्रत्ययोत्तरपदयोश्च ’ ह्या सूत्रांत करण्याची मुळींच गरज नव्हती. पण ती अनुवृत्ति केली आहे, आणि तशी अनुवृत्ति करण्यास कांहीं तरी विशेष कारण असलेंच पाहिजे. तें कारण पुढें लवकरच सांगण्यांत येईल. ) आणि ‘ उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ’ असा सामान्य नियम असल्यामुळेंच, ( आणि तो नियम पाणिनीला देखील मान्य असल्यामुळें ‘ तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ ’ सू० १३७१ ह्या सूत्रांत ‘ युष्माक ’ व ‘ अस्माक ’ ह्या आदेशांचें विधान चरितार्थ ठरतें; असा नियम पाणिनीस मान्य नसता तर, ‘आकङ् ’ ह्या आदेशाचें विधान केलें असतें. (‘तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ ’ ह्या सूत्राऐवजी ‘ तस्मिन्नणि च आकङ् ’ असें पाणिनीनें लहानसें सूत्र करून जर ‘ आकङ् ’ व्हावा असें म्हटलें असतें तर, ‘ आकङ्’

हा ' ङित् ' असल्यामुळें व ' ङिच्च ' सू० ४३ ह्या सूत्रान्वयें तो अन्त्यादेश होणारा असल्यामुळें, ' तवकममकावेकवचने ' सू० १३७२ या पुढील सूत्रानें सांगितलेले ) ' तवक ' व 'ममक' हें युष्माक व अस्माक यांचे अपवादात्मक आदेश, आकञ्प्रमाणें, अन्त्यादेशच झाले असते–म्हणजे आकञ् जसा युष्मद् यांतील अन्त्य दकाराचे जागीं झाला असता तसेंच ते तवकममकादेश देखील त्याच अन्त्य दकाररूपी स्थानीच्या जागीं झाले असते– व अनिष्ट रूप सिद्ध होण्याची आपात्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरितां ('तस्मिन्नणि च ' सू० १३७१ या सूत्रांत आकञाचें विधान न करितां पाणिनीनें युष्माक व अस्माक या आदेशांचें ) विधान केलें आहे व तें विधान 'उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ' या न्यायाचें ज्ञापक ठरतें

**यद्यपि विरोधे बाधकत्वमिति वार्तिकमतेऽयं न्यायो, भाष्यकारस्तु विनापि विरोधं सत्यपि संभवे बाधकत्वमिच्छतीत्यनभिहितसूत्रस्थकैयटरीत्या नायं नियमस्तथापि युस्माकाद्यादेशविधानज्ञापित उत्सर्गः स्वीक्रियत एवेति प्रकृते न दोषः । एतद्भाष्यमपि तत्स्वीकारे मानम् ॥**

जथ दोन परस्पर विरुद्ध कार्यें करणारीं सूत्रें एकेच वेळीं एकाच स्थलीं प्रवृत्त होऊं शकत न हीत तेथेंच एक सूत्र दुसऱ्याचें बाधक ठरतें असें जें वार्तिककाराचें मत आहे तें स्वीकारल्यासच ' उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ' हा न्याय लागू पडतो. ' अनभिहिते ' २–३–१ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें सांगितल्याप्रमाणें ' विनापि विरोधं सत्यपि संभवे बाधनं भवति '—म्हणजे दोन सूत्रें जरी एकच वेळीं एकाच स्थलीं आपापलीं कार्यें करण्यास प्रवृत्त होऊं शकण्याचा संभव आहे तरी एक सूत्र दुसऱ्याचें बाधक ठरतें—असें भाष्यकाराचें मत असल्यामुळें, त्या मतान्वयें वरील न्याय स्वीकारतां येत नाहीं. हें जरी खरें आहे तरी युष्माकादि आदेशांच्या विधानानें ज्ञापित झालेला वरील सामान्य नियम स्वीकारणेंच योग्य आहे, व त्यामुळें प्रकृतस्थळीं–म्हणजे युष्मद् व अस्मद् यांच्या मपर्यन्त जागीं ' त्व ' व ' म ' हे आदेश होण्याकरितां–तो न्याय स्वीकारण्यास कांहीं हरकत नाहीं. ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति ज्या भाष्यांत या परिभाषेची ज्ञापिका मानली आहे तें भाष्य देखील वरील न्याय स्वीकारण्यास प्रमाण ठरतें ( वार्तिककाराचें मत ' असति संभवे बाधनं भवति ' असें असून, भाष्यकाराचें मत ' सत्यपि संभवे बाधनं भवति ' असें आहे. वार्तिककाराचें मत स्वीकारल्यासच वरील न्याय सिद्ध होऊं शकतो. जसें ' इको यणचि' या सूत्रानें यणादेश होणें सांगितलें आहे व ' अकः सवर्णे दीर्घः ' या सूत्रानें सवर्णदीर्घादेश होणें सांगितलें आहे. हीं दोन कार्यें परस्पर विरुद्ध असल्यामुळें, एकेच ठिकाणीं युगपत् होणें असंभवनीय आहे. कारण यणादेश केल्यास सवर्ण दीर्घादेशाचें निमित्त नष्ट होतें व सवर्णदीर्घ केल्यास यणादेशाचें निमित्त नष्ट होतें. जेथें जेथें 'अकःसवर्णे दीर्घः ' हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें 'इको यणचि' या सूत्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें,

तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें, आणि म्हणूनच ' येन नाप्राप्ते ' या न्यायानें तें सूत्र ' इको यणचि ' या सूत्राचें बाधक व अपवादात्मक सूत्र ठरतें. ' इको यणचि ' या सामान्य सूत्रानें यणादेश जी जागा व्यापतो तीच जागा ' अकः सवर्णे दीर्घः ' या अपवादात्मक सूत्रानें होणारा सवर्णदीर्घ आदेश व्यापतो, व अशाच ठिकाणीं ' उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' हा न्याय लागू पडतो. पण ' एकाचो द्वे प्रथमस्य ' व ' अजादेर्द्वितीयस्य सू० २१७५ व २१७६ या दोन सूत्रांनीं होणारीं कार्यें युगपत् एकेच स्थलीं होण्याचा संभव आहे. धातु अजादि व अनेकाच् असल्यास पहिल्यानें प्रथम एकाचाचें द्वित्व करून नंतर द्वितीय एकाचाचें देखील द्वित्व करतां येतें. असें जरी आहे तरी ' अजादेर्द्वितीयस्य ' हें सूत्र भाष्यकाराच्या मताप्रमाणें ' एकाचो द्वे प्रथमस्य ' या सूत्राचें बाधक ठरतें, व अशा ठिकाणीं वरील दोन सूत्रांनीं होणाऱ्या द्वित्वकार्यांचा समानदेश नसल्यामुळें, 'उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' हा न्याय स्वीकारतां येत नाहीं. ग्रन्थकार म्हणतात कीं असें जरी आहे तरी—म्हणजे वर सांगितलेला सामान्य नियम जरी सार्वत्रिक नसला तरी-पुष्कळ ठिकाणीं लागू पडणारा आहे, आणि ज्या अर्थीं तो नियम सूत्रकारास मान्य आहे व भाष्यकारांनीं देखील, 'मपर्यन्तस्य' या सूत्राची अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका आहे हें सिद्ध करण्याकरितां तो मानला आहे त्या अर्थी तो न्याय स्वीकारण्यास व प्रकृतस्थलीं उपयोगांत आणण्यास कांहीं हरकत नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. हा न्याय न स्वीकारल्यास, ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका ठरूं शकत नाहीं. ती या परिभाषेची कशी ज्ञापिका ठरते हें ग्रन्थकार आतां पुढील पंक्तींत सांगतात.)

**एवं च मपर्यन्तानुवृत्तिस्त्वत्कृतमित्यादौ मपर्यन्तस्यादेशविधानार्था। तत्र चान्तरङ्गत्वात्त्वमावित्येव सिद्धे व्यर्था सैतज्ज्ञापिका।**

आणि अशा रीतीनें वर सांगितल्याप्रमाणें सिद्ध झालेला ' उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ' हा न्याय स्वीकारल्यास, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची जी अनुवृत्ति केली आहे ती ' त्वत्कृतम् ' इत्यादि स्थलीं मपर्यन्त जागीं 'त्व' इत्यादि आदेश व्हावे याचें विधान करण्याच्या हेतूनें केली आहे. ही परिभाषा नसती तर ' त्व ' व ' म ' असे आदेश होणें हें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें आदेश प्रथम झालेच असते व ' त्वत्कृतम् ' इत्यादि रूपें सिद्ध झालींच असतीं, आणि ती अनुवृत्ति व्यर्थ ठरली असती. ( पण ही परिभाषा असल्यामुळें ती अनुवृत्ति चरितार्थ होते व अशा रीतीनें ) ती अनुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका ठरते. ( जर ही परिभाषा नसती तर ' युष्मद्+टा+कृतम् ' या स्थलीं अन्तर्वर्तिनी ' टा ' विभक्तीला मानून ' त्वमावेकवचने ' या सूत्रानें त्वादेश होणें हें कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, त्वादेश प्रथम झालाच असता व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' या सूत्रानें होणारा विभक्तिप्रत्ययाचा लुक् बहिरङ्गकार्य असल्यामुळें मागून झाला असता, व मपर्यन्तानुवृत्ति व्यर्थ ठरली

असती. पण ही परिभाषा असल्यामुळें, ' टा ' या विभक्तिप्रत्ययाचा लुक होणें हें कार्य जरी बहिरङ्ग आहे तरी लुक् प्रथम होतें, व विभक्तिप्रत्ययाचा लुक् प्रथम झाल्यावर पुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामळें, ' त्वमावेकवचने ' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व त्वादेश होऊं शकत नाहीं. तो आदेश व्हावा आणि तो ' युष्मद् ' च्या मपर्यन्त जागींच व्हावा याचें विधान करण्याकरितां ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र करावें लागलें, व त्या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' याची अनुवृत्ति करावी लागली. सारांश ही परिभाषा असल्यामुळें, ती अनुवृत्ति चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेची ज्ञापिका ठरते )

**ज्ञापिते त्वस्मिन्नेतद्विषये तवादीनामप्राप्त्या तदपवादत्वाभावेन मपर्यन्तस्यैवादेशार्थं सा चरितार्थेति तदाशयः ॥**

( येथें अशी शंका उत्पन्न होते कीं, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र ' त्वमावेकवचने, ' ' तवममौ ङसि ' इत्यादि सूत्रांचें अपवादक सूत्र असल्यामुळें, व ' उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' हा न्याय असल्यामुळें, 'त्वमावेकवचने' इत्यादि सामान्यसूत्रांनीं जसें ' युष्मद् ' व ' अस्मद् ' यांच्या मपर्यन्तजागीं आदेश होतात, तसेंच ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या अपवादक सूत्रानें देखील वरील न्यायान्वयें ' युष्मद् ' व ' अस्मद् ' यांच्या मपर्यन्तजागींच ' त्व ' व ' म ' हे आदेश आपोआपच होतील. मग ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची अनुवृत्ति करण्याची गरज काय ? या शंकेला ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं जर वास्तविक ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र ' त्वमावेकवचने ' इत्यादि सूत्रांचें अपवादात्मक सूत्र ठरत असलें तरच वरील शंका उपपन्न होते. ) परंतु ही परिभाषा एकदां वर सांगितल्याप्रमाणें ज्ञापित झाल्यावर ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्राच्या विषयांत–म्हणजे ' त्वया कृतं त्वत्कृतम्, तव पुत्रः त्वत्पुत्रः, तुभ्यं हितं त्वद्धितम् ' इत्यादि उदाहरणांत–' तव, मम ' इत्यादि आदेशांची प्राप्तिच होत नसल्यामुळें, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र अपवादात्मक सूत्र ठरूं शकत नाहीं. त्यामुळें तें सूत्र लागतेवेळीं ' युष्मद् ' व ' अस्मद् ' यांच्या मपर्यन्तजागीं आदेश होण्याकरितां ' मपर्यन्तस्य ' या सूत्राची ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्रांत केलेली अनुवृत्ति चरितार्थ ठरते असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ( जेथें एखाद्या सूत्राची प्रत्येक उदाहरणांत अवश्यप्राप्ति असल्यामुळें दुसरें सूत्र प्रवृत्त होण्यास स्थळच मिळत नाहीं व तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें तशाच ठिकाणीं ' येन नाप्राप्ते ' –परिभाषा ५८–या न्यायान्वयें तें दुसरें सूत्र प्रथम सूत्राचें बाधक व अपवाद होतें. अन्तर्वर्तिनी विभक्तीला मानून जशी ' त्वमावेकवचने, तवममौ ङसि ' इत्यादि सूत्रांची प्राप्ति होते तशीच जर अन्तर्वर्तिनी विभक्तीला मानून ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' या सूत्राची प्राप्ति असती तरच तें सूत्र त्या सूत्रांचें अपवादात्मक सूत्र ठरलें असतें. पण प्रकृत परिभाषा असल्यामुळें, अन्तर्वर्तिनी विभक्तीचा प्रथम लुक् होऊन विभक्तीप्रत्यय पुढें राहत नाहीं व ' न लुमताङ्गस्य ' हें निषेधक सूत्र असल्यामुळें ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् '

या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं, व त्यामुळें प्रत्ययनिमित्तक कार्य होऊं शकत नाहीं. अशा रीतीनें ' त्वमावेकवचने ' इत्यादि सूत्रांची प्राप्तीच होत नसल्यामुळें, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें अपवादात्मक सूत्र न ठरतां, स्वतंत्र विधायक सूत्र ठरतें, आणि तें विधायक सूत्र ठरत असल्यामुळें, ' उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति ' हा न्याय त्या सूत्रास लागू पडत नाहीं. अशा स्थितींत कोणत्या स्थानीच्या जागीं आदेश व्हावा हें सांगण्याकरितां त्या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' याची अनुवृत्ति आवश्यक आहे. अशा रीतीनें, ही परिभाषा असल्यामुळें, ती अनुवृत्ति चरितार्थ होते व या परिभाषेची ज्ञापिका ठरते. )

**यत्तु हरदत्तेनान्तरङ्गप्रवृत्तौ प्रत्यय उत्तरपदे च मपर्यन्तासंभवेन तदनुवृत्तिर्व्यर्था सती तज्ज्ञापिकेत्युक्तं, तन्न । अन्तरङ्गाणामप्यपवादबाध्यत्वेन तद्विषये तदप्रवृत्तेः ॥**

हरदत्ताचें ह्मणणें असें आहे कीं, ( ही परिभाषा नसल्यास, अन्तर्वर्तिनी विभक्तीला मानून ' त्वमावेकवचने ' इत्यादि सूत्रांनीं ) ' त्व ' ' म ' आदेशरूपी अन्तरङ्ग कार्य केल्यावर ( ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र लावतेवेळीं ), प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां, ' युष्मद् ' ' अस्मद् ' ह्या शब्दांचें मपर्यन्त रूप मिळणें अशक्य आहे. ( कारण एकवचनी विभक्तीला मानून ' युष्म् ' व ' अस्म् ' ह्यांचे जागीं ' त्व ' व ' म ' हे आदेश होऊन जात असल्यामुळें, ' युष्म्, ' ' अस्म् ' अशीं रूपें, प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतां, मिळण्याचा मुळींच संभव नाहीं. ) ह्मणून ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ह्या सूत्रांत ' मपर्यन्तस्य ' ह्या सूत्राची अनुवृत्ति केली तरी कांहींच प्रयोजन निष्पन्न होणार नाहीं, व ती अनुवृत्ति व्यर्थ ठरेल. पण ज्या अर्थीं भाष्यकारांनीं ती अनुवृत्ति केली आहे त्या अर्थीं, त्या अनुवृत्तीमुळें, ही परिभाषा ज्ञापित होते. ( कारण ही परिभाषा असल्यामुळें, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें होणारें बहिरङ्ग लुक्रूपी कार्य प्रथम होतें; व अशा रीतीनें अन्तर्वर्तिनी विभक्तीचा लुक् प्रथम होऊन पुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें ' युष्म् ' ' अस्म् ' ह्यांचे जागीं ' त्व ' ' म ' असे आदेश होऊं शकत नाहींत, व त्यामुळें ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र लावतांना, ' युष्मद्, ' ' अस्मद् ' ह्यांचे मपर्यन्त रूप मिळूं शकतें. )—पण हें हरदत्ताचें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ही परिभाषा नसल्यास ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र ' त्वमावेकवचने ' इत्यादि सूत्रांचा अपवाद ठरेल व 'अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान्'–प. ५७–ह्या परिभाषेप्रमाणें, ) अपवाद हा अन्तरङ्ग कार्याचा देखील बाधक होतो. ( व अन्तरङ्ग कार्य प्रथम न होतां, अपवादात्मक सूत्रानें सांगितलेलें कार्य प्रथम होतें. ) आणि त्यामुळें ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ह्या अपवादात्मक सूत्राच्या विषयांत—ह्मणजे जेथें हें सूत्र लागू पडतें तेथें—' त्वमावेकवचने ' इत्यादि अन्तरङ्गकार्यविधायक सूत्रांची प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं. ( ह्मणजे ' त्वमावेकवचने ' इत्यादि सूत्रांनीं आदेश न होतां, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ह्या सूत्रानेंच आदेश होतील; ते आदेश होतेवेळीं, ' युष्मद् '

'अस्मद्' ह्यांची मपर्यन्त रूपें सांपडणारच. त्यामुळें हरदत्ताचें मत स्वीकारल्यास, 'मपर्यन्तस्य' ही अनुवृत्ति ह्या परिभाषेची ज्ञापिका ठरूं शकणार नाहीं. पण वर सांगितल्याप्रमाणेंच 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' ह्या सूत्रांत केलेली 'मपर्यन्तस्य' ह्या सूत्राची अनुवृत्ति ह्या परिभाषेची ज्ञापिका ठरूं शकते.)

**वस्तुत इदं ज्ञापकं वार्तिकरीत्यैव भाष्यरीत्या तु वाचनिक एवायमर्थ इत्याहुः ॥**

कित्येक वैयाकरणांचें असें मत आहे कीं 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' या सूत्रांत केलेली 'मपर्यन्तस्य' या सूत्राची अनुवृत्ति, वार्तिककारांनीं सांगितलेला नियम मानल्यास त्या नियमानुसारच, प्रकृतपरिभाषेची ज्ञापिका ठरते; पण भाष्यकारांनीं सांगितलेल्या नियमानुसार ती अनुवृत्ति प्रकृतपरिभाषेची ज्ञापिका ठरूं शकत नाहीं व भाष्यकारांनीं सांगितलेला नियम स्वीकारल्यास, ही परिभाषा वाचनिकीच मानली पाहिजे. ( कारण 'असति संभवे बाधनं भवति' हा जो नियम वार्तिककारांनीं सांगितला आहे तो स्वीकारल्यासच, 'उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' या न्यायाची सिद्धि होऊं शकते; पण 'सत्यपि संभवे बाधनं भवति' असा भाष्यकारांनीं सांगितलेला नियम स्वीकारल्यास, वरील न्याय सिद्ध होऊं शकत नाहीं हें पूर्वीच सांगितलें आहे. आणि ज्या अर्थी त्या न्यायाच्या आधारावरच मपर्यन्तानुवृत्ति प्रकृत परिभाषेची ज्ञापिका ठरूं शकते त्याअर्थी हें स्पष्ट होतें कीं भाष्यकारांनीं सांगितलेल्या नियमान्वयें तो न्याय सिद्ध होऊं शकत नसल्यामुळें, मपर्यन्तानुवृत्ति या परिभाषेची ज्ञापिका मानतां येत नाहीं व ही परिभाषा स्वतंत्र वाचनिकीच मानली पाहिजे असें कित्येक वैयाकरण ह्मणतात. पण हें त्यांचें ह्मणणें ग्रन्थकारास पसंत नाहीं असें दिसतें.)

**इयं सुपो धात्विति लुग्विषयैवेति केचित् । एङ्ह्रस्वात्सम्बुद्धेः न यासयोरिति सूत्रस्थाकरप्रामाण्येन लुङ्मात्रविषया । आद्ये हे त्रपु इत्यादावनेन न्यायेन लोपं बाधित्वा लुग्भवतीति भाष्ये उक्तम् । अन्त्येऽन्तरङ्गांश्च विधीन् सर्वोऽपि लुग्बाधते न तु सुब्लुगेव । अत एव सनीस्रंस इत्यादौ नलोपो न भवति । पञ्चभिः खट्वाभिः क्रीतः पञ्चखट्व इत्यादावेकादेशात्प्रागेव टापो लुक् । अन्यथा कृतैकादेशस्य लुक्यकारश्रवणं न स्यादिति कैयटे उक्तम् ।**

कांहीं वैयाकरणांचें असे मत आहे कीं, ही परिभाषा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें होणाऱ्या सुप्लुकासच लागते. ( इतर सूत्रांनीं होणाऱ्या लुकास लागत नाहीं. परंतु हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण ) 'एङ्ह्रस्वात्संबुद्धेः' ६–१–६९ व 'न यासयोः' ७–३–४५ ह्या सूत्रांवरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, ही परिभाषा सर्व प्रकारच्या लुकांना लागते. 'एङ्ह्रस्वात्संबुद्धेः' ह्या सूत्रावरील भाष्यांत असें ह्मटलें आहे कीं, 'हे त्रपु' इत्यादि स्थलीं, ( 'स्वमोर्नपुंसकात्' सू० ३१९

या सूत्रानें होणारा सु प्रत्ययाचा ) लुक् ( एङ्ह्रस्वात्संबुद्धेः ' सू. १९३ ह्या सूत्रानें होणाऱ्या संबुद्धीच्या ) सुलोपाचा, ह्या परिभाषेप्रमाणें, बाधक ठरून तो लुक् होतो. (व लोप होत नाहीं. वास्तविक पाहिलें असतां, ' एङ्ह्रस्वात्संबुद्धेः ' ह्या सूत्राच्या मानानें ' स्वमोर्नपुंसकात् ' हें परसूत्र असल्यामुळें, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ह्या सूत्रान्वयें, लोप न होतां लुकच होईल. परंतु ह्या परिभाषेंत असें ह्मटलें आहे कीं, ' अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुक् बाधते ' व ह्या परिभाषेंत असलेल्या ' अपि ' शब्दाचा अर्थ हा आहे कीं, बहिरङ्ग लुक् पर, नित्य, व अन्तरङ्ग कार्य सांगणाऱ्या सर्व सूत्रांचा बाधक होतो. त्यामुळें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र येथें लावण्याची कांहीं गरज नाहीं. दुसरें असें कीं, तें सूत्र दोन सूत्रें तुल्यबल असल्यासच लागू पडतें. पण ह्या परिभाषेमुळें, पूर्वसूत्र बाध्य झाल्यामुळें, तें तुल्यबल राहत नाहीं. ह्मणून येथें ही परिभाषाच लावणें बरोबर आहे; व ह्या परिभाषेप्रमाणें सुलोप न होतां, सुलुकच होतो. सुलोप केल्यास, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू. २६२ हें सूत्र प्रवृत्त होईल, व ' ह्रस्वस्य गुणः ' सू. २४२ ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊन, ' हे त्रपो ' असें संबुद्धीचें विकृत रूप होईल. पण सुलोप न करितां, सुलुक् केल्यास, ' न लुमताङ्गस्य ' सू. २६३ ह्या सूत्रान्वयें, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' ह्या सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं व गुण होत नाहीं; आणि ' हे त्रपु ' असें संबुद्धीचें इष्ट रूप सिद्ध होतें. ) ' न यासयोः ' ह्या सूत्रावरील भाष्यांत असें ह्मटलें आहे कीं, ' सुपो धातु-प्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें होणारा विभक्तिप्रत्ययाचा लुकच सर्व अन्तरङ्ग विधींचा बाधक ठरतो असें नसून, सर्व प्रकारचा लुक्-मग तो कोणत्याहि सूत्रानें सांगितला असो—अन्तरङ्ग विधींचा बाधक ठरतो. आणि असें आहे ह्मणूनच, ' सनीस्रंसः ' इत्यादि स्थलीं, नलोप होत नाहीं. ( ' स्रंस्+यङ्+अच् ' अशा स्थलीं, ' सन्यङोः ' सू० २३९५ ह्या सूत्रानें द्विर्वचन होतें; व ' नीग्वञ्चुस्रंसुध्वंसु '... सू० २६४२ ह्या सूत्रानें अभ्यासास ' नीक् ' आगम होतो. त्यामुळें ' सनीस्रंस्+यङ्+अच् ' अशी स्थिति झाली असतां, ' अनिदितां हल उपधायाः ' सू० ४१५ ह्या सूत्रानें, ' यङ् ' हा ङित् प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' स्रन्स् ' ह्यांतील उपधानकाराचा लोप पावला आहे व ' यङोऽचि च ' सू० २६५० ह्या सूत्रानें, अजादि ' अच् ' प्रत्यय पुढें अस-ल्यामुळें, यङ्लुक् पावला आहे. पूर्वनिमित्तक नलोप जरी अन्तरङ्ग कार्य आहे व परनिमित्तक यङ्लुक् हें जरी बहिरङ्ग कार्य आहे तरी, ह्या परिभाषेप्रमाणें, बहिरङ्ग लुक् अन्तरङ्ग कार्यांचा बाधक होत असल्यामुळें, यङ्लुक् प्रथम होतो. तो प्रथम झाला ह्मणजे ङित् प्रत्यय पुढें राहत नसल्यामुळें, ' अनिदितां हल उपधायाः ' ह्या सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं व नलोप होत नाहीं. येथें देखील ' न लुमताङ्गस्य ' हें सूत्र असल्यामुळें, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व नलोप होत नाहीं. ) तसेंच, ' पञ्चभिः खट्वाभिः क्रीतः=पञ्चखट्वः ' इत्यादि स्थलीं, एकादेश होण्यापूर्वींच ' टाप् ' चा लुक् होतो. तो लुक् प्रथम न करितां, एकादेश

प्रथम केल्यास, व नंतर लुक् केल्यास, प्रकृत उदाहरणांत ( सामासिक शब्दाच्या अन्तीं ) अकार राहणार नाहीं असें कैयटानें ह्मटलें आहे. ( ' पञ्चभिः खट्वाभिः क्रीतः= पञ्चन्+भिस्+खट्व+टाप्+भिस्+ठक् ' येथें, ' तेन क्रीतम् ' सू० १७०२ ह्या सूत्रानें आर्हीय ' ठक् ' प्रत्यय झाला आहे, व ' अध्यर्धपूर्वद्विगोर्लुगसंज्ञायाम् ' सू० १६९३ ह्या सूत्रानें त्या आर्हीय ' ठक् ' प्रत्ययाचा लुक् झाला आहे. ' लुक् तद्धितलुकि ' सू० १४०८ ह्या सूत्रानें स्त्रीप्रत्यय ' टाप् ' चा लुक् झाला आहे, व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' सू० ६५० ह्या सूत्रानें विभक्तिप्रत्यय ' भिस् ' चा लुक् झाला आहे. ' न लोपः प्रातिपदिकान्तस्य ' सू० २९३६ ह्या सूत्रानें ' पञ्चन् ' ह्यांतील नकाराचा लोप झाला आहे. वरील उदाहरणांत, ' खट्व+टाप् ( आ ) ' येथें ' अकःसवर्णे दीर्घः ' या सूत्रानें सवर्णदीर्घरूप एकादेश होण्यापूर्वींच, ह्या परिभाषेप्रमाणें, ' टाप् ' चा लुक् झाला आहे; आणि ह्मणूनच ' पञ्चखट्व ' असें अकारान्त रूप दिसतें. जर एकादेश प्रथम केला असता व नंतर आकाराचा लुक् केला असता तर ' पञ्चखट्व् ' असें व्यञ्जनान्त रूप झालें असतें. सारांश वर दिलेल्या उदाहरणावरून हें स्पष्टपणें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें होणाऱ्या लुकालाच लागत नसून, सर्व प्रकारच्या लुकांना लागते. )

**एतद्विरोधात्तद्राजस्येति सूत्रे कैयटेनोक्तमङ्गानतिक्रान्तोऽत्यङ्ग इत्यत्र सुपो लुकि बहुवचनपरत्वाभावात्तद्राजस्येति लुग्न स्यादिति शङ्कापरभाष्यव्याख्यावसरे अन्तरङ्गानपीति न्यायेनायं लुक् सुब्लुको बाधकः स्यादित्याशङ्क्य सुब्लुक एवानेन बलवत्त्वं बोध्यत इति तत्प्रौढ्येति द्रष्टव्यम्। लुगपेक्षया लुको बलवत्त्वस्य वक्तुमशक्यत्वादिति तदाशङ्कासमाधानं वक्तुं युक्तम्॥**

' तद्राजस्य ' २-४-६२ ह्या सूत्रावरील भाष्यांत 'अङ्गान् अतिक्रान्तः अत्यङ्गः' ह्या उदाहरणांत, सुप्चा-म्हणजे ' शस् ' प्रत्ययाचा-लुक् प्रथम केल्यास, बहुवचनाचा प्रत्यय पुढें नसल्यामुळें, ' तद्राज अण् ' प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं अशी शंका काढली आहे; व त्या शङ्कापर भाष्याचें व्याख्यान करतेवेळीं कैयटानें अशी शंका उपस्थित केली आहे कीं, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें होणारा लुक् बहिरङ्ग आहे व ' तद्राज अण् ' प्रत्ययाचा लुक् होणें हें अन्तरङ्ग कार्य आहे; त्यामुळें अन्तरङ्ग लुक् बहिरङ्ग शस्प्रत्ययलुकाचा बाधक होईल, ( आणि अन्तरङ्ग अण्प्रत्ययलुक् प्रथम होईल. ) व ह्या शङ्केवर उत्तर देतांना, कैयट म्हणतो कीं, ' अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुक् बाधते ' अशी परिभाषा असल्यामुळें, शस्प्रत्ययलुक् जरी बहिरङ्ग आहे तरी तो, ह्या परिभाषेप्रमाणें, बलवान् ठरत असल्यामुळें, प्रथम होईल. पण हें म्हणणें त्याच्या पूर्वीच्या उक्तीच्या विरुद्ध असल्यामुळें,बरोबर मानतां येत नाहीं; आणि ( शङ्कापर भाष्याचें समर्थन करण्याकरितां, ) ही त्यानें केवळ प्रौढोक्ति केलेली

आहे. ( म्हणून ती त्याज्य समजावी. ) एका लुकापेक्षां दुसरा लुक् अधिक बलवान् ठरतो हें म्हणणें अशक्य आहे—अशा रीतीनें त्यानें प्रतिपादन करून, शङ्कापर भाष्याचें समर्थन करावयास पाहिजे होतें. ( 'अङ्गान् अतिक्रान्तः अत्यङ्गः=अति+अङ्ग+अण्+शस्+सु' येथें, 'द्व्यञ्मगधकलिङ्गसूरमसादण्' सू० ११८८ ह्या सूत्रानें 'अण्' प्रत्यय झाला आहे; व 'तद्राजस्य बहुषु तेनैवाऽस्त्रियाम्' सू० ११९३, ह्या सूत्रानें, 'ते तद्राजाः' सू० ११९२ ह्या सूत्रान्वयें 'तद्राजसंज्ञा' प्राप्त झालेल्या त्या 'अण्' प्रत्ययाचा लुक् पावला आहे. जर वरील उदाहरणांत, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' ह्या सूत्रानें 'शस्' प्रत्ययाचा लुक् प्रथम केला तर, बहुवचनाचा प्रत्यय पुढें राहत नसल्यामुळें, 'तद्राजस्य बहुषु' ह्या सूत्रान्वयें 'अण्' प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं अशी भाष्यांत शंका काढली असतां, त्या शंकेच्या समर्थनार्थ कैयट असें म्हणतो कीं, 'शस्' प्रत्ययास मानून होणारा 'अण्' प्रत्ययाचा लुक् अन्तरङ्ग आहे व पलीकडे असणाऱ्या 'सु' प्रत्ययास मानून होणारा 'शस्' प्रत्ययाचा लुक् बहिरङ्ग आहे; म्हणून अन्तरङ्ग अण्लुक् बहिरङ्ग शस्लुकाचा बाधक होऊन तो प्रथम होतो—असें कोणीं म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ह्या परिभाषेप्रमाणें, बहिरङ्ग लुक् बलवान् ठरत असल्यामुळें तो अन्तरङ्ग लुकाचा बाधक होऊन प्रथम झाला पाहिजे. पण शङ्कापर भाष्याचें कसें तरी समर्थन करण्यास कैयटानें केलेली ही उक्ति केवळ प्रौढोक्ति—म्हणजे जिच्यांत कांहीं तथ्य नाहीं अशी निरर्थक उक्ति—आहे; कारण दोन्हीं लुक्च असल्यामुळें, एक लुक् दुसऱ्या लुकापेक्षां बलवान् आहे असें म्हणतां येत नाहीं; व असेंच म्हणून त्यानें शङ्कापर भाष्याचें समर्थन करावयास पाहिजे होतें. पण तसें न करितां, त्यानें जें समर्थन केलें आहे ती केवळ प्रौढोक्ति मानून तिचा स्वीकार करूं नये.)

**अनेन न्यायेनान्तरङ्गनिमित्तविनाशकलुकस्तत्प्रयोजकसमासादीनां च प्राबल्यं बोध्यत इत्यन्यत्र विस्तरः ॥ ५२ ॥**

ह्या परिभाषेवरून हें स्पष्ट होतें कीं, ( पर, नित्य अथवा ) अन्तरङ्ग कार्याचा प्रतिबंध करणारा लुक् आणि तसेंच त्या लुकाचें निमित्त—ह्मणजे समास इत्यादि विधि—, पर, नित्य व अन्तरङ्ग कार्यापेक्षां अधिक बलवान् ठरतात. ह्याचा विस्तार इतर ग्रन्थांत केला आहे. ( सारांश जरी ह्या परिभाषेंत असें ह्मटलें आहे कीं, बहिरङ्ग लुक् अन्तरङ्ग कार्याचा बाधक होतो, तरी 'लुक्' शब्दानें अशाच लुकाचें ग्रहण करावें कीं, जो पर, नित्य किंवा अन्तरङ्ग कार्याच्या निमित्ताचा विनाशक होत असेल. जो लुक् पर, नित्य किंवा अन्तरङ्ग कार्याच्या निमित्ताचा विनाशक होत नसेल अशा लुकाचें, ह्या परिभाषेंत वापरलेल्या 'लुक्' शब्दानें, ग्रहण होत नाहीं. जसें:—'ऋणु गतौ' ह्या तनादिगणांतील 'ऋण्' धातूचें लोटाच्या द्वितीयपुरुषाचें एकवचनाचें रूप करितांना, 'तनादिकृञ्भ्य उः' सू० २४६६ ह्या सूत्रानें 'उ' हें विकरण लागून 'ऋण्+उ+हि' अशी स्थिति झाली

असतां, आर्धधातुक ' उ ' प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ ह्या सूत्रानें ऋकारास गुण पावला आहे; तसेंच ' उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात् ' सू० २३३४ ह्या सूत्रानें ' हि ' प्रत्ययाचा लुक् पावला आहे. गुणकार्य अन्तरङ्ग आहे व ' हि ' प्रत्ययाचा लुक् होणें हें बहिरङ्ग कार्य आहे. ह्या परिभाषेप्रमाणें, बहिरङ्ग ' हि ' प्रत्ययाचा लुक् प्रथम केला तरी गुणरूपी अन्तरङ्ग कार्य होईलच; कारण गुणाचें निमित्त ' उ ' प्रत्यय व लघूपधा, बहिरङ्ग लुकामुळें, नष्ट होत नाहींत. ह्मणून अशा ठिकाणीं, बहिरङ्ग लुक् अन्तरङ्ग कार्यांचा विनाशक होत नसल्यामुळें, तो बलवत्तर ठरत नाहीं, व प्रथम होत नाहीं. गुणरूपी अन्तरङ्ग कार्य प्रथम होतें व तें प्रथम झाल्यावर, ' उ ' हा संयोगपूर्व होतो. ह्मणून ' उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात् ' हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं व ' हि ' चा लुक् होत नाहीं, आणि ' अर्णुहि ' असें रूप होतें. समासविधीचें उदाहरण ' गोमत्प्रियः ' हें पूर्वीं सांगितलेंच आहे. ह्या उदाहरणांत ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या सूत्रानें होणाऱ्या लुकाचें निमित्त असणारा समास पदद्वयनिमित्तक असल्यामुळें बहिरङ्ग ठरत असून देखील, अन्तरङ्ग नुमादिकार्यांचा बाधक होतो व ' गोमान्प्रियः ' असें रूप न होतां, ' गोमत्प्रियः असें रूप होतें. ' तत्प्रयोजकसमासादीनाम् ' असा शब्द ग्रन्थांत वापरला आहे; येथें ' आदि ' शब्दानें तद्धिताचें ग्रहण होतें. ' घटिकः ' हें तद्धिताचें उदाहरण आहे. ' घटिकः ' ह्या उदाहरणांत ' तरति ' ह्या अर्थांत ' नौद्व्यचष्ठन् ' सू० १५५५ ह्या सूत्रानें ' ठन् ' प्रत्यय होऊन, ' घट+टा+ठन् ' अशी स्थिति होते, व ' कृत्तद्धितसमासाश्च' सू०१७९ ह्या सूत्रानें तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळें, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' हें सूत्र प्रवृत्त होतें व ' टा ' ह्या विभक्तिप्रत्ययाचा लुक्, ह्या परिभाषेप्रमाणें, प्रथम होतो, व तो लुक् प्रथम झाल्यामुळें, ' घट ' ह्या द्व्यच्काला ' ठन् ' प्रत्यय होतो. ' टा ' प्रत्ययाला मानून अन्तरङ्ग कार्य प्रथम केल्यास, ' घटेन ' असा त्र्यच्क शब्द होईल, व त्यामुळें ' ठन् ' प्रत्यय होणार नाहीं. वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, अन्तरङ्ग कार्यांच्या निमित्ताचा विनाशक बहिरङ्ग लुक् व त्याचें निमित्तकारण समास व तद्धितविधि हे बलवत्तर ठरतात. )

---

## परिभाषा ५३

**नन्वेवं सौमेन्द्रेऽन्तरङ्गत्वादाद्गुणे पूर्वपदात्परेन्द्रशब्दाभावेन नेन्द्रस्य परस्येति वृद्धिनिषेधो व्यर्थः । अन्तादिवद्भावस्तूभयत आश्रयणे निषिद्धः ।**

( प. नं. ५१ व ५२ एवढ्याच जर प. नं. ५० च्या अपवाद मानल्या ) तर 'सौमेन्द्र' ह्या स्थलीं, 'आद्गुणः' सू० ६९ ह्या सूत्रानें अन्तरङ्ग कार्य प्रथम केल्यास पूर्वपदापुढें 'इन्द्र' शब्द येतच नाहीं व त्यामुळें 'नेन्द्रस्य परस्य' सू० १२४० ह्या

सूत्रानें केलेला वृद्धिनिषेध व्यर्थ ठरतो. 'अन्तादिवच्च' सू० ७५ ह्या सूत्रानें एका देशाला एकेच वेळीं पूर्वपदाचा अन्त व उत्तरपदाचा आदि मानतां येत नाहीं. ('सोमश्च इन्द्रश्च सोमेन्द्रौ, तौ देवते यस्य सः सोमेन्द्रो यागः' ह्या स्थलीं, 'सास्य देवता' सू० १२२६ ह्या सूत्रानें 'अण्' प्रत्यय होतो. 'देवताद्वन्द्वे च' सू० १२३९ ह्या सूत्रानें, पूर्वपदाच्या व उत्तरपदाच्या आद्यचाला वृद्धि पावली आहे, पण 'नेन्द्रस्य परस्य' सू० १२४० ह्या सूत्रानें, 'इन्द्र' शब्द पुढें असतां, त्या 'इन्द्र' शब्दाच्या आद्यचाला वृद्धीचा निषेध सांगितला आहे; म्हणून 'सौमैन्द्रः' असें रूप न होतां, सौमेन्द्रः' असें रूप होतें. आतां शङ्का अशी करितात कीं, 'सोम+इन्द्र+अण्' अशा स्थितींत, 'सोम' ह्यांतील अन्त्य 'अ' व इन्द्र ह्यांतील आदि 'इ' ह्यांचे जागीं 'आद्गुणः' ह्या सूत्रानें होणारा गुणरूपी एकादेश हें अन्तरङ्ग कार्य आहे, व 'अण्' प्रत्ययाला मानून होणारें वृद्धिरूपी कार्य बहिरङ्ग आहे. म्हणून 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ह्या परिभाषेप्रमाणें, अन्तरङ्ग कार्य प्रथम केलें पाहिजे; व तें प्रथम केल्यास, 'सोमे+न्द्र+अण्' अशी स्थिति होते; व अशा स्थितींत, उत्तरपद 'इन्द्र' राहतच नाहीं; 'न्द्र' एवढेंच उत्तरपद राहतें. त्यामुळें 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधात्मक सूत्र व्यर्थ ठरतें. कोणी असें म्हणेल कीं, एकादेशाला-म्हणजे 'ए' ला—आम्ही पूर्वपद 'सोम' ह्याचा अन्त्य मानूं व उत्तरपद 'इन्द्र' ह्याचा आदि मानूं—म्हणजे 'सोमेन्द्र' यांत 'सोमे' हें पूर्वपद 'सोम' च आहे व 'एन्द्र' हें उत्तरपद 'इन्द्र' च आहे असें मानू—व तसें मानल्यास, उत्तरपदांत 'इन्द्र' शब्द राहतो व त्यामुळें, 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र चरितार्थ ठरतें, पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असें 'अन्तादिवच्च' ६-१-८५ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे, व त्याचा अर्थ असा आहे कीं, एकादेशाला एकेच वेळीं पूर्वपदाचा अन्त्य व उत्तरपदाचा आदि मानतां येत नाहीं. म्हणून वृद्धिनिषेधक सूत्र व्यर्थ ठरतें.)

**किञ्च वृद्धिरप्यत्र न प्राप्नोत्यन्तादिवत्त्वोभयाभावेऽपि पूर्वान्तवत्वेनैकादेशविशिष्टे पूर्वपदत्वेन न्द्रस्यैकदेशविकृतन्यायेन, "उभयत आश्रयणे नान्तादिवत्" इत्यस्याभावेन तदाश्रयणे चोत्तरपदत्वेऽपि तस्यानच्कत्वादेकस्यैकादेशेन परस्य नित्येन यस्येति लोपेनापहारात्। न च परादिवद्भावेनैकादेशविशिष्टस्योत्तरपदत्वमेवास्त्विति तत्संभव इति वाच्यम्। उत्तरपदाद्यच्स्थानिकत्वाद् वृद्धेस्तदभावेनाप्राप्तेस्ताद्रूप्यानतिदेशात्। अन्यथा खट्वाभिरित्यादावपि पूर्वान्तवत्वेनाऽदन्तत्वे भिस ऐस्त्वापत्तिरिति भाष्ये स्पष्टम्।**

दुसरें असें कीं, वर दिलेल्या उदाहरणांत वृद्धि देखील प्राप्त होत नाहीं (१) 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असें वचन असल्यामुळें जरी एकादेशाला पूर्वपदाचा अन्त मानतां येतो, व तसें मानल्यास, एकादेशविशिष्ट पूर्वपद होऊन

—ह्मणजे पूर्वपद 'सोमे'असें होऊन—उत्तरपद जें 'न्द्र 'असें राहतें तें, 'एकदेशविकृतमनन्यवत्' या न्यायानें, जरी 'इन्द्र 'च आहे असें मानतां येतें; ( २ ) आणि तसेंच, 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' ( हें वास्तविक सिद्धान्तीचें वचन नसून एकदेशीची उक्ति आहे ह्मणून ) तें वचनच नाहीं असें समजून, व एकादेशास पूर्वपदाचा अन्त व उत्तरपदाचा आदि मानून 'एन्द्र' हें 'इन्द्र' या पदाचें विकृत रूप उत्तरपदांत आहे असें जरी मानतां येतें तरी, 'इन्द्र' या पदांतील 'इ' एकादेशानें नष्ट होत असल्यामुळें, आणि तसेंच त्या पदांतील 'अ' देखील 'यस्येति च' सू० ३११ या नित्य सूत्रानें नष्ट होत असल्यामुळें, ( व अशा रीतीनें वृद्धिरूप बहिरङ्ग कार्य होण्यापूर्वींच, 'इन्द्र' या पदांतील दोन्ही अच् नष्ट होत असल्यामुळें ) 'इन्द्र' या शब्दांत अच् मुळींच राहत नाहीं, व तो शब्द अनच्क होतो. ( व वृद्धि अचालाच होत असल्यामुळें, येथें वृद्धीच पावत नाहीं. ) ( ३ ) एकादेश जर उत्तरपदाचा आदि मानला—ह्मणचे पूर्वपद 'सोम्' व उत्तरपद 'एन्द्र' असें मानलें—तर वृद्धि होऊं शकते—असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें देखील बरोबर नाहीं; कारण वृद्धि जी सांगितली आहे ती उत्तरपदाचा आद्यच्—जो इकार—त्याला सांगितली आहे. पण त्या इकाराचा, 'ए' हा एकादेश झाल्यामुळें, अभाव—ह्मणचे नाश—झाला असल्यामुळें, वृद्धीची प्राप्तिच होत नाहीं, व एकादेश 'ए' हा 'इ 'च आहे असा ( एकादेशाचे ठिकाणीं ) ताद्रूप्याचा अतिदेश करतां येत नाहीं. ( ग्रन्थकारानीं 'नेन्द्रस्य परस्य' हें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें असें वर ह्मटलें आहे. ह्यावर शंकाकार तीन शंका उपस्थित करून असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करितो कीं, 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र व्यर्थ ठरत नाहीं. त्याची प्रथम शंका अशी आहे कीं, 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' हें जें वचन भाष्यांत सांगितलें आहे तें सिद्धान्तीचें मत आहे असें जरी गृहीत घेतलें तरी, 'अन्तादिवच्' या सूत्रान्वयें, एकादेशास पूर्वपदाचा अन्त किंवा उत्तरपदाचा आदि मानतां येतोच. 'सोम+इन्द्र' या स्थलीं, 'आद्गुणः' या सूत्रानें जो गुणरूपी एकादेश 'ए' झाला आहे तो पूर्वपद 'सोम' याचा अन्त मानल्यास, 'सोमे+न्द्र' अशी स्थिति होईल. अशा स्थितींत, जरी 'इन्द्र' हें उत्तरपद राहत नसून, 'न्द्र' एवढेंच उत्तरपद राहतें तरी, 'एकदेशविकृतमनन्यवत्' या न्यायानें, 'न्द्र' याला 'इन्द्र' च आहे असें मानतां येते त्यामुळें उत्तरपदांत एकदेशविकृत 'इन्द्र' शब्द राहत असल्यामुळें, 'देवताद्वन्द्वे च' या सूत्रानें दोन्ही पदांच्या आद्यचाला जी वृद्धि पावली आहे ती, 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधात्मक सूत्र असल्यामुळें, उत्तरपदाच्या आद्यचाला होत नाहीं, व अशा रीतीनें तें निषेधक सूत्र चरितार्थ ठरतें. दुसरी शंका अशी कीं, 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असें जें भाष्यांत सांगितलें आहे ती वास्तविक सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेशीची उक्ति आहे; म्हणून ती स्वीकारार्ह नाहीं, व त्यामुळें 'ए' या एकादेशास एकेच वेळीं पूर्वपदाचा अन्त व उत्तरपदाचा आदि मानण्यांत कांहींच

हरकत नाहीं; व असें मानल्यास, ‘ सोमे+एन्द्र ’ अशी स्थिति होईल, व या स्थितींत ‘ एकदेशविकृतमनन्यवत् ’ हा न्याय लावून, ‘ सोमे ’ हा शब्द ‘ सोम ’ च आहे व ‘ एन्द्र ’ हा शब्द ‘ इन्द्र ’च आहे असें म्हणतां येतें, व अशा तऱ्हेनें एकदेशविकृत ‘ इन्द्र ’ शब्द उत्तरपदांत असल्यामुळें जी ‘ देवताद्वन्द्वे च ’ या सूत्रानें, दोन्ही पदांच्या आद्यचाला वृद्धि पावली होती ती, ‘ नेन्द्रस्य परस्य ’ हें वृद्धिनिषेधक सूत्र असल्यामुळें, उत्तरपदाच्या आद्यचाला होत नाहीं व तें सूत्र चरितार्थ ठरतें. तिसरी शंका अशी कीं, ‘ अन्तादिवच्च ’ या सूत्रान्वयें, ‘ ए ’ या एकादेशास उत्तरपदाचा आदि मानण्यास कांहींच हरकत नाहीं, व तसें मानल्यास, ‘ सोम+एन्द्र ’ अशी स्थिति होईल. अशा स्थितींत देखील, ‘ एकदेशविकृतमनन्यवत् ’ या न्यायानें ‘सोम्’ हा शब्द ‘सोम’ च आहे व ‘ एन्द्र ’ हा शब्द ‘ इन्द्र ’ च आहे असें मानतां येतें; व असें मानल्यास, एकदेशविकृत ‘ इन्द्र ’ शब्द उत्तरपदांत सांपडतोच, व त्यामुळें दोन्ही पदांच्या आद्यचाला जी वृद्धि पावली होती ती, ‘ नेन्द्रस्य परस्य ’ हें सूत्र असल्यामुळें, उत्तरपदाच्या आद्यचाला होत नाहीं, व अशा रीतीनें ‘ नेन्द्रस्य परस्य ’ हें सूत्र चरितार्थ ठरतें. ह्या वरील तिन्ही शंकांचें निरसन ग्रन्थकारानीं दोन कारणें देऊन केलें आहे. पहिलें कारण हें कीं ‘ इन्द्र ’ या पदांतलि आद्यच् जो ‘ इ ’ तो एकादेशानें नष्ट होत असल्यामुळें व दुसरा अच् जो ‘ अ ’ तो ‘ यस्येति च ’ या सूत्रानें नष्ट होत असल्यामुळें, ‘इन्द्र’ या उत्तरपदांत मुळींच अच् राहत नाहीं, ‘न्द्र् ’ असें अनच्क रूप राहतें, आणि त्यामुळें या ठिकाणीं वृद्धीच पावत नाहीं. दुसरें कारण असें कीं, ‘ एन्द्र ’ हें एकदेशविकृत रूप ‘ इन्द्र ’ च असें मानलें तरी, एकादेश जो ‘ ए ’ त्याला ‘ इ ’ असें मुळींच मानतां येत नाहीं. कारण एकादेशाचे ठिकाणीं ताद्रूप्याचा अतिदेश करितां येत नाहीं—म्हणजे ज्या दोन वर्णांचे जागीं तो एकादेश झाला आहे त्या दोन वर्णांपैकीं हा कोणता तरी एक वर्ण आहे असें मानतां येत नाहीं. अशा रीतीनें ताद्रूप्याचा अतिदेश होऊं शकतो असें मानल्यास, ) ‘ खट्वाभिः ’ इत्यादि स्थलीं, ( ‘खट्व+टाप् +भिस्=खट्वा+भिस् ’ अशा स्थितींत, ‘ अ+आ ’ ह्यांचे जागीं झालेल्या ‘ आ ’ या ) एकादेशास पूर्वपदाचा—म्हणजे ‘ खट्व ’ शब्दाचा—अन्त मानल्यास—म्हणजे पूर्वपद ‘ खट्वा ’ नसून अकारान्त ‘ खट्व ’ शब्दच आहे असें समजल्यास,—) ‘ अतो भिस ऐस् ’ सू० २०३ हें सूत्र प्रवृत्त होऊन ‘ भिस् ’ प्रत्ययाचे जागीं ‘ ऐस् ’ असा आदेश होण्याची आपत्ति येईल—म्हणजे ‘खट्वाभिः’ असें शुद्ध रूप न होतां, ‘ खट्वैः ’ असें विकृत रूप होण्याची आपत्ति येईल,—असें ‘अन्तादिवच्च’ ६-१-८५ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( ह्या भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, ‘ न हि ताद्रूप्यमतिदिश्यते रूपाश्रया वा एते विधयः, अताद्रूप्याच्च भविष्यन्ति’ व ह्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, दोन अचांचे जागीं जो एकादेश होतो त्या एकादेशाला त्या दोन अचांपैकीं, कोणत्याहि अचाचें ताद्रूप्य प्राप्त होत नाहीं. सारांश,

' अ+इ ' ह्यांचे जागीं होणाऱ्या ' ए ' ह्या एकादेशास, हा अकार आहे किंवा इकार आहे, असें मानतां येत नाहीं. )

**अत एव पूर्वैषुकामशम इत्यादावन्तरङ्गत्वादाद्गुणे वृद्धिर्न स्यादित्याशङ्कितम् । तदेकदेशमात्रस्य विकाराभावाच्च ॥**

(एकादेशाचे ठिकाणीं, वर सांगितल्याप्रमाणें, ताद्रूप्यातिदेश करितां येत नाहीं,) ह्मणूनच, 'अन्तादिवच्च' ६-१-८५ ह्या सूत्रावरील भाष्यांत अशी शंका केली आहे कीं, 'पूर्वैषुकामशमः' इत्यादि स्थलीं, (आद्गुण' सू० ६९ ह्या सूत्रानें) गुणैकादेशरूपी अन्तरङ्ग कार्य प्रथम केल्यास, उत्तरपदाच्या आद्यचाला वृद्धि होऊं शकणार नाहीं, कारण एकादेश (दोन वर्णांचे जागीं होत असल्यामुळें तो त्या दोन वर्णांपैकीं) एकवर्णाचें बदललेलें रूप आहे असें मानतां येत नाहीं. ('पूर्व' व 'इषुकामशमी' ह्या दोन शब्दांचा 'दिक्संख्ये संज्ञायाम्' सू०७२७ ह्या सूत्रानें समास होऊन, 'पूर्वैषुकामशमी' असा सामासिक शब्द होतो. ' पूर्वेषुकामशम्यां भवः पूर्वैषुकामशमः ' ह्या ठिकाणीं, 'तत्र भवः' सू० १४२८ ह्या सूत्रानें 'अण्' प्रत्यय होतो,व 'प्राचां ग्रामनगराणाम्' सू० १४०० ह्या सूत्रानें, उत्तरपदांतील आद्यच् 'इ' ह्याला वृद्धि होते, व ' यस्येति च ' सू० ३११ ह्या सूत्रानें 'शमी' ह्यांतील ईकाराचा लोप होऊन पूर्वैषुकामशमः' असें रूप सिद्ध होतें. आतां 'पूर्व+इषुकामशमी+अण्' अशा स्थितींत, 'आद्गुणः' ह्या सूत्रानें गुणैकादेशरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें प्रथम केल्यास, उत्तरपदांतील आद्यच् जो इकार व ज्याला ' इको गुणवृद्धी ' ह्या सूत्रान्वयें इग्लक्षणा वृद्धि ' प्राचां ग्राम नगराणाम्' ह्या सूत्रानें सांगितली आहे तो इकार, एकादेश झाल्यानें, नष्ट झाला असल्यामुळें, वृद्धि होऊं शकत नाहीं. एकादेश जो ' ए ' त्याला उत्तरपदाचा, 'अन्तादिवच्च' ह्या सूत्रान्वयें, आद्यच् मानल्यास एकार राहतो, इकार राहत नाहीं, व वृद्धि तर इकारास विहित आहे; व तो एकादेशानें नष्ट झाला असल्यामुळें, वृद्धि व्हावी कशी ? ' एकदेशविकृतमनन्यवत् ' ह्या परिभाषेप्रमाणें एकादेश 'ए' हा 'इ' च आहे असेंहि मानतां येत नाहीं; कारण 'ए' हा एकादेश ' इषुकामशमी ' ह्या उत्तरपदांतील आद्यच् जो इकार त्याचेच जागीं झाला नसून, पूर्वपदांतील अन्त्यस्वर अकार व उत्तरपदांतील आद्यच् इकार ह्या दोहोंचे जागीं झाला आहे. म्हणून तो एकादेश 'अ' आहे अथवा 'इ' आहे असें मानतां येत नाहीं. त्यामुळें एकादेश प्रथम केल्यास, उत्तरपदांत आद्यच् इकार कोणत्याहि रीतीनें मिळूं शकत नसल्यामुळें, वृद्धि प्राप्त होत नाहीं. )

**तदुक्तं भाष्ये इन्द्रे द्वावचावेको यस्येति लोपेनापहृतोऽपर एकादेशेन, ततोऽनच्क इन्द्रशब्दः संपन्नस्तत्र कः प्रसङ्गो वृद्धेरिति ॥**

भाष्यांत असें म्हटलें आहे कीं 'इन्द्र' शब्दांत दोन अच्–म्हणजे 'इ' व 'अ' हे दोन स्वर–आहेत. त्यापैकीं एक अच्–' अ ' हा–'यस्येति च' ह्या सूत्रानें नाहींसा होतो; व दुसरा अच्–' इ ' हा–एकादेशानें नाहींसा होतो; अशा रीतीनें

' इन्द्र ' शब्दांत अच् मुळींच राहत नाहीं; त्यामुळें वृद्धि होण्याचा प्रसङ्गच प्राप्त होत नाहीं. म्हणून ' सोम + इन्द्र ' ह्यांतील उत्तरपदाच्या आद्यचाला वृद्धि व्हावी कशी ? पण परिभाषा ५३ असल्यामुळें, एकादेशरूपी कार्य जरी अन्तरङ्ग आहे व वृद्धिकार्य जरी बहिरङ्ग आहे तरी, एकादेश प्रथम न होतां, वृद्धिकार्य प्रथम होतें व त्यामुळें 'सौमेन्द्रः' व ' पूर्वेषुकामशमः ' हीं रूपें सिद्ध होतात.)

**मरुदादिभिरिन्द्रस्य द्वन्द्वे इन्द्रस्यैव पूर्वनिपातोऽत आह—**

(शंकाकाराची चौथी शंका अशी आहे कीं 'मरुत्' इत्यादि हलन्त देवतावाचक शब्दांचा 'इन्द्र' शब्दाशीं देवताद्वन्द्व केल्यास, 'इन्द्र' हा शब्द उत्तरपदांत आला असतां, 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र अशा ठिकाणीं चरितार्थ ठरूं शकतें. पण ग्रन्थकार म्हणतात कीं हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण,) 'मरुत्' व 'इन्द्र' ह्या दोन देवतावाचक शब्दांचा देवताद्वन्द्व केल्यास, 'इन्द्र' शब्द (अजादि व अदन्त असल्यामुळें, 'अजाद्यदन्तम्' सू० ९०४ या सूत्रानें किंवा 'अभ्यर्हितं च' ह्या वार्तिकान्वयें,) समासांत प्रथम येणार. ('इन्द्र ' शब्द समासांत उत्तरपद होणारच नाहीं, व त्यामुळें 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र व्यर्थ ठरणार. 'सोमेन्द्र' ह्या ठिकाणीं, 'इन्द्र' शब्द अजादि अदन्त असल्यामुळें व तसेंच 'इन्द्र' देवता सर्वांत श्रेष्ठ असल्यामुळें, 'अभ्यर्हितं च' ह्या वार्तिकान्वयें, 'इन्द्र' हा शब्द समासांत पूर्वपद व्हावा. तथापि 'सोम'शब्द चन्द्रवाचक नसून महेश्वरवाचक असल्यामुळें किंवा तो शब्द चन्द्राचा वाचक मानला तरी, साक्षात् महेश्वरानें देखील त्याला आपल्या मस्तकावर धारण केल्यानें तो अभ्यर्हित–म्हणजे अत्यन्त पूज्य–ठरत असल्यामुळें, 'अभ्यर्हितं च' ह्या वार्तिकान्वयें, तो समासांत पूर्वपद होतो हें लक्षांत ठेवावें. सारांश ' नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र चरितार्थ ठरण्याचें खरें कारण काय आहे हें कळावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात:–

**पूर्वोत्तरपदनिमित्तकार्यात्पूर्वमन्तरङ्गोऽप्येकादेशो न ॥ ५३ ॥**

"पूर्वपद व उत्तरपद ह्यांना निमित्त मानून कांहीं कार्य करावयाचें असेल तर, एकादेश अन्तरङ्ग असला तरी देखील, तो पूर्वी होत नाहीं "

**अत्र च नेन्द्रस्येति निषेध एव ज्ञापक इत्यन्तादिवच्च विप्रतिषेधे परमिति सूत्रयोर्भाष्ये स्पष्टम् ॥ ५३ ॥**

' नेन्द्रस्य परस्य ' हें वृद्धिनिषेधक सूत्रच ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे असें ' अन्तादिवच्च ' ६-१-८५ व ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' १-४-२ ह्या सूत्रांवरील भाष्यांत सांगितलें आहे ( सारांश, पूर्वपद व उत्तरपद ह्यांच्या निमित्तामुळें होणारें कार्य बहिरङ्ग असलें तरी प्रथम होतें, व एकादेशरूपी कार्य अन्तरङ्ग असलें तरी देखील प्रथम होत नाहीं, असें ही परिभाषा सांगत असल्यामुळें, 'नेन्द्रस्य परस्य'

हें वृद्धिनिषेधक सूत्र चरितार्थ ठरतें. 'देवताद्वन्द्वे च' ह्या सूत्रानें पूर्वपद व उत्तरपद ह्यांच्या आद्यचाला, ञित्, कित्, अथवा णित् प्रत्यय पुढें असल्यास, वृद्धि सांगितली आहे. त्यामुळें 'सौमेन्द्रः' असें रूप झालें असतें पण 'नेन्द्रस्य परस्य' हें वृद्धिनिषेधक सूत्र असल्यामुळें, 'इन्द्र' ह्या उत्तरपदांतील आद्यचाला वृद्धि होत नाहीं. ही परिभाषा नसती तर, एकादेशरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, प्रथम झालें असतें व मग वृद्धीची प्राप्तीच झाली नसती, आणि 'नेन्द्रस्य परस्य' हें सूत्र व्यर्थ ठरलें असतें. या परिभाषेंत असलेल्या 'एकादेश' या शब्दानें केवळ एकादेशाचें ग्रहण न होतां सर्व प्रकारच्या सन्धिकार्यांचें ग्रहण होतें आणि म्हणूनच 'रात्रिमटः' हें वैकल्पिक रूप सिद्ध होऊं शकतें असें कित्येक वैयाकरण म्हणतात. 'रात्रिम् अटतीति रात्र्यटः' किंवा 'रात्रिमटः' या स्थलीं, 'कप्रकरणे मूलविभुजादिभ्य उपसंख्यानम्'–सू० २९१९ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'अट्' धातूहून 'क=अ' हा कृत्प्रत्यय झाला आहे व 'अट' हा कृदन्त शब्द 'रात्रि' या शब्दापुढें आल्यामुळें, 'रात्रेः कृति विभाषा' सू० १००८ या सूत्रानें 'रात्रि' शब्दास विकल्पेंकरून मुमागम पावला आहे. 'रात्रि+अटः' अशा स्थितींत 'इको यणचि' या सूत्रानें होणारें यणूरूपी सन्धिकार्य अन्तरङ्ग आहे व 'अट' या कृदन्त उत्तरपदाच्या निमित्तामुळें होणारें मुमागमरूपी कार्य बहिरङ्ग आहे. तरी प्रकृत परिभाषेप्रमाणें मुमागम प्रथम होतो व तो झाल्यावर 'इको यणचि' या सूत्राची प्राप्तीच होत नाहीं, व त्यामुळें 'रात्रिमटः' असें वैकल्पिक रूप सिद्ध होतें. यणादेश प्रथम केला असता तर असें रूप सिद्ध होऊं शकलें नसतें. )

---

## परिभाषा ५४

नन्वेवमपि प्रधाय प्रस्थायेत्यादावन्तरङ्गत्वाद्धित्वादिषु कृतेषु ल्यप् स्यादत आह ॥

( आतांपर्यंत परिभाषा ५१ ते ५३, परिभाषा ५० च्या अपवाद म्हणून सांगितल्या आहेत. पण एवढ्या तीनच परिभाषा प. ५० च्या अपवाद मानल्यास 'ल्यप्' प्रत्यय करितांना उपस्थित होणाऱ्या अडचणी टाळतां येत नाहींत. म्हणून ग्रन्थकार म्हणतात कीं, ) असें जरी आहे तरी 'प्रधाय', 'प्रस्थाय' इत्यादि स्थलीं हित्वादिकार्यं अन्तरङ्ग असल्यामुळें तीं ( प. ५० प्रमाणें ) प्रथम केलीं पाहिजेत व नंतर 'ल्यप्' होईल. ( 'प्र+धा+क्त्वा' ह्या उदाहरणांत, 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू० ३३३२ ह्या सूत्रान्वयें, 'क्त्वा' चे जागीं 'ल्यप्' पावला आहे, आणि तसेंच 'दधातेर्हिः' सू० ३०७६ ह्या सूत्रानें, 'धा' चे जागीं 'हि' हा आदेश पावला आहे. 'प्रथमं धातुः साधनेन युज्यते। पश्चादुपसर्गेण' असा नियम असल्यामुळें,

'धा' धातूचा प्रथम ' क्त्वा ' ह्या प्रत्ययाशीं संबंध होईल व तो संबंध होतांक्षणींच, 'दधातेर्हिः' हें सूत्र प्रवृत्त होऊन ' प्र+हि+क्त्वा ' असें होईल. नंतर क्त्वान्त धातूचा उपसर्गाशीं संबंध करून समास केल्यावर, ' समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ' हें सूत्र प्रवृत्त होऊन ' प्र+हि+य ' असें झाल्यावर, ' ह्रस्वस्य पिति कृति तुक् ' सू० २८५८ ह्या सूत्रानें तुगागम होऊन ' प्रहित्य ' असें विकृत रूप होईल. पण तसें रूप न होतां, ' प्रधाय ' असें रूप होतें हें कसें? तसेंच, ' प्र+स्था+क्त्वा ' ह्या उदाहरणांत, ' स्था ' धातूचा ' क्त्वा ' प्रत्ययाशीं पूर्वोक्त न्यायानें प्रथम संबंध केल्यास, ' घुमास्थागापाजहातिसां हलि' सू० २४६२ ह्या सूत्रानें धातूच्या आकाराचा ईकार होऊन नंतर क्त्वान्त धातु व उपसर्ग ह्यांचा समास केल्यावर, 'क्त्वा' चे जागीं 'समासेऽनञ्पूर्वे' ह्या सूत्रानें ल्यबादेश होऊन, ' प्रस्थीय ' असें रूप होईल. पण तसें रूप न होतां, ' प्रस्थाय ' असें रूप कसें होतें? समास हा अनेकपदाश्रय असल्यामुळें, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, समासनिमित्तक ल्यप्‌रूपी कार्य बहिरङ्ग ठरतें, व धातु आणि प्रत्यय एवढ्यांच्याच अपेक्षेनें होणारें कार्य—ह्मणजे ' धा ' चे जागीं ' हि ' असा आदेश होणें किंवा ' स्था ' यांतील ' आ ' चा ' ई ' होणें हें कार्य–अन्तरङ्ग ठरतें. प. ५० प्रमाणें अन्तरङ्ग कार्य प्रथम केल्यास, पूर्वोक्त उदाहरणांत ल्यपाची विकृत रूपें होण्याची आपत्ति येणार. ती आपत्ति टाळण्याकरितां, ) ही परिभाषा सांगतातः—

## अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो ल्यब्बाधते ॥ ५४ ॥

" बहिरङ्ग ल्यप् अन्तरङ्गकार्यविधायक सूत्रांचा देखील बाधक होतो "

( ही परिभाषा असल्यामुळें, ल्यबादेशरूपी कार्य बहिरङ्ग असून देखील प्रथम होतें व ल्यबादेश झाल्यावर ' धा ' धातूपुढें तादि कित् प्रत्यय राहत नसल्यामुळें ' धा ' चे जागीं ' हि ' असा आदेश होऊं शकत नाहीं. ' स्थानिवदादेशः ' या सूत्रांत ' अनल्विधौ ' असा प्रतिषेध असल्यामुळें, ल्यप् प्रत्ययास स्थानिवद्भावानें तादि कित् प्रत्यय मानतां येत नाहीं. तसेंच ' प्र+स्था+ल्यप् ' अशा स्थितींत ल्यप् हा जरी हलादि प्रत्यय आहे व स्थानिवद्भावानें त्याला कित् मानतां येतें तरी ' न ल्यपि ' सू० ३३३५ हें निषेधात्मक सूत्र असल्यामुळें ' स्था ' यांतील आकाराला ईत्व होत नाहीं. येथें हें सांगणें अवश्य आहे कीं, जर अन्तरङ्गकार्यनिमित्तविनाशक ल्यप् असला तरच तो अन्तरङ्गकार्यविधायकसूत्रापेक्षां बलवत्तर ठरतो; तसा नसला तर बलवत्तर ठरत नाहीं व तशा ल्यपाला प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं. जसें ' प्र+इष्+णिच्+ल्यप् ' अशा स्थितींत लघूपधगुणरूपी अन्तरङ्ग कार्याचें निमित्त णिच् आहे. ल्यप् झाल्यावर जरी ' णेरनिटि ' सू० २३१३ या सूत्रानें णिलोप होतो तरी ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' सू० २६२ या सूत्रान्वयें लघूपधगुणाचें निमित्त–ह्मणजे णिच्या ठिकाणीं झालेला लोपरूपी आदेश–कायम राहतेंच, ह्मणून अशा ठिकाणीं ल्यप् अन्तरङ्गकार्याचा बाधक न होतां, गुणरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम होतें, व ' प्र+एष्+इ+य ' अशी स्थिति झाल्यावर

' णेरनिटि ' या सूत्रानें ' णि=इ ' चा लोप होऊन व ' एङि पररूपम् ' सू० ७८ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन ' प्रेष्य ' असें रूप होतें. जर ल्यबादेश गुणाचा बाधक झाला असता तर, ' प्र+इष्+इ+य ' अशा स्थितींत ' ल्यपि लघुपूर्वात् ' सू० ३३३६ हें सूत्र प्रवृत्त झालें असतें व ' णि ' च्या जागीं अयादेश होऊन इष्ट रूप सिद्ध झालें नसतें, ही परिभाषा, परिभाषा ५० चा अपवाद आहे व या परिभाषेंतील ' अपि ' हा शब्द आधिक्यार्थांत वापरला आहे असें समजूं नये; कारण ल्यप्कार्य समासनिमित्तक असल्यामुळें नेहमीच बहिरङ्ग असणार व त्याच्या मानानें पूर्वोपस्थितनिमित्तक कार्य नेहमीच अन्तरङ्ग असणार. )

**अदोजग्धिरिति सूत्रे कितीत्येव सिद्धे ल्यब्ग्रहणमस्या ज्ञापकमित्यदो जग्धिरित्यत्र भाष्ये स्पष्टम् ॥ ५४ ॥**

' अदो जग्धिर्ल्यप्ति किति ' सू० २०८० या सूत्रांत जें कित् ग्रहण केलें आहे तेवढ्यानेंच इष्ट रूप सिद्ध होत असून देखील पुन्हा त्या सूत्रांत 'ल्यप्' चें जें ग्रहण केलें आहे तें या परिभाषेचें ज्ञापक होय असें ' अदो जग्धिः' २-४-३६ या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे.( ' प्र + अद् + क्त्वा ' अशा स्थितींत क्त्वा हा कित् प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' अद् ' चे जागीं ' जग्ध् ' असा आदेश होऊं शकतो व तो केल्यानंतर ' क्त्वा ' चे जागीं ल्यबादेश केल्यास, ' प्रजग्ध्य ' असें रूप सिद्ध होऊं शकतें. तरी पण सूत्रांत 'ल्यप्' ग्रहण केलें आहे. त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'क्त्वा' चे जागीं होणारा ल्यबादेश बहिरङ्ग असून देखील प्रथम होतो. तो प्रथम झाला म्हणजे, तादि कित् प्रत्यय पुढें न राहिल्यामुळें, ' अद् ' चे जागीं ' जग्ध् ' असा आदेश होणार नाहीं. तो व्हावा म्हणून सूत्रांत पुनः ' ल्यप् ' ग्रहण केलें आहे, व तें अशा तऱ्हेनें ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. ह्या वरील अर्थाचा श्लोक भाष्यकारांनीं भाष्यांत दिला आहे.

**' जग्धौ सिद्धेऽन्तरङ्गत्वात् तिकितीति ल्यबुच्यते ।**
**ज्ञापयत्यन्तरङ्गाणां ल्यपा भवति बाधनम् ' ॥)**

---

## परिभाषा ५५

**नन्वेवमपीयायेत्यादौ द्वित्वे कृतेऽन्तरङ्गत्वात्सवर्णदीर्घत्वेन तदसिद्धिरत आह**

असें जरी आहे तरी–म्हणजे प. ५१ ते प. ५४ या जरी अन्तरङ्गपरिभाषेच्या अपवादात्मक परिभाषा सांगितल्या आहेत तरी–' इयाय ' इत्यादि स्थलीं द्वित्व केल्यावर सवर्णदीर्घरूप कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें प्रथम केल्यास, इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. ( ' इ + णल् ' येथें ' लिटि धातोरनभ्यासस्य ' सू०

२१७७ या सूत्रानें द्विर्वचन करून ' इ + इ + णल् ' अशी स्थिति झाली असतां, ' अकः सवर्णे दीर्घः ' सू० ८५ या सूत्रानें सवर्णदीर्घकार्य पावलें आहे व तसेंच ' अचो ञ्णिति ' सू० २५४ या सूत्रानें वृद्धि पावली आहे. पलीकडे असलेल्या 'णल्' प्रत्ययाला मानून होणारें वृद्धिकार्य बहिरङ्ग आहे व त्याच्या मानानें, अलीकडे असलेल्या इकाराला मानून होणारें सवर्णदीर्घकार्य, अन्तरङ्ग आहे. प० ५० प्रमाणें सवर्णदीर्घरूप अन्तरङ्गकार्य प्रथम केल्यास ' इ+इ+णल्=ई+णल्=ई+अ ' अशी स्थिति होईल, व त्यानंतर वृद्धिरूप बहिरङ्गकार्य केल्यास ' ऐ + अ ' अशी स्थिति झाली असतां, ' एचोऽयवायावः ' सू ६१ या सूत्रानें ' ऐ ' चे जागीं ' आय् ' होऊन, ' ऐ + अ = आय् + अ=आय ' असें विकृत रूप होईल; ' इयाय ' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. विकृत रूप न होतां इष्ट रूप सिद्ध व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात

## वर्णादाङ्गं बलीयो भवति ॥ ५५ ॥

" ( अङ्गाधिकारांत सांगितलेलें ) अङ्गकार्य ( सन्धिनियमाप्रमाणें होणाऱ्या) वार्णकार्यापेक्षां बलवत्तर असतें. "

**तेनान्तरङ्गमपि सवर्णदीर्घं बाधित्वा वृद्धिरिति तत्सिद्धिः ॥**

ही परिभाषा असल्यामुळें, सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग असून देखील, वृद्धिकार्य त्याचा बाध करून प्रथम होतें, व त्यामुळें ' इयाय ' असें इष्ट रूप सिद्ध होतें. (' इ+इ+णल् ' अशा स्थितींत वृद्धिकार्य बहिरङ्ग असून देखील प्रकृतपरिभाषेप्रमाणें प्रथम होतें, व त्यामुळें ' इ+ऐ+अ=इ+आय्+अ ' अशी स्थिति झाली असतां, ' अभ्यासस्यासवर्णे ' सू० २२९० या सूत्रानें अभ्यासांतील इवर्णाचे जागीं इयङ् आदेश होऊन ' इय्+आय्+अ=इयाय ' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

**अभ्यासस्यासवर्णे इतीयङ्विधायकसूत्रस्थमसवर्णग्रहणमस्या ज्ञापकम्। तद्धीषतुरीत्यादावियङादिव्यावृत्यर्थम्। एतत्परिभाषाभावे त्वीषतुरित्यादावन्तरङ्गेण सवर्णदीर्घेण बाधात्तद्व्यर्थम्।**

' अभ्यासस्यासवर्णे ' या इयङादेशाचें विधान करणाऱ्या सूत्रांत ' असवर्णे ' हा जो शब्द घातला आहे तो या परिभाषेचा ज्ञापक आहे. ' ईषतुः ' इत्यादि स्थलीं इयङादेश न व्हावा म्हणून त्या सूत्रांत 'असवर्णे' हा शब्द घातला आहे. ही परिभाषा नसती तर ' ईषतुः ' इत्यादि स्थलीं सवर्णदीर्घरूप अन्तरङ्ग कार्यानें ( बहिरङ्ग इयङादेशाचा ) बाध झालाच असता, व त्या सूत्रांत घातलेलें ' असवर्णे ' हें पद व्यर्थ ठरलें असतें. ( एखादें सूत्र किंवा त्यांतील एखादें पद एखाद्या परिभाषेचें ज्ञापक तेव्हांच मानतां येतें कीं जेव्हां, ती परिभाषा नसल्यास, तें सूत्र किंवा तें पद व्यर्थ ठरतें व ती परिभाषा असल्यासच चरितार्थ ठरतें असें पूर्वीं सांगितलेंच आहे आतां ' अभ्यासस्यासवर्णे ' या सूत्रांतील ' असवर्णे ' हें पद असें आहे काय कीं जर ही

परिभाषा नसती तर तें व्यर्थ ठरतें व ही परिभाषा असल्यासच चरितार्थ ठरतें ? 'अभ्यासस्य' एवढेंच जर सूत्र असतें तर 'अचि श्नुधातु' या पूर्वसूत्रांतून 'अचि य्वोः इयङुवङौ' हीं पदें अनुवृत्त होऊन त्या सूत्राचा 'अभ्यासस्य य्वोः इयङुवङौ स्तः अचि परे सति'–म्हणजे अभ्यासांतील इकारापुढें किंवा उकारापुढें 'अच्' आल्यास त्यांच्या जागीं अनुक्रमें इयङ् व उवङ् आदेश करावे–असा अर्थ झाला असता, व त्यामुळें 'इष्+इष्+अतुः' अशा स्थितींत 'हलादिः शेषः' सू० २१७९ या सूत्रानें अभ्यासांतील षकाराचा लोप होऊन 'इ+इष्+अतुः' अशी स्थिति झाली असतां, सवर्णदीर्घ व इयङादेश हीं दोन कार्यें युगपत् प्राप्त झालीं आहेत. सवर्णदीर्घ-कार्याचें सूत्र पूर्वसूत्र असून इयङादेशाचें सूत्र परसूत्र आहे. तरी पण सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग व इयङादेशकार्य बहिरङ्ग असल्यामुळें, प० ५० प्रमाणें सवर्णदीर्घकार्यच प्रथम झालें असतें व 'ईषतुः' असें इष्ट रूप सिद्ध झालेंच असतें. सारांश, ही परि-भाषा नसती तर 'अभ्यासस्यासवर्णे' या सूत्रांत 'असवर्णे' हें पद नसतें तरी 'ईषतुः, ऊखतुः' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकलीं असतीं, व 'असवर्णे' हें पद व्यर्थ ठरलें असतें. पण ही परिभाषा पाणिनीस मान्य असल्यामुळें त्याला हें माहित होतें कीं 'इ+इष्+अतुः' इत्यादि स्थलीं इयङादेशरूप कार्य बहिरङ्ग असून देखील तें अन्तरङ्ग सवर्णदीर्घरूप वार्णकार्याचा बाध करून प्रथम होईल व 'इयिषतुः' इत्यादि अनिष्ट रूपें होतील. तसें न व्हावें म्हणून त्यानें 'अभ्यासस्यासवर्णे' या सूत्रांत 'असवर्णे' हें पद मुद्दाम घातलें, व अशा रीतीनें तें पद, ही परिभाषा अस-ल्यामुळें, चरितार्थ होऊन या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**इयङुवङौ ह्यभ्याससंबन्धनिमित्तकत्वाद्बहिरङ्गौ ।**

( सवर्णदीर्घ कार्य अन्तरङ्ग व इयङादेश कार्य त्याच्या मानानें बहिरङ्ग आहे असें जें वर म्हटलें आहे त्याचें कारण ग्रन्थकार या पंक्तींत सांगतात. ) इयङुवङादेश होण्याकरितां ज्या इकाराचे किंवा उकाराचे जागीं इयङ् उवङ् आदेश करणें आहे तो इकार किंवा उकार अङ्गावयव जो अभ्यास त्या अभ्यासाचा अवयव असला पाहिजे या निमित्ताची गरज आहे. म्हणून इयङुवङादेशकार्य ( सवर्णदीर्घ कार्याच्या मानानें ) बहिरङ्ग ठरतें. ( सवर्णदीर्घादेश होण्याकरितां इकार उकार अमुक प्रकारचाच असावा याची मुळींच गरज नाहीं; त्याच्या लगेंच पुढें सवर्ण 'अच्' असला कीं पुरें. पण इयङ् उवङ् आदेश होण्याकरितां 'अच्' लगेंच पुढें असणें या निमित्ताची तर गरज आहेच, पण त्याखेरीज ज्या इकाराला व उकाराला इयङ् उवङ् आदेश होणें आहे तो इकार किंवा उकार अङ्गाचा अवयव जो अभ्यास त्या अभ्यासाचा अवयव असला पाहिजे या निमित्ताची देखील गरज आहे. जसें 'इष्+इष्+अतुः' येथें 'हलादिः शेषः' या सूत्रानें अभ्यासांतील षकाराचा लोप झाल्यावर 'इ+इष्+अतुः' अशी स्थिति झाली असतां, सवर्णदीर्घादेश होण्याकरितां, लगेच पुढें सवर्ण इकार असणें एवढ्याच निमि-त्ताची गरज आहे. पण इयङादेश होण्याकरितां पलीकडे असणाऱ्या 'अतुस्' प्रत्ययाला

मानून ' इ+इप् ' याला अङ्गसंज्ञा प्राप्त झाल्यावर व पूर्व इकाराला अभ्याससंज्ञा प्राप्त झाल्यावर अङ्गावयव जो अभ्यास त्याचा अवयव हा इकार आहे असें सिद्ध झाल्यानंतरच त्या इकाराला इयङादेश होऊं शकतो. ह्मणून पूर्वोपस्थितनिमित्तक सवर्णदीर्घादेश अन्तरङ्ग ठरतो, व त्याच्या मानानें परोपस्थितनिमित्तक इयङादेश बहिरङ्ग ठरतो. वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, इयङादेश जो बाहेरङ्ग मानला आहे तो संज्ञेच्या अपेक्षेमुळें बहिरङ्ग मानला नसून, परोपस्थितनिमित्तकत्वामुळें—ह्मणजे त्याचें निमित्त पलीकडे असल्यामुळें—बहिरङ्ग मानला आहे. ' संज्ञापेक्षं बहिरङ्गत्वम् ' हा सिद्धान्त ग्रन्थकारांनीं पूर्वींच प. ५० मध्यें सांगितला आहे. )

न चेयङादिरपवादो, येन नाप्राप्तिन्यायेनेयर्तीत्यादिसकललक्ष्यप्राप्तयणपवादत्वस्यैव निर्णयादिति प्राञ्चः ॥

( आतां शंकाकार अशी शंका करतो कीं, ही परिभाषा नसली तरी, ' अभ्यासस्यासवर्णे ' या सूत्रांतील 'असवर्णे' हें पद अन्य रीतीनें चरितार्थ ठरतें, आणि ह्मणून तें पद या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. तें पद अन्य रीतीनें चरितार्थ ठरतें हें ह्मणण्याचें कारण त्याच्या मतें असें आहे कीं, इयङ्विधायक सूत्र ' अकः सवर्णे दीर्घः ' या सूत्राचें अपवादात्मक सूत्र असल्यामुळें, ' इ+इप्+अतुः ' या स्थलीं सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग असून देखील तें प्रथम न होतां, ' अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान् '—प. ५७—या न्यायान्वयें, इयङादेशकार्य बहिरङ्ग असून देखील, प्रथम झालें असतें. तें कार्य प्रथम न व्हावें व सवर्णदीर्घकार्यच प्रथम व्हावें या हेतूनें ' अभ्यासस्यासवर्णे ' या सूत्रांत ' असवर्णे ' हें पद पाणिनीनें मुद्दाम घातलें आहे व अशा रीतीनें तें पद आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्याला या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. या शंकेवर कैयटादि प्राचीन वैयाकरण असें उत्तर देतात कीं ही शंका व्यर्थ आहे; कारण ज्या आधारावर—ह्मणजे इयङादेशविधायक सूत्र ' अकःसवर्णे दीर्घः ' याचें अपवादात्मक सूत्र आहे असें गृहीत करून—ही शंका रचली आहे तो आधारच खोटा आहे—ह्मणजे ' अकःसवर्णे दीर्घः ' या सूत्राचें इयङादेशविधायक सूत्र अपवादात्मक सूत्र मुळींच ठरूं शकत नाहीं. कारण ) ' येन नाप्राप्ते ' प. ५८ या न्यायान्वयें ' इयर्ति ' इत्यादि सर्व उदाहरणांत लागू पडणाऱ्या ( ' इको यणचि ' या सूत्रानें होणाऱ्या ) यणादेशाचेंच तें इयङादेशविधायक सूत्र अपवादात्मक सूत्र ठरूं शकतें ( व तें सूत्र ' अकः सवर्णे दीर्घः ' याचें अपवादात्मक सूत्र ठरूं शकत नाहीं ) असें प्राचीन वैयाकरणांचें मत आहे. ( जेथें जेथें एखादें सूत्र प्रवृत्त होऊं पाहत असतां, दुसऱ्या सूत्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें त्या सूत्रास आपलें कार्य करण्याकरितां एकहि उदाहरण मिळत नाहीं, व तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें, तशाच ठिकाणीं ' येन नाप्राप्ते ' या न्यायान्वयें, तें सूत्र अपवादात्मक सूत्र मानलें जातें. जेथें दोन सूत्रें आपापल्या विषयांत चरितार्थ ठरतात तेथें ' येन नाप्राप्ते ' हा न्याय मुळींच लागू पडत नाहीं. ' अकः सवर्णे दीर्घः ' हें सूत्र अशा प्रकारचें नाहीं कीं जेथें जेथें

'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें त्याची अवश्यप्राप्ति आहे. कारण 'इयर्ति' या उदाहरणांत जुहोत्यादिगणांतील 'ऋ' धातूचें द्वित्व केल्यावर 'ऋ+ऋ' अशा स्थितींत 'अर्तिपिपर्त्योश्च' सू० २४९३ या सूत्रानें अभ्यासांतील ऋकाराचे जागीं इकार होऊन, व 'उरण् रपरः' सूत्रानें त्या इकारास रकारागम होऊन, व नंतर 'हलादिः शेषः' या सूत्रानें त्या रकाराचा लोप होऊन, 'इ+ऋ+ति' अशी स्थिति झाली असतां, येथें जशी 'इको यणचि' या सूत्राची अवश्यप्राप्ति आहे तशी 'अकःसवर्णे दीर्घः' या सूत्राची मुळींच प्राप्ति नाहीं. ह्मणून जेथें जेथें 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें 'अकःसवर्णे दीर्घः' या सूत्राची अवश्यप्राप्ति आहे हें ह्मणणें चूक ठरतें. त्यामुळें 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र 'अकःसवर्णे दीर्घः' याचें अपवादात्मक सूत्र मानतां येत नाहीं आणि ह्मणून शंकाकारानें उपस्थित केलेली शंका व्यर्थ ठरते असें प्राचीन वैयाकरण ह्मणतात.)

**परे त्वेतत्परिभाषाभावेऽभ्यासस्येति सूत्रमेव व्यर्थम् ।**

इतर वैयाकरणांचें असें मत आहे कीं (व हेंच ग्रन्थकाराचें मत आहे असें समजावें; कारण ग्रन्थकार जेव्हां 'परे तु' या शब्दांनीं पंक्ति सुरू करून भिन्न मत सांगतात तेव्हां ते स्वतःचेंच मत सांगत असतात.) ही परिभाषा नसल्यास, ('अभ्यासस्यासवर्णे' या सूत्रांतील 'असवर्णे' एवढेंच पद व्यर्थ न ठरतां) तें संपूर्ण सूत्र व्यर्थ ठरतें. (कारण 'इ' व 'उ' नें सुरू होणाऱ्या एकाच् धातूचें द्विर्वचन करून 'हलादिः शेषः' या सूत्रानें अभ्यासांतील हलाचा लोप केल्यावर, अभ्यासापुढें सवर्णच 'इ व उ' येऊं शकतो; गुण किंवा वृद्धि केल्याशिवाय अभ्यासांतील 'इ' व 'उ' पुढें असवर्ण अच् येणें शक्य नाहीं. सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग व इयङुवङादेशकार्य बहिरङ्ग असल्यामुळें, सवर्णदीर्घकार्य प्रथम झाल्यावर अभ्यासांतील 'इ' व 'उ' पुढें कोणताहि अच् राहत नसल्यामुळें, त्या 'इ' व 'उ' चे जागीं इयङ् उवङ् आदेश होऊंच शकत नाहींत, व त्यामुळें 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळण्याचा संभव नसल्यामुळें, तें संपूर्ण सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. पण भाष्यकारांनीं तर असें ह्मटलें आहे कीं कोणतेंहि पाणिनीय सूत्र किंवा त्या सूत्रांतील एक अक्षर देखील व्यर्थ ठरूं शकत नाहीं. ह्मणून ज्याअर्थीं पाणिनीनें हें सूत्र मुद्दाम केलें आहे त्याअर्थीं त्या सूत्रावरूनच हें स्पष्ट होतें कीं गुणवृद्धिरूप अङ्गकार्य बहिरङ्ग असून देखील तें, अन्तरङ्ग सवर्णदीर्घ वार्णकार्याचा बाध करून, प्रथम होतें. अशा रीतीनें त्या सूत्रानेंच ही परिभाषा ज्ञापित होते, व ही परिभाषा असल्यामुळेंच, तें सूत्र व्यर्थ न ठरतां, चरितार्थ ठरतें.)

**न चेयेषयायेत्यादौ चरितार्थम् । तयोरपि पूर्वप्रवृत्तगुणस्य पूर्वप्रवृत्तवृद्धेश्च द्विर्वचनेचीतिरूपातिदेशेनापहारे द्वित्वे कृते पुनः प्राप्ते गुणवृद्धी बाधित्वान्तरङ्गत्वात्सवर्णदीर्घापत्तेः ।**

आतां शंकाकार अशी शंका करितो कीं, ही परिभाषा नसून देखील इयेष, इयाय इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां, 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र आवश्यक आहे; कारण 'इष्+णल्' किंवा 'इ+णल्' अशा स्थितींत, 'लिटि धातोरनभ्यासस्य' सू० २१७६ या सूत्रानें द्विर्वचन व तसेंच 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ व 'अचो ञ्णिति' सू० २५४ या सूत्रांनीं 'इष्' येथें लघूपधगुण व 'इ' येथें वृद्धि पावलीं आहेत. गुण व वृद्धि सांगणारीं सूत्रें, द्विर्वचन सांगणाऱ्या सूत्राच्या मानानें, परसूत्रें असल्यामुळें, 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायान्वयें गुण व वृद्धि प्रथम होऊन 'एष्+णल्' व 'ऐ+णल्' अशी स्थिति झाल्यावरच द्विर्वचन करितां येतें. द्विर्वचन केल्यावर 'हलादिः शेषः' सू० २१७९ या सूत्रानें अभ्यासांतील हलाचा लोप होऊन, व 'ऱ्हस्वः' सू० २१८० या सूत्रानें अभ्यासांतील 'ए' व 'ऐ' चा, 'एच इक् ऱ्हस्वादेशे' सू० ३२३ या सूत्रान्वयें, ऱ्हस्व इकार होऊन, 'ए+एष्+णल्=इ+एष्+णल्' व 'ऐ+ऐ+णल्=इ+ऐ+णल्' अशी स्थिति झाली असतां अभ्यासांतील इकारापुढें असवर्ण अच् येत असल्यामुळें, त्या इकाराचे जागीं इयङादेश होण्याकरितां 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र आवश्यक आहे, व अशा रीतीनें तें संपूर्ण सूत्र व्यर्थ न ठरतां चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं—या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ) इयेष, इयाय इत्यादि रूपें सिद्ध करण्याकरितां 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र चरितार्थ—ह्मणजे आवश्यक—आहे हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण 'द्विर्वचनेऽचि' सू० २२४३ या सूत्रानें पूर्वरूपाचा अतिदेश केला असल्यामुळें, द्विर्वचन करण्यापूर्वी केलेलें गुणकार्य व वृद्धिकार्य, द्विर्वचन करतेवेळीं, नाहींसें होतें. असें होत असल्यामुळें, द्विर्वचन केल्यानंतर जेव्हां गुण व वृद्धि यांची ( व तसेंच सवर्णदीर्घकार्याची युगपत् ) प्राप्ति होते तेव्हां सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, बहिरङ्ग गुणकार्य व वृद्धिकार्य यांचा बाध करून, तें सवर्णदीर्घकार्य प्रथम होण्याची आपत्ति येते. ( व ही परिभाषा न मानल्यास ती आपत्ति टळूं शकत नाहीं. 'द्विर्वचनेऽचि' या सूत्रांत 'स्थानिवदादेशोऽनल्विधौ' या पूर्वसूत्रांतून 'स्थानिवदादेशः' हीं पदें अनुवृत्त होत असल्यामुळें, त्या सूत्राचा 'द्विर्वचननिमित्तके अचि परे सति अजादेशः स्थानिवद्भवति—ह्मणजे द्वित्व होण्याचें निमित्त असा अच् पुढें असल्यास द्विर्वचन करण्यापूर्वी अचाचे जागीं झालेला गुणवृद्धिरूप आदेश, द्विर्वचन करतेवेळीं, स्थानिवत् समजावा—असा अर्थ होतो. सारांश गुणवृद्धिकार्य प्रथम केल्यावर गुणवृद्धिरूप आदेश ज्या अचाचे जागीं झाला आहे तो झालाच नाहीं व पूर्वीचाच अच् कायम आहे असें समजून द्विर्वचन केलें पाहिजे. अशा प्रकारचें, आदेशाचा अपहार—ह्मणजे नाश—करून आदेशाचे जागीं पूर्वस्वरूप अचूच आहे असें सांगणारें, हें सूत्र असल्यामुळें, गुण व वृद्धिकार्य प्रथम करून 'एष्+णल्' व 'ऐ+णल्' अशी स्थिति झाली असतां देखील द्विर्वचन करतेवेळीं, गुणरूप आदेश 'ए' व वृद्धिरूप आदेश 'ऐ' 'इ' च आहे असें समजून द्विर्वचन करावें लागतें, व तसें केल्यास पुनः 'इ+इष+णल्' व 'इ+

इ+णल् ' अशीच स्थिति होते. अशा स्थितींत पुनः सवर्णदीर्घकार्य व गुणवृद्धिकार्य या दोहोंची युगपत् प्राप्ति झाली असतां, सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें प्रथम होऊन ' ईष+णल् ' व ' ई+णल् ' अशी स्थिति होते, व अशा स्थितींत अभ्यासापुढें उत्तरखंडांत असवर्ण अच् येणें अशक्य असल्यामुळें, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें इयङु-वङादेशविधायक सूत्र व्यर्थ ठरतें. पण ही परिभाषा असल्यामुळें द्विर्वचन केल्यानंतर गुणरूप किंवा वृद्धिरूप अङ्गकार्य बहिरङ्ग असून देखील, तें अन्तरङ्ग सवर्णदीर्घरूप वार्णकार्याचा बाध करून, प्रथम होत असल्यामुळें, अभ्यासांतील इकारापुढें असवर्ण अच् येतो व त्यामुळें ' अभ्यासस्यासवर्णे ' हें संपूर्ण सूत्र चारितार्थ होऊन प्रकृतपरि-भाषेचें ज्ञापक ठरतें. )

**न चेयर्तीत्यादौ तच्चरितार्थम् । तावन्मात्रप्रयोजनकत्वे उरित्येव ब्रूयात् । य्वोरित्यनुवर्तते । इणो यणिति साहचर्याद्व्याख्यानाच्च ऋधा-तोरेव ग्रहणम् । अर्तेरिवर्णस्येयङित्यर्थः । अभ्यासस्यार्तावित्यभ्यासस्या-र्तेरिति गुरुत्वान्न युक्तम् ॥**

( पुनः शंकाकार अशी शंका करितो की, जुहोत्यादिगणांतील ' ऋ ' धातूची ' इयर्ति ' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र आवश्यक आहे. तें सूत्र नसल्यास, ' इयर्ति ' इत्यादि इष्ट रूपांची सिद्धि होणें अशक्य आहे. कारण ' ऋ+ऋ+ति ' अशा स्थितींत ' अर्तिपिपर्त्योश्च ' सू० २४९३ या सूत्रानें अभ्यासांतील ऋकाराचे जागीं इकारादेश होऊन, व ' उरण् रपरः ' या सूत्रानें त्या इकारास रकारागम होऊन, व ' हलादिः शेषः ' या सूत्रानें त्या रकाराचा लोप होऊन, ' इ+ऋ+ति ' अशी स्थिति झाली असतां, अशा स्थितींत सवर्णदीर्घाची मुळींच प्राप्ति नसून, इयङादेशाची किंवा यणादेशाची प्राप्ति आहे. यणादेश न होतां, गुण झाल्यावर इयङादेशच व्हावा म्हणून, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र मुद्दाम केलें आहे. तें सूत्र नसल्यास, अभ्यासांतील इकाराचे जागीं इयङादेश होऊं शकणार नाहीं, व ' इयर्ति ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. अशा रीतीनें तें सूत्र ' इयर्ति ' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्याला प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं.—या शंकेवर उत्तर देतांना ग्रन्थकार म्हणतात कीं, ही शंका देखील बरोबर नाहीं. हें खरें आहे कीं ' ऋ ' धातूच्या अभ्यासांतील इकाराचे जागीं इयङादेश होण्याकरितां, एखादें सूत्र आवश्यक आहे. पण एक ' ऋ ' धातु खेरीजकरून दुसरें असें कोणतेंहि उदाहरण नाहीं कीं जेथें अभ्या-सांतील इकारापुढें किंवा उकारापुढें, गुणवृद्धिकार्य केल्याशिवाय, असवर्ण अच् येऊं शकतो. म्हणून तेवढ्या एकाच उदाहरणासाठीं ' अभ्यासस्यासवर्णे ' असें मोठें सामा-न्यसूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. ' न ह्येकमुदाहरणं योगारम्भं प्रयोजयति ' —म्हणजे एकाच उदाहरणाकरितां सामान्य सूत्र कधींहि केलें जात नाहीं—असा भाष्य-

कारांनीं सिद्धांत सांगितला असल्यामुळें, अनेक उदाहरणांस लागू पडत असल्यासच सामान्यसूत्र केलें जात असतें. केवळ एका उदाहरणाकरितां सामान्यसूत्र केलें जात नसून, तेवढ्याच उदाहरणास लागू पडणारें असें लहानसें विशेषसूत्र केलें जात असतें. जसें, उणादि 'नि' प्रत्ययान्त 'अग्नि' शब्दाहून 'अग्नेर्ढक्' सू० १२३६ या सूत्रानें ढक्प्रत्यय होणें सांगितलें आहे. इतर कोणत्याहि निप्रत्ययान्त शब्दाहून ढक् प्रत्यय होत नसल्यामुळें, 'निप्रत्ययान्तात् ढक्' असें सामान्यसूत्र न करितां, 'अग्नि' एवढ्याच शब्दास लागू पडणारें 'अग्नेर्ढक्' असें विशेषसूत्र केलें आहे. पण पाणिनीनें तर प्रकृत स्थलीं अनेक उदाहरणांस लागू पडणारें असें 'अभ्यासस्यासवर्णे' हें सामान्यसूत्र रचलें आहे. ह्मणून ) 'ऋ' धातूचीं 'इयर्ति' इत्यादि रूपें सिद्ध करण्याकरितां तें सूत्र चरितार्थ ठरतें हें ह्मणणें बरोबर नाहीं. तेवढाच—ह्मणजे 'ऋ' धातूच्या अभ्यासांतील इकाराचे जागीं इयङ् आदेश व्हावा एवढाच—जर तें सूत्र करण्याचा हेतु असता तर (पाणिनीनें 'अभ्यासस्यासवर्णे' असें लांबलचक सामान्यसूत्र न करितां ) 'उः' एवढेंच लहानसें विशेष ) सूत्र केलें असतें; व त्या सूत्रांत ('अचि श्नुधातु' या पूर्वसूत्रांतून ) 'य्वोः' हें पद अनुवृत्त झालें असतें, व 'इणो यण्' हें सूत्र जवळ असल्यामुळें त्या सूत्राच्या साहचर्यानें व ( भाष्यकारादिकांच्या) व्याख्यानानें, 'उः' या सूत्रानें 'ऋ' धातूचेंच ग्रहण झालें असतें, व त्या सूत्राचा 'अर्तेरिवर्णस्येयङ्'—ह्मणजे 'ऋ' धातूच्या इवर्णाचे जागीं इयङ् करावा—असा अर्थ झालाच असता. 'अभ्यासस्यार्तौ' किंवा 'अभ्यासस्यार्तेः' एवढें देखील मोठें विशेषसूत्र रचणें योग्य झालें नसतें. ( कित्येक प्राचीन वैयाकरण असें ह्मणतात कीं केवळ 'ऋ' धातूकरितां 'अभ्यासस्यार्तौ' किंवा 'अभ्यासस्यार्तेः' अशीं सूत्रें असलीं पाहिजे होतीं. पण ग्रन्थकार ह्मणतात कीं एवढीं मोठीं विशेषसूत्रें करण्याची गरज नाहीं; कारण 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः' प. १३३ असा न्याय असल्यामुळें एवढीं मोठीं विशेषसूत्रें करणें अनुचित झालें असतें, व 'उः' या लहानशा सूत्रानेंच काम भागलें असतें; कारण 'ऋ' धातूचीं रूपें करितांना जो इकार येतो तो 'अर्तिपिपर्त्योश्च' या सूत्रान्वयें अभ्यासांतच येतो. ह्मणून 'अभ्यासस्य' हें पद देखील विशेषसूत्रांत घालण्याची गरज पडली नसती. पण 'उः' असें विशेषसूत्र न करितां ज्याअर्थी पाणिनीनें अनेक उदाहरणांना लागू पडणारें 'अभ्यासस्यासवर्णे' असें सामान्यसूत्र केलें आहे त्याअर्थी त्या सूत्रावरूनच हें ज्ञापित होतें कीं प्रकृतपरिभाषा पाणिनीस मान्य होती, व ही परिभाषा असल्यामुळेंच त्याला तसें सामान्यसूत्र करावें लागलें. अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**न च ए ऐ ओ औ शब्देभ्य आचरक्विबन्तेभ्यो लिटीयङाद्यर्थं तत्सूत्रमावश्यकं, तथा ओणृधातोर्ण्वुलन्तादिच्छाक्यजन्तात्सन्युवोणकीयिषतीत्याद्यर्थमावश्यकमिति वाच्यम् । षाष्ठप्रथमाह्निकान्तस्थभाष्य-**

**प्रामाण्येन तेषामनभिधानात् । अन्त्ये द्वितीयद्विर्वचनस्यैव सत्वेन त्वदुक्त-प्रयोगस्यैव दुर्लभत्वात् । एवं च संपूर्णसूत्रस्य ज्ञापकता युक्ता ॥**

( पुन्हा शंकाकार अशी शंका करितो कीं, 'सर्वप्रातिपदिकेभ्यःक्विब्वा वक्तव्यः'– सू० २६६५ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें ) ए, ऐ, ओ, औ, यांना आचार क्विप् करून ( ' सनाद्यन्ता धातवः ' सू० २३०४ या सूत्रान्वयें धातुसंज्ञा प्राप्त झालेल्या ) त्या आचारक्विबन्त नामधातूंचा लिट् केल्यास, इयङादेश होण्याकरितां ' अभ्यास-स्यासवर्णे ' हें सूत्र आवश्यक आहे. ( जसें ' ए+क्विप्+लिट्=ए+ए+लिट् ' अशा स्थितींत' ह्रस्वः ' सू० २१८० या सूत्रानें अभ्यासांतील ' ए ' च्या जागीं, ' एच इक् ह्रस्वादेशे ' सू० ३२३ या सूत्रान्वयें, ह्रस्व इकार होऊन त्या इकारापुढें अस-वर्ण ' ए ' हा अच् येतो. अशा ठिकाणीं अभ्यासांतील इकाराचे जागीं इयङ् आदेश होण्याकरितां ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र आवश्यक आहे अशी शंकाकाराची शंका आहे. सारांश केवळ ' ऋ ' धातूचीं रूपें सिद्ध करण्याकरितांच वरील सूत्र आवश्यक आहे असें नसून, ए, ऐ, ओ, औ या क्विबन्त नामधातूंहून लिट् केला असतां त्या सूत्राची गरज आहेच. एवढेंच नव्हे तर ) भ्वादिगणांतील ' ओणृ अपनयने ' या धातूला ' ण्वुल् ' करून व त्या ण्वुलन्त शब्दाहून ' क्यच् ' प्रत्यय करून, तशा क्यच्-प्रत्ययान्त नामधातूचें सनाचें रूप केल्यास देखील ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र आव-श्यक आहे. ( ' ओण् ' धातूला 'ण्वुल्' प्रत्यय लावला असतां 'ओणक' असें रूप होतें, व त्या ' ओणक ' शब्दाहून ' सुप आत्मनः क्यच् ' सू० २६५७ या सूत्रानें इच्छार्थे क्यचप्रत्यय केल्यास ' ओणकीय ' असें रूप होतें; व या क्यजन्ताहून ' सन् ' केल्यास, ' सन्यङोः ' सू० २३९५ या सूत्रानें द्विर्वचन केल्यावर ' ओ+ओणकीय +सन्=उ+ओणकीय+सन् ' अशी स्थिति झाली असतां, अभ्यासांतील उकारापुढें ' ओ ' हा असवर्ण अच् येत असल्यामुळें त्या उकाराचे जागीं उवङ् आदेश होण्या-करितां देखील, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सामान्यसूत्र आवश्यक आहे. या शंकेवर उत्तर देतांना ग्रन्थकार असें ह्मणतात कीं ) ही शंका बरोबर नाहीं; कारण भाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या प्रथमान्हिकाच्या शेवटील सूत्रांत–ह्मणजे ' दाश्वान्साह्वान्मी-ढ्वांश्च ' ६–१–१२ या सूत्रांत–( जेथें ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानलें आहे ) जें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे त्याच्या आधारानेंच हें सिद्ध होतें कीं, ( ए, ऐ, ओ, औ यांना क्विप्प्रत्यय होऊन तशा नामधातूंचा ) प्रयोग कोठेंहि आढळत नाहीं. ( अशा प्रकारचे प्रयोग जर भाषेंत रूढ व प्रचलित असते तर भाष्यकारांनीं ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानलें नसतें; कारण तशा नामधातूंचीं लिटाचीं रूपें केलीं असतां, अभ्यासांतील इकाराचे व उका-राचे जागीं इयङ्, उवङ् आदेश होण्याकरितां तें सूत्र आवश्यक ठरलें असतें. ) दुसऱ्या उदाहरणांत—ह्मणजे ' उवोणकीयिषति ' हें जें शंकाकारानें दुसरें उदाहरण

दिलें आहे त्या उदाहरणांत ('यथेष्टं नामधातुषु' या वार्तिकानें प्राप्त झालेल्या द्वित्वाचेंहि 'अजादेर्द्वितीयस्य' सू २१७६ हें सूत्र नियामक असल्यामुळें,) द्वितीय एकाचाचेंच द्विर्वचन प्राप्त असल्यामुळें, 'उवोणकीयिषति' असें रूप सिद्ध होऊंच शकत नाहीं. (कारण 'ओणकीय+सन्' येथें अनेकाच् धातु अजादि असल्यामुळें, 'एकाचो द्वे प्रथमस्य' सू० २१७५ हें सूत्र लागू पडत नाहीं व प्रथम एकाचाचें द्वित्व होऊं शकत नाहीं; द्वितीय एकाचाचेंच द्वित्व होऊं शकतें, व त्यामुळें शंकाकाराची शंका व्यर्थ ठरते.) वरील विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं, 'अभ्यासस्यासवर्णे' हें संपूर्ण सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानणें योग्य आहे. (कारण ही परिभाषा नसल्यास, एक 'ऋ' धातु खेरीज करून इतर कोठेंहि हें सूत्र चरितार्थ ठरत नाहीं, व केवळ 'ऋ' धातूकरितां असें सामान्यसूत्र मुळींच केलें नसतें. ही परिभाषा असल्यामुळेंच तें सूत्र करावें लागलें. अशा रीतीनें या परिभाषेमुळें तें सूत्र चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें.)

**यद्यपि भाष्ये यदयमभ्यासस्यासवर्ण इत्यसवर्णग्रहणं करोतीति ग्रन्थेनासवर्णग्रहणस्यैव ज्ञापकता लभ्यते तथापि न ह्यन्तरेण गुणवृद्धी असवर्णपराभ्यासो भवतीति तदुपपादनग्रन्थेन संपूर्णसूत्रस्यैव ज्ञापकता लभ्यते । अग्रेऽपि नैतदस्ति ज्ञापकमर्त्यर्थमेतत्स्यादित्यनेन सूत्रसार्थक्यमेव दर्शितमसवर्णग्रहणस्यैव ज्ञापकत्वे तु तद्व्यावर्त्यप्रदर्शनेन तत्सार्थक्यमेव दर्शितं स्यात् ॥**

"यदयमभ्यासस्यासवर्णे इत्यसवर्ण ग्रहणं करोति" ह्या भाष्यग्रन्थावरून जरी असें दिसून येतें कीं 'अभ्यासस्यासवर्णे' ह्या सूत्रांतील 'असवर्ण' शब्दाचें ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक भाष्यकारांनीं मानलें आहे, तथापि ह्या उक्तीच्या समर्थनार्थ 'न ह्यन्तरेण गुणवृद्धी असवर्णपराभ्यासो भवति'-म्हणजे गुण अथवा वृद्धि झाल्याशिवाय अभ्यासापुढें असवर्ण अच् येऊंच शकत नाहीं—असें जें भाष्यांत प्रतिपादन केलें आहे यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकाराच्या मतें, 'अभ्यासस्यासवर्णे' हें संपूर्ण सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे, पुढें त्याच भाष्यांत शंका उपस्थित करून असें म्हटलें आहे कीं, हें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं; कारण हें सूत्र 'ऋ' धातूकरितां चरितार्थ ठरूं शकतें; व असें म्हणून, भाष्यकारांनीं संपूर्ण सूत्राची सार्थकता दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. जर त्या सूत्रांतील 'असवर्णे' एवढेंच पद भाष्यकाराच्या मतें ह्या परिभाषेचें ज्ञापक असतें तर, तें पद सूत्रांतून गाळलें असतां, कोणता दोष उपस्थित होईल हें स्पष्ट दाखवून तेवढ्याच पदाची सार्थकता दाखविणारें उदाहरण शंकापरभाष्यांत दिलें असतें. (संपूर्ण सूत्राची सार्थकता दाखविणारें उदाहरण त्या शंकापरभाष्यांत भाष्यकारांनीं दिलें नसतें.)

**न चाकृतव्यूहपरिभाषयेयेषेत्यादौ सवर्णदीर्घप्राप्तिर्यदि दीर्घो न स्यात्तर्हि गुणः स्यादिति संभावनायाः सत्वेन परिभाषाप्रवृत्तेः सूपपादत्वादिति कथं सम्पूर्णसूत्रस्य ज्ञापकतेति वाच्यम् । तस्या असत्वात् । सत्वे वैत-**

**द्भाष्यप्रामाण्येन यत्रान्तरङ्गकार्यप्रवृत्तियोग्यकालोत्तरमेव तन्निमित्त-विनाशकबाहिरङ्गविधेः प्राप्तिस्तत्रैव तत्परिभाषाप्रवृत्तिस्वीकाराच्च ॥**

( पुन्हा शंकाकार अशी शंका करितो कीं ) 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' ही परिभाषा ५६ असल्यामुळें 'इयेष' इत्यादि स्थलीं सवर्णदीर्घ आदेश होण्याची प्राप्तीच नाहीं; कारण सवर्णदीर्घ न केल्यास गुण होईल ( व गुण झाल्यानें अन्तरङ्ग सवर्णदीर्घ कार्याच्या निमित्ताचा नाश होईल ) असा संभव असल्यामुळें, अशा ठिकाणीं 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा लागू पडते. म्हणून 'अभ्यासस्यासवर्णे' हें संपूर्ण सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक कसें ठरूं शकणार? ('इ+इष्+णल्' किंवा 'इ+इ+णल्' या स्थलीं सवर्णदीर्घ-कार्याची तसेंच गुणवृद्धि कार्याची युगपत् प्राप्ति आहे अलीकडे असलेल्या 'इ' या निमित्तामुळें होणारें सवर्णदीर्घ कार्य अन्तरङ्ग आहे, व पलीकडे असलेल्या 'णल्' या प्रत्ययाच्या निमितामुळें होणारें गुणवृद्धिकार्य बहिरङ्ग आहे. म्हणून प० ५० प्रमाणें अन्तरङ्ग सवर्णदीर्घ कार्याची प्रथम प्राप्ति होते. पण 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा, प० ५० ची अपवादात्मक परिभाषा असल्यामुळें, ती या स्थलीं प० ५० ला प्रवृत्त होऊं देत नाहीं; कारण गुणवृद्धिकार्य जरी बहिरङ्ग आहे तरी तें असें आहे कीं, तें केल्यानें अन्तरङ्ग सवर्णदीर्घ कार्याचें निमित्त जो सवर्ण इकार त्याचा, इकाराचे जागीं 'ए' असा गुण किंवा 'ऐ' अशी वृद्धि झाल्यानें, नाश होणार, म्हणून येथें अन्तरङ्ग परिभाषा लागू पडत नाहीं, व 'अकृतव्यूहाः' हीच परिभाषा लागू पडते; व त्या परिभाषेप्रमाणें अन्तरङ्ग कार्य न करितां गुणवृद्धिरूप बहिरङ्ग कार्य प्रथम केल्यास 'इ+एष् + अ' व 'ई + ऐ+अ' अशी स्थिति झाली असतां, अभ्यासांतील इकारापुढें उत्तरखंडांत असवर्ण 'अच्' येत असल्यामुळें, त्या इकाराचे जागीं इयङ् आदेश होण्याकरितां 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र आवश्यक व चरितार्थ ठरतें, आणि त्यामुळें तें सूत्र प्रकृत परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं—अशी शंकाकाराची शंका आहे. यावर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, वास्तविक पाहिलें असतां, ज्या परिभाषेच्या आधारावर—म्हणजे 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या आधारावर—ही शंका उपस्थित केली आहे ती परिभाषा भाष्यांत कोठेंहि पठित नसल्यामुळें ) तशी परिभाषाच नाहीं, व ती परिभाषा आहे असें मानलें तरी ज्या भाष्यांत 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रकृत परिभाषेचें ज्ञापक मानलें आहे त्या भाष्याच्या आधारानें हें सिद्ध होतें कीं अन्तरङ्गकार्य प्रवृत्त होण्याच्या योग्य कालानंतर—ह्मणजे अन्तरङ्ग कार्य प्रथम झाल्यानंतर—तशा पूर्वीं झालेल्या अन्तरङ्ग कार्याच्या निमित्ताचा नाश करणारें बहिरङ्ग कार्य प्राप्त होत असेल तर तशाच ठिकाणीं 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा लागू पडते. ( जसें 'भाषायां सदवसश्रुवः' सू० ३०९७ या सूत्रान्वयें 'सद्' या धातूपुढें असलेल्या लिटाचे जागीं 'क्वसु=वस्' असा आदेश केल्यास 'सद्+क्वसु=वस्' अशा स्थितींत 'वस्वेकाजाद्घसाम्' सू० ३०९६ या सूत्रानें 'वस्' प्रत्ययाला इडागम पावला आहे. तो इडागम केल्यावर व तसेंच लिटाचे जागीं 'क्वसु' हा आदेश झाला असल्यामुळें, व तो प्रत्यय 'कित् असल्यामुळें, 'अत एकहल्मध्ये'

सू० २२६० या सूत्रान्वयें इडागमापूर्वी 'एत्व' व अभ्यासलोप केल्यावर ' सेद्+इ+वस्= सेदिवस्' अशी स्थिति होते, व या ' सेदिवस् ' शब्दाला ' कृत्तद्धितसमासाश्च ' सू. १७९ या सूत्रान्वयें प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते. नंतर या प्रातिपदिकास द्वितीयाविभक्तीच्या बहुवचनाचा 'शस्' प्रत्यय लावला असतां, 'वसोः सम्प्रसारणम्' सू० ४३५ या सूत्रानें ' वस् ' यांतील वकाराला सम्प्रसारणकार्य प्राप्त होतें. पूर्वकालिक इडागम कार्य अन्तरङ्ग व उत्तरकालिक सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग आहे. तरी पण बहिरङ्ग सम्प्रसारणकार्य असें आहे कीं, तें केल्यास इडागमरूपी अन्तरङ्गकार्याचें निमित्त, जें वस् - प्रत्ययाचें वलादित्व, त्याचा, वकाराचे जागीं उकार झाल्यानें, नाश होतो म्हणून, येथें सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग असून देखील अन्तरङ्गकार्याची निवृत्ति करतें व त्यामुळें इडागम नाहींसा होऊन ' सेद् + उ+अस् + शस् ' अशी स्थिति झाली असतां, ' सम्प्रसारणाच्च ' सू० ३३० या सूत्रान्वयें पूर्वरूप एकादेश झाल्यावर ' सेद् + उस् +अस् = सेदुषः' असें रूप होतें. या उदाहरणांत इडागमरूपी अन्तरङ्गकार्य केल्यानंतर सम्प्रसारणरूप बहिरङ्गकार्य प्राप्त झालें आहे म्हणून येथें ' अकृतव्यूहाः ' ही परिभाषा लागते. पण ' इयाय, इयेव ' या उदाहरणांत अन्तरङ्गकार्य झाल्यानंतर बहिरङ्गकार्याची प्राप्ति झाली नसून दोन्हीं कार्ये युगपत् प्राप्त झालीं आहेत त्यामुळें या उदाहरणांत ' अकृतव्यूहाः ' ही परिभाषा लागू पडत नाहीं जेथें अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्य युगपत् प्राप्त होतें, तशा ठिकाणीं ' अकृतव्यूहाः ' ही परिभाषा लागते असें मानल्यास, ज्या ज्ञापकवर भाष्यांत ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानलें आहे तें भाष्य असंगत ठरतें. पण भाष्य प्रमाण मानलेंच पाहिजे; व 'अकृतव्यूहाः ' ही परिभाषा भाष्यकारास मान्य होती असें गृहीत घेऊन चालल्यास, व ही परिभाषा अन्तरङ्ग व बहिरङ्गकार्ये युगपत् प्राप्त झालीं असतां देखील लागू पडते असें मानल्यास, भाष्यकारांनीं ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र प्रकृत परिभाषेचें ज्ञापक मानलें नसतें. पण त्यांनीं तें सूत्र ज्ञापक मानलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अन्तरङ्ग व बहिरङ्गकार्ये युगपत् प्राप्त झालीं असतां लागू पडत नाहीं. म्हणून शंकाकाराची शंका ज्या आधारावर रचली आहे तो आधारच खोटा असल्यामुळें ती शंका व्यर्थ ठरते. सारांश ' इयेव ' इत्यादि स्थलीं अन्तरङ्ग सवर्णदीर्घकार्याची प्राप्तीच नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. पण प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, सवर्णदीर्घरूप वार्णकार्य अन्तरङ्ग असून देखील तें प्रथम न होतां गुणवृद्धिरूप बहिरङ्ग अङ्गकार्य प्रथम होतें व त्यामुळें अभ्यासांतील इवर्णापुढें उत्तरखंडांत असवर्ण ' अच् ' येतो म्हणून असवर्ण ' अच् ' पुढें आला असतां इकाराचे जागीं इयङ् आदेश व्हावा याकरितां, ही परिभाषा असल्यामुळें, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र चरितार्थ होऊन या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**न चान्तरङ्गत्वाद्दीर्घेपीयायेत्यादौ पूर्वान्तवत्त्वेनाभ्यासत्वादिवर्णत्वाच्च णल्यसवर्ण इयङ्विधानेन सूत्रं चरितार्थम् । न चाचिश्निवत्यनेन सिद्धिः,**

**वृद्धिबाधनार्थत्वादिति वाच्यम् । प्रत्यासत्त्याऽसवर्णपदेनाभ्यासोत्तरखण्ड-संबन्ध्यसवर्णाच एव ग्रहणाच्छास्त्रबाधकल्पनापेक्षया परिभाषाज्ञापक-त्वस्यैवौचित्याच्चेत्याहुः ॥**

( पुन्हा शंकाकार अशी शंका करितो कीं ) 'इयाय' इत्यादि स्थलीं सवर्ण-दीर्घकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें प्रथम केलें तरी सवर्णदीर्घ एकादेशाला पूर्व वर्णाचा अन्त समजून तो अभ्यास आहे असें मानतां येतें, व तो ईवर्ण असल्यामुळें, व त्याच्या लगेंच पुढें असवर्ण 'णल् = अ' हा अच् येत असल्यामुळें, ईकाराचे जागीं इयङ् आदेश होण्याकरितां 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र चरितार्थ ठरतें. अशा ठिकाणीं 'अचिश्नुधातु' सू० २७१ या सूत्रानें इयङादेश होऊं शकतो ( असें सिद्धान्तीनें म्हटल्यास) तें म्हणणें बरोबर नाहीं. ( कारण 'अचो ञ्णिति' सू० २५४ हें वृद्धिविधायक सूत्र परसूत्र अस-ल्यामुळें, 'अचि श्नुधातु' या पूर्वसूत्रानें वृद्धीचा बाध होणें शक्य नसल्यामुळें, इयङा-देश न होतां, वृद्धि होईल. ती वृद्धि न होतां इयङादेश व्हावा म्हणून ) वृद्धीचा बाध होण्याकरितां 'अभ्यासस्यासवर्णे' हें अपवादात्मक सूत्र केलें आहे. ( व अशा रीतीनें तें सूत्र आवश्यक ठरत असल्यामुळें या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं अशी शंकाकाराची शंका आहे. त्याचा सर्व कटाक्ष 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं हें सिद्ध करण्याकडे आहे. 'वादी भद्रन्न पश्यति' या म्हणीप्रमाणें तो या गोष्टीकडे लक्ष देत नाहीं कीं त्याची शंका बरोबर ठरल्यास जरी 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक मानतां येणार नाहीं तरी 'इयाय, इयेष' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. त्याचा हेतु इष्ट रूपसिद्धि होणें हा नसून, सिद्धान्तीचें म्हणणें कोण्यातरी रीतीनें हाणून पाडावें एव-ढाच दिसतो. तो म्हणतो कीं 'इ+इ+णल्' अशा स्थितींत सवर्णदीर्घ व वृद्धि या दोन कार्यांची युगपत् प्राप्ति आहे. पण सवर्णदीर्घकार्य वृद्धिकार्याच्या मानानें अन्तरङ्ग असल्यामुळें, सवर्णदीर्घकार्य प्रथम होऊन 'ई+णल्' अशी स्थिति झाली असतां 'ई' या एकादेशास 'अन्तादिवच्च' सू० ७५ या सूत्रान्वयें अभ्यासाचा अन्त मानतां येतो, व तसें मानल्यास–म्हणजे 'ई' हा अभ्यासवर्ण आहे असें मानल्यास–त्याच्या लगेंच पुढें 'णल् =अ' हा असवर्ण अच् येत असल्यामुळें, त्या ईकाराला 'अचो ञ्णिति' या सूत्रान्वयें वृद्धि न होतां, त्या ईकाराचे जागीं इयङादेश व्हावा म्हणून 'अभ्यास-स्यासवर्णे' हें अपवादात्मक सूत्र मुद्दाम केलें आहे; व तें सूत्र आवश्यक असल्यामुळें या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. पण त्याची शंका बरोबर आहे असें मानल्यास 'इयाय' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, 'ई+अ=इय्+अ=इय' असें विकृत रूप सिद्ध होण्याची आपत्ति येईल. या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ही शंका निरर्थक आहे; कारण 'पूर्वोऽभ्यासः' सू० २१७८ या सूत्रान्वयें पूर्वखंडाला अभ्यास अशी संज्ञा होते. यांत 'पूर्व' हा शब्द सापेक्ष असल्यामुळें त्यानें उत्तरखंडाचा आपोआपच आक्षेप होतो. अशा रीतीनें पूर्वखंड व उत्तरखंड यांचें नेहमी सान्निध्य राहत असल्यामुळें,

त्या ) सान्निध्यामुळें ( ' अभ्यासस्यासवर्णे ' या सूत्रांतील ) ' असवर्णे ' या पदानें उत्तरखंडांत असणाऱ्या असवर्ण अचाचेंच ग्रहण होऊं शकतें. ( 'णल्=अ' हा उत्तर-खंडाचा भाग नसून उत्तरखंडाच्या पलीकडे असतो, व त्यामुळें ' असवर्णे ' या पदानें उत्तरखंडाच्या पलीकडे असणाऱ्या असवर्ण णल्चें ग्रहण करितां येत नाहीं. सारांश ज्या आधारावर वरील शंका रचली आहे तो आधार चूक ठरत असल्यामुळें ती शंका व्यर्थ ठरते. ) दुसरें असें कीं, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र ' अचि श्नु ' या सूत्रानें प्राप्त जो इयङादि आदेश, त्याचें बाधक अशा 'अचो ञ्णिति' या सूत्राचें बाधक व अपवादात्मक आहे असें मानण्यापेक्षां तें सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे हें मानणें अधिक योग्य आहे. ( कारण दोन्हीं सूत्रें सारखीं प्रमाणभूत असल्यामुळें त्यांच्यांत बाध्यबाधकभाव मानण्यांत गौरव आहे; जेथें गत्यन्तर नाहीं तेथेंच बाध्यबाधकभाव मानणें योग्य आहे.)

सा चेयं धर्मिग्राहकमानादाङ्गवार्णयोः समानकार्थित्व एव ।

( ' धर्मी ' ह्मणजे परिभाषा, तिचें ' ग्राहक ' ह्मणजे ज्ञापक असें जें ' मान ' ह्मणजे प्रमाण; तें प्रमाण ह्मणजे ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र आहे. ) ह्या सूत्रावरून असें स्पष्ट होतें कीं, जेव्हां वर्णकार्य व अङ्गकार्य एकाच कार्यीला प्राप्त होतें तेव्हांच ही परिभाषा लागू पडते. कारण तें ज्ञापकसूत्र अशाच ठिकाणीं लागू पडतें कीं जेथें अङ्गकार्यांचा जो कार्यी आहे तोच वर्णकार्याचा कार्यी आहे. ( जसें ' इ+इ+णल् ' येथें मधल्या ' इ ' ला वृद्धिरूप अङ्गकार्य ' अचो ञ्णिति ' ह्या अङ्गाधिकारांतील सूत्रानें पावलें आहे; तसेंच ' अकःसवर्णे दीर्घः ' या सूत्रानें त्याच ' इ ' ला सवर्ण-दीर्घादेशरूपी वार्णकार्य,–ह्मणजे संधिकार्य-पावलें आहे. दोन्हीं कार्यांचा कार्यी एकच असल्यामुळें, ह्या उदाहरणांत, प्रकृत परिभाषा लागू पडते व वार्णकार्य न होतां, अङ्गकार्य होतें. तसेंच ' इ+इष्+णल् ' येथें ज्या ' इ ' ला गुणरूपी अङ्ग-कार्य ' पुगन्तलघूपधस्य च ' ह्या अङ्गाधिकारांतील सूत्रानें पावलें आहे त्याच ' इ ' ला सवर्णदीर्घरूप वार्णकार्य पावलें आहे. ह्मणून दोन्ही कार्यांचा कार्यी एक असल्यामुळें ह्या उदाहरणांत देखील, प्रकृत परिभाषा लागू पडते. परंतु जेथें दोन्हीं कार्यांचा कार्यी एक नाहीं तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं. जसें:—भ्वादिगणांतील ' गाङ् गतौ ' ह्या धातूचें लटाचें प्रथमपुरुषाचें द्विवचन करितांना ' गा+शप्+आताम् ' अशा स्थितींत, ' टित आत्मनेपदानां टेरे ' सू० २२३३ हें सूत्र लावलें असतां, ' गा+अ+आते ' अशी स्थिति होते. अशा स्थितींत, ' आतो ङितः ' सू० २२३५ ह्या अङ्गाधिकारांतील सूत्रानें अदन्त अङ्गापुढें असणाऱ्या ' आते ' ह्या ङित् प्रत्ययाच्या आकारास इयादेश पावला आहे. तसेंच ' अकःसवर्णे दीर्घः ' ह्यानें ' गा+अ ' ह्या ठिकाणीं दीर्घादेश पावला आहे. दीर्घादेशरूपी वार्णकार्याचे कार्यी ' गा ' ह्यांतील ' आ ' व त्यापुढें असणारा ' अ ' हे आहेत. इयादेशरूपी अङ्गकार्याचा कार्यी ' आते' ह्यांतील ' आ ' आहे. इयादेशरूपी कार्य अङ्गकार्य असल्यामुळें, व दीर्घादेशरूपी कार्य वार्णकार्य असल्यामुळें, ह्या परिभाषेप्रमाणें अङ्गकार्य प्रथम व्हावें; पण येथें अङ्ग-

कार्याचें व वार्णकार्याचें कार्यी भिन्न असल्यामुळें, ही परिभाषा ह्या उदाहरणांत लागू पडत नाहीं, व वार्णकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें प्रथम होतें. तें प्रथम झाल्यावर, अङ्ग अदन्त राहत नाहीं, आदन्त होतें; व त्यामुळें 'आते' ह्यांतील 'आ' ला इयादेश होत नाहीं, आणि सवर्णदीर्घरूप एकादेश होऊन 'गा+अ+आते=गा+आते =गाते' असें रूप सिद्ध होतें.)

**यत्तु समाननिमित्तकत्वरूपसमानाश्रयत्व एवैषेति, तन्न। ज्ञापितेऽपीयायेषेत्याद्यसिद्धेः सूत्रवैयर्थ्यस्य तदवस्थत्वाच्च।**

वार्णकार्याचें व अङ्गकार्याचें निमित्त एकच असेल तर ही परिभाषा लागू पडते हें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण असें मानल्यास, 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक मानलें तरी, 'इयाय' 'इयेष' इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत, व 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र पुनः व्यर्थ ठरणारच. ('इ+इ+णल्' ह्या स्थलीं, वृद्धिरूप अङ्गकार्याचें निमित्त 'णल्' आहे; व सवर्णदीर्घादेशरूपी वार्णकार्याचें निमित्त मधला 'इ' आहे. दोन्हीं कार्यांची निमित्तें भिन्न असल्यामुळें ही परिभाषा न लावल्यास, वर्णकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें प्रथम होईल, व तें प्रथम केल्यास, 'ई+अ' अशी स्थिति झाल्यावर, वृद्धिरूप बहिरङ्ग कार्य होऊन, 'ऐ+अ=आय्+अ= आय' असें विकृत रूप होईल, 'इयाय' असें शुद्ध रूप होणार नाहीं. तसेंच 'इ+इष्+णल्' ह्या स्थलीं, सवर्णदीर्घरूप अन्तरङ्गकार्य प्रथम केल्यास, 'ईष+णल्' अशी स्थिति होईल, व लघु उपधा नाहींशी झाल्यामुळें, 'पुगन्तलघूपधस्य च' हें सूत्र लागू पडणार नाहीं, आणि 'इयेष' असें शुद्ध रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं; आणि अशा रीतीनें वार्णकार्य प्रथम केल्यास अभ्यासापुढें उत्तरखंडांत असवर्ण अच् येणें अशक्य असल्यामुळें, 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंही उदाहरण मिळूं शकणार नाहीं, व तें सूत्र व्यर्थ ठरेल.)

**स्योन इत्यत्र तु वक्ष्यमाणरीत्यास्या अनित्यत्वादप्रवृत्तौ गुणादन्तरङ्गत्वाद्यणादेशः ॥**

ही परिभाषा अनित्य आहे असें पुढें सांगणार असल्यामुळें, 'स्योनः' ह्या उदाहरणांत ही परिभाषा लागू पडत नाहीं, व गुणरूपी अङ्गकार्याच्या मानानें यणादेशरूपी वार्णकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें वार्णकार्य प्रथम होतें. ('सिव्' ह्या धातूस उणादि 'न' प्रत्यय लावला असतां, 'सिव्+न' अशा स्थितींत, 'च्छ्वोः शूठ्' सू० ६।४।१९ ह्या सूत्रानें वकाराचें जागीं ऊठ् होऊन 'सि+ऊ+न' अशी स्थिति होते. अशा स्थितींत, 'सि' ह्यांतील इकाराला 'पुगन्तलघूपधस्य च' ह्या सूत्रानें, 'न' प्रत्यय पुढें असल्यामुळें, गुणरूपी अङ्गकार्य पावलें आहे, व 'इको यणचि' ह्या सूत्रानें त्याच इकारास यणादेशरूपी वार्णकार्य पावलें आहे. 'न' ह्या पलीकडच्या प्रत्ययाला मानून होणारें गुणरूपी अङ्गकार्य बहिरङ्ग आहे, व पूर्वोपस्थित-

निमित्तक वार्णकार्य अन्तरङ्ग आहे. ही परिभाषा नित्य मानल्यास, गुणरूपी अङ्ग-कार्य प्रथम व्हावें. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, यणादेशरूपी अन्तरङ्ग वार्णकार्य प्रथम होतें, व त्यामुळें 'स्यू+न' अशी स्थिति झाल्यावर, गुणरूपी बहिरङ्ग अङ्गकार्य, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू० २१६८ ह्या सूत्रानें होऊन 'स्योनः' असें रूप सिद्ध होतें. )

**न चैवमपीयायेत्यादावियङ् दुर्लभस्तत्र कर्तव्ये वृद्ध्यादेः स्थानिवत्त्वेनासवर्ण इति प्रतिषेधादिति वाच्यम् । सूत्रारम्भसामर्थ्यादेव स्थानिवत्वाप्रवृत्तेः ।**

ह्या परिभाषेप्रमाणें, गुणवृद्धिरूप अङ्गकार्य, एकादेशरूपी वार्णकार्य करण्यापूर्वी केलें तरी, 'इयाय' इत्यादि स्थलीं, अभ्यासवर्णाला इयङ् होऊं शकणार नाहीं; कारण ('अचः परस्मिन्पूर्वविधौ' सू० ५० ह्या सूत्रान्वयें) गुणवृद्धिरूप अजादेश स्थानिवत्‌च मानला पाहिजे, व तो तसा मानल्यास, 'अभ्यासस्यासवर्णे' ह्या सूत्रांत 'असवर्णे' असें पद असल्यामुळें, इयङ् उवङ् आदेश अभ्यासवर्णास होणें अशक्य आहे. ('इ+इ+णल्=इ+ऐ+णल्' ह्या ठिकाणीं, वृद्धिरूप अजादेश 'ऐ' अथवा 'इ+इष्+णल्=इ+एष्+णल्' ह्या ठिकाणीं, गुणरूप अजादेश 'ए' हे 'इ'च आहेत असें स्थानिवद्भावानें मानणें भाग आहे, व तसें मानल्यास, अभ्यासवर्णापुढें असवर्ण अच् आहे असें मानतां येणार नाहीं, व यामुळें, 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकणार नाहीं, व इयङादेश होऊं शकणार नाहीं, ) अशी कोणी शंका केल्यास, हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण 'अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें, गुणवृद्धिरूप अजादेशाला स्थानिवत् मानतां येत नाहीं. (कारण अशा ठिकाणीं स्थानिवद्भाव मानल्यास, 'अभ्यासस्यासवर्णे' ह्या सूत्रास प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळणार नाहीं, व तें सूत्र केलें असून देखील न केल्यासारखें–ह्मणजे व्यर्थ ठरणार. तें मुद्दाम केलेलें सूत्र व्यर्थ न ठरावें ह्मणून, तें सूत्र जेथें प्रवृत्त होतें तेथें स्थानिवद्भाव मानणें अयोग्य आहे.)

**तच्च सामान्यापेक्षमभ्यासकार्ये तदुत्तरखण्डादेशस्य तत्कार्यप्रतिबन्धकीभूतं स्थानिवत्त्वं नेति ।**

('अभ्यासस्यासवर्णे' हें सूत्र चरितार्थ ठरावें ह्मणून मानलेला वरील नियम –ह्मणजे स्थानिवद्भावनिषेध–त्या सूत्रापुरताच आहे असें समजूं नये. त्या सूत्रापासून निघणारा वरील नियम) सर्वसामान्य नियम आहे असें समजावें; व जेथें उत्तरखंडांतील अजादेश स्थानिवत् मानल्यास, स्थानिवद्भावामुळें, तो अभ्यासास होणाऱ्या कार्याचा प्रतिबंधक होत असेल तेथें स्थानिवद्भाव मानूं नये. (व अभ्यासास सांगितलेलें कार्य करावें.)

**अत एवारतीत्यादौ यणादेशस्य स्थानिवत्वादभ्यासस्य ढ्रलोप इति दीर्घो दुर्लभ इत्यपास्तम् । दीर्घविधौ तन्निषेधाच्च ।**

म्हणूनच 'आरति' इत्यादि स्थलीं, यणादेशाला स्थानिवद्भाव प्राप्त होत असल्यामुळें, 'ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः' सू० १७४ ह्या सुत्रानें अभ्यासाचा दीर्घ होऊं शकत नाहीं, असें जर कोणी म्हणेल तर, वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें, तें म्हणणें चुकीचें ठरतें. दुसरें असें कीं, दीर्घविधि करतेवेळीं स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. ('आरति' हें 'ऋ' धातूचें यङ्लुकाच्या लटाच्या प्रथम पुरुषाचें बहुवचन आहे. 'सूचिसूत्रिमुत्र्यट्यर्त्यशूर्णोतिभ्यो यङ् वाच्यः' ह्या २६३० सूत्रावरील वार्तिकानें 'ऋ' धातूस यङ् होऊन, 'यङोऽचि च' सू० २६५० ह्या सूत्रानें यङ्लुक् होतो. नंतर 'सन्यङोः' सू० २३९५ ह्या सूत्रानें द्विर्वचन होऊन 'ऋ+ऋ+झि' अशी स्थिति झाली असतां, 'उरत्' सू० २२४४ ह्या सूत्रानें अभ्यास ऋवर्णाचे जागीं अकार होऊन, 'उरण्रपरः' सू० ७० ह्यानें 'अ' पुढें रकारागम होऊन, व त्या रकाराचा 'हलादिःशेषः' सू० २१७९ ह्यानें लोप होऊन, व 'अदभ्यस्तात्' सू० २४७९ ह्यानें 'झ्' चें जागीं 'अत्' होऊन, 'अ+ऋ+अति' अशी स्थिति झाली असतां, 'ऋतश्च' सू० २६५३ ह्या सूत्रानें अभ्यासवर्णाला 'रुक्' आगम होऊन 'अर्+ऋ+अति' अशी स्थिति होते. अशा स्थितींत, 'ऋ' च्या पुढें 'अ' आल्यामुळें, 'इको यणचि' सू० ४७ ह्या सूत्रानें ऋकाराचें जागीं यणादेश–म्हणजे 'र्'–होऊन, 'अर्+र्+अति' अशी स्थिति झाली असतां, 'रो रि' सू० १७३ ह्या सूत्रान्वयें, रेफापुढें रेफ आल्यामुळें, पूर्व रेफाचा लोप होऊन, 'ढ्रलोपे' सू० १७४ ह्या सूत्रानें रेफापूर्वी असलेल्या 'अ' चा दीर्घ होतो, आणि 'आरति' असें रूप होतें. येथें शंकाकार अशी शंका करितो कीं, ऋकाराचें जागीं झालेला यणादेश रकार ह्याला 'अचःपरस्मिन्' सू० ५० ह्या सूत्रान्वयें स्थानिवत् मानलें पाहिजे–म्हणजे यणादेश रकार 'ऋ'च आहे असें मानलें पाहिजे–व तसें मानल्यास, 'रो रि' व 'ढ्रलोपे' हीं सूत्रें प्रवृत्त होऊं शकत नाहींत, व त्यामुळें पूर्व रकाराचा लोप व 'अ' चा दीर्घ होऊं शकत नाहीं. ह्या शंकेला उत्तर हें आहे कीं, उत्तरखंडांतील अचाचे जागीं होणारा आदेश, स्थानिवद्भाव मानल्यास, जर अभ्यासास होणाऱ्या कार्याचा प्रतिबंधक होत असेल तर, तशा ठिकाणीं स्थानिवद्भाव मानूं नये असा सर्वसाधारण नियम असल्यामुळें, 'ऋ' ह्या उत्तरखंडांतील अचाचें जागीं, झालेला यणादेश 'र्' ह्याला, स्थानिवद्भावानें, 'ऋ' असें मानतां येत नाहीं; कारण स्थानिवद्भाव मानल्यास. अभ्यासवर्णाला होणाऱ्या रलोपरूपी कार्याचा व 'अ' चा दीर्घ होणें ह्या कार्याचा तो प्रतिबंधक होईल–म्हणजे तो तीं कार्यें होऊं देणार नाहीं. म्हणून येथें स्थानिवद्भाव मानणें बरोबर नाहीं; दुसरें असें कीं, 'रो रि' हें असिद्धकाण्डांतील सूत्र असल्यामुळें, त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य करितांना, 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' ह्या वार्तिकान्वयें, स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. तसेंच 'ढ्रलोपे' ह्या सूत्रानें

दीर्घविधि करतेवेळीं, ' न पदान्त द्विर्वचन ' सू० ५१ ह्या निषेधात्मक सूत्रान्वयें, स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. )

**अरिरियाद्दित्यत्र तु स्थानिवत्त्वेनेयङ् भवत्येव । तस्य स्थानिवत्त्वस्याभ्यासकार्यप्रतिबन्धकत्वाभावात् ॥**

' अरिरियात् ' ह्या स्थलीं, आदेशाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें, 'इयङ्' होतो. येथें स्थानिवद्भाव, अभ्यासास होणाऱ्या कोणत्याहि कार्याचा प्रतिबंधक होत नसल्यामुळें, तो मानण्यास कांहीं हरकत नाहीं. ( ' अरिरियात् ' हें ' ऋ ' धातूच्या यङ्लुकाचें आशीर्लिङाचें प्रथम पुरुषाचें एकवचनाचें रूप आहे. तें असें सिद्ध होतें– ' ऋ+ऋ+यात् = अर्+ऋ+यात् = अ+ऋ+यात् = अरि+ऋ+यात् ' येथें ' ऋतश्च ' सू० २६५३ ह्या सूत्रानें अभ्यासाला 'रिक्' आगम झाला आहे. अशा स्थितींत, ' रि ' ह्यांतील इकारास ' इको यणचि ' ह्या सूत्रानें यणादेशरूपी वार्णकार्य प्राप्त झालें आहे. तसेंच ' अभ्यासस्यासवर्णे ' सू० २२९० ह्या सूत्रानें त्या इकारास इयङ्रूपी अङ्गकार्य प्राप्त झालें आहे. प्रकृतपरिभाषेप्रमाणें, अङ्गकार्य बलवत्तर असल्यामुळें, अभ्यासांतील इकाराचे जागीं इयङ् ची व तसेंच 'रिङ् शयग्लिङ्क्षु' सू० २३३७ ह्या सूत्रानें ऋचे जागीं ' रि ' ची प्रथम प्राप्ति होते. पण ' रिङ् शयक् ' हें सूत्र ' अभ्यासस्यासवर्णे ' ह्या सूत्राच्या मानानें परसूत्र असल्यामुळें, त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य प्रथम होऊन, ' अरि +रि +यात् ' अशी स्थिति झाली असतां, ' ऋ ' चे जागीं झालेल्या ' रि ' ह्या आदेशास, ' अचः परस्मिन् ' ह्या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें हा ' ऋ ' च आहे असें मानल्याशिवाय, ' अभ्यासस्यासवर्णे ' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं; आणि येथें स्थानिवद्भाव मानण्यास कांहीं हरकत नाहीं; कारण स्थानिवद्भाव अभ्यासकार्यांचा प्रतिबन्धक होत नाहीं. ह्मणून ' रि ' ह्या आदेशाला स्थानिवद्भावानें ' ऋ ' असें मानून, मागल्या ' रि ' ह्यांतील ' इ ' ला इयङादेश होतो, व ' अरिय्+रि+ यात्=अरिरियात् ' असें रूप सिद्ध होतें. )

**इयं चाङ्गसंबन्धिन्याङ्ग एवेति स्वरितो वेति सूत्रे भाष्ये । तत्र हि कुमार्यै इत्यादौ यणुत्तरमाडुक्तः ।**

ही परिभाषा, अङ्गाधिकारांत सांगितलेलें कार्य अङ्गाला–ह्मणजे अङ्गवयवाला–करणें झाल्यासच, लागू पडते असें ' स्वरितो वा ' ८–२–६ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे, व त्या भाष्यांत ' कुमार्यै ' इत्यादि स्थलीं, यणादेश झाल्यावर ' आट् ' होतो असें ह्मटलें आहे. ( अङ्गाधिकारांत अङ्गाला कार्य सांगितलें आहे, व तसेंच प्रत्ययालाहि कार्य सांगितलें आहे. जेथें अङ्गाधिकारोक्त कार्य अङ्गाला होतें तेथें ही परिभाषा लागते, पण जेथें अङ्गाधिकारोक्त कार्य प्रत्ययाला होतें तेथें ही परिभाषा लागत नाहीं. जसें:–' कुमारि+ङे=कुमारी+ए ' अशा स्थितींत, ' इको यणचि ' यानें यणादेश होऊन ' कुमार्य्+ए ' अशी स्थिति झाली असतां, ' आण्नद्याः ' सू०

२६८ ह्या सूत्रानें 'ए' ह्या प्रत्ययाला 'आट्' आगम होऊन, 'कुमार्य्+आ+ए' अशी स्थिति झाली असतां, 'आटश्च' सू० २६९ ह्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'कुमार्यै' असें रूप होतें. ह्या उदाहरणांत 'आण्नद्याः' ह्या अङ्गाधिकारांतील सूत्रानें आडागमरूपी कार्य, अङ्गाला झालें नसून, प्रत्ययाला झालें आहे. अङ्गाला तें कार्य होणें सांगितलें असतें तर, 'आट्' प्रथम होऊन मग 'इको यणचि' ह्या सूत्रानें होणारें वार्णकार्य झालें असतें; पण प्रत्ययाला वार्णकार्य झालें असल्यामुळें, प्रकृत परिभाषा येथें लागू पडत नाहीं, व अन्तरङ्ग वार्णकार्य प्रथम होऊन आडागमरूपी बहिरङ्ग अङ्गकार्य नंतर होतें. )

इयं चानित्या च्छ्वोरिति सतुग्निर्देशात् । अन्यथाङ्गत्वात्पूर्वं तुकः शादेशे तुकोऽप्राप्त्या तद्वैयर्थ्यं स्पष्टमेवेत्यन्यत्र विस्तरः ॥ ५५ ॥

'च्छ्वोः शूठ्' सू० २५६१ ह्या सूत्रांत 'च्छ्' असा सतुक निर्देश केला असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते. ही अनित्य न मानल्यास, 'च्छ्वोः शूठ्' येथील तुगागमसहित छकाराचें ग्रहण व्यर्थ ठरतें; कारण छकाराचे जागीं शकार होणें हें अङ्गाधिकारोक्त अङ्गकार्य असल्यामुळें (व 'छे च' सू० १४६ ह्या सूत्रानें होणारें कार्य वार्णकार्य असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें) 'तुक्' होण्यापूर्वींच 'छ्' चे जागीं 'श्' असा आदेश होऊन (छ् नाहींसा झाल्यामुळें, 'छे च' ह्या सूत्रानें) तुक् झालाच नसता. ( पाणिनीनें 'छ्वोः शूठ्' असें सूत्र न करितां, 'च्छ्वोः शूठ्' असें सूत्र कां केलें ? 'प्रच्छ्,' 'गच्छ्,' 'यच्छ्' इत्यादि ठिकाणीं जो सतुक्क 'छ्' सांपडतो तो 'छे च' ह्या सूत्रानें होत असतो, आणि हें वार्णकार्य आहे. 'च्छ्वोः शूठ्' ह्या सूत्रानें होणारें कार्य अङ्गकार्य असल्यामुळें, ही परिभाषा नित्य मानल्यास, ह्या परिभाषेप्रमाणें तें कार्य प्रथम होणारच. 'प्रछ्+नङ्,' 'विछ्+नङ्' इत्यादि स्थलीं 'यजयाच' सू० ३२६८ या सूत्रानें होणारा 'नङ्' प्रत्यय पुढें असतां, अङ्गकार्य प्रथम होऊन, 'च्छ्वोः शूठ्' असें सूत्र असतें तरी 'छ्' चे जागीं 'श्' होऊन 'प्रश्नः' 'विश्नः' इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकलीं असतीं, व 'छ्' चे जागीं 'श्' झाल्यावर, तुगागम प्राप्तीचा संभव नव्हता. तरी पण पाणिनीनें 'च्छ्वोः शूठ्' ह्या सूत्रांत तुगागमसहित छकाराचें ग्रहण केलें आहे. त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे–ह्मणजे केव्हां केव्हां वार्णकार्य प्रथम होऊन नंतर अङ्गकार्य होतें, व वार्णकार्य प्रथम होऊन सतुक्क 'छ्' झाल्यास, त्याचेंहि जागीं 'श्' व्हावा ह्मणून, सूत्रांत सतुक्क छग्रहण केलें आहे.) ह्या विषयाची इतर ग्रंथांत विस्तारपूर्वक चर्चा केली आहे.

# परिभाषा ५६

**नन्वेवं सेदुष इत्यादौ क्वसोरन्तरङ्गत्वादिटि ततः सम्प्रसारणेऽपीटः श्रवणापत्तिरिति चेत् । अत्र केचित् ।**

(प. ५१ ते ५६ एवढ्याच जर प. ५० च्या अपवाद मानल्या तर) 'सेदुषः' इत्यादि स्थलीं 'क्वसु' प्रत्ययाला, इडागमकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, इडागम झाल्यावर सम्प्रसारण केल्यानंतर इडागमाचें देखिल श्रवण होण्याची आपत्ति येईल— म्हणजे इडागमाचे जागीं होणारा यणादेश देखील त्या रूपांत राहण्याची आपत्ति येईल. ('सद् + लिट्' अशा स्थितींत 'भाषायां सदवसश्रुवः' सू० ३०९७ या सूत्रानें लिटाचे जागीं 'क्वसु=वस्' असा आदेश होतो व तो स्थानिवद्भावानें लिट् मानला जात असल्यामुळें, 'लिटि धातोरनभ्यासस्य' सू० २१७७ या सूत्रानें द्विर्वचन होऊन व 'अत एकहल्मध्ये' सू० २२६० या सूत्रानें अभ्यासलोप व एत्व होऊन 'सेद्+वस्' अशी स्थिति झाली असतां, 'वस्' हा वलादि आर्धधातुकप्रत्यय असल्यामुळें 'वस्वेकाजात्' सू० ३०९६ या नियमानें 'वस्' ला इडागम होऊन 'सेद्+इ+वस्=सेदिवस्' असें रूप होतें, व हा शब्द कृत्प्रत्ययान्त असल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू० १७९ या सूत्रान्वयें त्याला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते. या प्रातिपदिकास द्वितीयेच्या बहुवचनाचा 'शस्' प्रत्यय लावला असतां, 'सेदि-वस्+शस्' अशा स्थितींत 'वसोः सम्प्रसारणम्' सू० ४३५ या सूत्रानें 'वस्' यांतील वकाराला सम्प्रसारण होऊन 'सेदि+उ+अस्+शस्' अशी स्थिति झाली असतां, 'सम्प्रसारणाच्च' सू० ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'सेदि+उस्+शस् (अस्)' अशा स्थितींत 'इको यणचि' या सूत्रानें 'सेदि' यांतील इकाराचे जागीं यणादेश होऊन 'सेद्युषः' असें रूप होण्याची आपत्ति येते, व या रूपांत इकाराचे जागीं झालेला यणादेश दिसतो व 'सेदुषः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. तसें रूप सिद्ध व्हावें) म्हणून कांहीं वैयाकरण ही परिभाषा सांगतातः—

## अकृतव्यूहाः पाणिनीयाः ॥ ५६ ॥

"पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य केल्यानें जर पूर्वी प्राप्त झालेल्या अन्तरङ्ग-कार्याचें निमित्त नष्ट होत असेल तर तसें अन्तरङ्गकार्य करूं नये असें पाणिनीच्या अनुयायांचें मत आहे."

**न कृतो विशिष्ट ऊहो निश्चयः शास्त्रप्रवृत्तिविषयो यैरित्यर्थः । भावि-निमित्तविनाश इत्यध्याहारः । बहिरङ्गेणान्तरङ्गस्य निमित्तविनाशे पश्चा-त्संभावितेऽन्तरङ्गं नेति यावत् ॥**

'अन्तरङ्गशास्त्राच्या प्रवृत्तीच्या विषयांत ज्यांनीं विशिष्ट प्रकारचा निश्चय केला नाहीं' असा 'अकृतव्यूहाः' या शद्बाचा अर्थ आहे. या परिभाषेंत 'भाविनिमित्तविनाशे'

हें पद अध्याहृत करावें–ह्मणजे ' भाविनिमित्तविनाशे अकृतव्यूहाः पाणिनीयाः ' अशी परिभाषा पठित करावी,—व या परिभाषेचा अर्थ असा समजावा कीं पुढें प्राप्त होणाऱ्या बहिरङ्गकार्यानें पूर्वीं प्राप्त झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश होण्याचा संभव असेल तर तसें अन्तरङ्गकार्य करूं नये. ( अन्तरङ्गकार्य करतेवेळीं पूर्वीं झालेलें बहिरङ्गकार्य किंवा युगपत् प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य असिद्ध समजावें असें प० ५० मध्यें सांगितलें आहे. अन्तरङ्गकार्य केल्यानंतर पुढें प्राप्त होणारें बहिरङ्ग-कार्य असिद्ध समजावें असें त्या परिभाषेंत सांगितलें नसल्यामुळें, भविष्यत्–ह्मणजे पुढें प्राप्त होणारें–बहिरङ्गकार्य असिद्ध ठरत नाहीं, व तें करण्यास कोणताहि प्रत्यवाय नाहीं असें आपोआपच सिद्ध होतें. पण अन्तरङ्गकार्य केल्यावर पुढें प्राप्त होणारें बहि-रङ्गकार्य जर असें असेल कीं तें केल्यानें पूर्वीं झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश होतो किंवा होण्याचा संभव आहे तर तशा ठिकाणीं तसें अन्तरङ्गकार्य न करितां बहिरङ्गकार्यच करावें असें पाणिनीचे अनुयायी ह्मणतात. यावरून हें स्पष्ट होतें कीं अन्तरङ्गकार्य नेहमी प्रथमच झालें पाहिजे असा पाणिनीच्या अनुयायांचा आग्रह नाहीं. वर सांगितल्या प्रकारच्या बहिरङ्गकार्याची प्राप्ति झाल्यास अन्तरङ्ग-कार्य करूं नये असें त्यांचें मत आहे. दीक्षितांनीं या परिभाषेचा अर्थ ' निमित्त विनाशोन्मुखं दृष्ट्वा तत्प्रयुक्तं कार्यन्न कुर्वन्ति ' असा केला आहे, व या पंक्तीचा अर्थ देखील वर प्रमाणेंच आहे. ही परिभाषा असल्यामुळें, ' सेद्+वस् ' येथें ' वस् ' प्रत्ययाला मानून जरी इडागमरूपी अन्तरङ्गकार्य प्राप्त झालें आहे तरी पुढें 'सेद्+वस्' याला ' शस् ' प्रत्यय लावतेवेळीं त्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें ज सम्प्रसारणरूपी बहि-रङ्गकार्य होणार आहे त्या कार्यानें ' वस् ' यांतील वकाराचा उकार होऊन अन्तरङ्ग-कार्याचें निमित्त जें ' वस् ' प्रत्ययाचें वलादित्व त्याचा नाश होणार असल्यामुळें, इडागमरूपी अन्तरङ्गकार्य न करितां सम्प्रसारणरूपी बहिरङ्गकार्यच करावें; व तसें केल्यास ' सेद् + वस् + शस्=सेद् + उ + अस् + शस् ' अशा स्थितींत ' सम्प्र-सारणाच्च ' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन ' सेद् + उस् + शस् ' अशी स्थिति झाली असतां, ' आदेशप्रत्यययोः ' सू० २१२ या सूत्रानें षत्व होऊन ' सेदुष्+ अस्=सेदुषः ' असें इष्टरूप सिद्ध होतें. )

**अत्र च ज्ञापकं समर्थानां प्रथमादिति सूत्रे समर्थानामिति । तद्धि सूत्थितादिभ्यः कृतदीर्घेभ्यः प्रत्ययोत्पत्त्यर्थम् । अन्यथान्तरङ्गत्वाद्दीर्घे कृत एव प्रत्ययप्राप्त्या तद्व्यर्थता स्पष्टैव । तत्र हि भाविन्यादिवृद्ध्या सवर्णाच्-त्वविनाशः स्पष्ट एव ॥**

' समर्थानां प्रथमाद्वा ' सू० १०७२ या सूत्रांतील ' समर्थानाम् ' हें पद या परिभाषेचें ज्ञापक आहे, व तें पद त्या सूत्रांत अशाकरितां घातलें आहे कीं, 'सूत्थित' इत्यादि स्थलीं सवर्णदीर्घरूप सन्धिकार्य प्रथम केल्यावर तशा सिद्ध झालेल्या शब्दाहून प्रत्यय व्हावा. ही परिभाषा नसती तर सवर्णदीर्घकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें प्रथम

झालेंच असतें व नंतर प्रत्यय लागून प्रत्ययनिमित्तककार्य झालें असतें व वरील सूत्रांत ‘ समर्थानाम् ’ हें पद घालण्याची कांहींच गरज नव्हती. ‘सौत्थितिः’ इत्यादि उदाहरणांत पुढें आद्यचाला होणाऱ्या वृद्धीनें सवर्णदीर्घाचें निमित्त—ह्मणजे एका अचापुढें दुसरा सवर्ण ‘ अच् ’ असणें—त्या निमित्ताचा नाश होतो हें स्पष्ट आहे. ( ‘सूत्थित+ङस्+इञ्’ येथें ‘ अत इञ् ’ सू० १०९५ या सूत्रानें अपत्यार्थी ‘ इञ् ’ प्रत्यय झाला आहे व ‘ सुपो धातुप्रातिपदिकयोः ’ सू० ६५० या सूत्रानें ‘ ङस् ’ प्रत्ययाचा लुक् होतो व इञ् प्रत्यय ‘ञित्’ असल्यामुळें, ‘ तद्धितेष्वचामादेः’ सू० १०७५ या सूत्रानें आद्यचाला वृद्धि पावली आहे. ‘ सूत्थित + इञ् = सु + उत्थित + इञ् ’ या स्थलीं अलीकडे असलेल्या सवर्ण उकाररूपी निमित्तामुळें सवर्णदीर्घरूप अन्तरङ्गकार्य प्राप्त झालें आहे व त्यानंतर ‘ इञ् ’ प्रत्यय लागला असतां पलीकडे असणाऱ्या इञ्-प्रत्ययरूपी निमित्तामुळें वृद्धिरूप बहिरङ्गकार्य प्राप्त झालें आहे. ही परिभाषा नसती तर अन्तरङ्ग सवर्णदीर्घकार्य प्रथम झालेंच असतें व नंतर बहिरङ्ग वृद्धिकार्य झालें असतें व त्यामुळें ‘ समर्थानां प्रथमाद्वा ’ या सूत्रांतील ‘ समर्थानाम् ’ हें पद व्यर्थ ठरलें असतें. पण ही परिभाषा असल्यामुळें, पाणिनीला हें माहीत होतें कीं ‘ सौत्थितिः ’ इत्यादि उदाहरणांत पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असें आहे कीं, तें झाल्यानें अन्तरङ्ग-कार्याच्या निमित्ताचा नाश होणार व त्यामुळें अन्तरङ्गकार्य न होतां बहिरङ्गकार्यच होईल आणि तसें झाल्यास इष्टरूपसिद्धि होणार नाहीं. तसें न व्हावें ह्मणून, ही परिभाषा असल्यामुळें, त्याला ‘ समर्थानां प्रथमाद्वा ’ या सूत्रांत ‘ समर्थानाम् ’ हें पद मुद्दाम घालावें लागलें व त्या पदाचा अर्थ ‘ कृतसन्धिकार्याणाम् ’ असा आहे. अशा रीतीनें, ही परिभाषा असल्यामुळें, तें पद चरितार्थ होऊन या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. तें पद सूत्रांत घातलें असल्यामुळें जरी सवर्णदीर्घरूप अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा पुढें होणाऱ्या बहिरङ्ग वृद्धिकार्यानें विनाश होणार आहे तरी तें कार्य प्रथम करावें व नंतर प्रत्यय लावून प्रत्ययनिमित्तककार्य करावें असें स्पष्ट होतें. )

**न चात्रैकादेशप्रवृत्तिसमये वृद्ध्यप्राप्त्यैकादेशे कृत आदेशे वृद्धेः प्राप्तावपि तन्निमित्तविनाशाभाव इति वाच्यम् । तद्द्वारैव तन्निमित्तविनाशसत्त्वेनाक्षतेः ॥**

‘ सूत्थित ’ इत्यादि स्थलीं एकादेश होण्याचे वेळीं वृद्धीची प्राप्तीच नाहीं; एकादेश झाल्यावरच वृद्धिकार्य प्राप्त होतें, व तें कार्य (ज्या दोन सवर्ण अचांचे जागीं सवर्णदीर्घ आदेश झाला आहे त्यांपैकीं एकाहि अचाला प्राप्त होत नसून त्यांचे जागीं झालेल्या ) आदेशास जरी प्राप्त होतें तरी त्या वृद्धिरूप बहिरङ्गकार्यानें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा विनाश होत नाहीं ( विनाश आदेशाचा होतो. ह्मणून या स्थलीं सवर्णदीर्घरूप अन्तरङ्गकार्य केल्यावर ज्या वृद्धिरूप बहिरङ्गकार्याची प्राप्ति होते तें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें साक्षात् विनाशक नसल्यामुळें, अशा ठिकाणीं प्रकृतप-

रिभाषा लागूच पडत नाहीं व त्यामुळें ' समर्थानाम् ' हें पद या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं )— असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण त्या आदेशाच्या नाशानें, ज्यांचे जागीं तो आदेश झाला आहे व जे सवर्णदीर्घरूप अन्तरङ्ग-कार्याचीं निमित्तें आहेत त्यांचा नाश होतोच, व त्यामुळें आमच्या—ह्मणजे ग्रन्थका-राच्या —ह्मणण्यांत कांहीं दोष येत नाहीं. ( सारांश वरील शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं जरी वृद्धिरूप बहिरङ्गकार्यानें प्रकृत उदाहरणांत ज्या दोन सवर्ण उकारांचे जागीं दीर्घ ऊकारादेश झाला आहे त्यांचा साक्षात् नाश होत नसून सवर्ण-दीर्घ आदेशाचा—ह्मणजे ऊकाराचा——नाश होतो तरी ज्या अर्थीं तो ऊकारादेश दोन सवर्ण उकारांचे जागीं झाला आहे त्या अर्थीं त्या आदेशाच्या नाशानें, ज्यांचे जागीं तो झाला आहे त्यांचा, नाश परंपरेनें होतोच. म्हणून प्रकृत उदाहरणांत पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असें आहे कीं जें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें विनाशक होतें असें जें आम्ही वर म्हटलें आहे तें म्हणणें चूक ठरत नाहीं, व वरील उदाहरणांत प्रकृत परिभाषा लागू पडते. )

**न च सौत्थितौ बहिरङ्गतया वृद्धेरसिद्धत्वान्न तन्निमित्तविनाश इति वाच्यम् । समर्थग्रहणेनैतद्विषये तस्या अप्रवृत्तेरपि ज्ञापनात् ॥**

( पुन्हा शंकाकार अशी शंका करितो कीं ) ' सौत्थितिः ' या स्थलीं वृद्धिकार्य बहिरङ्ग असल्यामुळें असिद्ध ठरतें, आणि त्यामुळें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश सिद्ध होत नाहीं. ( शंकाकाराची शंका अशी आहे कीं, ' सूत्थित + ङस् + इञ् = सूत्थित + ० + इञ् ' या स्थलीं बहिरङ्ग वृद्धिकार्य करून ऊकाराचा औकार केल्यावर तें वृद्धिकार्य बहिरङ्ग असल्यामुळें प० ५० प्रमाणें असिद्ध ठरतें, व औकार झालाच नसून तो ऊकारच आहे असें मानतां येतें व त्यामुळें एकादेशाचा किंवा त्या एकादेशा-च्या द्वारा एकादेशाच्या निमित्ताचा नाश झाला नाहीं असें आपोआपच सिद्ध होतें. म्हणून अशा ठिकाणीं पुढें प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य पूर्वीं झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें विनाशक आहे हें म्हणणें बरोबर ठरत नाहीं.—या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ही शंका बरोबर नाहीं; कारण ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांतील ' समर्थानाम् ' या पदानें जशी प्रकृत परिभाषा ज्ञापित होते त्याचप्रमाणें त्या) 'समर्थ' पदानें हें देखील ज्ञापित होतें कीं, जेथें ही परिभाषा लागते तेथें अन्तरङ्गपरिभाषा—प० ५०-प्रवृत्त होऊं शकत नाहीं. ( कारण ' यावता विना न चारितार्थ्यं तत्कल्पनीयम् ' या न्यायान्वयें, ' समर्थानाम् ' हें पद चरितार्थ ठरण्याकरितां जेवढ्या गोष्टी मानणें आवश्यक आहे तेवढ्या सर्व मानल्याच पाहिजेत. जेथें प्रकृत परिभाषा लागते तेथें अन्तरङ्गपरिभाषा देखील लागते असें मानल्यास, ' समर्थानाम् ' हें पद व्यर्थ ठरेल; कारण अन्तरङ्गकार्यांच्या निमित्ताचें विनाशक बहिरङ्गकार्य पुढें प्राप्त झाल्यास तें असिद्ध ठरतें असें मानलें तर, ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांत ' समर्थानाम् ' हें पद नसलें तरी सवर्णदीर्घ कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें प्रथम होईलच, व तें झाल्यावर बहिरङ्ग

कार्यानें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा विनाश झाला असला तरी तें कार्य प. ५० प्रमाणें असिद्ध ठरत असल्यामुळें, अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश झालाच नाहीं असें मानतां येतें. मग ' समर्थानाम् ' हें पद सूत्रांत घालण्याची गरज काय होती ? पण ज्या अर्थी तें पद सूत्रांत मुद्दाम घातलें आहे त्या अर्थी हें देखील मानणें भाग आहे कीं, जेथें प्रकृतपरिभाषा लागू पडते तेथें अतरङ्गपरिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. )

**यत्तु समर्थग्रहणेनान्तरङ्गपरिभाषाया अनित्यत्वमेव ज्ञाप्यत इति । तन्न । असिद्धपरिभाषया समकालप्राप्तबहिरङ्गस्य पूर्वजातबहिरङ्गस्य चान्तरङ्गे कर्तव्येऽसिद्धत्वं बोध्यते न तु जातेऽन्तरङ्गे तस्य तत्वं बोध्यते मानाभावात् फलाभावाच्च । एवं च सूत्थितादावेकादेशस्य परिभाषा-साध्यत्वाभावेन तदनित्यत्वज्ञापनासम्भवात् ॥**

( पुन्हां शंकाकार अशी शंका करतो कीं ) ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांतील 'समर्थानाम्' या पदानें ( प्रकृतपरिभाषा ज्ञापित न होतां, ) अन्तरङ्गपरिभाषा अनित्य आहे एवढेंच ज्ञापित होतें. ( व ती अनित्य असल्यामुळें, कोठें कोठें जसें अन्तरङ्गकार्य प्रथम होतें तसें बहिरङ्गकार्य देखील प्रथम होतें. त्यामुळें ' सु+उत्थित+इञ् ' या स्थलीं आद्यच्वृद्धिरूप बहिरङ्गकार्य प्रथम केल्यास, ' सौ + उत्थित + इञ् ' अशा स्थितींत ' एचोऽयवायावः ' सू० ६१ या सूत्रानें ' औ ' चे जागीं 'आव्' असा आदेश होऊन व ' यस्येति च ' सू० ३११ या सूत्रानें ' उत्थित ' यांतील अन्त्य अकाराचा लोप होऊन ' सावुत्थितिः ' असें विकृत रूप होईल व ' सौत्थितिः ' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं तसें न व्हावें व अन्तरङ्ग सन्धिकार्यच प्रथम करावें आणि त्यानंतर ताद्धितप्रत्यय लावून प्रत्ययनिमित्तक बहिरङ्ग वृद्धिकार्य करावें हें सांगण्याकरितां वरील सूत्रांत ' समर्थ ' पदाचें ग्रहण केलें आहे, व अशा रीतीनें त्या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें पद प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं–अशी शंकाकारानें शंका केली असतां ग्रन्थकार म्हणतात कीं ) ही शंका बरोबर नाहीं; कारण अन्तरङ्ग-परिभाषेनें पूर्वीं झालेलें किंवा युगपत् प्राप्त असलेलेंच बहिरङ्गकार्य असिध्द ठरतें; अन्त-रङ्गकार्य होऊन गेल्यानंतर पुढें प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य त्या परिभाषेनें असिद्ध ठरत नाहीं. कारण तसें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं व तसें मानल्यानें–म्हणजे पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असिद्ध मानल्यानें–कोणतेंहि फल निष्पन्न होत नाहीं. ( पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असिध्द मानल्यानें इष्टरूपसिद्धि होण्यांत मदत होत असेल व तसें न मानल्यानें इष्टरूपसिद्धि होऊं शकत नसेल तरच तें कार्य असिद्ध मानण्यांत फायदा आहे. पण वस्तुस्थिति तशी नसल्यामुळें, पुढें प्राप्त होणाऱ्या बहिरङ्ग-कार्यास असिद्ध मानण्याची कांहींच गरज नाहीं. सारांश वर सांगितल्याप्रमाणें अन्तरङ्ग परिभाषा दोनच ठिकाणीं–म्हणजे (१) जेथें पूर्वीं बहिरङ्ग कार्य होऊन गेलें आहे व (२) जेथें बहिरङ्गकार्याची युगपत् प्राप्ति आहे तेथेंच–उपस्थित होत असल्यामुळें, 'सूत्थित'

इत्यादि स्थलीं एकादेश करतेवेळीं अन्तरङ्ग परिभाषेची उपस्थितीच होत नाहीं; कारण ‘ सु+उत्थित’ या ठिकाणीं सन्धिकार्य करतेवेळीं कोणतेंहि बहिरङ्गकार्य प्राप्त होत नसतें. सन्धिकार्य झाल्यानंतरच ‘इञ्’ प्रत्यय लागतो व त्यावेळीं बहिरङ्गकार्याची प्राप्ति होते ) म्हणून ‘सूत्थित’ इत्यादि स्थलीं एकादेश प्रथम होण्याकरितां अन्तरङ्गपरिभाषेच्या सहाय्याची कोणत्याहि रीतीनें गरज पडत नसल्यामुळें, ‘समर्थ’ या पदानें अन्तरङ्गपरिभाषेचें अनित्यत्व ज्ञापित होऊं शकत नाहीं. ( सारांश ‘ सौत्थितिः ’ इत्यादि उदाहरणांत पुढें प्राप्त होणारें आयच्वृद्धिरूप बहिरङ्गकार्य जर अन्तरङ्गपरिभाषेनें असिद्ध मानतां आलें असतें व त्यामुळें ‘ सौत्थितिः ’ इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकलीं नसतीं तर तशीं रूपें सिद्ध होण्याकरितां अन्तरङ्ग परिभाषा अनित्य मानण्याची गरज पडली असती. पण ‘ सौत्थितिः ’ इत्यादि उदाहरणें अन्तरङ्गपरिभाषेच्या कक्षेंत येत नसल्यामुळें—ह्मणजे त्यांना अन्तरङ्गपरिभाषा मुळींच लागू पडत नसल्यामुळें—‘ समर्थ ’ पदग्रहणानें त्या परिभाषेचें अनित्यत्व ज्ञापित होतें हें म्हणणें बरोबर नाहीं. )

**अन्तरङ्गानपि विधीनित्यादेरप्यस्यामेवान्तर्भावः । एतत्प्रवृत्तौ च निमित्तविनाशसम्भावनापि निमित्तम् । अत एव गोमद्ण्डीत्यादौ हल्ङ्यादिलोपो न । अन्यथा हल्ङ्यादिलोपकाले सामासिकलुकोऽप्राप्त्या तदुत्तरं चापहार्याभावादप्राप्त्या लोपस्यैवापत्तेः । अस्ति चात्रापि यदि लोपो न स्यात्तर्हि लुक् स्यादिति सम्भावना ।**

‘ अन्तरङ्गानपि विधीन् ’ इत्यादि परिभाषा—ह्मणजे परिभाषा ५२ व ५४ या—प्रकृतपरिभाषेंत अन्तर्भूत होतात. ( त्यामुळें त्या दोन परिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं. प्रकृत परिभाषा मानल्यानें त्या दोन्ही परिभाषा गतार्थ ठरतात. ह्मणून त्या दोन परिभाषा न मानतां त्यांच्या ऐवजीं ही एकच परिभाषा मानण्यांत लाघव आहे हें उघड आहे. आतां प्रकृतपरिभाषा मानल्यानें ‘ अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुग्बाधते ’—प ५२— ही परिभाषा कशी गतार्थ होते हें ग्रन्थकार सांगतात ) प्रकृतपरिभाषा प्रवृत्त होण्याकरितां ( अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा साक्षात् किंवा परंपरेनें नाश झाला पाहिजे अशी आवश्यकता नसून, ) पुढें प्राप्त होणाऱ्या बहिरङ्गकार्यानें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश होण्याचा संभव आहे एवढें देखील कारण पुरें आहे. ( जेथें नंतर प्राप्त झालेलें बहिरङ्गकार्य केल्यानें पूर्वीं झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा साक्षात् किंवा परंपरेनें नाश होतो तेथें तर ही परिभाषा लागू पडतेच; पण जेथें तसें बहिरङ्गकार्य केल्यानें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश होण्याचा संभव आहे तेथें देखील ही परिभाषा प्रवृत्त होते. ‘ सेदुषः ’ या स्थलीं पूर्वीं झालेल्या इडागमरूपी अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा, पुढें प्राप्त होणाऱ्या सम्प्रसारणरूप बहिरङ्गकार्यानें साक्षात् नाश होतो. ‘ सौत्थितिः ’ या स्थलीं पूर्वीं झालेल्या अन्तरङ्ग सवर्णदीर्घादेशाचा पुढें प्राप्त होणाऱ्या वृद्धिरूप बहिरङ्गकार्यानें पर-

परंपरेनें–ह्मणजे आदेशाच्या नाशाच्या द्वारा–नाश होतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे; व तशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा उपस्थित होतेच. आतां ग्रन्थकार, जेथें पुढें प्राप्त झालेल्या बहिरङ्गकार्यानें अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश होण्याचा संभव आहे तेथें देखील ही परिभाषा प्रवृत्त होते, याचें उदाहरण देतात. ) ही परिभाषा प्रवृत्त होण्यास वर दिलेलें कारण देखील पुरेसें असल्यामुळें, ‘ गोमद्दण्डी ’ इत्यादि उदाहरणांत ‘ हल्ङ्याब्भ्यः ’ सू० २५२ या सूत्रानें ‘ सु ’ लोप होत नाहीं. वर दिलेलें कारण प्रकृतपरिभाषेची प्रवृत्ति होण्याकरितां पुरे नाहीं ( व जेथें पुढें प्राप्त होणाऱ्या बहिरङ्गकार्यानें पूर्वी झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा साक्षात् किंवा परंपरेनें नाश होतो तेथेंच ही परिभाषा प्रवृत्त होते ) असें मानल्यास, ‘ हल्ङ्याब्भ्यः ’ या सूत्रानें ‘ सु ’ लोपरूपी अन्तरङ्गकार्य करतेवेळीं ‘ सुपो धातुप्रातिपदिकयोः ’ सू० ६५० या सूत्रानें समासाच्या निमित्तामुळें होणाऱ्या बहिरङ्ग ‘ सु ’ लुक् कार्याची प्राप्तीच नसल्यामुळें, ‘ सु ’ लोप प्रथम झाल्यावर, ज्या ‘ सु ’ चा ‘ लुक् ’ होणें आहे तो ‘ सु ’ राहत नसल्यामुळें ‘ सु ’ लुक्ची प्राप्तीच होणार नाहीं, व त्यामुळें, ‘ सु ’ लोप जसाचा तसा कायम राहण्याची आपत्ति येईल ‘ गोमद्दण्डी ’ या स्थलीं देखील, लोप न झाला तर लुक् होईल अशी संभावना–संभव–आहे ( ‘ गोमत्+सु ’ हा शब्द समासाचा अवयव झाला नसून त्याला समासाचा अवयव करणें आहे अशा स्थितींत तो समासाचा अवयव अजून झाला नसल्यामुळें, ‘ हल्ङ्याब्भ्यः ’ या सूत्रानें केवळ ‘ सु ’ लोपाची प्राप्ति आहे. हें कार्य करतेवेळीं ‘ सुपो धातुप्रातिपदिकयोः ’ या सूत्रानें होणाऱ्या समासनिमित्तक ‘ सु ’ लुक्ची प्राप्तीच नाहीं. पण जर त्याला समासाचा अवयव करणें आहे तर तसें करण्यापूर्वी जर प्रथम ‘ सु ’ लोप केला व नंतर तो शब्द समासाचा अवयव केला तर तेव्हांच ‘ सु ’ लुक्ची प्राप्ति आहे. पण ‘ सु ’ लोप प्रथम केला असल्यामुळें, ज्या ‘ सु ’ चा ‘ लुक् ’ करणें आहे त्याचा पूर्वीच लोप झाला असल्यामुळें ‘ सु ’ लुक् होणार नाहीं, व ‘ सु ’ लुक् न झाल्यास, ‘ सु ’ लोप कायम राहून ‘प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्’ सू० २६२ हें सूत्र प्रवृत्त होईल व त्यामुळें ‘ अत्वसन्तस्य चाधातोः ’ ४२५ या सूत्रानें उपधादीर्घ होऊन व ‘उगिदचां सर्वनामस्थाने’ सू० ३६१ या सूत्रानें नुमागम होऊन ‘गोमान्दण्डी’ असें विकृत सामासिक रूप होण्याची आपत्ति येईल. ‘ प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ’ हें सूत्र लावल्यानें, ‘ सु ’ चा जरी लोप झाला आहे तरी तो कायमच आहे असें मानतां येते व त्यामुळें ‘ सु ’ लुक् करतां येतो–असें कोणीं म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ज्या ठिकाणीं तें सूत्र लागतें तेथें स्थानिवद्भाव मानतांच येत नाहीं, असा ‘ प्रत्ययलक्षण ’ ग्रहणानें नियम सिद्ध झाला आहे. ‘सु’ लोप न केला तर ‘सु’ लुक् होणारच आहे अशी संभावना प्रकृत स्थलीं असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा येथें लागू पडते व ‘सु’ लुक्रूपी बहिरङ्गकार्य ‘सु’ लोपरूपी अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें–म्हणजे ‘सु’ चें–विनाशक असल्यामुळें, ‘सु’ लोप न होतां, ‘सु’ लुक् बहिरङ्ग असूत देखील तोच होतो, व तो ‘सु’ लुक्

झाला म्हणजे, 'न लुमताङ्गस्य' सू० २६३ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व त्यामुळें उपधादीर्घ व नुमागम न होतां, 'गोमद्दण्डी' असें इष्ट सामासिक रूप सिद्ध होतें. सारांश, 'अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुग्बाधते' ही परिभाषा प्रकृत परिभाषेनें कशी गतार्थ होते याचें आतांपर्यंत विवरण केलें. 'अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो ल्यप् बाधते' ही परिभाषा प्रकृतपरिभाषेनें कशी गतार्थ होते याचें ग्रन्थांत उदाहरण देऊन स्पष्टीकरण केलें नसल्यामुळें, तें स्पष्टीकरण होण्याकरितां आपण 'प्रजग्ध्य' हें उदाहरण घेऊं. 'अद्+क्त्वा' अशा स्थितींत, तादि कित् 'क्त्वा' प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'अदो जग्धिः' सू० ३०८० या सूत्रानें 'अद्' चे जागीं 'जग्घ्' असा आदेश पावला आहे. हा आदेश पावतेवेळीं 'क्त्वा' चे जागीं समासनिमित्तक ल्यबादेशरूप बहिरङ्गकार्याची प्राप्ति नाहीं. 'कुगतिप्रादयः' सू० ७६१ या सूत्रान्वयें धातूचा गतीशीं समास झाल्यावरच 'समासेऽनञ्पूर्वे' सू० ३३३२ या सूत्रानें तो आदेश प्राप्त होतो. हें ल्यबादेशरूपी बहिरङ्गकार्य असें आहे कीं तें केल्यानें 'अद्' चे जागीं होणाऱ्या जग्धादेशरूपी अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा–म्हणजे तादि कित् 'क्त्वा' प्रत्ययाचा नाश होणार आहे. म्हणून प्रकृत परिभाषा येथें लागू पडते, व त्यामुळें 'क्त्वा' चे जागीं ल्यबादेश करण्यापूर्वीं 'अद्' चे जागीं 'जग्ध्' असा आदेश करतां येत नाहीं. प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ल्यबादेशरूपी कार्य बहिरङ्ग असून देखील अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें विनाशक असल्यामुळें तेंच प्रथम केलें पाहिजे व तें प्रथम केलें असतां, 'अद्' च्या पुढें तादि कित् प्रत्यय राहत नसल्यामुळें, 'अद्' चे जागीं 'जग्ध्' असा आदेश होऊं शकणार नाहीं. पण तसा आदेश होणें इष्ट असल्यामुळें 'अदो जग्धिः' या सूत्रांत पाणिनीनें मुद्दाम 'ल्यप्' ग्रहण केलें आहे, व अशा रीतीनें तें ल्यप्ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरत असल्यामुळें, प० ५४ गतार्थ–ह्मणजे निरर्थक–ठरते. )

**अल्लोपोन इति सूत्रस्थतपरकरणं तु परिभाषाऽनित्यत्वज्ञापनेन चरितार्थम्। तद्धयान इत्यादौ लोपवारणाय। अन्यथा दीर्घाभावे लोपसम्भावनयैतत्परिभाषाबलाद्दीर्घाप्राप्तौ तद्वैयर्थ्यं स्पष्टमेवेत्याहुः॥**

'अल्लोपोऽनः' सू० २३४ या सूत्रांत 'अत्' अशा तऱ्हेनें अकार तपर उच्चारला आहे; हें तपरकरण, प्रकृतपरिभाषा अनित्य आहे याचें, ज्ञापक होय व अशा रीतीनें तें तपरकरण चरितार्थ ठरतें. 'आनः' इत्यादि स्थलीं आकाराचा लोप न व्हावा म्हणून तें तपरकरण केलें आहे. ही परिभाषा अनित्य नसून नित्य आहे असें मानल्यास 'अन्' यांतील अकाराचा दीर्घ न केला तर त्या अकाराचा लोप होण्याची सभावना असल्यामुळें, प्रकृत उदाहरणास ही परिभाषा लागू पडते व त्यामुळें अकाराचा आकार होणें या दीर्घ कार्याची प्राप्तीच होऊं शकत नसल्यामुळें, तें तपरकरण व्यर्थ ठरतें असें कित्येक वैयाकरण ह्मणतात. ( 'क्विप्च' २९८३ या सूत्रानें 'अन्' धातूस क्वि

प्रत्यय झाला असतां, 'अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति' सू० २६६६ या सूत्रानें 'अन्' यांतील उपधादीर्घ होऊन 'आन्' असें रूप होतें व या कृदन्त शब्दास 'कृत्तद्धितसमासाश्च' सू० १७९ या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते. या प्रातिपदिकास द्वितीयाविभक्तीच्या बहुवचनाचा 'शस्' प्रत्यय लावल्यावर 'आन्+शस्=आन्+अस्' अशी स्थिति झाली असतां, 'अल्लोपोऽनः' या सूत्रांत तपरकरण केलें नसतें तर, 'अ' हा अठराहि प्रकारच्या अकाराचा वाचक असल्यामुळें, 'आन्' यांतील आकाराचा लोप झाला असता व 'नः' असें विकृत रूप झालें असतें. तसें न व्हावें ह्मणून 'अत्' असें तपरकरण केलें आहे, व अशा रीतीनें तें तपरकरण चरितार्थ ठरतें. परंतु 'आन्+शस्=अन्+क्विप्+अस्' अशा स्थितींत 'क्विप्' या अलीकडच्या प्रत्ययाला मानून प्राप्त झालेलें उपधादीर्घरूप कार्य अन्तरङ्ग आहे व पलीकडे असलेल्या 'शस्' प्रत्ययाला मानून होणारें अलोपरूपी कार्य बहिरङ्ग आहे. पण हें बहिरङ्गकार्य असें आहे कीं, तें केल्यानें उपधादीर्घरूपी अन्तरङ्गकार्याचें निमित्त जो अकार त्याचा नाश होण्याची संभावना आहे. त्यामुळें या उदाहरणांत प्रकृतपरिभाषा लागू पडते आणि ही परिभाषा लावून अलोपरूपी बहिरङ्गकार्य प्रथम केल्यास, 'अल्लोपोऽनः' या सूत्रांत तपरकरण असलें किंवा नसलें तरी 'नः' असेंच विकृतरूप होईल. म्हणून त्या सूत्रांत केलेलें तपरकरण व्यर्थ ठरतें. पण तें तपरकरण मुद्दाम केलें असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा अनित्य आहे असें ज्ञापित होतें—म्हणजे ती कोठें कोठें लागते व कोठें कोठें लागत नाहीं असें ज्ञापित होतें; व ती अनित्य असल्यामुळें उपधादीर्घरूप अन्तरङ्गकार्य प्रथम होतें आणि तें कार्य झाल्यावर लोपरूपी बहिरङ्गकार्य करतेवेळीं आकाराचा लोप होऊं नये म्हणून 'अल्लोपोऽनः' या सूत्रांत अकार 'अत्' अशा रीतीनें तपर करून उच्चारला आहे व 'तपरस्तत्कालस्य' सू० १५ या सूत्रान्वयें तो तपर केलेला अकार ऱ्हस्व अकाराचाच वाचक होतो व दीर्घ अकाराचा—म्हणजे आकाराचा—वाचक होत नाहीं.)

**समर्थानामिति सूत्रे कैयटस्तु समर्थवचनेनेयं परिभाषा ज्ञाप्यते अकृतव्यूहाः पाणिनीया इति। तेन पपुष इत्यादावन्तरङ्गत्वात्पूर्वं कृतोऽपीडागमो निवर्तत इति वदन्न कृतो व्यूहो विशिष्टस्तर्को निमित्तकारणविनाशेऽपि कार्यस्थितिरूपो यैरित्यर्थमभिप्रैति। निमित्तापाये नैमित्तिकस्याप्यपाय इति यावत्। सूत्थितादिभि वृद्धौ दीर्घनिवृत्तौ सावुत्थितिमाभूदिति समर्थानामिति॥**

('निमित्तं विनाशोन्मुखं दृष्ट्वा तत्प्रयुक्तं कार्यं न कुर्वन्ति' असा जो भट्टोजी दीक्षितांनी या परिभाषेचा अर्थ केला आहे त्या अर्थाला धरून आतांपर्यंत ग्रन्थकारांनीं प्रकृतपरिभाषेचें विवेचन केलें. आतां कैयटानें या परिभाषेचा अर्थ कसा केला आहे हें ग्रन्थकार सांगतात. वास्तविक ग्रन्थकारास दीक्षितांचें किंवा कैयटाचें ह्मणणें मान्य नसून, त्याच्या मताप्रमाणें प्रकृतपरिभाषा नाहींच, व ती न मानली तरी इष्टरूपें सिद्ध होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं असें ग्रन्थकार लौकरच पुढें सांगणार आहे.)

' समर्थानां प्रथमाद्वा ' ४–१–८२ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें ह्मटलें आहे कीं, ' समर्थ ' या पदानें ' अकृतव्यूहाः ' ही परिभाषा ज्ञापित होते, व ही परिभाषा असल्यामुळें, 'पपुषः' इत्यादि स्थलीं इडागमरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें प्रथम केलें तरी निवृत्त—नाहींसें–होतें. असें सांगून, कैयट ' अकृतव्यूहाः' या पदाचा अर्थ असा करतो कीं ' कारण नष्ट झालें तरी कार्य राहूं शकतें या संबंधानें ज्यानीं विशेष विचार केला नाहीं' ते ' अकृतव्यूह ' होत, व तो या परिभाषेचा अर्थ ' कारण नष्ट झालें असतां, कार्य नष्ट होतें ' असा करतो. ( कारण नष्ट झालें तर कार्य नष्ट होतेंच असा कांहीं सार्वत्रिक नियम नाहीं; कारण घट निर्माण करणारा कुंभार व ज्या चक्रदण्डादिकांच्या सहायानें तो घट निर्माण करतो हे सर्व नष्ट झाले तरी त्यांच्या बरोबर घट नष्ट होत नाहीं. या गोष्टीचा पाणिनीच्या अनुयायांनीं विचार न करितां, कारण नष्ट झालें म्हणजे कार्य नष्ट होतें असें ह्मटलें असल्यामुळें ते 'अकृतव्यूह' होत असें कैयटाचें म्हणणें आहे. त्याच्या मताप्रमाणें अन्तरङ्गकार्य प्रथम होऊन गेल्यावर जेव्हां अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश करणाऱ्या बहिरङ्गकार्याची प्राप्ति होते तेव्हां तें बहिरङ्गकार्य करतेवेळीं, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, अन्तरङ्गकार्याची निवृत्ति करावी–म्हणजे पूर्वी होऊन गेलेलें अन्तरङ्गकार्य नाहींसें करावें. असें म्हणण्याचें कारण हें कीं, अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं अन्तरङ्गकार्यनिमित्तविनाशक बहिरङ्गकार्याची प्राप्तीच नसल्यामुळें व तें कार्य पुढें प्राप्त होणारें असल्यामुळें, अन्तरङ्ग कार्य होणें थांबूं शकत नाहीं व तें प्राप्त झाल्याबरोबर होऊन जातें, व पुढें जेव्हां त्या झालेल्या अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें विनाशक बहिरङ्गकार्य प्राप्त होऊन तें कार्य करण्याची वेळ येते तेव्हां पूर्वी झालेलें अन्तरङ्गकार्य निवृत्त—नष्ट—होतें. याच्या उलट दीक्षिताचें असें म्हणणें आहे कीं, अन्तरङ्गकार्य करतेवेळीं जर आपणास हें माहीत आहे कीं, तें कार्य केल्यावर अन्तरङ्गकार्य-निमित्तविनाशक बहिरङ्गकार्याची प्राप्ति होणार आहे तर, अन्तरङ्गकार्य प्रथम करून नंतर तें नाहींसें करण्यापेक्षां, 'प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम्' या न्यायान्वयें, अन्तरङ्गकार्य न करितां बहिरङ्गकार्यच करावें हें मानण्यांत लाघव आहे. आणि म्हणूनच दीक्षितांनीं ' अकृतव्यूहाः ' या पदाचा अर्थ ' अन्तरङ्गकार्यच प्रथम व्हावें असा ज्यांनीं विशिष्ट प्रकारचा निश्चय केला नाहीं–म्हणजे आग्रह धरला नाहीं '–असा केला आहे. या वरील दोन मतांपैकीं कोणतेंहि मत स्वीकारलें तरी अखेर परिणामांत कांहीं फरक पडत नाहीं; कारण दोहोंच्याहि मतें पुढें प्राप्त होणारें अन्तरङ्गकार्यनिमित्तविनाशक बहिरङ्गकार्य अन्तरङ्गकार्याचें बाधक ठरतें. तथापि दोहोंच्या मतांत काय फरक आहे हें लक्षांत यावें म्हणून वरील विवेचन केलें आहे. ' पपुषः ' या उदाहरणांत 'पा' धातूस लिट् लावला असतां, ' क्वसुश्च ' सू० ३०९५ या सूत्रानें लिटाचे जागीं ' क्वसु= वस् ' असा आदेश झाल्यावर द्विर्वचन व अभ्यासऱ्हस्व होऊन ' पपा+वस् ' अशी स्थिति झाली असतां, ' वस्वेकाजाद्धसाम् ' सू० ३०९६ या सूत्रानें ' वस् ' ला इडागम होऊन ' पपा+इ+वस् ' अशी स्थिति झाल्यावर ' आतो लोप इटि च ' सू० २३७२

या सूत्रानें ' पा ' यांतील आकाराचा लोप होऊन ' पप् + इ + वस्= पपिवस् ' असें रूप होतें. ' पपिवस् ' या कृदन्त प्रातिपदिकास द्वितीयेच्या बहुवचनाचा ' शस् ' प्रत्यय लावला असतां, ' पपिवस् + शस् ' अशा स्थितींत ' वसोः सम्प्रसारणम् ' सू० ४३५ या सूत्रानें ' वस् ' प्रत्ययांतील वकारास सम्प्रसारण होऊन ' पपि+उ+अस् + शस् ' अशा स्थितींत 'सम्प्रसारणाच्च' सू० ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन पपि+उस् + शस् = पपि+उस्+अस् ' अशी स्थिति होते. ' वस् ' प्रत्ययाला मानून झालेलें पूर्वकालिक इडागमरूपी कार्य अन्तरङ्ग आहे व ' शस् ' प्रत्ययास मानून नंतर होणारें सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग आहे. हें बहिरङ्ग सम्प्रसारणकार्य असें आहे कीं तें झालें असतां इडागमरूपी अन्तरङ्गकार्याचें निमित्त जें 'वस् 'प्रत्ययाचें वलादित्व त्याचा नाश करितें. म्हणून ' कारणनाशे कार्यनाशः ' या न्यायान्वयें इडागमाच्या कारणाचा नाश झाल्यामुळें इडागमाचाहि नाश होऊन ' पप् +उस् + अस्' अशा स्थितींत षत्व होऊन ' पपुषः ' असें रूप सिद्ध होतें असें कैयटाचें म्हणणें आहे. या मताप्रमाणें प्रकृतपरिभाषेचा जो प्रथम अर्थ केला आहे त्यांत थोडा फरक करून परिभाषेचा अर्थ ' पुढें होणाऱ्या बहिरङ्गकार्यानें पूर्वी झालेल्या अन्तरङ्गार्याचें निमित्त नष्ट होत असेल तर पूर्वी झालेलें अन्तरङ्गकार्य देखील नष्ट होतें' असा केला पाहिजे.) ' सूत्थित ' शब्दाहून ' इञ् ' प्रत्यय केला असतां, वृद्धि झाल्यावर सवर्णदीर्घादेशाची निवृत्ति होऊन ' सावुत्थितिः' असें विकृत रूप होण्याची आपत्ति येईल, ती न यावी म्हणून ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांत ' समर्थ ' पद घातलें आहे. ( ' सु+उत्थित= सूत्थित ' याला अपत्यार्थे ' इञ् ' प्रत्यय लावला असतां ' तद्धितेष्वचामादेः ' सू० १०७५ या सूत्रानें वृद्धि होऊन व ' यस्येति च ' सू० ३११ या सूत्रानें अकारलोप होऊन ' सौत्थितिः ' असें रूप होतें पूर्वकालिक सवर्णदीर्घादेशाच्या मानानें नंतर झालेलें वृद्धिकार्य बहिरङ्ग आहे व हें बहिरङ्ग वृद्धिकार्य सवर्णदीर्घ ऊकाराचा व त्याच्या द्वारा सवर्णदीर्घरूपी अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचा नाश करणारें आहे. म्हणून 'निमित्तापाये नैमित्तिकापायः ' या न्यायान्वयें पूर्वी झालेल्या सन्धिरूप अन्तरङ्गकार्याचा नाश होऊन पुन्हा 'सु+उत्थित+इञ् ' अशी स्थिति झाली असतां, आद्यचाला वृद्धि होऊन ' सौ + उत्थित + इञ्=सावुत्थित + इञ् = सावुत्थितिः ' असें विकृत रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरितां पाणिनीनें 'समर्थानां प्रथमाद्वा' या सूत्रांत मुद्दाम ' समर्थ ' हें पद घातलें आहे व त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, पाणिनीच्या मताप्रमाणें सन्धिकार्य केल्यानंतरच प्रत्यय लावावा व प्रत्ययनिमित्तक कार्य करावें. त्यामुळें प्रत्ययनिमित्तक कार्यानें सन्धिकार्याच्या निमिताचा नाश झाला तरी सन्धिकार्य नष्ट होत नाहीं असें ज्ञापित होतें. )

**लोकन्यायसिद्धश्चायमर्थः । तथा हि । लोके निमित्तं द्विविधं दृष्टम् । कार्यस्थितौ नियामकं तदनियामकं च । आद्यं यथा न्यायनयेऽपेक्षाबुद्धिस्तन्नाशे द्वित्वनाशाभ्युपगमात् । वेदान्तिनये प्रारब्धस्य विक्षेपस्थि-**

तिनियामकत्वं च प्रसिद्धमेव । द्वितीयं यथा दण्डादि, तन्नाशेपि घटनाशादर्शनात् । शास्त्रे लक्ष्यानुरोधाद्व्यवस्था ॥ भाविनिमित्तविनाशे पूर्वमनुत्पत्तौ तु न कश्चिन्न्यायो नापि संप्रतिपन्नो दृष्टान्तः । समर्थानामित्यस्यापि लोकसिद्धार्थज्ञापनेन चारितार्थ्यसम्भवे लोकासिद्धापूर्वतादृशार्थज्ञापकत्वे मानाभाव इति तदाशय इति बोध्यम् ॥

( कैयटाचें म्हणणें असें आहे कीं, त्यानें या परिभाषेचा जसा अर्थ केला आहे तसा ) अर्थ लौकिकन्यायानेंच सिद्ध होतो. तो अर्थ लौकिकन्यायानें कसा सिद्ध होतो हें आतां कैयट सांगतात. ) लौकिकव्यवहारांत दोन प्रकारचें कारण दिसून येतें. एक प्रकारचें कारण असें असतें कीं जो पर्यंत तें असतें तो पर्यंतच त्याच्यापासून झालेलें कार्य अस्तित्वांत राहतें. ( व त्या कारणाचा नाश झाला कीं त्याच्याबरोबर लगेंच त्याच्यापासून झालेल्या कार्याचाहि नाश होतो. ) दुसऱ्या प्रकारचें कारण असें असतें कीं त्याचा नाश झाला तरी त्याच्यापासून झालेल्या कार्याचा नाश होत नाहीं. पहिल्या प्रकारच्या कारणाचें उदाहरण न्यायशास्त्रांत सांगितलेली अपेक्षाबुद्धि होय. अपेक्षाबुद्धीचा नाश झाला कीं तिच्याबरोबर तिच्यापासून उत्पन्न झालेल्या द्वित्वाचाहि नाश होतो. ( हा एक व हा दुसरा अशी जेव्हां बुद्धि होते तेव्हां तशा बुद्धीपासून द्वित्वाचा उदय होतो. तशी बुद्धि जो पर्यंत कायम आहे तों पर्यंत द्वित्व राहतें. ती बुद्धि नष्ट झाली कीं द्वित्वहि नष्ट होतें. भाषापरिच्छेदांत असें म्हटलें आहे कीं ' द्वित्वादयः परार्यान्ता अपेक्षाबुद्धिजा मताः । अनेकाश्रयपर्याप्ता एते तु परिकीर्तिताः । अपेक्षाबुद्धिनाशाच्च नाशस्तेषां निरूपितः । ) प्रारब्ध जो पर्यंत कायम आहे तों पर्यंत विक्षेप--म्हणजे संसार--कायम राहतो हें पहिल्या प्रकारच्या कारणाचें वेदान्तशास्त्रांतील प्रसिद्ध उदाहरण आहे ( कर्मापासून संसाराची उत्पत्ति होते व कर्म नष्ट झालें कीं त्याबरोबर संसाराचाहि नाश होतो. कर्म नष्ट होण्यास ज्ञानप्राप्ति हा एकच उपाय वेदान्तशास्त्रांत सांगितला आहे, व ज्ञान उत्पन्न होतांक्षणींच कर्मांचा नाश व त्याबरोबर संसाराचाहि लय होतो. ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ' व ' यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥ ' ही या विषयासंबंधाची भगवदुक्ति प्रसिद्धच आहे. ) दुसऱ्या प्रकारच्या कारणाचें उदाहरण दण्डादिक होत. त्यांचा नाश झाला तरी त्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या घटाचा नाश होत नाहीं. ( सारांश लौकिकव्यवहारांत वर सांगितल्याप्रमाणें दोन प्रकारचीं कारणें असल्यामुळें व कारणाचा नाश झाला तरी नेहमी कार्यनाश होत नसून केव्हां केव्हां कारणनाशानंतर देखील कार्य कायम राहत असल्यामुळें, वर सांगितलेल्या लौकिकन्यायानुसार ही परिभाषा अनित्य ठरते, आणि म्हणूनच ) इष्टरूप सिद्ध करण्याकरितां जेथें या परिभाषेचा उपयोग होऊं शकतो तेथें ती लावावी, व जेथें ही परिभाषा लावल्यास अनिष्ट रूप सिद्ध होण्याची आपत्ति येते तेथें ती न लावतां इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. ( जसें, ' पपुषः ' ' सेदुषः ' इत्यादि रूपें सिद्ध

करितांना ही परिभाषा उपयोगी पडते ह्मणून तेथें ती लावावी; पण 'आनः, पट्व्या' इत्यादि रूपें सिद्ध करितांना, ती लावल्यास अनिष्ट रूपें होण्याचा प्रसङ्ग येतो ह्मणून तशा ठिकाणीं तिचा उपयोग करूं नये. 'आनः' या उदाहरणाची प्रक्रिया पूर्वीं सांगितलीच आहे. 'पट्व्या=पटु+ङीप्+टा=पटु+ई+आ' अशा स्थितींत पूर्वयणादेश अन्तरङ्गकार्य असून उत्तरयणादेश बहिरङ्गकार्य आहे. पूर्वयणादेशरूपी अन्तरङ्गकार्य केल्यानंतर प्राप्त होणारें उत्तरयणादेशरूपी बहिरङ्गकार्य असें आहे कीं तें केल्यानें पूर्वयणादेशाचें निमित्त—ह्मणजे ईकार—नष्ट होतो. या ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू पडते; पण ती लावल्यास पूर्वयणादेशरूपी अन्तरङ्गकार्य न करितां उत्तरयणादेशरूपी बहिरङ्गकार्यच करावें लागणार, व तसें केल्यास 'पट्व्या' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, 'पट्वया' असें विकृत रूप होण्याची आपत्ति येते. ह्मणून अशा ठिकाणीं, ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, तिचा उपयोग न करितां प्रथम अन्तरङ्गकार्य करून व नंतर बहिरङ्गकार्य करून इष्टरूपसिद्धि करून घ्यावी.) कारणाचा पुढें नाश होणार आहे ह्मणून त्या कारणापासून उत्पन्न होणारें कार्य करूंच नये असें ह्मणण्यास कोणत्याहि न्यायाचा आधार देतां येत नाहीं किंवा समर्पक दृष्टान्त सांगतां येत नाहीं. ह्मणून 'समर्थानाम्' हें पद देखील वर सांगितलेल्या लौकिकव्यवहाराचें ज्ञापक मानल्यानें चरितार्थ ठरत असल्यामुळें, लौकिकव्यवहारानें जो अर्थ सिद्ध होऊं शकत नाहीं अशा विलक्षण अर्थाचें—म्हणजे पुढें कारणाचा नाश होणार असल्यास त्या कारणापासून उत्पन्न होणारें कार्य करूंच नये अशा अर्थाचें—तें पद ज्ञापक आहे असें मानण्याकरितां कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नाहीं असा कैयटाच्या म्हणण्याचा आशय आहे हें समजावें. ('प्रक्षालनाद्धि पङ्कस्य दूरादस्पर्शनं वरम्' हा तरी लौकिकन्यायच आहे व त्या न्यायान्वयें हें सिद्ध होतें कीं कार्याच्या निमित्ताचा पुढें नाश होणार असल्यास तें कार्य करूं नये—असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तो न्याय एवढेंच सांगतो कीं एखादें कार्य करून पुढें तें नष्ट करण्यापेक्षां तें न करण्यांत लाघव आहे; तो न्याय मुळींच असें सांगत नाहीं कीं, एखाद्या कार्याचें कारण पुढें नष्ट होत असेल तर तें कार्य करूं नये.)

परे तु सेदुष इत्यादौ पदावधिकेऽन्वाख्याने सेद्वस् अस् इति स्थिते इड्सम्प्रसारणयोः प्राप्तयोः प्रतिपदविधित्वात्पूर्वं संप्रसारणे वलादित्वाभावादिटः प्राप्तिरेव नेति तत्सिद्धिरिति स्पष्टं समर्थानामिति सूत्रे कैयटेऽसिद्धवत्सूत्रे कैयटे च स्पष्टमेतत्। यद्यपि प्रतिपदविधित्वमनवकाशत्वे सत्येव बाधकत्वे बीजं, तथापि पूर्वप्रवृत्तौ सावकाशत्वेपि नियामकं भवत्येवेति तदाशयः। निरूपितं चैतद्बहुशः शब्देन्दुशेखरे॥

(आतांपर्यंत या परिभाषेसंबंधानें दीक्षिताचें व कैयटाचें काय मत आहे हें सांगून ग्रन्थकार आतां या परिभाषेबद्दल स्वतःचें मत सांगतात. ही पंक्ति 'परे तु'

या पदांनीं सुरू केली असल्यामुळें यांत सांगितलेलें मत ग्रन्थकाराचें मत आहे हें समजावें. ) इतर वैयाकरण असें ह्मणतात कीं, सिद्धपदाचें अन्वाख्यान करितांना—ह्मणजे त्या पदाचीं शकलें पाडून व तीं एकापुढें एक ठेवून व्याकरणरीत्या तें पद कसें सिद्ध होतें हें दाखवितांना—' सेद् + वस् + अस् ' अशा स्थितींत—ह्मणजे ' सद् ' धातूला लिट् लावला असतां लिटाचे जागीं ' क्वसु=वस् ' असा आदेश करून व नंतर द्विर्वचन, अभ्यासलोप, आणि एत्व करून तयार झालेल्या कृदन्तप्रातिपदिकास द्वितीयेच्या बहुवचनाचा ' शस् ' प्रत्यय लावल्यावर जी स्थिति होते तशा स्थितींत—इडागम व सम्प्रसारण या दोन कार्यांची प्राप्ति होते. (या दोन कार्यांपैकीं जरी इडागमकार्य अन्तरङ्ग व सम्प्रसारणकार्य बहिरङ्ग आहे तरी ' वसोः सम्प्रसारणम् ' सू० ४३५ या सूत्रानें होणारें ) सम्प्रसारणकार्य प्रतिपदोक्त असल्यामुळें—ह्मणजे ' वसु ' या पदाचा मुद्दाम उच्चार करून तें कार्य होणें सांगितलें असल्यामुळें—तें प्रथम होतें; व तें प्रथम केल्यावर इडागमाचें निमित्त जें ' वस् ' प्रत्ययाचें वलादित्व तें राहत नसल्यामुळें, इडागमाची प्राप्तीच होत नाहीं व त्यामुळें ( या परिभाषेचा उपयोग करण्याची गरज न पडतां ) ' सेदुषः ' हें रूप सिद्ध होतें हें कैयटानें स्वतःच ' समर्थानां प्रथमाद्वा ' ४–१–८२ व तसेंच ' असिद्धवदत्राभात् ' ६–४–२२ या सूत्रांवरील भाष्याच्या वृत्तींत ह्मटलें आहे. ( ह्मणून प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं; कारण त्या परिभाषेनें सिद्ध होणारीं रूपें, ती परिभाषा नसून देखील, इतर रीतीनें सिद्ध होऊं शकतात. ' सेदुषः ' या स्थलीं ' सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् ' प. १२८ या परिभाषेप्रमाणें सम्प्रसारणकार्य प्रथम होत असून त्या परिभाषेचा उपयोग न करितां, ग्रन्थकारानें सम्प्रसारणकार्य प्रथम होण्याकरितां अपवादरूपी प्रतिपदविधीचा आश्रय केला आहे. याचें कारण हें कीं, ती परिभाषा ग्रन्थकारास मान्य नाहीं; कारण भाष्यांत त्या परिभाषेचें प्रत्याख्यान केलें आहे. जेथें एखाद्या सूत्रांत पदाचा उच्चार करून त्याला कार्य होणें सांगितलें आहे तो प्रतिपदविधि होय, व तो अपवादविधि ठरत असल्यामुळें, ' अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान् ' या न्यायान्वयें प्रतिपदोक्त बहिरङ्ग सम्प्रसारणकार्य अन्तरङ्ग इडागम कार्याचें बाधक होऊन प्रथम होतें. ) प्रतिपदविधीला कोठेंहि प्रवृत्त होण्यास स्थळ मिळत नसल्यास तो अनवकाशत्वामुळें बाधक होतो हें जरी खरें आहे तरी तो सावकाश असून देखील, त्याची प्रथम प्रवृत्ति होणें एवढ्यापुरता, तो बाधक ठरतोच असा कैयटाच्या ह्मणण्याचा आशय आहे. (' वसोः सम्प्रसारणम् ' या प्रतिपदविधीनें होणारें सम्प्रसारणकार्य असें नाहीं कीं इडागम झाल्यावर तें होऊं शकत नाहीं. इडागम झाल्यावर देखील तें कार्य होऊं शकत असल्यामुळें व अशा रीतीनें सावकाश ठरत असल्यामुळें, इडागमकार्य व सम्प्रसारणकार्य या दोहोंत बाध्यबाधकभाव मानतां येत नाहीं—ह्मणजे सम्प्रसारणकार्य इडागमाचें बाधक ठरतें व इडागम बाध्य ठरतो असें मानतां येत नाहीं. हें जरी खरें आहे तरी प्रतिपदविधि अपवादविधि असल्यामुळें,

प्रतिपदोक्तकार्य प्रथम व्हावें व इतर अन्तरङ्ग कार्याची युगपत् प्राप्ति झाली असतां तें प्रथम होऊं नये एवढ्यापुरता तो बाधक ठरतो. प्रतिपदोक्तकार्य प्रथम झाल्यावर युगपत् प्राप्त झालेल्या अन्तरङ्ग कार्याचें निमित्त उपलब्ध असेल तर तें कार्य होण्यास कांहीं हरकत नाहीं. पण ' सेदुषः ' इत्यादि स्थलीं सम्प्रसारणकार्य प्रथम झाल्यावर इडागमाचें निमित्त जें ' वस् ' प्रत्ययाचें वलादित्व तें नष्ट होत असल्यामुळें इडागमकार्य होऊं शकत नाहीं. ) या विषयासंबंधानें शब्देन्दुशेखरांत विस्तृत चर्चा केली आहे.

**समर्थानामिति सूत्रस्थसमर्थग्रहणं तु विषुण इत्यादावकृतसन्धेः प्रत्ययदर्शनेन सर्वत्र तथा भ्रमवारणाय न्यायसिद्धार्थानुवाद एव । ध्वनितं चेदं विप्रतिषेधसूत्रे भाष्ये । तत्र हि वैक्षमाणिरित्यन्तरङ्गपरिभाषोदाहरणमुक्तम् ।**

( ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांतील ' समर्थ ' हें पद ही परिभाषा असल्यामुळें चरितार्थ होऊन, या परिभाषेचें ज्ञापक ठरतें असें पूर्वी ह्मटलें आहे. पण ही परिभाषा नाहीं असें मानल्यास, तें पद त्या सूत्रांत व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते अशी शंका केली असतां, ग्रन्थकार ह्मणतात कीं, तें पद अन्य रीतीनें आवश्यक व चरितार्थ ठरतें, आणि ह्मणून त्या पदानें प्रकृतपरिभाषा ज्ञापित होते हें ह्मणणें चूक आहे. तें पद अन्य रीतीनें कसें चरितार्थ ठरतें हें आतां ग्रन्थकार सांगतात. ) ' विषुणः ' इत्यादि स्थलीं जसें सन्धिकार्य होण्यापूर्वी तद्धितप्रत्यय लागतो व तन्निमित्तक कार्य होतें तसें इतर सर्व स्थलीं सन्धिकार्य करण्यापूर्वी तद्धितप्रत्यय लावून तन्निमित्तक कार्य करण्यास कांहीं हरकत नाहीं असा भ्रम न व्हावा ह्मणून, त्या भ्रमाचें निवारण करण्याकरितां, ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांत ' समर्थ ' पदाचें ग्रहण केलें आहे. ( ' विषु=सर्वत्र अञ्चतीति विष्वङ् = सर्वतोगामी; विष्वङ् अस्यास्तीति विषुणः ' या स्थलीं ' विष्वगित्युत्तरपदलोपश्चाकृतसन्धेः '—सू० १९०७ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें सन्धिकार्य होण्यापूर्वी मत्वर्थक ' न ' प्रत्यय होऊन उत्तरपदलोप होतो. ' विषु+अञ्च्+क्विप् ' अशा स्थितींत ' अनिदिताम् ' सू० ४१५ या सूत्रानें ' अञ्च् ' यांतील नकाराचा लोप होऊन ' विषु + अच् + क्विप् = विष्वक् ' असें रूप होतें. वार्तिक हें सांगतें कीं ' विषु+अच् ' यांचा सन्धि करण्यापूर्वी ' न ' प्रत्यय लागतो व तो लागल्यावर उत्तरपदाचा लोप होतो. त्यामुळें ' विषु+अच्+क्विप्+न=विषु+०+०+न ' अशी स्थिति होऊन व णत्व होऊन ' विषुणः ' असें रूप होतें. येथें सन्धि प्रथम केल्यावर ' न ' प्रत्यय लावल्यास, ' विष्वच्+न ' अशा स्थितींत ' अच् ' या उत्तरपदाचा लोप केला तर ' विष्व् +न ' अशी स्थिति होऊन, ' लोपो व्योर्वलि ' सू० ८७३ या सूत्रानें वकाराचा लोप होऊन ' विष्णः ' असें अनिष्ट रूप झालें असतें. तसें न होतां ' विषुणः ' असें रूप व्हावें ह्मणून वरील वार्तिक केलें आहे. ' विषुणः ' हें उदाहरण खेरीज करून इतर

कोठेंहि सन्धिकार्य करण्यापूर्वीं तद्धितप्रत्यय लावूं नये व तन्निमित्तक कार्य करूं नये हें स्पष्ट होण्याकरितां ' समर्थ ' पदाचें ग्रहण केलें आहे. त्या पदाचें ग्रहण केलें नसतें तर ' विषुणः ' येथें जसा सन्धि करण्यापूर्वीं तद्धितप्रत्यय लागून तन्निमित्तक कार्य होतें त्याचप्रमाणें इतर सर्वत्र तसें कार्य करण्यास कांहीं हरकत नाहीं असा भ्रम उत्पन्न होण्याचा संभव होता. तो भ्रम उत्पन्न न व्हावा ह्मणून ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांत ' समर्थ ' पदाचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें पद आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. ) व हें 'समर्थ' पदाचें ग्रहण केवळ अन्तरङ्ग परिभाषेचें अनुवाद करणारें–ह्मणजे अन्तरङ्ग सन्धिकार्य केल्यानंतर तद्धितप्रत्यय लावून प्रत्ययनिमित्तक बहिरङ्गकार्य करावें असें सांगणारें–आहे. ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' १–४–२ या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे, व त्या भाष्यांत ' वैक्षमाणिः ' हें अन्तरङ्गपरिभाषेचें उदाहरण दिलें आहे. ( ' वि+ईक्षमाण+इञ् ' येथें प्रकृतपरिभाषा लागू पडते; कारण येथें ' इञ् ' प्रत्ययनिमित्तक वृद्धिरूप बहिरङ्गकार्य असें आहे कीं तें केल्यास सवर्णदीर्घरूप अन्तरङ्ग सन्धिकार्याच्या निमित्ताचा तें नाश करितें. ह्मणून प्रकृतपरिभाषा जर भाष्यकारास मान्य असती तर त्यांनीं असें ह्मटलें असतें कीं जरी या उदाहरणास प्रकृतपरिभाषा लागू पडते तरी ' समर्थानां प्रथमाद्वा ' या सूत्रांत ' समर्थ ' पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, सन्धिकार्य प्रथम केल्यावर तद्धितप्रत्यय लागतो व तन्निमित्तक कार्य होतें, आणि त्यामुळें ' वायीक्षमाणिः ' असें रूप न होतां ' वैक्षमाणिः ' असें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण तसें न करतां त्यांनीं अन्तरङ्ग परिभाषा लावून ' वैक्षमाणिः ' हें रूप सिद्ध केलें आहे. जर प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य असती तर ती अन्तरङ्गपरिभाषेची अपवादात्मक परिभाषा ठरत असल्यामुळें, त्यांनीं प्रकृत स्थलीं अन्तरङ्गपरिभाषा मुळींच लावली नसती. )

**किञ्च विभज्यान्वाख्याने सु उत्थित अस् इ इति स्थिते वार्णादाङ्गं बलीय इति प्राप्तवृद्धिवारणाय समर्थग्रहणमित्यत्रैव सूत्रे कैयटे स्पष्टम् ॥**

( ' समर्थ ' पदग्रहणानें ही परिभाषा ज्ञापित होते, व ती तद्धितप्रत्यय लावतेवेळीं लागू पडत नाहीं आणि तद्धितप्रत्यय लावण्यापूर्वीं सन्धिकार्य प्रथम करून नंतर तद्धितप्रत्यय लावावा असेंहि पण त्या पदानें ज्ञापित होतें. याचा अर्थ असा कीं, प्रथम सन्धिरूप अन्तरङ्गकार्य करून तद्धितप्रत्ययनिमित्तक बहिरङ्ग कार्य करावें, व प० ५० तरी हेंच सांगतें कीं, अन्तरङ्गकार्य प्रथम करावें. ह्मणून भाष्यकारांनीं 'वैक्षमाणिः ' हें अन्तरङ्ग परिभाषेचें उदाहरण दिलें आहे एवढ्यावरून प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य नव्हती असें सिद्ध होत नाहीं—असें कोणी ह्मटल्यास, तें ह्मणणें वावगें होणार नाहीं. ह्मणून ग्रन्थकार आतां ' समर्थ ' पदग्रहण दुसऱ्या रीतीनें कसें चरितार्थ ठरतें हें या पंक्तींत सांगतात ) दुसरें असें कीं, ' सौत्थितिः ' या सिद्ध

पदाचीं शकलें पाडून तीं एकापुढें एक मांडल्यावर तें पद व्याकरणरीत्या कसें सिद्ध होतें हें दाखवितेवेळीं ‘ सु+उत्थित+ङस् ( अस् ) इञ् ’ अशी स्थिति झाली असतां, ‘ वार्णादाङ्गं बलीयः ’ प० ५५ या न्यायान्वयें बहिरङ्ग वृद्धिरूप अङ्गकार्य प्रथम प्राप्त होतें ( व तें प्रथम केल्यास ‘ सावुत्थितिः ’ व तसेंच ‘ वि+ईक्षमाण+ङस्+इञ् ’ या स्थलीं ‘ वायीक्षमाणिः ’ असें विकृत रूप होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां ) व प्राप्त झालेल्या बहिरङ्ग वृद्धिरूप अङ्गकार्याचें निवारण करण्याकरितां—ह्मणजे अन्तरङ्ग सन्धिकार्य प्रथम करून नंतर बहिरङ्ग वृद्धिरूप अङ्गकार्य करावें हें सांगण्याकरितां—‘ समर्थ ’ पद आवश्यक व चरितार्थ ठरतें असें कैयटानें ‘ समर्थानां प्रथमाद्वा ’ ४–१–८२ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींतच म्हटलें आहे ( आणि अशा रीतीनें तें पद चरितार्थ ठरत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं.)

अत एवासिद्धवत्सूत्रे वसुसंप्रसारणमज्विधौ सिद्धं वक्तव्यं पपुष इत्यादौ वसोः संप्रसारणे कृते आतो लोपो यथा स्यादिति भाष्ये उक्तम् । पद्स्य विभज्यान्वाख्याने पूर्वोक्तकैयटरीत्या पूर्वं संप्रसारणे इटोऽप्राप्तावुस्निमित्तक एवातो लोप इति तदाशयः । अन्यथान्तरङ्गत्वादिटि तन्निमित्तक एवातो लोप इति तदसङ्गतिः ॥

ही परिभाषा नाहीं ह्मणूनच ‘ असिद्धवदत्राभात् ’ ६-४-२२ या सूत्रावरील भाष्यांत ‘ वसोः सम्प्रसारणमज्विधौ सिद्धं वक्तव्यम् ’ हें वार्तिक सांगून भाष्यकार असें ह्मणतात कीं, ‘ पपुषः ’ इत्यादि स्थलीं ( ‘ वसोःसम्प्रसारणम् ’ सू० ४३५ या सूत्रानें ) ‘ वस् ’ चें सम्प्रसारण केलें असतां, आकाराचा लोप होण्याकरितां तसें वार्तिक असणें आवश्यक आहे. ‘ पपुषः ’ या पदाचीं शकलें पाडून तें पद व्याकरणरीत्या कसें सिद्ध झालें आहे हें दाखवितेवेळीं, कैयटानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें सम्प्रसारणकार्य प्रथम होतें, व त्यामुळें इडागमाची प्राप्तीच होत नाहीं; ह्मणून ‘ उस् ’ ला मानून आकारलोप व्हावा याकरितां वरील वार्तिक आवश्यक आहे असा भाष्यकाराच्या ह्मणण्याचा आशय आहे. नाहीं तर—ह्मणजे ‘ प्रतिपदविधित्वात् सम्प्रसारणं पूर्वं भवति ’ हें कैयटाचें ह्मणणें बरोबर न मानलें तर—इडागमकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें प्रथम होऊन त्याच्या निमित्तामुळें आकारलोप होऊं शकतोच, व वरील भाष्य विसंगत ठरण्याची आपत्ति येते. ( ‘ वसोः सम्प्रसारणम् ’ व ‘ आतो लोप इटि च ’ हीं दोन्हीं आभीय अधिकारांतील सूत्रें आहेत. ‘ असिद्धवदत्राभात् ’ सू० २१८३ या अधिकारसूत्रान्वयें त्या अधिकारांतील एका सूत्रानें समानाश्रय कार्य करतेवेळीं दुसऱ्या सूत्रानें झालेलें कार्य असिद्ध—ह्मणजे झालेंच नाहीं असें—मानावें लागतें. ‘ पपा+वस्+शस् ’ येथें ‘ वस् ’ चें सम्प्रसारण होणें व तसेंच आकारलोप होणें हीं दोन्हीं आभीय कार्यें आहेत. ‘ वस् ’ प्रत्ययाला मानून इडागम करणें हें कार्य अन्तरङ्ग आहे, व ‘ शस् ’ प्रत्ययाला मानून ‘ वस् ’ चें सम्प्रसारण करणें हें कार्य बहिरङ्ग आहे. पण पूर्वीं

कैयटानें सांगितल्याप्रमाणें ' वस् ' चें सम्प्रसारण होणें हें कार्य बहिरङ्ग असून देखील प्रतिपदोक्त कार्य असल्यामुळें, तें प्रथम होतें. हें खरें कीं ' वस्वेकाजात् ' या सूत्रानें होणारें इडागम कार्य देखील प्रतिपदोक्त आहे; कारण त्या सूत्रांत देखील ' वस् ' हें पद साक्षात् उच्चारुन ' वस् ' ला इडागम होणें सांगितलें आहे. परंतु त्या सूत्राचा ' कृतद्विर्वचनानामेकाचाम्=कृतेऽपि द्वित्वे एकाच एव ये अवशिष्यन्ते तेषां, वसोरिट् ' असा अर्थ होत असल्यामुळें, तें सूत्र प्रवृत्त होण्याकरितां द्विर्वचन होण्याची व एकाच्त्वाची अपेक्षा आहे—ह्मणजे द्विर्वचन झाल्यानंतर व द्विर्वचन होऊन एकाच्त्व असल्यासच तें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें. ' वसोः सम्प्रसारणम् ' हें सूत्र प्रवृत्त होण्याकरितां कशाचीहि अपेक्षा नाहीं. ह्मणून 'वस्' चें सम्प्रसारणकार्य शीघ्रोपस्थितिक व ' वस् '-ला इडागम होणें हें कार्य विलम्बोपस्थितिक ठरतें. त्यामुळें जरी दोन्हीं कार्यें प्रतिपदोक्त आहेत तरी सम्प्रसारणकार्य बलवत्तर ठरून तें प्रथम होतें असा कैयटाच्या ह्मणण्याचा आशय आहे. तें सम्प्रसारणकार्य प्रथम झाल्यास ' वस् ' प्रत्ययाचें वलादित्व हें जें इडागमाचें निमित्त आहे तें नष्ट होत असल्यामुळें, इडागम होऊं शकत नाहीं, व इडागम पुढें येत नसल्यामुळें आकाराचा लोप होऊं शकत नाहीं. सम्प्रसारणामुळें ' वस् ' या प्रत्ययाचें ' उस् ' असें रूपान्तर होत असल्यामुळें, तो ' उस् ' अजादि आर्धधातुक ' कित् ' प्रत्यय मानतां येतो, व तसा प्रत्यय पुढें आल्यामुळें ' आतो लोपः ' सू० २३७२ या सूत्रानें ' पपा ' यांतील आकाराचा लोप होऊं शकतो—असें कोणी ह्मटल्यास तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ' वसोः सम्प्रसारणम् ' या सूत्रान्वयें झालेलें आभीय सम्प्रसारणकार्य, ' आतो लोपः ' या सूत्रानें आकारलोपरूपी आभीय कार्य करतेवेळीं, ' असिद्धवदत्राभात् ' या सूत्रान्वयें असिद्ध ठरतें—ह्मणजे 'वस्' चा ' उस् ' झालाच नाहीं व ' वस् ' च कायम आहे असें मानणें भाग पडतें—व तसें मानल्यास, ' पपा ' यांतील आकारापुढें ' इट् ' किंवा अजादि आर्धधातुक प्रत्यय येत नसल्यामुळें, त्या आकाराचा लोप होणें अशक्य आहे, व आकाराचा लोप न झाल्यास, ' पपुषः ' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. आकारलोप होऊन इष्ट रूप सिद्ध व्हावें ह्मणून भाष्यकारांनीं वरील वार्तिक सांगितलें आहे व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं अज्विधि करतेवेळीं—ह्मणजे आकारलोप करतेवेळीं—सम्प्रसारणकार्य असिद्ध मानूं नये—ह्मणजे सम्प्रसारणामुळें ' वस् ' याचें ' उस् ' असें जें रूपान्तर होतें तें ' वस् ' च आहे असें न समजतां ' उस् ' आहे असें समजावें. तसें मानल्यास, तो ' उस् ' अजादि आर्धधातुक कित् प्रत्यय असल्यामुळें, ' पपा ' यांतील आकाराचा ' आतो लोपः ' या सूत्रानें लोप होऊन 'पपुषः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. जर प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य असती तर वरील वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण कैयटानें त्या परिभाषेचा जसा अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें इडागमरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम झालेंच असतें व त्यामुळें ' इट् ' प्रत्ययाच्या निमित्तानें आकारलोप झालाच असता, नंतर सम्प्रसारण झाल्यावर

इडागम नष्ट होऊन ' पपुषः ' असें इष्ट रूप सिद्ध झालेंच असतें. दुसरें असें कीं जर प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य असती तर 'पपुषः' इत्यादि स्थलीं सम्प्रसारणकार्य प्रथम होण्याकरितां ' प्रतिपदविधित्वात् पूर्वं सम्प्रसारणं भवति ' या न्यायाचें अवलंबन करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण या स्थलीं बहिरङ्ग सम्प्रसारणकार्य इडागमरूपी अन्तरङ्गकार्याच्या निमित्ताचें विनाशक असल्यामुळें प्रकृतपरिभाषेप्रमाणें प्रथम झालेंच असतें. पण ज्याअर्थी सम्प्रसारणकार्य प्रथम होण्याकरितां भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेचा उपयोग न करितां कैयटाचे ह्मणण्याप्रमाणें प्रतिपदविधीचा उपयोग केला आहे, त्याअर्थीं हें स्पष्ट होतें कीं ही परिभाषा भाष्यकारास मुळींच मान्य नव्हती, व ह्मणून ती स्वीकारार्ह नाहीं. प्रतिपदविधित्वामुळें सम्प्रसारणकार्य प्रथम होत असल्यामुळें वरील वार्तिक करण्याची गरज पडली हें उघड आहे.)

अत एव चौ प्रत्यङ्गस्य प्रतिषेध इति वचनं वार्तिककृतारब्धं भाष्यकृता च न प्रत्याख्यातम् । प्रत्यङ्गमन्तरङ्गम् । अस्यां परिभाषायां सत्यां तु तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ॥

( प्रकृतपरिभाषा वार्तिककारास किंवा भाष्यकारास मान्य नव्हती ) ह्मणूनच ' चौ प्रत्यङ्गस्य प्रतिषेधः ' असें वार्तिककाराला वार्तिक करावें लागलें व भाष्यकारांनीं त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें नाहीं. ( वार्तिकांतील ) ' प्रत्यङ्ग ' या शद्बाचा अर्थ ' अन्तरङ्ग ' असा आहे. जर प्रकृतपरिभाषा असती तर तसें वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती हें उघड आहे. ( ' प्रति + अञ्च् + क्विन् + शस् ' या स्थलीं ' अनिदितां हल उपधायाः ' सू० ४१५ या सूत्रानें नकाराचा लोप होऊन व 'वेरपृक्तस्य ' सू० ३७५ या सूत्रानें ' क्विन् = व् ' चा लोप होऊन ' प्रति+अच्+शस् ' अशी स्थिति झाली असतां, अलीकडच्या निमित्तामुळें होणारें यणादेशरूपी अन्तरङ्ग कार्य ' इको यणचि ' या सूत्रान्वयें पावलें आहे, व तसेंच पलीकडे असलेल्या ' शस् ' प्रत्ययाच्या निमित्तामुळें ' अचः ' सू० ४१६ या सूत्रान्वयें होणारें अलोपरूपी बहिरङ्ग कार्य पावलें आहे. हें अलोपरूपी बहिरङ्गकार्य असें आहे कीं तें केलें असतां, अन्तरङ्ग यणादेशाचें निमित्त–म्हणजे 'अच्' यांतील अकार नष्ट होणार. म्हणून जर प्रकृतपरिभाषा असती तर अलोपरूपी बहिरङ्गकार्य प्रकृतपरिभाषेप्रमाणें प्रथम झालेंच असतें आणि ' प्रति + च् + शस् = प्रति + च् + अस् ' अशी स्थिति झालीच असती, व ' चौ ' सू० ४१७ या सूत्रान्वयें ' प्रति ' यांतील इकाराचा दीर्घ होऊन ' प्रती +च्+ अस् = प्रतीचः ' असें रूप सिद्ध झालेंच असतें, आणि ' चौ प्रत्यङ्गस्य प्रतिषेधः ' असें वार्तिक करण्याची–म्हणजे चकार पुढें असतां अन्तरङ्गकार्य प्रथम करूं नये असें वार्तिक करण्याची–कांहींच गरज नव्हती. पण तें वार्तिक केलें असल्यामुळें व भाष्यकारांनीं त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें नसल्यामुळें, प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य नव्हती हें स्पष्ट होतें. वरील वार्तिकान्वयें अलोपरूपी कार्य बहिरङ्ग असून देखील तें

यणादेशरूपी अन्तरङ्गकार्याचा बाध करून–म्हणजे सन्धिकार्य होण्यापूर्वी 'प्रति+अच्+शस्' अशा स्थितींतच–प्रथम होतें, व अलोप होऊन 'प्रति+च्+शस्' अशी स्थिति झाली असतां, वर सांगितल्याप्रमाणें 'चौ' या सूत्रानें इकाराचा दीर्घ होऊन 'प्रतीचः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

अत एव च्छ्वोरिति सूत्रे अवश्यमत्र तुगभावार्थो यत्नः कार्योऽन्तरङ्गत्वाद्धि तुक् प्राप्नोतीति भाष्ये उक्तम्। एतत्सत्त्वे तु तुकोऽप्राप्त्या यत्नावश्यकत्वकथनमसङ्गतमिति स्पष्टमेव। न चैतदनित्यत्वज्ञापनार्थमेव तदिति तदाशयः। अवश्यमत्रेत्यक्षरस्वारस्यभङ्गापत्तेः॥

( ही परिभाषा भाष्यकारास मान्य नव्हती ) म्हणूनच 'च्छ्वोः शूठ्' ६-४-१९ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, या स्थलीं–म्हणजे 'प्रश्नः, विश्नः' इत्यादि स्थलीं–'तुक्' न राहावा म्हणून ( सतुक निर्देशरूपी ) यत्न करण्याची ( पाणिनीला ) आवश्यकता वाटली; कारण तुगागमरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें येथें त्याची प्राप्ति आहे. प्रकृतपरिभाषा असती तर तुकाची प्राप्तीच नव्हती व पाणिनीला अवश्य यत्न करावा लागला असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे तें म्हणणें विसंगत ठरलें असतें. प्रकृतपरिभाषा अनित्य आहे हें ज्ञापित करण्याकरितां भाष्यकारांनीं तसें म्हटलें आहे हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण असें मानल्यास 'अवश्यमत्र' असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्या म्हणण्यांत कांहीं स्वारस्य राहत नाहीं. ( 'छे च' सू० १४६ या सूत्रानें 'प्रछ्' याचें 'प्रच्छ्' असें रूप होतें, व 'यजयाच' सू० ३२६८ या सूत्रानें 'प्रच्छ्' ला 'नङ्' प्रत्यय झाल्यावर 'प्रच्छ् + नङ्' अशी स्थिति झाली असतां, 'च्छ्वोः शूठ्' सू० २५६१ या सूत्रानें 'च्छ्' चे जागीं 'श्' होऊन 'प्रश्+ न = प्रश्न' असें रूप होतें. प्रकृत उदाहरणांत छकाराला मानून होणारें तुगागमरूपी कार्य अन्तरङ्ग आहे व पलीकडे असलेल्या 'नङ्' प्रत्ययाला मानून होणारें शकारादेशरूपी कार्य बहिरङ्ग आहे. हें बहिरङ्गकार्य असें आहे कीं तें केल्यास तुगागमरूपी अन्तरङ्गकार्याचें निमित्त जो छकार त्याचे जागीं शकार होत असल्यामुळें त्याचा नाश होणार. त्यामुळें प्रकृतपरिभाषा पाणिनीस मान्य असती तर 'च्छ्वोः शूठ्' असें सूत्र न करितां 'छ्वोः शूठ्' असें सूत्र केलें असतें तरी काम भागलें असतें; कारण प्रकृतपरिभाषेमुळें तुगागमरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम न होतां छकाराचे जागीं होणारें शकारादेशरूपी बहिरङ्गकार्य प्रथम झालेंच असतें. पण ही परिभाषा पाणिनीस मान्य नसल्यामुळें त्याला हें माहीत होतें कीं तुगागमरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम होणार व तें झाल्यानें छकाराचा च्छकार होणार. छकाराच्या बरोबर तुगागम देखील नाहींसा व्हावा व 'च्छ्' चे जागीं 'श्' असा आदेश व्हावा म्हणून पाणिनीला मुद्दाम 'च्छ्वोः शूठ्' असें सूत्र करण्याचा यत्न करणें भाग पडलें असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ही परिभाषा अनित्य आहे हें ज्ञापित करण्याकरितां पाणिनीला तसा प्रयत्न

करावा लागला अशा रीतीनें भाष्याचा अर्थ लावणें मुळींच बरोबर नाहीं; कारण ही परिभाषा असून अनित्य आहे असें म्हटल्यास त्याचा अर्थ हाच होतो कीं जेथें इष्टरूप सिद्ध करण्याकरितां प्रकृतपरिभाषा उपयोगी पडूं शकत नाहीं तेथें ती लावूं नये व तिच्या शिवाय इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. पण ' प्रश्नः ' इत्यादि स्थलीं इष्टरूप सिद्ध होत नाहीं असें नसून, ती लावल्यानें इष्टरूप सिद्ध होतें. मग 'अवश्यमत्र तुगभावार्थो यत्नः कार्यः ' असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्यांतील ' अवश्यमत्र ' या शब्दांचें स्वारस्य नाहींसें होतें; कारण ही परिभाषा असती तर जसा पाणिनीनें यत्न केला आहे तसा न करितां इष्टरूप सिद्ध होऊं शकलेंच असतें. पण ही परिभाषा पाणिनीस मान्य नसल्यामुळें तसा यत्न करावा लागला आणि म्हणूनच भाष्यकाराचें म्हणणें ठीक जुळतें. वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं प्रकृतपरिभाषा पाणिनीस व भाष्यकारास मान्य नव्हती )

किञ्चानयैव प्रत्ययोत्तरपदयोश्च अदो जग्धिर्ल्यप्ति कितीत्यनयोश्चारितार्थ्येन तज्ज्ञापकवशाल्लुग्ल्यपोरन्तरङ्गबाधकता भाष्योक्ता भज्येत ॥

दुसरें असें कीं ही परिभाषा मानल्यानें ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' सू० १३७३ व ' अदोजग्धिर्ल्यप्ति किति ' सू० ३०८० हीं सूत्रें चरितार्थ ठरत असल्यामुळें व प्रकृत-परिभाषेचीं ज्ञापक सूत्रें ठरत असल्यामुळें, ' लुक् ' आणि ' ल्यप् ' अन्तरङ्गकार्यांचे बाधक होतात असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे तें म्हणणें असंगत ठरेल. ( भाष्यकारांनीं प० ५२ व ५४ भाष्यांत पठित केल्या आहेत व स्वीकारल्या आहेत, आणि ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' हें सूत्र प० ५२ चें ज्ञापक मानलें असून, ' अदो जग्धिः' हें सूत्र प. ५४चें ज्ञापक आहे असें म्हटलें आहे. जर प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य असती तर, त्या परिभाषेनें प० ५२ व ५४ गतार्थ होत असल्यामुळें, या दोन वेगळ्या परिभाषा मानण्याची व त्यांची ज्ञापकें सांगण्याची त्यांना कांहींच गरज नव्हती. त्या दोन परिभाषांनीं होणारें कार्य प्रकृतपरिभाषेनें होऊं शकलेंच असतें हें पूर्वीं विस्तृत रीतीनें सिद्ध करून दाखविलेंच आहे. पण भाष्यकारांनीं ' लुक् ' व ' ल्यप् ' अन्तरङ्गकार्यांचे बाधक होतात हें सांगणाऱ्या प० ५२ व ५४ मानल्या असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं त्यांना प्रकृतपरिभाषा मान्य नव्हती. )

किञ्चैषा भाष्ये न दृश्यते । तदुक्तमसिद्धवत्सूत्रे कैयटेन " निमित्तापाये नैमित्तिकस्याप्यपाय " इति परिभाषाया भाष्यकृतानाश्रयणादिति ॥

दुसरें असें कीं ही परिभाषा भाष्यांत कोठेंहि आढळत नाहीं, आणि म्हणूनच ' असिद्धवदत्राभात् ' ६–४–२२ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें म्हटलें आहे कीं, ' निमित्तापाये नैमित्तिकस्याप्यपायः ' या परिभाषेचा भाष्यकारांनीं कोठेंहि उपयोग केला नाहीं.

**पदसंस्कारपक्षे हरिरित्यादौ विसर्गे कृते ततो गच्छतीत्यादिसम्बन्धे हरिः गच्छतीत्याद्येव साधु । तद्विषये पदसंस्कारपक्षानाश्रयणं वेति दिक् ॥ ५६ ॥**

( आतां शंकाकार अशी शंका करितो कीं, प्रकृतपरिभाषा न मानली तरी ' पपुषः ' इत्यादि रूपें पदसंस्कारपक्षाचा आश्रय केल्यानें जरी सिद्ध होतात, तरी ही परिभाषा न मानल्यास, पदसंस्कारपक्षांत ' हरिर्गच्छति ' असा प्रयोग सिद्ध होऊं शकणार नाहीं. म्हणून ही परिभाषा मानणें आवश्यक आहे. पदसंस्कारपक्षांत–म्हणजे प्रत्येक पद व्याकरणरीत्या स्वतंत्र रीतीनें सिद्ध करितांना व ' हरिर्गच्छति ' या वाक्यांतील ' हरि : ' हें पद, ' गच्छति ' या पदाकडे दुर्लक्ष करून, स्वतंत्र रीतीनें सिद्ध करतेवेळीं, ' हरि ' या प्रातिपदिकास ' सु ' हा विभक्तिप्रत्यय लावून 'हरि +सु' अशी स्थिति झाली असतां, 'ससजुषो रुः' सू० १६२ या सूत्रानें 'सु' चे जागीं रकार होऊन ' हरि +र्' अशी स्थिति होते, व अशा स्थितींत रकार पदाच्या अन्तीं असून रकारापुढें अवसान असल्यामुळें–म्हणजे कांहींच नसल्यामुळें–' खरवसानयोर्विसर्जनीयः ' सू० ७६ या सूत्रानें रकाराचा विसर्ग होऊन ' हरि : ' असें रूप होतें व त्यांत रकार राहत नाहीं. अशा रीतीनें सिद्ध झालेल्या ' हरिः ' या पदाचा ' गच्छति ' या पदाशीं संबंध आल्यावर, ' हरि : गच्छति ' असा अनिष्ट प्रयोग सिद्ध होण्याची आपत्ति येईल व ' हरिर्गच्छति ' असा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकणार नाहीं. पण प्रकृतपरिभाषा मानल्यास तसा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकतो; कारण ' गच्छति ' या पदान्तराशीं संबंध होताक्षणींच विसर्गाचें निमित्त जें अवसान त्याचा नाश होत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, विसर्गाचा रेफ होणें हें अन्तरङ्गकार्य होऊं शकत नाहीं व त्यामुळें ' हरिर् ' असें रूप कायम राहून त्याचा ' गच्छति ' या पदाशीं संबंध आल्यावर ' हरिर्गच्छति ' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. सारांश अशा प्रकारचे प्रयोग पदसंस्कारपक्षांत सिद्ध होण्याकरितां प्रकृतपरिभाषा मानणें आवश्यक आहे अशी शंकाकाराची शंका आहे या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) पदसंस्कारपक्षांत ' हरि + सु=हरिर् ' इत्यादि स्थलीं रेफाचा विसर्ग केल्यावर, ' हरि : ' या पदाचा ' गच्छति ' इत्यादि पदान्तरांशीं संबंध आला असतां, ' हरिःगच्छति ' हाच प्रयोग शुद्ध आहे. (आणि म्हणूनच ' हरि : ॐ ' हा विसर्गसहित सर्वतोमुखी प्रयोग शुद्ध ठरतो. सारांश ग्रन्थकार म्हणतात कीं शंकाकारानें जी आपत्ति दाखविली आहे ती इष्टापत्ति आहे, व तिचें निवारण करण्याची कांहींच गरज नाहीं. ) ' हरिर्गच्छति ' असा प्रयोग सिद्ध करणें झाल्यास पदसंस्कारपक्षाचा आश्रय न केला ( व वाक्यसंस्कारपक्षाचा आश्रय केला ) म्हणजे तसा प्रयोग सिद्ध होऊं शकतो.

---

# परिभाषा ५७

( ग्रन्थकारानें द्वितीयप्रकरणाच्या आरंभीं ' पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः '–प. ३८– ही परिभाषा सांगून, पूर्वसूत्रापेक्षां परसूत्र, परसूत्रापेक्षां नित्यकार्यविधायकसूत्र, नित्यकार्यविधायकसूत्रापेक्षां अन्तरङ्गकार्यविधायक सूत्र, बलवत्तर असतें हें त्या त्या विषयासंबंधी परिभाषा देऊन त्यांचें विस्तृत रीतीनें आतांपर्यंत विवेचन केलें. आतां ग्रन्थकार अन्तरङ्गकार्यविधायकसूत्रापेक्षां देखील अपवादशास्त्र बलवत्तर असतें हें सांगणारी परिभाषा सांगतात. )

**अन्तरङ्गादप्यपवादो बलीयान् ॥ ५७ ॥**

" अन्तरङ्गकार्यविधायकसूत्रापेक्षां देखील अपवादशास्त्र बलवत्तर असतें. "

( या परिभाषेंत ' अपि ' शब्द घातला असल्यामुळें, अपवादशास्त्र इतर सर्व प्रकारच्या–ह्मणजे पूर्व, पर व नित्य—सूत्रापेक्षां बलवत्तर असतें हें आपोआपच सिद्ध होतें. )

---

# परिभाषा ५८

तत्रापवादपदार्थमाह—

आतां वरील परिभाषेंत जो ' अपवाद ' शब्द घातला आहे त्याचा अर्थ स्पष्ट करणारी ही परिभाषा सांगतात—

**येन नाप्राप्ते यो विधिरारभ्यते स तस्य बाधको भवति ॥ ५८ ॥**

" ज्या सूत्राची अवश्यप्राप्ति असतां एखादें दुसरें सूत्र आरंभिलें जातें तशा ठिकाणीं तें दुसरें सूत्र त्या ( अवश्यप्राप्त होणाऱ्या ) सूत्राचें बाधक होतें. "

( जसें सन्धिकार्य करतेवेळीं इक्प्रत्याहारांतील वर्णापुढें ' अच् ' आल्यास–मग तो सवर्ण किंवा असवर्ण ' अच् ' असो-- ' इको यणचि ' सू० ४७ या सूत्राची अवश्यप्राप्ति होते. ' श्री + ईश ' किंवा ' विष्णु + उदय ' या स्थलीं इकापुढें ' अच् ' आला असल्यामुळें ' इको यणचि ' हें सूत्र अवश्य प्राप्त होतें व यणादेश होऊं पाहतो. पण ' अकः सवर्णे दीर्घः ' सू० ७५ हें सूत्र आरंभिलें असल्यामुळें, जरी जेथें जेथें तें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ' इको यणचि ' या सूत्राची अवश्यप्राप्ति आहे तरी हें विशेषसूत्र ' इको यणचि ' या सामान्यसूत्राचें प्रकृतपरिभाषेप्रमाणें बाधक ठरतें. सारांश सामान्यशास्त्र व्यापकशास्त्र असून विशेषशास्त्र व्याप्यशास्त्र असतें, आणि जेथें दोन सूत्रांत असा व्याप्यव्यापकभाव असतो तेथें व्याप्यशास्त्र बाधक

आणि व्यापकशास्त्र बाध्य ठरतें. सारांश व्याप्यव्यापकभाव हें खरें बाधबीज होय, व 'अपवाद' याचा सामान्य अर्थ बाधकशास्त्र असा समजावा व अशा अपवादशास्त्रानें सामान्यशास्त्राचा अर्थ संकुचित केला जातो. जसें ' अकः सवर्णे दीर्घः ' हें विशेषशास्त्र असल्यामुळें, ' इको यणचि ' या सूत्रांतील ' अचि ' या पदाचा ' असवर्णे अचि ' असा संकुचित अर्थ होतो )

**प्राप्त इति भावे क्तः। येन नाप्राप्त इत्यस्य यत्कर्तृकावश्यप्राप्ताविव्यर्थो नञ्द्वयस्य प्रकृतार्थदार्ढ्यबोधकत्वात्। एवं च विशेषशास्त्रोद्देश्यविशेषधर्मावच्छिन्नवृत्तिसामान्यधर्मावच्छिन्नोद्देश्यकशास्त्रस्य विशेषशास्त्रेण बाधः।**

( ' येन नाप्राप्ते ' यांत ' येन ' ही ' कर्तृकरणयोस्तृतीया ' सू० ५६१ या सूत्रान्वयें कर्तरि तृतीया असून त्या पदाचा अर्थ ' यत्कर्तृक ' असा आहे, आणि ' नाप्राप्ते ' यांतील ) 'प्राप्ते' येथें ( 'नपुंसके भावे क्तः' सू० ३०९० या सूत्रान्वयें ) भावे क्तप्रत्यय झाला आहे. ( आणि ' न प्राप्तं अप्राप्तं, न अप्राप्तं नाप्राप्तं, तस्मिन् नाप्राप्ते ' या स्थलीं ' नञ् ' व ' नलोपो नञः ' सू० ७५६ व ७५७ या सूत्रांनीं ' अप्राप्त ' असा शब्द तयार होऊन त्या शब्दाचा ' न ' या शब्दाशीं ' सुपा ' सू० ६४९ या सूत्रानें समास होऊन ' नाप्राप्ते ' हा जो सामासिक शब्द तयार झाला आहे त्यांत असणारे ) दोन निषेधवाचक ' न ' व ' नञ् ' हे शब्द प्रकृत—ह्मणजे प्राप्तिरूप-अर्थाचे—दार्ढ्यबोधक—ह्मणजे आवश्यकत्वबोधक—शब्द असल्यामुळें, ' येन नाप्राप्ते ' या पदांचा ' ज्याची अवश्यप्राप्ति होत असतां ' असा अर्थ होतो. या शब्दांचा असा अर्थ असल्यामुळें, (प्रकृतपरिभाषेचा असा अर्थ होतो कीं) विशेषशास्त्राच्या उद्देश्याचे ठिकाणीं असणारा जो विशेषधर्म त्या धर्मानें युक्त अशा शब्दस्वरूपाचें ठिकाणीं असणारा जो सामान्यधर्म त्या सामान्यधर्मानें युक्त आहे उद्देश्य ज्याचें अशा सामान्यशास्त्राचें विशेषशास्त्र बाधक ठरतें— ह्मणजे ज्या विशेषधर्माला उद्देशून विशेषशास्त्र सांगितलें आहे त्या विशेषधर्माबरोबर राहणाऱ्या सामान्यधर्माला उद्देशून सांगितलेल्या सामान्यशास्त्राचें विशेषशास्त्र बाधक होतें ( या पंक्तीचा अर्थ नीट ध्यानांत येण्याकरितां आपण ' हो ढः ' व ' दादेर्धातोर्घः ' सू० ३२४ व ३२५ हीं दोन सूत्रें घेऊं. ' हो ढः ' हें सामान्यशास्त्र असून ' दादेर्धातोर्घः ' हें विशेषशास्त्र आहे. हकारापुढें झल्प्रत्याहारांतील वर्ण असल्यास किंवा तो हकार पदाचे अन्तीं असल्यास त्या हकाराचे जागीं ढकार होतो असा ' हो ढः ' या सामान्यशास्त्राचा अर्थ आहे. या सामान्यशास्त्राचें झल्परक किंवा पदाच्या अन्तीं हकार हें उद्देश्य आहे. धातुपाठांत जो दकारानें सुरु होणारा धातु पठित आहे तशा धातूचा अवयव जो हकार तो झल्परक किंवा पदान्तीं असल्यास, त्या हकाराचे जागीं घकार होतो असा ' दादेर्धातोर्घः ' या सूत्राचा अर्थ आहे. या विशेषशास्त्रांत दकारानें सुरू होणाऱ्या धातूचा अवयव व झल्परक किंवा पदाच्या अन्तीं असणारा हकार हा उद्देश्य आहे. या विशेषशास्त्रांतील उद्देश्याचे

ठिकाणीं सामान्यशास्त्रांतील उद्देश्या या धर्म –ह्मणजे झल्परक किंवा पदान्ती हकार असणें हा धर्म–आहेच व त्या धर्माबरोबरच कांहीं जास्त धर्म-ह्मणजे दकारानें सुरू होणाऱ्या धातूचा अवयव हकार असणें हा धर्म–आहे. अशीं स्थिति असल्यामुळें, ‘ हो ढः ’ हें सामान्यशास्त्र ‘ दादेर्घातोर्घः ’ या विशेषशास्त्रानें बाधित होतें, व त्यामुळें दादिधातूचा अवयव जो हकार त्याच्यापुढें ‘झल्’ असल्यास किंवा तो पदान्तीं असल्यास, त्याचे जागीं ढकार न होतां, घकार होतो. अशी स्थिति जेथें नसते–म्हणजे जेथें विशेषशास्त्र व सामान्यशास्त्र यांच्या उद्देश्यांत व्याप्यव्यापकभाव नसतो—तेथें एक सूत्र दुसऱ्या सूत्राचें बाधक होत नाहीं. जसें ‘इको यणचि ’ सू० ४७ या सूत्रांत इक्प्रत्याहारांतील वर्ण अच्परक असणें हें उद्देश्य असून ‘आद्गुणः’ सूत्र ६९ या सूत्रांत ‘ अ ’ वर्ण अच्परक असणें हें उद्देश्य आहे. या दोन उद्देश्यांत व्याप्यव्यापकभाव नाहीं. म्हणून ‘ आद्गुणः ’ हें सूत्र ‘ इको यणचि ’ या सूत्राचें बाधक होऊं शकत नाहीं. सारांश प्रकृतपरिभाषेप्रमाणें एक सूत्र दुसऱ्या सूत्राचें बाधक ठरण्याकरितां त्या दोन सूत्रांतील उद्देश्यांमध्यें व्याप्यव्यापकभाव असणें आवश्यक आहे. )

## तदप्राप्तियोग्येऽचारितार्थ्यं ह्येतस्य बाधकत्वे बीजम् ॥

सामान्यशास्त्राची प्राप्ति नाहीं असें स्थळ विशेषशास्त्रास प्रवृत्त होण्यास मिळत नसल्यामुळें तें विशेषशास्त्र व्यर्थ ठरूं पाहणें हेंच विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक होण्यास कारणीभूत होतें. ( जेथें जेथें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें, विशेषशास्त्रास प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळूं शकत नाहीं, व त्यामुळें तें विशेषशास्त्र व्यर्थ ठरूं पाहतें. परंतु कोणतेंहि पाणिनीय सूत्र किंवा त्यांतील कोणतेंहि अक्षर व्यर्थ ठरूं शकत नाहीं असा भाष्यकाराचा सिद्धान्त आहे हें पूर्वींच सांगितलें आहे, व त्यामुळें विशेषशास्त्र व्यर्थ न ठरतां सामान्यशास्त्राचें बाधक होतें. हेंच प्रथम बाधबीज होय, व ‘ असति सम्भवे बाधनं भवति ’ असा जो वार्तिककारांनीं सिद्धान्त सांगितला आहे तोच या प्रथम बाधबीजांत भिन्न शद्वांनीं सांगितला आहे. या प्रथम बाधबीजांत अनवकाशत्वामुळें–ह्मणजे विशेषशास्त्रास प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थळ सांपडत नसल्यामुळें–विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक होतें व त्यामुळें सामान्यशास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं. जसें ‘ रमा ’ या प्रातिपदिकाचें सम्बुद्धीचें एकवचन करितांना ‘ रमा+सु ’ या स्थितींत, ‘ हल्ङ्याब्भ्यः ’ सू० २५२ व ‘सम्बुद्धौ च’ सू० २८८ हीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त होतात. ‘सम्बुद्धौ च’ या सूत्रांत ‘ सम्बुद्धि ’ हा शद्व साक्षात् उच्चारल्यामुळें हा प्रतिपदविधि असून विशेषशास्त्र आहे व या सूत्रान्वयें आबन्त प्रातिपदिकापुढें सम्बुद्धीचा ‘ सु ’ प्रत्यय असल्यास प्रातिपदिकाच्या आकाराचे जागीं एकार होतो. जेथें जेथें हें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ‘ हल्ङ्याब्भ्यः ’ या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहेच. त्यामुळें ‘ सम्बुद्धौ च ’ या सूत्रास प्रवृत्त होण्यास कोठेंहि अवकाश मिळत नसल्यामुळें, तें सूत्र

अनवकाशत्वामुळें ' हल्ङ्याब्भ्यः ' या सामान्यशास्त्राचें बाधक ठरून प्रथम प्रवृत्त होतें, व तें प्रवृत्त होऊन त्यानें एत्वरूपी कार्य केल्यानंतर प्रातिपदिक आबन्त राहत नसल्यामुळें व एकारान्त प्रातिपदिक होत असल्यामुळें, ' हल्ङ्याब्भ्यः ' हें सामान्य शास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्याचा नेहमी करितां बाध फलित होतो. )

अत एव " आयादय " इति सूत्रे गोपायिष्यतीत्यादावायादीन्बाधित्वा परत्वात्स्यादयः प्राप्नुवन्तीत्याशङ्क्यानवकाशा आयादयः । गोपायतीत्यादावपि शप् स्यादिः प्राप्नोति । न च सति शप्यसति वा न विशेषः । अन्यदिदानीमिदमुच्यते नास्ति विशेष इति । यदुक्तमायादीनां स्यादिभिरव्याप्तोऽवकाश इति स नास्त्यवकाश इति भाष्ये उक्तम् ॥

वर सांगितल्याप्रमाणें या परिभाषेचा अर्थ असल्यामुळेंच, ' आयादय आर्धधातुके वा ' ३–१–३१ या सूत्रावरील भाष्यांत 'गोपायिष्यति' इत्यादि स्थळीं आयादिकांचा बाध करून, विकरणविधायकसूत्रें पर सूत्रें असल्यामुळें, ' स्य ' इत्यादि विकरणांची प्रथम प्रवृत्ति होण्याची आपत्ति येते अशी शंका उपस्थित करून, भाष्यकार म्हणतात कीं असें झाल्यास, आयादिक अनवकाश ठरतील; ' गोपायति ' इत्यादि स्थळीं देखील ' स्य ' नें सुरु होणारा जो विकरणसमुदाय त्यांत अन्तर्गत असणाऱ्या शपाची प्राप्ति आहेच; शप् लावला अथवा न लावला तरी इष्टरूप सिद्ध होण्यांत कांहीं फरक होत नाहीं हें खरें, पण रूप भिन्न होत नाहीं ही अगदी वेगळी गोष्ट आहे; तथापि ' स्य ' इत्यादि विकरणांनीं आयादिकांची जागा व्यापली नाहीं हें म्हणणें बरोबर नसून, त्यांनीं आयादिकांची सर्व जागा व्याप्त केली आहे व त्यामुळें आयादिक अनवकाश ठरतात हेंच म्हणणें बरोबर आहे. ( ' गुपूधूपविच्छिपणिपनिभ्य आयः ' सू० २३०३ या सूत्रानें होणारा ' आय ' ' ऋतेरीयङ् ' सू० २४२२ या सूत्रानें होणारा ' ईयङ् , ' व ' कमेर्णिङ् 'सू०२३१० या सूत्रानें होणारा ' णिङ् ' या तीन प्रत्ययांना ' आयादि ' म्हणतात. ' आय ईयङ् णिङ् चेति त्रय आयादयो मताः ' असें वचन आहे. वर सांगितलेल्या तीन्ही सूत्रानंतर स्य, तासि, च्लि, यक्, शप् , श्यन् , श इत्यादि विकरणांचें विधान करणारीं सूत्रें अष्टाध्यायीच्या तृतीयाध्यायाच्या प्रथम पादांत पठित आहेत, व त्या सूत्रांमध्यें ' स्यतासी लृलुटोः ' हें प्रथम सूत्र असून त्या सूत्रांत ' स्य ' चा प्रथम निर्देश केला असल्यामुळें, ' स्यादि ' याचा अर्थ ' स्य ' नें सुरु होणारीं विकरणें असा होतो. तसेंच ' शप् स्यादिः' येथें ' स्यादिः ' हें शप्चें विशेषण आहे व त्या दोन पदांचा अर्थ 'स्यादिविकरणसमुदायान्तर्गत शप् ' असा आहे. आतां भाष्यकार अशी शंका उपस्थित करतात कीं आय, ईयङ्, व णिङ् यांचें विधान करणारीं सूत्रें पूर्वसूत्रें असून 'स्य' इत्यादि विकरणांचें विधान करणारीं सूत्रें परसूत्रें असल्यामुळें, पूर्वात्परं बलवत्' या न्यायान्वयें, स्यादिविकरणविधायकसूत्रें आयादिकांचें विधान करणाऱ्या सूत्राच्या अपेक्षेनें बलवत्तर ठरतात, व त्यामुळें स्यादिविकरणें आयादिकांचे,

परत्वामुळें, बाधक ठरण्याची आपत्ति येते. पण या शंकेचें निरसन करितांना भाष्यकार म्हणतात कीं, 'स्य' इत्यादि विकरणांनीं सर्व स्थलें व्यापलीं असल्यामुळें आयादि निरवकाश ठरतात–म्हणजे त्यांना प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थळ मिळत नाहीं व त्यामुळें ते व्यर्थ ठरूं पाहतात. मग त्यांचें विधान तरी कशास केलें ? पण ज्या अर्थीं पाणिनीनें त्यांचें मुद्दाम विधान केलें आहे व कोणतेंहि पाणिनीय सूत्र व्यर्थ ठरूं शकत नाहीं त्याअर्थी ते आयादिक, अनवकाशत्वामुळेंच, स्यादिविकरणविधायकसूत्रांचे बाधक ठरून प्रथम होतात. आयादिक कसे निरवकाश ठरतात हें सिद्ध करितांना भाष्यकारांनीं 'गोपायिष्यति' व 'गोपायति' हीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. 'गुप्+लृट्' या स्थलीं 'गुपूधूप' या सूत्रानें 'आय' ची प्राप्ति आहे व तसेंच 'स्यतासी' यासूत्रानें 'स्य' ची प्राप्ति आहे. त्याचप्रमाणें 'गुप्+लट्' येथें 'आय' ची प्राप्ति आहे आणि 'कर्तरि शप्' सू० २१६७ या सूत्रानें शपाचीहि प्राप्ति आहे. विकरणाचीं सूत्रें परसूत्रें असल्यामुळें, वरील दोन्ही उदाहरणांत 'आय' न होतां, परत्वामुळें 'स्य' व 'शप अनुक्रमें व्हावे, पण तसें झाल्यास लृटाचें 'गोपायिष्यति' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. हें खरें कीं 'गोपायति' या स्थलीं 'आय' प्रथम लावला किंवा 'शप्' प्रथम लावला तरी 'गोपायति' असेंच इष्टरूप सिद्ध होतें; कारण 'गुप् + आय+शप् + ति' अशा स्थितींत, 'आय' प्रत्यय पुढें असल्यामुळें 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ या सूत्रानें 'गुप्' यांतील उपधाउकारास गुण होऊन 'गोप् + आय +अ+ति' अशी स्थिति झाली असतां, 'अतो गुणे' सू० १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'गोपायति' असें रूप सिद्ध होतें, आणि तसेंच 'गुप् + शप्+आय +ति' अशा स्थितींत, 'शप्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, लघूपधगुण होऊन 'गोप्+अ +आय+ति' अशी स्थिति झाली असतां, 'अकः सवर्णे दीर्घः' सू० ८५ या सूत्रानें 'गोपायति' असेंच रूप सिद्ध होतें. पण भाष्यकार म्हणतात कीं 'आय' व शप् या दोन प्रत्ययांपैकीं कोणताहि प्रत्यय प्रथम लावला तरी इष्टरूप सिद्ध होतें हें म्हणणें प्रकृतविषयास धरून नाहीं; कारण येथें प्रश्न हा आहे कीं 'आय' प्रथम व्हावा किंवा 'शप्' प्रथम व्हावा? कोणताहि प्रत्यय प्रथम लावला तरी इष्टरूप सिद्ध होतेंच हें या प्रश्नाचें उत्तर नव्हे. वास्तविक, अनवकाशत्वामुळें, 'आय' प्रथम होतो हें या प्रश्नाचें खरें उत्तर आहे; कारण आयादिविधायकसूत्रें विशेषसूत्रें आहेत व स्यादिविधायकसूत्रें सामान्यसूत्रें आहेत. जेथें जेथें विशेषसूत्रें प्रवृत्त होऊं पाहतात तेथें तेथें सामान्यसूत्रांची अवश्यप्राप्ति आहेच. म्हणून आयादिकांस प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थळ मिळत नसल्यामुळें, ते अनवकाशत्वामुळें स्यादिविकरणांचे बाधक ठरून प्रथम होतात व स्यादिविकरणांचा बाध करितात. हें खरें कीं आयादि प्रत्यय लागल्यानंतर स्यादि विकरणें लागतात. पण त्याचें कारण हें आहे कीं, 'सनाद्यन्ता धातवः' सू० २३०४ या सूत्रान्वयें 'सन्' इत्यादि बारा प्रत्ययांपैकीं कोणताहि प्रत्यय अन्तीं आल्यास तशा प्रत्ययान्त शब्दाला धातुसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळें, स्यादि विकरणें नंतर लागतात.

सारांश सामान्यशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यास त्याची प्रवृत्ति सफल ठरत असो किंवा निष्फल ठरत असो, दोन्ही स्थलीं विशेषशास्त्र अनवकाशत्वामुळें सामान्यशास्त्राचें बाधक ठरतेंच ).

**एवमत्र तत्प्रवृत्त्युत्तरं चारितार्थ्ये ऽपि तद्व्याप्तोऽवकाशो नास्तीति सममेव ॥**

तसेंच सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असला व अशा रीतीनें विशेषशास्त्र चारितार्थ ठरत असलें तरी सामान्यशास्त्रानें न व्यापलेली जागा विशेषशास्त्रास प्रवृत्त होण्यास मिळत नसल्यामुळें, या ठिकाणीं देखील अनवकाशता सारखीच आहे ( सारांश जेथें सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा मुळींच संभव नाहीं व सामान्यशास्त्राची प्रथमप्रवृत्ति निष्फल असली तरी तेथें ज्याप्रमाणें वार्तिककारानें अनवकाशत्वामुळें विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक मानलें आहे त्याचप्रमाणें सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असला तरी देखील सामान्यशास्त्र प्रवृत्त होतेवेळीं विशेषशास्त्रास प्रवृत्त होण्यास स्थल मिळत नसल्यामुळें, तशा ठिकाणीं देखील वार्तिककारानें अनवकाशत्व मानल्याखेरीज गत्यन्तर नाहीं. कारण अशा स्थलीं देखील सामान्यशास्त्रानें न व्यापलेली जागा विशेषशास्त्रास, सामान्यशास्त्र प्रवृत्त होतेवेळीं, मिळत नाहीं. परंतु दोन्हीं ठिकाणीं जर अनवकाशत्वामुळें बाध मानला तर ही परिभाषा सांगण्याचें कांहींच प्रयोजन उरत नाहीं; कारण अनवकाशत्वामुळें विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें आपोआपच बाधक ठरतें. परंतु भाष्यकारांनीं तर ही परिभाषा सांगितली आहे व ती सांगण्याचें कांहीं तरी विशेष प्रयोजन असलेंच पाहिजे. तें प्रयोजन कोणतें आहे हें आतां ग्रन्थकार पुढील पंक्तींत स्पष्ट करितात. )

**किञ्चानेन न्यायेन तत्प्रवृत्त्युत्तरमपि चारितार्थ्ये तद्बाधबोधनम् अन्यथानवकाशत्वेनैव बाधे सिद्धे एतत्कथनवैयर्थ्यापत्तेस्तक्रकौण्डिन्यन्यायप्रदर्शनस्यापि वैयर्थ्यापत्तेश्च ।**

दुसरें असें कीं या परिभाषेप्रमाणें, सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा जरी संभव असला तरी विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक होतें. या परिभाषेचा अशा प्रकारचा अर्थ न मानल्यास—ह्मणजे सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यावर विशेषशास्त्र व्यर्थ ठरणें एवढेंच बाधबीज मानल्यास,—अनवकाशत्वामुळें बाधसिद्धि होऊं शकत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा सांगण्याची कांहींच गरज नव्हती व तसेंच ( भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेच्या समर्थनार्थ जो तक्रकौंडिन्यन्याय सांगितला आहे तो ) तक्रकौंडिन्यन्याय देखील सांगण्याची कांहींच गरज नव्हती, व ते दोन्ही व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते ( एखाद्या सूत्रास जर दुसऱ्या सूत्राला बाधल्याखेरीज प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थल मिळत नाहीं तर तशा ठिकाणीं तें सूत्र त्या दुसऱ्या सूत्राचें बाधक होतें

हें सांगण्याकरितां कोणतीहि परिभाषा पठित करण्याची आवश्यकता नाहीं. कारण तशा ठिकाणीं तें सूत्र अनवकाशत्वामुळें आपोआपच दुसऱ्या सूत्राचें बाधक ठरतें; तसें न मानल्यास, तें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व कोणतेंहि पाणिनीय सूत्र व्यर्थ ठरूं शकत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. पण ज्याअर्थीं ही परिभाषा मुद्दाम भाष्यकारांनीं पठित केली आहे व तिच्या समर्थनार्थ तक्रकौडिन्यन्याय सांगितला आहे त्याअर्थीं हें स्पष्ट होतें कीं दोन सूत्रांतील उद्देश्यांत व्याप्यव्यापकभाव असल्यास जसें व्याप्यसूत्र व्यापकसूत्राचें अनवकाशत्वामुळें बाधक ठरतें, तसेंच व्यापकसूत्राची प्रवृत्ति झाल्यानंतर व्याप्यसूत्र प्रवृत्त होण्याचा संभव असला तरी व्याप्यसूत्र व्यापकसूत्राचें बाधक होतें. हेंच द्वितीय बाधबीज होय, व ' सत्यपि सम्भवे बाधनं भवति ' असा जो भाष्यकारांनीं सिद्धान्त सांगितला आहे त्याला धरूनच हें द्वितीय बाधबीज सांगितलें आहे, व या बाधबीजालाच तक्रकौडिन्यन्याय लागू पडतो, व या बाधबीजान्वयें विशेषशास्त्रानें सामान्यशास्त्र नेहमीकरितां बाधित होतें. ' तदप्राप्तियोग्येऽचारितार्थ्येऽपि कृत चारिता-र्थ्यम् ' अशा रीतीनें वैयाकरण हें द्वितीय बाधबीज पठित करितात व याचें उदाहरण ' सर्वेषाम् ' हें देतात. ' सर्व ' या अदन्त सर्वनामाचें षष्ठीचें बहुवचन करितांना ' सर्व+आम् ' अशा स्थितींत,–' ह्रस्वनद्यापो नुट् ' सू० २०८ व ' आमि सर्वनाम्नः सुट् ' सू० २१७ या दोन सूत्रांची प्राप्ति होते. ' आमि सर्वनाम्नः सुट् ' हें विशेष-शास्त्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ' ह्रस्वनद्यापो नुट् ' या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहेच. ह्मणून तें विशेषसूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. प्रकृतउदाहरणांत ' ह्रस्वन-द्यापो नुट् ' या सामान्यशास्त्रान्वयें ' आम् ' प्रत्ययाला प्रथम नुडागम केल्यास, ' नाम् ' हा नुडागमसहित प्रत्यय यदागमपरिभाषेच्या आधारें ' आम् ' च आहे अशी बुद्धि केल्यानें, ' आमि सर्वनाम्नः सुट् ' हें विशेषशास्त्र नंतर प्रवृत्त होऊं शकतें व अशा रीतीनें चरितार्थ ठरूं शकतें तथापि अशा ठिकाणीं देखील, या द्वितीय बाधबी-जान्वयें, विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां बाधक ठरतें, व सामान्यशास्त्रास प्रथम किंवा नंतर प्रवृत्त होऊं न देतां स्वतःच प्रवृत्त होतें. त्यामुळें प्रकृत स्थलीं ' आम् ' प्रत्ययास नुडागम न होतां ' सुट् ' आगम होऊन ' सर्व+साम् ' अशी स्थिति झाली असतां, ' बहुवचने झल्येत् ' सू० २०५ या सूत्रानें अकाराचे जागीं एकार होऊन व नंतर ' आदेशप्रत्यययोः ' सू० २१२ या सूत्रानें षत्व होऊन ' सर्वेषाम् ' असें इष्ट रूप सिद्ध होतें. या द्वितीय बाधबीजांत विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें अनवकाशत्वामुळें बाधक ठरत नसून अपवादत्वामुळें बाधक ठरतें आणि नेहमी करितां बाधक ठरणें हेंच ह्या द्वितीय बाधबीजाचें वैशिष्ट्य आहे. व त्यामुळेंच या बाधबीजाला तक्रकौडिन्यन्याय लागू पडतो. या न्यायाचें स्वरूप पुढें लौकरच सांगण्यांत येईल. आतां ग्रन्थकार या द्वितीय बाधबीजाचीं कांहीं उदाहरणें देतात. )

**यथा प्रथमद्विर्वचनस्य तदुत्तरं सावकाशेनापि द्वितीयद्विर्वचनेन बाधः । यथा वादेरपि प्रवृत्त्या चरितार्थेनादेः परस्येत्यनेनालोऽन्त्यस्येत्यस्य**

बाधः ॥ तदुक्तं मिदचोऽन्त्यादिति सूत्रे भाष्ये सत्यपि सम्भवे बाधनं भवतीति । अन्यथा ब्राह्मणेभ्यो दधि दीयतां तक्रं कौण्डिन्यायेत्यत्र तक्रदानेन दधिदानस्य बाधो न स्यात्तद्दानोत्तरं तत्पूर्वं वा तद्दानस्य चारितार्थ्यसम्भवात् ॥

जसें 'एकाचो द्वे प्रथमस्य' सू० २१७५ या सूत्रान्वयें अजादि अनेकाच् धातूच्या प्रथम एकाचाचें द्विर्वचन करून नंतर 'अजादेर्द्वितीयस्य' या सूत्रान्वयें धातूच्या द्वितीय एकाचाचें द्विर्वचन केल्यानें 'अजादेर्द्वितीयस्य' हें सूत्र सावकाश ठरण्याचा संभव आहे तरी, तें सूत्र 'एकाचो द्वे प्रथमस्य' या सूत्राचें बाधक ठरतें ( व अजादि अनेकाच् धातूच्या प्रथम एकाचाचें द्वित्व न होतां, द्वितीय एकाचाचेंच द्वित्व होतें. ) त्याचप्रमाणें 'अलोऽन्त्यस्य' सू० ४२ या सूत्रान्वयें अन्त्य अलाचे जागीं आदेश केल्यानंतर 'आदेः परस्य' सू० ४४ या सूत्रान्वयें प्रथम अलाचे जागीं आदेश केल्यानें जरी 'आदेः परस्य' हें सूत्र चरितार्थ ठरण्याचा संभव आहे तरी तें सूत्र 'अलोऽन्त्यस्य' या सूत्राचें बाधक ठरतें. ( व 'आदेः परस्य' या सूत्राच्या विषयांत 'अलोऽन्त्यस्य' हें सूत्र प्रवृत्त न होतां, 'आदेः परस्य' हेंच सूत्र प्रवृत्त होतें. 'एकाचो द्वे प्रथमस्य' व 'अलोऽन्त्यस्य' हीं दोन्हीं सामान्यशास्त्रें आहेत, व अजादेर्द्वितीयस्य' व 'आदेः परस्य' हीं विशेषशास्त्रें आहेत. जेथें जेथें हीं विशेषशास्त्रें प्रवृत्त होऊं पाहतात तेथें तेथें सामान्यशास्त्रांची अवश्यप्राप्ति आहेच व सामान्यशास्त्रें प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्रें प्रवृत्त होऊन तीं चरितार्थ ठरण्यांचा संभव आहे. तरी पण 'सत्यपि सम्भवे बाधनं भवति' या द्वितीय बाधबीजान्वयें, विशेषशास्त्रें सामान्यशास्त्रांची नेहमीकरितां बाधक ठरून स्वतःच प्रवृत्त होतात व सामान्यशास्त्रांची मुळींच प्रवृत्ति होऊं देत नाहींत.) 'मिदचोऽन्त्यात्परः' १–१–४७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात कीं उत्सर्गशास्त्रानें कार्य केल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असला तरी विशेषशास्त्र उत्सर्गशास्त्राचें बाधक ठरतें; तसें न मानल्यास, 'ब्राम्हणांना दही द्या, कौण्डिन्यास ताक द्या' अशा स्थलीं, कौण्डिन्यास दही देण्यापूर्वीं किंवा दही देण्यानंतर ताक देण्याचा संभव असल्यामुळें, तक्रदानानें दधिदानाचा बाध होऊं शकणार नाहीं. (वास्तविक या स्थलीं आज्ञा देणाऱ्याचा आशय हा आहे कीं 'कौण्डिन्यास फक्त ताकच द्या, दही देऊं नका. कौण्डिन्य खेरीजकरून इतर सर्व ब्राम्हणांस दही द्या;' व ज्याअर्थी भाष्यकारांनीं हा तक्रकौण्डिन्यन्याय प्रकृतपरिभाषेच्या समर्थनार्थ सांगितला आहे त्याअर्थी उत्सर्गशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असला तरी, विशेषशास्त्र उत्सर्ग शास्त्राचें बाधक ठरतें असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ होतो हें स्पष्ट होतें. केवळ अनवकाशत्वामुळें, उत्सर्गशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक ठरत असतें तर भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेच्या समर्थनार्थ तक्रकौण्डिन्यन्यायाचा दाखला दिला नसता. )

**अत एव विषयभेदेऽप्यपवादत्वम् । अत एवाचि रादेशेन नुटोऽप्यपवादत्वाद्बाधमाशङ्क्य न तिसृचतसृ ज्ञापकेन समाहितं तृज्वत्सूत्रे भाष्ये ।**

'सत्यपि संभवे बाधनं भवति' असा न्याय आहे म्हणूनच, उत्सर्गशास्त्र व अपवादशास्त्र यांचे विषय—म्हणजे कार्यी–भिन्न असले तरी अपवादशास्त्र उत्सर्गशास्त्राचें बाधक होतेंच. असा नियम असल्यामुळेंच, 'तृज्वत्क्रोष्टुः' ७·१-९५ या सूत्रावरील भाष्यांत 'अचि र ऋतः' सू. २९९ हें अपवादसूत्र असल्यामुळें त्या सूत्रान्वयें ऋकाराचे जागीं होणाऱ्या रेफादेशानें, 'ऱ्हस्वनद्यापो नुट्' सू २०८ या सामान्यसूत्रानें 'आम्' प्रत्ययाला होणाऱ्या नुडागमाचा बाध होण्याची आपत्ति येते अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचें समाधान भाष्यकारांनीं 'न तिसृचतसृ' सू ३०० या ज्ञापकसूत्राच्या आधारानें केलें आहे (अचि र ऋतः' या सूत्रानें 'तिसृ' व 'चतसृ' ह्या शब्दापुढें अजादि विभक्तिप्रत्यय आल्यास त्यांतील ऋकाराचे जागीं रेफादेश होतो. 'तिसृ+आम्' ह्या स्थितींत, 'तिसृ' शब्दापुढें 'आम्' हा अजादिविभक्तिप्रत्यय आल्यामुळें, वरील सूत्राची प्राप्ति होतें, व तसेंच 'तिसृ' हें ऱ्हस्वान्त अङ्ग असल्यामुळें, 'ऱ्हस्वनद्यापो नुट्' ह्या सूत्रानें 'आम्' प्रत्ययास नुडागमाची प्राप्ति होते. रेफादेशाची प्राप्ति 'तिसृ' ह्या प्रकृतीतील अन्त्य ऋकारास आहे, व नुडागमाची प्राप्ति 'आम्' प्रत्ययास आहे. सारांश येथें 'ऱ्हस्वनद्यापो नुट्' ह्या सामान्यशास्त्राचें व 'अचि र ऋतः' ह्या विशेषशास्त्राचें कार्यी भिन्न आहेत. असें असून देखील, 'अचि र ऋतः' हें विशेष शास्त्र 'ऱ्हस्वनद्यापो नुट्' ह्या सामान्यशास्त्राचा बाध करतें; व तें प्रथम प्रवृत्त झाल्यास, तिसृ' हें ऱ्हस्वान्त अङ्ग राहत नाहीं; 'तिस्र्' असें हलन्त अङ्ग होणार, व त्यामुळें 'आम्' प्रत्ययाला नुडागम होऊं शकणार नाहीं, व 'तिस्राम्' असें षष्ठीच्या बहुवचनाचें विकृतरूप होणार. म्हणूनच वार्तिककारांनीं 'नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् पूर्वविप्रतिषेधेन' असें वार्तिक केलें आहे; व ह्या वार्तिकान्वयें रेफादेशाचा बाध होऊन नुडागम होतो. परंतु भाष्यकारास हा पूर्वविप्रतिषेध मान्य नाहीं. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, पाणिनीनें 'न तिसृचतसृ' हें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, रेफादेशानें नुडागमाचा बाध होत नाहीं; कारण तसा बाध झाला असते तर, 'तिसृचतसृ इत्येतयोः नामि दीर्घो न स्यात्' ह्या अर्थाचें वरील सूत्र पाणिनीनें केलें नसतें. रेफादेश केल्यास हलन्त अङ्ग होत असल्यामुळें, नुडागम प्राप्तच होत नाहीं, व त्यामुळें दीर्घाचीहि प्राप्ति होत नाहीं. पण 'प्राप्तस्यैव प्रतिषेधः' असा न्याय असल्यामुळें, 'न तिसृचतसृ' ह्या निषेधात्मक सूत्रावरून हें स्पष्ट होतें कीं, 'तिसृ' व 'चतसृ' ह्यापुढें नुडागमसहित 'आम्' प्रत्यय–म्हणजे 'नाम्'–येतो; व नुडागम रेफादेशाचा बाधक मानल्याशिवाय तसा नुडागमसहितप्रत्यय येऊं शकत नाहीं म्हणून पूर्वविप्रतिषेधाचा आश्रय करण्याची येथें गरज नाहीं, व नुडागम रेफादेशाचा बाधक होतो हें 'न तिसृचतसृ' ह्या निषेधात्मक सूत्रावरूनच सिद्ध होतें. सारांश 'अचि र ऋतः' हें अपवादात्मक सूत्र असल्यामुळें जरी त्यानें, सामान्य

शास्त्रानें होणाऱ्या नुडागमाचा बाध करणें योग्य आहे तरी, 'न तिसृचतसृ' ह्या ज्ञापक सूत्रामुळें रेफादेश नुडागमाचा बाधक न होतां, नुडागमच रेफादेशाचा बाधक होतो. )

तेन विषयभेदेऽपवादत्वाभाव एव बोध्यते इति कश्चित्, तन्न। विन्मतोर्लुका टिलोपमात्रस्य बाधानापत्तेः।

भाष्यकारांचें असें मत असल्यामुळें, कार्यी भिन्न असल्यास अपवाद उत्सर्गाचा बाधक होत नाहीं असें जें एका वैयाकरणानें म्हटलें आहे तें म्हणणें (भाष्यविरुद्ध असल्यामुळें) बरोबर नाहीं; कारण तें बरोबर मानल्यास, 'विन्' व 'मतुप्' ह्यांच्या लुकानें सर्व प्रकारच्या 'टि' लोपाचा बाध न होण्याची आपत्ति येईल. ('अस्मायामेधास्रजो विनिः सू० १९२८ ह्या सूत्रानें 'स्रज्' ह्याला 'विन्' प्रत्यय होऊन 'स्रग्विन्' असें रूप होतें. 'अतिशयेन स्रग्वी' ह्या अर्थांत 'स्रग्विन्' ह्या शब्दास 'इष्ठ' प्रत्यय केल्यास, 'स्रज् + विन् + इष्ठ' अशा स्थितींत, 'विन्मतोर्लुक्' सू० २०२० ह्या सूत्रानें 'विन्' प्रत्ययाचा लुक् होऊन, स्रज् + इष्ठ =' स्रजिष्ठ' असें रूप होतें. 'इष्ठ' प्रत्यय पुढें आल्यास, 'टि' लोप होण्यासंबंधाचें 'टेः' सू०१७८६ हें सामान्य सूत्र आहे. 'विन्मतोर्लुक्' हें 'विन्' व 'मतुप्' ह्यांच्याच लुकासंबंधी सूत्र असल्यामुळें, तें विशेषसूत्र आहे. दोहोंचे कार्यी भिन्न आहेत. विशेषशास्त्राचा कार्यी 'विन्' प्रत्यय आहे व सामान्यशास्त्राचा कार्यी 'स्रज्' ह्या प्रकृतींतील 'टि' —म्हणजे 'अज्'—आहे. दोहोंचे कार्यी भिन्न असल्यामुळें, विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक होत नाहीं असें मानल्यास, 'विन्मतोर्लुक्' ह्या विशेषशास्त्रानें 'टेः' ह्या सामान्यशास्त्रानें होणाऱ्या टिलोपाचा बाध होणार नाहीं; व तसा बाध न झाल्यास, 'स्रज् + विन् + इष्ठ=स्रज् + ० + इष्ठ= स्र् + इष्ठ=' स्रिष्ठ ' असें विकृत रूप सिद्ध होण्याची आपत्ति येईल. परंतु कार्यी भिन्न असले तरी विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचा बाध करतें हें भाष्यकाराचें मत स्वीकारल्यास, ती आपत्ति टळते, आणि म्हणूनच तें मत स्वीकारलें पाहिजे. )

यत्तु दयतेर्दिगीति सूत्रे द्वित्वोत्तरं दिग्यादेशस्य चारितार्थ्यं कैयटेनोक्तं तत् प्रौढ्या ध्वनितं च तेनापि तस्य तथात्वं तदुत्तरग्रन्थेन॥

'दयतेर्दिगिलिटि' ७-४-९ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत, द्वित्व केल्यानंतर दिग्यादेशाचें सूत्र चरितार्थ ठरतें असें जें कैयटानें म्हटलें आहे ती केवळ प्रौढोक्ति होय. तें म्हणणें बरोबर नाहीं हें कैयटानें स्वतःच त्याच सूत्रावरील भाष्याच्या पुढील वृत्तींत ध्वनित केलें आहे. ('दयतेर्दिगि लिटि' सू. २३८८ या सूत्रावर 'साभ्यासस्येति वक्तव्यम्' असें वार्तिककारानें वार्तिक केलें आहे. हें वार्तिक करण्याचा हेतु हा कीं, जरी दिग्यादेशाचें सूत्र परसूत्र आहे तरी या ठिकाणीं पूर्वविप्रतिषेध मानून प्रथम 'देङ्' धातुचें द्विर्वचन करावें व नंतर साभ्यास 'देङ्' धातूचे

ठिकाणीं ' दिगि ' असा आदेश करावा; नाहींतर ' दिग्ये ' असें लिटाचें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. यावर शंकाकार असें म्हणतो कीं, ' देङ् ' धातूचें द्विर्वचन प्रथम केल्यावर ' देङ्देङ् ' हा स्थानिवद्भावानें ' देङ् ' आहे असें समजून त्याचे जागीं ' दिगि ' असा आदेश करता येतो व इष्टरूप सिद्ध करता येतें, आणि म्हणून वरील वार्तिक असण्याची कांहींच गरज नाहीं या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात कीं, दिग्यादेशाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्याया-न्वयें द्विर्वचनापूर्वी दिग्यादेशाचीच प्राप्ति होते; व दिग्यादेश प्रथम केल्यावर ' पुनः प्रसङ्गविज्ञानात् सिद्धम् ' या न्यायान्वयें ' दिगि ' या आदेशाला द्विर्वचनाची प्राप्ति होते व ' दिगि ' याचें द्विर्वचन केल्यास ' दिग्ये ' असें लिटाचें इष्टरूप सिद्ध न होतां, 'दिदिग्ये' असें अनिष्टरूप होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्या-करितां वरील वार्तिक मानणें भाग आहे. या वार्तिकसमर्थनपर एकदेशी भाष्याच्या टीकेंत विप्रतिषेधन्यायाचें समर्थन करतांना असें म्हटलें आहे कीं, ' लिटि धातोरन-भ्यासस्य ' सू. २१७७ हें सूत्र ' पपाच ' इत्यादि स्थलीं सावकाश असून, ' दयतेर्दिगि लिटि ' हें सूत्र द्विर्वचन करून दिग्यादेश केल्यानें सावकाश आहे, व अशा रीतीनें दोन्हीं सूत्रें सावकाश ठरत असल्यामुळें, येथें विप्रतिषेधन्याय लागू पडतो. या कैयटाच्या टीकेसंबंधानें ग्रन्थकार असे म्हणतात कीं एकदेशिभाष्याचें कसें तरी समर्थन करण्याकरितां कैयटानें असें म्हटलें आहे, पण तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' लिटि धातोरनभ्यासस्य ' हें सामान्यशास्त्र असून ' दयतेर्दिगि लिटि ' हें विशेषशास्त्र आहे, व जेथें जेथें ' दयतेर्दिगि लिटि ' हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ' लिटि धातोः ' या सूत्राची अवश्यप्राप्ति आहे. म्हणून या ठिकाणीं दिग्यादेशाचें सूत्र अनवकाशत्वा-मुळें बलवत्तर ठरत असल्यामुळें, दोन तुल्यबल सूत्रांचे ठिकाणीं लागू पडणारा विप्रति-षेधन्याय येथें लागू पडत नाहीं, व ' येन नाप्राप्ते ' हाच न्याय येथें लागू पडतो, व त्या न्यायान्वयें ' दयतेर्दिगि लिटि ' हें विशेषशास्त्र ' लिटि धातोरनभ्यासस्य ' या सामान्यशास्त्राचें नेहमींकरितां बाधक ठरत असल्यामुळें, दिग्यादेश प्रथम झाल्यावर द्विर्वचनाची प्राप्तिच होऊं शकत नाहीं. भाष्यकारांनीं सिद्धान्तभाष्यांत हेंच सांगितलें आहे व त्या भाष्याच्या टीकेंत कैयटानें स्पष्ट म्हटलें आहे कीं ' अनवकाशो दिग्यादेश इति पूर्वं सामान्यविशेषभावमनाश्रित्योभयो : सावकाशत्वमुक्तम् इदानीं तु सामान्य-विशेषाश्रयेण नाप्राप्ते द्विर्वचने आरभ्यमाणस्य दिग्यादेशस्यापवादत्वमुच्यते '. या कैयटो-क्तिवरून हें सिद्ध होतें कीं त्याची पूर्वोक्ति केवळ उपचारार्थ—म्हणजे एकदेशिभाष्याचें कसें तरी समर्थन करण्याकरितां—असून शास्त्रीयसिद्धान्तास धरून नसल्यामुळें, ती केवळ प्रौढोक्ति आहे व स्वीकारार्ह नाहीं. )

**असम्भव एव बाधकत्वं विरोधस्य तद्बीजत्वादिति वार्तिकमतं तु भाष्यकृता दूषितत्वान्न लक्ष्यसिद्ध्युपयोगि ॥**

वार्तिककारांचें असें मत आहे कीं जेथें सामान्यशास्त्र व विशेषशास्त्र एकेचवेळीं प्रवृत्त होण्याचा संभव नसेल तशाच ठिकाणीं विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें बाधक होतें; कारण दोहोंत विरोध असणें हेंच बाधकत्व येण्यास कारणीभूत होतें. परंतु भाष्यकारांनीं ( 'सत्यपि संभवे बाधनं भवति' असें सांगून ) हें वार्तिककाराचें मत दूषित केलें असल्यामुळें, तें मत इष्टरूपसिद्धि करण्याकरितां स्वीकारतां येत नाहीं.

**तक्रकौण्डिन्यन्यायोऽपि तदप्राप्तियोग्येऽचरितार्थविषयो विधेयविषय एव चेति तद्धितेष्वचामादेर्धातोरेकाच इत्यादिसूत्रेषु भाष्ये स्पष्टम् ॥९८॥**

'तद्धितेष्वचामादेः' ७–२–११७ व 'धातोरेकाचः' ३–१–२२ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत असें सांगितलें आहे कीं, जेथें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहे आणि ज्यानां उद्देशून विधेय सांगितलें आहे त्या दोहोंत व्याप्यव्यापकभाव आहे तशाच ठिकाणीं तक्रकौण्डिन्यन्याय देखील लागू पडतो. ( 'ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम्, तक्रं कौण्डिन्यन्याय' या तक्रकौण्डिन्यायांत, 'ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम्' या सामान्यवचनांत, दधिदान हें विधेय असून त्या विधेयाचें 'ब्राह्मण' हे उद्देश्य आहेत. 'तक्रं कौण्डिन्याय' या विशेषवचनांत, तक्रदान विधेय असून त्या विधेयाचा 'कौण्डिन्य ब्राह्मण' हा उद्देश्य आहे. दोन्हीं वाक्यांत विधेयें भिन्न असून, त्या विधेयांचे जे उद्देश्य–ह्मणजे ब्राह्मण व कौण्डिन्य–आहेत त्या दोहोंत व्याप्यव्यापकभाव आहे; कारण कौण्डिन्य हा व्याप्य असून तो 'ब्राह्मण' या व्यापकांत अन्तर्भूत आहे. ह्मणून कौण्डिन्यास जें तक्रदान सांगितलें आहे त्यानें, त्याचें ठिकाणीं, दधिदानाचा नेहमीकरितां बाध होतो, व त्याला केवळ तक्र मिळतें व दधि मिळत नाहीं. हा न्याय 'एकाचो द्वे प्रथमस्य' व 'अजादेर्द्वितीयस्य' सू० २१७६ व २१७७ या सूत्रांस लागू पडतो. 'एकाचो द्वे प्रथमस्य' या सामान्यशास्त्रांत, प्रथम एकाचाचें द्वित्व होणें हें विधेय असून त्या विधेयाचें 'धातु' हें उद्देश्य आहे. अजादेर्द्वितीयस्य' या विशेषशास्त्रांत, द्वितीय एकाचाचें द्वित्व होणें हें विधेय असून, त्या विधेयाचें 'अजादि अनेकाच् धातु' हें उद्देश्य आहे. या स्थलीं विधेयें भिन्न असून, विधेयांच्या उद्देश्यांत व्याप्यव्यापकभाव आहे; कारण 'धातु' हें उद्देश्य व्यापक असून, 'अजादि अनेकाच् धातु' हें उद्देश्य धातूंत अन्तर्भूत असल्यामुळें व्याप्य आहे. ह्मणून वर सांगितल्याप्रमाणें, या दोन सूत्रांना तक्रकौण्डिन्यन्याय लागून, 'एकाचो द्वे प्रथमस्य' या सामान्यशास्त्राचें 'अजादेर्द्वितीयस्य' हें विशेषशास्त्र नेहमीकरितां बाधक ठरतें. तसेंच 'अलोऽन्त्यस्य' व 'आदेः परस्य' सू० ४२ व ४४, आणि 'न्हस्वनद्यापो नुट्' व 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू० २०८ व २१७ या सूत्रांत विधेयें भिन्न असून उद्देश्यांत व्याप्यव्यापकभाव असल्यामुळें, या सूत्रांना देखील तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडतो, व 'आदेः परस्य' आणि 'आमि सर्वनाम्नः सुट्' हीं विशेषशास्त्रें आपापल्या सामान्यशास्त्राचीं नेहमीकरितां बाधक ठरतात. पण जेथें उद्देश्यांत व्याप्य-

व्यापकभाव नाहीं तेथें हा न्याय लागू पडत नाहीं. जसें–'अचो ञ्णिति' व 'तद्धितेष्वचामादेः' सू० २५४ व १०७५ या दोन्ही अङ्गाधिकारांतील सूत्रांत 'अङ्ग' हें उद्देश्य असून, प्रथम सूत्रानें अन्त्य अचाला वृद्धि सांगितली आहे व द्वितीय सूत्रानें आद्यचाला वृद्धि सांगितली आहे. येथें उद्देश्यांत किंवा विधेयांत व्याप्यव्यापकभाव नसून, केवळ निमित्तांमध्यें व्याप्यव्यापकभाव आहे; कारण प्रथम सूत्रांत वृद्धीचें निमित्त सामान्य ञित् किंवा णित् प्रत्यय असून, दुसऱ्या सूत्रांत वृद्धीचें निमित्त विशेष–ह्मणजे तद्धित–ञित् किंवा णित् प्रत्यय आहे. ह्मणून या ठिकाणीं तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडत नाहीं.)

---

## परिभाषा ५९

काचित्तु सर्वथानवकाशत्वादेव बाधकत्वं यथा ङेरामो याडादिबाधकत्वम्। न हि याडादिषु कृतेषु ङेराम् प्राप्नोति निर्दिश्यमानस्य व्यवधानात्। तत्र स्वस्य पूर्वं प्रवृत्तिरित्येव तेषां बाधः। तत्र बाधके प्रवृत्ते यद्युत्सर्गप्राप्तिर्भवति तदा भवत्येव यथा तत्रैव याडादयः। अप्राप्तौ तु न, यथा पपेयुरित्यादौ दीर्घबाधके निरवकाश इयादेशे दीर्घाभावः। तदेतत्पठ्यते ॥

कोठें कोठें सर्वथा अनवकाशत्वामुळेंच, एक सूत्र दुसऱ्या सूत्राचें बाधक ठरतें. (सामान्यशास्त्रानें सर्व जागा व्यापली असल्यामुळें–ह्मणजे जेथें जेथें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें–जेथें विशेषशास्त्र सामान्यशास्त्रापूर्वी प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व तसेंच सामान्यशास्त्राची प्रथम प्रवृत्ति झाल्यास विशेषशास्त्राच्या प्रवृत्तीचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं, अशा स्थलीं—म्हणजे सामान्यशास्त्राच्या प्रवृत्तीपूर्वी किंवा सामान्यशास्त्राच्या प्रवृत्तीनंतर देखील जेथें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं अशा-स्थलीं–विशेषशास्त्र सर्वथा अनवकाश ठरत असल्यामुळें, तें सामान्यशास्त्राचें बाधक होतें. ग्रन्थकारानें प० ५८ च्या आरंभीं 'तदप्राप्तियोग्येऽचारितार्थ्यं ह्येतस्य बाधकत्वे बीजम्' असें म्हटलें आहे. ही सामान्योक्ति असून तिचा अर्थ असा आहे कीं एकसूत्र दुसऱ्या सूत्राचें बाधक ठरण्याकरितां हें आवश्यक आहे कीं जेथें जेथें तें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें दुसऱ्या सूत्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें, तें व्यर्थ ठरण्याचा संभव आहे. अशी स्थिति असली तरच दोन सूत्रांत बाध्यबाधकभाव उत्पन्न होतो, नसली तर उत्पन्न होत नाहीं. पुढें ग्रन्थकार या वरील सामान्योक्तीचे दोन विभाग करितात. (१) 'तदप्राप्तियोग्येऽचारितार्थ्ये कृते चारितार्थ्यम्' (२) 'तदप्राप्तियोग्येऽचारितार्थ्ये कृतेऽचारितार्थ्यम्.' प्रथम भागाचें विवेचन प० ५८ मध्यें करून आतां

ग्रन्थकार द्वितीय भागाचें विवेचन प्रकृतपरिभाषेंत करितात. या द्वितीयभागाचे देखील दोन पोटभेद आहेत; एक पोटभेद हा कीं, अनवकाशत्वामुळें विशेषशास्त्राची प्रथम प्रवृत्ति झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें, सामान्यशास्त्र मुळींच प्रवृत्त होऊं न शकणें, व पूर्वी सांगितल्याप्रमाणें हेंच प्रथम बाधबीज मानलें गेलें आहे. द्वितीयभागाचा दुसरा पोटभेद हा आहे कीं, अनवकाशत्वामुळें विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त नष्ट होत नसल्यामुळें, सामान्यशास्त्र देखील नंतर प्रवृत्त होणें. हेंच तृतीय बाधबीज होय. सामान्यशास्त्राची सर्वत्र अवश्यप्राप्ति असल्यामुळें तें प्रथम प्रवृत्त झाल्यावर, जेथें विशेषशास्त्र नंतर प्रवृत्त होण्याचा संभव आहे तेथें देखील, विशेषशास्त्र सावकाश असूनहि, सामान्यशास्त्राचें बाधक ठरतें हें द्वितीय बाधबीज होय व याचेंच विस्तृत विवेचन ग्रन्थकारानें प० ५८ मध्यें केलें आहे. द्वितीय बाधबीजस्थलींच बाधक ठरणाऱ्या सूत्रास अपवाद म्हणतात, पण प्रथम व तृतीय बाधबीजस्थलीं बाधक ठरणाऱ्या सूत्रास अपवाद असें म्हणतां येत नाहीं हें आतां ग्रन्थकार सांगणार आहेत व तसें म्हणण्याचें कारण काय आहे हें देखील सांगणार आहेत. सारांश द्वितीय बाधबीजस्थलीं विशेषशास्त्र अपवादत्वामुळें सामान्यशास्त्राचें बाधक ठरतें, व या स्थलींच तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडतो. प्रथम व तृतीय बाधबीजस्थलीं विशेषशास्त्र अनवकाशत्वामुळें सामान्यशास्त्राचें बाधक ठरतें व या दोन्हीं बाधबीजस्थलीं तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडत नाहीं. प्रथम व तृतीय बाधबिजांत हा फरक आहे कीं, प्रथम बाधबीजस्थलीं विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त राहत नसल्यामुळें, विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमींकरितां बाधक ठरतें; पण तृतीय बाधबीजस्थलीं विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त कायम राहत असल्यामुळें, सामान्यशास्त्र नंतर प्रवृत्त होतें. या तृतीय बाधबिजांत विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमींकरितां बाधक ठरत नाहीं, व त्याची बाधकता एवढ्याच पुरती असते कीं तें सामान्यशास्त्रास प्रथम प्रवृत्त होऊं न देतां, स्वतःच प्रथम प्रवृत्त होतें, व नंतर सामान्यशास्त्राची प्रवृत्ति होण्याच्या आड येत नाहीं. या तृतीय बाधबीजस्थलीं माठरकौण्डिन्यपरिवेषणन्याय लागू पडतो. 'हयवरट्' या माहेश्वरसूत्रावरील भाष्यांत तो न्याय भाष्यकारांनीं सांगितला आहे व तो असा आहे. 'ब्राम्हणा भोज्यन्तां माठरकौण्डिन्यौ परिवेविषातामिति । नेदानीं तौ भुञ्जाते. ' या न्यायाचा अर्थ असा आहे कीं ' ब्राम्हणांना भोजन घाला. माठर व कौण्डिन्य या दोन ब्राम्हणांनीं वाढावें.' त्यांचेकडे वाढण्याचें काम सोंपलें असल्यामुळें ते इतर ब्राम्हणांच्या पंक्तींत भोजन करूं शकत नाहींत, त्यांचें वाढण्याचें काम संपल्यानंतरच ते भोजन करूं शकतात. या ठिकाणीं इतर ब्राम्हणांच्या पंक्तींत भोजनास बसूं न शकणें हीच बाधकता आहे. वाढण्याचें काम संपल्यावर त्यांनीं भोजन करण्यास कांहीं हरकत नाहीं. सारांश, त्यांचें भोजन नेहमींकरितां बाधित होत नसून वाढण्याचें काम संपे-

पर्यंतच बाधित होतें, आणि हाच न्याय वर सांगितल्याप्रमाणें तृतीय बाधबीजांत लागू पडतो. तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडला असला तर जसें तक्रदान दधिदानाचें नेहमी-करितां बाधक ठरतें तसें विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्राच्या प्रवृत्तीचें निमित्त उपलब्ध असून देखील विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां बाधक ठरलें असतें. आतां ग्रन्थकार तृतीय बाधबीजाचें उदाहरण देतात) जसें 'ङेराम्' सू० २७० हें सूत्र 'याडापः' सू. २९० या सूत्राचें बाधक ठरतें. याडागम प्रथम केल्यास 'ङि'-चे जागीं आमादेश होऊं शकत नाहीं; कारण 'ङेराम्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेला जो 'ङि' (व ज्याचे जागीं आमादेश होणें सांगितलें आहे) त्यांत व आबन्त अङ्गांत याडागमाचें व्यवधान होतें. अशा ठिकाणीं बाधकसूत्राची बाध्यसूत्राच्या पूर्वी प्रवृत्ति होणें एवढ्याचपुरती त्याची बाधकता असते. बाधकसूत्र प्रवृत्त झाल्यानंतर जर उत्सर्गशास्त्राची प्राप्ति होत असेल तर तें उत्सर्गशास्त्र देखील प्रवृत्त होतेंच. जसें वरील उदाहरणांत 'ङि'-चे जागीं आमादेश झाल्यावर याडागम होतो. बाधकसूत्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर जर उत्सर्गशास्त्राची प्राप्ति होत नसेल तर तें उत्सर्गशास्त्र प्रवृत्त होत नाहीं. जसें 'पचेयुः' या स्थलीं दीर्घाचा बाधक निरवकाश इयादेश झाल्यावर दीर्घ होत नाहीं, ('रमा' या प्रातिपदिकाचें सप्तमीचें एकवचन करितांना 'रमा + ङि' या स्थितींत 'ङेराम्' सू० २७० व 'याडापः' सू० २९० या दोन सूत्रांची प्राप्ति होते. जेथें जेथें 'ङेराम्' हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें 'याडापः' या सूत्राची अवश्यप्राप्ति आहेच आणि त्यामुळ 'ङेराम्' हें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. 'याडापः' या सूत्रानें प्रथम कार्य केल्यास, 'रमा+या+ङि (इ)' अशी स्थिति होईल व त्यामुळें 'रमा' हें आबन्त अङ्ग आणि 'ङेराम्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेला 'ङि' प्रत्यय या दोहोंत याडागमाचें व्यवधान होत असल्यामुळें, 'ङेराम्' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकणार नाहीं. या ठिकाणीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' प० १२ ही यदागमन्यायाची अपवादक परिभाषा असल्यामुळें, येथें यदागमपरिभाषा प० ११ लागू पडत नाहीं-म्हणजे याडागमसहित 'ङि' प्रत्यय 'ङि' च आहे असें मानतां येत नाहीं-आणि म्हणून 'ङेराम्' हें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें, व अनवकाशत्वामुळें' तें 'याडापः' या सामान्यशास्त्राचें बाधक ठरून प्रथम प्रवृत्त होतें; आणि तें प्रवृत्त झाल्यावर 'रमा+ङि=रमा + आम्' अशी स्थिति झाली असतां, 'याडापः' हें सामान्यशास्त्र, 'आम्' हा स्थानिवद्भावानें 'ङि' च आहे असें समजून, प्रवृत्त होतें व याडागम होतो, आणि 'रमा+या+आम्' अशी स्थिति होऊन 'रमायाम्' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. पण 'पच्' धातूचें विधिलिङाचें प्रथमपुरुषाचें बहुवचन करितांना 'यासुट् परस्मैपदेषु' सू० २२०९ या सूत्रानें 'यासुट्' आगम होऊन, व 'लिङः स लोपोऽनन्त्यस्य' सू० २२११ या सूत्रानें 'यासुट् = यास्' यांतील सकाराचा लोप होऊन, व 'झेर्जुस्' सू० २२१३ या सूत्रानें 'झि' चे जागीं 'उस्' आदेश होऊन, 'पच+या+उस्' अशी स्थिति झाली असतां, 'अतो दीर्घो यञि' सू० २१४० व 'अतो येयः' सू०

२२१२ या दोन सूत्रांची प्राप्ति होते. 'अतो दीर्घो यञि' या सूत्रानें प्रथम दीर्घकार्य केल्यास, 'पचा + या + उः' अशी स्थिति झाली असतां, अदन्त अङ्ग राहत नसल्यामुळें, 'अतो येयः' हें सूत्र प्रवृत्त होण्यास जागाच मिळत नाहीं व तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. म्हणून निरवकाशत्वामुळें तें सूत्र प्रथम प्रवृत्त होतें व 'या' चे जागीं 'इय्' असा आदेश होऊन 'पच+इय् + उः' अशी स्थिति होते. अशी स्थिति झाल्यावर अदन्त अङ्गापुढें यञ्प्रत्याहारांतील वर्णानें सुरु होणारा प्रत्यय राहत नसल्यामुळें, 'अतो दीर्घो यञि' या उत्सर्गशास्त्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व 'पचेयुः' असें इष्टरूप सिद्ध होतें. सारांश 'रमायाम्' या स्थलीं विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त कायम राहत असल्यामुळें, सामान्यशास्त्र नंतर प्रवृत्त होतें; पण 'पचेयुः' या स्थलीं विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्र प्रवृत्त होण्याचें निमित्त कायम राहत नसल्यामुळें, सामान्यशास्त्र मुळींच प्रवृत्त होऊं शकत नाहीं. ) या वरील अर्थाची ही परिभाषा सांगतात.

## क्वचिदपवादविषयेऽप्युत्सर्गोऽभिनिविशत इति ॥ ५९ ॥

"कोठें कोठें अपवादशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर देखील सामान्यशास्त्र प्रवृत्त होतें."

अपवादशब्दोऽत्र बाधकपरः ॥

या परिभाषेंतील 'अपवाद' या शब्दाचा 'बाधक' एवढाच अर्थ समजावा. ( जेथें सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यावर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असतो तशाच ठिकाणीं विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें अपवादत्वामुळें बाधक होतें आणि तशाच ठिकाणीं तशा विशेषशास्त्राला 'अपवाद' ही परिभाषिक संज्ञा लागू पडते. पण जेथें विशेषशास्त्र अनवकाशत्वामुळें सामान्यशास्त्राचें बाधक ठरतें तशा ठिकाणीं 'अपवाद' ही परिभाषिकसंज्ञा लागू पडत नाहीं, व तशा स्थलीं 'अपवाद' शब्दाचा उपयोग केला असल्यास, त्याचा, सामान्यशास्त्राच्या अवश्यप्राप्तिमुळें सामान्यशास्त्राचा बाधक, असा लक्षणवृत्तीनें अर्थ करावा. हा जो अपवाद शब्दाचा ग्रन्थकारानें अर्थ सांगितला आहे तो बरोबर आहे हें सिद्ध करण्याकरितां ग्रन्थकार पुढील पंक्तींत भाष्याचें प्रमाण देतात.)

तदुक्तं गुणोयङ्लुकोरित्यत्र भाष्ये । अभ्यासविकारेष्वपवादा उत्सर्गान्न बाधन्ते । अजीगणत् । अत्र गणेरीत्वमपवादत्वाद्धलादिःशेषं बाधते । न गणेरीत्वमपवादत्वाद्धलादिःशेषं बाधते । किं तर्हि । अनवकाशत्वादिति ग्रन्थेन । गणरूपाभ्यासान्त्यणस्येत्वमित्यर्थे हलादिः शेषेण तन्निवृत्तौ तदनवकाशमीत्वे तु कृते न तस्य प्राप्तिरन्त्यहलोऽभावात् । अभ्यासविकारेषु बाध्यबाधकभावाभावेन च साधितम् । तस्मिंश्च सति लोपे कृते सामर्थ्या-

च्छिष्टस्यान्त्यस्येत्वमिति न दोषः । न च येन नाप्राप्तिन्यायेनापवादत्व-मप्यस्य सुवचं, तस्य चरितार्थविषयताया उक्तत्वात् ॥

'गुणो यङ्लुकोः' ७-४-८२ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार 'अभ्यास-विकारेषु अपवादा उत्सर्गान्न बाधन्ते–ह्मणजे अभ्यासांतील वर्णांचें जागीं फरक होण्याचें विधान करणाऱ्या सूत्रांमध्यें एक उत्सर्गसूत्र व दुसरें अपवादसूत्र असलें तर अपवाद-सूत्र उत्सर्गसूत्राचा बाध करीत नाहीं—अशी परिभाषा पठित करून परिभाषेचें 'अजी-गणत्' हें उदाहरण देतात व म्हणतात कीं, या उदाहरणांत 'ई च गणः' हें सूत्र अपवादत्वामुळें 'हलादिः शेषः' या सूत्राचें बाधक ठरतें. असें म्हणून लगेंच भाष्यकार पुढें म्हणतात कीं 'ई च गणः' हें सूत्र अपवादत्वामुळें 'हलादिः शेषः' या सूत्राचा बाध करीत नाहीं. तर मग तें सूत्र 'हलादिः शेषः' या सूत्राचा कशामुळें बाध करितें ? अनवकाशत्वामुळें बाध करितें. हें भाष्य अपवाद शद्बाचा जो वर अर्थ सांगि-तला आहे त्याला प्रमाण आहे. 'ई च गणः' या सूत्राचा 'गण्' रूपी अभ्या-साच्या अन्त्य णकाराचे जागीं ईकार होतो असा अर्थ असल्यामुळें, 'हलादिः शेषः' या सामान्यशास्त्रान्वयें प्रथम कार्य केल्यास, अभ्यासांतील अन्त्य णकार नाहींसा होतो, व त्यामुळें 'ई च गणः' हें विशेषशास्त्र आपलें कार्य करूं शकत नाहीं व अनवकाश ठरतें; 'ई च गणः' या विशेषशास्त्रानें प्रथम कार्य केल्यास, अभ्यासां-तील अन्त्य णकाराचे जागीं ईकार होऊन अभ्यासांत अन्त्य हल् राहत नसल्यामुळें 'हलादिः शेषः' हें सामान्यशास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं. तथापि अभ्यासांतील वर्णांचे जागीं फरक होण्याचें विधान करणाऱ्या सूत्रांमध्यें परस्परांत बाध्यबाधकभाव नसतो असें सांगून भाष्यकारांनीं 'अजीगणत्' हें रूप सिद्ध केलें आहे. तशी परिभाषा असल्यामुळें, 'हलादिः शेषः' या सामान्यशास्त्रान्वयें प्रथम अभ्यासांतील अन्त्य णकाराचा लोप केल्यावर बाकी राहिलेला जो अभ्यास–म्हणजे 'ग'–त्यांतील अन्त्य वर्णाच्या–म्हणजे अकाराच्या–जागीं, 'ई च गणः' हें सूत्र मुद्दाम केलें अस-ल्यामुळें, त्या विशेषशास्त्राच्या सामर्थ्यानें, ईकारादेश होतो व 'अजीगणत्' असें इष्टरूप होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ( ती परिभाषा नसती तर 'अजीगणत्' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकलें नसतें.) 'ई च गणः' हें विशेषशास्त्र 'येन नाप्राप्ते' या न्यायान्वयें 'हलादिः शेषः' या सामान्यशास्त्राचें अपवादत्वामुळें बाधक ठरतें असें म्हणतां येतें–असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण जेथें सामा-न्यशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यास नंतर विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असतो तशाच ठिकाणीं विशेषशास्त्रास अपवाद ह्मणतां येतें असें ( भाष्यकारांनीं ) म्हटलें आहे. ( 'गण्' धातूच्या णिजन्ताच्या लुङाचें प्रथमपुरुषाचें एकवचन करितांना, 'णिश्रि-द्रुस्रुभ्यः' सू० २३१२ या सूत्रान्वयें 'च्लि' चे जागीं 'चङ्' होऊन व 'चङि' सू० २३१५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन 'अ + गण् गण् + णि + चङ् + त्' अशी स्थिति झाली असतां, 'हलादिः शेषः' सू० २१७९ व 'ई च गणः'

सू० २५७३ हीं दोन सूत्रें प्राप्त होतात. ‘ ई च गणः ’ हें विशेषशास्त्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ‘ हलादिः शेषः ’ या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें, तें सामान्यशास्त्रापूर्वी प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व सामान्यशास्त्र प्रवृत्त होऊन ‘ गण् ’ या अभ्यासांतील अन्त्य णकाराचा लोप होत असल्यामुळें, तें सामान्यशास्त्राच्या प्रवृत्तिनंतरहि कार्य करूं शकत नाहीं. अशा रीतीनें तें सूत्र सर्वथा अनवकाश ठरत असल्यामुळें, ‘ निरवकाशा हि विधयः सावकाशान् विधीन् बाधन्ते ’ या न्यायान्वयें सामान्यशास्त्राचें बाधक ठरतें, व त्यामुळें तें प्रथम प्रवृत्त व्हावयास पाहिजे. पण तें प्रथम प्रवृत्त झाल्यास, ‘अजीगणत्’ असें इष्टरूप सिद्ध होऊं शकत नाहीं. तसें इष्टरूप सिद्ध व्हावें म्हणून भाष्यकार ‘अभ्यासविकारेष्वपवादा उत्सर्गान्न बाधन्ते’ अशी परिभाषा पठित करितात व अशी परिभाषा पठित करण्याचीं अनेक प्रयोजनें आहेत असें सांगून त्या प्रयोजनांपैकीं ‘ अजीगणत् ’ असें रूप सिद्ध होणें हेंहि एक प्रयोजन आहे असें म्हणतात. त्या परिभाषेंत ‘ अपवादाः ’ असा शब्द पठित आहे. म्हणून ‘ ई च गणः ’ हें सूत्र अपवादसूत्र आहे कीं काय या संबंधानें चर्चा करितांना भाष्यकार म्हणतात कीं ‘ ई च गणः ’ हें सूत्र ‘ हलादिः शेषः ’ या सूत्राचें अपवादत्वामुळें बाधक ठरत नसून अनवकाशत्वामुळें बाधक ठरतें. भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं जेथें एक सूत्र दुसऱ्या सूत्राचें अनवकाशत्वामुळें बाधक ठरतें तशा ठिकाणीं तें सूत्र अपवाद मानतां येत नाहीं. बाधकसूत्रास ‘ अपवाद ’ ही संज्ञा तेव्हांच लागू पडते कीं जेव्हां सामान्यशात्र प्रवृत्त झाल्यानंतर तें सूत्र प्रवृत्त होण्याचा संभव आहे. जसें, ‘एकाचो द्वे प्रथमस्य ’ सू० २१७५ हें सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर ‘ अजादेर्द्वितीयस्य ’ सू० २१७६ हें विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचा संभव असल्यामुळें, ‘ अजादेर्द्वितीयस्य ’ या सूत्राला ‘ अपवाद ’ ही संज्ञा लागू पडते; आणि म्हणूनच भाष्यकार म्हणतात कीं ‘ अभ्यासविकारेष्वपवादा उत्सर्गान्न बाधन्ते ’ अशी परिभाषा पठित न करितां, ‘अभ्यासविकारेषु बाधका न बाधन्ते’ अशी परिभाषा पठित करणें योग्य आहे, व या परिभाषेंत ‘ बाधकाः ’ अशा सामान्यशब्दाचा उपयोग केला असल्यामुळें, ती परिभाषा सर्व प्रकारच्या बाधक विशेषशास्त्रांना—मग तीं विशेषशास्त्रें अपवादत्वामुळें बाधक ठरत असोत किंवा अनवकाशत्वामुळें बाधक ठरत असोत —लागू पडण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. अशी परिभाषा असल्यामुळें, ‘ हलादिः शेषः ’ या सामान्यशास्त्राचा बाध न होतां, तें प्रथम प्रवृत्त होतें, व नंतर ‘ ई च गणः ’ हें सूत्र प्रवृत्त होऊन ‘ अजीगणत् ’ असें इष्टरूप सिद्ध होतें. सारांश या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं ‘ अपवाद ’ हा पारिभाषिक शब्द तशाच बाधक विशेषशास्त्रांना लागू पडतो कीं जीं सामान्यशास्त्र प्रवृत्त झाल्यानंतर प्रवृत्त होण्याचा संभव आहे. आतां ग्रन्थकार ‘ अपवाद ’ शब्दाचा असाच अर्थ आहे हें सिद्ध करण्याकरितां दुसऱ्या भाष्याचें प्रमाण देतात. )

इको झलित्यत्र भाष्येऽपि ध्वनितमेतत् । तत्र हि अज्झनेतिदीर्घेण गुणोत्तरं फलाभावेनानवकाशत्वाद् गुणे बाधिते दीर्घोत्तरं गुणः स्याद्दीर्घविधानं तु मिनोतेर्दीर्घे कृते सनि मीमेत्यत्र मीग्रहणेन ग्रहणेऽर्थवत्तत्र पश्चात्प्राप्तगुणबाधनार्थमिको झलिति किंत्वमित्युक्तम् । अन्यथापवादत्वेन बाधे तद्विषये उत्सर्गाप्रवृत्तेर्भाष्यस्य सूत्रस्य चासङ्गतिरिति स्पष्टमेव ॥

'इको झल्' १-२-९ या सूत्रावरील भाष्यांत देखील हें ध्वनित केलें आहे. त्या भाष्यांत असें म्हटलें आहे कीं ('सार्वधातुकार्धधातुकयोः' सू० २१६८ या सूत्रानें) गुण केल्यावर 'अज्झनगमां सनि' सू० २६१४ या सूत्रानें दीर्घ केल्यास त्या दीर्घीकरणापासून कांहींच फलनिष्पत्ति होत नाहीं. म्हणून अनवकाशत्वामुळें तें दीर्घीकरणाचें सूत्र गुणाचा बाध करतें. दीर्घीकरणानंतर गुण होऊं शकतो (पण तसें केल्यास दीर्घीकरण व्यर्थ ठरणार. तथापि दीर्घाचें विधान व्यर्थ ठरत नाहीं. ) तें दीर्घविधान अशाकरितां केलें आहे कीं ('डु मिञ् प्रक्षेपणे' हा स्वादिगणांतील ) 'मि' धातु ('अज्झनगमां सनि' या सूत्रान्वयें) दीर्घ केल्यावर 'सनि मीमाघु' सू० २६२३ या सूत्रांत पठित असलेल्या 'मी' धातूनें त्या धातूचें ग्रहण व्हावें, व अशा रीतीनें तें दीर्घविधानाचें सूत्र चरितार्थ ठरतें. आणि दीर्घ केल्यावर गुणाची प्राप्ति होत असल्यामुळें, त्या गुणाचा बाध व्हावा व प्राप्त झालेलें गुणकार्य होऊं नये म्हणून, 'इको झल्' या सूत्रांत झलादि सनाच्या किंत्वाचें विधान केलें आहे. जर अनवकाशस्थलीं देखील 'येन नाप्राप्ते' हा न्याय लागू पडूं शकत असता तर, अपवादत्वामुळें गुणाचा नेहमीकरितां बाध झालाच असता, व गुणविधायक सामान्यसूत्र प्रवृत्त होऊं शकलेंच नसतें. त्यामुळें 'इको झल्' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची व तसेंच त्या सूत्रावरील भाष्य असंगत—चूक—ठरण्याची आपत्ति येते हें उघड आहे. ( ही पंक्ति नीट ध्यानांत येण्याकरितां आपण 'चि' धातु घेऊं. 'चि + सन्' अशा स्थितींत 'सन्यङोः' सू० २३९५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन 'चिचि + सन्' अशी स्थिति झाली असतां, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू० २१६८ या सूत्रानें गुण पावला आहे व तसेंच 'अज्झनगमां सनि' सू० २६१४ या सूत्रानें 'चि' या अजन्त धातूच्या इकाराचें दीर्घ होणें पावलें आहे. गुण प्रथम केल्यास 'चिचे + सन्' अशी स्थिति होणार व 'चे' यांतील अन्त्य एकार दीर्घ असल्यामुळें त्याचा दीर्घ केल्यास 'ए' च होणार. म्हणून 'अज्झनगमां सनि' हें दीर्घीकरणाचें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. हें सूत्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें 'सार्वधातुकार्धधातुकयोः' या गुणविधायकसूत्राची अवश्यप्राप्ति आहेच. अशा रीतीनें त्या सूत्रास प्रवृत्त होण्याकरितां कोणतेंहि स्थळ मिळत नसल्यामुळें तें दीर्घीकरणाचें सूत्र अनवकाशत्वामुळें, 'निरवकाशा हि विधयः सावकाशान् विधीन् बाधन्ते' या न्यायान्वयें, गुणविधायकसूत्राचें बाधक ठरून तें प्रथम प्रवृत्त होतें. तें प्रथम प्रवृत्त झाल्यावर 'चिची + सन्' अशी स्थिति झाली असतां, गुण होण्याचें निमित्त उपलब्ध असल्यामुळें—म्हणजे इगन्ताङ्गापुढें आर्धधातुक 'सन्' प्रत्यय

असल्यामुळें—प्रकृतपरिभाषेप्रमाणें गुणविधायकसूत्र नंतर प्रवृत्त होऊं शकतें. पण गुण केल्यास ' चिचेषति ' असें सनाचें विकृत रूप होईल. दुसरें असें कीं दीर्घीकरणानंतर गुण केला असतां, दीर्घीकरण व्यर्थ ठरणार; कारण ' चि ' धातूच्या अन्त्य इकाराचा दीर्घ करून ' चिची + सन्' अशा स्थितींत गुण केल्यावर ' चिचे + सन् ' असें रूप होणार, व दीर्घ न करितां गुण केला तरी ' चिचि + सन् = चिचे + सन् ' असेंच रूप होणार. मग दीर्घीकरणाचें सूत्र कशास केलें ? तें सूत्र व्यर्थ ठरूं पाहतें. पण भाष्यकार म्हणतात कीं ' सनि मीमाधु ' सू० २६२३ या सूत्रांत जें ' मी ' धातूचें ग्रहण केलें आहे त्या 'मी ' ग्रहणानें,' स्वादिगणांतील ह्रस्व इकारान्त ' मि ' धातूचा अन्त्य इकार ' अज्झन ' या सूत्रानें दीर्घ केल्यावर, त्या ' मि ' धातूचें ग्रहण व्हावें याकरितां तें दीर्घीकरणाचें सूत्र केलें आहे. दीर्घ केल्यावर प्रकृतपरिभाषेप्रमाणें गुणाची प्राप्ति आहे व वास्तविक गुण झाला पाहिजे हें वर सांगितलेंच आहे. तो प्राप्त झालेला गुण न व्हावा म्हणून ' इको झल् ' हें सूत्र मुद्दाम केलें आहे, व त्या सूत्रान्वयें, इगन्त अङ्गापुढें झलादि सन् प्रत्यय आला असतां तो कित् होत असल्यामुळें, ' क्ङिति च ' सू० २२१७ या सूत्रान्वयें गुण न होतां, ' चिचीषति ' असें इष्ट रूप सिद्ध होतें असें भाष्यकाराचें म्हणणें आहे. या भाष्यांत देखील दीर्घीकरणाचें सूत्र अनवकाशत्वामुळें गुणाचें बाधक ठरतें असें म्हटलें आहे. अपवादत्वामुळें बाधक ठरतें असें म्हटलें नाहीं. त्याचें कारण हें आहे कीं गुणविधायक सामान्यशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यास दीर्घीकरणाचें सूत्र नंतर प्रवृत्त होऊं शकत नाहीं. सामान्यशास्त्राच्या प्रवृत्तीनंतर जर तें सूत्र प्रवृत्त होण्याचा संभव असता तरच तें सूत्र अपवादत्वामुळें गुणाचें बाधक ठरलें असतें, व अपवादत्वामुळें जर गुणाचें बाधक ठरलें असतें तर तें प्रथम प्रवृत्त झाल्यावर गुणाचा नेहमीकरितां बाध होऊन गुण होऊंच शकला नसता व 'इको झल् ' हें गुणाचा निषेध करणारें सूत्र व्यर्थ ठरलें असतें आणि तसेंच भाष्यकारांनीं जें म्हटलें आहे कीं दीर्घीकरणानंतर गुण होऊं शकतो व तो न व्हावा म्हणून पाणिनीला ' इको झल् ' हें सूत्र करणें भाग पडलें तें म्हणणें देखील अयोग्य ठरलें असतें. पण दीर्घीकरणाचें सूत्र अनवकाशत्वामुळें गुणाचें बाधक होतें व दीर्घीकरणानंतर गुण होऊं शकतो असें भाष्यकारांनीं म्हटलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं जेथें अनवकाशत्वामुळें एक सूत्र दुसऱ्या सूत्राचें बाधक ठरतें तेथें तशा सूत्रास ' अपवाद ' ही संज्ञा मुख्यार्थानें लागू पडत नाहीं, व तसें सूत्र प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यसूत्राचा नेहमीकरितां बाध होत नसून, जर त्याचें निमित्त उपलब्ध असेल तर, तें नंतर प्रवृत्त होऊं शकतें. )

( वरील भाष्यासंबंधानें दोन शंका उपस्थित होतात. भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं ' अज्झनगमां सनि ' या सूत्रांत ' अच् ' चें ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं ' सनि मीमाघु ' या सूत्रांत पठित असलेल्या ' मी ' धातूनें ' मि ' धातूचें ग्रहण

व्हावें. परंतु ' लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् ' प० ११४ अशी परिभाषा असल्यामुळें, ' सनि मीमाघु ' या सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या दीर्घ ईकारान्त ' मी ' धातूनें ' अज्झनगमां सनि ' या सूत्रान्वयें दीर्घ होणाऱ्या ' मी ' धातूचें ग्रहण करतां येत नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं; कारण ' गामादाग्रहणेष्वविशेषः ' प० ११५ ही वरील परिभाषेची अपवादात्मक परिभाषा असल्यामुळें, ती (प० ११४) परिभाषा अनित्य ठरते, आणि तसेंच ' सनि मीमाघु ' या सूत्रांत ' मी ' व ' मा ' या दोन्हीं धातूंचें एकत्र ग्रहण केलें असल्यामुळें, प्रत्यासत्तिन्यायान्वयें–म्हणजे साहचर्यन्यायानें–जसें प्रतिपदोक्त–म्हणजे साक्षात् पठिता–'मा' धातूनें, 'आदेच उपदेशेऽशिति' सू० २३७० या सूत्रानें ' मेङ् ' धातूचें ' मा ' असें रूप झाल्यावर तशा लाक्षणिक ' मा ' चें, ग्रहण होतें त्याचप्रमाणें ' मी ' या प्रतिपदोक्तधातूनें, ' मि ' धातूचें दीर्घीकरण झाल्यानंतर तशा लाक्षणिक ' मी ' चें ग्रहण करण्यांत कांहीं दोष येत नाहीं. दुसरी शंका अशी कीं ' अज्झनगमां सनि ' या सूत्रांत ' अच् ' ग्रहण ' मी ' धातूनें ' मि ' धातूचें ग्रहण व्हावें एवढ्याचकरितां जर केलें आहे तर ' अच् ' असा सामान्यशब्द उच्चारण्याची कांहींच गरज नव्हती. ' नैकमुदाहरणं सूत्रारम्भं प्रयोजयति ' असा न्याय असल्यामुळें, जर 'अच्' ग्रहणाचें, 'मि' धातुनें 'मी' धातूचें ग्रहण व्हावें, एवढेंच प्रयोजन असतें तर ' मिञ्हनगमां सनि ' असें सूत्र केलें पाहिजे होतें. परंतु ही शंका देखील बरोबर नाहीं; कारण ' अज्झनगमां सनि ' या सूत्रांतील ' अच् ' हा शब्द ' गम् ' धातूचें विशेषण आहे व त्या दोन शब्दांचा अर्थ 'अजादेशगमेः' असा होतो व तसा अर्थ होत असल्यामुळें 'अज्झनगमां सनि' या सूत्रांतील 'गम्' यानें 'गम्' धातूचें ग्रहण न होतां, ' सनि च ' व ' इङश्च ' सू० २६१५ व २६१६ या सूत्रान्वयें इण्, व इङ् धातूच्या जागीं होणाऱ्या गमादेशाचेंच ग्रहण होतें. सारांश, ' अज्झनगमां सनि या सूत्रांतील अच्ग्रहण' 'मी' धातूनें, दीर्घ झालेल्या ' मि ' धातूचें, ग्रहण व्हावें एवढ्याचकरितां नसून त्याचे, वर सांगितल्याप्रमाणें, दुसरेंहि प्रयोजन आहे. म्हणून वरील शंका अनुपपन्न ठरते. )

यत्तु काञ्चनीत्यादावपवादमयड्विषयेऽप्यण् भवति क्वचिदपवादविषयेऽपीति न्यायादिति, तन्न । अण् कर्मणि चेति सूत्रस्थभाष्यविरोधात् । तत्र ह्यणः पुनर्वचनमपवादविषयेऽनिवृत्त्यर्थं गोदायो व्रजतीत्याद्युक्तम् । काञ्चनीत्यादौ काञ्चनेन निर्मितेत्यर्थे शैषिकोऽण् बोध्यः ॥

(' बाधके प्रवृत्ते यद्युत्सर्गप्राप्तिर्भवति तदा भवत्येव'–म्हणजे विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यानंतर जर सामान्यशास्त्राची प्राप्ति असेल तर तें नंतर प्रवृत्त होतें–असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ ग्रन्थकारानें केला आहे. पण कांहीं वैयाकरण या परिभाषेचा अर्थ वेगळ्या तऱ्हेनें करितात. ते असा अर्थ करितात कीं जेथें विशेषशास्त्र व सामान्यशास्त्र हीं दोन्हीं प्राप्त होतात तेथें क्वचित् स्थलीं सामान्यशास्त्र विशेषशास्त्राला एकीकडे

सारून स्वतःच प्रवृत्त होतें–म्हणजे विशेषशास्त्र प्रवृत्त न होतां सामान्यशास्त्रच प्रवृत्त होतें, आणि या अर्थाच्या समर्थनार्थ ते 'काञ्चनी' हें उदाहरण देतात आणि ह्मणतात कीं ) 'काञ्चनी' इत्यादि स्थलीं अपवादात्मक 'मयट्' प्रत्ययाच्या विषयांत देखील, 'क्वचिदपवादविषयेऽप्युत्सर्गोऽभिनिविशते' या प्रकृतपरिभाषेप्रमाणें ( विशेषशास्त्रान्वयें 'मयट्' प्रत्यय न होतां, सामान्यशास्त्रान्वयें) 'अण्' प्रत्यय होतो–पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण हें ह्मणणें बरोबर मानल्यास, 'अण् कर्मणि च' ३–३–१२ या सूत्रावरील भाष्याशीं विरोध येतो. त्या भाष्यांत 'गोदायो व्रजति' हें उदाहरण देऊन भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'अण् कर्मणि च' या सूत्रांत पुन्हा अण् ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं अपवादाच्या विषयांत देखील–म्हणजे जेथें 'आतोऽनुपसर्गे कः' हें अणाचें बाधकसूत्र लागू पडतें तशा स्थलीं देखील—अण्प्रत्ययाची निवृत्ति न होतां, तो अण् प्रत्ययच व्हावा. 'काञ्चनी' इत्यादि स्थलीं 'काञ्चनेन निर्मिता' या अर्थामध्यें शैषिक अण्–म्हणजे 'शेषे' सू० १३१२ या सूत्रान्वयें होणारा अण्–प्रत्यय होऊन 'काञ्चनी' हें रूप सिद्ध होतें हें समजावें. ( 'प्राग्दीव्यतोऽण्' सू० १०७३ या अधिकारांत जें 'तस्य विकारः' सू० १५१४ हें सामान्यसूत्र पठित आहे त्याचा बाध करणारें 'नित्यं वृद्धशरादिभ्यः' सू० १५२४ हें सूत्र आहे. हें विशेषसूत्र असें विधान करतें कीं, 'वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम्' सू० १३३५ या सूत्रान्वयें ज्या प्रातिपदिकाला वृद्धसंज्ञा प्राप्त होते तशा प्रातिपदिकाहून विकारार्थामध्यें 'तस्य विकारः' या सूत्रानें अण्प्रत्यय न होतां, नित्य 'मयट्' प्रत्ययच व्हावा. 'काञ्चन' हें प्रातिपदिक वृद्धसंज्ञक आहे; कारण त्यांतील आद्यस्वर 'आ' हा 'वृद्धिरादैच्' सू० १६ या सूत्रान्वयें वृद्धिसंज्ञक आहे, ह्मणून 'काञ्चन' या प्रातिपदिकाहून 'तस्य विकारः' या सामान्यशास्त्रान्वयें अण् प्रत्यय न होतां व 'काञ्चनी' असें रूप न होतां, वास्तविक 'नित्यं वृद्धशरादिभ्यः' या विशेषशास्त्रान्वयें 'मयट्' प्रत्यय होऊन 'काञ्चनमयी' असें रूप झालें पाहिजे होतें. पण 'काञ्चनी' असा शब्द भाषेंत प्रचलित आहे, व तसें रूप 'तस्य विकारः' या सामान्यशास्त्रानें अण्प्रत्यय केल्याशिवाय होऊं शकत नाहीं. यावरून हें सिद्ध होतें कीं कोठें कोठें बाधकशास्त्राच्या विषयांत–म्हणजे जेथें बाधकसूत्र लागू पडतें अशा स्थलीं देखिल–बाधकशास्त्र प्रवृत्त न होतां सामान्यशास्त्रच प्रवृत्त होतें, व हाच अर्थ सांगणारी प्रकृतपरिभाषा आहे असें कांहीं वैयाकरणांचें मत आहे. पण हें मत ग्रन्थकारास मुळींच मान्य नाहीं. ग्रन्थकार म्हणतात कीं प्रकृतपरिभाषेचा वर दिलेला जो विपरीत अर्थ कांहीं वैयाकरण करतात तो बरोबर नसून त्यांनीं स्वतः जो या परिभाषेचा अर्थ केला आहे तोच योग्य अर्थ आहे. आणि हें म्हणणें सिद्ध करण्याकरितां 'अण् कर्मणि च' या सूत्रावरील भाष्याचें ते प्रमाण देतात. त्या भाष्यांत 'अणः पुनर्वचनमपवादविषयेऽनिवृत्त्यर्थम्' हें वार्तिक सांगून भाष्यकार म्हणतात कीं 'अण् कर्मणि च' या सूत्रांत जें पुन्हा अण्ग्रहण केलें आहे तें अशाकरितां केलें आहे कीं, जेथें 'कर्मण्यण्' सू० २९१३ या सामान्यसूत्रानें

अणूप्रत्ययाची प्राप्ति आहे पण ' आतोऽनुपसर्गे कः ' सू० २९१५ हें बाधकशास्त्र लागू पडतें तशा स्थलीं देखील, बाधित अणूप्रत्यय निवृत्त न होतां तोच प्रत्यय व्हावा, व वरील वार्तिकाच्या समर्थनार्थ ते ' गोदायो व्रजति ' हें उदाहरण देतात. या उदाहरणांत 'कर्मण्यण् ' या सामान्यसूत्रानें अणूप्रत्यय पावला आहे, पण 'आतोऽनुपसर्गे कः' हें सूत्र त्या सूत्राचें बाधक असल्यामुळें, अणूप्रत्यय न होतां 'क' प्रत्यय होऊन 'गोदः' असें रूप व्हावें. परंतु ' अण् कर्मणि च ' सू० ३१८१ हें सूत्र ' आतोऽनुपसर्गे कः ' या सूत्राचें बाधकसूत्र आहे. ' अण् कर्मणि च ' या सूत्रांत ' भविष्यति गम्यादयः ' सू० ३१७१ या सूत्रांतील ' भविष्यति ' हें पद अनुवृत्त होतें, व तसेंच ' तुमुन्ण्वुलौ क्रियायां क्रियार्थायाम् ' सू० ३१७५ या पूर्वसूत्रांतून ' क्रियायां क्रियार्थायाम्' हीं पदें अनुवृत्त होतात, व सूत्राचा अर्थ असा होतो कीं जेथें पुढें होणाऱ्या क्रियेकरितां एखादी क्रिया केली जाते तशा स्थलीं, कर्मणि उपपद मागें असल्यास, आकारान्त धातूस 'क' हा विशेषप्रत्यय न होतां 'अण् ' हा सामान्यप्रत्ययच होतो. 'गां दातुं व्रजति'–ह्मणजे गोदानरूप क्रिया करण्याकरितां गमनरूप क्रिया करतो अशा अर्थामध्यें 'गोदायो व्रजति' असा प्रयोग केला असल्यामुळें, येथें अणूप्रत्ययच होतो व 'आतो युक्चिण्कृतोः' सू० २७६१ या सूत्रान्वयें, ' अण् ' हा णित्कृत्प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' दा ' या आकारान्त धातूस यकारागम होऊन ' गोदायः ' असें रूप सिद्ध होतें. जर अपवादाच्या विषयांत कोठें कोठें बाधकसूत्र प्रवृत्त न होतां सामान्यसूत्रच प्रवृत्त होतें अशा अर्थाची परिभाषा असती तर ' अण् कर्मणि च ' असें प्रतिप्रसवात्मकसूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती, व ' गोदायः ' या स्थलीं अपवादात्मक ' क ' प्रत्यय न होतां, 'अण्' हा सामान्यप्रत्यय होऊं शकलाच असता. पण ' अण् कर्मणि च' हें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं जेथें अपवादसूत्र लागू पडतें तेथें सामान्यसूत्र प्रथम प्रवृत्त होऊं शकत नाहीं व अपवादसूत्रच प्रथम प्रवृत्त होतें. सारांश ग्रन्थकारानें प्रकृतपरिभाषेचा जसा अर्थ केला आहे तसा अर्थ बरोबर मानल्यासच, प्रकृतस्थलीं विशेषप्रत्यय न होतां, सामान्य ' अण् ' प्रत्ययच होतो असें विधान करणारें ' अण् कर्मणि च ' हें सूत्र चरितार्थ ठरूं शकतें. म्हणून कांहीं वैयाकरणांनीं प्रकृतपरिभाषेचा जो विपरीत अर्थ केला आहे तो बरोबर मानतां येत नाहीं. तसा अर्थ बरोबर मानल्यास, सामान्यशास्त्र विशेषशास्त्राचें बाधक होतें असा उलट नियम मानावा लागेल. मग ' काञ्चनी' हें रूप कसें सिद्ध होते? या प्रश्नाचें ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं 'शेषे' सू० १३१२ या सूत्रानें 'काञ्चन' या प्रातिपदिकाहून शैषिक अण् प्रत्यय केला असतां, ' काञ्चनी ' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ग्रन्थकाराच्या ह्मणण्याचा आशय हा आहे कीं ' प्राग्दीव्यतोऽण् ' या अधिकारांत ' तस्यापत्यम् ' या सूत्रापासून ' अदूरभवश्च ' या सूत्रापर्यंत ' अण् ' प्रत्ययाचे जे अर्थ सांगितले आहेत त्या अर्थांहून भिन्न अर्थामध्यें—म्हणजे ' तेन निर्मितम् ' या अर्थामध्यें–' शेषे ' या सूत्रानें अणूप्रत्यय होऊं शकत असल्यामुळें, ' काञ्चनेन निर्मिता काञ्चनी ' या अर्थामध्यें अण्-

प्रत्यय केल्यास, ‘ काञ्चनी ’ हें रूप सिद्ध होऊं शकतें, व तें रूप सिद्ध होण्याकरितां प्रकृतपरिभाषेचा जो विपरीत अर्थ कांहीं वैयाकरणांनीं केला आहे तसा अर्थ करण्याची कांहींच गरज नाहीं. तथापि येथें अशी शंका उत्पन्न होते कीं, ‘ शेषे ’ या अधिकारांत ‘ वृद्धाच्छः ’ सू० १३३७ हें सूत्र साक्षात् पठित असल्यामुळें व ‘ काञ्चन ’ हें प्रातिपदिक वृद्धसंज्ञक असल्यामुळें, ‘ काञ्चन ’ शब्दाहून शैषिक अण्प्रत्यय न होतां ‘छ ’ प्रत्यय झाला पाहिजे. या शंकेवर हें उत्तर आहे कीं शैषिकाधिकारांत ‘तत्र जातः,तत्र भवः, तस्य निवासः, तस्येदम्’ इत्यादि जे विशिष्ट प्रत्ययार्थ सांगितले आहेत तशा अर्थांमध्येंच ‘ छ ’ हा अण्प्रत्ययाचा बाधक होतो. ‘ तेन निर्मितम् ’ हा अर्थ शैषिकाधिकारांत सांगितला नाहीं. ह्मणून तशा अर्थामध्यें होणाऱ्या शैषिक अण्प्रत्ययाचा ‘छ’ प्रत्यय बाधक होत नाहीं, आणि त्यामुळें ‘काञ्चनेन निर्मिता’ या अर्थांमध्यें ‘ छ ’ प्रत्यय न होतां, शैषिक अण्प्रत्यय होऊन ‘ काञ्चनी ’ असें रूप सिद्ध होतें. )

**अत्रेदं बोध्यम्। येन नाप्राप्तेत्यत्र येनेत्यस्य यदि स्वेतरेणेत्यर्थस्तदा स्वविषये स्वेतरद्यद्यत् प्राप्नोति तद् बाध्यं, विध्यन्तराप्राप्तविषयाभावात्। इयमेव बाध्यसामान्यचिन्तेति व्यवह्रियते । अनवकाशत्वेन बाधेऽप्येषा वक्तुं शक्या यद्युदाहरणमस्ति, विनिगमनाविरहात् ॥**

येथें हें लक्षांत ठेवावें कीं, ‘ येन नाप्राप्ते ’ या परिभाषेंतील ‘येन’ या पदाचा ‘स्वेतरेण’–ह्मणजे स्वतःहून भिन्न (बाधकशास्त्राहून भिन्न)–असा अर्थ केल्यास, बाधकशास्त्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें ज्या ज्या सूत्रांची अवश्यप्राप्ति आहे तीं सर्व सूत्रें बाधकशास्त्रानें बाधित झालीं पाहिजेत; कारण तसें झाल्याशिवाय, इतर–म्हणजे सामान्य–सूत्रांची जेथें प्राप्ति नाहीं असें कोणतेंहि स्थळ बाधकशास्त्र प्रवृत्त होण्याकरितां मिळूं शकणार नाहीं. यालाच व्याकरणशास्त्रांत ‘ बाध्यसामान्यचिन्ता ’ असें म्हणण्याचा व्यवहार आहे.(सारांश एखादें सूत्र कोणकोणत्या सूत्रांचें बाधक आहे या संबंधानें जेथें विचार करणें आहे तशा स्थलीं बाध्यसामान्यचिन्ता असा व्यवहार केला जातो. ) जेथें अनवकाशत्वामुळें एखादें सूत्र अनेक सूत्रांचें बाधक ठरतें तशा स्थलीं देखील, उदाहरण मिळूं शकत असल्यास, बाध्यसामान्यचिन्ता संभवते. कारण ‘ येन नाप्राप्ते ’ या न्यायान्वयें अपवादत्वामुळें बाधक ठरणाऱ्या सूत्राचे ठिकाणीं बाध्यसामान्यचिन्ता संभवते व अनवकाशत्वामुळें बाधक ठरणाऱ्या सूत्राच्या विषयांत ती संभवत नाहीं अशा तऱ्हेचा भेद करण्यास कोणतेंहि प्रमाण किंवा युक्ति उपलब्ध नाहीं. ( सारांश. अपवादत्वामुळें सूत्र बाधक ठरत असो किंवा अनवकाशत्वामुळें सूत्र बाधक ठरत असो, अशा दोन्हीं ठिकाणीं बाध्यसामान्यचिन्ता सारखीच संभवते. या पंक्तींत व तसेंच पुढील पंक्तींत अनवकाशस्थलीं ‘ यद्युदहारणमस्ति ’ असें ग्रन्थकारानें कां म्हटलें हें समजत नाहीं. कांहीं टीकाकारांचें मत असें आहे कीं, ही केवळ

वैचित्र्योक्ति आहे व त्या उक्तीचा अर्थ असा समजूं नये कीं अनवकाशस्थलीं उत्पन्न होणाऱ्या बाध्यसामान्यचिन्तेचीं किंवा बाध्यविशेषचिन्तेचीं उदाहरणें मिळूं शकत नाहींत. वास्तविक पाहिलें असतां, अनवकाशस्थलीं उत्पन्न होणाऱ्या दोन्ही प्रकारच्या चिन्तांचीं उदाहरणें मिळूं शकतात. अपवादस्थलीं उत्पन्न होणाऱ्या बाध्यसामान्यचिन्तेचीं किंवा बाध्यविशेषचिन्तेचीं उदाहरणें मिळणें दुर्लभ आहे. ह्मणून वास्तविक ग्रन्थकारानें 'यद्युदाहरणमस्ति' हें अपवादस्थलीं म्हणावयास पाहिजे होतें, व अनवकाशस्थलीं त्या शब्दांचा त्यानें जो उपयोग केला आहे तो बरोबर नाहीं असें कांहीं टीकाकार म्हणतात. अनवकाशस्थलीं उत्पन्न होणाऱ्या बाध्यसामान्यचिन्तेचीं अनेक उदाहरणें देतां येतील. तथापि दोन निवडक उदाहरणें खालीं दिलीं आहेत. ' अचि र ऋतः ' सू० २९९ हें सूत्र असें आहे कीं जेथें तें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें गुणविधायक ' ऋतो ङिसर्वनामस्थानयोः ' सू० २७५, पूर्वसवर्णदीर्घविधायक ' प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू० १६४, व उत्वैकादेशविधायक ' ऋत उत् ' सू० २७९ या तीन सूत्रांपैकीं कोणत्याना कोणत्या तरी सूत्राची अवश्यप्राप्ति आहे. हीं तीन सूत्रें अशीं आहेत कीं तीं प्रवृत्त झाल्यावर ' अचि र ऋतः ' हें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं; कारण तीं सूत्रें प्रवृत्त झाल्यानंतर हें सूत्र प्रवृत्त होण्याचें निमित्त कायम राहत नाहीं. म्हणून अनवकाशत्वामुळें हें सूत्र त्या तीन्ही सूत्रांचें बाधक ठरतें, आणि म्हणूनच या सूत्रावरील वृत्तींत 'गुणदीर्घोत्वानामपवादः' असें दीक्षितांनीं म्हटलें आहे–पहा बालमनोरमा द्वितीयावृत्ति पान १३५. तसेंच ' उर्ऋत् ' सू० २५६७ या विशेषशास्त्रानें कोणकोणतीं सूत्रें बाधित होतात या संबंधानें विचार करितांना, ' अचीकृतत् ' या स्थलीं ' उपधायाश्च ' सू० २५७१ या सूत्राची, ' अमीमृजत् ' या स्थलीं 'मृजेर्वृद्धिः ' सू० २४७३ या सूत्राची, ' अपीपृथत् ' या स्थलीं ' पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ या सूत्राची अवश्यप्राप्ति आहे. वरील तीन सूत्रांनीं प्रथम कार्य केल्यास ' उर्ऋत् ' हें सूत्र प्रवृत्त होण्याचें निमित्त नष्ट होतें. म्हणून अनवकाशत्वामुळें हें सूत्र त्या तीन्हीं सूत्रांचें बाधक ठरतें, आणि म्हणूनच या सूत्रावरील टीकेंत ' इररारामपवादः ' असें दीक्षितांनीं म्हटलें आहे.–पहा बालमनोरमा द्वितीयावृत्ति पान ८६९.)

यदि तु येनेत्यस्य लक्ष्णेनेत्यर्थः कार्येणेत्यर्थो वा, तदा बाध्यविशेषचिन्ता । अनवकाशत्वेन बाधेऽप्येतद्बाधेन सार्थक्यमुत तद्बाधेनेत्येवं विशेषचिन्ता सम्भवति यद्युदाहरणमस्ति ॥ ५९ ॥

' येन नाप्राप्ते ' या परिभाषेंतील ' येन ' या पदाचा ( 'स्वेतरेण ' असा अर्थ न करितां ) ' लक्ष्णेन ' किंवा ' कार्येण '–म्हणजे ज्या विशिष्ट सूत्राची किंवा ज्या विशिष्ट कार्याची अवश्यप्राप्ति आहे–असा अर्थ केल्यास, अशा स्थलीं जो विचार करणें आहे त्याला बाध्यविशेषचिन्ता म्हणतात. ( अशा स्थलीं एखादें सूत्र कोणकोणत्या सूत्रांचें बाधक ठरतें असा विचार करणें नसून, एखादें सूत्र किंवा कार्य

कोणत्या विशिष्ट सूत्राचें किंवा कार्याचें बाधक आहे एवढाच विचार करावयाचा असतो, आणि हाच दोन प्रकारच्या चिन्तेमध्यें फरक आहे. ) जेथें अनवकाशत्वामुळें एखादें सूत्र किंवा कार्य बाधक ठरत असेल तशा ठिकाणीं देखील, ( अपवादत्वामुळें बाध होत असल्यास जशी बाध्यविशेषचिन्ता संभवते त्याचप्रमाणें ), उदाहरण मिळूं शकत असल्यास, या विशिष्ट सूत्राचें किंवा कार्याचें अथवा त्या विशिष्ट सूत्राचें किंवा कार्याचें बाधक झाल्यानें बाधकशास्त्र चरितार्थ ठरतें अशा तऱ्हेची बाध्यविशेष-चिन्ता संभवते. ( बाध्यविशेषचिन्तेचीं उदाहरणें ग्रन्थकारानें स्वतःच पुढील दोन परिभाषांमध्यें दिलीं आहेत. )

---

## परिभाषा ६०

**तत्र कार्येणेत्यर्थे पररूपत्वावच्छिन्ने कार्य आरभ्यमाणाया वृद्धेस्त-द्बाधकत्वे निर्णीते किंशास्त्रविहितस्येत्येवं तद्विशेषचिन्तायामाह—**

बाध्यसामान्यचिन्ता व बाध्यविशेषचिन्ता कशास म्हणतात हें मागील परिभा-षेंत सांगून, आतां ग्रन्थकार बाध्यविशेषचिन्तेसंबंधानें नियम घालून देणाऱ्या पुढील तीन परिभाषा सांगतात. ' येन नाप्राप्ते ' यांतील ' येन ' या पदाचें जे वर तीन अर्थ–म्हणजे ( १ ) स्वेतरेण, ( २ ) लक्षणेन, व ( ३ ) कार्येण–सांगितले आहेत त्या तीन अर्थांपैकीं ) ' येन ' या पदाचा ' येन कार्येण ' असा अर्थ केल्यास, ( एत्येधत्यठ्सु ' सू० ७३ या सूत्रानें सांगितलेल्या ) वृद्धीनें पररूपकार्याचा बाध होतो असें निश्चित केल्यावर, कोणत्या सूत्रानें सांगितलेल्या पररूपकार्याचा बाध होतो अशी बाध्यविशेषचिन्ता उत्पन्न झाली असतां, ही परिभाषा सांगतात––

**पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्ते नोत्तरान् ॥ ६० ॥**

" पूर्वीं सांगितलेला अपवाद त्याच्या नंतर प्रथम सांगितलेल्या उत्सर्गाचा बाधक होतो; पुढें सांगितलेल्या उत्सर्गाचा तो अपवाद बाधक होत नाहीं. "

**अवश्यं स्वपरस्मिन्बाधनीये प्रथमोपस्थितानन्तरबाधेन चारितार्थ्ये पश्चादुपस्थितस्य ततः परस्य बाधे मानाभावः आकाङ्क्षाया निवृत्तेर्विप्रति-षेधशास्त्रबाधे मानाभावाच्चेत्येतस्य बीजम् ॥ ६० ॥**

अपवादकसूत्रानें स्वतःहून भिन्न सूत्राचा बाध केलाच पाहिजे ( कारण सामा-न्यशास्त्रानें सर्व जागा व्यापली असल्यामुळें त्याला बाधल्याशिवाय अपवादशास्त्रास प्रवृत्त होण्याकरितां कोणतेंहि स्थळ मिळणें अशक्य आहे. ) म्हणून, त्याच्यापुढें जें सामान्यशास्त्र प्रथम उपस्थित होतें त्याचा बाध करून तें अपवादसूत्र चरितार्थ झाल्या-वर, ज्या सामान्यशास्त्राचा बाध केला त्याच्या पुढें सांगितलेल्या सामान्यशास्त्राचें तें

( अपवादसूत्र ) बाधक होतें असें म्हणण्यास कांहीं प्रमाण नाहीं. अशा रीतीनें त्या अपवादसूत्राची आकांक्षा नाहींशी झाल्यावर, पुढें दुसरें सामान्यशास्त्र सांगितलें असल्यास, त्या शास्त्राचें देखील, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ह्या सूत्राचा बाध करून, तें अपवादसूत्र बाधक ठरतें असें म्हणण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ह्याच न्यायाच्या पायावर ही परिभाषा रचली आहे. ( ' एत्येधत्यूठ्सु ' ह्या वृद्धिरूप कार्याचें विधान करणाऱ्या अपवादात्मक सुत्राच्यापुढें जीं सूत्रें पठित आहेत त्यांमध्यें सर्वांत जवळ ' एङि पररूपम् ' सू० ७८ हें पररूपकार्यविधायक सामान्यसूत्र आहे; व ह्या सूत्राचा बाध केल्यानें ' एत्येधत्युठ्सु ' ह्या सूत्राची आकांक्षानिवृत्ति होऊन तें चरितार्थ ठरतें, व मग त्याला पुढील इतर पररूपकार्यविधायक सामान्यशास्त्रांचा बाध करण्याची गरज उरत नाहीं. अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ झाल्यावर, ' एङि पररूपम् ' ह्या सूत्रानंतर सांगितलेल्या पररूपकार्यविधायक ' ओमाङोश्च ' सू० ८० ह्या दुसऱ्या सामान्यशास्त्राचा तें बाध करूं शकत नाहीं. ' एत्येधत्यूठ्सु ' व ' ओमाङोश्च ' हीं दोन्हीं सूत्रें आपापल्या विषयांत चरितार्थ व तुल्यबल असल्यामुळें, अशा ठिकाणीं ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हा न्याय लागू पडतो; व ' ओमाङोश्च ' हें परसूत्र असल्यामुळें, तें ' एत्येधत्युठ्सु ' ह्या सूत्राचें बाधक होतें. म्हणूनच ' अव+आ+इहि=अव+एहि ' येथें वृद्धिरूप एकादेश न होतां, ' ओमाङोश्च ' ह्या सूत्रानें पररूप एकादेश होतो व ' अवेहि ' असें रूप होतें, ' अवैहि ' असें होत नाहीं. )

---

## परिभाषा ६१

नासिकोदरौष्ठजङ्घादन्तेत्यस्यौष्ठाद्यंशे ङीष्निषेधत्वावच्छिन्नबाधकत्वे निर्णीते किंविहितस्येत्याकाङ्क्षायामाह—

' नासिकोदरौष्ठजङ्घादन्तकर्णशृङ्गाच्च ' सू० ५११ हें सूत्र, ओष्ठादि पांच शद्बांच्या विषयांत ' ङीष् ' निषेधाचें बाधक आहे असें निश्चित केल्यावर, कोणत्या सूत्रानें सांगितलेल्या ' ङीष् ' निषेधाचें तें बाधक आहे अशी बाध्यविशेषचिन्ता उत्पन्न झाली असतां, ही परिभाषा सांगतात.

**मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्ते नोत्तरान् ॥ ६१ ॥**

" मध्यें सांगितलेला अपवाद त्याच्यापूर्वी सांगितलेल्या सूत्राचा बाधक होतो; त्याच्या नंतर सांगितलेल्या सूत्राचा बाधक होत नाहीं. "

तेनौष्ठादिषु पञ्चस्वसंयोगोपधादिति प्रतिषेध एव बाध्यते, न तु सहनञ्विद्यमानलक्षण इति नासिकोदरेत्यत्र भाष्ये स्पष्टम् ॥ पूर्वोपस्थितबाधेन नैराकाङ्क्ष्यमस्या बीजम् ॥ ६१ ॥

ही परिभाषा असल्यामुळें, ' नासिकोदर ' ह्या सूत्रापूर्वी असलेल्या ' स्वाङ्गाच्चो-पसर्जनादसंयोगोपधात् ' सू० ५१० ह्या सूत्रांत ' असंयोगोपधात् ' ह्यानें जो ' ङीष् ' प्रतिषेध सांगितला आहे त्या प्रतिषेधाचें ' नासिकोदर ' हें सूत्र, ओष्ठ, ' जङ्घा-दन्त, कर्ण, व शृङ्ग ह्या पांच शब्दांच्या विषयांत बाधक होतें. पण तें सूत्र त्याच्या पुढें असलेल्या ' सहनञ्विद्यमानपूर्वाच्च ' सू० ५१३ ह्या सूत्रांत जो ' ङीष् ' प्रतिषेध सांगितला आहे त्याचें बाधक होत नाहीं, असें ' नासिकोदर ' ४-१-५५ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( ' स्वाङ्गाच्चोपसर्जनादसंयोगोपधात् ' ह्या सूत्रांत ' असंयोगोपधात् ' असा शब्द वापरला असल्यामुळें, उपसर्जनभूत स्वाङ्गवाचक संयोगोपध शब्द जर समासाच्या अन्तीं असला तर ' ङीष् ' प्रत्यय होत नाहीं. म्हणून ' शोभनौ गुल्फौ यस्याः सा ' ह्या स्थलीं, 'सुगुल्फी' असें रूप न होतां, ' सुगुल्फा ' असें रूप होतें. ' नासिकोदर ' ह्या सूत्रांत उच्चारलेले ओष्ठादि पांच शब्द संयो-गोपध आहेत, व त्यामुळें ' स्वाङ्गाच्चोपसर्जनात्' ह्या सूत्रानें त्यांचे ठिकाणीं ' ङीष् ' निषेधाची प्राप्ति झाली आहे. त्या निषेधाचा ' नासिकोदर ' हें सूत्र बाध करतें व विकल्पेंकरून ' ङीष् ' होतो असें विधान करतें. जसें बिम्बोष्ठी–बिम्बोष्ठा, सुजङ्घी–सुजङ्घा, शुभ्रदन्ती–शुभ्रदन्ता, सुशृङ्गी–सुशृङ्गा. ' सहनञ्विद्यमानपूर्वाच्च ' ह्या सूत्रांत देखील ' ङीष् ' निषेध सांगितला आहे; पण हें सूत्र ' नासिकोदर ' ह्या सूत्राच्या पुढें असल्यामुळें, त्यांत सांगितलेल्या ' ङीष् ' निषेधाचा ' नासिकोदर ' हें सूत्र, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, बाध करूं शकत नाहीं. ह्मणून ' सहोष्ठा ' ' अनोष्ठा,' ' विद्यमानोष्ठा ' अशींच रूपें होतात. दीक्षितांनी ' नासिकोदर ' ह्या सूत्रास, ' नासिका ' व ' उदर ' ह्या शब्दांच्या विषयांत, ' पुरस्तादपवादाः ' प. ६० ही परिभाषा देखील लावली आहे. ' नासिका ' व ' उदर ' हें स्वाङ्ग-वाचक बह्वच् शब्द असल्यामुळें, ' न क्रोडादिबह्वचः ' सू० ५१२ ह्या सूत्रान्वयें, त्यांचे ठिकाणीं ' ङीष् ' निषेधाची प्राप्ति आहे. हें सूत्र ' नासिकोदर ' ह्या सूत्राच्या लगेंच पुढें आहे व ' सहनञ्विद्यमानपूर्वाच्च ' हें सूत्र त्यानंतर आहे. ह्मणून ' पुर-स्तादपवादाः ' ह्या न्यायानें, ' नासिकोदर ' हें अपवादसूत्र त्याच्या अगदीं जवळ असलेल्या ' न क्रोडादिबह्वचः ' या सूत्राचें बाधक होतें. पुढें असलेल्या ' सहनञ् ' सूत्राचें बाधक होत नाहीं. उलटें, तेंच सूत्र ' नासिकोदर ' ह्या सूत्राचें, विप्रति-षेध न्यायानें, बाधक होतें. म्हणून तुङ्गनासिका—तुङ्गनासिकी अशीं रूपें होतात. पण अनासिकी, सहनासिकी अशीं रूपें न होतां, अनासिका, सहनासिका अशींच रूपें होतात. ) प्रथम उपस्थित झालेल्या सूत्राचा बाध करून चरितार्थ झालेल्या अपवाद सूत्राला इतर सूत्रांचा बाध करण्याची आकांक्षा राहत नाहीं, हें ह्या परि-भाषेचें बीज होय (– ह्मणजे ह्या न्यायाच्या पायावर ही परिभाषा रचली आहे, व ती युक्तिसिद्ध आहे असें समजावें. )

---

# परिभाषा ६२

ननु वा छन्दसीत्यनेन सेर्ह्यपिच्चेत्यनन्तरस्यापित्वस्येव हेरपि विकल्पः स्यात् । तथा नेटीति निषेधोऽनन्तरहलन्तलक्षणाया इव सिचिवृद्धिमृजि-वृद्ध्योरपि स्यात्, अत उक्तन्यायमूलकमेवाह—

'सेर्ह्यपिच्च' सू० २२०१ ह्या सूत्राच्या लगेच पुढें असणाऱ्या 'वा छन्दसि' सू० ३५५२ ह्या सूत्रानें, 'सि' चे जागीं होणारा 'हि' हा आदेश वेदांत विकल्पेंकरून 'अपित्' असतो, असें अगदीं जवळ असणाऱ्या अपित्‌च्या विकल्पाचें जसें विधान केलें आहे त्याचप्रमाणें, वेदांत 'सि' चे जागीं 'हि' हा आदेश विकल्पेंकरून होतो असें 'हि' च्या विकल्पाबद्दल देखील 'वा छन्दसि' ह्या सूत्रानें विधान होण्याची आपत्ति येते. ('सेर्ह्यपिच्च' ह्या सूत्रांत दोन कार्यांचें विधान केलें आहे:-(१) 'सि' चे जागीं 'हि' हा आदेश होणें व (२) 'सि' जरी 'पित्' आहे तरी त्याचे जागीं होणारा 'हि' हा आदेश 'अपित्' होणें. ह्या सूत्राच्या लगेच पुढें 'वा छन्दसि' हें विकल्पविधायक सूत्र पठित असल्यामुळें, 'सेर्ह्यपिच्च' ह्या सूत्रांतील लगेच मागें असलेल्या अपित्वरूपी कार्यास न लागतां, तें विकल्पविधायक सूत्र उभयविध कार्यास लागू पडण्याची आपत्ति येते.) तसेंच 'नेटि' सू० २२६८ ह्या सूत्रानें जो वृद्धिनिषेध सांगितला आहे तो जसा त्याच्या लगेच मागें असलेल्या 'वदव्रजहलन्तस्याचः' सू. २२६७ ह्या सूत्रास लागतो त्याचप्रमाणें तो निषेध 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' सू० २२९७ व 'मृजेर्वृद्धिः' सू० २४७३ ह्या सूत्रांना देखील लागू पडण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून वर जो न्याय सांगितला आहे—म्हणजे प० ६० मध्यें 'अवश्यं स्वपरस्मिन् बाधनीये...मानाभावः' असा जो न्याय सांगितला आहे–त्याच न्यायाच्या आधारावर रचलेली ही परिभाषा सांगतात:–

## अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति ॥ ६२ ॥

"जेव्हां एखादें सूत्र कशाचे विधान किंवा कशाचा प्रतिषेध करतें तेव्हां तें विधान किंवा तो प्रतिषेध त्याच्या सर्वांत जवळ असलेल्याचाच समजावा"

( ही परिभाषा असल्यामुळें 'वा छन्दसि' ह्या सूत्रांत जें विकल्पाचें विधान केलें आहे तें, 'सेर्ह्यपिच्च' ह्या सूत्रांतील अपित्वाचें विधान त्याच्या अगदीं जवळ असल्यामुळें, तेवढ्याच विधानाला तें विकल्पविधान लागू पडतें, 'सि' चे जागीं 'हि' होतो हें विधान त्या मानानें दूर असल्यामुळें, त्या विधानास विकल्पाचें विधान लागू शकत नाहीं. तसेंच 'नेटि' ह्या सूत्रांतील वृद्धिनिषेध अगदीं जवळच्या सूत्रास लागू पडतो, व दूरच्या सूत्रांस लागू पडत नाहीं; कारण जवळच्याचें विधान किंवा निषेध करून चरितार्थ झालेल्या अपवादसूत्रास इतरांचें विधान किंवा निषेध करण्याची आकांक्षा राहत नाहीं. )

**अत एव संख्याव्ययादेरिति ङीब्ग्रहणं चरितार्थम् । तद्ध्यनन्तरस्य ङीषो विध्यभावाय ।**

ही परिभाषा असल्यामुळें, 'संख्याव्ययादेर्ङीप्' सू० ४८५ ह्या सूत्रांतील 'ङीप्' ग्रहण चरितार्थ ठरतें. तें त्याच्या अगदीं जवळ असलेल्या ( ' बहुव्रीहेरूधसो ङीष् ' सू० ६८४ ह्या ङीष्चें विधान करणाऱ्या ) सूत्रांतून त्यांत ' ङीष् ' ची अनुवृत्ति न व्हावी ह्या करितां केलें आहे.( संख्याव्ययादेः ' एवढेंच जर सूत्र केलें असतें तर त्याच्या लगेंच मागें असणाऱ्या ' बहुव्रीहेरूधसो ङीष् ' ह्या सूत्रांतून ' ङीष् ' ची अनुवृत्ति झाली असती. ती अनुवृत्ति न व्हावी व ' ङीष् ' चें विधान न व्हावें ह्मणून 'संख्याव्ययादेर्ङीप् ' असें सूत्र केलें आहे व अशा रीतीनें त्या सूत्रांतील ' ङीप् ' ग्रहण चरितार्थ ठरतें.)

**न क्त्विचीति सूत्रे दीर्घग्रहणञ्च चरितार्थम् । तद्ध्यनन्तरस्यानुदात्तोपदेशेत्यस्यैव निषेधाभावाय ॥**

तसेंच ' न क्त्विचि दीर्घश्च ' सू० ३३१४ ह्या सूत्रांत ' दीर्घश्च ' हें दीर्घग्रहण चरितार्थ ठरतें. तें दीर्घग्रहण, ' अनुदात्तोपदेश ' सू० २४२८ ह्या सर्वांत जवळ असलेल्या सूत्रांत सांगितलेल्या कार्याचाच केवळ निषेध न व्हावा ह्मणून, केलें आहे. ('अनुदात्तोपदेश' ह्या सूत्रांत अनुनासिकलोपाचें विधान केलें आहे. हें सूत्र 'न क्त्विचि' ह्या सूत्राच्या सर्वांत जवळचें सूत्र आहे. 'अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति ' सू० २६६६ ह्या सूत्रांत अनुनासिकान्ताच्या उपधेचा दीर्घ व्हावा असें विधान केलें आहे; पण हें सूत्र ' अनुदात्तोपदेश ' ह्या सूत्राच्या बरेंच पूर्वी पठित आहे. ' न क्त्विचि ' एवढेंच जर सूत्र केलें असतें तर त्याच्या सर्वांत जवळ असलेल्या ' अनुदात्तोपदेश ' ह्या सूत्रांत अनुनासिकलोपाचें जें विधान केलें आहे तेवढ्याच विधानाचा ' न क्त्विचि ' ह्या सूत्रानें निषेध झाला असता; बरेंच पूर्वी असलेल्या ' अनुनासिकस्य क्विझलोः ' ह्या सूत्रांत उपधादीर्घाचें जें विधान केलें आहे त्या विधानास 'न क्त्विचि' हा निषेध, ह्या परिभाषेप्रमाणें, लागू पडला नसता. परंतु पाणिनीला दोन्हीं कार्यांचा निषेध करावयाचा होता. म्हणून त्याला ' न क्त्विचि ' ह्या सूत्रांत ' दीर्घश्च ' हे शब्द मुद्दाम घालावे लागले, व अशा तऱ्हेनें ते शब्द चरितार्थ ठरतात. )

**मध्येपवादन्यायाद्यपेक्षयाऽनन्तरस्येतिन्यायः प्रबल इत्यष्टाभ्य इति सूत्रे कैयटः ॥**

' मध्येऽपवादाः ' इत्यादि न्यायांच्या ( प. ६० व ६१ च्या ) मानानें ' अनन्तरस्य विधिः '( प. ६२ ) हा न्याय प्रबल आहे असें ' अष्टाभ्य औश् ' ७-१-२१ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें ह्मटलें आहे. ( ' अष्टौ पुत्राः यस्य सः अष्टपुत्रः' येथें ' अष्टन्+जस्+पुत्र+जस्+सु ' अशा स्थितींत, ' सुपो धातुप्रातिपदिकयोः 'सू० ६५०, व तसेंच ' षड्भ्यो लुक् ' सू० २६१ आणि ' अष्टाभ्य औश् ' सू० ३७२

ह्या तिन्ही सूत्रांची प्राप्ति आहे. ' अष्टाभ्य. औश् ' हें लुकाचें बाधक अपवादसूत्र आहे. ' मध्येऽपवादाः ' प. ६१ हा न्याय ह्या ठिकाणीं लावल्यास, ' अष्टाभ्य औश् ' हें अपवादसूत्र ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्या, पूर्वीं असलेल्या, लुग्विधायक सूत्राचें बाधक होईल; ' षड्भ्यो लुक् ' ह्या, पुढें असलेल्या, लुक्विधायक सूत्राचें बाधक होणार नाही. पण ' अनन्तरस्य विधिर्वा प्रतिषेधो वा ' प. ६२ हा न्याय लावल्यास, ' षड्भ्यो लुक् ' हें सूत्र जवळ असल्यामुळें व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' हें सूत्र फार दूर पूर्वीं पठित असल्यामुळें, ' अष्टाभ्य औश् ' हें सूत्र ' षड्भ्यो लुक् ' ह्याचें बाधक ठरतें, व ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' ह्याचें बाधक ठरत नाहीं. त्यामुळें ' सुपो धातुप्रातिपदिकयोः ' हें सूत्र प्रकृत उदाहरणांत लागतें; 'अष्टाभ्य औश्' हें सूत्र लागत नाहीं, व ' जस् ' चा लुक् होऊन ' अष्टपुत्रः ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**प्रत्यासत्तिमूलकोयम् । लक्ष्यानुरोधाच्च व्यवस्थेत्यपि पक्षान्तरम् ।**

सान्निध्याच्या पायावर—ह्मणजे ज्याचें सान्निध्य आहे त्याचाच बाध होणें उचित आहे व जें फार पूर्वीं सांगितलें आहे व सन्निध नाहीं त्याचा बाध होणें ठीक नाहीं ह्या पायावर—ही परिभाषा रचला आहे. (पण असेंहि ह्मणतां येईल कीं, पूर्वीं पठित असलेलें सूत्र अनुभवाचा विषय झालें असल्यामुळें, त्याचें चटकन् स्मरण होतें, व पुढें असलेलें सूत्र अनुभवाचा विषय झालें नसल्यामुळें, त्याचें स्मरण होणें शक्य नाहीं. अशा तऱ्हेनें प० ६१ व ६२ ह्या दोन्ही तुल्यबल मानतां येतील. मग कोणत्या ठिकाणीं कोणती परिभाषा लावावी हा प्रश्न येतो. ह्या प्रश्नाचें उत्तर हें कीं, इष्टरूपसिद्धि करण्याकरितां परिभाषा असल्यामुळें, ) ज्या परिभाषेनें इष्टरूप सिद्ध होईल ती परिभाषा लावावी असाहि दुसरा पक्ष आहे. ( प० ६२ ही प० ६१ पेक्षां बलवत्तर आहे. ह्मणून ती प्रथम लावावी हा एक पक्ष; व दोन्ही परिभाषा तुल्यबल आहेत व इष्टरूपसिद्धि होण्याकरितां जी परिभाषा उपयोगी पडेल ती लावावी, हा दुसरा पक्ष. )

**तत्र तत्र क्वचित्स्वरितत्वप्रतिज्ञासामर्थ्येन वा बाध्यतेऽयं न्यायः । यथा टिड्ढेति सूत्रेण डापा व्यवहितस्यापि ङीपो विधिः । न षडित्यादिना द्वयोरपि टाबङीपोः प्रतिषेधः । इयञ्च शि सर्वनामस्थानमित्यादौ भाष्ये स्पष्टेत्यन्यत्र विस्तरः ॥ ६२ ॥**

( पूर्वसूत्रांतील कांहीं भाग स्वरित केला असल्यास, ' स्वरितेनाधिकारः ' सू० ४६ ह्या सूत्रान्वयें स्वरित भागाची अनुवृत्ति त्या अधिकारांत पठित असलेल्या सूत्रांत होत असल्यामुळें, ) कोठें कोठें स्वरितत्वाच्या योगानें प्रकृतन्याय बाधित होतो. जसें ' टिड्ढाणञ् ' सू० ४७० ह्या सूत्रांत, ' ऋन्नेभ्यो ङीप् ' सू० ३०६ ह्या सूत्रांतील ' ङीप् ' स्वरित असल्यामुळें, जरी ' ऋन्नेभ्यो ङीप् ' व ' टिड्ढाणञ् ' ह्या दोन सूत्रां-

मध्यें ' डाबुभ्यामन्यतरस्याम् ' सू० ४६१ हें सूत्र आलें असून त्यांत ' डाप् ' चें विधान केलें आहे तरी, ' डाप् ' ची अनुवृत्ति न होतां, ' ङीप् ' ची अनुवृत्ति होते. ( ' अनन्तरस्य विधिः ' ह्या न्यायान्वयें वास्तविक, ' टिड्ढाणञ् ' ह्या सूत्राच्या अगदीं जवळ ' डाबुभाभ्यामन्यतरस्याम् ' हें सूत्र असल्यामुळें, ' डाप् ' ची अनुवृत्ति होऊन ' डाप् ' चें विधान ' टिड्ढाणञ् ' ह्या सूत्रांत व्हावें. पण ' ऋन्नेभ्यो ङीप् ' ह्यांतील ' ङीप् ' हा शब्द स्वरित असल्यामुळें, ' स्वरितेनाधिकारः ' सू० ४६ ह्या सूत्रान्वयें ' डाप् ' ची अनुवृत्ति न होतां, ङीप्‌ची अनुवृत्ति ' टिड्ढाणञ् ' ह्या सूत्रांत होते. ) तसेंच ' न षट् स्वस्रादिभ्यः ' सू० ३०८ व ' ऋन्नेभ्यो ङीप् ' ह्या दोन सूत्रांमध्यें, ' टाबृचि ' सू० ४५८ हें सूत्र असून त्यांत ' टाप् ' चें विधान केलें आहे तरी, ' न षट् स्वस्रादिभ्यः ' ह्या सूत्रांतील निषेध केवळ ' टाप् ' ला न लागतां, ' टाप् ' व ' ङीप् ' ह्या दोहोंसहि तो लागतो. ( ' अनन्तरस्य प्रतिषेधः ' ह्या न्यायानें तो निषेध फक्त ' टाप् ' लाच लागला पाहिजे होता. पण ' ङीप् ' स्वरित असल्यामुळें, तो निषेध ' ङीप् ' लाहि लागतो. ) ' शि सर्वनामस्थानम् '–१–४–३९ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. या विषयाचा विस्तार इतर ग्रन्थांत केला आहे.

---

# परिभाषा ६३

( आतांपर्यंत ग्रन्थकारांनीं तीन बाधबीजें सांगितलीं. पण इतर वैयाकरण आणखी दोन बाधबीजें मानतात. त्या दोन बाधबीजांपैकीं ' तद्प्राप्तियोग्येऽचारितार्थ्ये सति अपवादशास्त्रप्रवृत्त्युत्तरमुत्सर्गशास्त्रप्रवृत्तौ अपवादशास्त्रप्रणयनवैयर्थ्यसंभावना ' हें एक होय व हेंच चतुर्थ बाधबीज आहे. हें बाधबीज कोणत्याहि परिभाषेंत स्पष्ट सांगितलेलें दिसून येत नाहीं. परंतु याचा अर्थ असा आहे कीं जेथें जेथें विशेषशास्त्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें, तें विशेषशास्त्र व्यर्थ ठरण्याचा प्रसंग येतो व त्यामुळें विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त होतें व तें प्रवृत्त झाल्यानंतर जर सामान्यशास्त्रान्वयें कार्य केलें तर विशेषशास्त्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. असें आहे म्हणूनच या बाधबीजांत विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां अनवकाशत्वामुळें बाधक ठरतें. या बाधबीजाचें उदाहरण ' ज्ञानम् ' हें आहे. 'ज्ञान' या प्रातिपदिकाचें प्रथमेचें एकवचन करितांना ' ज्ञान+सु ' या स्थितींत ' स्वमोर्नपुंसकात् ' सू० ३१९ व ' अतोऽम् ' सू० ३०९ या दोन सूत्रांची प्राप्ति होते. ' अतोऽम् ' हें विशेषशास्त्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें 'स्वमोर्नपुंसकात्' या सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति आहेच. त्यामुळें तें विशेषशास्त्र व्यर्थ ठरण्याचा प्रसंग येतो. म्हणून तें विशेषशास्त्र प्रथम प्रवृत्त होतें व तें प्रथम प्रवृत्त झाल्यावर ' ज्ञान+सु=ज्ञान+अम् ' अशी स्थिति झाली असतां, ' अम् ' हा स्थानिवद्भावानें ' सु ' च आहे अशी बुद्धि

करून सामान्यशास्त्र नंतर प्रवृत्त केल्यास 'अम्' चा 'लुक्' होऊन 'ज्ञान' असें विकृतरूप होण्याची आपत्ति येते व 'अतोऽम्' हें मुद्दाम केलेलें विशेषशास्त्र व्यर्थ ठरण्याचा प्रसंग येतो. म्हणून या स्थलीं विशेषशास्त्र सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां बाधक ठरतें, व तें प्रथम प्रवृत्त झाल्यावर सामान्यशास्त्राची मुळींच प्रवृत्ति होऊं देत नाहीं. हाच या बाधबीजांत व तृतीय बाधबीजांत फरक आहे. 'उत्सर्गशास्त्रप्रवृत्त्यभावसंभावनाप्रयोज्यापवादशास्त्रप्रवृत्तिसंभावना' हें पंचम बाधबीज होय; व हें बाधबीज प्रकृतपरिभाषेंत ग्रथित केलें आहे. याचा अर्थ असा आहे कीं जर सामान्यशास्त्रान्वयें प्रथम कार्य केलें नाहीं तरच विशेषशास्त्रान्वयें पुढें प्राप्त होणारें कार्य करतां येतें; पण जर सामान्यशास्त्रान्वयें प्रथम कार्य केलें तर विशेषशास्त्रान्वयें पुढें प्राप्त होणारें कार्य करण्यास मुळींच वाव मिळत नाहीं आणि अशा रीतीनें तें विशेषशास्त्र व्यर्थ ठरूं पाहतें. तें विशेषशास्त्र व्यर्थ न ठरावें म्हणून जेथें पुढें विशेषशास्त्रान्वयें कार्य करावयाचें आहे तशा स्थलीं सामान्यशास्त्रान्वयें प्रथम प्राप्त झालेलें कार्य मुळींच करूं नये व विशेषशास्त्रान्वयें कार्य करण्याची वेळ आली म्हणजे विशेषशास्त्रान्वयेंच कार्य करावें. या बाधबीजाचें ग्रन्थकारानें 'दधति' हें उदाहरण दिलें आहे. 'धा' धातूचें प्रथमपुरुषाचें बहुवचनाचें रूप करतेवेळीं 'धा+झि' अशी स्थिति झाली असतां, 'धा' या धातूपुढें 'झि' हा प्रत्यय आला असल्यामुळें, 'झोऽन्तः' सू० २१६९ हें सामान्यशास्त्र प्रथम प्रवृत्त होऊं पाहतें व 'झि' प्रत्ययाचा अवयव जो झकार त्याचे जागीं अन्तादेश होऊं पाहतो. 'धा+झि' अशी स्थिति असतांना, 'अदभ्यस्तात्' सू० २४७९ हें विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याची वेळ आलेली नाहीं. 'धा' हा धातु जुहोत्यादिगणांतील असल्यामुळें, 'विकरणेभ्यो नियमो बलीयान्' प० ४१ या परिभाषेप्रमाणें प्रत्यय प्रथम लावल्यानंतर 'जुहोत्यादिभ्यः श्लुः' सू० २४८९ या सूत्रान्वयें जेव्हां 'श्लु' हें विकरण लागतें व नंतर 'श्लौ' सू० २४९० या सूत्रान्वयें द्विर्वचन होऊन 'धाधा=दधा' याला 'उभे अभ्यस्तम्' सू० ४२६ या सूत्रान्वयें अभ्यस्तसंज्ञा प्राप्त होते तेव्हांच 'अदभ्यस्तात्' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें. तों पर्यंत तें सूत्र मुळींच प्रवृत्त होऊं शकत नाहीं. सारांश या विशेषसूत्रान्वयें जें कार्य करणें आहे तें युगपत् प्राप्त होणारें कार्य नसून पुढें प्राप्त होणारें कार्य आहे. या कार्याची वाट न पाहतां—म्हणजे 'श्लु' विकरण लागणें, नंतर द्विर्वचन होणें व नंतर अभ्यस्तसंज्ञा प्राप्त होणें याची वाट न पाहतां—'धा+झि' अशा स्थितींत 'झोऽन्तः' हें जें सामान्यशास्त्र प्राप्त झालें आहे त्याची एकदम प्रवृत्ति केल्यास, 'धा + अन्त् + इ' अशी स्थिति होणार. अशी स्थिति झाली तरी, विकरण लागून द्विर्वचन झाल्यावर व अभ्यस्तसंज्ञा प्राप्त झाल्यावर 'अन्त्' हा 'झ्' च आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करून 'अदभ्यस्तात्' या विशेषसूत्रान्वयें 'अन्त्' चे जागीं 'अत्' असा आदेश करतां येतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'स्थानिवदादेशोऽनल्विधौ' सू० ४९ या स्थानिवद्भावाचें विधान करणाऱ्या सूत्रांत 'अनल्विधौ' हा निषेध

सांगितला असल्यामुळें व प्रकृतस्थलीं ' झ् ' या अलाचे जागीं अन्तादेश झाला असल्यामुळें, स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं—म्हणजे ' अन्त् ' हा ' झ् ' च आहे अशी बुद्धि करतां येत नाहीं—व त्यामुळें ' अन्त् ' चे जागीं अदादेश करतां येत नाहीं. मग ' दधति ' हें रूप कसें सिद्ध व्हावें ? या प्रश्नाचें उत्तर ही परिभाषा देते व तें उत्तर हें आहे कीं ' धा+झि ' हें उदाहरण विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याचें स्थल आहे हें माहीत असल्यामुळें, जरी या ठिकाणीं सामान्यशास्त्राची प्रथम प्राप्ति झाली आहे व त्यावेळीं विशेषशास्त्राची प्राप्ति झालेली नाहीं तरी, सामान्यशास्त्राची एकदम प्रवृत्ति करूं नये; विशेषशास्त्र प्रवृत्त होण्याच्या स्थितीची वाट पाहावी व तशी स्थिति झाल्यावर–म्हणजे विकरण लागून द्विर्वचन केल्यानंतर अभ्यस्तसंज्ञा झाल्यावर–विशेष शास्त्राचीच प्रवृत्ति करावी व सामान्यशास्त्राची मुळींच प्रवृत्ति करूं नये. तसें केल्यास ' दधा+झि=दधा +अत्+इ ' अशी स्थिति झाली असतां, ' श्नाभ्यस्तयोरातः ' सू० २४८३ या सूत्रानें 'धा' यांतील आकाराचा लोप होऊन ' दधति ' हें इष्टरूप सिद्ध होतें. या बाधबीजांत देखील विशेषशास्त्र अनवकाशत्वामुळें सामान्यशास्त्राचें नेहमीकरितां बाधक ठरतें. वर दिलेलें विवरण व प्रक्रिया ध्यानांत ठेऊन प्रकृत परिभाषा वाचल्यास ती समजण्यास कांहीं अडचण जाणार नाहीं. )

**ननु दधतीत्यादावन्तरङ्गत्वादन्तादेशेऽलिवधौ स्थानिवत्त्वाभावाददादेशो न स्यादिति तद्वैयर्थ्यापत्तिरत आह—**

' दधति ' इत्यादि स्थलीं अन्तादेशकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें तें प्रथम झाल्यावर व अल्विधि करितांना स्थानिवद्भाव मानतां येत नसल्यामुळें, अदादेश होणार नाहीं व अदादेशविधायकसूत्र व्यर्थ ठरेल. ( ' धा+झि ' अशा स्थितींत ' झोऽन्तः ' सू० २१६९ या सूत्रानें ' झि ' या प्रत्ययांतील ' झ् ' या अवयवाचे ठिकाणीं ' अन्त् ' हा आदेश प्राप्त होतो; पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ' शप् ' चे जागीं ' श्लु ' होऊन द्विर्वचन केल्यावर ' दधा ' यास अभ्यस्तसंज्ञा होते, व ती संज्ञा प्राप्त झाल्यावर अदादेशरूपी कार्य होणारें असल्यामुळें, आणि तें प्रकृति आणि प्रत्यय ह्यांना धरून होणारें कार्य असल्यामुळें, बहिरङ्ग कार्य आहे; ह्मणून ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ह्या परिभाषेप्रमाणें, अन्तादेशरूपी अन्तरङ्ग कार्य प्रथम होईल, नंतर वर सांगितल्याप्रमाणें अदादेश होऊं शकणार नाहीं, व ' अदभ्यस्तात् ' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टळावी, ) ह्मणून ही परिभाषा सांगतात:—

## पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः ॥ ६३ ॥

" प्रथम अपवाद आपापल्या विषयांत निश्चयेंकरून प्रवृत्त होतात, नंतर बाकी राहिलेल्या स्थलीं उत्सर्ग प्रवृत्त होतात. "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' धा+झि ' ह्या स्थलीं, ' अदभ्यस्तात् ' हें अपवाद सूत्र असल्यामुळें, प्रथम प्रवृत्त होऊन अदादेश होतो, व ' दधति ' हें रूप सिद्ध होतें. अपवादाचे जे विषय नाहींत तेवढ्याच स्थलीं ' झोऽन्तः ' हें सामान्यशास्त्र प्रवृत्त होतें. अपवादसूत्र ज्या उदाहरणांत लागू पडतें तेथें सामान्यशास्त्र प्रवृत्तच होत नाहीं. )

**लक्षणैकचक्षुष्को ह्यपवादविषयं पर्यालोच्य तद्विषयत्वाभावनिश्चय उत्सर्गेण तत्तल्लक्ष्यं संस्करोति । अन्यथा विकल्पापत्तिरित्यर्थः ।**

( ज्याची नजर सदैव लक्षणाकडे—म्हणजे पाणिनीय सूत्राकडे असते व जो पाणिनीय सूत्रान्वयें जशीं रूपें सिद्ध होतात तींच रूपें शुद्ध होत असें मानतो तो लक्षणैकचक्षुष्क होय. ) लक्षणैकचक्षुष्क पुरुषानें अपवादसूत्रांचें नीट पर्यालोचन केलें असल्यामुळें ( व प्रत्येक सामान्यशास्त्राचें जें अपवादशास्त्र आहे त्या दोहोंची एकवाक्यता करून सामान्यशास्त्राचा अर्थ मर्यादित केला असल्यामुळें ) अपवादाचे विषय कोणकोणते नाहींत याचें त्याला यथार्थ ज्ञान झालेलें असतें. त्यामुळें ( अपवादशास्त्रानें सिद्ध होणारीं लक्ष्यें वगळून बाकी राहिलेल्या उदाहरणांत ) तो सामान्यशास्त्र लावून इष्टरूप सिद्ध करितो. असें न केल्यास—म्हणजे सामान्यशास्त्र प्रथम प्रवृत्त करून नंतर पुन्हा विशेषशास्त्र प्रवृत्त केल्यास, दोन्हीं शास्त्रें सारखीच प्रमाण असल्यामुळें—दोन पाक्षिक रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल, ( व एकच इष्ट असलेलें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. उदाहरणार्थ ' धा+झि ' या स्थलीं, ' झोऽन्तः ' हें सामान्यशास्त्र प्रथम लावल्यास व त्यानंतर ' अदभ्यस्तात् ' हें अपवादशास्त्र लावल्यास ' दधन्ति ' व ' दधति ' अशीं दोन वैकल्पिक रूपें सिद्ध होतील. पण लक्षणैकचक्षुष्क पुरुषानें वरील दोन्ही सूत्रांची एकवाक्यता करून ' झोऽन्तः ' या सामान्यशास्त्राचा अर्थ संकुचित केला असल्यामुळें—म्हणजे ' अभ्यस्तव्यतिरिक्तधातोः परस्य प्रत्ययावयवस्य झकारस्य अन्तादेशः स्यात् ' असा संकुचित अर्थ केला असल्यामुळें—' धा+झि ' या स्थलीं सामान्यशास्त्राची प्राप्तीच नाहीं व हें अपवादशास्त्राचें उदाहरण आहे असें समजून तो अपवादशास्त्रच प्रवृत्त करितो व ' अदभ्यस्तात् ' या सूत्रान्वयें ' दधति ' हें इष्टरूप सिद्ध करितो )

**अभिनिविशन्त इत्यस्य बुद्ध्यारूढा भवन्तीत्यर्थः । अपवादो यद्यन्यत्र चरितार्थ इति न्यायस्य तु नात्र प्राप्तिरन्तादेशाप्राप्तिविषये चारितार्थ्याभावात् ॥ ६३ ॥**

या परिभाषेंतील ' अभिनिविशन्ते ' या पदाचा अर्थ ' बुद्धींत उपस्थित होतात ' असा आहे. ( अपवादाचे विषय कोणकोणते आहेत याचा बुद्धींत प्रथम यथार्थनिश्चय होत असल्यामुळें, लक्षणैकचक्षुष्क पुरुष उरलेल्या ठिकाणींच सामान्यशास्त्राची प्रवृत्ति करितो. ) ' अपवादो यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यते '—प. ६६—हा न्याय

'दधति' या उदाहरणाला लागू पडत नाहीं; कारण 'झोऽन्तः' या सूत्रानें न व्यापलेली अशी जागा 'अदभ्यस्तात्' या अपवादसूत्रास मिळूं शकत नसल्यामुळें तें आपलें कार्य करून चरितार्थ होऊं शकत नाहीं (आणि तें चरितार्थ होत नसून निरवकाश ठरत असल्यामुळें, 'झ्' च्या जागीं 'अन्त्' असा आदेश होणें हें जें अन्तरङ्गकार्य आहे त्या अन्तरङ्गकार्यानें अपवादशास्त्रानें, होणाऱ्या अदादेशरूपी बहिरङ्गकार्याचा बाध होऊं शकत नाहीं.)

---

# परिभाषा ६४

**लक्ष्यैकचक्षुष्कस्तु तच्छास्त्रपर्यालोचनं विनाप्यपवादविषयं परित्यज्योत्सर्गेण लक्ष्यं संस्करोति, तस्यापि शास्त्रप्रक्रियास्मरणपूर्वकप्रयोग एव धर्मोत्पत्तेः, तदाह—**

(ज्याची नजर सदैव लक्ष्याकडेच असते व शुद्ध शब्द नित्य आहेत व त्यांचें साधुत्व निश्चित करण्याकरितां पाणिनीय सूत्रांची अवश्यकता नसून केवळ धर्मोत्पत्तिकरितां त्या सूत्रांची आवश्यकता आहे असें जो समजतो तो लक्ष्यैकचक्षुष्क पुरुष होय.) लक्ष्यैकचक्षुष्क पुरुष उत्सर्गशास्त्राचा अर्थ निश्चित करतेवेळीं अपवादशास्त्राचा विचार न करून देखील, अपवादाचीं उदाहरणें वगळून, बाकीच्या उदाहरणांतच सामान्यशास्त्राची प्रवृत्ति करितो. (अशा पुरुषास 'दधति' हेंच रूप शुद्ध आहे हें पूर्णपणें माहीत असल्यामुळें, तो अशा ठिकाणीं अदादेशाला पाहून अदादेशाचें विधान करणाऱ्या 'अदभ्यस्तात्' या सूत्राचेंच स्मरण करितो व तेंच सूत्र एकदम प्रवृत्त करतो. परंतु 'पचन्ति' इत्यादि स्थलीं अन्तादेश झाला असल्यामुळें, तो अन्तादेशाचें विधान करणाऱ्या 'झोऽन्तः' या सूत्राचें स्मरण करतो व तें सूत्र प्रवृत्त करतो. त्यानें सामान्यसूत्र कोणतें व अपवादसूत्र कोणतें याचा विचार केलेला नसतो व दोहोंची एकवाक्यता करून सामान्यसूत्राचा अर्थ संकुचित केलेला नसतो; परंतु भाषेंत प्रचलित असलेल्या शुद्ध रूपाकडे नजर ठेऊन तो जें सूत्र जेथें लागू पडतें तेथें त्या सूत्राची प्रवृत्ति करतो. तथापि तोहि वैयाकरण असल्यामुळें व 'शास्त्रपूर्वके प्रयोगे अभ्युदयः' हा सिद्धान्त त्यालाहि मान्य असल्यामुळें) त्याला देखील शास्त्रप्रक्रियेचें स्मरण करून शब्दप्रयोग करण्यांतच पुण्य लाभतें. या वरील अर्थाची ही परिभाषा सांगतात.

**प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते ॥ ६४ ॥**

"प्रथम अपवादाच्या कक्षेंत येणारीं रूपें वगळून नंतर उरलेल्या उदाहरणांतच सामान्यशास्त्र उपयोगांत आणलें जातें."

तत इत्यस्यापवादशास्त्रपर्यालोचनात् प्रागपीत्यर्थः । प्रकल्प्येत्यस्य परित्यज्येत्यर्थः । अत एव प्रातिपदिकार्थसूत्रे भाष्ये इदं द्वयमप्युक्त्वा, न कदाचित्तावदुत्सर्गो भवत्यपवादं तावत्प्रतीक्षत इत्यर्थकमुक्तम् ॥ ६४ ॥

( प्रकृतपरिभाषेंत असणाऱ्या ‘ ततः ’ या पदाचा ‘ त्यानंतर ’ असा अर्थ करूं नये; कारण ‘ प्रकल्प्य ’ यांतील ल्यपानें आनन्तर्यरूपी अर्थ व्यक्त होतोच. म्हणून ) ‘ ततः ’ या पदाचा अर्थ ‘अपवादशास्त्राचा विचार करण्यापूर्वी देखील’ असा समजावा. तसेंच ‘ प्रकल्प्य ’ या पदाचा अर्थ ‘ वगळून ’ असा समजावा. असा या वरील दोन पदांचा अर्थ असल्यामुळें, ‘ प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमा ’ २-३-४६ या सूत्रावरील भाष्यांत वरील दोन्ही परिभाषा–प. ६३ व ६४–सांगून, ‘ न कदाचित्तावदुत्सर्गो भवत्यपवादं तावत् प्रतीक्षते ’–म्हणजे ‘ सामान्यशास्त्र केव्हांहि प्रथम प्रवृत्त होत नाहीं; तें अपवादशास्त्राची वाट पाहतें ’–अशा अर्थाचें वचन पठित केलें आहे. ( सारांश वरील दोन परिभाषा जरी भिन्न शब्दांत सांगितल्या आहेत तरी त्यांचा तात्पर्यार्थ एकच आहे व तो तात्पर्यार्थ भाष्यकारांनीं सांगितला आहे. त्यावरून हें सिद्ध होतें कीं ‘ धा+क्षि ’ अशा स्थलीं जरी सामान्यशास्त्राची प्राप्ति आहे व द्विर्वचन केल्यावर अभ्यस्तसंज्ञा प्राप्त झाल्यानंतरच अपवादशास्त्राची प्राप्ति आहे तरी अशा स्थलीं सामान्यशास्त्राची एकदम प्रवृत्ति न करितां अपवादशास्त्र प्रवृत्त होण्याच्या वेळेची वाट पाहवी व ती स्थिति प्राप्त झाल्याबरोबर अपवादशास्त्रच प्रवृत्त करावें आणि इष्टरूपाची सिद्धि करावी. )

---

## परिभाषा ६५

एतन्मूलकमेव नवीनाः पठन्ति ॥

वर सांगितलेल्या दोन परिभाषांच्या अर्थाला व तसेंच ‘ न कदाचित्तावदुत्सर्गो भवत्यपवादं तावत् प्रतीक्षते ’ या भाष्यपठित वचनाला धरूनच नवीन वैयाकरण खालीं दिलेली परिभाषा पठित करितात.

**उपसंजनिष्यमाणनिमित्तोऽप्यपवाद उपसंजातनिमित्तमप्युत्सर्गं बाधत इति ॥ ६५ ॥**

“ ज्याचें निमित्त पुढें उपस्थित होणार आहे असा देखील अपवाद, ज्याचें निमित्त उपस्थित झालें आहे अशाहि सामान्यशास्त्राचा, बाधक होतो. ”

( अशी ही परिभाषा असल्यामुळें ‘ धा+क्षि ’ अशा स्थितींत जरी ‘ झोऽन्तः ’ या सामान्यशास्त्राचें निमित्त उपस्थित आहे व द्विर्वचन केलें नसल्यामुळें आणि अभ्य

स्तसंज्ञा प्राप्त झाली नसल्यामुळें ' अदभ्यस्तात् ' या अपवादशास्त्राचें निमित्त उपस्थित झालें नसून, द्विर्वचन केल्यावर व अभ्यस्तसंज्ञा प्राप्त झाल्यावर तें सूत्र प्रवृत्त होण्याचें निमित्त पुढें उपस्थित होणार आहे तरी, अपवादसूत्र सामान्यशास्त्राचा बाध करून स्वतः प्रथम प्रवृत्त होतें, व त्यामुळें ' दधन्ति ' असें रूप न होतां, ' दधति ' असें इष्टरूप सिद्ध होतें. )

**यत्तु अभ्यस्तसंज्ञासूत्रे कैयटेन प्रकल्प्य चेति प्रतीकमुपादाय यथा न संप्रसारण इति परस्य यणः पूर्वं संप्रसारणं, पूर्वस्य तु तन्निमित्तकः प्रतिषेध इत्युक्तं, तत्तु तत उत्सर्ग इत्याद्यक्षरार्थाननुगुणम् ॥**

' उभे अभ्यस्तम् ' ६–१–५ या अभ्यस्तसंज्ञाविधायक सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत ' प्रकल्प्य च ' असें प्रतीक देऊन कैयटानें असें म्हटलें आहे कीं ( ' व्यध्+क्त ' अशा स्थितींत ' ग्रहिज्यावयिव्यधि ' सू० २४१२ या सूत्रानें, ' क्त ' हा कित्प्रत्यय पुढें असल्यामुळें, ' व्यध् ' यांतील यणाला–म्हणजे ' व् ' आणि ' य् ' यांना—संप्रसारण प्राप्त झालें आहे. पण ) ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' सू० ३६३ हें सूत्र असल्या-मुळें, परयणाचें–म्हणजे ' य् ' चें–संप्रसारण प्रथम होतें व तें झाल्यावर पूर्वयण् 'व्' याच्यापुढें संप्रसारण आलें असल्यामुळें, पूर्वयणाच्या संप्रसारणाचा निषेध होतो–म्हणजे ' व् ' चें संप्रसारण होऊं शकत नाहीं. पण हें कैयटाचें म्हणणें ( परिभाषा ६४ मधील ) ' तत उत्सर्गः ' इत्यादि पदांच्या अर्थाला धरून नसल्यामुळें ग्राह्य नाहीं. ( व्यध् + क्त ' या स्थलीं कैयटानें प० ६४ लावली आहे, पण त्यानें या स्थलीं ती परिभाषा लावावयास नको होती; कारण जेथें दोन सूत्रांत उत्सर्गापवादभाव आहे तेथेंच ती परिभाषा लागू पडते व तशाच ठिकाणीं ती परिभाषा लावणें योग्य आहे. पण ' ग्रहिज्या ' व ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' या दोन सूत्रांत उत्सर्गापवादभाव मुळींच नाहीं; कारण ' विविधतुः ' इत्यादि स्थलीं ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' हें सूत्र चरितार्थ ठरतें व तें निरवकाश होत नसल्यामुळें त्याला अपवादसूत्र मानतां येत नाहीं. ' व्यध् + अतुस् ' अशा स्थितींत, ' ग्रहिज्या ' हें संप्रसारणाचें विधान करणारें सूत्र परसूत्र असल्यामुळें व तसेंच ' सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् ' हा न्याय असल्यामुळें, प्रथम संप्रसारण होतें व नंतर द्वित्व होतें व द्वित्व झाल्यावर 'विविध् + अतुस् ' अशी स्थिति झाली असतां, 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' सू० २४०८ या सूत्रानें अभ्यासांतील वकाराला संप्रसारण पावलें आहे. तें न व्हावें म्हणून ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' हें सूत्र केलें आहे व अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ ठरत असल्यामुळें त्याला ' ग्रहिज्या ' या सामान्यसूत्राचें अपवादकसूत्र मानतां येत नाहीं. सारांश ' ग्रहिज्या ' व ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' या दोन सूत्रांत उत्सर्गापवादभाव नसल्यामुळें कैयटाचें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. )

यत्त्वपवादवाक्यार्थं विना नोत्सर्गवाक्यार्थ इति तदर्थ इति तन्न। अभिनिविशतेऽपवादविषयमित्यादिपदस्वारस्यभङ्गापत्तेः। पदजन्यपदार्थोपस्थितौ वाक्यार्थबोधाभावे कारणाभावाच्च।

कित्येक वैयाकरण ( प० ६४ चा ) अर्थ असा करितात कीं, अपवादसूत्रांचा अर्थ निश्चित केल्याखेरीज सामान्यसूत्रांच्या अर्थाचा योग्य बोध होत नाहीं. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ह्या परिभाषेचा असा अर्थ केल्यास, ‘ अभिनिविशते ’ व ‘ अपवादविषयम् ’ इत्यादि पदांचें स्वारस्य नष्ट होतें. ( ‘ अभिनिविशते ’ या पदाचा अर्थ ‘ प्रवर्तते ’ असा आहे व ‘ प्रकल्प्य चापवादविषयम् ’ चा अर्थ ‘ अपवादविषयं परित्यज्य ’ असा आहे. या अर्थाला धरून वरील अर्थ नसल्यामुळें, तो अर्थ बरोबर मानतां येत नाहीं, व तो बरोबर मानल्यास, वर दिलेल्या पदांचें स्वारस्य नष्ट होतें. ) दुसरें असें कीं, वाक्यांतील पदांचा अर्थ कळल्यावर वाक्याच्या अर्थाचा बोध होत नाहीं असें म्हणण्यास कांहींच प्रमाण नाहीं.

यत्रत्वपवादो निषिद्धस्तत्रापवादविषयेऽप्युत्सर्गः प्रवर्तत एव। यथा वृक्षावित्यत्र नादिचीति पूर्वसवर्णदीर्घनिषेधादप्रवर्तमानस्य वृद्धिबाधकत्वाभावाद्वृद्धिः प्रवर्तते। अत एव तौ सदित्यादि सङ्गच्छते।

जेथें अपवादाचा निषेध केला आहे तेथें अपवादविषयामध्यें देखील सामान्यशास्त्र प्रवृत्त होतें—म्हणजे अपवादाचा निषेध केला असल्यास, अपवादसूत्राच्या कक्षेंत येणाऱ्या उदाहरणांत सामान्यशास्त्र लागू पडतें. जसें—‘ वृक्षौ ’ ह्या उदाहरणांत, ‘ नादिचि ’ सू० १६५ ह्या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घाचा निषेध केला असल्यामुळें, पूर्वसवर्णदीर्घ होऊं शकत नाहीं, व त्यामुळें वृद्धीचा बाध होत नाहीं. ( ‘ वृक्ष + औ ’ ह्या स्थितींत, ‘ वृद्धिरेचि ’ सू० ७२ हें सूत्र पावलें आहे. पण ‘ प्रथमयोः पूर्वसवर्णः ’ सू० १६४ हें वृद्धीचा बाध करणारें सूत्र असल्यामुळें, अपवाद प्रथम प्रवृत्त होईल, व तो वृद्धीचा बाधक ठरून प्रथम प्रवृत्त झाल्यास, ‘ वृक्ष + औ = वृक्षा ’ असें विकृत रूप होईल. परंतु ‘ नादिचि ’ सू० १६५ ह्या सूत्रानें सवर्णदीर्घाचा निषेध केला असल्यामुळें, ‘ प्रथमयोः पूर्वसवर्णः ’ हें सूत्र येथें प्रवृत्त होत नाहीं, व त्यामुळें वृद्धीचा बाध न होतां ‘ वृद्धिरेचि ’ हें सामान्यसूत्र लागून ‘ वृक्षौ ’ असें रूप होतें. ) असा नियम असल्यामुळेंच, ‘ तौ सत् ’ सू० ३१०६ इत्यादि स्थलीं, ‘ तौ ’ इत्यादि रूपें बरोबर ठरतात. ( ‘ तत् + औ ’ ह्या स्थलीं, ‘ त्यदादीनामः ’ सू० २६५ ह्या सूत्रानें अन्त्य ‘ त् ’ चे जागीं अकार होऊन व ‘ अतो गुणे ’ सू० १९१ ह्या सूत्रानें पररूप एकादेश होऊन ‘ त + औ ’ अशी स्थिति झाली असतां, ‘ नादिचि ’ ह्या निषेधक सूत्रानें ज्याचा निषेध केला आहे असें ‘ प्रथमयोः पूर्वसवर्णः ’ हें वृद्धीचा बाध करणारें सूत्र प्रवृत्त होत नाहीं· त्यामुळें वृद्धीचा बाध न होतां, ‘ वृद्धिरेचि ’ ह्यानें वृद्धि होऊन ‘ तौ ’ असें रूप

सिद्ध होतें. सारांश, ' तौ सत् ' इत्यादि निर्देशावरून वर सांगितलेला नियम सिद्ध होतो. )

**अत एव निर्देशाद्भ्रष्टावसरन्यायस्यात्र शास्त्रेऽनाश्रयणम् । ध्वनितं चेदमिको गुणेति सूत्रे भाष्य इति भाष्यप्रदीपोद्योते निरूपितम् ॥ अत्र देवदत्तस्य हन्तरि हते देवदत्तस्योन्मज्जनं नेति न्यायस्य विषय एव नास्ति । हते देवदत्त उन्मज्जनं न । देवदत्तहननोद्यतस्य हनने तु भवत्येवोन्मज्जनम् । प्रकृतेऽपि न पूर्वसवर्णदीर्घेण वृद्धेर्हननं किन्तु हननोद्यमसजातीयं प्रसक्तिमात्रं प्रसक्तस्यैव निषेधात् ॥**

म्हणूनच ( ' तौ सत् ' इत्यादि निर्देश असल्यामुळें ) हें स्पष्ट होतें कीं व्याकरणशास्त्रांत ' भ्रष्टावसरन्याय ' मानीत नाहींत. ( ज्याचा अवसर एकदां निघून गेला आहे त्याची पुनः प्रवृत्ति न होणें ह्याला ' भ्रष्टावसरन्याय ' म्हणतात. व्याकरणशास्त्रांत हा न्याय मानल्यास, ' तौ सत् ' इत्यादि सूत्रांत ' तौ ' असें रूप सिद्ध होणार नाहीं; कारण ' वृद्धिरेचि ' ह्या सूत्राचा ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' ह्या अपवादसूत्रानें बाध होऊन वृद्धिरूप कार्याचा एकदां बाध झाला कीं, तें पुनः प्रवृत्त होऊं शकणार नाहीं, व त्यामुळें ' तौ ' ' वृक्षौ ' इत्यादि रूपें सिद्ध न होतां, ' ता ' ' वृक्षा ' अशीं विकृत रूपें होतील, व ' तौ सत् ' ह्या सूत्रांतील ' तौ ' हा निर्देश चुकीचा ठरेल. ) ' इको गुणवृद्धी ' १-१-३ ह्या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे व ह्याचें निरूपण भाष्यप्रदीपोद्योतांत केलें आहे. ' देवदत्ताचा ज्यानें प्राण घेतला आहे त्याला मारून टाकल्यास, देवदत्त कांहीं जिवंत होत नाहीं ' हा न्याय ' तौ ', ' वृक्षौ' इत्यादि स्थलीं लागू पडत नाहीं. देवदत्त एकदां मारला गेला म्हणजे तो पुनः जिवंत होत नाहीं; पण देवदत्तास मारण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा प्राण घेतल्यास, देवदत्ताचे प्राण वांचतात. प्रकृत उदाहरणांत–म्हणजे 'तौ' ' वृक्षौ ' इत्यादि उदाहरणांत–' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' ह्या सूत्रानें ' वृद्धिरेचि ' ह्याचा नाश केला नसून, तें सूत्र नाश करण्यास केवळ प्रवृत्त होऊं पाहतें, व त्याचें प्रवृत्त होऊं पाहणें हेंच नाश करण्यास प्रवृत्त होण्यासारखें आहे. ( व त्याच्या प्रवृत्तीला ' नादिचि ' ह्या सूत्रानें प्रतिबंध करून त्याचा नाश केल्यावर ज्याप्रमाणें देवदत्ताचा प्राण घेण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा प्राण घेतला म्हणजे देवदत्ताचे प्राण वांचतात, त्याचप्रमाणें ' वृद्धिरेचि ' ह्या सूत्राचा नाश करण्यास प्रवृत्त झालेल्या ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' ह्या अपवादसूत्राचा ' नादिचि ' ह्या निषेधात्मक सूत्रानें नाश–बाध–केल्यामुळें 'वृद्धिरेचि' ह्या सूत्राचे प्राण वांचतात, व तें सूत्र वृद्धिरूप कार्य करतें. ) जें प्राप्त आहे त्याचाच निषेध केला जातो. ( असा न्याय आहे म्हणूनच ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' ह्या सूत्राची प्राप्ति झाली असल्यामुळें, ' नादिचि ' ह्या सूत्रानें त्याचा निषेध करणें–म्हणजे प्रवृत्ति होऊं न देणें–भाग पडलें. )

**प्रतिपदोक्तत्वमपि निरवकाशत्वे सत्येव बाधप्रयोजकम् । स्पष्टं चेदं शेषाद्विभाषेति सूत्रे भाष्ये । तत्र हि शेषग्रहणमनर्थकं ये प्रतिपदं विधीयन्ते ते बाधका भविष्यन्तीत्याशङ्क्यानवकाशा हि विधयो बाधका भवन्ति समासान्ताश्च कबभावे सावकाशा इत्युक्तम् ।**

( जेथें सूत्रांत एखादा विशेष शब्द उच्चारून कांहीं कार्य होणें सांगितलें आहे त्याला ' प्रतिपदविधि ' म्हणतात. ) ' प्रतिपदविधि ' सामान्यशास्त्राचा तेव्हांच बाधक होतो कीं जेव्हां सामान्यशास्त्रास बाधल्याखेरीज त्याची कोठेंहि प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व तो निरवकाश ठरण्याचा प्रसङ्ग येतो. ( सामान्यशास्त्रानें सर्व जागा व्यापली असल्यामुळें, जेथें प्रतिपदविधीला आपलें कार्य करण्यास कोणतेंच उदाहरण मिळूं शकत नाहीं व तो व्यर्थ ठरूं पाहतो तशाच ठिकाणीं तो सामान्यशास्त्राचा बाधक होतो. जसें ' पादोऽन्यतरस्याम् ' सू० ४५७ ह्या सामान्यशास्त्रानें सर्व जागा व्यापली असल्यामुळें, ' ऋचि ' हा शब्द उच्चारून सांगितलेला ' टाबृचि ' सू० ४५८ हा प्रतिपदविधि सावकाश होत नसल्यामुळें, तो सामान्यशास्त्राचा बाध करितो व ' द्विपदा ऋक् ' या स्थलीं वैकल्पिक ' ङीप् ' प्रत्यय न होतां केवळ ' टाप् ' प्रत्ययच होतो. ) ' शेषाद्विभाषा ' ५–४–१५४ ह्या सूत्रावरील भाष्यांत हें सांगितलें आहे. त्या भाष्यांत अशी शंका उपस्थित केली आहे कीं, ' शेषाद्विभाषा ' ह्या सूत्रांत ' शेषात् ' हें पद व्यर्थ घातलें आहे. ( कारण ' विभाषा ' एवढेंच जरी सूत्र असलें तरी ज्या सूत्रांत विशेष शब्द उच्चारून ते शब्द समासाच्या अन्तीं असल्यास समासान्त प्रत्यय होणें सांगितलें आहे ते प्रतिपदविधि 'विभाषा' ह्या सामान्यशास्त्राचे बाधक ठरतीलच. ते तसे न ठरल्यास, त्यांतील विशेष-पद उच्चारून केलेलें विधान अनर्थक ठरण्याचा प्रसंग येईल; ) परंतु पुढें भाष्यकारांनीं ह्या शंकेचें समाधान असें केलें आहे कीं निरवकाश होत असलेलेच प्रतिपदविधि सामान्यशास्त्राचे बाधक होतात; पण विशेष शब्द उच्चारून जेथें इतर समासान्त प्रत्यय सांगितले आहेत, तशा स्थलीं ते प्रतिपदविधि कपाच्या अभावीं सावकाश ठरतील. (' शेषाद्विभाषा ' सू० ८९१ ह्या सूत्रांतून ' शेषात् ' हा शब्द गाळल्यास व 'विभाषा' —म्हणजे विकल्पेंकरून ' कप् ' प्रत्यय होतो—एवढेंच सूत्र केल्यास, जेथें नित्य ' कप् ' प्रत्यय प्राप्त आहे अशी जागा—म्हणजे 'उरःप्रभृतिभ्यः कप्' सू० ८८९, ' इनः स्त्रि-याम् ' सू० ८९० व ' नद्यृतश्च ' सू० ८३३ हीं सूत्रें—सोडून, बाकी सर्व ठिकाणीं —म्हणजे जेथें इतर समासान्त प्रत्यय सांगितले आहेत तेथें देखील–, ' विभाषा ' हें सूत्र लागेल; आणि तें सूत्र लावल्यास जेव्हां विकल्पानें ' कप् ' प्रत्यय करणार नाहीं तेव्हां प्रतिपदविधींत सांगितलेल्या त्या त्या समासान्त प्रत्ययांची प्राप्ति होईल व अशा रीतीनें ते प्रतिपदोक्त समासान्त प्रत्यय सावकाश ठरतील व त्यामुळें ते ' विभाषा ' ह्या सामान्यसूत्राचे बाधक होणार नाहींत. त्याचा परिणाम असा

होणार कीं, ' कप् ' प्रत्यय विकल्पेंकरून न केल्यास, ते प्रत्यय होतील, व ' कप् ' प्रत्यय विकल्पेंकरून केल्यास, कप्प्रत्ययान्त देखील रूपें होतील, आणि अशा रीतीनें उभयप्रत्ययान्त दोन रूपें होतील. पण ' शेषात् ' हें पद सूत्रांत असल्यास, नित्य ' कप् ' प्रत्ययाची व इतर समासान्त प्रत्ययांची जागा सोडून बाकी जेवढी जागा उरली आहे तेवढ्याच ठिकाणीं विभाषा प्राप्त होईल, आणि त्यामुळें जेथें इतर समासान्त प्रत्यय सांगितले आहेत तेथें ' कप् ' प्रत्यय होणार नाहीं व अशुद्ध कप्प्रत्ययान्त रूपें होणार नाहींत. सारांश, वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, सावकाश असलेले प्रतिपदविधि सामान्यशास्त्राचे बाधक होत नसतात. )

**क्वचिदनवकाशत्वाभावेऽपि परनित्यादिसमवधाने शीघ्रोपस्थितिकत्वेन पूर्वप्रवृत्तिप्रयोजकं बलवत्वं प्रतिपदविधित्वेनापि, परनित्यान्तरङ्गप्रतिपदविधियो विरोधिसन्निपाते तेषां मिथः प्रसङ्गे परबलीयस्त्वमिति प्रत्ययोत्तरपदयोश्चेति सूत्रे कैयटेन पाठात् ।**

कोठें कोठें प्रतिपदविधि अनवकाश नसून देखील -म्हणजे सावकाश असला तरी, पर, नित्य, किंवा अन्तरङ्ग, व प्रतिपदविधि ह्यांची युगपद् प्राप्ति झाली असतां त्यांच्या बलाबलत्वाचा विचार केल्यास, प्रतिपदविधींत विशेषशब्दाचें उच्चारण केलें असल्यामुळें, तो सर्वांचे पूर्वीं उपस्थित होतो व त्यामुळें तो प्रथम प्रवृत्त होण्यापुरता जास्त बलवान् ठरतो. असें म्हणण्याला प्रमाण हें आहे कीं, ' प्रत्ययोत्तरपदयोश्च ' ७-२-९८ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें ' परनित्यान्तरङ्गप्रतिपदविधयः, विरोधिसन्निपाते तेषां मिथः प्रसङ्गे परबलीयस्त्वम् ' असें वचन पठित केलें आहे. ( त्याचा अर्थ असा आहे कीं, पर, नित्य, अन्तरङ्ग, व प्रतिपदविधि आहेत. ते जर एखाद्या उदाहरणांत एकेचवेळीं प्रवृत्त झाले व त्यांच्या मध्यें विरोध उत्पन्न झाला व कोणत्या विधीनें कार्य करावें हा प्रश्न उपस्थित झाला तर, अशा ठिकाणीं, उत्तरोत्तरविधि बलवान् समजावा, व त्यानें कार्य करावें.)

**अत एव रमे इत्यादौ प्रतिपदोक्तत्वात्पूर्वमेत्व आकारप्रश्लेषाद्धल्ङ्यादिलोपो न प्राप्नोतीत्याशङ्क्य एङ्ह्रस्वादिति लोपेन समाहितम् ॥ ६५ ॥**

( प्रतिपदविधि सावकाश असून देखील सामान्यशास्त्राचा बाध करून प्रथम प्रवृत्त होतो असा नियम आहे ) म्हणूनच, ' रमे ' इत्यादि स्थलीं, प्रतिपदविधीनें प्रथम एत्व केल्यावर, ' हल्ङ्याब्भ्यो दीर्घात् ' ह्या सूत्रांत आकारप्रश्लेष केला असल्यामुळें, त्या सूत्रानें, ' सु ' प्रत्ययाचा लोप होऊं शकत नाहीं अशी शंका उपस्थित करून, ' एङ्ह्रस्वात्संबुद्धेः ' ह्या सूत्रानें सुलोप होतो असें त्या शङ्केचें समाधान केलें आहे. ( ' रमा ' या आबन्त प्रातिपदिकास संबुद्धीचा ' सु ' प्रत्यय लावला असतां, ' रमा + सु ' अशा स्थितींत ' हल्ङ्याब्भ्यः ' सू० २५२ व

' सम्बुद्धौ च ' सू० २८८ या दोन सूत्रांची प्राप्ति होते. या दोन सूत्रांपैकीं 'सम्बुद्धौ च ' या सूत्रांत ' सम्बुद्धौ ' हें विशेषपद उच्चारून कार्य होणें सांगितलें असल्यामुळें हा प्रतिपदविधि आहे, व तो सावकाशहि आहे; कारण ' हल्ङ्याब्भ्यः ' या सूत्रानें सुलोप केल्यावर ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र लावल्यास, 'सु' कायमच आहे असें समजून ' सम्बुद्धौ च ' या सूत्रान्वयें एत्व करतां येतें. तरी देखील–म्हणजे ' सम्बुद्धौ च ' हा प्रतिपदविधि सावकाश असून देखील–तो प्रथम प्रवृत्त होतो. तो प्रथम प्रवृत्त झाल्यावर एत्व होऊन ' रमे + सु ' अशी स्थिति झाली असतां, ' हल्ङ्याब्भ्यः ' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व ' सु ' लोप होऊं शकत नाहीं. ' रमे + सु ' येथील ' रमे ' याला स्थानिवद्भावानें ' रमा ' च आहे असें मानल्यास, ' सु ' लोप होऊं शकतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ' हल्ङ्याब्भ्यः ' या सूत्रांत ' हल्, ङी , आ, आप् ' अशीं पदें पाडून आकारप्रश्लेष केल्यामुळें त्या सूत्राचा असा अर्थ होतो कीं आबन्त शब्दापुढें ' सु ' प्रत्यय आल्यास, त्या ' सु ' प्रत्ययाचा लोप करतेवेळीं जर तो शब्द आकारान्त असेल तरच सुलोप होऊं शकतो. 'रमे+सु' या स्थलीं जरी 'रमा' हें आबन्त प्रातिपदिक आहे तरी ' सु ' लोप करतेवेळीं तें आबन्त राहत नसून एकारान्त प्रातिपदिक राहतें. ' स्थानिवदादेशोऽनल्विधौ ' या सूत्रांत ' अनल्विधौ ' असा प्रतिषेध असल्यामुळें व प्रकृतस्थलीं आकाराला मानून सुलोप सांगितला असल्यामुळें आणि त्यामुळें हा अल्विधि ठरत असल्यामुळें, येथें स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. मग ' रमे + सु ' अशी स्थिति झाली असतां, जर ' हल्ङ्याब्भ्यः ' हें सूत्र लागू शकत नाहीं तर सुलोप व्हावा कसा ? या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं ' एङ् ह्रस्वात्सम्बुद्धेः ' सू० १९३ या सूत्रानें सुलोप होऊं शकतो, व तो केला म्हणजे ' रमे ' असें संबुद्धीचें रूप सिद्ध होतें. )

---

## परिभाषा ६६

**नन्वयजे इन्द्रमित्यादावन्तरङ्गस्यापि गुणस्यापवादेन सवर्णदीर्घेण बाधः स्यादत आह—**

' अयजे इन्द्रम् ' इत्यादि स्थलीं, गुणैकादेशरूपी कार्य जरी अन्तरङ्ग आहे, तरी अपवादात्मक सवर्णदीर्घकार्यानें त्याचा बाध होईल. ( ' अयज+इ्+इन्द्रम् ' येथें, गुणरूपी एकादेशाचें निमित्त ' इ् ' प्रथम उपस्थित असल्यामुळें, ' आद्गुणः ' सू० ६९ ह्या सूत्रानें होणारें गुणैकादेशरूपी कार्य अन्तरङ्ग आहे. सवर्णदीर्घाचें निमित्त–' इन्द्रम् ' ह्यांतील ' इ् '–पलीकडे असल्यामुळें, ' अकः सवर्णे दीर्घः ' सू० ८५ ह्या सूत्रानें होणारें सवर्णदीर्घकार्य बहिरङ्ग आहे. म्हणून अन्तरङ्ग कार्य प्रथम व्हावें, पण ' अन्तरङ्ग-

दप्यपवादो बलीयान्' अशी परिभाषा असल्यामुळें, व सवर्णदीर्घकार्य गुणादेशाचा अपवाद असल्यामुळें, सवर्णदीर्घ प्रथम होईल, व तसें झाल्यास, 'अयज+इ+इन्द्रम् =अयज+ईन्द्रम्=अयजेन्द्रम्' असें विकृत रूप होईल. ही आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

अपवादो यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यते ॥ ६६ ॥

"जर अपवाद इतर स्थलीं चरितार्थ असला तर त्याचा अन्तरङ्गकार्यानें बाध होतो."

निरवकाशत्वरूपस्य बाधकत्वबीजस्याभावात्। एवं च प्रकृतेऽन्तरङ्गेण गुणेन सवर्णदीर्घः समानाश्रये चरितार्थो यण्गुणयोरपवादोऽपि बाध्यते।

अपवाद उत्सर्गाचा बाधक होण्यास तो निरवकाश असावा लागतो. जो अपवाद निरवकाश नाहीं–म्हणजे इतर ठिकाणीं चरितार्थ आहे,–त्याचे ठिकाणीं बाधकत्व येण्याचें मूळ कारण राहत नसल्यामुळें, तो बाधक होत नाहीं. म्हणून प्रकृत उदाहरणांत, 'अकः सवर्णे दीर्घः' ह्या सूत्रानें होणारा सवर्णदीर्घ, जरी ('इको यणचि' ह्यानें होणाऱ्या) यणादेशाचा व ('आद्गुणः' ह्यानें होणाऱ्या) गुणरूपी एकादेशाचा ('यद्यत्प्राप्नोति तद्बाध्यम्' या बाध्यसामान्यचिन्तेनें) अपवादक आहे तरी, तो इतर समाननिमित्तक उदाहरणांत चरितार्थ होत असल्यामुळें व अशा रीतीनें निरवकाश ठरत नसल्यामुळें, तो गुणैकादेशरूपी अन्तरङ्ग कार्यानें बाधित होतो. ('भानु+उदयः,' 'हरि+इच्छा' 'होतृ+ऋकारः' इत्यादि स्थलीं, 'इको यणचि' ह्या सामान्यसूत्राची ज्या निमित्तामुळें प्राप्ति आहे त्याच निमित्तामुळें 'अकः सवर्णे दीर्घः' ह्या अपवादसूत्राची प्राप्ति आहे, व 'अकः सवर्णे दीर्घः' हें अपवादसूत्र ह्या ठिकाणीं चरितार्थ होतें. तसेंच, 'कृष्ण+अर्पण' 'दण्ड+अग्रम्' इत्यादि स्थलीं, 'आद्गुणः' ह्या सामान्यशास्त्राची ज्या निमित्तामुळें प्राप्ति आहे त्याच निमित्तामुळें 'अकः सवर्णे दीर्घः' ह्याचीहि प्राप्ति आहे. येथें 'अकः सवर्णे दीर्घः' हें अपवादसूत्र चरितार्थ ठरतें. अशा रीतीनें हें अपवादसूत्र जेथें सामान्यशास्त्राची प्राप्ति आहे तेथें सावकाश ठरत असल्यामुळें, प्रकृत उदाहरणांत गुणैकादेशरूपी अन्तरङ्गकार्यानें त्याचा, ह्या परिभाषेप्रमाणें, बाध होतो. म्हणून 'अयज + इ +इन्द्रम्' येथें, गुणैकादेशरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, सवर्णदीर्घरूपी बहिरङ्ग अपवादक कार्याचें बाधक होऊन, प्रथम होतें, आणि 'अयजे + इन्द्रम्' असा इष्ट सन्धि होतो. )

पूर्वोपस्थितनिमित्तकत्वरूपान्तरङ्गत्वविषय इदम् ॥

ही परिभाषा अशाच ठिकाणीं लागू पडते कीं जेथें प्रथम उपस्थित होणाऱ्या निमित्तामुळें कार्यास अन्तरङ्गत्व येतें (अन्तरङ्गत्व इतर कारणामुळें देखील येऊं शकतें.

प्रथमोपस्थितिरूप कारणाहून भिन्न कारणामुळें अन्तरङ्गत्व येत असल्यास, तशा ठिकाणीं ही परिभाषा लागू पडत नाहीं व अपवादशास्त्रच प्रथम प्रवृत्त होतें. जसें 'अक्ष+दिव्+क्विप्' ह्या स्थलीं, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ ह्या सूत्रानें 'क्विप्=व्' हा वल् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असल्यामुळें, 'व्' लोपाची प्राप्ति आहे, व तसेंच 'च्छ्वोः शूठ्' सू० २५६१ ह्या सूत्रानें वकाराचे जागीं 'ऊठ्' आदेश होण्याची प्राप्ति आहे. 'च्छ्वोः शूठ्' हें सूत्र 'लोपो व्योर्वलि' ह्या सूत्राचा अपवाद आहे, व इतरत्र सावकाश असणारें सूत्र आहे. तसेंच वलोपरूपी कार्य अन्तरङ्ग असून, 'च्छ्वोः शूठ्' ह्या सूत्रानें होणारें कार्य बहिरङ्ग आहे; कारण वलोपरूपी कार्य 'क्विप्' ह्यांतील केवळ 'व्' ला मानून होणारें, वर्णाश्रयनिमित्तक कार्य आहे, व ऊठ्रूपी कार्य, ज्यांत 'व्' अन्तर्भूत आहे अशा पूर्ण कित् 'क्विप्' प्रत्ययाला मानून होणारें प्रत्ययाश्रय कार्य आहे व त्यामुळें, तें बहिरङ्ग कार्य आहे. तरीपण ह्या उदाहरणांत प्रथमोपस्थितनिमित्तक बहिरङ्गत्व नसल्यामुळें, ही परिभाषा लागू पडत नाहीं. त्यामुळें 'व्' लोपरूपी अन्तरङ्ग कार्यानें ऊठ्रूपी बहिरङ्ग कार्याचा बाध न होतां, अपवादसूत्र प्रथम प्रवृत्त होतें; व वकाराचा लोप न होतां, वकाराचे जागीं ऊठ् होऊन 'अक्षद्यूः' असें रूप होतें. )

**यत्वागमादेशयोर्न बाध्यबाधकभावो भिन्नफलत्वादत एव ब्राह्मणेभ्यो दधि दीयतां कम्बलः कौण्डिन्यायेत्यादौ कम्बलदानेन न दधिदानबाध इति च्छ्वोरिति सूत्रे कैयटस्तन्न। अपवादो नुग्दीर्घत्वस्येति दीर्घोऽकित इति सूत्रस्थभाष्यविरोधात् ॥ ६६ ॥**

कैयटानें 'च्छ्वोः शूठ्' ६–४–१९ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत असें म्हटलें आहे कीं, आगम आणि आदेश ह्यांचीं फलें भिन्न असल्यामुळें, एक दुसऱ्याचा बाधक होत नाहीं. ( आगमानें शब्दस्वरूपांत वाढ होते; जसें, 'आम्' प्रत्ययास नुडागम केल्यास, 'नाम्' असें होतें. आदेश केवळ दुसऱ्याचे जागीं जाऊन बसतो; त्यामुळें शब्दाच्या मूळस्वरूपांत वाढ न होतां, केवळ फरक होतो. अशा रीतीनें आगम व आदेश ह्यांचीं फलें भिन्न आहेत. म्हणूनच 'ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम्, कम्बलः कौण्डिन्याय' ह्या ठिकाणीं, कम्बलदानानें दधिदानाचा बाध होत नाहीं. ( कारण जसें 'सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम्, तक्रं कौण्डिन्याय' ह्या ठिकाणीं, तक्रदान व दधिदान ह्या दोहोंचेंहि फल एकच–म्हणजे भक्षण–असल्यामुळें, तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो, त्याप्रमाणें, दधिदानाचें फल भक्षण व कम्बलदानाचें फल थंडीपासून निवारण अशीं दोहोंचीं फलें एकच नसून भिन्न असल्यामुळें, कम्बलदानानें दधिदानाचा बाध होत नाहीं, व कौण्डिन्याला दही व घोंगडें हीं दोन्हीं मिळतात. )—पण हें कैयटाचें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'दीर्घोऽकितः' ७–४–८३ ह्या सूत्रावरील भाष्यांत

नुगागम दीर्घादेशाचा अपवाद असल्यामुळें दीर्घादेशाचा बाध करतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे, व ह्या भाष्योक्तीच्या विरुद्ध कैयटाचें म्हणणें आहे. ( ' यंयम्यते ' इत्यादि स्थलीं, ' नुगतोऽनुनासिकान्तस्य ' सू॰ २६४३ ह्या सूत्रानें अदन्त अभ्यासाला नुगागम पावला आहे; तसेंच ' दीर्घोऽकितः ' सू॰ २६३२ ह्या सूत्रानें अभ्यासाला दीर्घादेश पावला आहे. भाष्यकार म्हणतात कीं, नुगागम दीर्घरूपी कार्याचा बाध करतो, व त्यामुळें ' यायंम्यते ' असें रूप न होतां ' यंयम्यते ' असें रूप होतें. ह्यावरून हें स्पष्ट होतें कीं, आगम व आदेश ह्यांत बाध्यबाधकभाव नसतो हें म्हणणें बरोबर नाहीं. )

---

## परिभाषा ६७

**नन्वजीगणदित्यादौ गणेरीत्वं निरवकाशत्वाद्धलादिः शेषं बाधते तत्राह—**

' अजीगणत् ' इत्यादि स्थलीं, ' ई च गणः ' सू॰ २५७३ ह्या सूत्रानें ' गण् ' धातूच्या अभ्यासाच्या अन्त्यवर्णाचे जागीं होणारा ' ई ' हा आदेश निरवकाश ठरत असल्यामुळें, तो ' हलादिः शेषः ' सू॰ २१७९ ह्याचा बाधक होईल--( म्हणजे ' हलादिः शेषः ' ह्यानें अभ्यासांतील न् चा लोप न होतां, त्याचे जागीं ई हा आदेश होईल; तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात.

**अभ्यासविकारेषु बाध्यबाधकभावो नास्ति ॥ ६७ ॥**

" ज्या सूत्रांमध्यें अभ्यासाचे ठिकाणीं विकार—म्हणजे फरक—होणें सांगितलें आहे त्या सूत्रांमध्यें परस्परांत बाध्यबाधकभाव नसतो "

( ही परिभाषा असल्यामुळें ' ई च गणः ' हें विशेषसूत्र ' हलादिः शेषः ' या सामान्यशास्त्राचें बाधक न होतां, ' हलादिः शेषः ' हें सूत्र प्रथम प्रवृत्त होतें व ' ई च गणः ' हें सूत्र अनवकाशत्वामुळें बाधक होऊं शकणारें सूत्र जरी आहे तरी, तें नंतर प्रवृत्त होऊन ' अजीगणत् ' असें इष्टरूप सिद्ध होतें )

**दीर्घोऽकित इत्यकिद्ग्रहणमस्या ज्ञापकम् । अन्यथा यंयम्यत इत्यत्र नुकि कृतेऽनजन्तत्वाद्दीर्घाप्राप्त्या तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ॥**

' दीर्घोऽकितः ' सू॰ २६३२ या सूत्रांत असलेलें ' अकितः ' हें पद या परिभाषेचें ज्ञापक आहे. ही परिभाषा नसती तर 'यंयम्यते' इत्यादि स्थलीं नुगागम प्रथम केल्यावर अभ्यास अजन्त राहत नसल्यामुळें दीर्घाची प्राप्तीच होत नाहीं व त्यामुळें 'अकितः' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरतें हें उघड आहे. ( ' नुगतोऽनुनासिकान्तस्य ' सू॰

२६४३ हें नुगागमविधायकसूत्र परसूत्र व तसेंच अपवादसूत्र असल्यामुळें, व 'दीर्घोऽकितः' हें पूर्वसूत्र असल्यामुळें, नुगागम प्रथम झालाच असता, व तो झाल्यानंतर 'दीर्घोऽकितः' असें सूत्र न करितां, 'दीर्घः' एवढेंच सूत्र केलें असतें तरी नुगागम झाल्यावर अभ्यासाच्या अन्तीं अच् राहत नसल्यामुळें व 'अचश्च' सू० ३५ या सूत्रान्वयें अचाचेंच दीर्घीकरण होऊं शकत असल्यामुळें, दीर्घ झालाच नसता, आणि 'यंयम्यते' असें इष्टरूप सिद्ध झालेंच असतें. परंतु ही परिभाषा असल्यामुळें, 'नुगतोऽनुनासिकान्तस्य' व 'दीर्घोऽकितः' या दोन सूत्रांत बाध्यबाधकभाव राहत नाहीं व त्यामुळें 'नुगतः' या सूत्रानें अभ्यासास प्रथम नुगागम केल्यावर व अभ्यास 'यन्' असा झाल्यावर 'दीर्घः' एवढेंच सूत्र असतें तर त्याचा अर्थ अभ्यासांतील अच् दीर्घ व्हावा असा होत असल्यामुळें 'यन्' या अभ्यासांतील अच् जो अकार तो दीर्घ होऊन 'यांयम्यते' असें अनिष्टरूप होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरितां 'दीर्घोऽकितः' या सूत्रांत 'अकित्' ग्रहण केलें आहे व तसें ग्रहण केलें असल्यामुळें आणि प्रकृत उदाहरणांत अभ्यासास झालेला आगम 'कित्' असल्यामुळें, अभ्यासांतील अच् दीर्घ होत नाहीं व 'यंयम्यते' असें रूप सिद्ध होतें. सारांश ही परिभाषा असल्यामुळें 'दीर्घोऽकितः' या सूत्रांतील 'अकितः' हें पद चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें )

**इयं परान्तरङ्गादिबाधकानामप्यबाधकत्वबोधिका । तेनाचीकरत् मीमांसत इत्यादि सिद्धम् । आद्ये सन्वद्भावस्य परत्वाद्दीर्घेण बाधः प्राप्नोति । अन्त्ये मान्बधेति दीर्घेणान्तरङ्गत्वादित्वस्य बाधः प्राप्तः ॥**

पर, नित्य, अन्तरङ्ग इत्यादि बाधकशास्त्रें बाधक होत नाहींत हें या परिभाषेवरून स्पष्ट होतें. ( वास्तविक प० ३८ प्रमाणें परसूत्र पूर्वसूत्राचें बाधक होतें; तसेंच नित्यकार्य सांगणारें सूत्र परसूत्राचें बाधक होतें. त्याचप्रमाणें नित्यकार्य सांगणाऱ्या सूत्राचें अन्तरङ्गकार्यविधायकसूत्र बाधक होतें व त्याहि सूत्राचें अपवादसूत्र बाधक होतें. पण हीं सूत्रें अभ्यासांत विकार व्हावा असें विधान करणारीं असल्यास, त्यांच्यांत परस्परांमध्यें बाध्यबाधकभाव राहत नाहीं. ) आणि त्यामुळेंच 'अचीकरत्' व 'मीमांसते' इत्यादि रूपें सिद्ध होतात. 'अचीकरत्' या प्रथम उदाहरणांत दीर्घकार्य सांगणारें सूत्र परसूत्र असल्यामुळें सन्वद्भावाचा बाध होण्याची प्राप्ति आहे. ( 'अ+कृ+णि+चङ्+त्' अशा स्थितींत 'दीर्घो लघोः' सू० २३१८ या परसूत्रानें अभ्यासदीर्घ प्रथम केल्यास 'सन्वल्लघुनि' सू० २३१६ या पूर्वसूत्रानें सन्वद्भावाची प्राप्तिच होऊं शकत नाहीं, व त्यामुळें 'सन्यतः' सू० २३१७ या सूत्रानें सन्वद्भावांत होणारें इत्वकार्य होऊं शकत नाहीं व 'अचीकरत्' असें इष्टरूप सिद्ध

होणार नाहीं. परंतु 'सन्वल्लघुनि' व 'दीर्घो:लघो:' हीं दोन्हीं सूत्रें अभ्यासविकार सांगणारीं असल्यामुळें, त्यांच्यांत बाध्यबाधकभाव राहत नाहीं. म्हणून सन्वद्भाव प्रथम होऊन—म्हणजे अभ्यासांतील अन्त्य अकाराचा ' सन्यतः ' ह्या सूत्रानें प्रथम इकार होऊन—नंतर अभ्यासाचा अन्त्य वर्ण दीर्घ होतो, व त्यामुळें ' अचीकरत् ' असें शुद्ध रूप सिद्ध होतें. ) 'मीमांसते ' ह्या उदाहरणांत ' मान्बधदान्शान्भ्यो दीर्घश्चाभ्यासस्य ' सू० २३९४ ह्या सूत्रानें सांगितलेलें अभ्यासदीर्घकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, ' सन्यतः ' सू० २३१७ ह्या सूत्रानें होणाऱ्या इत्वरूपी बहिरङ्ग कार्यांच्या बाधाची प्राप्ति आहे. ( ' मान् + सन् + ते = ममान् + सन् + ते ' ह्या स्थलीं, ' मान्बधदान् ' ह्या सूत्रानें जसा ' सन् ' होणें सांगितलें आहे त्याचप्रमाणें अभ्यासदीर्घ होणेंहि सांगितलें असल्यामुळें, तें अनिमित्तक दीर्घकार्य अन्तरङ्ग आहे व 'सन्' प्रत्ययानिमित्तामुळें होणारें इत्वकार्य बहिरङ्ग आहे; व ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' ह्या परिभाषेप्रमाणें अन्तरङ्गकार्य बहिरङ्गकार्यांचा बाध करून प्रथम प्रवृत्त होईल, व तें अन्तरङ्ग दीर्घकार्य प्रथम केल्यास, ' मामांसते ' असें विकृत रूप होईल. परंतु ' मान्बधदान् ' व ' सन्यतः ' हीं दोन्हीं सूत्रें अभ्यासविकार सांगणारीं असल्यामुळें, त्यांच्यांत बाध्यबाधकभाव नाहीं. म्हणून इत्वरूपी कार्य बहिरङ्ग असूनहि प्रथम होतें, व नंतर दीर्घरूपी अन्तरङ्ग कार्य होऊन, ' मीमांसते ' हें शुद्ध रूप सिद्ध होतें. )

**यत्तु यत्रैकैकप्रवृत्युत्तरमपि सर्वेषां प्रवृत्तिस्तत्रैवेदमित्यत एकेति सूत्रे कैयटस्तन्न । नुकि कृते दीर्घाप्राप्त्या धर्मिग्राहकमानविरोधान्मान्बधादीनां दीर्घे कृते इत्वाप्राप्त्या गुणो यङ्लुकोरिति सूत्रस्थभाष्योक्ततदुदाहरणासङ्गतेश्चेत्यन्यत्र विस्तरः ॥ ६७ ॥**

' अत एकहल्मध्ये ' ६-४-१२० या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें म्हटलें आहे कीं एखाद्या उदाहरणांत अभ्यासविकाराचें विधान करणाऱ्या जेवढ्या सूत्रांची प्राप्ति आहे तेवढीं सर्व सूत्रें जेथें एकामागून एक अशा क्रमानें प्रवृत्त होऊं शकतात तशाच ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागते. पण हें कैयटाचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ('यंयम्यते' या उदाहरणांत) नुगागम प्रथम केल्यावर दीर्घाची प्राप्ति मुळींच होत नसल्यामुळें, ' दीर्घोऽकितः ' या सूत्रांतील ' अकितः ' हें जें पद प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानलें आहे त्याशीं कैयटोक्तीचा विरोध येतो आणि तसेंच ( ' मीमांसते ' या उदाहरणांत ) दीर्घकार्य ( अन्तरङ्ग असल्यामुळें तें ) प्रथम केल्यास, इत्वकार्याची प्राप्ति होत नसून देखील, ' गुणो यङ्लुकोः ' ७-४-८२ या सूत्रावरील भाष्यांत ' मीमांसते ' हें जें प्रकृतपरिभाषेचें उदाहरण भाष्यकारांनीं दिलें आहे तें, कैयटाचें म्हणणें बरोबर मानल्यास, चूक ठरण्याची आपत्ति येते. ( ' यंयम्यते ' या उदाहरणांत ' नुगतोऽनुनासिकान्तस्य ' व 'दीर्घोऽकितः' या अभ्या-

सांत विकार सांगणाऱ्या दोन सूत्रांची प्राप्ति आहे. या दोन सूत्रांपैकीं, ' नुगतोऽनुनासिकान्तस्य ' हें पर व अपवादसूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास, दीर्घीकरण सांगणाऱ्या सूत्राची प्राप्तिच होऊं शकत नाहीं. तरी पण भाष्यकारांनीं दोन्हीं सूत्रें प्रवृत्त होऊं शकत नसून देखील या उदाहरणांत प्रकृतपरिभाषा लावली आहे व 'दीर्घोऽकितः' या सूत्रांतील ' अकित् ' ग्रहणाची, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, चरितार्थता दाखवून ' अकित् ' ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानलें आहे. तसेंच ' मीमांसते' या स्थलीं ' मान्बध ' व ' सन्यतः ' या दोन अभ्यासविकार सांगणाऱ्या सूत्रांची प्राप्ति आहे. या दोन सूत्रांपैकीं ' मान्बध ' हें दीर्घरूपी अन्तरङ्गकार्य सांगणारें सूत्र असल्यामुळें तें प्रथम प्रवृत्त करून अभ्यासदीर्घ केल्यास, इत्वरूपी बहिरङ्गकार्य सांगणाऱ्या 'सन्यतः' या सूत्राची प्राप्तिच होऊं शकत नाहीं; कारण अभ्यासांत अकार न राहतां आकार राहतो. असें असून देखील, या उदाहरणांत भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषा लावली आहे. कैयटाचें म्हणणें बरोबर मानल्यास, भाष्यकारांनीं ' मीमांसते ' या उदाहरणांत प्रकृतपरिभाषा लावावयास नको होती. पण ज्याअर्थीं ' यंयम्यते ' व ' मीमांसते ' या दोन्हीं स्थलीं अभ्यासविकार सांगणारीं जीं सूत्रें प्राप्त होतात तीं सर्व सूत्रें एकामागून एक अशीं प्रवृत्त होत नसून देखील प्रकृतपरिभाषा भाष्यकारांनीं लावली आहे त्याअर्थीं कैयटाचें वरील म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं. ) यासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा ६८

**ननु तच्छीलादितृन्विषये ण्वुलपि स्यात् । न च तृन्नपवादोऽसरूपापवादस्य विकल्पेन बाधकत्वात् । अत आह—**

जेथें तच्छीलादि ' तृन् ' प्रत्यय होतो तेथें ' ण्वुल् ' प्रत्यय देखील होईल. ' तृन् ' हा ण्वुलाचा अपवाद आहे म्हणून तृन्च्या विषयांत ण्वुल्ची प्राप्ति होऊं शकत नाहीं—हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' सू० २८३० ह्या सूत्रान्वयें, असरूप अपवाद विकल्पेंकरून उत्सर्गाचा बाधक होत असतो. ( ' आ केस्तच्छीलतद्धर्मतत्साधुकारिषु ' सू० ३११४ ह्या सूत्रान्वयें, तच्छील, तद्धर्म, व तत्साधुकारि ह्या अर्थांमध्यें, ' तृन् ' सू० ३११५ ह्या सूत्रानें होणारा ' तृन् ' प्रत्यय ज्या उदाहरणांत पावला आहे त्या उदाहरणांत, ' ण्वुल् ' प्रत्यय देखील होईल. ण्वुल् हा कर्तरि अर्थांत होणारा सामान्यप्रत्यय आहे व तृन् हा तच्छीलादिविशिष्टकर्तरि अर्थांत होणारा प्रत्यय आहे आणि त्यामुळें ' तृन् ' हा ण्वुल्चा अपवाद आहे; म्हणून, जेथें ' तृन् ' ची प्राप्ति आहे तेथें ' ण्वुल् ' प्रत्यय होऊं शकत नाहीं—हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण हे दोन प्रत्यय अनुबन्धरहित केले असतां, त्यांचें स्वरूप एकसारखें होत नसून

भिन्न असतें. 'ण्वुल्' म्हणजे 'अक' व 'तृन्' म्हणजे 'तृ' असें असल्यामुळें, 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' ह्या सूत्रान्वयें, असरूप अपवादप्रत्यय उत्सर्गप्रत्ययाचा नेहमीं-करितां बाधक न होतां, विकल्पेंकरून बाधक होईल—म्हणजे दोन्ही प्रत्यय विकल्पेंकरून होतील. त्यामुळें, एकदां 'तृन्' प्रत्यय होईल, व पुनः 'ण्वुल्' प्रत्ययहि होईल. असें न व्हावें ) म्हणून, ही परिभाषा सांगतातः—

## ताच्छीलिकेषु वासरूपविधिर्नास्ति ॥ ६८ ॥

"तच्छीलादि अर्थांमध्यें होणाऱ्या प्रत्ययांना 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' हें सूत्र लागत नाहीं."

( ही परिभाषा असल्यामुळें, अपवादप्रत्यय व उत्सर्गप्रत्यय असरूप असले तरी, अपवादप्रत्यय उत्सर्गप्रत्ययाचा विकल्पेंकरून बाधक न होतां, नेहमींकरितां बाधक होतो. )

**ण्वुलि सिद्धे, निन्दाहिंसादिसूत्रेणैकाज्भ्यो वुञ्विधानमत्र ज्ञापकं, तत्र ण्वुल्वुञोः स्वरे विशेषाभावात् ॥**

'निन्दहिंसक्लिशखाद' सू० ३१२६ ह्या सूत्रानें सांगितलेला 'वुञ्' प्रत्यय लावून जशीं ( निन्दकः, हिंसकः, क्लेशकः, खादकः, इत्यादि ) रूपें सिद्ध होतात तशींच रूपें 'ण्वुल्तृचौ' सू० २८९५ ह्या सूत्रांत सांगितलेला 'ण्वुल्' प्रत्यय लावून देखील सिद्ध होत असतां, 'निन्दहिंस' हें पृथक् सूत्र करून त्या सूत्रांत सांगितलेल्या एकाच् धातूंना 'वुञ्' प्रत्यय व्हावा असें जें विधान केलें आहे तें ह्या परिभाषेचें ज्ञापक होय. ( स्वरांत फरक होण्याकरितां भिन्न प्रत्ययांचें विधान केलें आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण, ) 'ण्वुल्' हा 'लित्' प्रत्यय लावला, अथवा 'वुञ्' हा 'ञित्' प्रत्यय लावला, तरी स्वरांत कांहीं फरक होत नाहीं. ( 'लिति' सू० ३६७६ ह्या सूत्रान्वयें 'लित्' प्रत्ययापूर्वीं असणारा स्वर उदात्त होतो; 'ञ्नित्यादिर्नित्यम्' सू० ३६८६ ह्या सूत्रान्वयें ञिदन्ताचा व निदन्ताचा आद्यच् उदात्त होतो. 'निन्दहिंसक्लिशखाद' ह्या सूत्रांत सांगितलेल्या सर्व धातु एकाच् असल्यामुळें—म्हणजे त्यांच्यांत एकच अच् असल्यामुळें, तोच आदि व तोच अन्त्य होत असल्यामुळें—तोच उदात्त होणार. म्हणून स्वरांत कांहीं फरक पडत नाहीं. सारांश 'वुञ्' किंवा 'ण्वुल्' प्रत्यय लावल्यानें 'निन्दहिंस' इत्यादि धातूंचीं रूपें एकसारखींच होतात व स्वरांतहि फरक पडत नाहीं. असें असूनहि, ज्याअर्थीं 'निन्द-हिंसक्लिश' हें पृथक् सूत्र केलें आहे त्यावरून हें सिद्ध होतें कीं, ताच्छील्यादि अर्थां-मध्यें होणारे अपवादात्मक 'तृन्' इत्यादि प्रत्यय व उत्सर्गरूपी 'ण्वुल्' प्रत्यय जरी असरूप असले तरी अपवादप्रत्यय, ण्वुल् ह्या उत्सर्गप्रत्ययाचे, नेहमींकरितां बाधक होतात, व ते नेहमींकरितां बाधक होत असल्यामुळें, 'निन्दहिंसक्लिश' इत्यादि धातूंना

तच्छीलादि अर्थांमध्यें ' ण्वुल् ' प्रत्यय होऊं शकत नाहीं. म्हणून पाणिनीला पृथक् सूत्र करून ' वुञ् ' प्रत्ययाचें विधान करणें भाग पडलें. ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र जर ताच्छीलिक प्रत्ययांस लागू पडत असतें तर, ' निन्दहिंसक्लिशखाद ' हें पृथक् सूत्र करण्याची गरज नव्हती. अशा रीतीनें तें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**ताच्छीलिकेष्विति विषयसप्तमी । तेन ताच्छीलिकैरताच्छीलिकैश्च वासरूपविधिर्नेति बोध्यम् ।**

ह्या परिभाषेंतील ' ताच्छीलिकेषु ' ही ( अधिकरणसप्तमी नसून ) विषयसप्तमी आहे, व ही विषयसप्तमी असल्यामुळें असें ज्ञापित होतें कीं, ताच्छील्यादि अर्थांमध्यें सांगितलेले अपवादप्रत्यय केवळ ताच्छील्यादि :अर्थांमध्यें सांगितलेल्या उत्सर्गप्रत्ययांचे बाधक होतात एवढेंच नसून, ते ताच्छील्यादिहून भिन्न अर्थांमध्यें सांगितलेल्या उत्सर्गप्रत्ययांचे देखील नेहमींकरितां बाधक होतात, व त्यांच्या विषयांत, ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र लागू पडत नाहीं. (ह्या मुळेंच ' ण्वुल् ' हा उत्सर्गप्रत्यय जरी ताच्छील्यादि अर्थांमध्यें सांगितलेला नाहीं व ' तृन् ' हा अपवादप्रत्यय ताच्छील्यादि अर्थांमध्यें होणारा आहे तरी, ' तृन् ' हा ' ण्वुल् ' चा विकल्पेंकरून बाधक न होतां, नेहमींकरितां बाधक होतो. तसेंच ' अलंकृञ्-निराकृञ् ' सू० ३११६ ह्या सूत्रानें ताच्छील्यादि अर्थांमध्यें होणारा ' इष्णुच् ' प्रत्यय ' तृन् ' ह्या तच्छीलार्थक प्रत्ययाचा व तसेंच ' ण्वुल् ' ह्या अतच्छीलार्थक प्रत्ययाचा नेहमींकरितां बाधक होतो. )

**नन्वेवं कम्रा कमनेत्याद्यसिद्धिर्नमिकम्पीति रेणानुदात्तेतश्च हलादेरिति युचो बाधादिति चेत् । न । सूददीपदीक्षश्चेत्यनेन दीपेर्युज्निषेधेनोक्तार्थस्यानित्यत्वात् ॥ ६८ ॥**

( तच्छीलादि अर्थांमध्यें होणारा अपवादप्रत्यय, तच्छीलादि अर्थांत होणाऱ्या उत्सर्गाचा देखील नेहमीकरितां बाधक होतो असें जर आहे ) तर, ' नमिकम्पि ' सू. ३१४७ ह्या सूत्रानें तच्छीलादि अर्थांमध्यें होणारा ' र ' हा अपवादप्रत्यय ' अनुदात्तेतश्च हलादेः ' सू० ३१२९ ह्या सूत्रानें तच्छीलादि अर्थांत होणाऱ्या ' युच् ' ह्या उत्सर्गप्रत्ययाचा नेहमीकरितां बाधक होईल, व ' कम् ' धातूचीं विकल्पेंकरून ' कम्रा ' ' कमना ' अशीं रूपें सिद्ध होणार नाहींत.—अशी शंका कोणी केल्यास, त्या शंकेचें उत्तर हें आहे कीं ' सूददीपदीक्षश्च ' सू० ३१३३ ह्या सूत्रानें ' दीप् ' धातूला ' युच् ' प्रत्ययाचा निषेध केला असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते. (ही परिभाषा नित्य असती तर, ' नमिकम्पि ' ह्या उत्तरसूत्रांत ' दीप् ' धातूला तच्छीलादि अर्थांमध्यें ' र ' हा अपवादप्रत्यय सांगितला असल्यामुळें, ' अनुदात्तेतश्च हलादेः ' ह्या पर्वसूत्रांत तच्छीलादि अर्थांमध्यें सांगितलेल्या ' युच् ' ह्या उत्सर्गप्रत्ययाचा नेहमीकरितां बाध झालाच होता; मग पुन्हां ' सूददीपदीक्षश्च ' ह्या

सूत्रानें, ' दीप् ' धातूला ' युच् ' प्रत्यय होऊं नये हें सांगण्याची कांहींच गरज नव्हती; तरी पण हें सूत्र पाणिनीनें केलें आहे. ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे; व ती अनित्य असल्यामुळें, ' र ' प्रत्ययानें ' युच् ' प्रत्ययाचा नेहमीकरितां बाध न होतां, विकल्पेंकरून बाध होतो, आणि त्यामुळें ' कम्रा ' व ' कमना ' अशीं दोन्हीं रूपें सिद्ध होतात. )

---

## परिभाषा ६९

**नन्वेवं हसितं छात्रस्य हसनमित्यादौ घञ्, इच्छति भोक्तुमित्यत्र लिङ्लोटावीषत्पानः सोमो भवतेत्यत्र खल् प्राप्नोतीत्यत आह—**

( तच्छीलादि अर्थांमध्यें होणाऱ्या अपवादप्रत्ययांनाच जर ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र लागत नाहीं, ) तर मग ' हसितं छात्रस्य ' ' हसनं छात्रस्य ' इत्यादि स्थलीं, ' घञ् ' व्हावा; तसेंच ' इच्छति भोक्तुम् ' ह्या स्थलीं, ' लिङ् ' व ' लोट् ' व्हावा, आणि 'ईषत्पानः सोमो भवता' ह्या स्थलीं, ' खल् ' प्रत्यय व्हावा. (१) ' भावे ' सू० ३१८४ ह्या सूत्रानें कोणत्याहि धातूला, धात्वर्थ—ह्मणजे क्रिया—वाच्य असतां, ' घञ् ' प्रत्यय होतो. हा उत्सर्गप्रत्यय आहे. ' नपुंसके भावे क्तः' सू० ३०९० व 'ल्युट् च ' सू० ३२९० ह्या सूत्रांनीं ' भावे ' ह्या अर्थांत होणारे अतच्छीलार्थक ' क्त' व 'ल्युट्' प्रत्यय, ' भावे ' ह्या अर्थांत होणाऱ्या ' घञ् ' ह्या उत्सर्गप्रत्ययाचे अपवाद आहेत. म्हणून तच्छीलादि अर्थांमध्यें न होणाऱ्या ह्या तीन्ही प्रत्ययांना ' वाऽसरूपोऽस्त्रियाम्' सू० २८३० हें सूत्र लागावें, व ' क्त ' व 'ल्युट्' ह्या अपवादप्रत्ययांनीं ' घञ् ' ह्या उत्सर्गप्रत्ययाचा नेहमीकरितां बाध न होतां, विकल्पेंकरून बाध व्हावा, आणि ' हस् ' धातूस भावे ' क्त 'व भावे 'ल्युट् ' लावून जशीं ' हसितम् ' व ' हसनम् ' हीं रूपें होतात त्याप्रमाणेंच, त्या धातूला 'भावे' या अर्थांमध्ये ' घञ् ' प्रत्यय विकल्पेंकरून लागून ' हास ' असें रूप देखील व्हावें. ( २ ) त्याचप्रमाणें ' इच्छार्थेषु लिङ्लोटौ सू० २८१४ ह्या सामान्यसूत्रानें 'इच्छा' ह्या अर्थांत होणारे लिङाचे व लोटाचे प्रत्यय उत्सर्गप्रत्यय असल्यामुळें, व 'समानकर्तृकेषु तुमुन्' सू० ३१७६ ह्या सूत्रानें होणारा 'तुमुन्' प्रत्यय अपवादप्रत्यय असल्यामुळें आणि हे तीन्ही प्रकारचे प्रत्यय तच्छीलादि अर्थांमध्ये होणारे नसल्यामुळें, ' तुमुन् ' ह्या अपवादप्रत्ययानें लिङ् व लोटाचा नेहमीकरितां बाध न होतां, ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' ह्या सूत्रान्वयें, विकल्पेंकरून बाध व्हावा, व ' इच्छति भोक्तुम् ' ह्या स्थलीं, केवळ तुमुन्प्रत्ययान्त रूप न होतां, लिङ्लोट्प्रत्ययांन्त रूपें देखील विकल्पेंकरून व्हावीं. ( ३ ) त्याचप्रमाणें ' ईषद्दुःसुषु कृच्छ्राकृच्छ्रार्थेषु खल् ' सू० ३३०५ ह्या सूत्रानें होणारा 'खल्'

प्रत्यय उत्सर्गप्रत्यय असल्यामुळें, व ' आतो युच् ' सू० ३३०९ ह्या सूत्रानें खलर्था-मध्यें होणारा ' युच् ' प्रत्यय ' खल् ' प्रत्ययाचा अपवाद असल्यामुळें, आणि हे दोन्ही प्रत्यय तच्छीलादि अर्थांमध्ये होणारे नसल्यामुळें, ' युच् ' प्रत्ययानें ' खल् ' प्रत्य-याचा नेहमीकरितां बाध न होतां विकल्पेंकरून बाध व्हावा, आणि ' ईषत्पानः सोमो भवता ' ह्या ठिकाणीं जसें ' पा ' धातूचें ' युच् ' प्रत्ययान्त रूप झालें आहे तसेंच, ' खल् ' प्रत्ययान्त रूप देखील व्हावें. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु वासरूपविधिर्नास्ति ॥ ६९ ॥

" क्त, ल्युट्, तुमुन्, व खलर्थ युच् प्रत्यय जेथें अपवादरूपानें प्रवृत्त होतात तेथें ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र लागत नाहीं. "

( ही परिभाषा असल्यामुळें, वरील तिन्हीं उदाहरणांत, ' क्त, ' ' ल्युट्, ' ' तुमुन् ' व खलर्थ ' युच् ' हे अपवादप्रत्यय आपापल्या उत्सर्गप्रत्ययांचे नेहमीकरितां बाधक होतात. )

**इदं च वासरूपविधेरनित्यत्वात्सिद्धम् । तदनित्यत्वे ज्ञापकं चार्हे कृत्यतृचश्चेति । तत्र हि चकारसमुच्चितलिङा कृत्यतृचोर्बाधो मा भूदिति कृत्यतृज्ग्रहणं क्रियत इत्यन्यत्र विस्तरः ॥ वासरूपसूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ ६९ ॥**

' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' सू० २८३० हें सूत्र अनित्य असल्यामुळें प्रकृतपरि-भाषा सिद्ध होते. हें सूत्र अनित्य आहे याचें ' अर्हे कृत्यतृचश्च ' सू० २८२२ हें सूत्र ज्ञापक आहे. ' अर्हे कृत्यतृचश्च ' या सूत्रांत ( 'लिङ् यदि ' या पूर्वसूत्रांतून ) चकारानें ' लिङ् ' चें अनुकर्षण केलें आहे—म्हणजे लिङ् होणें देखील सांगितलें आहे–व लिङ् झाल्यास, कृत्यप्रत्यय व तृच्प्रत्यय यांचा बाध न व्हावा म्हणून, त्या सूत्रांत कृत्य व तृच् प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे. ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र नित्य असतें तर, लिङ्, कृत्यप्रत्यय, व तृच्प्रत्यय असरूप असल्यामुळें, अर्हार्थामध्यें होणारा ' लिङ् ' हा अपवादप्रत्यय, कृत्य व तृच् या सामान्यप्रत्ययांचा ' वाऽसरूपोऽ स्त्रियाम् ' या सूत्रान्वयें, नेहमीकरितां बाधक न होतां, विकल्पेंकरून बाधक झाला असता; व ' अर्हे कृत्यतृचश्च ' या सूत्रांत कृत्यप्रत्यय व तृच्प्रत्यय यांचें ग्रहण केलें नसतें व ' अर्हे ( लिङ् ) ' एवढेंच सूत्र केलें असतें तरी ते प्रत्यय, असरूप असल्या-मुळें, वासरूपविधीनें होऊं शकलेच असते. असें असून देखील त्या सूत्रांत कृत्य व तृच् प्रत्ययांचें ग्रहण केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र अनित्य आहे, व तें अनित्य असल्यामुळें, लिङानें कृत्य व तृच्प्रत्ययांचा नेहमीकरितां बाध होण्याचा संभव होता. तसें न व्हावें म्हणून त्या सूत्रांत कृत्य व तृच्प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे, व अशारीतीनें तें ग्रहण ' वासरूप ' सूत्राच्या अनित्यत्वाचें ज्ञापक

ठरतें व तें सूत्र अनित्य असल्यामुळें परिभाषा ६८ ते ७० या सांगण्याची कांहीं गरज नव्हती व त्या तीन्ही परिभाषा अनावश्यक ठरतात.) इतर ग्रन्थांत या विषयाचें विस्तृत विवेचन केलें आहे. ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' ३–१–९४ या सूत्रावरील भाष्यांत प्रकृतपरिभाषा सांगितली आहे.

---

## परिभाषा ७०

ननु श्वः पक्तेत्यत्र वासरूपविधिना लृडपि प्राप्नोति, कृते आदेशे वैरूप्यादत आह—

' श्वः पक्ता ' या स्थलीं ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' या सूत्रान्वयें लृटाची देखील प्राप्ति आहे. ( कारण लुट् व लृट् हे जरी लकारत्वामुळें सरूप आहेत तरी, ) 'लुट् ' व ' लृट् ' ह्यांचे जागीं आदेश केल्यावर ते असरूप होतात. ( ' लृट् ' हा ' लृट् शेषे च ' सू० २१९३ ह्या सुत्रान्वयें 'सामान्य' भविष्यकाळाच्या अर्थामध्यें होणारा उत्सर्गलकार आहे. ' लुट् ' हा ' अनद्यतने लुट् ' सू० २१८५ ह्या परसूत्रान्वयें 'अनद्यतन' भविष्यदर्थामध्यें होणारा अपवादलकार आहे. वास्तविक जरी ह्या दोहोंमध्यें ' नानुबन्धकृतमसारूप्यम् ' प० ८ ह्या न्यायानें सारूप्य आहे, तथापि त्यांचे जागीं ' ता, तारौ तारः ' व ' स्यति, स्यतः, स्यन्ति ' इत्यादि आदेश झाल्यावर, त्यांच्यांतील असारूप्य स्पष्ट होतें. अशा रीतीनें ' लुट् ' व ' लृट् ' असरूप होत असल्यामुळें, 'वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' ह्या सूत्रान्वयें अपवाद ' लुट् ' उत्सर्ग लृटाचा नेहमकिरितां बाधक न होतां विकल्पेंकरून बाधक होईल, व ' श्वः पक्ता ' ह्या स्थलीं, ' श्वः पक्ष्यति ' असें विकल्पेंकरून रूप होईल तसें न व्हावें म्हणून ही परिभाषा सांगतातः—

### लादेशेषु वासरूपविधिर्नास्ति ॥ ७० ॥

" लादेशांच्या विषयांत ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र लागत नाहीं. "

( ही परिभाषा असल्यामुळें लुटाचे जागीं ' लृट् ' विकल्पेंकरून होऊं शकत नाहीं, व ' लुट् ' हा लृटाचा नेहमीकरितां बाधक होतो. )

आदेशकृतवैरूप्यवत्सु लकारेषु स नास्तीत्यर्थः ॥

लकारांचे जागीं आदेश झाल्यावर जरी ते असरूप होतात तरी त्यांचे ठिकाणीं ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र लागू पडत नाहीं असा ह्या परिभाषेचा अर्थ आहे.

अत्र च हशश्वतोर्लङ् चेति लङ्विधानं ज्ञापकम् । अन्यथा परोक्षे लिडिति लिटा लङः समावेशोऽसारूप्यात्सिद्ध इति किं लङ्विधानेन ।

' हशश्वतोर्लङ् च ' सू० २७७६ ह्या सूत्रांत केलेलें लङाचें विधान ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ( जर ही परिभाषा नसती तर ) 'परोक्षे लिट् ' सू० २१७१ ह्या परसूत्रानें होणारा अपवाद ' लिट् ' लकार, ' अनद्यतने लङ् ' सू० २२०५ ह्या पूर्वसूत्रानें होणाऱ्या उत्सर्ग ' लङ् ' लकाराचा, ' वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' सू० २८३० ह्या सूत्रान्वयें नेहमीकरितां, बाधक न होतां, विकल्पेंकरून बाधक झाला असता; व विकल्पामुळें लङाची आपोआपच प्राप्ति झाली असती; आणि ' हशश्वतोः ' ह्या सूत्रांत ' लङ्हि होतो ' असें विधान करण्याची कांहींच गरज नव्हती. ( परंतु ही परिभाषा असल्यामुळें ' लिट् ' हा लङाचा नेहमीकरितां बाधक ठरत असल्यामुळें, पाणिनीला दोन्ही लकार होणें इष्ट होतें म्हणून, लङाचें विधान ' हशश्वतोः ' ह्या सूत्रांत करावें लागलें )

**शत्रादिभिस्तिङां समावेशार्थं शतृविधायके विभाषाग्रहणानुवृत्तिर्लिटः कानज्वेति वा ग्रहणं च कृतम् । तज्ज्ञापयति वासरूपसूत्रेऽपवाद आदेशत्वानाक्रान्तः प्रत्यय एव गृह्यत इति कैयटादौ ध्वनितम् । तत्फलं तु सदादिभ्यो भूतसामान्ये लिटः क्सुरेव न तु पक्षे तिङिति बोध्यम् ॥ ७० ॥**

' लटः शतृशानचौ ' सू० ३१०० ह्या शतृविधायक सूत्रांत, जसा लटाचे जागीं ' शतृ ' आदेश होतो तसेच तिङादेशहि व्हावे म्हणून, (' नन्वोर्विभाषा ' सू० २७८१ ह्या पूर्वसूत्रांतून,) 'विभाषा' ह्या पदाची अनुवृत्ति केली आहे; व तसेंच 'लिटः कानज्वा' सू० ३०९४ ह्या सूत्रांत ' वा ' हें पद घातलें आहे. ह्यावरून हें ज्ञापित होतें कीं 'वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' हें सूत्र अशाच अपवादप्रत्ययांना लागू पडतें कीं जे दुसऱ्याचे जागीं आदेशरूपानें होत नाहींत–असें कैयटाच्या भाष्यवृत्तींत व इतर ठिकाणीं ध्वनित केलें आहे. 'अपवाद' शब्दाचा असा अर्थ केल्यामुळें, त्याचा परिणाम हा होतो कीं, ( 'भाषायां सदवसश्रुवः ' सू० ३०९७ ह्या सूत्रानें ) सदादि धातूंना भूतसामान्यार्थामध्यें होणाऱ्या लिटाचे जागीं 'क्सु' प्रत्ययच होतो व विकल्पेंकरून तिङादेश होत नाहींत. (लटाचे जागीं दोन प्रकारचे आदेश होतात. (१) ' तिप्तस्झि ' सू० २१५४ ह्या सूत्रानें होणारे तिङादेश, व (२) 'लटः शतृशानचौ' ह्या सूत्रानें होणारे शतृशानच् आदेश. हे दोन प्रकारचे आदेश असरूप असल्यामुळें, शतृशानजादेशरूपी अपवाद, तिङादेशाचा 'वाऽसरूपोऽस्त्रियाम् ' ह्या सूत्रान्वयें विकल्पेंकरून बाधक व्हावा. परंतु प्रकृत परिभाषा असल्यामुळें, अपवादरूपी लादेश विकल्पेंकरून बाधक न होतां, नेहमीकरितां बाधक होत असतो. ही परिभाषा पाणिनीला मान्य असल्यामुळेंच, लटाचे जागीं होणारा शत्रादेश तिङादेशाचा नेहमीकरितां बाधक न व्हावा म्हणून, ' लटः शतृशानचौ ' ह्या सूत्रांत पूर्वसूत्रांतून ' विभाषा ' ह्या पदाची अनुवृत्ति केली आहे. तसेंच लिटाचे आदेश दोन प्रकारचे आहेत. (१) 'क्सु,' 'कानच्' व (२) णलादि; हे असरूप आहेत; व ह्या परिभाषेप्रमाणें ' कानच् ' हा अपवादरूपी आदेश णलादि आदेशाचा नेहमीकरितां बाधक ठरेल. तो तसा न ठरावा म्हणून, ' लिटः कानज्वा ' ह्या सूत्रांत ' वा ' शब्दाचें

ग्रहण केलें आहे; आणि त्यामुळें, ही परिभाषा असून देखील, दोन्ही प्रकारचे आदेश विकल्पेंकरून होतात. परंतु 'भाषायां सदवसश्रुवः' ह्या सूत्रानें भूतसामान्य अर्थामध्यें 'सद्' 'वस्, 'श्रु' ह्या धातूंना लिटाचे जागीं होणारा अपवादरूपी आदेश 'क्वसु', णलादि आदेशांचा, नेहमीकरितां बाधक ठरतो. म्हणून तशा लिटांत सेदिवान्, ऊषिवान् शुश्रुवान् अशींच रूपें होतात, व ससाद, उवास, शुश्राव इत्यादि रूपें भूतसामान्य अर्थांमध्यें न होतां, परोक्षभूत अर्थांत होतात. आतां 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' सू० २८३० ह्या सूत्राचा अर्थ 'असरूपः अपवादप्रत्ययः उत्सर्गस्य बाधको वा स्यात्' असा आहे व नुकतेंच वर सांगितलें आहे कीं अपवाद शब्दानें अशाच प्रत्ययांचें ग्रहण होतें कीं जे इतरांचे जागीं आदेशरूपानें होत नाहींत. त्यामुळें लकारांचे जागीं होणाऱ्या असरूप आदेशास 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' हें सूत्र लागूच पडत नाहीं, आणि त्यामुळें ही परिभाषा असण्याची कांहींच आवश्यकता दिसत नाहीं. असो.)

---

## परिभाषा ७१

ननु ङमो ह्रस्वादित्यादौ ङमः परस्याचोऽचि परतो ङम इति वेति सन्देहः स्यादतआह—

'ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम्' सू० १३४ इत्यादि सूत्रांत ङमाचेपुढें असणाऱ्या अचाला, किंवा अचाचे पूर्वीं असणाऱ्या ङमाला कार्य व्हावें असा संदेह उत्पन्न होतो. ('तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' सू० ४० 'तस्मादित्युत्तरस्य' सू० ४१ अशा दोन परिभाषा अष्टाध्यायींत साक्षात् पठित आहेत. प्रथम परिभाषा सांगते कीं जेथें एखाद्या शब्दाचा सप्तमीविभक्तींत निर्देश करून कांहीं कार्य करणें सांगितलें असेल तेथें, त्या शब्दाच्या लगेंच पूर्वीं असणाऱ्या वर्णास तें कार्य होतें; जसें—'इको यणचि' येथें सप्तमिनिर्दिष्ट अचाचे पूर्वीं असणाऱ्या इकाच्या जागीं यणादेश होतो. दुसरी परिभाषा सांगते कीं, सूत्रांत एखाद्या शब्दाचा पञ्चमीविभक्तींत निर्देश करून कांहीं कार्य करणें सांगितलें असेल तेथें, त्या शब्दाच्या लगेंच पुढें असणाऱ्या वर्णास तें कार्य होतें. जसें 'उदः स्थास्तम्भोः पूर्वस्य' सू० २१८ येथें 'उदः' हा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें त्याच्या लगेच पुढें असणाऱ्या सकाराचे जागीं पूर्वसवर्णरूपी कार्य होतें परंतु जेथें सूत्रांत एक शब्द पञ्चमीविभक्तींत व दुसरा सप्तमीविभक्तींत वापरला आहे तेथें वरील दोन्हीं परिभाषा उपस्थित होतात, व त्या दोन्ही लावल्यास, दोन भिन्न रूपें होतील. 'ङमो ह्रस्वात्' ह्या सूत्रांत 'ङमः' हा शब्द पञ्चमीविभक्तींत व 'अचि' हा शब्द सप्तमीविभक्तींत वापरला आहे. येथें 'तस्मिन्निति निर्दिष्टे' ही परिभाषा लावल्यास, 'ङम्' कार्यी ठरेल व त्याला 'ङमुट्' आगम होईल; व 'तस्मादित्यु-

त्तरस्य ' ही परिभाषा लावल्यास, ङमापुढें असणारा अच् कार्यी ठरून त्याला ङमुट्-आगम होईल. अशा स्थितींत काय करावें ? ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## उभयनिर्देशे पञ्चमीनिर्देशो बलीयान् ॥ ७१ ॥

" जेथें सूत्रांत उभयनिर्देश असेल ( म्हणजे एक शब्द पञ्चमींत व दुसरा सप्तमींत वापरला असेल ) तेथें पञ्चमी निर्देश बलवत्तर समजावा ( व तस्मादित्युत्तरस्य ' ही परिभाषा लावून कार्य करावें. "

ही परिभाषा असल्यामुळें, ' ङमो ह्रस्वात् ' ह्या स्थलीं ङमाच्या लगेंच पुढें असणाऱ्या अचास ' ङमुट् ' आगम होतो, व तो आगम ङमास होत नाहीं. )

**अचीति सप्तमीनिर्देशस्य मय उञ इत्युत्तरत्र चारितार्थ्यात्पञ्चमीनिर्देशोऽनवकाश इति तस्मादित्युत्तरस्येत्यस्यैव प्रवृत्तिः ।**

' ङमो ह्रस्वादचि ङमुट् नित्यम् ' ह्या सूत्रांत सप्तमीविभक्तींत वापरलेला ' अचि ' हा शब्द ' मय उञो वो वा ' सू० १०८ ह्या सूत्रांत अनुवृत्त होतो. त्यामुळें सप्तमीनिर्देश ( वाया न जातां, ) चरितार्थ ठरतो. पण त्या सूत्रांतील पञ्चमीविभक्तींत वापरलेला ' ङमः ' हा शब्द पुढील कोणत्याहि सूत्रांत अनुवृत्त होत नसल्यामुळें, निरवकाश—म्हणजे व्यर्थ—ठरतो. म्हणून ' तस्मादित्युत्तरस्य ' ह्या परिभाषेप्रमाणें पञ्चमीनिर्देशानें होणारें कार्य होतें—म्हणजे ङमाच्या लगेंच पुढें असणाऱ्या अचास ' ङमुट् ' आगमरूपी कार्य होतें.

**यत्र तु डः सि धुडित्यादावुभयोरप्यचारितार्थ्यं तत्र तस्मिन्निति सूत्रापेक्षया तस्मादित्युत्तरस्येत्यस्य परत्वात्तेनैव व्यवस्था ।**

जेथें ' डः सि धुट् ' सू० १३१ इत्यादि सूत्रांत उभयनिर्देश अचरितार्थ असतो तेथें, ' तस्मिन्निति निर्दिष्टे ' ह्या सूत्रानंतर ' तस्मादित्युत्तरस्य ' हें सूत्र असल्यामुळें, परसूत्राला धरून व्यवस्था करावी. (' डः सि धुट् ' ह्या सूत्रांत ' डः ' हा पञ्चम्यन्त शब्द असून ' सि ' हा सप्तम्यन्त शब्द आहे. ' डः ' व ' सि ' ह्या दोन्ही शब्दांची पुढील कोणत्याहि सूत्रांत अनुवृत्ति होत नसल्यामुळें, ते अचरितार्थ ठरतात. अशा स्थलीं ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' सू० १७५ हा न्याय लावून परसूत्रान्वयें होणारें कार्य—म्हणजे पञ्चमीनिर्देशान्वयें होणारें कार्य—लगेंच पुढें असणाऱ्या वर्णास करावें. त्यामुळें डकाराच्या लगेंच पुढें असणाऱ्या सकारास ' धुट् ' आगम होतो. )

**एवमुभयोश्चारितार्थेऽपि, यथामि सर्वनाम्न इत्यादौ । तत्रामीति सप्तमी त्रेस्त्रय इत्यत्र चरितार्था । आदिति पञ्चम्याज्जसेरसुगित्यत्र चरितार्थेति स्पष्टं तस्मिन्निति सूत्रे भाष्ये कैयटे च ॥ ७१ ॥**

जेथें ' आमि सर्वनाम्नः सुट् ' इत्यादि सूत्रांत पञ्चमीनिर्दिष्ट व सप्तमीनिर्दिष्ट असे दोन्ही शब्द असून ते चरितार्थ असतात तेथें देखील, असेंच करावें. ( म्हणजे पूर्वी सांगितल्याप्रमाणें, ' विप्रतिषेध ' न्याय लावून पञ्चमीनिर्देशानें होणारें कार्य उत्तर वर्णास करावें. ) ' आमि सर्वनाम्नः सुट् ' सू० २१७ ह्या सूत्रांत ' आमि ' ही सप्तमी ' त्रेस्त्रयः ' सू० २६४ ह्या पुढच्या सूत्रांत अनुवृत्त होऊन चरितार्थ होते, व तसेंच ' आज्जसेरसुक् ' सू० ३५७२ ह्या पूर्वीच्या सूत्रांतून ' आमि सर्वनाम्नः सुट् ' या सूत्रांत अनुवृत्त होणारी ' आत् ' ही पञ्चमी ' आज्जसेः ' या सूत्रांत चरितार्थ झाली आहे. ( अशा रीतीनें पञ्चमी व सप्तमी या दोन्ही चरितार्थ झाल्या असल्यामुळें, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायान्वयें, पञ्चमीनिर्देशाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें पञ्चमीनिर्देश सप्तमीनिर्देशाचा बाधक ठरतो. सारांश जेथें पञ्चमीनिर्देश व सप्तमीनिर्देश हे दोन्ही चरितार्थ किंवा दोन्ही अचरितार्थ असतात तेथें परत्वामुळें पञ्चमीनिर्देश सप्तमीनिर्देशाचा बाधक ठरतो. जेथें सप्तमीनिर्देश चरितार्थ असून पञ्चमीनिर्देश अचरितार्थ असतो तेथें पञ्चमीनिर्देश अनवकाशत्वामुळें सप्तमीनिर्देशाचा बाधक ठरतो. जेथें पञ्चमीनिर्देश चरितार्थ असून सप्तमीनिर्देश अचरितार्थ असतो तेथें काय होतें याबद्दल ग्रन्थकारांनीं उल्लेख केला नाहीं; पण तशा ठिकाणीं अनवकाशत्वामुळें सप्तमीनिर्देश पञ्चमीनिर्देशाचा बाधक ठरतो असें टीकाकारांचें म्हणणें आहे व याचें उदाहरण ते ' शि तुक् ' सू० १३३ हें सूत्र देतात. या सूत्रांत ' नः' हें पञ्चम्यन्त पद ' नश्च ' या पूर्वसूत्रांतून अनुवृत्त होऊन चरितार्थ होतें, पण ' शि ' हें सप्तम्यन्त पद पुढें कोणत्याहि सूत्रांत अनुवृत्त होत नसल्यामुळें अचरितार्थ ठरतें. म्हणून या स्थलीं अनवकाशत्वामुळें सप्तमीनिर्देश पञ्चमीनिर्देशाचा बाधक ठरून शकाराच्या लगेंच पूर्वी असणाऱ्या पदान्त नकारास तुगागम होतो. ) ' तस्मिन्निति निर्दिष्टे ' १-१-६६ या सूत्रावरील भाष्यांत व कैयटाच्या वृत्तींत हें सांगितलें आहे.

द्वितीयं प्रकरणं समाप्तम्.



## तृतीयं प्रकरणम्.

# परिभाषा ७२

**नन्वतः कृकमीति सत्वमयस्कुम्भीत्यत्र न स्यात्कुम्भशब्दस्यैवोपादा नादत आह—**

'अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य' सू० १६० ह्या सूत्रांत 'कुम्भ' शब्द वापरला असल्यामुळें (व 'कुम्भी' शब्द नसल्यामुळें), ह्या सूत्रान्वयें 'अयस्कुम्भी' ह्या स्थलीं, विसर्गाला सत्व होणार नाहीं. (तसें न व्हावें) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

**प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम् ॥ ७२ ॥**

"जेथें सूत्रांत प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असेल, तेथें लिङ्गविशिष्ट प्रातिपदिकाचेंहि ग्रहण करावें" (—म्हणजे अशा स्थलीं, त्या प्रातिपदिकास तिन्ही लिङ्गांचे बोधक प्रत्यय लावून तिन्ही प्रकारच्या रूपांचें ग्रहण करावें.)

(ही परिभाषा असल्यामुळें 'कुम्भ' ह्या प्रातिपदिकानें जसें 'कुम्भः' ह्या पुलिङ्ग शब्दाचें ग्रहण होतें तसें 'कुम्भी' ह्या स्त्रीलिङ्ग शब्दाचेंहि ग्रहण होतें व 'अयस्कुम्भः' आणि 'अयस्कुम्भी' अशीं रूपें सिद्ध होतात)

**सामान्यरूपेण विशेषरूपेण वा प्रातिपदिकबोधकशब्दग्रहणे सति लिङ्गबोधकप्रत्ययविशिष्टस्यापि तेन ग्रहणं बोध्यम् ॥ अपिना केवलस्यापीत्यर्थः ॥**

जो शब्द उच्चारला असतां प्रातिपदिकाचा सामान्येकरून बोध होतो असा सामान्य शब्द, (जसें 'ङ्याप् प्रातिपदिकात्' ह्या सूत्रांत 'प्रातिपदिकात्' हा सर्व प्रातिपदिकांचा बोधक सामान्य शब्द उच्चारला आहे,) अथवा प्रातिपदिकबोधक विशेष शब्द जेथें सूत्रांत उच्चारला आहे (जसें 'अतः कृकमिकंस' ह्या सूत्रांत 'कुम्भ' इत्यादि प्रातिपादिकबोधक विशेष शब्द उच्चारले आहेत) अशा स्थलीं, तिन्ही लिङ्गांचे बोधक प्रत्यय लावून प्रातिपदिकाचीं जीं तीन भिन्न रूपें होतात त्या तिन्हीं रूपांचें ग्रहण करावें. परिभाषेंत 'अपि' शब्द घातला आहे त्यामुळें, (ही परिभाषा नसती तर जसें केवळ प्रातिपदिकाचें ग्रहण झालें असतें तसें) केवळ प्रातिपदिकाचेंहि ग्रहण करितां येतें.

**अस्याश्च ज्ञापकं समानाधिकरणाधिकारस्थे कुमारश्रमणादिभिरिति सूत्रे स्त्रीलिङ्गश्रमणादिशब्दपाठः । स्त्रीप्रत्ययविशिष्टश्रमणादिभिश्च कुमारीशब्दस्यैव सामानाधिकरण्यं न तु कुमारशब्दस्येति तदेतज्ज्ञापकम् ॥**

' समानाधिकरण ' अधिकारांत ( हा अधिकार ' पूर्वकालैकसर्व ' सू० २-१-४९ ह्या सूत्रापासून सुरू होतो व ह्या अधिकारांत 'कुमारः श्रमणादिभिः' हें सूत्र पठित आहे. ) पठित असलेल्या ' कुमारः श्रमणादिभिः ' सू० ७५२ ह्या सूत्रांत वापरलेलें ' श्रमणादिभिः ' हें स्त्रीप्रत्ययान्त पद ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ( ' श्रमणादि ' गणांत श्रमणा, प्रव्राजिता, कुलटा, गर्भिणी, तापसी, दासी, व बन्धकी हे स्त्रीप्रत्ययान्त शब्द पठित आहेत. ) स्त्रीप्रत्ययान्त ' श्रमणा ' इत्यादि शब्दांचें ' कुमारी ' शब्दाशींच सामानाधिकरण्य होऊं शकतें; ' कुमार ' शब्दाशीं होऊं शकत नाहीं. हेंच ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ( कारण सूत्रांत वापरलेल्या ' कुमार ' शब्दानें 'कुमारी' शब्दाचेंहि ग्रहण होतें असें ह्या सूत्रावरून स्पष्ट होतें. )

**इयं च द्विषत्परयोरित्याद्युपपदविधौ समासान्तविधौ महदात्त्वे ङ्नित्स्वरे राजस्वरे ब्राह्मणकुमारयोर्बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि इत्यादौ समाससङ्घातग्रहणेषु च न प्रवर्तत इति ङ्याप्सूत्रे भाष्ये स्पष्टम्। विभक्तिनिमित्तककार्ये च नेत्यपि तत्रैव ॥ तत्र समासान्तविधाववयवग्रहण एव न समाससङ्घातग्रहणे तु प्रवर्तत एव स्वरविधावेव समाससंङ्घातग्रहणे तत्र दोषोक्तेः ॥ बहुव्रीहेरूधस इति सूत्रस्थभाष्याच्च ॥ एतावत्सु एवानित्यत्वादप्रवृत्तिर्दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिता इति भाष्योक्तेः ॥**

' ङ्याप्प्रातिपदिकात् ' ४-१-१ ह्या सूत्रावरील भाष्यांत असें सांगितलें आहे कीं, ही परिभाषा ( १ ) उपपदविधि सांगणाऱ्या ' द्विषत्परयोस्तापेः ' सू० २९५४ इत्यादि सूत्रांस लागत नाहीं. ( द्विषत्परयोस्तापेः' ह्या सूत्रांत ' द्विषत् ' व ' पर' हीं दोन प्रातिपदिकें उपपदें सांगितलीं आहेत. अशा उपपदांना ही परिभाषा लागत नसल्यामुळें, ' द्विषत् ' व ' पर ' ह्या प्रातिपदिकांनीं, ' द्विषती ' व ' परा ' ह्या स्त्रीप्रत्ययान्त शब्दांचें ग्रहण होऊं शकत नाहीं; म्हणून ' खचि ह्रस्वः ' सू० २९५५ ह्या सूत्रानें ह्रस्व होऊन जसें ' द्विषन्तपः ' असें रूप होतें तसें, 'खच्' प्रत्यय लागू शकत नसल्यामुळें, व त्यामुळें मुमागम होऊं शकत नसल्यामुळें, 'द्विषतिन्तपः ' असें रूप न होतां, 'द्विषतीतापः ' असें रूप होतें. ) तसेंच, ( २ ) समासान्त प्रत्यय होण्याचें विधान करणाऱ्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या प्रातिपदिकांना देखील ही परिभाषा लागत नाहीं ( जसें— ' राजाहःसखिभ्यष्टच् ' सू० ७८८ ह्या सूत्रांत तत्पुरुष समासाच्या अन्तीं, 'राजन्' ' अहन् ' व सखि ' शब्द असल्यास, ' टच् ' प्रत्यय होतो असें सांगितलें आहे. येथें ' राजन् ' इत्यादि प्रातिपदिकांनीं, स्त्रीप्रत्ययान्त शब्दांचें ग्रहण होत नाहीं. म्हणून ' मद्राणां राजा मद्रराजः ' असें जरी रूप होतें तरी, ' मद्राणां राज्ञी ' ह्या स्थलीं, समासान्त टच् प्रत्यय होत नाहीं, व ' मद्रराज्ञी ' असें रूप होतें. ) तसेंच, ( ३ ) ' महत्' शब्दाच्या अन्त्य वर्णाचे जागीं आकारादेश होतो हें सांगणाऱ्या ' आन्महतः समा-

नाधिकरणजातीययोः ' सू० ८०७ ह्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' महत् ' ह्या प्रातिपदिकाला ही परिभाषा लागत नाहीं (–म्हणजे ' महत् ' शद्बानें स्त्रीप्रत्ययान्त ' महती ' शद्बाचें ग्रहण होत नाहीं. जसें—' महान् प्रियः यस्य सः ' येथें आत्व होऊन जसें ' महाप्रियः ' असें रूप होतें, तसें ' महती प्रिया यस्य सः ' ह्या ठिकाणीं, आत्व न होतां, ' महतीप्रियः ' असें रूप होतें.) ' तसेंच ( ४ ) ' ञित् ' प्रत्ययान्त व ' नित् ' प्रत्ययान्त प्रातिपदिकांना ज्या सूत्रांत स्वर होणें सांगितलें आहे त्या सूत्रांना, ही परिभाषा लागत नाहीं. ( ' ञ्नित्यादिर्नित्यम् ' सू० ३६८६ ह्या सूत्रांत असें सांगितलें आहे कीं, ' ञित् ' प्रत्ययान्त व ' नित् ' प्रत्ययान्त प्रातिपदिकांचा आद्यच् उदात्त होतो. म्हणून ' अत इञ् ' सू० १०९५ ह्या सूत्रान्वयें होणाऱ्या ' ञित् ' प्रत्ययान्त ' दाक्षिः ' ह्याचा आद्युदात्त स्वर होतो; स्त्रीप्रत्यय लागून होणाऱ्या ' दाक्षी ' ह्या शद्बास तो स्वर होत नाहीं. तसेंच ' अहिचुम्बकायनिः ' येथें आद्युदात्त स्वर होतो, पण ' अहिचुम्बकायनी ' येथें तो होत नाहीं. ) तसेंच, ( ५ ) कर्मधारय समासांत ' ब्राह्मण ' व ' कुमार ' हे शद्ब पुढें असतांना, ' राजन् ' ह्या शद्बास विकल्पेंकरून प्रकृतिस्वर होतो असें ज्या सूत्रांत सांगितलें आहे त्या ' राजा च ' सू० ३७९३ ह्या सूत्राला, ही परिभाषा लागत नाहीं. ( म्हणजे ' राजब्राह्मणः ' ' राजकुमारः ' येथें जसा प्रकृतिस्वर होतो तसा ' राजब्राह्मणी', ' राजकुमारी ' येथें होत नाहीं. ) तसेंच, ( ६ ) ' बह्वोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि ' सू० ३९०९ इत्यादिसूत्रान्वयें, पूर्ण सामासाला जेथें स्वर सांगितला आहे तशा सूत्रांना देखील, ही परिभाषा लागत नाहीं. ( म्हणून 'बहवः गोमन्तः यस्मिन् ग्रामे स बहुगोमान् ' ह्या ठिकाणीं बहुव्रीहि समासास होणारा अन्तोदात्त स्वर, ' बहवो गोमन्तो यस्यां नगर्यां सा बहुगोमती ' ह्या बहुव्रीहि समासास होत नाहीं. ) त्याच—म्हणजे ' ङ्याप्प्रातिपदिकात् ' ह्या सूत्रावरील— भाष्यांत असेंहि सांगितलें आहे कीं, ( ७ ) विभक्तिप्रत्यय पुढें असतांना कांहीं कार्य होणें ज्या सूत्रांत सांगितलें आहे अशा सूत्रांना देखील, ही परिभाषा लागत नाहीं; ( जसें—' उगिदचां सर्वनामस्थाने ' सू० ३६१ व ' अत्वसन्तस्य चाधातोः ' सू० ४२५ ह्या सूत्रांनीं, गोमान् ' येथें जसा नुमागम व उपधादीर्घ होतो तसें ' गोमती ' येथें होत नाहीं. ह्याच अर्थाची परिभाषा ७३ आहे. मागें असें सांगितलें आहे कीं, ज्या सूत्रांत समासान्तविधि सांगितला आहे तशा सूत्रांना ही परिभाषा लागत नाहीं. पण त्या विषयासंबंधानें हें लक्षांत ठेवावें कीं, ) ही परिभाषा समासान्तविधि सांगणाऱ्या अशाच सूत्रांना लागत नाहीं कीं, जेथें अवयव ग्रहण केलें आहे. पण ज्या सूत्रांत पूर्ण सामासिकशद्बाहून समासान्तविधि होणें सांगितलें आहे तशा ठिकाणीं, ही परिभाषा लागते. ( जसें:— ' शेषाद्विभाषा ' सू० ८९१ ह्या सूत्रानें, पूर्ण सामासिकशद्बाहून ' कप् ' प्रत्यय होणें सांगितलें आहे. म्हणून तशा सूत्राला ही परिभाषा लागते, आणि 'कप्' प्रत्यय लागून जशी ' महायशस्का ', ' बहुगोमत्का ' इत्यादि रूपें होतात तशींच

'बहुमालका', बहुखट्वका ' इत्यादि रूपें होतात. पण ' राजाहःसखिभ्यष्टच् ' सू० ७८८ इत्यादि सूत्रांत समासाच्या अन्त्यावयवाला प्रत्यय सांगितला आहे. म्हणून तेथें ही परिभाषा लागत नाहीं आणि ' मद्रराजः ' येथें जसा ' टच् ' प्रत्यय होतो तसा, ' मद्रराज्ञी ' येथें होत नाहीं. ) पूर्ण सामासिकशद्वास जेथें स्वरविधि सांगितला आहे तशा सूत्रांना ही परिभाषा लागत नाहीं असें भाष्यांत सांगितलें असल्यामुळें, हें स्पष्ट होतें कीं, जेथें पूर्ण सामासिकशद्वाला समासान्तविधि सांगितला आहे अशा सूत्रांना, ही परिभाषा लागू पडते. ' बहुव्रीहेरूधसो ङीष् ' ४–१–२५ ह्या सूत्रावरील भाष्यांत देखील हेंच सांगितलें आहे. वर जेवढीं स्थलें सांगितलीं आहेत तेवढ्याच ( सात ) स्थलीं ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, लागत नाहीं; कारण भाष्यांत असें म्हटलें आहे कीं जेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं तीं सर्व दोषाचीं स्थलें निवडून मोजून काढलीं आहेत.

**नन्वेवं बहुव्रीहेरूधसो ङीषिति सूत्रस्थभाष्यासङ्गतिः । तत्र हि कुण्डोध्नीत्यत्र नद्यृतश्चेति कबापादितो नद्यन्तबहुव्रीहेरित्यर्थात् नद्यन्तस्य-व्रीहित्वाभावात्तदसङ्गतिः । नद्यन्तानां यः समास इत्यर्थेन च परिहृतम् । नद्यन्तप्रकृतिकसुबन्तोत्तरपदकः समास इतीति चेत् । न । अनया परिभाषया स्त्रीप्रत्ययसमभिव्याहारे तद्रहिते दृष्टानां प्रातिपदिकत्वतद्व्याप्यधर्माणां विशिष्टेऽपि पर्याप्तत्वमतिदिश्यत इत्याशयात् ॥ ७२ ॥**

('सामान्यरूपेण विशेषणरूपेण... वा तेन ग्रहणं बोध्यम्' असा) वर ह्या परिभाषेचा जो अर्थ दिला आहे तो बरोबर मानल्यास, 'बहुव्रीहेरूधसो ङीष्' ह्या सूत्रावरील भाष्य चूक ठरूं पाहतें. कारण त्या भाष्यांत, ' नद्यन्त बहुव्रीहिसमासाहून कप् प्रत्यय होतो,' असा ' नद्यृतश्च ' सू. ८३३ ह्या सूत्राचा प्रथम अर्थ करून त्या सूत्रान्वयें, ' कुण्डोध्नी ' ह्या उदाहरणांत 'कप्' प्रत्यय प्राप्त होतो, अशी शङ्का उपस्थित केली आहे; पण ' कुण्डोध्नी ' ह्या नद्यन्त शद्वाचे ठिकाणीं बहुव्रीहित्व नसल्यामुळें, हें भाष्य विसंगत दिसतें. परंतु ' सुबन्त नदीसंज्ञक शद्व जेथें बहुव्रीहि समासांत अन्त्यावयव असतो तशाच बहुव्रीहि समासास कप् प्रत्यय होतो ' असा ' नद्यृतश्च ' ह्या सूत्राचा अर्थ करून, भाष्यकारांनीं त्या शंकेचें निवारण केलें आहे. ( प्रकृत उदाहरणांत, ' ऊधस् ' शद्व बहुव्रीहिसमासाचा चरमावयव आहे; ' यू स्त्र्याख्यौ नदी ' सू. २६६ ह्या सूत्रान्वयें 'नदी' संज्ञा प्राप्त होणारा शद्व ह्या ठिकाणीं बहुव्रीहिसमासाचा चरमावयव नाहीं; ह्मणून या उदाहरणांत 'कप्' प्रत्यय होत नाहीं असें ह्मणून भाष्यकारांनीं शंकेचें समाधान केलें आहे. पण शंकेचें समाधान करतेवेळीं देखील, भाष्यकारांनीं ' कुण्डोध्नी ' हा बहुव्रीहीच मानिला आहे. पण ह्या परिभाषेचा अर्थ जसा वर दिला आहे तसा मानल्यास, ' कुण्डोध्नी ' हा शद्व बहुव्रीहि मानतां येत नाहीं, व भाष्य चुक ठरूं पाहतें, असें कोणी म्हटल्यास ) हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण एखाद्या

शद्वास स्त्रीप्रत्यय लावून तो शद्व स्त्रीप्रत्ययविशिष्ट उच्चारला असतां, स्त्रीप्रत्ययरहित त्या शद्वाचे ठिकाणीं जो प्रातिपदिकत्व धर्म किंवा प्रातिपदिकत्वव्याप्यधर्म असतो त्या धर्माचा, ह्या परिभाषेप्रमाणें, स्त्रीप्रत्ययविशिष्ट त्या शद्वाचे ठिकाणीं अतिदेश–ह्मणजे आरोप–करतां येतो, असा भाष्याचा आशय आहे. ( जेथें सामान्यप्रातिपदिक-बोधक अथवा प्रातिपदिकविशेषबोधक शद्व उच्चारून सूत्रांत प्रातिपदिक ग्रहण केलें आहे तेथें त्या प्रातिपदिकानें तिन्ही लिङ्गांच्या रूपांचें ग्रहण होतें असा ह्या परिभाषेचा अर्थ वर दिला आहे. ' बहुव्रीहेरूधसो ङीष् ' सू० ४८४ ह्या सूत्रांत 'बहुव्रीहि ' शद्व उच्चारला आहे. तो शद्व कोणत्याहि प्रातिपदिकबोधक सामान्यशद्वाचा वाचक शद्व नाहीं, व तसेंच तो प्रातिपदिकविशेषाचा बोधक शद्व नाहीं. ह्मणून ' बहुव्रीहि ' शद्वानें ' कुण्डोधस् ' ह्या प्रातिपदिकाचें ग्रहण करतां येतें, स्त्रीप्रत्ययविशिष्ट ' कुण्डोध्नी ' शद्वाचें ग्रहण करतां येत नाहीं. कारण ' कुण्डोधस् ' हा वास्तविक बहुव्रीहि समास आहे व त्या सामासिक शद्वाला 'ङीष्' प्रयत्य लावून ' कुण्डोध्नी ' हें स्त्रीप्रत्ययान्त रूप झालें आहे. असें असून देखील भाष्यकारांनीं, वर सांगितलेली शंका उपस्थित करतेवेळीं व त्या शंकेचें समाधान करतेवेळीं देखील, ' बहुव्रीहि ' शद्वानें 'कुण्डोध्नी' शद्वाचें जें ग्रहण केलें आहे तें बरोबर दिसत नाहीं, अशी शंकाकाराची शंका आहे. ह्या शंकेचें ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ' कृत्तद्धितसमासाश्च ' सू. १७९ ह्या सूत्रान्वयें ' कुण्डोधस् ' हा बहुव्रीहि प्रातिपदिकसंज्ञक होतो, व ह्या ' कुण्डोधस् ' शद्वांत जो प्रातिपदिकत्व धर्म आहे किंवा प्रातिपदिकत्वव्याप्य–' प्रातिपदिकत्व ' हा व्यापक धर्म व ' बहुव्रीहित्व ' हा व्याप्य धर्म अशा रीतीनें ' बहुव्रीहित्व ' हा प्रातिपदिकत्व-व्याप्य–धर्म आहे तो बहुव्रीहित्वरूपी धर्म, जेव्हां ' कुण्डोधस् ' ह्या शद्वास 'ङीष्' प्रत्यय लावून ' कुण्डोध्नी ' असा शद्व होतो तेव्हां, त्या ' कुण्डोध्नी ' शद्वाचे ठिकाणीं, ह्या परिभाषेच्या आधारें, आरोपित करतां येतो असा भाष्याचा आशय समजावा, ह्मणजे ह्या परिभाषेचा जो अर्थ वर दिला आहे त्याशीं भाष्य जुळतें. सारांश, समासाला ' प्रातिपदिक ' ही संज्ञा आहे. ह्मणून, बहुव्रीहि हा समासाचा एक प्रकार असल्यामुळें, त्यालाहि प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते आणि ' बहुव्रीहि ' शद्वानें जसें पुल्लिङ्ग बहुव्रीहि समासाचें ग्रहण होतें तसेंच, त्याच्या स्त्रीलिङ्गाचेंहि ग्रहण, ह्या परिभाषेप्रमाणें, होतें. त्यामुळें ' कुण्डोधस् ' ह्याला जशी प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते त्याच प्रमाणें, ' कुण्डोध्नी ' ह्याला देखील प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते. मग ' कुण्डोध्नी ' हा बहुव्रीहिसमास मानल्यास, तो नद्यन्त असल्यामुळें, ' नद्यृतश्च ' या सूत्रान्वयें त्याला 'कप्' प्रत्यय कां होऊं नये ? या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं ' कुण्डोध्नी ' या स्थलीं बहुव्रीहिसमासाचा अन्त्यावयव नदीसंज्ञक शद्व नसून असन्त 'ऊधस्' शद्व असल्यामुळें, येथें 'कप्' प्रत्यय होत नाहीं. या पंक्तीचा अन्वय नीट लक्षांत येण्याकरितां ' इति चेत् ' या पदांचा ' तदसङ्गतिः ' या पदाशीं अन्वय करावा व ' नद्यन्तानांयः समास इत्यर्थेन च परिहृतम् ' हें वाक्यान्तर्गत वाक्य–ह्मणजे उपवाक्य-

समजावें, आणि ' नद्यन्तप्रकृतिकसुबन्तोत्तरपदकः समास इति ' ह्या त्या उपवाक्याचा अर्थ समजावा, व 'इति' शब्दापुढें 'आशयः' हें पद अध्याहृत करावें म्हणजे पंक्तीच्या अर्थाचा नीट बोध होईल. कित्येक वैयाकरणांच्या मतें ही परिभाषा असण्याची कांहींच गरज नाहीं; कारण ' अतःकृकमि ' इत्यादि सूत्रांत जीं विशिष्ट प्रातिपदिकें उच्चारलीं आहेत तीं ' पुमान् स्त्रिया ' सू० ९३३ या सूत्रान्वयें एकशेष करून उच्चारलीं आहेत असें मानल्यास, स्त्रीबोधक शब्दांचेंहि ग्रहण करतां येतें. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तसें मानल्यास, 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रांत 'प्रातिपदिक' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, ' रमा, गौरी ' इत्यादि आबन्त व ङीबन्त शब्दांहून 'णिच्' न होण्याची आपत्ति येईल. )

---

## परिभाषा ७३

नन्वेवं यूनः पश्येत्यत्रेव युवतीः पश्येत्यत्रापि श्वयुवेति संप्रसारणं स्यादत आह—

( जर प० ७२ प्रमाणें प्रातिपदिकानें लिङ्गविशिष्टप्रातिपदिकाचें ग्रहण होतें तर मग, ' युवन् ' शब्दानें ' युवन् ' शब्दाच्या स्त्रीलिङ्ग रूपाचें—ह्मणजे ' युवति ' शब्दाचेंहि—ग्रहण होईल, आणि ) ' यूनः पश्य ' ह्या स्थलीं ' श्वयुवमघोनामतद्धिते ' सू० ३६२ ह्या सूत्रानें (' युवन्+शस् ' अशा स्थितींत ' युवन् ' शब्दास संप्रसारण होऊन जसें ' यूनः ' असें रूप होतें तसें ('यूनस्तिः' सू० ५३१ ह्या सूत्रानें ' ति ' प्रत्यय लागून झालेल्या ) ' युवति ' शब्दास (' युवति+शस् ' अशा स्थितींत ) संप्रसारण होईल. ( तसें होऊं नये ) ह्मणून ही परिभाषा सांगतातः—

**विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम् ॥ ७३ ॥**

" ज्या ठिकाणीं सूत्रांत, विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारें कांहीं कार्य सांगितलें आहे तशा ठिकाणीं, त्या सुत्रांत उच्चारलेल्या प्रातिपदिकानें लिङ्गविशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण होत नाहीं."

(' विभक्तिनिमित्तककार्ये च न ' असें जें मागील परिभाषेंत सांगितलें आहे तेंच ही स्वतंत्र परिभाषा सांगते; व ही परिभाषा असल्यामुळें, ' श्वयुवमघोनाम् ' ह्या सूत्रांत सांगितलेल्या ' युवन् ' ह्या प्रातिपदिकानें, विभक्तिप्रत्ययनिमित्तक कार्य करतेवेळीं, स्त्रीलिङ्गविशिष्ट ' युवति ' शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं. )

स्पष्टा चेयं युवोरनाकावित्यत्र भाष्ये । घटघटीग्रहणेन लिङ्गविशिष्टपरिभाषाया अनित्यत्वात्तन्मूलैवेत्यन्ये ॥ ७३ ॥

'युवोरनाकौ' ७-१-१ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. 'शक्तिलाङ्गलाङ्कुशतोमरयष्टि घटघटीधनुष्षु ग्रहेरुपसंख्यानम्'—सू० २९२३ ह्यांत सांगितलेलें वार्तिक—ह्या वार्तिकांत 'घट' शद्बाचें ग्रहण करून पुन्हा 'घटी' शद्बाचें ग्रहण केलें आहे. त्यावरून प० ७२ अनित्य आहे असें सिद्ध होते. ('घट' ह्या प्रातिपदिकानें स्त्रीलिङ्गविशिष्ट 'घटी' शद्बाचें, प० ७२ प्रमाणें, ग्रहण होतेंच; मग 'घटी' शद्ब पुन्हा वार्तिकांत घालण्याचें कांहीं कारण नव्हतें. तरी पण तो शद्ब वार्तिकांत घातला आहे, व ह्यानें त्या परिभाषेचें अनित्यत्व ज्ञापित होतें.) व ती अनित्य असल्यामुळें, ही परिभाषा आपोआपच सिद्ध होते, (व ही स्वतन्त्र परिभाषा करण्याचें कांहीं कारण नव्हतें,) असें कित्येक वैयाकरण म्हणतात.

---

# परिभाषा ७४

ननु तस्यापत्यम् इत्येकवचननपुंसकाभ्यां निर्देशाद् गार्ग्यौ गार्ग्या इत्याद्ययुक्तमत आह—

'तस्यापत्यम्' सू० १०८८ ह्या सूत्रांत 'अपत्यम्' हा शद्ब एकवचनांत व नपुंसकलिङ्गांत घातला असल्यामुळें, 'गार्ग्यः,' 'गार्ग्यौ' हीं रूपें चूक ठरतील. ('गर्गादिभ्यो यञ्' सू० ११०७ ह्या सूत्रान्वयें, गर्गादिगणांत पठित असलेल्या शद्बांना अपत्यार्थें 'यञ्' प्रत्यय होऊन 'गर्गस्य अपत्यम् गार्ग्यम्' असें रूप व्हावें. 'गार्ग्यः,' 'गार्ग्यौ' अशीं पुल्लिङ्गाचीं किंवा द्विवचनाचीं रूपें होऊं नयेत. तसेंच, 'तस्यापत्यम्' या सूत्रांत 'तस्य' हा शद्ब पुल्लिङ्गांत व एकवचनांत वापरला असल्यामुळें स्त्रीलिङ्गाहून किंवा नपुंसकलिङ्गाहून व तसेंच द्विवचनाहून किंवा बहुवचनाहून अपत्यार्थ प्रत्यय होऊं नये. पण 'सुमातुः अपत्यं सौमात्रः,' 'क्षत्रस्यापत्यं क्षात्रिः' इत्यादि रूपें भाषेंत प्रचलित आहेत, तशीं रूपें व्हावीं ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## सूत्रे लिङ्गवचनमतन्त्रम् ॥ ७४ ॥

"सूत्रांत लिङ्ग व वचन विवक्षित नसतात"

( सारांश लिङ्ग व वचन लावल्याशिवाय शद्बप्रयोग करणें अशक्य असल्यामुळें सूत्रांत लिङ्गवचननिर्देश केला असतो; म्हणून त्यांकडे दुर्लक्ष करून लौकिक रूपें सिद्ध करावीं. )

**अर्द्धर्चपुंसकमिति नपुंसकग्रहणमस्या ज्ञापकम्। नित्यनपुंसकत्वार्थं तु न तदित्यन्यत्र निरूपितम्॥**

'अर्धं नपुंसकम्' सू० ७१३ या सूत्रांत केलेलें 'नपुंसकम्' या शद्वाचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे. (सूत्रांत 'अर्धं' हा शद्व नपुंसकलिङ्गांत वापरलाच आहे; म्हणून पुन्हा 'नपुंसकम्' हा शद्व सूत्रांत घालण्याचें कांहींच कारण नव्हतें. परंतु ही परिभाषा असल्यामुळें वरील सूत्रांत नपुंसकलिङ्ग विवक्षित आहे हें सांगण्याकरितां त्या सूत्रांत 'नपुंसकम्' हा शद्व मुद्दाम घालावा लागला, व अशा रीतीनें तो शद्व या परिभाषेचा ज्ञापक ठरतो.) 'अर्ध' हा शद्व नित्य नपुंसकलिङ्गी असतो असें सांगण्याकरितां 'अर्धं नपुंसकम्' या सूत्रांत 'नपुंसकम्' हें पद घातलें नाहीं हें इतर ग्रन्थांत सांगितलें आहे. (कारण समांशवाची अर्ध शद्व पुल्लिङ्गी देखील असतो हें 'एओङ्, ऐऔच्' या शिवसूत्रावरील भाष्यांतील प्रयोगावरून स्पष्ट होतें. त्या भाष्यांत 'अर्ध एकारः, अर्ध ओकारः' असा प्रयोग आढळतो.)

**धान्यपलालन्यायेन नान्तरीयकतया तयोरुपादानमिति तस्यापत्यमित्यत्र भाष्ये स्पष्टम् ॥**

लिङ्ग व वचन लावल्याशिवाय शब्दप्रयोग करणें अशक्य असल्यामुळें सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या शद्वास लिङ्ग व वचन लावलेलीं असतात. (पण तीं विवक्षित नसतात.) जसें-धान्य विकत घेतांना, त्या बरोबर मिसळलेला भुसा घ्यावा लागतो. (परंतु धान्य शिजविण्यापूर्वीं भुसा वेगळा काढून अवशिष्ट धान्यच शिजविलें जातें. तसेंच, लिङ्ग व वचन जरी सूत्रांत निर्दिष्ट असलीं तरी, त्यांच्याकडे लक्ष न देतां, रूपांची सिद्धि करावी,) असें 'तस्यापत्यम्' ४-१-९२ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे.

**अत एवाकडारसूत्रे एकेति चरितार्थमित्यन्यत्र विस्तरः ॥ ७४ ॥**

(ही परिभाषा आहे) म्हणूनच 'आकडारादेका संज्ञा' सू० २३२ ह्या सूत्रांत 'एका' ह्या शद्वाचें ग्रहण चरितार्थ ठरतें. ह्या बद्दल इतर ग्रन्थांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे. ('आकडारात् एका संज्ञा' ह्या सूत्रांत 'संज्ञा' हा शद्व एकवचनांत वापरला असल्यामुळें त्या शद्वाचा अर्थ एकसंज्ञा असाच होतो. तरी पण, ह्या परिभाषेप्रमाणें, सूत्रांत सांगितलेलें लिङ्ग व वचन अविवक्षित असल्यामुळें, 'एका' ह्या शद्वाचा प्रयोग सूत्रांत मुद्दाम करावा लागला, व त्यामुळें 'एका' हा शद्व व्यर्थ ठरत नसून, चरितार्थ ठरतो.)

---

## परिभाषा ७५

**ननु भृशादिभ्यो भुव्यच्वेरित्यादौ विधीयमानः क्यङ् क दिवा भृशा भवन्तीत्यत्रापि स्यादत आह—**

' भृशादिभ्यो भुव्यच्वेः ' सू० २६६७ ह्या क्यङ्विधायक सूत्रान्वयें, ' क्व दिवा भृशा भवन्ति ' ह्या स्थलीं देखील, ' भृश ' शब्दाला ' क्यङ् ' होईल. ( तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः ॥ ७५ ॥

" सूत्रांत ' नञ् ' किंवा ' इव ' ह्यांनीं युक्त असलेल्या शब्दाचा अर्थ ' तद्भिन्न पण तत्सदृश वस्तु ' असा होतो. कारण ( लौकिक व्यवहारांत ) तशा शब्दांपासून अशाच अर्थाचा बोध होत असतो. "

**नञ्युक्तमिवयुक्तं वा यत्किंचिद् दृश्यते तत्र तस्माद्भिन्ने तत्सदृशेऽधिकरणे द्रव्ये कार्यं विज्ञायते हि यतस्तथार्थगतिरस्ति । नह्यब्राह्मणमानयेत्युक्ते लोष्टमानीय कृती भवति । अतश्च्व्यन्तभिन्ने च्व्यन्तसदृशेऽभूततद्भावविषये क्यङिति नोक्तदोषः ॥**

जेथें सूत्रांत ' नञ् ' किंवा ' इव ' ह्यानें युक्त असें पद उच्चारलें असतें तशा ठिकाणीं, त्या सूत्रांत सांगितलेलें कार्य त्याहून भिन्न पण तत्सदृश अशालाच होतें असें समजावें; कारण लौकिक व्यवहारांत अशाच रीतीनें अर्थाचें ग्रहण केलें जातें. एखाद्यास ' अब्राह्मणमानय ' अशी आज्ञा केल्यास, व त्यानें त्या आज्ञेप्रमाणें मृत्पिंड आणल्यास, त्याचें तसें करणें आज्ञेला धरून आहे असें म्हणतां येत नाहीं. म्हणूनच ' भृशादिभ्यः' ह्या सूत्रांतील ' अच्वेः ' ह्या पदाचा अर्थ ' च्व्यन्तभिन्न परंतु च्व्यन्तसदृश ' असाच केला पाहिजे. ( व ' अभूततद्भावे इति वक्तव्यम् '–सु० २११७ वरील वार्तिक—ह्या वार्तिकांत सांगितल्याप्रमाणें, ' अभूततद्भावविषयांत '—म्हणजे जें पूर्वीं नव्हतें तें झालें अशा अर्थांत–' च्वि ' प्रत्यय होत असल्यामुळें, ) 'च्व्यन्तसदृश' म्हणजे 'अभूततद्भाव ह्या अर्थाचा द्योतक ' असाच अर्थ केला पाहिजे, व असा अर्थ केला म्हणजे ( ' क्व दिवा भृशा भवन्ति ' ह्या स्थलीं ' भृश ' शब्दास ' क्यङ् ' होऊं शकत नाहीं व ) वर सांगितलेला दोष येत नाहीं. ( ' क्व दिवा भृशा भवन्ति ' ह्याचा अर्थ 'रात्रीं जे पुष्कळ दिसत होते तें दिवसा कोठें नाहींसे झाले आहेत ? ' असा आहे. ह्या उदाहरणांत ' भृश ' शब्द च्व्यन्त नाहीं–म्हणजे च्व्यन्तभिन्न आहे–हें खरें, परंतु तो शब्द अभूततद्भावाचा वाचक नसल्यामुळें, च्व्यन्तसदृश नाहीं. ' क्व दिवा भृशा भवन्ति ' ह्या वाक्यानें पूर्वीं जें होतें त्यांचा अभाव द्योतित होतो, पूर्वीं जें नव्हतें त्यांचा भाव द्योतित होत नाहीं. सारांश येथें ' भृश ' शब्द च्व्यन्तसदृश—म्हणजे अभूततद्भावाचा द्योतक नसल्यामुळें, ' क्यङ् ' प्रत्यय होत नाहीं. )

**ओषधेश्च विभक्तावप्रथमायामित्यादौ विभक्तिग्रहणमेतन्न्यायसिद्धार्थानुवाद एव । एतेन विभक्तावित्याद्यस्यानित्यत्वे ज्ञापकमिति वदन्तः**

परास्ताः । अनित्यत्वे भाष्यसम्मतफलाभावात् । अत एवाकर्त्तरि चेति सूत्रे कारकग्रहणं भाष्ये प्रत्याख्यातमिति बोध्यम् ॥

'ओषधेश्च विभक्तावप्रथमायाम्' सू० ३५३४ ह्या सूत्रांत ('अप्रथमायाम्' असा नञ्युक्त शब्द असून देखील,) 'विभक्तौ' हा शब्द पुन्हा घातला आहे. (वास्तविक, तो घालण्याची कांहींच गरज नव्हती. कारण, ह्या परिभाषेप्रमाणें, 'अप्रथमायाम्' ह्याचा अर्थ 'प्रथमाभिन्न पण प्रथमासदृश' असाच होऊं शकतो, व प्रथमाभिन्न व प्रथमासदृश अशी द्वितीयादिविभक्तीच असूं शकते. तरीपण तो शब्द वापरला आहे) ह्यावरून तो शब्द ह्या परिभाषेनें सिद्ध केलेल्या न्यायाचा केवळ अनुवाद कारणारा आहे असें समजावें; व असें मानलें म्हणजे कित्येक वैयाकरण जे म्हणतात कीं, हा शब्द ह्या परिभाषेचें अनित्यत्व दाखवितो तें म्हणणें चुकीचें ठरतें. कारण ही परिभाषा अनित्य मानल्यानें, असें कोणतेंहि फल निष्पन्न होत नाहीं कीं जें भाष्यकारांना मान्य असून, या परिभाषेला अनित्य मानल्याशिवाय, इतर रीतीनें सिद्ध होऊं शकत नाहीं (कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, जर ही परिभाषा अनित्य न मानली तर 'अनचि च' सू० ४८ या सूत्रांतील 'अनचि' या शब्दाचा 'अज्भिन्ने किन्तु अच्सदृशे वर्णे परे सति' असा अर्थ करावा लागेल व तसा अर्थ केल्यास, वाक्, रामात् रामाद्' इत्यादि स्थलीं ककार, तकार व दकार यांच्यापुढें कोणताहि वर्ण नसून अवसान असल्यामुळें, ककाराचें, तकाराचें किंवा दकाराचें द्वित्व होऊं शकणार नाहीं. पण ही परिभाषा अनित्य मानल्यानें, तसें द्वित्व होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. या शंकेवर हें उत्तर आहे कीं भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषा अनित्य न मानतां वर सांगितलेलें द्वित्व इतर रीतीनें सिद्ध करून दाखविलें आहे. भाष्यकाराचें असें म्हणणें आहे कीं 'अनचि च' या ठिकाणीं 'अनचि' हा पर्युदास न मानतां, प्रसज्यप्रतिषेध मानावा, व 'अनचि' या शब्दाचा अर्थ 'न तु अचि परे सति' असा करावा, व असा अर्थ केल्यानें, ककार, तकार व दकारापुढें अच् नसल्यामुळें द्वित्व होऊं शकतें. सारांश ही परिभाषा अनित्य मानल्यानें जीं फलें, सिद्ध होतात तीं फलें ही परिभाषा नित्य मानून देखील सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य मानण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) आणि भाष्यकारांनीं ही परिभाषा नित्य मानली आहे म्हणूनच, 'अकर्तरि च कारके संज्ञायाम्' सू०३१८६ ह्या सूत्रांतील 'कारके' ह्या शब्दाचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें आहे. (कारण नञ्युक्त 'अकर्तरि' ह्या शब्दाचा अर्थ, ह्या परिभाषेप्रमाणें, 'कर्तृभिन्ने, कर्तृसदृशे' असा होतो व असें कारक इतर प्रकारचें कारकच असूं शकतें.)

स्पष्टा चेयं भृशादिभ्य इति सूत्रे भाष्ये ॥ अत्रान्यसदृशेत्युक्त्या सादृश्यस्य भेदाघटितत्वं सूचयति । निरूपितं चैतन्मञ्जूषायाम् ॥ ७९ ॥

'भूशादिभ्यः' ३—१—१२ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. ह्या परिभाषेंत 'अन्यसदृश' असा शब्द वापरला असल्यामुळें, असें ध्वनित होतें कीं, भेद नसून देखील सादृश्य राहूं शकतें. ( नैयायिक लोक सादृश्याचें लक्षण 'तद्भिन्नत्वे सति तद्गतभूयोधर्मवत्त्वं सादृश्यम्' असें करितात. हें लक्षण वैयाकरणांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें, भेद नसून देखील, सादृश्य असूं शकतें. लौकिकव्यवहारांत 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' इत्यादि स्थलीं भेद नसून देखील सादृश्यवाचक शब्दप्रयोग केला जातो. तसेंच व्याकरणशास्त्रांत 'कृष्ण+अर्पण' किंवा 'हरि+इच्छा' इत्यादि स्थलीं, अकार व इकार यांच्या पुढें अनुक्रमें अकार व इकार—म्हणजे तेच वर्ण—असून देखील त्यांना सवर्ण मानून 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्रानें सवर्णदीर्घकार्य केलें जातें. 'सादृश्यं भेदाघटितम्' हा न्याय मानल्याशिवाय असें सवर्णदीर्घकार्य करतां येणार नाहीं. परंतु प्रकृतपरिभाषेंत तशा प्रकारच्या सादृश्याचें ग्रहण होऊं नये म्हणूनच, 'अन्यसदृश' ह्याठिकाणीं, 'अन्य' हा शब्द वापरला आहे ). मञ्जूषा ग्रन्थांत ह्या बद्दल विवेचन केलें आहे.

---

# परिभाषा ७६

**ननु व्याघ्री कच्छपीत्यादौ सुबन्तेन समासात्ततोऽप्यन्तरङ्गत्वाट्टा-प्यदन्तत्वाभावाज्जातिलक्षणो ङीष् न स्यादत आह—**

'व्याघ्री,' 'कच्छपी' इत्यादि स्थलीं, सुबन्ताशीं समास होत असल्यामुळें विभक्तिप्रत्यय प्रथम लागणार. पण तो लागण्यापूर्वीच, 'टाप्' अन्तरङ्गत्वामुळें प्रथम लागणार, व तो प्रथम लागल्यास, शब्दाचें अदन्तत्व नष्ट होणार; आणि त्यामुळें, जातिलक्षण 'ङीष्' प्रत्यय होऊं शकणार नाहीं. ( 'व्याघ्री,' 'कच्छपी' इत्यादि उदाहरणांत, 'सुबन्तं समर्थेन सह समस्यते' असा नियम असल्यामुळें, 'आतोऽनुपसर्गे कः' सू० २९१५ ह्या सूत्रानें, 'जिघ्रति इति घ्र' अशा, 'क' हा कृत् प्रत्यय करून सिद्ध झालेल्या 'घ्र' ह्या कृदन्त शब्दाचा 'वि' आणि 'आ' ह्या गतीशीं, 'कुगतिप्रादयः' सू० ७६१ ह्यानें, गतिसमास करतेवेळीं, व तसेंच 'पाति इति प' ह्या 'क' प्रत्ययान्त 'प' ह्या कृदन्त शब्दाचा 'कच्छेन' ह्या उपपदाशीं, 'उपपदमतिङ्' सू० ७८२ ह्या सूत्रानें, उपपदसमास करतेवेळीं, पदद्वयनिमित्तक समासाच्या मानानें, विभक्तिप्रत्ययोत्पत्तिरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, 'प' व 'घ्र' ह्यांना विभक्तिप्रत्यय प्रथम लागला पाहिजे. पण विभक्तिप्रत्ययोत्पत्तिरूपी कार्याच्या मानानें देखील, प० ५० मध्यें सांगितल्याप्रमाणें, लिङ्गकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, 'घ्र' व 'प' ह्या शब्दांना विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वी लिङ्गबोधक प्रत्यय प्रथम लावला पाहिजे. 'व्याघ्र' व 'कच्छप' हे शब्द जरी जातिवाचक आहेत तरी, 'घ्र' व 'प' हे

शब्द जातिवाचक नाहींत. म्हणून ' जातेरस्त्रीविषयादयोपधात् ' सू० ५१८ ह्या सूत्रान्वयें जातिलक्षण ' ङीष् ' प्रत्यय—म्हणजे जातिवाचक शब्दास होणारा ' ङीष् ' प्रत्यय—' घ्र ' व ' प ' ह्या शब्दांना होऊं शकत नाहीं, व ' अजाद्यतष्टाप् ' सू० ४५४ ह्या सूत्रानें ' टाप् ' प्रत्यय होणार, व तो प्रत्यय लावून ' घ्रा ' व ' पा ' अशीं रूपें होणार, व त्यांना ' सु ' हा विभाक्तिप्रत्यय लावल्यानंतर त्यांचा अनुक्रमें गति व उपपद ह्यांशीं समास केला असतां, ' व्याघ्रा ' व ' कच्छपा ' अशीं रूपें होतील, व हे शब्द जरी जातिवाचक असले तरी, अदन्त नसल्यामुळें, जातिलक्षण ' ङीष् ' होणार नाहीं, व ' व्याघ्री, ' ' कच्छपी ' अशीं रूपें सिद्ध होणार नाहींत. ही अडचण दूर व्हावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः ॥ ७६ ॥

" गति, कारक, व उपपद ह्यांचा कृदन्ताशीं जो समास होतो तो, 'सुप्' विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वींच, होतो. "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' सुप् ' प्रत्यय व स्त्रीवाचकप्रत्यय लागण्यापूर्वींच, ' घ्र ' व ' प ' ह्या कृदन्त शब्दांचा अनुक्रमें गति व उपपद ह्यांशीं समास होऊन 'व्याघ्र' व 'कच्छप' असे जातिवाचक अदन्त शब्द होत असल्यामुळें, त्यांना ' जातेः ' सू० ५१८ ह्या सूत्रानें ' ङीष् ' प्रत्यय होऊन, ' व्याघ्री, ' ' कच्छपी ' अशीं शुद्ध रूपें सिद्ध होतात. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ह्या परिभाषेंत असलेला ' सुबुत्पत्तेः ' हा शब्द ' स्त्रीप्रत्ययोत्पत्तेः ' ह्याचें देखील उपलक्षण आहे, आणि म्हणूनच, कृदन्ताला ' सुप् ' प्रत्यय आणि तसेंच स्त्रीप्रत्यय लागण्यापूर्वीं, गतिकारकोपपदांचा कृदन्ताशीं समास होत असतो. )

**उपपदमिति सूत्रेऽतिङ्ग्रहणेन कुगतीत्यत्र तदपकर्षणेनातिङन्तश्च समास इत्यर्थात्तयोः सूत्रयोः सुप्सुपेत्यस्य निवृत्त्यैकदेशानुमत्या कारकांशे च सिद्धेयं तेनाश्वक्रीतीति सिद्धा । अन्यथा पूर्वं टाप्यदन्तत्वाभावात् क्रीतात्करणपूर्वादिति ङीष् न स्यात् ॥**

'उपपदमतिङ्' सू० ७८२ ह्या सूत्रांत ' अतिङ् ' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें व ' कुगतिप्रादयः ' सू० ७६१ ह्या सूत्रांत (—म्हणजे ह्या सूत्रांतील ' गति ' शब्द पृथक् करून, ' गतिः ' अशा योगविभागानें तयार झालेल्या पृथक् सूत्रांत, ' उपपदमतिङ् ' ह्या सूत्रांतून ) ' अतिङ् ' शब्दाचें अपकर्षण केलें म्हणजे ' उपपदमतिङ् ' व ' गतिरतिङ् ' ह्या दोन सूत्रांचा अर्थ असा होतो कीं, उपपदसमास व गतिसमास अतिङन्त असतात. आणि ह्या दोन्ही सूत्रांत ' सह सुपा ' सू० ६४९ ह्या सूत्रांतील ' सुपा ' ह्या शब्दाची ( अनुवृत्ति करण्याची गरज राहत नाहीं; कारण तशी अनुवृत्ति केल्यास, ' अतिङ् ' हा शब्द व्यर्थ पडेल म्हणून ' सुपा ' ह्या शब्दाची ) निवृत्ति होते. ( सारांश, 'उपपदमतिङ्' व 'गतिः आतिङ्' ह्या होन्ही सूत्रांत 'सुपा'

ह्या शब्दाची अनुवृत्ति होत नसल्यामुळें, हें सिद्ध होतें कीं, गति व उपपद ह्यांचा समास सुबन्ताशीं होत नसून, सुबुत्पत्ति होण्यापूर्वींच, अतिङन्ताशीं होतो. अशा रीतीनें ह्या परिभाषेंत सांगितलेल्या 'गति' 'कारक' व 'उपपद' ह्या तीन विषयांपैकीं दोन विषयांत—म्हणजे गति व उपपद ह्यांच्या विषयांत—ही परिभाषा सिद्ध होते;) व अशा रीतीनें, गति व कारक ह्या एकदेशांत ती सिद्ध होऊन स्वीकारल्यामुळें बाकी राहिलेल्या 'कारक' ह्या अंशांत ती स्वीकारणें योग्य आहे; व कारकांशांत ती स्वीकारली म्हणजेच, 'अश्वक्रीती' हें रूप सिद्ध होतें. कारकांशांत ती न स्वीकारल्यास, पूर्वीं 'टाप्' प्रत्यय होऊन अदन्तत्व नाहींसें होईल, व 'क्रीतात्करणपूर्वात्' सू० ५०६ ह्या सूत्रानें 'ङीष्' प्रत्यय होणार नाहीं. ( वर हें सांगितलेंच आहे कीं, ह्या परिभाषेंत असलेल्या 'सुबुत्पत्तेः' ह्या शब्दानें 'स्त्रीप्रत्ययोत्पत्तेः' ह्याचेंहि उपलक्षणानें ग्रहण होतें, व त्यामुळें अर्थ असा होतो कीं, सुबुत्पत्ति व स्त्रीप्रत्ययोत्पत्ति होण्यापूर्वीं समास होतो. हें जसें 'गति' व 'उपपद' ह्यांच्या विषयांत लागू पडतें तसेंच, कारकांशांतहि लागू पडतें. कारकांशांत हें लागू पडत नाहीं असें मानल्यास, 'अश्वेन' ह्या करणरूपी कारकाचा कृदन्त 'क्रीत' शब्दाशीं स्त्रीप्रत्ययोत्पत्तीनंतर समास केला तर, 'क्रीत' शब्द अदन्त असल्यामुळें, 'अजाद्यतष्टाप्' सू० ४५४ ह्या सूत्रानें 'टाप्' होऊन, 'अश्वेन क्रीता=अश्वक्रीता' असा समास झाल्यावर, 'क्रीत' शब्द अदन्त राहत नाहीं, आदन्त होतो, व त्यामुळें, 'क्रीतात्करणपूर्वात्' हें सूत्र लागू पडत नाहीं व 'ङीष्' प्रत्यय होऊं शकत नाहीं, आणि 'अश्वक्रीती' असें रूप होऊं शकत नाहीं. पण कारकांशांत ही परिभाषा स्वीकारली म्हणजे, 'अश्वेन' ह्या कारकाचा 'क्रीत' ह्या कृदन्ताशीं, स्त्रीप्रत्ययोत्पत्ति होण्यापूर्वींच, समास होतो, व 'अश्वेन क्रीत=अश्वक्रीत' असा समास केला असतां, कृदन्त 'क्रीत' शब्द अदन्त राहत असल्यामुळें 'क्रीतात्करणपूर्वात्' हें सूत्र लागून 'ङीष्' प्रत्यय होतो व 'अश्वक्रीती' हें शुद्ध रूप सिद्ध होतें.)

**अस्या अनित्यत्वात् क्वचित् सुबुत्पत्त्यनन्तरमपि समासो यथा सा हि तस्य धनक्रीतेति ।**

( कित्येक वैयाकरण ही परिभाषा अनित्य मानतात व ती अनित्य मानण्याचें कारण हें सांगतात कीं 'कर्तृकरणे कृता बहुलम्' सू० ६९४ या सूत्रांत 'बहुल' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें हें सिद्ध होतें कीं, कर्तरि किंवा करणेतृतीयेचा सुबन्ताशीं सुबुत्पत्तीनंतर देखील समास होऊं शकतो. तसेंच 'अम्बाम्बगोभूमि' सू० २९१८ या सूत्रांत 'गो, भूमि' इत्यादि शब्दांपुढें समासांत 'स्थ' हा शब्द आला असतां, 'स्थ' यांतील सकाराचें षत्व होतें असें सांगितलें आहे. प्रकृतपरिभाषा नित्य असती तर, 'अम्बाम्ब' या सूत्रांत 'गो, भूमि' इत्यादि शब्दांचें ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण 'गोष्ठः, भूमिष्ठः' येथें सुबुत्पत्तिपूर्वीं समास होतो असें

मानल्यास, ' स्थ ' ला पदसंज्ञा प्राप्त होत नसल्यामुळें, ' सात्पदाद्योः ' सू० २१२३ हा निषेध लागू पडला नसता, व ' आदेशप्रत्यययोः ' सू० २१२ या सूत्रानें षत्व होऊं शकलें असतें. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, क्वचित् स्थलीं सुबुत्पत्तिनंतर देखील कृदन्ताशीं समास होऊं शकतो, व तशा स्थलीं ' सात्पदाद्योः ' हा निषेध न लागावा म्हणून ' अम्बाम्ब ' या सूत्रांत 'गो, भूमि' इत्यादि शब्दांचें जें ग्रहण केलें आहे तें व्यर्थ ठरत नाहीं. सारांश अशा रीतीनें) प्रकृतपरिभाषा अनित्य ठरत असल्या-मुळें, कोठें कोठें सुबुत्पत्तिनंतर (व तसेंच स्त्रीप्रत्ययोत्पत्तिनंतर) देखील कृदन्ताशीं समास होतो. म्हणून ' सा हि तस्य धनक्रीता ' या वाक्यांतील ' धनक्रीता ' हा प्रयोग शुद्ध ठरतो (ही परिभाषा नित्य असती तर, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, 'धनक्रीता' असें रूप न होतां ' धनक्रीती ' असें रूप झालें असतें, पण भाषेंत तर ' धनक्रीता ' असा प्रयोग आढळतो, व तो प्रयोग, ही परिभाषा अनित्य मानल्यानेंच, शुद्ध ठरतो. )

अन्ये त्वनित्यत्वे न मानं तत्राजादित्वाट्टाबित्याहुः ॥

इतर वैयाकरण असें म्हणतात कीं, ही परिभाषा अनित्य मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. (' कर्तृकरणे कृता बहुलम् ' या सूत्रांत ' बहुल ' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें प्रकृतपरिभाषा अनित्य ठरते असें मानतां येत नाहीं, कारण ' बहुल ' शब्दानें एवढेंच ज्ञापित होतें कीं कोठें कोठें कर्तरि व करणेतृतीयेचा कृदन्ताशीं समास न होतां, वाक्यच कायम राहतें. जसें, 'दात्रेण लूनवान्' इत्यादि स्थलीं समास होत नाहीं व वाक्यच कायम राहतें. तसेंच, ते वैयाकरण म्हणतात कीं ' अम्बाम्ब ' या सूत्रांत 'गो, भूमि' इत्यादि शब्दांचें जें ग्रहण केलें आहे तें नियमार्थ आहे— म्हणजे समासांत असलेल्या पूर्वपदांतील इणापुढें ' स्थ ' आल्यास त्याच्या सका-रास षत्व होणें असेल तर तो शब्द 'गो, भूमि' इत्यादि समासांतील पूर्वपदाच्या पुढें असल्यासच होतें–आणि म्हणूनच ' हृदिस्थः ' इत्यादि स्थलीं षत्व होत नाहीं. तसेंच ' सात्पदाद्योः ' या सूत्रांतील ' पदादि ' या शब्दाचा ' पदस्य आदिः ' असा षष्ठीतत्पुरुष समास न करितां ' पदात् आदिः ' असा पञ्चमीतत्पुरुष समास केल्यास, त्या सूत्रान्वयें पदाच्या पुढें सकार आल्यास त्याला षत्व होऊं शकत नाहीं, व त्यामुळें ' गोष्ठः, भूमिष्ठः ' इत्यादि स्थलीं षत्व होणार नाहीं. तें षत्व व्हावें म्हणून 'अम्बाम्ब' या सूत्रांत 'गो, भूमि' इत्यादि शब्दांचें ग्रहण केलें आहे व त्यामुळें त्या सूत्रांतील 'गो, भूमि' इत्यादि शब्दांचें ग्रहण प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरत नाहीं. मग जर ही परिभाषा नित्य मानली तर, ' धनक्रीता ' असा जो प्रयोग भाषेंत आढळतो तो कसा सिद्ध व्हावा ? या प्रश्नाचें ते वैयाकरण असें उत्तर देतात कीं, ) ' धनक्रीता ' हा शब्द ' अजादि ' या आकृतिगणांत अन्तर्भूत होत असल्यामुळें ('क्रीतात्करणपूर्वात्' या सूत्रानें ङीष् प्रत्यय न होतां, ' अजाद्यतष्टाप् ' सू० ४५४ या सूत्रानें ) टाप् प्रत्यय होऊन ' धनक्रीता ' असें रूप सिद्ध होतें असें इतर वैयाकरणांचें मत आहे.

अत एव कुम्भकार इत्यादौ षष्ठीसमासोऽपि सुबुत्पत्तेः पूर्वमेव। षष्ठीसमासाभावे चोपपदसमासकृत एकार्थीभाव इति न तत्र वाक्यमित्युपपदमिति सूत्रे भाष्ये स्पष्टम्।

( ही परिभाषा कारकांशांत देखील लागू पडते ) म्हणूनच 'कुम्भकारः' इत्यादि स्थलीं षष्ठीतत्पुरुषसमास देखील सुबुत्पत्तिपूर्वीच होतो ('कुम्भस्य कार=कुम्भकार' असा प्रथम षष्ठीतत्पुरुषसमास झाल्यानंतरच मग सुबुत्पत्ति होऊन 'कुम्भकारः' असें रूप होतें.) षष्ठीसमास न केल्यास ('विभाषा' या अधिकारांत 'षष्ठी' हें सूत्र पठित असल्यामुळें, विकल्पेंकरून 'कुम्भस्य कार' असा प्रयोग देखील होण्याची आपत्ति येईल. या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) उपपदसमास केल्यानें, 'कुम्भ' व 'कार' हे दोन शद्ब उपपदसमासांत एकत्र संघटित झाले असतां, 'कुम्भकार' अशा पूर्ण सामासिक शद्बांतच अर्थप्रतिपादन करण्याची शक्ति असते, आणि म्हणूनच अशा ठिकाणीं वाक्यप्रयोग होऊं शकत नाहीं असें 'उपपदमतिङ्' २-२-१९ या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ( त्या भाष्यांत असें म्हटलें आहे कीं 'उपपदसमासो नित्यसमासः। नित्यं यः समासः स नित्यसमासः यस्य विग्रहो नास्ति।' याचा अर्थ असा कीं 'उपपदसमास हा नित्यसमास असल्यामुळें व नित्यसमास हा नेहमी समासरूपानेंच राहणारा असल्यामुळें त्याचा विग्रह करतां येत नाहीं.' 'कुम्भं करोतीति कुम्भकार' हें विग्रहवाक्य नसून केवळ समासाच्या अर्थाचा बोध, करून देणारें वाक्य आहे हें लक्षांत ठेवावें. )

तत्र हि षष्ठीसमासादुपपदसमासो विप्रतिषेधेनेति वार्तिकम्। अथवा विभाषा षष्ठीसमासो यदा न षष्ठीसमासस्तदोपपदसमास इति तत्प्रत्याख्यानं च।

'उपपदमतिङ्' २-२-१९ ह्या सूत्रावरील भाष्यांत, 'षष्ठीसमासादुपपदसमासो विप्रतिषेधेन' असें वार्तिक प्रथम सांगून, नंतर 'अथवा विभाषा षष्ठीसमासः, यदा न षष्ठीसमासस्तदोपपदसमासः' असें म्हणून, भाष्यकारांनीं त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे. ('षष्ठी' सू० ७०२ हें षष्ठीसमासाचें सूत्र पूर्वसूत्र आहे, व 'उपपदमतिङ्' सू० ७८२ हें उपपदसमासाचें सूत्र परसूत्र आहे. 'कुम्भकारः' इत्यादि उदाहरणांत, दोन्ही प्रकारच्या समासांची प्राप्ति आहे. परंतु उपपदसमास पर असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ह्या न्यायानें, वरील उदाहरणांत षष्ठीसमास न होतां, उपपदसमास होतो—असा वार्तिकाचा अर्थ आहे. भाष्यकारांना हें वार्तिक संमत नाहीं. कारण 'विभाषा' सू० ६६५ ह्या अधिकारसूत्रान्वयें, षष्ठीसमास विकल्पेंकरून होणारा समास आहे. जेव्हां षष्ठीसमास करणें नसेल तेव्हां, उपपद समास करावा. दोन्ही समासांची नित्य प्राप्ति असती तर विप्रतिषेधन्याय लागू पडता; पण षष्ठीसमास विकल्पानें होणारा असल्यामुळें येथें

विप्रतिषेधन्याय लागू पडत नाहीं, व दोन्ही प्रकारचे समास विकल्पेंकरून होऊं शकतात. मात्र दोन्ही प्रकारचे समास, सुबुत्पत्ति व तसेंच स्त्रीप्रत्ययोत्पत्ति होण्यापूर्वीं, केले पाहिजेत, असा भाष्याचा आशय आहे. )

**यद्यप्युपपदसमासस्यान्तरङ्गत्वाभिप्रायकं न वा षष्ठीसमासाभावादुपपदसमास इति वार्तिककृतोक्तं तथापि तदुभयप्रत्याख्यानपरमथवेत्यादि भाष्यं परिभाषायां सामान्यतः कारकोपादानेन कारकविभक्त्यन्तेन कृद्भिः समासमात्रस्य सुबुत्पत्तेः पूर्वमेव लाभात् ।**

( ' उपपदमतिङ् ' ह्या सूत्रावरील भाष्यांत, ' षष्ठीसमासादुपपदसमासो भवति विप्रतिषेधेन ' असें वार्तिक प्रथम सांगून, भाष्यकारांनीं लगेंच ' न वा, षष्ठीसमासाभावादुपपदसमासः ' असें दुसरें वार्तिक सांगितलें आहे. पहिल्या वार्तिकाचा अर्थ वर दिलाच आहे. दुसऱ्या वार्तिकाचा अर्थ असा कीं, ' विप्रतिषेधामुळें षष्ठीसमास न होतां, उपपदसमास होतो असें म्हणण्याची गरज नाहीं; कारण षष्ठीसमासाची प्राप्तीच होत नसल्यामुळें, उपपदसमास होतो. ' कुम्भकार ' इत्यादि स्थलीं, षष्ठीसमासाची प्राप्तीच होत नाहीं असें जें वार्तिककारानें म्हटलें आहे तें कोणत्या कारणामुळें म्हटलें आहे हें आतां ग्रन्थकार सांगतात– ) उपपदसमास षष्ठीसमासाच्या मानानें अन्तरङ्ग आहे ह्या आशयानें वरील वार्तिक वार्तिककारानें केलें आहे. ( उपपदसमास सुबुत्पत्तीपूर्वीं होत असल्यामुळें अन्तरङ्ग आहे, व षष्ठीसमास सुबुत्पत्तीनंतर होत असल्यामुळें बहिरङ्ग आहे; व बहिरङ्ग परिभाषेप्रमाणें, षष्ठीसमास न होतां, अन्तरङ्ग उपपदसमास होतो. ह्या कारणामुळें वार्तिककारानें दुसरें वार्तिक सांगितलें आहे. ) तथापि भाष्यकारांनीं, 'अथवा विभाषा षष्ठीसमासः यदा न षष्ठीसमासस्तदोपपदसमासो भविष्यति ' असें म्हणून वरील दोन्ही वार्तिकांचें प्रत्याख्यान केलें आहे. हें प्रत्याख्यान करण्याचें कारण हें कीं, प्रकृतपरिभाषेंत ' कारक ' अशा सामान्यपदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, ह्या परिभाषेवरून असें सिद्ध होतें कीं, कारकविभक्तिप्रत्ययान्त शब्दाचा कृदन्ताशीं जो जो म्हणून समास होतो तो सर्वप्रकारचा समास कृदन्ताला ' सुप् ' प्रत्यय ( व तसेंच स्त्रीप्रत्यय ) लागण्यापूर्वींच होतो. ( षष्ठीसमास विकल्पेंकरून होणारा असल्यामुळें, षष्ठीसमास व उपपदसमास ह्यांच्या विषयांत विप्रतिषेध सूत्र लागू पडत नाहीं असें सांगून भाष्यकारांनीं प्रथम वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे हें वर सांगितलेंच आहे. दुसऱ्या वार्तिकाचें प्रत्याख्यान भाष्यकार अशा रीतीनें करितात कीं, वार्तिककारानें उपपदसमास अन्तरङ्ग व षष्ठीसमास बहिरङ्ग मानून त्याच्या आधारावर तें वार्तिक केलें असल्यामुळें चूक आहे; कारण, ह्या परिभाषेप्रमाणें, जसा उपपदसमास कृदन्ताशीं, कृदन्ताला सुबुत्पत्ति होण्यापूर्वींच, होतो, तसाच विकल्पानें होणारा षष्ठीसमास देखील, कृदन्ताला सुबुत्पत्ति होण्यापूर्वींच, होतो. सारांश, दोन्ही प्रकारचे

समास सुबुत्पत्तीपूर्वीच होत असल्यामुळें, एक बहिरङ्ग व दुसरा अन्तरङ्ग मानतां येत नाहीं. म्हणून अन्तरङ्गत्वामुळें उपपदसमासच होतो व बहिरङ्गत्वामुळें षष्ठीसमासाची प्राप्तीच होत नाहीं ह्या अर्थाचें द्वितीय वार्तिक चूक ठरतें. अशा रीतीनें दोन्ही वार्तिकांचें प्रत्याख्यान करून भाष्यकार असा सिद्धान्त सांगतात कीं, ' कुम्भकार ' इत्यादि उदाहरणांत, षष्ठीसमास विकल्पेंकरून होणारा असल्यामुळें, जेव्हां षष्ठीसमास करणें असेल तेव्हां षष्ठीसमास करावा व तो करणें नसेल तेव्हां उपपदसमास करावा. मात्र दोन्ही प्रकारचे समास, कृदन्ताला सुबुत्पत्ति अथवा स्त्रीप्रत्ययोत्पत्ति होण्यापूर्वींच, केले पाहिजेत. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, ' कुम्भस्य कार ' ह्या समासांत ' कुम्भस्य ' ही कर्मणि षष्ठी आहे, व ' कुम्भस्य ' हा कारकविभक्त्यन्त शब्द आहे. )

**एतेनैषा कारकतद्विशेषयोरुपादान एवेति परास्तम् । अस्या विध्येकवाक्यत्वाभावेन विप्रतिषेधादिशास्त्रवत् कार्यव्यवस्थापकत्वेनोपादान एवेत्यर्थालाभाच्च ॥ ७६ ॥**

असें असल्यामुळें, ज्या ज्या सूत्रांत सामान्यतः कारकाचें अथवा कारकविशेषाचें ग्रहण आहे तशाच सूत्रांना ही परिभाषा लागू पडते असें जें कांहीं वैयाकरण म्हणतात तें चूक ठरतें. ( कारण ' षष्ठी ' सू० ७०२ ह्या सूत्रांत सामान्यतः कारकाचा किंवा कारकविशेषाचा निर्देश केला नसून देखील, त्या सूत्राला भाष्यकारांनीं ही परिभाषा लावली आहे. दुसरें कारण असें कीं,) इतर सूत्रांशी एकवाक्यतापन्न होऊन त्या सूत्रांचा अर्थ करून देण्यास उपयोगी पडणारी अशा प्रकारची ही परिभाषा नाहीं. ज्याप्रमाणें ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र कार्यव्यवस्थापक आहे त्याचप्रमाणें ही परिभाषा देखील कार्यांची व्यवस्था लावून देणारी आहे. त्यामुळें जेथें सूत्रांत सामान्यतः कारकग्रहण केलें आहे किंवा कारकविशेषाचें ग्रहण केलें आहे तेथेंच ही परिभाषा लागते असा अर्थ ह्या परिभाषेंतून मुळींच काढतां येत नाहीं. ( ' तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ' ' तस्मादित्युत्तरस्य ' ह्या परिभाषा, ज्या सूत्रांत सप्तमीनिर्देश अथवा पञ्चमीनिर्देश करून कार्य सांगितलें आहे त्या सूत्रांशीं जशा एकवाक्यतापन्न होऊन त्या सूत्रांचा अर्थ योग्य रीतीनें करून देण्याच्या उपयोगी पडतात तशा प्रकारची प्रकृत परिभाषा नाहीं. ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' हें सूत्र ज्याप्रमाणें कोणतें कार्य प्रथम करावें व कोणतें नंतर करावें अशा प्रकारची व्यवस्था लावून देणारें सूत्र आहे त्याच तऱ्हेची ही परिभाषा आहे—म्हणजे कृदन्ताशीं प्रथम समास करावा, नंतर कृदन्ताचे ठिकाणीं सुबुत्पत्ति अथवा स्त्रीप्रत्ययोत्पत्ति करावी असा केवळ कार्यक्रम सांगणारी ही परिभाषा आहे. )

---

# परिभाषा ७७

**ननूगिदचामित्यत्र धातोश्चेदुगित्कार्यं तर्ह्यञ्चतेरेवेति नियमेनाधातोरेव नुमि सिद्धेऽधातुग्रहणं व्यर्थमत आह—**

' उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः ' सू० ३६१ हें सूत्र, धातूला जर नुमागमरूपी उगित्कार्य करणें असेल तर तें केवळ ' अञ्चु ' धातूलाच होऊं शकतें असा नियम सांगणारें सूत्र असल्यामुळें, जो धातु नाहीं अशाच उगिताला ' नुम् ' कार्य होतें हें आपोआपच सिद्ध होतें व त्यामुळें, ' अधातोः ' ह्या शब्दाचें वरील सूत्रांत केलेलें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें, म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## सांप्रतिकाभावे भूतपूर्वगतिः ॥ ७७ ॥

" सूत्रांत, जो सद्यःस्थितिदर्शक नाहीं असा शब्द वापरला असल्यास, तो पूर्वस्थितिदर्शक आहे असें समजावें "

**तत्तद्वचनसामर्थ्यन्यायसिद्धेयम् ।**

' तत्तद्वचनसामर्थ्यन्यायानें ' ही परिभाषा सिद्ध होते. ( कोणत्याहि वाक्यांत किंवा सूत्रांत जेवढे म्हणून शब्द वापरले असतात ते सर्व शब्द अर्थबोधक असून, त्यांपैकीं कोणताहि शब्द निरर्थक नसतो. अशा तऱ्हेनें प्रत्येक शब्दांत असणाऱ्या स्वार्थद्योतनरूपी शक्तीमुळें ही परिभाषा सिद्ध होते. सारांश, सूत्रांत सांगितलेला प्रत्येक शब्द अर्थबोधक असल्यामुळें, जर तो शब्द सद्यःस्थितिदर्शक होत नसेल तर तो पूर्वकालिकस्थिति दर्शविणारा शब्द आहे असें समजावें, व तो शब्द सूत्रांत व्यर्थ घातला आहे असें समजूं नये. ही परिभाषा असल्यामुळें, 'उगिदचाम्' ह्या सूत्रांतील ' अधातोः ' हा शब्द जरी सद्यःस्थितीला लागू पडणारा नाहीं तरी तो निरर्थक न मानतां, पूर्वस्थितिबोधक आहे असें समजावें. )

**तत्सामर्थ्यादधातुभूतपूर्वस्यापीत्यर्थेन गोमत्यतेः क्विपि गोमानित्यादौ नुम्सिद्धिः । नामीत्यादिसूत्रेषु भाष्ये स्पष्टा ॥ ७७ ॥**

प्रत्येक शब्दांत असें स्वार्थद्योतनरूपी सामर्थ्य असल्यामुळें, ' अधातोः ' हा शब्द पूर्वस्थितिबोधक आहे असा अर्थ करावा, व तसा अर्थ केल्यास, ' गोमत्यति ' ह्या धातूला ' क्विप् ' प्रत्यय करून ' गोमत् ' असा शब्द सिद्ध झाल्यावर, त्याचे ठिकाणीं नुमागमाची सिद्धि होते. ( ' सुप आत्मनः क्यच् ' सू० २६५७ ह्या सूत्रानें ' गोमत् ' शब्दाला ' क्यच् ' प्रत्यय केल्यास, ' गोमन्तमात्मनः इच्छति = गोमत्यति असें रूप सिद्ध होतें. ' सनाद्यन्ता धातवः ' सू० २३०४ ह्या सूत्रानें, 'क्यच्' प्रत्ययान्ताला धातुसंज्ञा प्राप्त होते; कारण, ' क्यच् ' सनादिमध्यें पठित आहे. 'गोमत्य' ह्या क्यजन्त धातूहून 'क्विप् च' सू० २९८३ ह्या सूत्रानें 'क्विप्' प्रत्यय केल्यास आर्धधातुक

'क्विप्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'गोमत्य' ह्यांतील 'य' चा 'यस्य हलः' सू० २६३१ व 'अतो लोपः' सू. २३०८ ह्या सूत्रांनी लोप होऊन, व तसेंच 'क्विप्=व्' चा 'वेरपृक्तस्य' सू० ३७५ ह्या सूत्रानें लोप होऊन, 'गोमत्' असें रूप सिद्ध होतें. नंतर 'गोमत्+सु' अशा स्थितींत, 'सु' प्रत्यय पुढें असल्यामुळें 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू ४२५ ह्यानें उपधादीर्घ करून, नंतर 'उगिदचां' सू० ३६१ ह्यानें नुमागम करून, व 'हल्ङ्याब्भ्यः' सू० २५२ ह्यानें सुलोप करून, व 'संयोगान्तस्य लोपः' सू० ५४ ह्यानें अन्त्य तकाराचा लोप करून, 'गोमान्' असें रूप सिद्ध होतें. आतां येथें अशी शंका उत्पन्न होते कीं, 'गोमत्+सु' अशा स्थितींत, 'गोमत्' हा शद्ब 'क्विप्'-प्रत्ययान्त असल्यामुळें, 'सनाद्यन्ता धातवः' सू० २३०४ ह्या सूत्रान्वयें तो धातु-संज्ञक आहे; मग त्याला 'उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः' सू० ३६१ ह्या सूत्रानें नुमागम कसा व्हावा ? ह्या शंकेचें उत्तर ही परिभाषा देते, व तें उत्तर हें आहे कीं, जरी सांप्रतकाळीं 'सु' प्रत्यय लावतेवेळीं. 'गोमत्' शद्ब 'क्विप्' प्रत्ययान्त असल्यामुळें, धातुसंज्ञक आहे व त्याला 'अधातु' मानतां येत नाहीं तरी, 'क्यच्, क्विप्' प्रत्यय होण्यापूर्वी, 'गावो विद्यन्ते यस्य' असा 'मतुप्' प्रत्ययान्त 'गोमत्' शद्ब अधातु होता; व त्या शद्बाच्या या पूर्वकालिक 'अधातु' संज्ञेचा आश्रय करून व त्यायोगानें त्याला 'अधातु' असें मानून नुमागम करावा. म्हणूनच बालमनोरमेंत असें म्हटलें आहे कीं, 'क्यजाचारक्विबन्तत्यनन्तरं धातुत्वे सत्यपि क्यजाद्युत्पत्तेः पूर्वमधातु'-त्वसत्वान्नुम् निर्बाधः' पहा बालमनोरमा द्वितीयावृत्ति पान १९६.कित्येक वैयाकरण असें म्हणतात कीं ही परिभाषा 'काकवद्देवदत्तस्य गृहम्' या लौकिकन्यायाच्या आधारावर रचली आहे, व चित्रप्रभेंत त्या न्यायाचें खालीं दिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे, 'लोके यथा देवदत्तीयगृहोपरितनकाकोड्डयने काकवदिति व्यवहारो यथा वा केन‌चिद्देवदत्तेन स्वीयगृहे विक्रीतेऽन्येन क्रीतेऽपि देवदत्तगृहमिति व्यवहारस्तथा शास्त्रेऽपि तत्त्वाभावे भूतपूर्वगत्या तद्व्यवहार इति लोकन्यायसिद्धेयम्।'—म्हणजे देवदत्ताच्या घरावर जरी आतां कावळे बसत नाहींत तरी त्या घरावर पूर्वीं कावळे बसत होते म्हणून पूर्वकालीन वस्तुस्थितीचा आश्रय करून त्या घराला 'काकवद्देवदत्तस्य गृहम्' असें म्हणतात किंवा देवदत्तानें आपलें स्वतःचें घर दुसऱ्यास विकून टाकलें तरी तें घर पूर्वीं देवदत्ताचें असल्यामुळें, देवदत्ताचें घर असें लौकिक व्यवहारांत म्हणण्याचा प्रचार आहे त्याचप्रमाणें व्याकरणशास्त्रांत देखील पूर्वकालीन वस्तुस्थितीचा आश्रय करून, सद्यःस्थिति भिन्न असली तरी, तसा ('पूर्वस्थित्यनुरूप') व्यवहार केला जातो. अशा रीतीनें ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध आहे.) 'नामि' ६–१–६ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे.

---

# परिभाषा ७८

( ' अनेकमन्यपदार्थे ' सू० ८३० असें सूत्र असल्यामुळें, बहुव्रीहिसमासानें केवळ अन्यपदार्थाचेंच ग्रहण होईल व समासांतील अवयवांचें ग्रहण होणार नाहीं. पण तसें झाल्यास, ' सर्वादीनि सर्वनामानि ' सू० २१३ या स्थलीं ' सर्व ' शद्वास सर्वनामसंज्ञा न होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टळावी म्हणून ही परिभाषा सांगतात. )

बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि॥ ७८ ॥

" सूत्रांत बहुव्रीहिसमास वापरला असल्यास, कोठें कोठें त्या समासानें त्या समासांतील अवयवाचें देखील ग्रहण होतें "

**अपिनाऽतद्गुणसंविज्ञानम्। तेषां गुणानामवयवपदार्थानां संविज्ञानं विशेष्यान्वयित्वमिति तदर्थः ॥**

या परिभाषेंत ' अपि ' हा शद्व वापरला असल्यामुळें, अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहीचें देखील ग्रहण होतें–म्हणजे कोठें कोठें बहुव्रीहिसमासानें त्याचा विशेष्य जो अन्यपदार्थ त्याचेंच ग्रहण होतें व समासांतील अवयवांचें ग्रहण होत नाहीं. समासाचे गुण–म्हणजे अवयव–जेथें विशेष्यामध्यें–म्हणजे अन्यपदार्थामध्यें–अन्वित असतात त्याला तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि म्हणतात. ( व जेथें समासांतील अवयव विशेष्यांत अन्वित नसतात त्याला अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि म्हणतात. )

**यत्र समवायसंबन्धेन संबन्ध्यन्यपदार्थस्तत्र प्रायस्तद्गुणसंविज्ञानम् । अन्यत्र प्रायोऽन्यत् ॥ लम्बकर्णचित्रगू उदाहरणे । सर्वादीनि जक्षित्यादय इति चोदाहरणे । सर्वनामसंज्ञासूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ ७८ ॥**

( या पंक्तींतील ' समवाय ' हा शद्व संयोगाचें उपलक्षण आहे. म्हणून या पंक्तीचा अर्थ असा करावा कीं ) जेथें बहुव्रीहिसमासाचा विशेष्य जो अन्यपदार्थ व त्या समासाचे अवयव या दोहोंमध्यें समवायसंबंध किंवा संयोगसंबंध असतो तशा ठिकाणीं बहुव्रीहिसमास बहुधा तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि असतो. इतर स्थलीं–म्हणजे जेथें अन्यपदार्थ व बहुव्रीहिसमासाचे अवयव या दोहोंत समवायसंबंध किंवा संयोगसंबंध नसून इतर प्रकारचा संबंध असतो तशा ठिकाणीं–बहुव्रीहिसमास बहुधा अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि असतो. ( ' लम्बकर्णमानय ' या उदाहरणांत लांबकान्या पुरुषाचा त्याच्या कानांशीं समवायसंबंध आहे; म्हणून या स्थलीं तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहिसमास होतो, व जसा लांबकान्या पुरुषाचा आनयनक्रियेंत अन्वय होतो त्याचप्रमाणें त्याच्या कानांचाहि त्या क्रियेंत अन्वय होतो–म्हणजे लांबकान्या पुरुष त्याच्या कानासह आणला जातो. त्याचे कान त्याचे ठिकाणीं समवायसंबंधानें अन्वित असल्यामुळें त्याला त्याच्या

कानांशिवाय आणणें शक्य नाहीं. ' लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्ति ' या उदाहरणांत ऋत्विजांचा त्यांच्या लाल पागोट्यांशीं संयोगसंबंध आहे. म्हणून येथें देखील जसा ऋत्विजांचा प्रचरणक्रियेंत अन्वय होतो तसाच त्यांच्या लाल पागोट्यांचा देखील त्या क्रियेंत अन्वय होतो, व त्या वाक्याचा अर्थ असा होतो कीं ऋत्विज लाल पागोटें घालून यज्ञमंडपांत संचार करितात. परंतु वरील पंक्तींत ' प्रायः ' असा शब्द वापरला असल्यामुळें, कोठें कोठें अन्यपदार्थ व समासांतील अवयवांत संयोग किंवा समवाय-संबंध असून देखील अवयवांचें ग्रहण होत नाहीं व अशा ठिकाणीं अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि होतो. जसें ' लम्बकर्णो भोज्यताम् ' किंवा ' चित्रवासा भोज्यताम् ' या उदाहरणांपैकीं प्रथम उदाहरणांत समवायसंबंध व द्वितीय उदाहरणांत संयोगसंबंध आहे तरी, कानांना किंवा कपड्यांना जेवूं घालणें अशक्य असल्यामुळें, अशा ठिकाणीं केवळ अन्यपदार्थांचाच भोजनक्रियेंत अन्वय होतो व समासांतील अवयवांचा भोजनक्रियेंत अन्वय होत नाहीं ' चित्रगुमानय ' या उदाहरणांत रंगीबेरंगी गाईंचा त्यांच्या मालकाशीं जो संबंध आहे तो संयोग किंवा समवायसंबंध नसून स्वस्वामिभावसंबंध आहे. म्हणून या स्थलीं अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि होतो व आनयनक्रियेंत गाईंचा अन्वय न होतां, विशेष्यरूपी अन्यपदार्थांचाच–म्हणजे गाईंच्या मालकाचाच–अन्वय होतो. तथापि ' अन्यत्र प्रायोऽन्यत् ' या पंक्तींत देखील ' प्रायः ' हा शब्द घातला असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, कोठें कोठें बहुव्रीहिसमासाच्या अवयवांत व अन्यपदार्थांत संयोग किंवा समवायसंबंध नसून देखील तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि होतो. जसें ' तरुणवत्सां गां ददाति ' येथें गाईचा तरुणवत्साशीं जन्यजनकभावसंबंध आहे. तरी पण येथें तद्गुण-संविज्ञानबहुव्रीहि होतो व जसा गायीचा दानक्रियेंत अन्वय होतो तसाच तिच्या तरुण वासराचाहि दानक्रियेंत अन्वय होतो. सारांश वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, कोठें तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि करावा व कोठें अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि करावा हें संदर्भावरूनच निश्चित करतां येते. ) लंबकर्ण व चित्रगु हीं अनुक्रमें तद्गुणसंविज्ञान व अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहीचीं लौकिक उदाहरणें होत. ' सर्वादीनि सर्वनामानि ' व ' जक्षित्यादयः षट् ' हीं अनुक्रमें तद्गुणसंविज्ञान व अतद्गुणसंविज्ञान बहुव्रीहिसमासाचीं शास्त्रीय उदाहरणें आहेत. ( ' सर्वादीनि सर्वनामानि ' सू० २१३ ह्या सूत्रांतील ' सर्वादीनि ' हा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि आहे; कारण सर्वनामसंज्ञा ' सर्व ' शब्दाला देखील लागते असा सूत्रार्थ आहे. पण ' जक्षित्यादयः षट् ' सू० ४२८ ह्या स्थलीं, ' जक्षित्यादयः ' हा अतद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि आहे. कारण ' षट् ' ह्या अन्यपदार्थांत 'जक्ष्' धातु समाविष्ट नसून ' षट् धातवोऽन्ये, जक्षितिश्च सप्तमः एते अभ्यस्तसंज्ञाः स्युः' असा सूत्रार्थ आहे. ) सर्वनामसंज्ञाविधायकसूत्रावरील ( १-१-२७ ) भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा ७९

**ननु वदःसुपि क्यप् चेति चेनानुकृष्टस्य यतो भुवो भावे इत्यत्राप्यनुवृत्तिः स्यादत आह—**

' वदः सुपि क्यप् च ' सू० २८५४ ह्या सूत्रांत चकारानें अनुकृष्ट केलेल्या (ओढून जवळ आणलेल्या) 'यत्' ह्या प्रत्ययाची 'भुवो भावे'या उत्तरसूत्रांत अनुवृत्ति होण्याचा प्रसङ्ग येतो. ('अचो यत्' सू. २८४२ ह्या सूत्रांतून, 'यत्' हा प्रत्यय, 'वदः सुपि क्यप् च ' सू० २८५४ ह्या सूत्रांत, चकारानें अनुकृष्ट केला आहे. त्यामुळें ' वद् ' धातूला ' क्यप् ' व ' यत् ' प्रत्यय होतात असा सूत्रार्थ होतो. ' भुवो-भावे' सू० २८५५ हें सूत्र 'वदः सुपि क्यप् च' ह्या सूत्राच्या लगेच पुढचें सूत्र आहे. ह्या सूत्रांत ' वदः सुपि क्यप् च ' ह्या सूत्रांतून जशी ' क्यप् ' ची अनुवृत्ति होते तशीच, पूर्वसूत्रांत चकारानें अनुकृष्ट केलेल्या ' यत् ' प्रत्ययाची देखील अनुवृत्ति होण्याची आपत्ति येते, तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## चानुकृष्टं नोत्तरत्र ॥ ७९ ॥

" पूर्वसूत्रांतून उत्तरसूत्रांत चकारानें अनुकृष्ट केलेल्या पदाची अनुवृत्ति, त्या उत्तरसूत्राच्या पुढील सूत्रांत, होत नाहीं "

( ही परिभाषा असल्यामुळें ' भुवो भावे ' ह्या सूत्रांत ' यत् ' प्रत्ययाची अनुवृत्ति होत नाहीं. )

**णमुल्यनुवर्तमानेऽव्ययेऽयथाभिप्रेतेति सूत्रे पुनर्णमुल्ग्रहणमस्या ज्ञापकम् । अन्यथा क्त्वा चेति वदेत् । तद्धि उत्तरत्रोभयोः सम्बन्धार्थम् ।**

' स्वादुमि णमुल् ' सू० ३३४७ ह्या पूर्वसूत्रांतून ' अव्ययेऽयथाभिप्रेताख्याने कृञः क्त्वाणमुलौ ' सू० ३३८१ ह्या उत्तरसूत्रांत ' णमुल् ' ची अनुवृत्ति होत असून देखील, त्या उत्तरसूत्रांत पुन्हा 'णमुल्' चें ग्रहण केलें आहे, तें ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. ही परिभाषा नसती तर, ' क्त्वा च ' असें म्हटलें असतें. ( पण ' क्त्वा च ' असें म्हटलें असतें तर, ही परिभाषा असल्यामुळें, ' तिर्यच्यपवर्गे ' सू० ३३८२ ह्या उत्तरसूत्रांत ' णमुल् ' ची अनुवृत्ति झाली नसती, केवळ क्त्वाची अनुवृत्ति झाली असती ) दोहोंचीहि—म्हणजे ' क्त्वा ' व ' णमुल् ' ह्यांची ' तिर्यच्यपवर्गे ' ह्या उत्तरसूत्रांत अनुवृत्ति व्हावी म्हणून, ' क्त्वाणमुलौ ' असें म्हटलें आहे; आणि ' णमुल्' चें पुन्हा ग्रहण केलें आहे. ( व अशा रीतीनें केलेलें ' णमुल्' चें ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**उदाहरणानि स्फुटानि । इदमनित्यम् । अत एव तृतीया च होरित्यत्र चानुकृष्टाया अपि द्वितीयाया अन्तरान्तरेणेत्यत्र सम्बन्धः ।**

ह्या परिभाषेचीं वाटेल तेवढीं उदाहरणें ( अष्टाध्यायींत ) सांपडतात. ही परिभाषा अनित्य आहे, आणि म्हणूनच, (' कर्मणि द्वितीया ' सू० ५३७ ह्या सूत्रांतून ) 'तृतीया च होश्छन्दसि ' सू० ३३९४ ह्या सूत्रांत ' द्वितीया ' हें पद चकारानें अनुकृष्ट झालेलें असून देखील ' अन्तरान्तरेण युक्ते ' सू० ५४५ ह्या उत्तरसूत्रांत अनुवृत्त झालें आहे. ( ही परिभाषा नित्य असती तर चकारानें अनुकृष्ट केलेलें ' द्वितीया ' हें पद उत्तरसूत्रांत अनुवृत्त व्हावयास नको होतें. )

लुटि च क्लृप इति सूत्रस्थेनानुवृत्त्यर्थकसकलचकारप्रत्याख्यानेन विरुद्धेयम् । व्याख्यानादेवानुवृत्तिनिवृत्त्योर्निर्वाह इति तदाशयः ॥ कुलिजाल्लुक्खौ चेति सूत्रस्थभाष्यविरुद्धा च । तत्र हि द्विगोः ष्ठंश्चेति सूत्रात् ष्ठनस्तत्र चेनाप्यनुकृष्टस्य खोऽन्यतरस्यामित्यस्य चानुवृत्तिं स्वीकृत्य लुक्खौ चेति भाष्ये प्रत्याख्यातम् ॥ ७९ ॥

लुटि च क्लृपः'–१-३-९३ ह्या सूत्रावरील भाष्यांत (पूर्वसूत्रांतून उत्तरसूत्रांत) अनवृत्ति व्हावी ह्या हेतूनें ठिकठिकाणीं सूत्रांत वापरलेल्या सर्व ' च ' शब्दांचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें आहे. त्यामुळें ही परिभाषा भाष्यविरुद्ध ठरते. त्या भाष्याचा आशय हा आहे कीं, ( पूर्वसूत्रांतून उत्तरसूत्रांत पदाची ) अनुवृत्ति करावी किंवा अनुवृत्ति न करितां निवृत्ति करावी हें व्याख्यानावरूनच ठरवावें. (ही परिभाषा अनित्य मानली असल्यामुळें ती कोणत्या सूत्रांच्या विषयांत नित्य मानावी व कोणत्या सूत्रांच्या विषयांत अनित्य मानावी ही अडचण सदैव उपस्थित होणार, व त्या अडचणीचें निवारण करण्याकरितां, अखेरीस व्याख्यानाचाच आश्रय केला पाहिजे. म्हणून ही परिभाषा असण्याची कांहींच गरज नाहीं, व ' स्वरितेनाधिकः कारः ' या भाष्यसिद्धान्तान्वयें, ज्याची अनुवृत्ति करणें आहे तें पद स्वरित केल्यावर सर्व अडचणी दूर होतात. असें केल्यानें पाणिनीय सूत्रांत असलेला चकार व्यर्थ ठरल हें खरें आहे. पण तो केवळ अदृष्टार्थप्रयोजनक आहे असें मानावें. ) त्याचप्रमाणें 'कुलिजाल्लुक्खौच' ५-१-५५ ह्या सूत्रावरील भाष्याच्याहि विरुद्ध ही परिभाषा आहे. कारण त्या सूत्रांत ' द्विगोः ष्ठंश्च ' सू० १७२० ह्या पूर्वसूत्रांतून ' ष्ठन् ' ची अनुवृत्ति भाष्यकारांनीं केली आहे, व तसेंच ' द्विगोः ष्ठंश्च ' ह्या सूत्रांतील चकारानें ' आढकाचितपात्रात्खोऽन्यतरस्याम् ' सू० १७१९ ह्या पूर्वसूत्रांतून अनुकृष्ट केलेल्या ' खोऽन्यतरस्याम् ' ह्या पदाची देखील अनुवृत्ति ' कुलिजात् लुक् खौ च ' सू० १७२१ ह्या सूत्रांत केली आहे. ( व अशा तऱ्हेनें ' ष्ठन् ' व ' खोऽन्यतरस्याम् ' ह्या दोहोंचीहि अनुवृत्ति ' कुलिजात् लुक्खौ च ' ह्या सूत्रांत करून, त्या सूत्रांत असलेल्या ) ' लुक्खौ च ' ह्या शब्दांचें प्रत्याख्यान केलें आहे.—( म्हणजे ' कुलिजात्' एवढेंच सूत्र पुरें आहे असें भाष्यकारांनी म्हटलें आहे. ही परिभाषा भाष्यकारास मान्य

असती तर त्यांनीं असें केलें नसतें. सारांश, प्रकृतपरिभाषा, भाष्यविरुद्ध असल्यामुळें, स्वीकारार्ह नाहीं.)

---

## परिभाषा ८०

**नन्वनुदात्तादेरन्तोदात्ताच्च यदुच्यते तद्व्यञ्जनादेर्व्यञ्जनान्ताच्च न प्राप्नोतीत्यत आह—**

अनुदात्तादि किंवा अन्तोदात्त शब्दानंतर कांहीं कार्य करणें सूत्रांत सांगितलें असल्यास, जेथें व्यञ्जनादि किंवा व्यञ्जनान्त शब्द असेल तेथें, सूत्रांत सांगितलेलें कार्य होऊं नये असा प्रसङ्ग येईल (तो न यावा) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

### स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत् ॥ ८० ॥

" जेथें सूत्रांत स्वराला उद्देशून कांहीं कार्य सांगितलें असेल तशा ठिकाणीं व्यञ्जन नाहींच असें समजावें. "

**स्वरोद्देश्यके विधावित्यर्थः ॥ नोत्तरपदेऽनुदात्तादावपृथिवीरुद्रपूषमन्थिष्विति सूत्रे पृथिव्यादिपर्युदासोऽस्या ज्ञापकः । अन्यथा पृथिव्यादीनामनुदात्तादित्वाभावादप्राप्तौ तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ॥ धर्मिग्राहकमानादेव च स्वरोद्देश्यकविधिविषयमिदम् ।**

'ज्या सूत्रांत स्वराला उद्देशून कांहीं कार्य सांगितलें आहे तेथें' असा या परिभाषेतील 'स्वरविधौ' ह्या शब्दाचा अर्थ आहे. 'नोत्तरपदेऽनुदात्तादावपृथिवीरुद्रपूषमन्थिषु' सू० ३८७६ ह्या ('देवताद्वन्द्वांत, पृथिव्यादि शब्द खेरीज करून उत्तरपद अनुदात्तादि असल्यास दोन्ही पदांना प्रकृतिस्वर होत नाहीं' असा अर्थ सांगणाऱ्या) सूत्रांतील 'अपृथिवीरुद्रपूषमन्थिषु' हा पृथिव्यादि शब्दांचा पर्युदास ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे. (या पर्युदासांत निर्दिष्ट असलेलीं 'पृथिवी, रुद्र, पूषन्, मन्थिन्' हीं सर्व प्रातिपदिकें 'फिषोऽन्त उदात्तः' फिट् सू० १ या सूत्रान्वयें अन्तोदात्त असल्यामुळें, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू० ३६५० या सूत्रान्वयें अनुदात्तादि आहेत.) ही परिभाषा न मानल्यास, पृथिव्यादिकांचा पर्युदास व्यर्थ ठरेल; कारण पर्युदासांत असलेले 'पृथिवी' इत्यादि सर्व शब्द व्यञ्जनादि असल्यामुळें, अनुदात्तादि मानले जाऊं शकणारच नाहींत, व त्यामुळें 'नोत्तरपदे' हें सूत्र तशा स्थलीं लागूच पडणार नाहीं. (पण पर्युदास सांगितला असल्यामुळें, हें स्पष्ट होतें कीं, स्वरविधींत व्यञ्जन नाहीं असें समजलें पाहिजे, व अशा रीतीनें हा पर्युदास ह्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो.) ह्या परिभाषेचा ज्ञापक जो पर्युदास वर सांगितला आहे त्यावरून हें देखील सिद्ध होतें

कीं, ही परिभाषा स्वराला उद्देशून ज्या सूत्रांत कांहीं कार्य सांगितलें आहे तशाच सूत्रांना लागू पडते. ( केवळ स्वरविधायक—म्हणजे अमुक स्वर व्हावा एवढेंच सांगणारें—सूत्र असल्यास, तशा सूत्राला ही परिभाषा लागत नाहीं. )

अत एव शतुरनुमो नद्यजादी अचः कर्तृयकीत्यादावजादी अच इत्यादेश्चारितार्थ्यम् ।

( स्वराला उद्देशून जेथें कार्य सांगितलें आहे तेथेंच ही परिभाषा लागू पडते असा नियम आहे, ) म्हणूनच, 'शतुरनुमो नद्यजादी' सू० ३७१९ व 'अचः कर्तृयकि' सू० ३६७८ इत्यादि सूत्रांत 'अजादी' व 'अचः' हे शब्द चरितार्थ ठरतात. ( 'शतुरनुमो नद्यजादी' व 'अचः कर्तृयकि' हीं दोन्हीं सूत्रें केवळ स्वरविधायक सूत्रें आहेत. स्वराला उद्देशून—म्हणजे उद्देश्यकोटींत स्वराचा अनुवाद करून—कार्य सांगाणारीं हीं सूत्रें नाहींत. त्यामुळें ह्या सूत्रांना ही परिभाषा लागू पडत नाहीं; आणि म्हणूनच, 'अजादि' व 'अचः' हे शब्द पाणिनीला मुद्दाम वरील सूत्रांत घालावे लागले; व ते शब्द घातले असल्यामुळें, असा अर्थ होतो कीं, अजादि 'शस्' विभक्तीला उदात्त स्वर होतो, व तसेंच अजन्त धातूपुढें 'कर्तरि यक्' प्रत्यय असल्यास, त्या धातूला आद्युदात्त स्वर होतो. अशा केवळ स्वरविधायक सूत्रांना ही परिभाषा लागू पडली असती तर 'अजादि' 'अचः' हे शब्द सूत्रांत घालण्याचें कांहींच कारण नव्हतें; कारण, ह्या परिभाषेप्रमाणें 'व्यञ्जनमविद्यमानवत्' असें मानल्यास, प्रत्येक विभक्तिप्रत्यय अजादि व प्रत्येक धातु अजन्त मानली गेली असती. तसें न व्हावें म्हणून ही परिभाषा केवळ स्वरविधायक सूत्रांस लाविली जात नाहीं, व त्यामुळें 'अजादी' व 'अचः' हे शब्द चरितार्थ ठरतात. )

अत एव राजवतीत्यादौ नलोपस्यासिद्धत्वादन्वतीशब्दत्वादन्तोऽवत्या इति स्वरो न उदश्वित्वानित्यत्र ह्रस्वनुड्भ्यामिति मतुबुदात्तत्वं च नेत्याकरः ॥

( केवळ स्वरविधायक सूत्रांस ही परिभाषा लागत नाहीं ) म्हणूनच, भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, 'राजवती' इत्यादि स्थलीं, ( 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू० २३४ ह्या असिद्धकाण्डांतील सूत्रानें होणारा ) नलोप असिद्ध असल्यामुळें, 'राजवती' हा शब्द 'अवत्यन्त' समजतां येत नाहीं, व त्यामुळें 'अन्तोऽवत्याः' सू० ३७०६ ह्या सूत्रानें होणारा अन्तोदात्त स्वर त्या शब्दास होत नाहीं. ( 'अन्तोऽवत्याः' हें केवळ स्वरविधायक सूत्र आहे. त्या सूत्रास जर ही परिभाषा लागू पडली असती तर, 'राजवती' ह्यांतील 'न्' लोप जरी असिद्ध आहे व तो झालाच नाहीं असें मानलें पाहिजे तरी, ह्या परिभाषेप्रमाणें, 'न्' हें व्यञ्जन 'राजवती' ह्या शब्दांत नाहींच असें समजून, 'राजवती' हा शब्द अवत्यन्त शब्द आहे असें मानतां आलें असतें, व 'अन्तोऽवत्याः' ह्या सूत्रान्वयें अन्तोदात्त स्वर प्राप्त झाला असता.) तसेंच भाष्यांत

असेंहि सांगितलें आहे कीं, ' उदश्वित्वान् ' ह्या स्थलीं, ' ऱ्हस्वनुड्भ्यां मतुप् ' सू० ३७२२ ह्या सूत्रान्वयें, मतुपाला उदात्त स्वर होत नाहीं, ( ' ऱ्हस्वनुड्भ्यां मतुप् ' हें केवळ स्वरविधायक सूत्र असल्यामुळें, त्याला ही परिभाषा लागत नाहीं. त्यामुळें, ' उदश्वित् ' येथील अन्त्य तकार नाहीं व ऱ्हस्वान्तानंतर ' मतुप् ' आहे असें मानतां येत नाहीं, व मतुपाला उदात्त स्वर करितां येत नाहीं; आणि ' अनुदात्तौ सुप्पितौ ' सू० ३७०९ ह्या सूत्रान्वयें असणारें त्याचें अनुदात्तत्व कायम राहतें )

स्पष्टं चेदं समासस्येति सूत्रे भाष्ये ॥ उच्चैरुदात्त इति सूत्रे कैयटस्त्वियमनावश्यकी समभिव्याहृताज्नुपरागेण हलोऽप्युदात्तादिवद्वभासात्तदुपपत्तेरित्याह । तत्र भाष्येऽपि ध्वनितमेतत् ॥ ८० ॥

वर जें सांगितलें आहे तें सर्व ' समासस्य ' ६-१-२२३ ह्या सुत्रावरील भाष्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे. परंतु ' उच्चैरुदात्तः ' १-२-२९ ह्या सुत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें म्हटलें आहे कीं, ही परिभाषा मानण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण व्यञ्जनाबरोबर जो अच् उच्चारला जातो त्या अचाच्या स्वरानें तें व्यञ्जन ( जपाकुसुमाजवळ ठेवलेला स्फटिक जसा उपरक्त होतो त्याप्रमाणें ) उपरक्त होत असल्यामुळें, उपपत्ति लागते. ( म्हणजे त्या व्यञ्जनाचे ठिकाणीं देखील तो स्वर भासमान होत असल्यामुळें, अनुदात्तादि, अन्तोदात्त ह्या संज्ञा हलादि हलन्त शब्दांस देखील लागू पडतात, व अशा रीतीनें ही परिभाषा नसून देखील काम भागतें ) त्या सूत्रावरील भाष्यांत देखील हें ध्वनित केलें आहे.

---

## परिभाषा ८१

नन्वेवमपि राजदृषदित्यादौ समासस्येत्यन्तोदात्तत्वं षकाराकारस्य न स्यादत आह—

मागील परिभाषा स्वीकारली तरी, ' राजदृषद् ' इत्यादि स्थलीं, ' समासस्य ' सू० ३७३४ ह्या सूत्रान्वयें 'ष' ह्यांतील अकाराला अन्तोदात्तत्वाची प्राप्ति होऊं शकणार नाहीं. ( ' समासस्य अन्तः उदात्तः स्यात् ' असा ' समासस्य ' ह्या सूत्राचा अर्थ आहे. ' राज्ञः दृषद् राजदृषद्' ह्या तत्पुरुष समासांत, ' द् ' हा अन्त्यवर्ण असल्यामुळें तो उदात्त होईल. ' द् ' च्या लगेंच मागें असलेल्या ' ष ' तील अकार अन्त्यवर्ण नसल्यामुळें, तो उदात्त होऊं शकणार नाहीं. तसें न व्हावें, ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत् ॥ ८१ ॥

" व्यञ्जनाला स्वराची प्राप्ति झाली असतां, तें व्यञ्जन नाहींच असें समजावें."

( व्यञ्जनाला प्राप्त झालेला स्वर त्याच्या लगेच पूर्वीं किंवा पुढें असणाऱ्या अचास होतो. ही परिभाषा असल्यामुळें, दकार उदात्त न होतां, त्याच्या पूर्वीं असलेल्या 'ध' मधील 'अ' उदात्त होतो. )

**अस्याश्च यतोऽनाव इति सूत्रेऽनौप्रतिषेधो ज्ञापकः । नाव्यमित्यत्रादिर्नकारो न स्वरयोग्यो यश्चाकारस्तद्योग्यो नासावादिरिति स प्रतिषेधोऽनर्थकः ॥ न चादिरेव नकार उदात्तगुणविशिष्टान्तरतमाज्रूपोऽस्त्विति वाच्यम् । तथा सति निमित्तभूतद्व्यचकत्वस्य विनाशादुपजीव्यविरोधेनाद्युदात्तत्वाप्राप्तेरित्यन्यत्र विस्तरः ॥ स्पष्टा चेयं समासस्येति सूत्रे भाष्ये ॥ ८१ ॥**

' यतोऽनावः ' सू० ३७०१ ह्या सूत्रांतील ' अनावः ' हा प्रतिषेध ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे. ( ' नौ ' शब्दाचें ' यत् ' प्रत्ययान्त रूप खेरीज करून, इतर ' यत् ' प्रत्ययान्त द्व्यचक शब्दाचा आदि उदात्त होतो असा 'यतोऽनावः' ह्या सूत्राचा अर्थ आहे. ' नाव्यम् ' हा शब्द ' यत् ' प्रत्ययान्त आहे. ' तार्यम् ' ह्या अर्थात, 'नौ' शब्दाला ' नौवयोधर्म ' सू० १६४३ ह्या सूत्रानें ' यत् ' प्रत्यय होतो, व ' वान्तो यि प्रत्यये ' सू० ६३ ह्या सूत्रानें, ' औ ' चें जागीं ' आव् ' असा आदेश होऊन ' नावा तार्यम् नाव्यम् ' असें द्व्यचक ' यत् ' प्रत्ययान्त रूप होतें. ' अनावः ' असा प्रतिषेध असल्यामुळें, ' नाव्यम् ' ह्यांतील आद्यच् उदात्त होत नाहीं. हा प्रतिषेध ह्या परिभाषेचा ज्ञापक कसा आहे हें आतां ग्रन्थकार सांगतात. ) ' नाव्यम् ' ह्यांत आदिवर्ण ' न् ' आहे. तो हल् असल्यामुळें, स्वर पावण्यालायक नाहीं. त्यापुढील आकार स्वर पावण्यालायक आहे. पण तो आदिवर्ण नाहीं. ( त्यामुळें त्याला उदात्त स्वराची प्राप्तिच नाहीं. ) म्हणून ' अनावः ' हा प्रतिषेध व्यर्थ ठरतो. ( परंतु ही परिभाषा असल्यामुळें तो चरितार्थ ठरतो. ह्या परिभाषेच्या अन्वयें, ' नाव्यम् ' येथील आकाराला उदात्त स्वर झाला असता; तो न व्हावा म्हणून, ' अनावः ' हा प्रतिषेध सूत्रांत केला आहे, व अशा रीतीनें तो ह्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. आतां, शंकाकार अशी शंका उपस्थित करतो कीं, ' अनावः' हा प्रतिषेध, इतर रीतीनें चरितार्थ ठरत असल्यामुळें, ह्या परिभाषेचा ज्ञापक मानतां येत नाहीं; व त्या प्रतिषेधाची इतर रीतीनें सार्थकता दाखविण्याच्या हेतूनें शंकाकार असें म्हणतो कीं, सूत्रांत 'अनावः' असा प्रतिषेध जर नसता व ' यतः ' एवढेंच सूत्र केलें असतें तर, त्या सूत्रानें ' नाव्य ' येथील ) आदि नकाराचे जागीं स्थानसाम्यानें अत्यन्त सदृश अशा उदात्तस्वरयुक्त अज्रूपी ऌकार या वर्णान्तराचा आदेश करण्याची आपत्ति आली असती. ( कारण 'ऌतुलसानां दन्ताः' ह्यानें ऌकार व तवर्ग ह्यांचें स्थानसाम्य सांगितलें आहे. ती आपत्ति टाळण्याकरितां 'अनावः' हा प्रतिषेध केला आहे आणि तो अशा रीतीनें चरितार्थ ठरत असल्यामुळें, ह्या परिभाषेचा ज्ञापक मानतां येत नाहीं, असें शंकाकाराचें म्हणणें आहे. पण ) हें म्हणणें बरो-

बर नाहीं. कारण नकाराचें जागीं ' ल ' असा आदेश केल्यास उदात्तस्वर होण्याचें निमित्त जें द्व्यचकत्व त्याचा नाश होईल व ' उपजीव्यविरोधस्यायुक्तत्वम् ' या न्याया-न्वयें उदात्तस्वराची प्राप्तीच होणार आहे ( कारण ' न् ' चें जागीं ' ल ' असा आदेश केल्यास, ' नाव्य ' हा द्व्यच्क शब्द त्र्यच्क होणार व आद्युदात्तस्वर प्राप्तीचें द्व्यच्करूपी निमित्त अशा रीतीनें नष्ट झाल्यामुळें, ' नाव्य ' ह्या स्थलीं आद्युदात्त स्वराची प्राप्तीच होणार नाहीं. म्हणून प्रतिषेध व्यर्थ ठरणार; पण ही परिभाषा असल्यामुळें, तो चरितार्थ ठरतो. आतां, कोणी असें म्हणेल कीं, ' तीन ' ह्या संख्येत ' दोन ' ही संख्या अंतर्भूत असल्यामुळें, ' नाव्य ' हा शब्द त्र्यच्क झाला तरी, तो द्व्यच्क मानतां येतो. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ' उत्तरा संख्या पूर्वां संख्यां बाधते ' असा न्याय आहे. ज्याला तीन मुलगे आहेत त्याला दोन मुलगे आहेत असें ज्याप्रमाणें म्हणतां येत नाहीं त्याचप्रमाणें, त्र्यच्क शब्दाला द्व्यच्क म्हणतां येत नाहीं, ) ह्या संम्बधानें इतर ग्रन्थांत विस्तृत विवेचन केलें आहे. 'समासस्य'–६–१–२२३ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे.

---

## परिभाषा ८२ व ८३

**ननु पूरणगुणेति निषेधस्तव्यत्यपि स्यात्। दिव औदित्यौत्वं दिवेः क्विप्यपि स्यात्। तथा यतोऽनाव इति स्वरो ण्यत्यपि स्यात्। ऋदृशोऽङि गुण इति चङ्यपि स्यादत आह—**

' पूरणगुणसुहितार्थसदव्ययतव्यसमानाधिकरणेन ' सू० ७०५ ह्या सूत्रांत ' तव्य ' प्रत्ययान्त शब्दाचा षष्ठीशीं समास होत नाहीं, असा जो निषेध सांगितला आहे तो ' तव्यत् ' प्रत्ययास देखील लागेल; ( ' तव्यत् ' प्रत्ययान्त ' कर्तव्य ' शब्दाचा षष्ठीशीं ' स्वस्य कर्तव्यम् स्वकर्तव्यम् ' असा समास होणार नाहीं. ) व तसेंच ' दिव औत् ' सू० ३३६ ह्या सूत्रानें, ' सु ' प्रत्यय पुढें असतां, ' दिव् ' ह्या शब्दाच्या अन्त्यवर्णाचे–म्हणजे वकाराचे–जागीं होणारा ' औ ' हा आदेश, ' दिवु ' ह्या धातूस ' क्विप् ' प्रत्यय लागून होणाऱ्या ' दिव् ' शब्दाच्या अन्त्यवर्णाचे जागीं देखील होईल; आणि त्याचप्रमाणें ' यतोऽनावः ' सू० ३७०१ ह्या सूत्रानें द्व्यच्क ' यत् ' प्रत्ययान्त शब्दास होणारा आद्युदात्त स्वर ' ण्यत् ' प्रत्ययान्त द्व्यच्क शब्दाला देखील होईल; तसेंच ' ऋदृशोऽङि गुणः ' सू० २४०६ ह्या सूत्रानें, ' अङ् ' प्रत्यय पुढें असतां, होणारा गुण, ' चङ् ' प्रत्यय पुढें आल्यास देखील, होईल. ( तसें न व्हावें ) म्हणून ह्या दोन परिभाषा सांगतातः—

**निरनुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य ॥ ८२ ॥**

**तदनुबन्धकग्रहणे नातदनुबन्धकस्य ॥ ८३ ॥**

( प. नं ८२ ):—" सूत्रांत अनुबन्धरहित शब्द उच्चारला असल्यास, त्यानें अनुबन्धसहित त्या शब्दाचें ग्रहण होत नाहीं. "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' तव्य ' ह्या अनुबन्धरहित प्रत्ययानें ' तव्यत् ' ह्या अनुबन्धसहित प्रत्ययाचें ग्रहण करितां येत नाहीं; ' तव्यत् ' येथें ' त् ' हा अनुबन्ध ' तित् ' स्वर होण्याकरितां लावला आहे हें लक्षांत ठेवावें. तसेंच ' दिव औत् ' येथें ' दिव् ' हें अव्युत्पन्न प्रातिपदिक असून त्याचा अर्थ ' स्वर्ग ' असा आहे. हा शब्द अनुबन्धरहित आहे. पण ' दिवु ' हा धातु उकारानुबन्धसहित आहे, व तो अनुबन्ध ' उदितो वा ' सू० ३३२८ ह्या सूत्रान्वयें, ' क्त्वा ' प्रत्यय पुढें असतां, विकल्पें-करून इडागम होण्याकरितां लावला आहे. म्हणून ' दिव् ' ह्या अनुबन्धरहित शब्दानें अनुबन्धसहित ' दिवु ' धातूच्या ' क्विप् ' प्रत्ययान्त ' दिव् ' ह्या रूपाचें, ही परिभाषा असल्यामुळें, ग्रहण होऊं शकत नाहीं. त्यामुळें ' अक्ष+दिव्+क्विप्+सु ' ह्या स्थलीं, ' च्छ्वोः शूठ् ' सू० २५६१ ह्या सूत्रानें ऊठ् होऊन, ' अक्षद्यूः ' असें रूप होतें; ' दिव औत् ' ह्या सूत्रानें वकाराचे जागीं ' औ ' असा आदेश होत नाहीं, व ' अक्षद्यौः ' असें रूप होत नाहीं )

( प. नं ८३ ):—" सूत्रांत एखादा शब्द विशिष्ट अनुबन्ध लावून उच्चारला असल्यास, तशा शब्दानें, तो अनुबन्ध व त्या बरोबर इतर अनुबन्ध लावून उच्चारलेल्या शब्दाचें ग्रहण होत नाहीं. "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' यत् ' प्रत्ययानें ' ण्यत् ' प्रत्ययाचें, व तसेंच ' अङ् ' प्रत्ययानें ' चङ् ' प्रत्ययाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. ' यत् ' प्रत्ययांत ' त् ' हा अनुबन्ध आहे. ' ण्यत् ' प्रत्ययांत ' त् ' हा अनुबन्ध असून, ' ण् ' देखील दुसरा अनुबन्ध आहे. तसेंच अङ् प्रत्ययांत ' ङ् ' हा अनुबन्ध आहे; पण ' चङ् ' प्रत्ययांत ' ङ् ' हा अनुबन्ध असून, ' च् ' देखील दुसरा अनुबन्ध आहे. )

**वामदेवाड्ड्यड्ड्याविति सूत्रे ड्यड्यतोर्ङित्वमनयोर्ज्ञापकम् । तद्धि ययतोश्चातदर्थ इत्यत्र तयोरग्रहणार्थम् ॥ नञःपरस्य ययदन्तस्योत्तरपदस्यान्त उदात्त इति तदर्थः । एवं चावामदेव्येऽव्ययपूर्वपदप्रकृतिस्वर एव भवति ॥**

' वामदेवात् ड्यत् ड्यौ ' सू० १२१० ह्या सूत्रांत सांगितलेले ' ड्यत् ' व ' ड्य ' हे प्रत्यय ङित् केले आहेत. त्यांचे हें ङित्वकरण ह्या दोन्ही परिभाषांचें ज्ञापक आहे. हे प्रत्यय ङित् केले आहेत ह्याचें कारण हें कीं, ' ययतोश्चातदर्थे ' सू० ३७९० ह्या सूत्रांत सांगितलेल्या ' य ' व ' यत् ' प्रत्ययांनीं त्यांचें ग्रहण होऊं नये. ' ययतोश्चातदर्थे ' ह्या सूत्राचा अर्थ असा आहे कीं, नञाच्या पुढें असलेल्या ' य ' प्रत्ययान्त व ' यत् ' प्रत्ययान्त उत्तरपदाचा अन्त्य स्वर उदात्त होतो. 'ड्य' व ' ड्यत् ' हे प्रत्यय ङित् केले असल्यामुळें, ('वामदेवेन दृष्टम् वामदेव्यम्, न वाम-

देव्यम् अवामदेव्यम् ' ह्या नञ् समासांतील ड्य प्रत्ययान्त ' वामदेव्य ' ह्या उत्तरपदांतील अन्त्यस्वर उदात्त न होतां, ' तत्पुरुषे तुल्यार्थतृतीया ' सू० ३७३६ या सूत्रानें, ) ' अवामदेव्य ' ह्या स्थलीं अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वरच होतो. ( —म्हणजे ' नञ् = अ ' हा आद्यच् उदात्त होतो. ह्या परिभाषा जर नसत्या तर, ' अवामदेव्य' ह्या स्थलीं, 'ययतोश्चातदर्थे' हें सूत्र लागून अन्तोदात्त स्वर झाला असता. तो न व्हावा म्हणून, ङित्करण केलें आहे. वरील अर्थाचा श्लोक भाष्यांत दिला आहेः—

' सिद्धे यस्येति लोपेन किमर्थं ययतौ ङितौ ।
ग्रहणं मा तदर्थे भूद्वामदेव्यस्य नञ्स्वरे ' ॥

ह्या श्लोकाचा अर्थ असा आहे कीं, वामदेव शद्बाहून ' य ' ' यत् ' प्रत्यय केला तरी, ' यस्येति च ' सू० ३११ ह्या सूत्रानें अकाराचा लोप होऊन 'वामदेव्य' असें रूप सिद्ध होतेंच. मग पाणिनीनें हे प्रत्यय सू० १२१० मध्यें ङित् कां केले आहेत ? त्याचें कारण हें कीं, ' ययतोश्चातदर्थे ' ह्या सूत्रांतील ' य ' व ' यत् ' प्रत्ययांनीं त्यांचें ग्रहण न व्हावें व अन्तोदात्त स्वर न होतां, आद्युदात्त व्हावा. )

**तन्मात्रानुबन्धकग्रहणे स चान्यश्चानुबन्धो यस्य तद्ग्रहणं नेत्यन्त्यार्थः ॥**

प० नं० ८३ चा अर्थ असा आहे कीं, सूत्रांत एक किंवा अधिक अनुबन्धांनीं युक्त असा शद्ब उच्चारला असल्यास, त्या शद्बानें, त्या शद्बांत असलेल्या अनुबन्धांनीं युक्त असून शिवाय इतर अनुबन्धांनीं युक्त असणाऱ्या शद्बाचें, ग्रहण होत नाहीं.

**एते च प्रत्ययाप्रत्ययसाधारणे, दिव औदित्यादौ संचारितत्वात् ।**

ह्या दोन्ही परिभाषा प्रत्ययांना व तसेंच अप्रत्ययांना देखील लागू पडतात; कारण भाष्यकारांनीं ' दिव औत् ' सू० ३३६ ह्या सूत्राचें ठिकाणीं त्यांचा उपयोग केला आहे. ( अनुबन्धरहित ' दिव् ' हें प्रातिपदिक व अनुबन्धसहित ' दिवु ' धातूस ' क्विप् ' प्रत्यय होऊन क्विप्प्रत्ययान्त ' दिव् ' हे दोन्ही प्रत्यय नसून देखील, भाष्यकारांनीं त्यांना प० ८२ लावली आहे, हें वर सांगितलेंच आहे. ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, अप्रत्ययांना देखील ह्या परिभाषा लागू पडतात. )

**वर्णग्रहणे चानयोरप्रवृत्तिरिति स्पष्टमौङ आप इत्यत्र भाष्ये ।**

जेथें सूत्रांत केवळ वर्णाचें ग्रहण केलें आहे तशा ठिकाणीं ह्या परिभाषा लागू पडत नाहींत असें ' औङ आपः ' ७-१-१८ ह्या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे. ' औङ् ' ह्यांतील ङकार अनुबन्ध नव्हे, व तो अनुबन्ध नसल्यामुळें, ' औङ् ' म्हणजे ' औ ' वर्ण असें समजावें. कैयटानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, ' औङ इति वर्णमात्रं निर्दिश्यते, ङकारस्त्वसंदेहार्थो नानुबन्धार्थः ' सारांश 'औङ आपः ' ह्या

सूत्रांत अशा रीतीनें केवळ वर्णग्रहण केलें असल्यामुळें, ' औ ' ह्या वर्णानें जसें प्रथमाद्विवचनाच्या प्रत्ययाचें ग्रहण होतें तसेंच द्वितीयाद्विवचनाच्या अनुबन्धसहित ' औट् ' प्रत्ययाचें देखील ग्रहण होतें. येथें हें सांगणें जरूर आहे कीं, कांहीं तरी कार्य व्हावें किंवा न व्हावें ह्या हेतूनें लावलेल्या इत्संज्ञक वर्णास ' अनुबन्ध ' असें म्हणतात. जसें-कित्येक प्रत्ययांना ' क् ' किंवा ' ङ् ' हा अनुबन्ध लावला असतो. तो अनुबन्ध ह्या हेतूनें लावला असतो कीं, तसे कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असल्यास 'सार्वधातुकार्धधातुकयोः' व 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१६८ व २१८९ या सूत्रांनीं प्राप्त होणारा गुण, ' क्ङिति च ' सू० २२१७ ह्या निषेधात्मक सूत्रान्वयें होऊं नये. तसेंच, कित्येक धातूंना धातुपाठांत ' इ ' हा अनुबन्ध लावला आहे. तो अशा करितां कीं, ' इदितो नुम् धातोः' सू० २२६२ ह्या सूत्रान्वयें, तशा धातूंना नुमागम व्हावा. ' औङ् ' ह्यांतील ङकार, कोणतेंहि कार्य होण्याकरितां किंवा कोणत्याहि कार्याचा निषेध होण्याकरितां लावला नसल्यामुळें, त्याला ' अनुबन्ध ' असें म्हणतां येत नाहीं. ' उपदेशे अन्त्यं हल् इत्संज्ञं स्यात् ' हें सांगणाऱ्या ' हलन्त्यम् ' सू० १ ह्या सूत्रान्वयें तो इत्संज्ञक वर्ण आहे. म्हणून ' औङ् ' शद्वानें केवळ ' औ ' ह्या वर्णाचें ग्रहण होतें. ' औङ् ' ही प्रथमेच्या व द्वितीयेच्या द्विवचनाच्या प्रत्ययांची पूर्वाचार्यांची संज्ञा आहे, व त्या संज्ञेचा उपयोग ' औङ आपः ' ह्या सूत्रांत पाणिनीनें केला आहे. )

**येनानुबन्धेन सानुबन्धकत्वं द्व्यनुबन्धकत्वादि वा तदनुच्चारणे एवैषा धर्मिग्राहकमानात्, तेन जश्शसोरित्यत्र नैषेति निरनुबन्धकत्वात्त द्धितशस एवात्र ग्रहणं स्यादिति न शङ्क्यम् ।**

ह्या दोन परिभाषांचें जें ज्ञापक वर सांगितलें आहे त्यावरून हें सिद्ध होतें कीं, जेथें अनुबन्धरहित शद्वास एक किंवा अनेक अनुबन्ध लावल्यानें तो शद्व एकानुबन्धसहित किंवा अनेकानुबन्धसहित होतो तशाच ठिकाणीं ह्या परिभाषा लागू पडतात. असा नियम असल्यामुळें, ' जश्शसोः शिः ' सू० ३१२ ह्या सूत्रास प्रथम परिभाषा नं. ८२ लागू शकत नाहीं, आणि त्यामुळें वरील सूत्रांत सांगितलेल्या 'शस् ' प्रत्ययानें अनुबन्धरहित तद्धित ' शस् ' प्रत्ययाचेंच ग्रहण होऊं शकतें अशी शंका मुळींच उत्पन्न होऊं शकत नाहीं. ( ' शस् ' प्रत्यय दोन प्रकारचा आहे. एक ' शस् ' प्रत्यय अनुबन्धरहित तद्धित प्रत्यय आहे, व दुसरा ' श् ' ह्या अनुबन्धानें युक्त असा द्वितीया विभक्तीच्या बहुवचनाचा ' शस् ' प्रत्यय आहे. आतां कोणी असें म्हणेल कीं, ' निरनुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य ' अशी परिभाषा असल्यामुळें, जेथें अनुबन्धरहित प्रत्ययाचें ग्रहण होऊं शकतें तेथें अनुबन्धसहित प्रत्ययाचें ग्रहण करूं नयें, आणि म्हणून, ' जश्शसोः शिः ' ह्या सूत्रांत सांगितलेल्या ' शस् ' प्रत्ययानें, अनुबन्धरहित तद्धित 'शस्' प्रत्ययाचें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें, अनुबन्धसहित द्वितीया विभक्तीच्या

बहुवचनाच्या ' शस् ' प्रत्ययाचें ग्रहण करणें बरोबर नाहीं. पण ह्या शंकेंत कांहींच अर्थ नाहीं; कारण तद्धित अनुबन्धरहित ' शस् ' प्रत्यय असा नाहीं कीं ज्याला विभक्ति ' शस् ' प्रत्ययांत असणारा ' श् ' हा अनुबन्ध लावला असतां, त्याला विभक्ति-' शस् ' प्रत्ययाचें रूप प्राप्त होईल. ' श् ' हा अनुबन्ध, अनुबन्धरहित तद्धित ' शस् ' प्रत्ययास लावला असतां, त्याचें ' श्शस् ' असें रूप होईल. ' शस् ' असें जें विभक्ति प्रत्ययाचें रूप आहे तसें रूप, त्या तद्धित प्रत्ययाला ' श् ' हा अनुबन्ध लावल्यानें येत नसल्यामुळें, ' जश्शसोः शिः ' ह्या सूत्रांतील ' शस् ' प्रत्ययानें, तद्धित ' शस् ' प्रत्ययाचें ग्रहण करितां येत नाहीं. दुसरें असेंहि येथें म्हणतां येईल कीं, ' जश्शसोः शिः ' ह्या सूत्रांत ' जस् ' ह्या विभक्तिप्रत्ययाबरोबर ' शस् ' प्रत्यय उच्चारला असल्यामुळें, ' सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम् ' ह्या न्यायानें, तद्धित ' शस् ' प्रत्ययाचें ग्रहण न करितां, विभक्ति ' शस् ' प्रत्ययाचेंच ग्रहण करणें योग्य आहे. ह्या वरील न्यायाचें येथें अवलंबन केलें नसून, प. नं ८२ चा आधार दिला आहे ह्याचें कारण भैरवींत असें दिलें आहे कीं, वरील न्याय–प. नं. ११२–लौकिकसिद्ध असून, प. नं ८२ ही ज्ञापकसिद्ध आहे; व लौकिकन्यायसिद्ध परिभाषेपेक्षां ज्ञापकसिद्ध परिभाषा अधिक प्रबल असल्यामुळें ह्या ठिकाणीं प० नं० ८२ चा आधार दिला आहे )

**एवमन्त्यान्यतरानुबन्धोच्चारणे एव । तेन वनो र चेत्यादौ ङ्वनिप्-क्वनिपोर्ग्रहणसिद्धिः ।**

( ह्या परिभाषेच्या ज्ञापकावरून हें देखील सिद्ध होतें कीं, ) प० नं० ८३ अशाच ठिकाणीं लागू पडते कीं, जेथें दोन पैकीं एक अनुबन्ध उच्चारला आहे. असें आहे म्हणूनच 'वनो र च' सू० ४५६ ह्या सूत्रांतील 'वन्' शब्दानें 'ङ्वनिप्' व 'क्वनिप्' ह्या दोहोंचेंहि ग्रहण होतें. ( ' वन् ' असा स्वतंत्र अनुबन्धरहित प्रत्यय पाणिनीनें कोठेंहि सांगितला नाहीं आणि म्हणूनच दीक्षितांनीं ' वन्निति ङ्वनिप्क्वनिब्वनिपां सामान्यग्रहणम् ' असें म्हटलें आहे. सारांश ' वनो र च ' ह्या सूत्रांत, ' वन् ' असा सामान्य उच्चार केला असल्यामुळें, ह्या ठिकाणीं प० नं० ८२ व ८३ लागू पडत नाहींत. ' वन् ' असा निरनुबन्धक प्रत्यय पाणिनीनें सांगितला असता तर, प० नं० ८२ लागू पडती. ' वन् ' ह्यांत, ' ङ्वनिप् ' व ' क्वनिप् ' ह्यांत असलेला कोणताहि अनुबन्ध नसल्यामुळें, प० नं० ८३ लागू पडत नाहीं, हें उघड आहे. )

**एकानुबन्धकग्रहणे संभवतीति त्वर्थो न भाष्यादिसम्मत इत्यन्यत्र विस्तरः ॥ ८२ ॥ ॥ ८३ ॥**

(कित्येक वैयाकरणांनीं प. नं. ८३ चा अर्थ असा केला आहे कीं,) 'सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें ज्या शब्दाला एक अनुबन्ध लागला आहे अशा शब्दाचें ग्रहण संभवत

असल्यास, ज्या शब्दाला दोन अनुबन्ध लागले आहेत अशा शब्दाचें, ग्रहण करूं नयें.' पण ह्या अर्थ भाष्यकारादिकांना संमत नाहीं. ( कारण ' मतुवसो रु संबुद्धौ च्छन्दसि ' ८-३-१ ह्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं, ' वन उपसंख्यानम् ' असें वार्तिक पठित करून ह्या वार्तिकाचें ' प्रातरित्वः ' असें उदाहरण दिलें आहे. ' प्रातरेति इति प्रातरित्वा ' ह्या ठिकाणीं, ' अन्येभ्योऽपि दृश्यन्ते ' सू० २९८० ह्या सूत्रानें, ' इण् ' धातूस ' क्वनिप् ' प्रत्यय होऊन ' मतुवसो रु संबुद्धौ च्छन्दसि ' सू० ३६२८ ह्या सूत्रानें संबुद्धीचें रूप करतेवेळीं रुत्व होतें. ' वन उपसंख्यानम् ' ह्या वार्तिकांत अनुबन्धरहित ' वन् ' शब्दाचें ग्रहण केलें आहे. ह्या ' वन् ' शब्दानें एकानुबन्धसहित ' वनिप् ' प्रत्ययाचें ग्रहण संभवत असून देखील, भाष्यकारांनीं द्व्यनुबन्धसहित ' क्वनिप् ' प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे. म्हणून वर सांगितलेला अर्थ भाष्याशीं असंगत असल्यामुळें, ग्राह्य नाहीं. )

---

## परिभाषा ८४

**ननु कुटीर इत्यादौ स्वार्थिकत्वात्स्वार्थिकानां प्रकृतितो लिङ्गवचनानुवृत्तेर्न्यायप्राप्तत्वात्पुंस्त्वानुपपत्तिरप्कल्पमित्यत्र नपुंसकत्वैकवचनयोरनुपपत्तिश्चेत्यत आह—**

' कुटीर ' इत्यादि स्थलीं, ( ' कुटीशमीशुण्डाभ्यो रः ' सू० २०४३ ह्या सूत्रानें, ' र ' प्रत्यय ) स्वार्थे होत असल्यामुळें, आणि ' स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते '—म्हणजे प्रकृतिच्या लिङ्गवचनाप्रमाणें स्वार्थिकप्रत्ययान्त प्रकृतीचें लिङ्गवचन असतें असा न्याय असल्यामुळें, ' कुटीरः ' येथें पुंस्त्व होणार नाहीं ( कारण ' कुटी ' ह्या स्त्रीलिङ्ग प्रकृतीला स्वार्थिक ' र ' प्रत्यय झाला असल्यामुळें, ' कुटीर ' हा शब्द, ' कुटी ' शब्दाप्रमाणें, स्त्रीलिङ्ग होईल.) तसेंच, ( नित्य स्त्रीलिङ्ग बहुवचनान्त ' अप् ' शब्दास ' ईषदसमाप्तौ कल्पब्देश्यदेशीयरः ' सू० २०२२ ह्या सूत्रानें, स्वार्थिक 'कल्पप्' प्रत्यय लावून, ' ईषदूनाः आपः ' ) ' अप्कल्पम् ' असें नपुंसकलिङ्गी एकवचनान्त रूप होणार नाहीं. ( स्त्रीलिङ्ग बहुवचनाचें रूप होईल. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

**क्वचित्स्वार्थिकाः प्रकृतितो लिङ्गवचनान्यतिवर्तन्ते ॥ ८४ ॥**

" कोठें कोठें स्वार्थिक प्रत्यय झाल्यावर, ज्या प्रकृतीला तो प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतीच्या लिङ्गवचनांहून भिन्न असें स्वार्थिकप्रत्ययान्त प्रकृतीचें रूप होतें. "

**णचःस्त्रियामिति सूत्रे स्त्रियामित्युक्तिरस्या ज्ञापिका। अन्यथा कर्मव्यतिहारे णच् स्त्रियामिति स्त्रियामेव विधानात्किं तेन॥ स्पष्टा चेयं बहुज्विधायके भाष्ये ॥ ८४ ॥**

'णचः स्त्रियामञ्' सू० ३२१६ ह्या सूत्रांत असलेला 'स्त्रियाम्' हा शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे. जर ही परिभाषा नसती तर, 'स्त्रियाम्' हा शब्द वरील सूत्रांत घालण्याची कांहींच गरज नव्हती. कारण 'कर्मव्यतिहारे णच् स्त्रियाम्' सू० ३२१५ ह्या सूत्रानें, स्त्रीलिङ्गांतच 'णच्' प्रत्यय होत असतो. ( तरी पण 'णचः स्त्रियामञ्' ह्या सूत्रांत पुनः 'स्त्रियाम्' हा शब्द घातला आहे. ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, कोठें कोठें स्वार्थिक प्रत्यय लागल्यानंतर, प्रकृतीच्या लिङ्गांत फरक पडतो; तो फरक 'अञ्' प्रत्यय लागला असतां, न व्हावा, व प्रकृतीचें स्त्रीलिङ्गरूप कायम राहावें म्हणून 'स्त्रियाम्' हा शब्द 'णचः स्त्रियाम्' ह्या सूत्रांत घातला आहे, आणि अशा रीतीनें तो शब्द ह्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. ) 'विभाषा सुपो बहुच्पुरस्तात्तु' ५-३-६८ ह्या बहुच्प्रत्ययविधायकसूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे.

---

## परिभाषा ८५

**ननु सुपथी नगरीति युवोरनाकाविति सूत्रभाष्योदाहृत इनः स्त्रियामिति कप्स्यादत आह—**

'युवोरनाकौ' ७-१-१ ह्या सूत्रावरील भाष्यांत, 'सुपथी नगरी' असा प्रयोग आढळतो. वास्तविक 'सुपथी' ह्या स्थलीं, 'इनः स्त्रियाम्' सू० ८९० ह्या सूत्रान्वयें, 'कप्' प्रत्यय केला पाहिजे होता ( तो कां केला नाहीं हें कळावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

### समासान्तावधिरनित्यः ॥ ८५ ॥

"ज्या सूत्रांत समासान्तप्रत्यय होण्याचें विधान केलें आहे तें सूत्र अनित्य समजावें."

( व असें सूत्र अनित्य असल्यामुळें, कोठें कोठें समासान्त प्रत्यय होत नाहीं. ह्यामुळें 'सुपथी' ह्या स्थलीं समासान्त 'कप्' प्रत्यय झाला नाहीं. )

**प्रतेरंश्वादयस्तत्पुरुषे इत्यन्तोदात्तत्वायांश्वादिषु राजन्शब्दपाठोऽस्या ज्ञापकः । अन्यथा टचैवान्तोदात्तत्वे सिद्धे किं तेन । द्वित्रिभ्यां पाद्न्मूर्द्धस्विति स्वरविधायके भाष्ये स्पष्टेयम् ॥ ८५ ॥**

'प्रतेरंश्वादयस्तत्पुरुषे' सू० ३९२७ ह्या सूत्रांत सांगितलेल्या 'अंश्वादि' गणांत, अन्तोदात्तत्व होण्याकरितां, 'राजन्' शब्दाचा पाठ केला आहे, व तो पाठ ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे. ही परिभाषा नसती तर, अंश्वादिगणांत 'राजन्'

शद्वाचा पाठ करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण 'टच्' प्रत्यय होऊन अन्तोदात्तत्व झालेंच असतें. ( तत्पुरुष समासांत, 'प्रति' हें अव्यय पूर्वावयव असून, अंश्वादिगणांत पठित असलेला शद्व चरमावयव असल्यास, तो समास अन्तोदात्त होतो असा ' प्रतेरंश्वादयस्तत्पुरुषे ' ह्या सूत्राचा अर्थ आहे. ' राजन् ' शद्व तत्पुरुष समासाच्या अन्तीं असल्यास, ' राजाहः सखिभ्यष्टच् ' सू० ७८८ ह्या सूत्रानें समासान्त ' टच् ' प्रत्यय होत असतो, व त्यामुळें 'चितः' सू० ३७१० ह्या सूत्रान्वयें, समास अन्तोदात्त होतोच; असें असून, ' राजन् ' शद्व अंश्वादिगणांत कां पठित केला आहे? ह्याचें उत्तर हें कीं, ह्या परिभाषेप्रमाणें समासान्तविधि अनित्य असल्यामुळें, कोठें कोठें ' राजन् ' शद्व समासाच्या अंतीं असून देखील, 'टच्' प्रत्यय होणार नाहीं, व तो न झाल्यास, 'चितः' ह्या सूत्राची प्रवृत्ति होणार नाहीं, व समास अन्तोदात्त होणार नाहीं. पण तो समास अन्तोदात्त होणें इष्ट असल्यामुळें, अंश्वादिगणांत ' राजन् ' शद्वाचा समावेश केला आहे, व अशा रीतीनें, त्या शद्वाचा अंश्वादिगणांत केलेला पाठ ह्या परिभाषेचा ज्ञापक ठरतो. ) ' द्वित्रिभ्यां पाद्दन्मूर्धसु ' ६-२-१९६ ह्या स्वरविधायक सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे.

---

## परिभाषा ८६

**ननु शतानीत्यादौ नुमि कृते षट्संज्ञा प्राप्नोति ततश्च लुक् स्यात्तथोपादास्तेत्यत्रात्त्वे कृते स्थाघ्वोरिच्च इतीत्त्वं प्राप्नोत्यत आह—**

' शतानि ' इत्यादि स्थलीं, नुमागम केल्यावर ' षट् ' संज्ञा प्राप्त होऊन ( इकाराचा ) लुक् होईल; तसेंच, ' उपादास्त ' ह्या स्थलीं, आत्व केल्यावर, ' स्थाघ्वोरिच्च ' सू० २३८९ ह्या सूत्रानें इत्व होईल. ( ' शत + जस् ' अशा स्थितींत, ' जश्शसोः शिः ' सू० ३१२ ह्या सूत्रानें ' जस् ' च्या जागीं ' शि '–म्हणजे 'इ'–असा आदेश होतो; नंतर, ' शि सर्वनामस्थानम् ' सू० ३१३ ह्या सूत्राप्रमाणें ' शि ' हें सर्वनामस्थान असल्यामुळें, ' नपुंसकस्य झलचः ' सू० ३१४ ह्या सूत्रानें नुमागम होऊन ' शतन् + इ ' अशी स्थिति होते. ' शत ' ह्या संख्यावाचक शद्वाचें अशा रीतीनें ' शतन् ' असें नान्त रूप झालें असतां, ' ष्णान्ता षट् ' सू० ३६९ ह्या सूत्रानें, 'शतन्' ह्याला ' षट् ' संज्ञा प्राप्त होऊन, ' षड्भ्यो लुक् ' सू० २६१ ह्या सूत्रानें ' जस् ' व ' शस् ' च्या जागीं होणाऱ्या ' शि ' ( इ ) ह्या आदेशाचा लुक् पावला आहे. तसेंच उपपूर्वक ' दीङ् क्षये ' ह्या दिवादिगणांतील धातूचें लुङाचें रूप करतेवेळीं, ' उप+अ+दी+सिच्+त ' अशा स्थितींत, ' मीनातिमिनोतिदीङां ल्यपि च ' सू० २५०८ ह्या सूत्रानें, ' दी ' ह्यांतील ईकाराचें

आत्व झालें असतां, ' उप+अ+दा+सिच्+त ' अशी स्थिति होते. अशा रीतीनें ' दी ' चा ' दा ' झाला असतां, ' दाधाध्वदाप् ' सू० २३७३ ह्या सूत्रानें त्या ' दा ' ला ' घु ' संज्ञा प्राप्त होते, व ' स्थाघ्वोरिच्च ' सू० २३८९ ह्या सूत्रानें ' दा ' ह्यांतील आकाराला इत्वाची प्राप्ति होते. असें झालें असतां, ' शतानि ' व ' उपादास्त ' अशीं रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत, व विकृत रूपें सिद्ध होतील तसें न व्हावें, ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य ॥ ८६ ॥

" दोहोंच्या संबन्धामुळें सूत्रांत सांगितलेल्या एखाद्या कार्याची प्रवृत्ति झाली असतां, तें झालेलें कार्य, त्या संबन्धाच्या नाशाचें कारण होऊं शकत नाहीं—म्हणजे त्या संबन्धाचा नाश करणाऱ्या कार्याचें निमित्त होऊं शकत नाहीं, व तशा कार्याची प्रवृत्ति होऊं देत नाहीं ",

( ' शतानि ' ह्या उदाहरणांत ' शत ' ही नपुंसक अजन्त प्रकृति व पुढें असलेलें ' इ ' हें सर्वनामस्थान ह्या दोहोंच्या संबन्धामुळें, ' नपुंसकस्य झलचः ' ह्या सूत्रानें नुमागम कार्य झालें आहे. तें कार्य ' ष्णान्ता षट् ' ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊं देत नाहीं; कारण ' शतन् ' ह्याला ' षट् ' संज्ञा प्राप्त झाल्यास, ' षड्भ्यो लुक् ' ह्या सूत्रानें इकाराचा लोप होणार, व तो लोप झाल्यास, ' शत+इ ' ह्यांचा संयोग नष्ट होणार. त्याचप्रमाणें, ' उपादास्त ' ह्या उदाहरणांत, ' उप+अ+दी+सिच्+त ' ह्यांतील 'दी' व ' सिच् ' ह्या दोहोंच्या संबन्धामुळें ' मीनातिमिनोतिदीङां ल्यपि च ' ह्या सूत्रानें ' दी ' ह्यांतील इकाराचे जागीं झालेलें आत्वरूपी कार्य ' स्थाघ्वोरिच्च ' ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊं देत नाहीं; कारण तें सूत्र प्रवृत्त झाल्यास, ' दा ' ह्यांतील आकाराचें इत्व होईल, व अङ्ग ह्रस्व होईल, आणि त्यामुळें, ' ह्रस्वादङ्गात् ' सू० २३६९ ह्या सूत्रानें सिचाचा लोप होईल व तो लोप झाल्यास, ' दा+सिच् ' ह्यांचा संयोग नष्ट होईल. )

**सन्निपातो द्वयोः सम्बन्धस्तन्निमित्तो विधिस्तं सन्निपातं यो विहन्ति तस्यानिमित्तम् ॥ उपजीव्यविरोधस्यायुक्तत्वमिति न्यायमूलैषा ।**

' सन्निपात ' म्हणजे दोहोंचा संबंध. त्या संबंधामुळें झालेलें कार्य, त्या सम्बन्धाचा नाश करणाऱ्या कार्याचें निमित्त ( कारण ) होत नाहीं. ( म्हणजे तशा सम्बन्धाचा नाश करणाऱ्या कार्याची प्रवृत्ति होऊं देत नाहीं. ) ज्याच्यामुळें अस्तित्व प्राप्त झालें आहे त्याच्याशीं विरोध करणें अयोग्य आहे ह्या लौकिक न्यायाच्या पायावर ही परिभाषा रचली आहे.

**अत एवात्र सन्निपातशब्देन न पूर्वपरयोः सम्बन्ध एव किंतु विशेष्यविशेषणसान्निपातोऽपि गृह्यते । अत एव ग्रामणि कुलमित्यादौ नपुंसकह्र-**

स्वत्वेऽपि ह्रस्वस्य पिति कृतीति तुग्न। प्रातिपदिकाजन्तत्वसन्निपातेन जातस्य ह्रस्वस्य तद्विघातकत्वात्। तुक्यजन्तत्वविघातः स्पष्ट एव ॥ न चार्थाश्रयत्वेन ह्रस्वस्य बहिरङ्गतयाऽसिद्धत्वम्। अर्थकृतबहिरङ्गत्वानाश्रयणस्योक्तत्वात्।

( ही परिभाषा लौकिकन्यायाच्या आधारावर रचली आहे ) म्हणूनच, 'एक पूर्वी असणारें व त्यापुढें दुसरें असणारें ह्या दोहोंचा–म्हणजे पूर्व व पर ह्यांचा–संयोग' एवढाच 'सन्निपात' शब्दाचा अर्थ होत नसून, 'विशेषणविशेष्यभावसम्बन्ध' असा देखील त्या शब्दाचा अर्थ होतो. ( कारण 'सन्निपात' ह्याचा अर्थ एकत्र येणें हा आहे, व विशेषण आणि विशेष्य हे एकत्र झाले असतां सन्निपात होतोच. ) आणि तसा देखील अर्थ होतो म्हणूनच, 'ग्रामणि कुलम्' इत्यादि उदाहरणांत, ( 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू० ३१८ ह्या सूत्रानें ) ह्रस्वत्व झालें तरी, तें 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू० २८५८ ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊं देत नाहीं, व तुक्कार्य होऊं देत नाहीं. ( 'ग्राम+नी+क्विप्+सु' अशा स्थितींत, 'स्वमोर्नपुंसकात्' सू० ३१९ ह्या सूत्रानें सुलोप होतो, व 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू० ३१८ ह्या सूत्रानें, 'नी' ह्यांतील ईकाराचा ह्रस्व होतो. ह्या सूत्राचा अर्थ 'क्लीबे अजन्तस्य प्रातिपदिकस्य ह्रस्वः स्यात्' असा आहे. येथें 'अजन्तस्य' हें विशेषण व 'प्रातिपदिकस्य' हें विशेष्य आहे; आणि ह्या विशेषणविशेष्यभावसम्बन्धामुळें, 'नी' ह्यांतील ईकाराला ह्रस्व कार्य झालें आहे. हें ह्रस्व कार्य 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' ह्या सूत्राची प्रवृत्ति होऊं देत नाहीं, व 'तुक्' कार्य होऊं देत नाहीं; कारण 'तुक्' झाल्यास, प्रातिपदिक हलन्त होईल व त्याचें अजन्तत्व नष्ट होईल; व त्यामुळें ) 'अजन्तस्य प्रातिपदिकस्य' असा जो विशेषणविशेष्यभावसम्बन्ध होता व ज्यामुळें ह्रस्व कार्य झालें तो सम्बन्ध नष्ट होईल. म्हणून ह्रस्व कार्य, ( विशेषणविशेष्यभावरूप ) सन्निपाताचा नाश करणाऱ्या 'तुक्' कार्याच्या प्रवृत्तीचें, कारण होत नाहीं. 'तुक्' झाल्यास, ( 'ग्रामणित्' असें हलन्त रूप होईल व त्यामुळें, ) प्रातिपदिकाचें अजन्तत्व नष्ट होईल हें स्पष्ट आहे. कोणी असें म्हणेल कीं, ( 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' ह्या सूत्रान्वयें, नपुंसकत्वरूपी ) अर्थाच्या आश्रयामुळें–म्हणजे त्या अर्थाला मानून–होणारें ( 'ग्रामणी' ह्यांतील ईकाराचा ह्रस्व होणें हें ) ह्रस्व कार्य बहिरङ्ग व असिद्ध–म्हणजे झालेंच नाहीं–असें ( प० नं० ५० प्रमाणें,) मानलें पाहिजे, ( व तसें मानल्यास, 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' हें सूत्र प्रवृत्तच होऊं शकत नाहीं, व तुगागम होऊं शकत नाहीं. )–पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण पूर्वी सांगितलेंच आहे कीं, अर्थाला मानून होणारें कार्य बहिरङ्ग असतें असा पक्ष स्वीकारतां येत नाहीं.

किं च षत्वतुकोरसिद्ध इत्येतद्बलात्कृतितुग्ग्रहणाच्च तुग्विधौ बहिरङ्गपरिभाषाया अप्रवृत्तेः ॥

दुसरें असें कीं, 'षत्वतुकोरसिद्धः' सू० ३३३३ ह्या सूत्रांत ' तुक् ' ग्रहण केलें असल्यामुळें, व तसेंच 'नलोपः सुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति' सू० ३१३ ह्या सूत्रांत ) ' कृति तुक् ' ग्रहण केलें असल्यामुळें, हें सिद्ध होतें कीं, तुग्विधि करितांना, बहिरङ्ग परिभाषा लागू पडत नाहीं. ( षत्व किंवा तुग्विधि करितांना, एकादेश आसिद्ध समजावा असा ' षत्वतुकोरसिद्धः ' ह्या सूत्राचा अर्थ आहे. ' अधि+इ+क्त्वा ' ह्या स्थलीं, ' अधि+इत्वा ' ह्यांचा समास होऊन ' अधी+क्त्वा ' अशी स्थिति झाली असतां, ' समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ' सू० ३३३२ ह्या सूत्रानें ' क्त्वा ' चे जागीं ' ल्यप् ' होतो, व ' ल्यप् ' हा पित् कृत् प्रत्यय असल्यामुळें, ' इ ' ह्या ऱ्हस्व धातूला मानून तुक् प्राप्त होतो. पण ' अधि+इत्वा ' ह्यांचा समास होऊन, ' अकः सवर्णे दीर्घः ' ह्या सूत्रानें दीर्घ ईकाररूपी एकादेश झाल्यामुळें ऱ्हस्वत्व नष्ट झालें आहे, व ' तुक् ' प्राप्ति नाहीं; पण ' तुक् ' हाण इष्ट आहे; म्हणून एकादेश असिद्ध–म्हणजे झालाच नाहीं–असें समजून तुगागम करावा. वास्तविक पाहिलें असतां, 'ल्यप्' प्रत्ययाला मानून होणारें तुगागमरूपी कार्य अन्तरङ्ग आहे, व दोन पदांत असणाऱ्या वर्णद्वयाला मानून होणारें एकादेशरूपी कार्य बहिरङ्ग आहे. म्हणून एकादेशरूपी कार्य असिद्ध ठरून, तुगागमरूपी अन्तरङ्ग कार्य होऊं शकतें. असें असून देखील, ज्याअर्थीं पाणिनीनें ' षत्वतुकोरसिद्धः ' ह्या सूत्रांत ' तुक् ' ग्रहण केलें आहे त्यावरून हें सिद्ध होतें कीं, ' तुक्विधि ' करितांना, बहिरङ्ग परिभाषा नं० ५० लागू पडत नाहीं. दुसरें असें कीं, ' नलोपः सुप्स्वरसंज्ञा तुक्विधिषु कृति ' ह्या सूत्रांत, ' कृति तुक् ' ग्रहण केलें आहे. त्या सूत्राचा अर्थ असा आहे कीं, कृत् प्रत्यय पुढें असतां, ' ऱ्हस्वस्य पिति कृति तुक् ' ह्या सूत्रानें तुगागम करतेवेळीं, ' नलोपः प्रातिपदिकान्तस्य ' सू० २३६ ह्या सूत्रानें होणारा नलोप असिद्ध–म्हणजे झाला नाहीं असें–समजावा. म्हणूनच ' वृत्र +हन्+क्विप्+भ्याम् ' ह्या स्थलीं, जरी ' हन् ' ह्यांतील नलोप होतो व ' ह ' असा ऱ्हस्वान्त शब्द राहतो, व ' क्विप् ' प्रत्यय पुढें असल्यामुळें, त्याला तुगागमाची प्राप्ति होते तरी, नलोप झाला नाहीं असें समजावें लागत असल्यामुळें, ' ह ' ला तुगागम होत नाहीं, व ' वृत्रहद्भ्याम् ' असें रूप न होतां, ' वृत्रहभ्याम् ' असें रूप होतें. वास्तविक पाहिलें असतां, ' भ्याम् ' ह्या पलीकडे असणाऱ्या निमित्तामुळें पदसंज्ञा प्राप्त होऊन नलोप रूपी कार्य झालें आहे; त्यामुळें तें बहिरङ्ग ठरतें, व जवळ असणाऱ्या ' क्विप् ' प्रत्ययाला मानून होणारें तुगागमरूपी कार्य अन्तरङ्ग ठरतें. त्यामुळें परिभाषा ५० प्रमाणें, नलोपरूपी कार्य आपोआपच असिद्ध ठरतें. असें असून देखील, 'नलोपः सुप्स्वर' ह्या सूत्रांत ' कृति तुक् ' ग्रहण केलें आहे. ह्यावरूनहि हें सिद्ध होतें कीं, ' तुक् ' विधि करितांना, परिभाषा नं० ५० लागू पडत नाहीं. )

**सर्वविधसंनिपातग्रहणादेव वर्णाश्रयः प्रत्ययो वर्णविचालस्यानिमित्तं स्यादित्येतत्परिभाषादोषनिरूपणावसरे वार्तिककृतोक्तम् ।**

ह्या परिभाषेंत वापरलेल्या 'सन्निपात' शब्दानें सर्वप्रकारच्या संबंधांचें (—म्हणजे पूर्वपरसन्निपात व तसेंच विशेषणविशेष्यभावरूपी सन्निपात ह्या उभयविध सन्निपातांचें) ग्रहण होत असल्यामुळेंच, वार्तिककारानें, ( ही परिभाषा नित्य मानल्यास, ) कोण-कोणते दोष उपस्थित होतील हे सांगतेवेळीं, असें म्हटलें आहे कीं, 'वर्णाला मानून होणारा प्रत्यय त्या वर्णाच्या नाशाचें कारण होऊं शकणार नाहीं.' ( जसें—'दक्ष+इञ्' येथें, 'अत इञ्' सू० १०९५ ह्या सूत्रानें होणारा 'इञ्' प्रत्यय, 'दक्ष' ह्यांतील 'अ' वर्णाला मानून होत असल्यामुळें, ही परिभाषा नित्य मानल्यास, तो प्रत्यय 'यस्येति च' सू० ३११ ह्या सूत्रान्वयें 'अ' वर्णाच्या नाशाचें कारण होऊं शकणार नाहीं; व तो 'अ' वर्णाचा नाश करूं न शकल्यास, 'दाक्षिः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. ह्या दोष दाखवितेवेळीं, वार्तिककारानें—म्हणजे सिद्धान्तीनें—विशेषणविशेष्यभावरूपी सन्निपात देखील असतो असें गृहीत केलें आहे. अशा प्रकारचा सन्निपात जर वार्तिककाराला मान्य नसता तर, त्याला वरील प्रकारचा दोष दाखवितां आलाच नसता; कारण 'अत इञ्' ह्या सूत्रान्वयें जो 'इञ्' प्रत्यय होतो तो, पूर्वीं कांहीं असणें व त्याच्यापुढें कांहीं असणें अशा प्रकारच्या पूर्वपरसन्निपाताला मानून होणारा नसून, 'अदन्तस्य प्रातिपदिकस्य' ह्या विशेषणविशेष्यभावाला मानून होणारा आहे. सारांश, विशेषणविशेष्यभावरूपी सन्निपाताचा देखील, ह्या परिभाषेंत वापरलेल्या 'सन्निपात' शब्दांत समावेश होतो हें वरील सिद्धान्तभाष्यावरून स्पष्ट होतें.)

**न हि प्रत्ययः पूर्वपरसन्निपातनिमित्तकः स एव च सन्निपातशब्देन गृह्यत इति मत्वा न प्रत्ययः सान्निपातनिमित्तक इति शङ्कायां तदभ्युपेत्यैवाङ्गसंज्ञा तद्धनिमित्तं स्यादित्येकदेशिनोक्तमिति न तद्भाष्यविरोधः ।**

( आतां, शंकाकार वरील सिद्धान्तभाष्यावर अशी शंका घेतो कीं, ) प्रत्यय जो होत असतो तो मागें कांहीं असणें व पुढें कांहीं असणें अशा प्रकारच्या सन्निपातामुळें होत नसतो, व पूर्वपरसन्निपातच ह्या परिभाषेंत अभिप्रेत आहे. ( विशेषण-विशेष्यभावरूपी सान्निपात ह्या परिभाषेंत अभिप्रेत नाहीं; त्यामुळें तुम्हीं-म्हणजे सिद्धान्ती ह्यांनीं—दाखविलेला दोष येऊं शकत नाहीं. ह्या शंकेचें उत्तर देतांना, सिद्धान्ती, शंकाकाराचेंच म्हणणें तेवढ्यापुरतें बरोबर मानून ती शंका खोडतेवेळीं असें म्हणतो कीं, अदन्तप्रकृति व 'इञ्' प्रत्यय ह्यांच्या 'सन्निपातामुळें यस्मात् प्रत्ययविधिः' सू० १९९ या सूत्रान्वयें प्रकृतीला प्राप्त झालेली ) अङ्गसंज्ञा ('दाक्षिः' ह्या उदाहरणांत, 'यस्येति च' ह्या सूत्रान्वयें, अकारलोपाचें) निमित्त होऊं शकणार नाहीं. (व तुझी—म्हणजे शंकाकाराची—शंका बरोबर मानली तरी, अकारलोप होऊं शकत नाहीं, व आम्ही—म्हणजे सिद्धान्ती ह्यांनीं—दाखविलेला दोष कायम राहतोच. म्हणून तुझी शंका व्यर्थ आहे. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, उत्तर देतेवेळीं, सिद्धान्तीनें विशेषणविशेष्यभावरूपी सन्नि-

पात न मानतां, प्रकृतिप्रत्ययरूप पूर्वपरसन्निपात मानूनच उत्तर दिलें आहे. म्हणून उत्तरभाष्य आपाततः पूर्वभाष्याच्या विरुद्ध दिसतें. ह्यावर ग्रन्थकार असें म्हणतात कीं, भाष्यकारांनीं शंकाकाराचें मत घटकाभर खरें मानून त्याची शंका खोडतांना जें उत्तर दिलें आहे तें वास्तविक सिद्धान्तीचें उत्तर नसून ) एकादेशीची उक्ति आहे; व त्यामुळें पूर्वीच्या सिद्धान्तभाष्याशीं कांहीं विरोध येत नाहीं. ( व विशेषणविशेष्यभावरूपी सन्निपात देखील ह्या परिभाषेंतील 'सन्निपात' शद्बांत समाविष्ट आहे हें सिद्धान्तभाष्यावरून स्पष्ट होतें. )

**किं चैवं शैवो गार्ग्यो वैनतेय इत्यादावप्यङ्गसंज्ञाया लोपनिमित्तत्वानापत्त्या वर्णाश्रय इत्यस्य वैयर्थ्यम् ॥**

दुसरें असें कीं ( 'अङ्गसंज्ञा वर्णविचालस्य अनिमित्तं स्यात्' ही एकदेश्युक्ति न मानली व 'वर्णाश्रयः प्रत्ययो वर्णविचालस्य अनिमित्तं स्यात्' ह्या सिद्धान्तोक्तीचा अर्थ 'अङ्गसंज्ञा वर्णविचालस्य अनिमित्तं स्यात्' असा केला तर, ) 'शैवः,' 'गार्ग्यः,' 'वैनतेयः' इत्यादि स्थलीं देखील, अङ्गसंज्ञानिमित्तामुळें लोप होणार नाहीं. व 'वर्णाश्रयः प्रत्ययः वर्णविचालस्य अनिमित्तं स्यात्' हें म्हणणें व्यर्थ ठरेल. ( 'शिवस्य अपत्यं शैवः' येथें, 'शिवादिभ्योऽण्' सू १११५ ह्यानें 'अण्' प्रत्यय होतो. 'गर्गस्य गोत्रापत्यं=गार्ग्यः' येथें, 'गर्गादिभ्यो यञ्' सू० ११०७ ह्या सूत्रानें 'यञ्' प्रत्यय होतो. 'विनतायाः अपत्यं=वैनतेयः' येथें, 'स्त्रीभ्यो ढक्' सू. ११२३ ह्या सूत्रानें 'विनता' ह्या स्त्रीप्रत्ययान्त शद्बाहून 'ढक्' प्रत्यय होऊन 'आयनेयी' सू० ४७५ या सूत्रान्वयें, 'ढ्' चे जागीं 'एय्' असा आदेश होतो. वरील तिन्ही उदाहरणांत, वर्णाला मानून प्रत्यय झाला नसून, शद्बाला मानून प्रत्यय झाला आहे— म्हणजे वर्णाश्रय अथवा वर्णनिमित्तक प्रत्यय झाला नसून, शद्बाश्रय अथवा शद्बनिमित्तक प्रत्यय झाला आहे. प्रत्यय लावला असतां, 'शिव,' 'गर्ग' व 'विनता' ह्यांना 'यस्मात्प्रत्ययविधिः' सू० १९९ ह्या सूत्रान्वयें अङ्गसंज्ञा प्राप्त होते, व प्रत्यय लागल्यामुळें प्राप्त झालेली अङ्गसंज्ञा, अङ्ग+प्रत्यय ह्यांच्या सन्निपाताच्या नाशाला, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, कारणीभूत होऊं शकणार नाहीं; व 'यस्येति च' सू० ३११ ह्या सूत्रानें, तद्धितप्रत्यय पुढें असतांना होणारा, अकाराचा व आकाराचा लोप होणार नाहीं; आणि त्यामुळें 'शैवः,' 'गार्ग्यः,' 'वैनतेयः' अशीं रूपें सिद्ध होणार नाहींत. तसें झाल्यास, 'वर्णाश्रयः प्रत्ययः वर्णविचालस्य अनिमित्तं स्यात्' हें म्हणणें अनावश्यक ठरेल; कारण वार्तिककारानें, ही परिभाषा नित्य मानल्यास, जो दोष दाखविला आहे तो ज्या ठिकाणीं वर्णाला मानून प्रत्यय होतो तेवढ्यापुरताच दाखविला आहे. त्यामुळें जेथें शद्बाला मानून प्रत्यय होणें सांगितलें आहे तशा ठिकाणीं ही परिभाषा लागूच पडत नाहीं हें सिद्ध होतें; कारण तशा ठिकाणीं वार्तिककाराच्या मतें प्रकृतिप्रत्ययरूपी सन्निपाताचा, 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा असल्यामुळें,

विघात होत नाहीं. पण जर विशेषणविशेष्यभावरूपी सन्निपात ह्या परिभाषेंतील 'सन्निपात' शब्दांत समाविष्ट आहे असें मानलें तर, तें म्हणणें व्यर्थ पडणार नाहीं. म्हणून पूर्वपरसन्निपात असला तरच ही परिभाषा लागते असा ह्या परिभाषेचा संकुचित अर्थ न करितां, कोणत्याहि प्रकारचा सन्निपात असला तरी ही परिभाषा लागू पडते असा ह्या परिभाषेचा अर्थ मानल्यास, वार्तिककाराचें म्हणणें व्यर्थ ठरत नाहीं. दुसरें असें कीं, ही परिभाषा नित्य मानल्यास, वार्तिककारानें एकच प्रकारचा दोष दाखविला आहे; सर्वप्रकारचे दोष दाखविले नाहींत. तथापि वार्तिक उपलक्षणानें सर्वदोषकथनपर आहे असें मानल्यास, कोणतीच अडचण उपस्थित होत नाहीं. )

**ग्रामणिकुलं ग्रामणिपुत्र इत्यादावुत्तरपदनिमित्तके ह्रस्वत्वे यथाकथंचिद्बहिरङ्गपरिभाषयापि वारणं संभवतीति कृन्मेजन्त इत्यत्र ह्रस्वस्य पितीति सूत्रे चैकदेशिना तया परिभाषया तुग्वारितो भाष्ये। अत एव परिभाषाफलत्वेनेदमुक्तं कृन्मेजन्त इति सूत्रे वार्तिककृतेति केचित्॥**

( 'तुग्विधौ बहिरङ्गपरिभाषायाः अप्रवृत्तेः'—म्हणजे तुग्विधि करितांना बहिरङ्ग परिभाषा नं० ५० लागू पडत नाहीं—असें वर सांगितलें आहे; म्हणून ) कित्येक वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, 'कृन्मेजन्तः' १-१-३९ व 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' ६-१-७१ ह्या सूत्रांवरील भाष्यांत, 'ग्रामणिकुलम्' 'ग्रामणिपुत्रः' इत्यादि स्थलीं ( 'इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य' सू० ९९९ ह्या सूत्रान्वयें, ) उत्तरपद पुढें असल्यामुळें, पूर्वपदांतील अन्त्य इकाचा ह्रस्व झाला असतां, 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू० २८५८ ह्या सूत्रानें जो तुगागम प्राप्त होतो त्याचें निवारण, बहिरङ्ग परिभाषा नं० ५० प्रमाणें देखील, कसें तरी करतां येतें असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे ती सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेश्युक्ति आहे असें समजावें, आणि ( तुक्विधि करतांना, वास्तविक बहिरङ्गपरिभाषा नं० ५० लागू पडत नाहीं, ) म्हणूनच, 'कृन्मेजन्तः' ह्या सूत्रावरील भाष्यांत वार्तिककारानें, 'ग्रामणिकुलम्' 'ग्रामणिपुत्रः' इत्यादि स्थलीं, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें तुग्विधि होत नाहीं असें म्हटलें आहे. (तुक्विधि करितांना बहिरङ्गपरिभाषा लागू पडत नाहीं व तुकाचें निवारण प्रकृतपरिभाषेनेंच होतें हा सिद्धान्त आहे; असें असून देखील, भाष्यांत कांहीं ठिकाणीं बहिरङ्गपरिभाषा लावून तुकाचें निवारण केलें आहे. म्हणून हें अशा रीतीनें केलेलें तुक्निवारण सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेशीची उक्ति आहे हें स्पष्ट होतें, व पुढील भाष्यांत प्रकृतपरिभाषा लावूनच ज्याअर्थीं तुक्निवारण केलें आहे त्याअर्थीं वरील उक्ति एकदेशीचीच आहे हें म्हणण्यास पुष्टि मिळते. वास्तविक पाहिलें असतां, बहिरङ्गपरिभाषेनें तुकाचें निवारण होऊं शकत नाहीं; कारण 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा नं० ५१ तुक्निवारणाच्या आड येते. अचांच्या लगेंच जवळ ( अव्यवहित ) असलेल्या निमित्तामुळें कांहीं कार्य करणें

झाल्यास बहिरङ्गपरिभाषा लागत नाहीं असा प० नं० ५१ चा अर्थ आहे. त्यामुळें 'ग्रामणि' येथील ऱ्हस्वइकारापुढें तुगागम होतेवेळीं बहिरङ्गपरिभाषा आड येऊं शकत नाहीं. असें असून देखील ज्याअर्थीं भाष्यांत तुगागमनिवारणार्थ त्या परिभाषेचा उपयोग केला आहे. व वार्तिककारानें–सिद्धान्तीनें–प्रकृतपरिभाषा लावून तुन्निवारण केलें आहे त्यावरुन हें स्पष्ट होतें कीं, तें भाष्य सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेशीची उक्ति आहे. )

**सन्निपातलक्षणविधित्वमस्या लिङ्गम् । स्वप्रवृत्तेः प्राक् स्वनिमित्तभूतो यः सन्निपातस्तद्विघातकस्य स्वातिरिक्तशास्त्रस्य स्वयमनिमित्तमिति फलति ॥**

ही परिभाषा तेथेंच लागू पडते कीं जेथें दोहोंच्या सन्निपातामुळें एखाद्या सूत्राची–म्हणजे सूत्रांत सांगितलेल्या कार्याची–प्रवृत्ति होते. या परिभाषेचा असा अर्थ निष्पन्न होतो कीं, एखाद्या सूत्राची–म्हणजे सूत्रविहित कार्याची–प्रवृत्ति होण्यास कारणीभूत, व तें सूत्र प्रवृत्त होण्यापूर्वीं असणारा, जो सन्निपात त्या सन्निपाताचा नाश करणाऱ्या कोणत्याहि स्वतःहून भिन्न सूत्राच्या प्रवृत्तीचें तें सूत्र निमित्त होऊं शकत नाहीं. ( 'यं सन्निपातं निमित्तं कृत्वा स्वस्य प्रवृत्तिस्तस्य सर्वथा विघटकं यच्छास्त्रं तस्य स्वप्रयोज्या प्रवृत्तिर्नेति फलितम्' असा या पंक्तीचा भैरवींत अर्थ केला आहे. या पंक्तीच्या अर्थाचें स्पष्टीकरण करण्याकरितां आपण 'रामाय' हें उदाहरण घेऊं. 'राम + ङे' या दोहोंच्या सन्निपातामुळें 'ङेर्यः' सू० २०४ या सूत्राची प्रवृत्ति होऊन ङिचे जागीं यादेश होतो व 'राम + य' अशी स्थिति होते. हा यादेश होण्यापूर्वीं जो सन्निपात–म्हणजे 'राम' हें अदन्त अङ्ग व त्यापुढें 'ङे' हा विभक्तिप्रत्यय या दोहोंचा जो सन्निपात–होता त्या सन्निपाताचा नाश करणाऱ्या 'सुपि च' या स्वतःहून भिन्न शास्त्राची प्रवृत्ति करून देण्यास 'ङेर्यः' हें सूत्र कारणीभूत होऊं शकत नाहीं; कारण 'सुपि च' हें दीर्घविधायकशास्त्र असें आहे कीं तें प्रवृत्त झाल्यास 'ङेर्यः' हें सूत्र प्रवृत्त होतेवेळीं जो सन्निपात होता त्या सन्निपाताचा, अदन्ताङ्ग दीर्घ करून, नाश करणारें आहे. तथापि 'कष्टाय क्रमणे' या सूत्रांत 'कष्टाय' असा निर्देश असल्यामुळें व त्यायोगानें ही परिभाषा अनित्य ठरत असल्यामुळें, 'सुपि च' या सूत्राची प्रवृत्ति होते हें ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत. ही परिभाषा नित्य असती तर 'सुपि च' हें सन्निपातविधायकशास्त्र प्रवृत्त होऊं शकलें नसतें. )

**नन्वेवं रामायेत्यादौ सुपि चेति दीर्घानापत्तिः । अदन्ताङ्गङेसन्निपातेन जातस्य यादेशस्य तद्विघातकत्वात् ॥**

( ही परिभाषा मानल्यास ) 'रामाय' इत्यादि स्थलीं, 'सुपि च' सू० २०२ या सूत्रान्वयें दीर्घ होऊं शकणार नाहीं; कारण अदन्त अङ्ग व 'ङे' प्रत्यय यांच्या सन्निपातामुळें 'ङे'च्या जागीं झालेला यादेश त्या सन्निपाताचा विनाश

करणाऱ्या ( ' सुपि च ' ह्या ) शास्त्राच्या प्रवृत्तीस करणीभूत होऊं शकत नाहीं. ( ' राम + ङे ' ह्या उदाहरणांत, ' ङेर्यः ' सू० २०४ ह्या सूत्रानें ' ङे 'च्या जागीं ' य ' असा आदेश होऊन ' राम + य ' अशी स्थिति झाली असतां, 'सुपि च ' ह्या सुत्रानें, यञादि सुप्प्रत्यय पुढें असतां अदन्ताङ्गाचा अन्त्यस्वर दीर्घ होत असल्यामुळें, 'रामाय' असें रूप होतें. आतां शंकाकार अशी शंका करितो कीं, ' राम+ ङे ' ह्या स्थलीं, अदन्त अङ्ग व 'ङे' प्रत्यय ह्यांच्या सन्निपातामुळें ' ङे ' च्या जागीं यादेश होत असल्यामुळें, त्या सन्निपाताचा नाश करणाऱ्या ' सुपि च ' ह्या सूत्राची प्रवृत्ति, ह्या परिभाषेप्रमाणें, होऊं नये; कारण ' सुपि च ' हें सूत्र प्रवृत्त झाल्यास, ' राम ' ह्यांतील अन्त्य अकाराचे जागीं आकार होऊन अदन्त अङ्ग नष्ट झाल्यानें, सन्निपाताचा नाश होणार. )

**न च यञादित्वसापेक्षदीर्घस्य बहिरङ्गतयाऽसिद्धत्वान्नात्रसन्निपातविघात इति वाच्यम् । आरोपितासिद्धत्वेऽपि वस्तुतस्तद्विघातस्य जायमानत्वेनैतत्प्रवृत्तेः ।**

यञादिप्रत्यय पुढें असतां अदन्ताङ्ग दीर्घ होत असल्यामुळें, हें दीर्घकार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरतें, आणि त्यामुळें सन्निपाताचा नाश झाला नाहीं असें मानतां येतें—असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण दीर्घकार्य झाल्यावर, तें बहिरङ्ग असल्यामुळें, झालेंच नाहीं असा त्याचे ठिकाणीं जरी असिद्धत्वाचा आरोप करता येतो तरी, सन्निपाताचा नाश करणारें कार्य प्रवृत्त होतेवेळींच ही परिभाषा प्रवृत्त होत असते ( व तें कार्य होऊं देत नाहीं. ' राम + ङे ' ह्या स्थलीं, ' ङे ' च्या जागीं यादेश होणें हें अन्तरङ्ग कार्य आहे, व यञादि सुप् प्रत्ययाला मानून होणारें दीर्घकार्य बहिरङ्ग आहे. म्हणून दीर्घ कार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरत असल्यामुळें, दीर्घ झालाच नाहीं असें मानतां येतें; व तसें मानल्यास, सन्निपाताचा नाश झाला नाहीं, व सन्निपात पूर्ववत् कायमच आहे असें मानण्यांत कांहींच हरकत नाहीं— अशी कोणी शंका केल्यास ह्या शंकेवर शंकाकार असें उत्तर देतो कीं, हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण सन्निपाताचा नाश करण्यास कारणीभूत असें दीर्घकार्य करणारें सूत्र प्रवृत्त होतेवेळींच, ही परिभाषा एकदम प्रवृत्त होते, व दीर्घकार्य मुळींच होऊं देत नाहीं. त्यामुळें ' राम + य ' येथें दीर्घ होऊं शकत नाहीं. ' रामाय ' असें दीर्घकार्य झाल्यानंतर जर ही परिभाषा लागू पडली असती तरच शंका योग्य ठरली असती, असें वरील शंकेसम्बन्धानें शंकाकाराचें उत्तर आहे. )

**किं चान्तरङ्गे कर्त्तव्ये बहिरङ्गस्यासिद्धत्वेऽपि तत्र कृते तस्यासिद्धत्वे मानाभावः ।**

( वास्तविक ' रामाय ' या स्थलीं अन्तरङ्गपरिभाषा लागूच पडत नाहीं असें शंकाकार सिद्ध करूं इच्छितो व म्हणतो कीं, ) दुसरें असें कीं अन्तरङ्गकार्य करतेवेळीं

( पूर्वी झालेलें किंवा युगपत् प्राप्त असलेलें ) बहिरङ्गकार्य जरी असिद्ध ठरतें तरी, अन्तरङ्गकार्य झाल्यानंतर प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरतें असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. (प० ५० मध्यें ग्रन्थकारानें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं 'अन्तरङ्गे कर्तव्ये जातं तत्कालप्राप्तिकं च बहिरङ्गमसिद्धम् ' पण ' भविष्यद्बहिरङ्गमसिद्धं भवति ' असें म्हटलें नाहीं. कारण तसें म्हणण्यास कांहींच प्रमाण नाहीं. सारांश अन्तरङ्गकार्य केल्यानंतर पुढें प्राप्त होणारें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरत नसल्यामुळें, आणि ' राम+ङे' येथें ' ङे ' च्या जागीं यादेशरूपी अन्तरङ्गकार्य झाल्यानंतरच दीर्घरूप बहिरङ्गकार्याची प्राप्ति होत असल्यामुळें, तसें बहिरङ्गकार्य असिद्ध मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. म्हणून अन्तरङ्गकार्य झाल्यावर जेव्हां बहिरङ्ग दीर्घकार्याची प्राप्ति होऊन 'रामा' असा दीर्घ होतो तेव्हां त्याला असिद्ध मानतां येत नाहीं, आणि 'रामा' असा दीर्घ झाल्यानें अदन्ताङ्ग नष्ट होऊन सन्निपाताचा नाश होत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें दीर्घ कार्य होऊं शकत नाहीं असें शंकाकाराचें म्हणणें आहे. )

**किं चातिदेशिकसान्निपातविघाताभावमादायैतदप्रवृत्तौ गौरीत्यादौ संबुद्धिलोपेऽपि स्थानिवत्वेन ह्रस्वनिमित्तसन्निपातविघाताभावात्तत्रैतस्या- तिव्याप्तिपरकृन्मेजन्तइति सूत्रस्थभाष्यासङ्गतिः ।**

दुसरें असें कीं, जेथें सन्निपाताच्या नाशाचा अभाव अतिदेशानें मानला जाऊं शकतो—म्हणजे सन्निपाताचा वास्तविक नाश झाला असून देखील तो नाश असिद्धत्वा-मुळें किंवा स्थानिवद्भाव मानल्यानें, झालाच नाहीं असें जेथें मानलें जाऊं शकतें—तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं असें मानल्यास, ' गौरि ' इत्यादि स्थलीं ( ' गौरी+-सु ' या स्थलीं, संबुद्धीचा ' सु ' प्रत्यय पुढें आला असल्यामुळें, 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' सू० २६७ या सूत्रानें ह्रस्व होऊन ' गौरि +सु ' अशी स्थिति झाली असतां, 'एङ्-ह्रस्वात्सम्बुद्धेः ' सू० १९३ या सूत्रानें ) संबुद्धीचा जरी लोप होतो तरी, तो लोप-रूपी आदेश ' सु ' प्रत्ययच आहे असें स्थानिवद्भावानें मानलें तर—म्हणजे ह्रस्वा-मुळें झालेल्या संबुद्धिप्रत्ययाचा नाश झालाच नाहीं व तो प्रत्यय पुढेंच आहे आणि त्यामुळें सन्निपाताचा विघात झालाच नाहीं आणि सन्निपात जसाचा तसाच कायम आहे असें मानलें तर—' कृन्मेजन्तः ' १–१–३९ या सूत्रावरील ज्या भाष्यांत प्रकृत परि-भाषेच्या ठिकाणीं अतिव्याप्तिरूप दोष दाखविला आहे त्या दोषकथनपर भाष्याशीं वरील म्हणणें विसङ्गत ठरेल. ( कारण त्या भाष्यांत असें सांगितलें आहे कीं, ' गौरी +सु ' येथें संबुद्धीच्या ' सु ' प्रत्ययामुळें झालेलें ह्रस्वकार्य, प्रकृत परिभाषा नित्य मानल्यास, सुप्रत्ययाचा नाश करूं शकणार नाहीं, आणि या परिभाषेंत असा दोष येत असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य मानणें भाग आहे. सुलोप होत असून देखील ' स्थानिवदादेशः ' या सूत्रान्वयें तो झालाच नाहीं असें अतिदेशानें मानल्यावर प्रकृत परिभाषा वरील उदाहरणांत लागू पडली नसती तर, भाष्यकारांनीं त्या स्थलीं प्रकृत

परिभाषा लावली नसती व सुलोपामुळें सन्निपाताचा नाश होतो–असें म्हटलें नसतें आणि प्रकृतपरिभाषा अनित्य असल्यामुळें सुलोप होतो असें म्हणण्याची भाष्यकारास कांहींच गरज नव्हती. सारांश या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें सन्निपाताच्या नाशाचा अभाव अतिदेशानें मानला जाऊं शकतो तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं हें म्हणणें चूक आहे; कारण तशा ठिकाणीं देखील भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषा लावली आहे आणि तिच्यांत अतिव्याप्तिरूप दोष दाखविला आहे. )

सन्निपातस्याशास्त्रीयत्वान्नात्र स्थानिवत्वमिति चेत्तर्ह्यत्रासिद्धत्वमपि कथमिति विभावय । अशास्त्रीयेऽसिद्धत्वाप्रवृत्तेरीदूदेदिति सूत्रे कैयटेन स्पष्टमुक्तत्वात् । एवं च पूर्वत्रासिद्धीयेऽपि कार्ये एतत्परिभाषाप्रवृत्तिर्भवत्येवेति चेन्न । कष्टायेति निर्देशेनैतस्या अनित्यत्वात् ॥

सन्निपात अशास्त्रीय असल्यामुळें ( सन्निपाताचा नाश झाला नाहीं व तो कायमच आहे हें सिद्ध करण्याकरितां ) जर स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं तर ( सन्निपाताचा विघात झाला असून तो सन्निपात कायमच आहे हें सिद्ध करण्याकरितां ) असिद्धत्व तरी कसें मानतां येतें याबद्दल तुम्ही विचार करावा; कारण 'ईदूदेत्' १-१-११ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं अशास्त्रीय कार्याच्या सिद्धिकरितां असिद्धत्व मानलें जाऊं शकत नाहीं. ( 'एकपदप्रतिपाद्यत्वं शास्त्रीयत्वमनेकपदप्रतिपाद्यत्वमशास्त्रीयत्वम्' अशी शास्त्रीय व अशास्त्रीय कार्यांची व्याख्या आहे. जें कार्य पाणिनीय सूत्रांत विधेयरूपानें प्रतिपादित केलें आहे तें कार्य शास्त्रीय होय; जें कार्य तशा रीतीनें प्रतिपादित केलें नाहीं तें अशास्त्रीय होय. जसें 'एकाचो द्वे प्रथमस्य' या सूत्रांत द्वित्वाचें विधान केलें आहे म्हणून तें द्वित्वकार्य शास्त्रीयकार्य आहे. पण एकाच्त्वाचें कोठेंहि विधान केलें नसल्यामुळें एकाच्त्व अशास्त्रीय आहे. तसेंच सन्निपाताचें पाणिनीय शास्त्रांत कोठेंहि विधान केलें नसल्यामुळें सन्निपात अशास्त्रीय ठरतो. अशा अशास्त्रीय सन्निपाताचा नाश झाला असून देखील तो कायमच आहे हें सिद्ध करण्याकरितां स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं; कारण शास्त्रीय कार्यांची सिद्धि करण्याकरितांच स्थानिवद्भाव मानतां येतो. ह्यावर शंकाकार असें म्हणतो कीं जसा अशास्त्रीयकार्याची सिद्धि करण्याकरितां स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं तसेंच अशा ठिकाणीं असिद्धत्व देखील मानतां येत नाहीं; कारण शास्त्रीयकार्य करण्याकरितांच असिद्धत्व मानतां येते असें कैयटानें स्पष्ट म्हटलें आहे. मग 'राम+ङे' अशा स्थितींत, 'ङे' च्या जागीं यादेशरूपी अन्तरङ्गकार्य झाल्यावर त्या यादेशाला मानून होणारें बहिरङ्ग दीर्घकार्य, सन्निपाताचा नाश झाला नाहीं हें दाखविण्याकरितां, असिद्ध कसें मानतां? सारांश 'रामाय' या स्थलीं होणाऱ्या दीर्घकार्याला असिद्ध मानतां येत नाहीं. म्हणून त्या ठिकाणीं, प्रकृत परिभाषा असल्यामुळें, 'सुपि च' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व 'रामाय' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं

अशी शंकाकाराची शंका आहे, व तो म्हणतो कीं ज्याअर्थी अशास्त्रीय कार्य करतेवेळीं दुसरें कोणतेंहि कार्य असिद्ध मानतां येत नाहीं त्याअर्थी जरी सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे तरी ) त्रिपादींतील सूत्रांनीं होणाऱ्या कार्याला देखील प्रकृतपरिभाषा लागू पडते. ( कारण अशास्त्रीय सन्निपातरूपी कार्याचें प्रतिपादन करणाऱ्या प्रकृत परिभाषेच्या दृष्टीनें कोणतेंहि कार्य, मग तें सापादिक असो अथवा त्रैपादिक असो, असिद्ध ठरूं शकत नाहीं. येथें हें लक्षांत असूं द्यावें कीं प्रकृत परिभाषा त्रिपादीस लागू पडते हें शंकाकाराचें म्हणणें आहे. वास्तविक सिद्धांतपक्ष असा आहे कीं ही परिभाषा सपादसप्ताध्यायींत पठित असल्यामुळें त्रिपादीस लागू पडत नाहीं. ' ननु एवं रामायेत्यादौ ' येथून ' भवत्येवेति चेत् ' पर्यंत शंकाग्रन्थ आहे, व या शंकाग्रन्थांत अनेक शंका उपस्थित करून शंकाकारानें त्या सर्व शंकांचें निरसन केलें आहे. त्याचें थोडक्यांत म्हणणें हें आहे कीं ' रामाय ' या स्थलीं, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, दीर्घकार्य होऊं शकत नाहीं व 'रामाय' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं या शंकेवर ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ) वरील शंका बरोबर नाहीं, कारण ' कष्टाय क्रमणे ' सू० २६७० या सूत्रांत ' कष्टाय ' असा निर्देश असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते. ( सारांश ही परिभाषा असल्यामुळें ' रामाय ' हें रूप सिद्ध करण्यांत ज्या अडचणी उपस्थित होतात त्याच अडचणी ' कष्टाय ' हें रूप सिद्ध करण्यांत देखील उपस्थित होतात. पण ज्याअर्थी पाणिनीनें वरील सूत्रांत ' कष्टाय ' असा प्रयोग केला आहे त्याअर्थी हें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे व इष्टरूप सिद्ध करतेवेळीं जेथें ती आड येत असेल तेथें ती न लावतां इष्टरूपाची सिद्धि करावी. )

**ययोः सन्निपातस्य विघातकं शास्त्रं तयोः सन्निपातनिमित्तकविधावुपादानमपेक्षितमिति तु नाग्रहः। अत एव दाक्षिरित्यत्राकारान्तप्रकृतीञ्सन्निपातनिमित्ताङ्गसंज्ञानया परिभाषयाल्लोपस्य निमित्तं न स्यादित्याशङ्कयानित्यत्वेन समाहितं कृन्मेजन्त इति सूत्रे भाष्ये, न ह्यङ्गसंज्ञायामदन्तस्याङ्गसंज्ञेत्युक्तमस्ति ॥**

इतर सूत्रांची प्रवृत्ति झाली असतां, ज्या दोहोंच्या सन्निपाताचा नाश होत असेल त्या दोहोंचा निर्देश, त्या दोहोंच्या सन्निपातामुळें होणारें कार्य ज्या सूत्रांत सांगितलें आहे त्या सूत्रांत, केलाच असला पाहिजे अशी कांहीं आवश्यकता नाहीं. ( तसा निर्देश त्या सूत्रांत केला नसला तरी ही परिभाषा प्रवृत्त होते आणि सन्निपाताचा नाश करणारें कार्य ज्या सूत्रांत सांगितलें आहे त्या सन्निपातविघातक सूत्राची प्रवृत्ति होऊं देत नाहीं.) असें आहे म्हणूनच ' दाक्षिः ' या स्थलीं अकारान्त प्रकृति 'दक्ष' व ' इञ् ' प्रत्यय या दोहोंच्या सन्निपातामुळें झालेली अङ्गसंज्ञा, ही परिभाषा असल्यामुळें, ' दक्ष ' यांतील अकाराच्या लोपाच निमित्त होऊं नये अशी शंका उपस्थित करून भाष्यकारांनी 'कृन्मेजन्तः' १-१-१९ या सूत्रावरील भाष्यांत,

ही परिभाषा अनित्य आहे असें म्हणून, त्या शंकेचें समाधान केलें आहे; अङ्ग-संज्ञाविधायक सूत्रांत अदन्त प्रकृतीला अङ्गसंज्ञा होते असें विधान केलें नाहीं. ( 'दाक्षिः ' या उदाहरणांत ' अत इञ् ' या सूत्रानें ' दक्ष ' या अदन्त प्रकृतीस ' इञ् ' प्रत्यय लागला असतां, अदन्त प्रकृति व इञ् प्रत्यय या दोहोंचा सन्निपात होतो व त्या सन्निपातामुळें ' यस्मात् प्रत्ययविधिः ' सू० १९९ या सूत्रान्वयें 'दक्ष' याला अङ्गसंज्ञा प्राप्त होते. सारांश 'यस्मात् प्रत्ययविधिः' हें सूत्र प्रकृति व प्रत्यय यांचा सन्निपात झाला असतां, प्रकृतीला अङ्गसंज्ञा होण्यास निमित्त होतें. या सन्निपाताचा नाश करणारें ' यस्येति च ' सू० ३११ हें सूत्र आहे; तें सूत्र प्रवृत्त झाल्यास प्रकृतीचें अदन्तत्व नष्ट होत असल्यामुळें अदन्तप्रकृति व इञ्प्रत्यय यांच्या सन्निपाताचा नाश होतो. हें खरें कीं ' यस्मात् प्रत्ययविधिः ' या अङ्गसंज्ञा-विधायकसूत्रांत ज्या दोहोंच्या—म्हणजे अदन्त प्रकृति व प्रत्यय यांच्या—सन्निपा-ताचा, ' यस्येति च ' हें सूत्र प्रवृत्त झाल्यानें, नाश होणार आहे त्यांचें ग्रहण केलें नाहीं. पण सन्निपातनिमित्तकसूत्रांत तसें ग्रहण केलें असलेंच पाहिजे असा कांहीं आग्रह नाहीं. म्हणून ' दाक्षिः ' या उदाहरणांत प्रकृत परिभाषा लागू पडते. पण ती लावल्यास ' यस्येति च ' हें सन्निपातविघातकसूत्र प्रवृत्त होऊं शकणार नाहीं, व तें सूत्र प्रवृत्त न झाल्यास ' दाक्षिः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही; म्हणून भाष्यकारांनीं ही परिभाषा अनित्य मानून ' दाक्षिः ' हें रूप, ही परिभाषा न लावतां, सिद्ध केलें आहे. सारांश ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, जेथें ती लाव-ल्यास इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं तेथें ती न लावतां इष्ट रूपाची सिद्धि करून घ्यावी. )

**न च कुम्भकारेभ्य आधय इत्यादावव्ययसंज्ञाया अनया परिभाषया वारणपरभाष्यासङ्गतिः । अनया परिभाषया लुग्मा भूत् । अव्ययत्वं तु स्यादेव । लुका हि तदीयसन्निपातस्य विघातो नाव्ययसंज्ञया । संज्ञाफलं त्वकच् स्यादिति वाच्यम् । एतदुदाहरणपरभाष्यप्रामाण्येन साक्षात्परंपरया वा स्वनिमित्तसन्निपातविघातकस्य स्वयमनिमित्तमित्यर्थेनादोषात् । एते-नात्राकच् स्यादित्यपास्तम् ॥**

( पुन्हा शंकाकार असें म्हणतो कीं ) 'कुम्भकारेभ्यः ' ' आधये ' इत्यादि स्थलीं, ही परिभाषा असल्यामुळें, ' कुम्भकारे ' व ' आधे ' ह्यांना अव्ययसंज्ञा प्राप्त होत नाहीं असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. ह्या परिभाषेमुळें लुक् होत नाहीं हें म्हणणें बरोबर आहे; परंतु ' कुम्भकारे ' व 'आधे' ह्यांना अव्ययसंज्ञा प्राप्त होण्यांत ही परिभाषा आड येत नाहीं. ह्याचें कारण असें कीं, लुक् झाल्यास, सन्निपाताचा नाश होतो, पण अव्ययसंज्ञा प्राप्त झाल्यानें सन्निपाताचा नाश होत नाहीं व त्या संज्ञेमुळें ' अकच् ' प्रत्यय होऊं शकतो.

( 'कर्मण्यण् ' सू० २९१३ ह्या सूत्रानें ' अण् ' हा कृत्प्रत्यय होऊन ' कुम्भकार ' असें कृत्प्रत्ययान्त अदन्त प्रातिपदिक होतें. ह्या अदन्त प्रातिपदिकाचें चतुर्थीचें बहुवचन करितांना ' कुम्भकार + भ्यः ' अशी स्थिति झाली असतां, ' बहुवचने झल्येत् ' सू० २०५ ह्या सूत्रानें ' कुम्भकार ' ह्याच्या अन्त्य अकाराचे जागीं एकार होऊन ' कुम्भकारे + भ्यः ' अशी स्थिति होते. ' कुम्भकारे ' हें एजन्त कृदन्त असल्यामुळें,' कृन्मेजन्तः ' सू० ४४९ ह्या सूत्रानें त्याला अव्ययसंज्ञा प्राप्त झाल्यास, ' अव्ययादाप्सुपः ' सू० ४५२ ह्या सूत्रानें ' भ्यस् ' प्रत्ययाचा लुक् होऊं पाहतो. तसेंच, ' आधि ' हा शब्द, ' उपसर्गे घोः किः ' सू० ३२७० ह्या सूत्रानें ' कि ' हा कृत्प्रत्यय होऊन, झाला असल्यामुळें, कृत्प्रत्ययान्त आहे. ह्याचें चतुर्थीचें एकवचनाचें रूप करितांना ' आधि + ङे ' अशी स्थिति झाली असतां, ' घेर्ङिति ' सू० २४५ ह्या सूत्रानें ' आधि ' ह्यांतील अन्त्य इकाराचा गुण होऊन ' आधे + ङे ' अशी स्थिति होते. ' आधे ' हें एजन्त कृदन्त असल्यामुळें, 'कृन्मेजन्तः ' ह्या सूत्रान्वयें त्याला अव्ययसंज्ञा प्राप्त होऊं पाहते व ' अव्ययादाप्सुपः ' ह्या सूत्रानें ' ङे' प्रत्ययाचा लुक् होऊं पाहतो. अशा स्थलीं भाष्यकारांनीं ही परिभाषा लावली आहे व म्हटलें आहे कीं, ही परिभाषा असल्यामुळें, ' कुम्भकारे ' व ' आधे ' ह्यांना अव्ययसंज्ञा प्राप्त होत नाहीं; व अवयवसंज्ञा प्राप्त होत नसल्यामुळें, सुब्लुक्हि होत नाहीं. ह्यावर शंकाकार असें म्हणतो कीं, 'कुम्भकार+भ्यः' ह्या उदाहरणांत 'कुम्भकार' ही अदन्त प्रकृति व ' भ्यस् ' हा बहुवचनाचा झलादि प्रत्यय ह्या दोहोंच्या सन्निपातामुळें एत्व होत असल्यामुळें, तें एत्व त्या सन्निपाताचा नाश करूं शकत नाहीं, व त्यामुळें ' भ्यस् ' प्रत्ययाचा लुक् होऊं शकत नाहीं. कारण ' भ्यस् ' प्रत्ययाचा लुक् झाल्यास सन्निपाताचा नाश होणार; तसेंच ' आधि + ङे ' ह्या उदाहरणांत, घिसंज्ञक ' आधि ' शब्द व ' ङे ' हा ङित् प्रत्यय ह्या दोहोंच्या सन्निपातामुळें गुण झाला आहे. म्हणून तो गुण त्या सन्निपाताचा नाश करूं शकत नाहीं, व त्यामुळें ' ङे ' प्रत्ययाचा लुक् होऊं शकत नाहीं:— असें जें भाष्यकारांनीं ह्या परिभाषेचा उपयोग करून म्हटलें आहे तें बरोबर आहे; परंतु भाष्यकारांनीं ' कुम्भकारे ' व ' आधे ' ह्यांना, ही परिभाषा असल्यामुळें, अव्ययसंज्ञा देखील प्राप्त होत नाहीं असें जें म्हटलें आहे तें म्हणणें बरोबर दिसत नाहीं असें शंकाकार म्हणतो, व त्याचें कारण तो असें देतो कीं, प्रत्ययाचा लुक् झाल्यानें जसा सन्निपाताचा नाश होतो असा अव्ययसंज्ञा झाल्यानें सन्निपाताचा नाश होत नाहीं. केवळ अव्ययसंज्ञा प्राप्त होऊन फायदा काय ? असा कोणी प्रश्न केल्यावर, शंकाकार असें उत्तर देतो कीं, अव्ययसंज्ञा प्राप्त झाल्यानें, ' अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः ' सू० २०२६ ह्या सूत्रानें ' अकच् ' होऊं शकतो, व तो ' अकच् ' ' टि'च्या पूर्वी होत असल्यामुळें, सन्निपाताचा नाश न होतां, तो सन्निपात जसाचा तसाच कायम राहतो. म्हणून ' कुम्भकारे ' व ' आधे ' ह्यांना अव्ययसंज्ञा व ' अकच् ' होण्यांत

ही परिभाषा आड येत नाहीं. ह्या शंकेवर ग्रंन्थकार असें म्हणतात कीं, ही शंका बरोबर नाहीं; कारण ), ज्या भाष्यांत वरील दोन—म्हणजे अकच्रहित 'कुम्भकारे' व 'आधे' हीं—उदाहरणें दिलीं आहेत, त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, दोहोंच्या सन्निपातामुळें होणारें कार्य त्या सन्निपाताच्या साक्षात् किंवा परंपरेनें देखील नाश करण्यास कारण होऊं शकत नाहीं असा ह्या परिभाषेचा अर्थ समजला पाहिजे, व ह्या अर्थ मानल्यास कांहींच दोष उपस्थित होत नाहीं व अशा ठिकाणीं 'अकच्' होऊं शकतो असें जें (शंकाकारानें) म्हटलें आहे तें म्हणणें देखील चूक ठरतें. ('कुम्भकार + भ्यस्' व 'आधि + ङे' ह्या उदाहरणांतील सन्निपातामुळें एत्व व गुण अनुक्रमें होतात, व त्यामुळें 'कुम्भकारे आणि 'आधे' ह्यांना अव्ययसंज्ञा होऊं पाहते; व अव्ययसंज्ञा झाल्यास, त्या अव्ययसंज्ञेच्या द्वारा, सुब्लुक् व अकच् होऊं पाहतात. अव्ययसंज्ञेमुळें सुब्लुक् होऊन सन्निपाताचा नाश होणार असल्यामुळें अव्ययसंज्ञा होत नाहीं, व अव्ययसंज्ञा होत नसल्यामुळें, अव्ययसंज्ञाद्वारा होणारें 'अकच्' कार्य देखील होत नाहीं. )

न च कार्यकालपक्षे लुगेकवाक्यतापन्नसंज्ञाबाधेऽप्यकजेकवाक्यतापन्ना संज्ञास्यादिति वाच्यम् । अन्तरङ्गायां तदेकवाक्यतापन्नसंज्ञायां बहिरङ्गगुणादेरसिद्धत्वात्, लुगेकवाक्यतापन्ना तु न गुणादितोऽन्तरङ्गोभयोरपि शब्दतः सुबाश्रयत्वात् ॥

कार्यकालपक्षामध्यें 'कृन्मेजन्तः' हें अव्ययसंज्ञाविधायक सूत्र 'अव्ययादाप्सुपः' ह्या सूत्राजवळ जाऊन दोन्ही सूत्रांचें एक वाक्य बनलें असतां, 'कुम्भकारे' व 'आधे' ह्यांना (ही परिभाषा असल्यामुळें) अव्ययसंज्ञा प्राप्त न होणें हें योग्य आहे (कारण यांना अव्ययसंज्ञा प्राप्त झाल्यास 'भ्यस्' व 'ङे' ह्या विभक्तिप्रत्ययांचा लुक् होणार, व लुक् झाल्यास, 'कुम्भकार+भ्यस्' व 'आधि+ङे' ह्यांच्या सन्निपाताचा नाश होणार ) पण 'कृन्मेजन्तः' हें सूत्र 'अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः' ह्या सूत्राजवळ कार्यकालपक्षांत जाऊन दोहोंचें एक वाक्य बनलें असतां, 'कुम्भकारे' व 'आधे' ह्यांना अव्ययसंज्ञा प्राप्त होण्यास कांहींच हरकत नाहीं. (कारण अव्ययसंज्ञा प्राप्त होऊन 'अकच्' झाल्यास, तो 'टि' पूर्वीं होत असल्यामुळें सन्निपाताचा नाश करीत नाहीं )—असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'कृन्मेजन्तः' हें सूत्र 'अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः' ह्या सूत्राजवळ जाऊन त्या सूत्राशीं एकवाक्यतापन्न झालें असतां, अव्ययसंज्ञा अन्तरङ्ग ठरते, व एत्व आणि गुणकार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरतात. ('कुम्भकार+भ्यस्=कुम्भकारे+भ्यस्,' व 'आधि+ङे=आधे+ङे' ह्या उदाहरणांत, 'कुम्भकारे' व 'आधे' ह्या कृदन्तांना, त्यांच्या अन्तीं एकार असल्यामुळें, त्या एकारवर्णाला मानून होणारी अव्ययसंज्ञा आहे; पण एकार जो झाला आहे तो पलीकडे असणाऱ्या 'भ्यस्' व 'ङे' ह्या प्रत्ययामुळें झाला आहे. अव्यय-

संज्ञा पूर्वोपस्थितनिमित्तक असल्यामुळें अन्तरङ्ग आहे; व पुढें असणाऱ्या निमित्तामुळें झालेलें ' एत्व ' बहिरङ्ग व असिद्ध ठरतें. त्यामुळें तें एत्व झालेंच नाहीं असें, बहिरङ्ग परिभाषेप्रमाणें, मानलें पाहिजे; व एत्व झालेंच नाहीं असें मानल्यास,—म्हणजे 'कुम्भकारे ' व ' आधे ' हे एकारान्त नाहींत असें मानल्यास,— ' कृन्मेजन्तः ' ह्या सूत्रानें त्यांना अव्ययसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें ' अकच् ' होऊं शकत नाहीं. ) परंतु ' कृन्मेजन्तः ' हें सूत्र 'अव्ययादाप्सुपः' ह्या सूत्राशीं एकवाक्यतापन्न झाल्यावर ' कुम्भकारे ' व 'आधे' ह्यांना प्राप्त होणारी अव्ययसंज्ञा, एत्व व गुण ह्यांच्या मानानें, अन्तरङ्ग ठरत नाहीं; कारण दोन्हीं कार्यें ' सुप् ' प्रत्ययरूपी एकाच निमित्तामुळें होणारीं कार्यें आहेत ('कृन्मेजन्तः ' हें अव्ययसंज्ञाविधायक सूत्र ' अव्ययादाप्सुपः ' या लुक्विधायक सूत्राजवळ जाऊन जेव्हां त्याशीं एकवाक्यतापन्न होतें तेव्हां त्या दोहोंचा मिळून असा अर्थ होतो कीं, ' सुपि परे यदेजन्तं तत् अव्ययं भवति, तत्परस्य सुपो लुक् भवति '—म्हणजे एजन्त शब्दापुढें विभक्तिप्रत्यय आल्यास, त्या एजन्त शब्दाला अव्ययसंज्ञा प्राप्त होते, व पुढें असलेल्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो. असा अर्थ भाष्यकारांनींच केला असल्यामुळें, तो स्वीकारणें भाग आहे. त्या अर्थाप्रमाणें, जसें एत्व व गुणकार्य विभक्तिप्रत्यय पुढें असल्यामुळें होतें, तसेंच अव्ययसंज्ञा देखील विभक्तिप्रत्यय पुढें असल्यामुळेंच होते. दोहोंचें निमित्त एकच असल्यामुळें, एक कार्य अन्तरङ्ग व दुसरें कार्य बहिरङ्ग असें मानतां येत नाहीं, व दोन्हीं कार्यें सारखीं असल्यामुळें, येथें बहिरङ्ग परिभाषा नं०५० लागू पडत नाहीं,आणि त्यामुळें येथें प्रकृत परिभाषा लावणें भाग आहे; व ही परिभाषा लावल्यास, सन्निपातामुळें झालेलें एत्व व गुणकार्य, त्या सन्निपाताचा परंपरेनें नाश करणाऱ्या अव्ययसंज्ञाप्राप्तिरूपकार्याची, प्रवृत्ति होऊं देत नाहीं, व अव्ययसंज्ञा होत नसल्यामुळें सुब्लुक् होत नाहीं आणि इष्ट रूपें सिद्ध होतात. )

**न यासयोरिति निर्देशाच्चैषाऽनित्या तेन नातिप्रसङ्गः । स्पष्टा चेयं कृन्मेजन्त इति सूत्रे भाष्ये ॥ अस्या अनित्यत्वे फलानि भाष्ये परिगणितानि ।**

' न यासयोः ' सू० ४६४ ह्या सूत्रांत ' या ' ' सा ' अशा रूपांचा निर्देश केला असल्यामुळें ही परिभाषा अनित्य आहे असें सिद्ध होतें; व ही अनित्य असल्यामुळें, जेथें ही लावली असतां, इष्टरूप सिद्ध होत नाहीं तशा ठिकाणीं ही लावली जात नसल्यामुळें अनिष्टरूपें सिद्ध होण्याची आपत्ति टळते. ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, हिचा सर्वत्र उपयोग केल्यास, जेथें जेथें दोष उत्पन्न होतील तीं सर्व स्थळें भाष्यकारांनीं मोजून काढलीं आहेत. ( व तीं स्थळें खालीं दिलीं आहेत. )

**वर्णाश्रयः प्रत्ययो वर्णविचालस्यानिमित्तम् । दाक्षिः ॥**

(१) 'दाक्षिः' या स्थलीं वर्णाला मानून होणारा प्रत्यय त्या वर्णाच्या नाशास कारण होऊं शकणार नाहीं. (पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, ' अत इञ् ' सू०

१०९५ ह्या सूत्रान्वयें 'अ' वर्णास मानून–म्हणजे अदन्त प्रातिपदिकास–होणारा अपत्यार्थे 'इञ्' प्रत्यय, 'दाक्षिः' ह्या उदाहरणांत 'यस्येति च' सू० ३११ ह्या सन्निपातविघातक सूत्राची प्रवृत्ति करून त्या 'अ' वर्णाच्या नाशास कारण होतो, व 'दाक्षिः' असें रूप होतें. )

आत्वं पुग्विधेः । क्रापयति ॥

(२) आत्व झाल्यावर, 'क्रापयति' या स्थलीं पुगागम होऊं शकणार नाहीं. ('डुक्रीञ् द्रव्यविनिमये' ह्या धातूहून 'णिच्' केल्यास, 'अचो ञ्णिति' सू० २५४ ह्यानें वृद्धि होऊन 'क्री + णिच्=क्रै + णिच्' अशी स्थिति झाली असतां, 'क्रीङ्जीनां णौ' सू० २६०० ह्या सूत्रानें एचाचे ठिकाणीं आत्व होऊन 'क्रा+णि' अशी स्थिति होते; व आत्व झाल्यामुळें, 'अर्तिह्रीव्ली सू० २५७० ह्या सूत्रानें पुगागम होतो व 'क्राप्+णि(इ)+अ+ति=क्रापि+अति=क्रापे+अति=क्रापयति' असें रूप होतें. ह्या उदाहरणांत, 'क्री' व 'णिच्' ह्यांच्या सन्निपातामुळें आत्व झालें आहे. हें आत्व, त्या सन्निपाताचा विनाशक जो पुगागम, त्याच्या प्रवृत्तीस, ह्या परिभाषेप्रमाणें, कारणीभूत होऊं नये. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, आत्व पुगागमास प्रवृत्त होऊं देतें; आणि त्यामुळें 'क्रापयति' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

पुग्ह्रस्वत्वस्य । अदीदपत् ॥

(३) 'अदीदपत्' या स्थलीं पुगागम झाल्यावर ऱ्हस्व होऊं शकणार नाहीं. ('अ +दा+णि+चङ्+त्' अशा स्थितींत, 'अर्तिह्रीव्ली' सू० २५७० ह्या सूत्रानें आदन्त 'दा' धातूस पुगागम होऊन 'अ+दाप्+णि+चङ्+त्' अशी स्थिति झाली असतां, 'णौ चङि उपधाया ऱ्हस्वः' सू० २३१४ ह्या सूत्रानें 'दाप्' ह्यांतील 'आ' ह्या उपधेचा ऱ्हस्व होतो. या स्थलीं आकारान्त 'दा' धातु व 'णिच्' प्रत्यय ह्यांच्या सन्निपातामुळें पुगागम झाला आहे, व ह्या परिभाषेप्रमाणें, त्या पुगागमानें, सन्निपाताचा नाश करणाऱ्या उपधाऱ्हस्वकार्यास, प्रवृत्त होऊं देऊं नये; कारण ऱ्हस्व झाल्यानें, 'दा' धातूंतील आकार नष्ट होऊन त्याचे जागीं अकार होतो. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, पुगागम ऱ्हस्वकार्य होऊं देतो. )

त्यदाद्यकारष्टाब्विधेः । या सेति ॥

(४) 'त्यद्' इत्यादि स्थलीं अकार झाल्यावर 'टाप्' होऊं शकणार नाहीं. ('त्यदादीनामः' सू० २५६ ह्या सूत्रान्वयें त्यदादि सर्वनामांपुढें विभक्तिप्रत्यय आल्यास, त्यांच्या अन्त्यवर्णाचे जागीं 'अ' असा आदेश होतो. जसें—'यत् + सु=य + अ + सु' अशा स्थितींत, 'अतो गुणे' सू० १९१ ह्या सूत्रानें पररूप एकादेश होऊन, 'यः' असें रूप होतें. 'य' हा अदन्त असल्यामुळें, 'अजाद्यतष्टाप्' सू० ४५४ ह्या सूत्रानें त्याला 'टाप् = आ' हा स्त्रीप्रत्यय होऊन 'या' असें रूप होतें. ह्या उदाहरणांत 'यत् + सु' ह्या दोहोंच्या सन्निपातामुळें 'यत्'

ह्यांतील अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश झाला आहे. ' टाप् ' प्रत्यय त्या सन्निपाताचा नाश करणारा आहे. कारण तो झाला म्हणजे, ' हल्ङ्याब्भ्यो दीर्घात् ' सू० २५२ ह्या सूत्रानें ' सु ' प्रत्ययाचा लोप होणार. म्हणून ह्या परिभाषेप्रमाणें, तशा सन्निपातविघातक कार्याची प्रवृत्ति होऊं नये. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, ' टाप् ' प्रत्यय होतो व ' या ', ' सा ' अशीं स्त्रीलिङ्गाचीं रूपें होतात. )

इड्विधिराकारलोपस्य । पपिवान् ।

(५) 'पपिवस्' या स्थलीं इडागम झाल्यावर आकारलोप होऊं शकणार नाहीं. (' पा + क्वसु=पपा +वस् ' अशा स्थितींत, ' वस्वेकाजाद्घसाम् ' सू० ३०९६ या सूत्रानें, वलादि ' वस् ' प्रत्ययास इडागम होऊन ' पपा + इ + वस् ' अशी स्थिति होते, व नंतर ' आतो लोप इटि च ' सू० २३७२ या सूत्रानें, इडागम पुढें असल्यामुळें, 'पपा' ह्यांतील आकाराचा लोप होऊन, 'पप्+इ+वस्=पपिवस्' असें रूप होतें. ह्या उदाहरणांत, आदन्त 'पा' धातु व 'वस्' प्रत्यय या दोहोंच्या सन्निपातामुळें इडागम झाला आहे; व आकारलोप त्या सन्निपाताचा नाश करणारा आहे; म्हणून, या परिभाषेप्रमाणें, आकारलोप होऊं नये. परंतु ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, आकारलोप होऊन ' पपिवस् ' असें रूप होतें. )

ह्रस्वनुड्भ्यां मतुप् अन्तोदात्तादुत्तरपदादिति मतुब्विभक्त्युदात्तत्वं पूर्वनिघातस्य अग्निमान् परमवाचा ॥

(६) ' ऱ्हस्वनुड्भ्यां मतुप् ' व ' अन्तोदात्तादुत्तरपदात् ' या सूत्रानीं 'मतुप्' व विभक्तिप्रत्यय अनुक्रमें उदात्त झाल्यावर ' अग्निमान् ' व ' परमवाचा ' या स्थलीं पूर्ववर्णाचा अनुदात्त स्वर होऊं शकणार नाहीं. ('अग्नि+मतुप्' ह्या स्थलीं, 'अग्नि' हा ऱ्हस्वान्त शब्द 'फिषोऽन्त उदात्तः'–फिट् सू० १ या सूत्रान्वयें, अन्तोदात्त आहे. म्हणून 'ऱ्हस्वनुड्भ्यां मतुप्' सू० ३७२२ ह्या सूत्रानें 'अग्नि' शब्दापुढील 'मतुप्', 'अनुदात्तौ सुप्पितौ' सू० ३७०९ ह्या सूत्राप्रमाणें जरी पित् प्रत्यय 'मतुप्' अनुदात्त आहे तरी, उदात्त होतो; व त्यामुळें, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू० ३६५० ह्या सूत्रानें ' अग्निमत् ' ह्या पदांतील बाकीचे स्वर अनुदात्त होतात. ह्या उदाहरणांत अन्तोदात्त प्रकृति ' अग्नि ' व ' मतुप् ' प्रत्यय ह्यांच्या सन्निपातामुळें ' मतुप् ' उदात्त झाला आहे; म्हणून ही परिभाषा नित्य मानल्यास, तो उदात्तस्वर त्या सन्निपाताच्या नाशास कारणीभूत होऊं नये, व ' अग्नि ' ह्यांतील अन्तोदात्तत्व नष्ट होऊं नये. तरी पण, ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, तसें होतें. ' परमवाचा ' हें ' परमवाच् ' शब्दाचें तृतीयाविभक्तीचें एकवचनाचें रूप आहे; म्हणून ' अन्तोदात्तादुत्तरपदात् अन्यतरस्यामनित्यसमासे ' सू० ३७१५ ह्या सूत्रान्वयें, तृतीयाविभक्तिप्रत्यय विकल्पेंकरून अन्तोदात्त होतो, व त्यामुळें, ' परमवाचा ' ह्या पदांतील बाकीचे स्वर, ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' सू० ३६५० ह्या सूत्रान्वयें, अनुदात्त होतात. ' वाच् ' याच्या

उदात्तत्वामुळें तृतीयाविभक्तीच्या प्रत्ययाला उदात्तत्व आलें आहे. म्हणून ' वाचा ' ह्यांतील ' चा ' मधील ' आ ' च्या उदात्तत्वामुळें ' वा ' मधील ' आ ' च्या उदात्तत्वाचा, ह्या परिभाषेप्रमाणें, नाश होऊं नये. पण, ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, तसें होतें. )

नदीह्रस्वत्वं संबुद्धिलोपस्य । नदि कुमारीत्यादि ॥

(७) 'नदी कुमारी' इत्यादि स्थलीं ह्रस्व झाल्यावर सम्बुद्धिप्रत्ययाचा लोप होऊं शकणार नाहीं. ( ' नदी + सु ' ह्या स्थलीं अम्बार्थनद्योर्ह्रस्वः ' सू० २६७ ह्या सूत्रानें ह्रस्व होऊन, ' नदि + सु ' अशी स्थिति झाली असतां, ' एङ्ह्रस्वात्सम्बुद्धेः ' सू० १९३ ह्या सूत्रानें संबुद्धीच्या ' सु ' प्रत्ययाचा लोप होऊन ' नदि ' असें सम्बुद्धीच्या एकवचनाचें रूप होतें. ह्या उदाहरणांत, ' नदी ' व सम्बुद्धीचा ' सु ' प्रत्यय ह्यांच्या सन्निपातामुळें झालेल्या ह्रस्वकार्यानें, ' सु ' प्रत्ययाचा लोप करून सन्निपाताचा नाश करण्यास, ह्या परिभाषेप्रमाणें, कारणीभूत होऊं नये. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, ' सु ' लोप होतो, व ' नदि ', ' कुमारि ' अशीं सम्बुद्धीच्या एकवचनाचीं रूपें होतात. )

यादेशो दीर्घत्वस्य । कष्टाय ॥

(८) 'कष्टाय' या स्थलीं 'य' असा आदेश झाल्यावर दीर्घ होऊं शकणार नाहीं. ( ' कष्ट+ङे ' या स्थलीं, ' ङेर्यः ' सू० २०४ या सूत्रानें, ' ङे ' च्या जागीं यादेश होऊन ' कष्ट + य ' अशी स्थिति झाली असतां, ' सुपि च ' सू० २०२ ह्या सूत्रानें दीर्घ होऊन 'कष्टाय' असें रूप होतें. ह्या उदाहरणांत, अदन्त प्रकृति ' कष्ट ' व ' ङे ' प्रत्यय ह्यांच्या सन्निपातामुळें यादेश झाला आहे; व ' सुपि च ' ह्या सूत्रानें होणारें दीर्घकार्य त्या सन्निपाताचा नाश करणारें आहे. म्हणून ही परिभाषा नित्य मानल्यास, यादेशानें दीर्घ कार्य होऊं देऊं नये. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, दीर्घ होऊन ' कष्टाय ' असें रूप होतें. सारांश वरील आठ उदाहरणांत ही परिभाषा लावल्यास इष्ट रूप सिद्धि होत नसल्यामुळें, ही परिभाषा तेथें न लावतां, इष्टरूपसिद्धि करून घ्यावी. )

**इतोऽन्यत्र प्रवृत्तिरेव, दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिता इति भाष्योक्तिरित्यन्यत्र विस्तरः ॥ ८६ ॥**

वर दिलेलीं उदाहरणें खेरीज करून बाकी सर्व ठिकाणीं ही परिभाषा लागू पडते; कारण भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, ( ही परिभाषा सर्वत्र लावली असतां जेथें जेथें दोष उत्पन्न होतील तीं ) सर्व दोषस्थळें वर दाखविलीं आहेत. ह्या सम्बन्धानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा ८७

**ननु पञ्चेन्द्राण्यो देवता अस्य पञ्चेन्द्र इत्यादौ द्विगोर्लुगित्यणो लुकि लुक्तद्धित इति स्त्रीप्रत्ययलुक्यानुकः श्रवणापत्तिरत आह—**

'पञ्च इन्द्राण्यः देवताः अस्य सः पञ्चेन्द्रः' इत्यादि स्थलीं, 'द्विगोर्लुगनपत्ये' सू० १०८० ह्या सूत्रानें 'अण्' प्रत्ययाचा लुक् झाला असतां, 'लुक् तद्धितलुकि' सू० १४०८ ह्या सूत्रानें स्त्रीप्रत्ययाचा लुक् होऊन, आनुक् आगम कायम राहण्याची आपत्ति येते. ('पञ्चेन्द्राण्यो देवताः अस्य' ह्या स्थलीं, 'साऽस्य देवता' सू० १२२६ ह्या सूत्रानें 'पञ्चेन्द्राणी' शब्दाहून 'अण्' प्रत्यय होतो, व 'द्विगोर्लुगनपत्ये' ह्या सूत्रानें त्या 'अण्' प्रत्ययाचा लुक् होतो, व नंतर 'लुक् तद्धितलुकि' ह्या सूत्रानें 'इन्द्राणी=इन्द्र+आनुक्+ङीष्' ह्यांतील 'ङीष्' या स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो. 'इन्द्र' शब्दास 'आनुक्' आगम व तसेंच 'ङीष्' हा स्त्रीप्रत्यय 'इन्द्र-वरुणभवशर्व' सू० ५०५ या सूत्रानें झालेले आहेत. वरील उदाहरणांत, केवळ 'ङीष्' प्रत्ययाचा लुक् झाल्यास व 'आनुक्' आगम कायम राहिल्यास, 'पञ्चेन्द्रः' असें रूप सिद्ध होणार नाहीं.) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

**सन्नियोगशिष्टानामन्यतरापाय उभयोरप्यपायः ॥ ८७ ॥**

"जेथें एखाद्या सूत्रांत दोन कार्यें एकेच वेळीं होण्याचें सांगितलें आहे तशा ठिकाणीं, एका कार्याचा नाश होत असला तर, दुसऱ्या कार्याचाहि नाश करावा—म्हणजे दोन्हीं कार्यें करूं नये."

('इन्द्रवरुणभवशर्व' ह्या सूत्रानें 'इन्द्र' शब्दास 'आनुक्' आगम व 'ङीष्' प्रत्यय हीं दोन कार्यें एकेच वेळीं होण्याचें सांगितलें आहे. त्यामुळें 'लुक् तद्धितलुकि' ह्या सूत्रानें जेव्हां 'ङीष्' प्रत्ययाचा लुक् होतो तेव्हां, त्या प्रत्ययाबरोबर झालेल्या 'आनुक्' आगमाचा देखील, या परिभाषेप्रमाणें, नाश होतो, व 'पञ्चेन्द्रः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. प्रकृतपरिभाषेची शब्दरचना विलक्षण आहे. जरी कित्येक टीकाकारांनीं 'सन्नियोगशिष्टानाम्' या बहुवचनाचें समर्थन करितांना बरीच मल्लि-नाथी केली आहे तथापि ती मनास रुचत नाहीं, व 'सन्नियोगशिष्टयोरन्यतरस्यापाये-ऽपरस्याप्यपायः' असा ह्या परिभाषेचा पाठ असावयास पाहिजे होता.)

**अत्र च बिल्वकादिभ्यश्छस्य लुगिति सूत्रस्थं छग्रहणं ज्ञापकम्। तद्धि छमात्रस्य लुग्बोधनद्वारा कुकोऽनिवृत्तिर्यथा स्यादित्यर्थम्। कृतकुगागमा नडाद्यन्तर्गता बिल्व दय एव तत्र निर्दिष्टा बिल्वकादिशब्देन।**

'बिल्वकादिभ्यः छस्य लुक्' सू० १३११ ह्या सूत्रांत केलेलें 'छ' ग्रहण ह्या परिभाषेचें ज्ञापक आहे. 'छ' ग्रहण करण्याचें कारण हें कीं, 'कुक्' आगमाचा 'लुक्'

न होतां, केवळ 'छ' प्रत्ययाचा लुक् व्हावा. वरील सूत्रांत असलेल्या 'बिल्वकादिभ्यः' ह्या शद्बानें, नडादिगणांत अन्तर्भूत असलेल्या कुगागमसहित 'बिल्वादि' शद्बांचें ग्रहण केलें आहे. ( 'उत्करादिभ्यश्छः' व 'नडादीनां कुक्च' सू० १३०९ व १३१० अशीं चतुर्थाध्यायाच्या द्वितीयपादांत सूत्रें आहेत. 'नडादीनां कुक् च' ह्या सूत्रांतील चकारानें पूर्वसूत्रांतील 'छ' प्रत्ययाची अनुवृत्ति होते, व सूत्राचा अर्थ असा होतो कीं, 'नडादि' शद्बांना 'छ' प्रत्यय आणि तसेंच कुगागम होतो. 'बिल्वादि' शद्ब नडादिगणांत पठित आहेत. त्यामुळें त्यांना देखील 'नडादीनां कुक् च' ह्या सूत्रान्वयें एकेच वेळीं 'छ' प्रत्यय व कुगागम होतो; जसें–'बिल्वाः यस्यां सन्ति सा बिल्वकीया.' अशा कुगागमयुक्त 'छ' प्रत्ययान्त 'बिल्वादि' शद्बांपुढें इतर तद्धित-प्रत्यय आल्यास, 'छ' प्रत्ययाचा लुक् होतो, असें 'बिल्वकादिभ्यः छस्य लुक्' हें सूत्र सांगतें; जसें—'बिल्वकीयायां भवाः' ह्या ठिकाणीं, 'तत्र भवः' ह्या अर्थांत 'अण्' प्रत्यय केल्यास, तद्धित 'अण्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'छ' प्रत्ययाचा लुक् होऊन, 'बैल्वकाः' असें रूप होतें. 'छ' प्रत्यय व कुगागम होणें हीं दोन्हीं कार्यें एकाच सूत्रानें सांगितलीं असल्यामुळें, या परिभाषेप्रमाणें, 'छ' चा लुक् झाल्यास, 'कुक्' चाहि लुक् होणार. परतु 'कुक्' चा लुक् न होतां, तो कायम राहावा म्हणून, 'बिल्वकादिभ्यः छस्य लुक्' ह्या सूत्रांत 'छ' ग्रहण केलें आहे, व 'बिल्वकादिभ्यः' अशा कुगागमविशिष्ट शद्बाचा उच्चार केला आहे. 'बिल्वादिभ्यः लुक्' असें सूत्र केलें असतें तर, 'छ' प्रत्यय व कुगागम ह्या दोहोंचाहि, या परिभाषेप्रमाणें, लुक् झाला असता. )

**न चैवमपि छग्रहणं व्यर्थं कृतकुगागमानुवादसामर्थ्यादेव तदनिवृत्तिसिद्धेः । अन्यथा बिल्वादिभ्य इत्येव वदेत् । लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषया बिल्वादिपुरस्कारेण विहितप्रत्ययस्यैव लुग्विधानान्नातिप्रसङ्ग इति वाच्यम् ततोऽपि प्रतिपदोक्तत्वेन बिल्वादिभ्योऽण् इति विकाराद्यर्थस्य लुगापत्तिनिवारणार्थं कुगनुवादचारितार्थ्यात् ।**

( 'बिल्वकादिभ्यः छस्य लुक्' ह्या सूत्रांतील 'छ' ग्रहण जरी ह्या परिभाषेचें ज्ञापक मानलें तरी, त्या सूत्रांत केलेलें ) 'छ' ग्रहण व्यर्थ ठरतें; कारण त्या सूत्रांत 'बिल्वकादिभ्यः' असा कुगागमविशिष्ट शद्बाचा उच्चार केला असल्यामुळें, तेवढ्यावरूनच हें सिद्ध होतें कीं, कुगागमाचा लुक् होत नाहीं. जर पाणिनीला कुगागमाचा देखील लुक् इष्ट असता तर, 'बिल्वादिभ्यः' असें सूत्र केलें असतें, व असें सूत्र असतें तरी, अतिव्याप्तिरूप दोष आला नसता, कारण 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' अशी परिभाषा असल्यामुळें, 'बिल्वादिभ्यः' ह्या शद्बानें ('नडादीनां कुक् च' सू० १३१० ह्या सूत्रान्वयें, नडादिगणांत साक्षात् पठित असलेल्या 'बिल्वादि' शद्बांहून 'छ' प्रत्यय होणें सांगितलें असल्यामुळें, प्रतिपदोक्त

' छ ' प्रत्ययाचेंच ग्रहण झालें असतें, व इतर सूत्रांनीं होणाऱ्या इतर प्रत्ययांचें ग्रहण झालें नसतें; आणि त्यामुळें, सूत्रांत साक्षात् सांगितलेल्या ) ' छ ' प्रत्ययाचाच लुक् पावला असता—असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ' बिल्वादिभ्यो-ऽण् ' सू० १५१६ या सूत्रांत ' बिल्वादि ' शब्दांहून ' अण् ' प्रत्यय व्हावा असें अधिक स्पष्टपणें प्रतिपदविधान केलें आहे. ( कारण नडादिगणांत साक्षात् पठित असलेल्या ' बिल्व ' इत्यादि शब्दांहून ' बिल्वादिभ्योऽण् ' या सूत्रानें विकारार्थें ' अण् ' प्रत्यय होण्याचें विधान केलें आहे. त्या गणांत कुगागमसहित ' बिल्व ' इत्यादि शब्द साक्षात् पठित नाहींत. म्हणून, ' नडादीनां कुक् च ' ह्या सूत्राच्या मानानें, ' बिल्वादिभ्योऽण् ' हें सूत्र जास्त स्पष्टपणें ' अण् ' प्रत्ययाचें विधान करणारें सूत्र आहे; आणि त्यामुळें ' बिल्वकादिभ्यः छस्य लुक् ' असें सूत्र न करितां ' बिल्वादिभ्यो लुक् ' असें सूत्र केलें असतें तर, त्या सूत्रानें ' बिल्वादिभ्योऽण् ' ह्या सूत्रांतील 'अण्' प्रत्ययाचें ग्रहण होऊन त्याचा लुक् पावला असता.) विकारार्थें होणाऱ्या त्या ' अण् ' प्रत्ययाचा लुक् न व्हावा व कुगागमविशिष्ट बिल्वादिशब्दांहून होणाऱ्या ' छ ' प्रत्ययाचाच लुक् व्हावा म्हणून ( ' बिल्वकादिभ्यः छस्य लुक् ' ह्या सूत्रांत ' बिल्वकादिभ्यः ' असें ) कुगागमसहित पद उच्चारलें आहे, व अशा रीतीनें तें पद चरितार्थ ठरतें ( आणि त्यामुळें ' बिल्वकादिभ्यः ' हें पद या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. केवळ ' छ ' ग्रहणच ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें; कारण तसें ग्रहण केलें नसतें तर, ह्या परिभाषेप्रमाणें, कुगागम व ' छ ' प्रत्यय ह्या दोहोंचाहि लुक् पावला असता. )

**समुच्चयार्थकचशब्दयोगे तु विधेययोरेककालिकत्वैकदेशत्वनियमा-न्न्यायसिद्धापीयम् ॥**

' समुच्चय ' ह्या अर्थाचा वाचक ' च ' शब्द असल्यामुळें, ' च ' शब्दाचा जेथें प्रयोग केला जातो तेथें ज्या दोन कार्यांचें विधान केलें आहे तीं दोन कार्यें एकेचवेळीं व एकेच जागीं होतात असा सामान्य नियम असल्यामुळें, ही परिभाषा ( जशी ज्ञापकसिद्ध आहे तशी ) लौकिकन्यायसिद्ध देखील आहे. ( कैयटानें देखील असेंच म्हटलें आहे: ' लौकिकोऽयं न्यायः । एकैकस्मिन्प्रयोजने येषां सहाधिकारस्तत्रान्यतरनिवृत्ताावितरनिवृत्तिः ।

**यत्तु णाविष्ठवदित्यनेन पुंवत्वविधानमेतदनित्यत्वज्ञापनार्थमन्यथैतयतीत्यादौ टिलोपेनैव ङीपि निवृत्ते संनियोगशिष्टपरिभाषया नस्यापि निवृत्त्यैतयतीत्यादिसिद्धौ पुंवत्ववैयर्थ्यं स्पष्टमेवेति टेरिति सूत्रे कैयट, स्तन्न । इडबिडमाचष्ट ऐडबियतीत्यादौ पुंवत्वस्यावश्यकत्वात् ॥ ऐनेयः श्यैनेय इत्यादि तु स्थानिवत्वेन सिद्धमित्यन्यत्र विस्तरः ॥ ८७ ॥**

' टेः ' ५-४-१५५ ह्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें म्हटलें आहे कीं, ' णौ इष्ठवत् प्रातिपदिकस्य ' ह्या वार्तिकानें, ' णि ' प्रत्यय पुढें असतां

प्रातिपदिकाला पुंवद्भाव व्हावा असें विधान केलें असल्यामुळें. ही परिभाषा अनित्य ठरते. ही परिभाषा नित्य असती तर, पुंवद्भावाचें विधान करण्याची कांहींच गरज नव्हती व तें विधान व्यर्थ ठरलें असतें; कारण 'एतयति' इत्यादि उदाहरणांत 'टि' लोपानें 'णि' प्रत्ययाची निवृत्ति होऊन त्याच्याच बरोबर, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, नकाराचा देखील लोप झाला असता व 'एतयति' असें रूप सिद्ध झालेंच असतें. ('वर्णादनुदात्तात्तोपधात्तो नः' सू० ४९६ ह्या सूत्रानें, वर्णवाचक अनुदात्तान्त व 'त्' आहे उपधेंत ज्याच्या अशा प्रातिपदिकाहून स्त्रीवाचक 'ङीप्' प्रत्यय विकल्पें करून होतो, व तो झाल्यास, उपधेंतील तकाराचा नकार होतो. म्हणून 'एत' ह्या शब्दाचीं 'एनी' व 'एता' अशीं स्त्रीलिङ्गाचीं रूपें होतात. 'तत्करोति तदाचष्टे' ह्या अर्थामध्यें 'एनी' शब्दाहून 'णिच्' केल्यास, 'एनीमाचष्टे एतयति' अशा स्थलीं, 'एनी+णिच्' ह्या स्थितींत, 'णाविष्ठवत्प्रातिपदिकस्य' ह्या वार्तिकान्वयें, 'टेः' सू० १०८६ ह्या सूत्रानें टिलोप—म्हणजे 'एनी' यांतील 'ङीप्=ई' प्रत्ययाचा लोप होतो; व ज्या अर्थी 'वर्णादनुदात्तात्' ह्या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय होणें व उपधेंतील तकाराचा नकार होणें अशा दोन कार्यांचें विधान केलें आहे त्या अर्थी 'ङीप्' चा लोप होतांच, प्रकृत परिभाषेप्रमाणें, नकाराचे जागीं पूर्ववत् तकार होणारच, व 'एतयति' असें रूप आपोआप सिद्ध होणारच. मग 'णौ इष्टवत्' ह्या वार्तिकानें पुंवद्भावाचें विधान कशाला केलें आहे? ह्या विधानावरूनच हें सिद्ध होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे, व ती अनित्य असल्यामुळें जेथें लागू पडत नाहीं व पुंवद्भाव होत नाहीं तशा ठिकाणीं देखील पुंवद्भाव व्हावा म्हणून पुंवद्भावाचें वार्तिकानें विधान केलें आहे असें कैयटाचें म्हणणें आहे.) पण तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण पुंवद्भावाचें विधान वार्तिकानें केलें नसतें तर, 'इडबिडमाचष्टे ऐडबिडयति' (व 'दरदमाचष्टे दारदयति') इत्यादि उदाहरणांत 'ऐडबिडयति' इत्यादि रूपें सिद्ध झालीं नसतीं; म्हणून पुंवद्भावाचें विधान करणें आवश्यक होतें. ('जनपदशब्दात् क्षत्रियादञ्' सू० ११८६ ह्या सूत्रानें 'इडबिड्' शब्दाहून अपत्यार्थें 'अञ्' प्रत्यय होऊन 'इडबिडः अपत्यं पुमान्=ऐडबिडः' असें रूप होतें. पण 'इडबिडः अपत्यं स्त्री' या स्थलीं, 'अतश्च' सू० ११९६ ह्या सूत्रानें 'अञ्' लुक् होऊन, 'इडबिड्' असें रूप होतें. ह्या प्रातिपादिकाला 'तत्करोति तदाचष्टे' ह्या अर्थामध्यें 'णिच्' केल्यास, 'इडबिड्+णि' अशा स्थितींत, 'णौ इष्टवत् प्रातिपदिकस्य' ह्या वार्तिकान्वयें पुंवद्भाव होते वेळीं, 'अतश्च' ह्या सूत्रानें झालेल्या 'अञ्' लुकाची निवृत्ति होऊन, 'ऐडबिड' असा शब्द पुनः होऊन, व टिलोप होऊन, 'ऐडबिडयति' असें रूप होतें व असें रूप सिद्ध होण्याकरितां, पुंवद्भावाचें विधान करणें जरूर होतें. सारांश पुंवद्भावविधीनामुळें ही परिभाषा अनित्य आहे असें सिद्ध होत नाहीं.) 'ऐनेयः' 'शैनेयः' हीं रूपें स्थानिवद्भावानें सिद्ध होतात. ह्या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे. ('एन्याः अपत्यं पुमान्' व 'श्येन्याः अपत्यं पुमान्' ह्या अर्थांत, 'स्त्रीभ्यो

ढक्' सू० ११२३ ह्या सूत्रानें अपत्यार्थ 'ढक्' प्रत्यय झाला असतां, 'यस्येति च' सू० ३११ ह्या सूत्रानें, तद्धित प्रत्यय पुढें असल्यामुळें, ईकाराचा लोप होतो. 'ई' लोप 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू० ५० ह्या सूत्रान्वयें स्थानिवत् मानल्यास—म्हणजे 'ई= ङीप्' कायमच आहे असें मानल्यास-'न्'लोपाची प्राप्ति होत नाहीं या परिभाषेसंबंधानें कित्येक वैयाकरणांचें असें मत आहे कीं जेथें एखाद्या सूत्रानें दोनकार्यें एकेवेळीं होणें सांगितलें आहे व त्या दोन कार्यांपैकीं एका कार्याचा लुक् होतो तथेंच ही परिभाषा लागू पडते, पण इतर रीतीनें त्या दोन कार्यांपैकीं एका कार्याचा नाश झाला असल्यास ही परिभाषा लागू पडत नाहीं. जसें 'अनुपसर्गात्फुल्लक्षीब' सू० ३०३५ या सूत्रानें 'फल्' धातूपुढें 'क्त' प्रत्यय आला असतां, अकाराचा उकार व तकाराचा लकार अशीं दोन कार्यें एकेचवेळीं होऊन 'फुल्ल' असें रूप होतें. 'फुल्ल' शब्दास 'अत इञ्' सू. १०९५ या सूत्रानें अपत्यार्थें इञ् प्रत्यय लावला असतां, 'अचो ञ्णिति' सू० २५४ या सूत्रानें उकाराची वृद्धि होत असल्यामुळें जरी उकाराचा नाश होतो तरी, त्याबरोबर लकाराची निवृत्ति न होतां, 'फौल्लिः' असें रूप होतें. तसेंच 'ई च खनः' सू० २८६० या सूत्रानें 'खन्' धातूस 'क्यप्' प्रत्यय होणें व अन्त्य नकाराचा ईकार होणें हीं दोन कार्यें सांगितलीं आहेत. नकाराचे जागीं ईकार झाल्यावर 'ख+ई+क्यप्' अशी स्थिती झाली असतां, 'आद्गुणः' सू० ६९ या सूत्रानें होणाऱ्या गुणरूपी एकादेशानें जरी ईकाराचा नाश होतो तरी, त्या बरोबर क्यप् प्रत्ययाची निवृत्ति न होतां, 'खेयम्' असें रूप होतें. तसेंच 'त्रेः सम्प्रसारणं च' सू० १८५५ या सूत्रानें 'त्रि' शब्दाला 'तीय' प्रत्यय होणें व रकाराचें संप्रसारण होणें हीं दोन कार्यें सांगितलीं आहेत, व त्यामुळें 'तृतीय' असें रूप होतें. 'तीयादिकक्स्वार्थे वा वाच्यः'—सू० १९९४ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें 'तृतीय' शब्दास स्वार्थें 'ईकक्' प्रत्यय होऊन व 'किति च' सू० १०७६ या सूत्रानें आद्यचाला वृद्धि होऊन जरी संप्रसारण कार्याचा नाश होतो तरी, त्याबरोबर 'तीय' प्रत्ययाची निवृत्ति न होतां, 'तार्तीयीकः' असें रूप सिद्ध होतें. वरील तीन उदाहरणांवरून हें स्पष्ट होतें कीं, एकेवेळीं झालेल्या दोन कार्यांपैकीं एका कार्याचा नाश झाला तरी, तो नाश लुकानें झाला नसल्यास, दुसरें कार्य नष्ट होत नाहीं, आणि म्हणून ही परिभाषा लुङ्मात्रविषयकच मानली पाहिजे. परंतु इतर वैयाकरण म्हणतात कीं हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तें म्हणणें बरोबर मानल्यास, 'वातातीसाराभ्यां कुक्च' सू० १९३५ या सूत्रान्वयें 'वात' शब्दाला मत्वर्थक 'इनि' प्रत्यय व कुगागम एकेचवेळीं होणें सांगितलें असल्यामुळें 'वातः अस्यास्तीति वातकी' असा शब्द सिद्ध झाल्यावर त्याला अपत्यार्थक अण् प्रत्यय लावल्यावर, 'नस्तद्धिते' सू० ६७९ या सूत्रानें टिलोप झाला असतां, कुगागमाची निवृत्ति न केल्यास, 'वातः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. सारांश ही परिभाषा लोपाचें ठिकाणीं देखील लागू पडत असल्यामुळें, ती लुङ्मात्रविषयक आहे हें म्हणणें बरोबर ठरत नाहीं. दुसरें असें का, ह्या परिभाषेचा अर्थ असा करावा कीं

जेथें एखाद्या सूत्रानें दोन कार्यें युगपत् होणें सांगितलीं आहेत तेथें त्या दोन कार्यांपैकीं प्रधानकार्याचा नाश झाल्यास अप्रधानकार्याची निवृत्ति होते; पण अप्रधानकार्याचा नाश झाला असल्यास, प्रधानकार्याची निवृत्ति होत नाहीं, अशा रीतीनें ह्या परिभाषेचा अर्थ केल्यास, वरील सर्व उदाहरणांची उपपत्ति लागते. ' फौल्लिः ' या स्थलीं निष्ठेचे जागीं होणारे आदेश सांगणाऱ्या प्रकरणांत निष्ठातकाराचे जागीं लकार होणें हें प्रधान कार्य आहे; व अकाराचा उकार होणें हें अप्रधानकार्य आहे म्हणून वृद्धिकार्यानें उकाराचा नाश झाला तरी लत्वाची निवृत्ति होत नाहीं. तसेंच ' खेयम् ' व ' तार्तीयीकः ' या दोन्हीं स्थलीं, प्रकरणावरून प्रत्ययाचें विधान प्रधान असल्यामुळें, जरी ईत्व व संप्रसारण या अप्रधानकार्यांचा अनुक्रमें नाश होतो तरी, प्रत्ययाची निवृत्ति होत नाहीं. )

---

# परिभाषा ८८

**ननु चुरा शीलमस्याः सा चौरीत्यादौ शील छत्रादिभ्योण इति णे ङीप् न प्राप्नोतीत्यत आह—**

' चुरा शीलमस्याः सा चौरी ' इत्यादि स्थलीं, ' शीलम् ' सू० १६११ ह्या अर्थामध्यें ' छत्रादिभ्यो णः ' सू० १६१२ ह्या सूत्रानें ' ण ' प्रत्यय केला असतां, ( ' चुरा शीलमस्य सः चौरः ' असें अकारान्त रूप होत असल्यामुळें, ' अजाद्यतष्टाप् ' सू० ४५४ ह्या सूत्रानें 'टाप्' होईल व ) 'ङीप्' प्रत्यय प्राप्त होऊं शकणार नाहीं. म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## ताच्छीलिके णेऽणकृतानि भवन्ति ॥ ८८ ॥

" अण् प्रत्ययाला मानून होणारीं कार्यें जेथें ताच्छीलिक ' ण ' प्रत्यय लागतो तेथें देखील होतात "

( ' टिड्ढाणञ् ' सू० ४७० ह्या सूत्रानें ' अण् ' प्रत्ययान्त प्रातिपदिकाला स्त्रीवाचक ' ङीप् ' प्रत्यय होत असतो, ' चौर ' हें ताच्छीलिक णप्रत्ययान्त प्रातिपदिक आहे. ह्या परिभाषेप्रमाणें, ' अण् ' प्रत्ययान्ताला होणारीं कार्यें ताच्छीलिक ' ण ' प्रत्ययान्ताला होत असल्यामुळें, ' चौर ' ह्याला स्त्रीवाचक ' ङीप् ' प्रत्यय होऊन, ' चौरी ' असें रूप सिद्ध होतें. )

**अन् इत्यणि विहितप्रकृतिभावबाधनार्थं कार्मस्ताच्छील्ये इति निपातनमस्या ज्ञापकम् ॥**

'अण्' प्रत्यय पुढें असतां, 'अन्' सू० ११५५ या सूत्रान्वयें, अन्नन्त प्रकृतीच टिलोप न होतां, प्रकृतिभाव कायम राहतो. ह्या प्रकृतिभावाचा बाध व्हावा म्हणून, 'कार्म-

स्ताच्छील्ये ' सू० १६१३ असें सूत्र करून ' कार्म ' शब्दाची निपातनानें जी सिद्धि केली आहे ती ह्या परिभाषेची ज्ञापिका आहे. ( ' कर्म शीलं यस्य सः' या स्थलीं, ' छत्रादिभ्यो णः ' सू० १६१२ या सूत्रानें ' ताच्छीलिक ' ण ' प्रत्यय होतो, व 'कर्मन्+ण' अशी स्थिति झाली असतां, ' अन् ' सू० ११८५ हें सूत्र लागू पडूं नये; कारण त्या सूत्राचा अर्थ असा आहे कीं, अन्नन्त प्रकृतीपुढें, भाववाचक किंवा कर्मवाचक खेरीज करून इतर अर्थाचा वाचक ' अण् ' प्रत्यय आल्यास, ' नस्तद्धिते ' सू० ६७९ या सूत्रानें होणारा टिलोप होत नाहीं. ' कर्मन् ' ह्या अन्नन्त प्रकृतीपुढें ' अण् ' प्रत्यय नसून ताच्छीलिक ' ण' प्रत्यय असल्यामुळें, ' नस्तद्धिते ' सू० ६७९ ह्या सूत्रान्वयें टिलोप होऊन, ' कार्मः ' असें रूप सिद्ध होऊं शकतेंच, मग ' कार्मस्ताच्छील्ये ' हें सूत्र पाणिनीनें कां केलें ? ह्या सूत्रावरून हें सिद्ध होतें कीं, ' अण् ' प्रत्यय पुढें असतां जसा प्रकृतिभाव कायम राहतो तसाच ताच्छीलिक ' ण ' प्रत्यय पुढें असतां देखील, तो प्रकृतिभाव, या परिभाषेप्रमाणें, कायम राहील, व ' कार्मः ' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. तो प्रकृतिभाव कायम न राहतां टिलोप व्हावा म्हणून, ' कार्मस्ताच्छील्ये ' हें सूत्र पाणिनीला मुद्दाम करावें लागलें, व अशा रीतीनें तें सूत्र ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

**ताच्छीलिकणान्तादणो द्व्यच इति फिञ्सिद्धिरप्यस्याः प्रयोजनमिति नव्याः ।**

नवीन वैयाकरणांच्या मताप्रमाणें, 'अणो द्व्यचः' सू० ११८० ह्या सूत्रानें द्व्यच्क ' अण् ' प्रत्ययान्त शब्दाहून जसा अपत्यार्थीं ' फिञ् ' प्रत्यय होतो त्याचप्रमाणें, द्व्यच्क ताच्छीलिक ' ण 'प्रत्ययान्त शब्दांहून देखील अपत्यार्थी ' फिञ् ' प्रत्यय व्हावा हें देखील या परिभाषेचें प्रयोजन आहे. ( जसें:—' कर्तुः छात्रः कार्त्रः ' ह्या स्थलीं, ' तस्येदम् ' सू० १५०० या सूत्रानें ' अण् ' प्रत्यय होऊन ' अण् 'प्रत्ययान्त द्व्यच्क ' कार्त्र ' शब्द होतो. ' कार्त्रस्य अपत्यं कार्त्रायणिः ' असें ' अणो द्व्यचः ' ह्या सूत्रानें अपत्यार्थीं ' फिञ् ' प्रत्यय होऊन, रूप जसें होतें तसेंच ' छत्रं शीलं यस्य सः छात्रः ' या स्थलीं, 'छत्रादिभ्यो णः' सू० १६१२ ह्या सूत्रान्वयें झालेल्या ताच्छीलिक 'ण'प्रत्ययान्त द्व्यच्क 'छात्र' शब्दास देखील अपत्यार्थीं ' फिञ् ' प्रत्यय होऊन 'छात्रस्य अपत्यं छात्रायणिः' असें रूप व्हावें, हें देखील या परिभाषेचें प्रयोजन आहे असें नव्य वैयाकरण म्हणतात. कांहीं टीकाकारांचें असें मत आहे कीं, पाणिनीनें 'छत्रादिभ्योऽण्' असें सूत्र न करितां 'छत्रादिभ्यो णः' असें सूत्र केलें असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते व त्यामुळेंच ' टिड्ढाणञ् ' सू० ४७० ह्या सूत्रान्वयें 'छात्र' या प्रातिपदिकास 'ङीप्' न होतां, ' अजाद्यतष्टाप् ' सू० ४५४ ह्या सूत्रानें ' टाप् ' होऊन ' छात्रा ' असें स्त्रीप्रत्ययान्त रूप होतें ).

ताच्छीलिक इत्युक्तेस्तदस्यां प्रहरणमिति णे दाण्डेत्येव ॥ कामे इति सूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ ८८ ॥

या परिभाषेंत ' ताच्छीलिके णे ' असे शद्ब घातले असल्यामुळें, जेथें ' तदस्यां प्रहरणमिति क्रीडायां णः ' सू. नं. १२६६ ह्या सूत्रानें 'तदस्यां प्रहरणम् ' ह्या अर्थामध्यें ' ण ' प्रत्यय होतो, तेथें ( ही परिभाषा लागू पडत नाहीं व त्यामुळें ' टिड्ढाणञ् ' हें सूत्र न लागतां, ' अजाद्यतष्टाप् ' हें सूत्र लागून, ' दाण्ड ' या 'ण' प्रत्ययान्त शद्वाचें स्त्रीलिङ्गाचें रूप 'दाण्डी' असें न होतां, ) 'दाण्डा' असेंच रूप होतें. ' कार्मस्ताच्छील्ये ' ६–४–१७२ ह्या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

## परिभाषा ८९

ननु कंसपरिमृड्भ्यामित्यादौ मृजेर्वृद्धिर्दुर्वारेत्यत आह—

'कंसपरिमृड्भ्याम्' ह्या स्थलीं 'भ्याम्' प्रत्यय 'मृज्' धातूच्या पुढें असल्यामुळें, ' मृज् ' धातूंतील ऋकारास ) ' मृजेर्वृद्धिः' सू० २४७३ ह्या सूत्रान्वयें वृद्धि होण्याची आपत्ति येते,( ती टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात :—

### धातोः कार्यमुच्यमानं तत्प्रत्यये भवति ॥ ८९ ॥

" धातूला जें कार्य होणें सांगितलें आहे तें कार्य, धातूहून विहित प्रत्यय धातूच्या पुढें असला तरच, होतें."

( ' भ्याम् ' हा विभक्तिप्रत्यय धातूहून होणार प्रत्यय नसून प्रातिपदिकाहून होणारा प्रत्यय आहे. म्हणून ' कंसपरिमृड्भ्याम् ' ह्या स्थलीं, ' मृजेर्वृद्धिः हें सूत्र लागू पडत नाहीं, व वृद्धि होत नाहीं. )

भ्रौणहत्ये तत्वनिपातनमस्या ज्ञापकम् ॥

' भ्रौणहत्ये ' या स्थलीं, अन्त्य नकाराचे जागीं निपातनानें जो तकार केला आहे तो ह्या परिभाषेचा ज्ञापक आहे. ( 'भ्रूणं हतवान् ' इति 'भ्रूणहा' ह्या स्थलीं, ' ब्रह्मभ्रूणवृत्रेषु क्विप् ' सू. नं. २९९८ या सूत्रानें ' भूते क्विप् ' प्रत्यय झाल्यानंतर, पुढें त्या शद्बाहून भावे ' ष्यञ् ' प्रत्यय केला असतां, ' दाण्डिनायनहास्तिनायन ' सू० ११४५ ह्या सूत्रान्वयें, ' भ्रूणहन् ' येथील अन्त्य नकाराचे जागीं निपातनानें तकार होऊन, ' भ्रौणहन्य ' असें रूप न होतां, ' भ्रौणहत्य ' असें रूप होतें. ' हनस्तोऽचिण्णलोः' सू० २५७४ ह्या सूत्रान्वयें, ' हन् ' धातूपुढें, ' चिण् ' किंवा ' णल् ' खेरीज करून इतर कोणताहि 'ञित्' किंवा ' णित् ' प्रत्यय आल्यास, 'हन्'

धातूच्या नकाराचे जागीं तकारादेश होतो. ‘ भ्रूणहन् + ष्यञ् ’ ह्या स्थळीं, ‘ हन् ’ धातूपुढें ‘ ष्यञ् ’ हा ञित् प्रत्यय आला असल्यामुळें, ‘ हन् ’ धातूच्या नकाराचे जागीं, ‘ हनस्तोऽचिण्णलोः ’ या सूत्रानें तकारादेश होऊं शकत असतां व ‘ भ्रौणहत्य ’ असें रूप सिद्ध होऊं शकत असतां, पाणिनीनें ‘ दाण्डिनायनहास्तिनायन ’ या सूत्रांत निपातानें होणारीं जीं रूपें सांगितलीं आहेत त्यांत ‘ भ्रौणहत्य ’ हें रूप कां सांगितलें आहे ? याला उत्तर हेंच कीं, ‘ ष्यञ् ’ हा तद्धित प्रत्यय असून धातूहून होणारा प्रत्यय नाहीं ; म्हणून तो प्रत्यय ‘ हन् ’ धातूपुढें आला असतां, ‘ हनस्तोऽचिण्णलोः’ या सूत्रानें होणारें कार्य होऊं शकत नाहीं. ह्यामुळें निपातानें होणाऱ्या रूपामध्यें ‘भ्रौणहत्य’ हें रूप ‘ दाण्डिनायनहास्तिनायन ’ ह्या सूत्रांत पाणिनीला घालावें लागलें, व अशा रीतीनें तें रूप ह्या परिभाषेचें ज्ञापक ठरतें. कित्येक येथें अशी शंका करितात कीं ‘हो हन्तेः’ सू० ३५८ या सूत्रानें ‘हन् ’ धातूच्या हकारास जें कुत्व पावलें आहे त्याचें निवारण होण्याकरितां ‘ भ्रौणहत्य ’ हा शब्द ‘ दाण्डिनायनहास्तिनायन ’ सू० ११४५ या सूत्रांत पठित केला आहे, व अशा रीतीनें तें निपातन चरितार्थ ठरत असल्यामुळें, तो शब्द प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक मानतां येत नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं; कारण ‘ हो हन्तेः ’ या सूत्रांत ‘ णित् ’ प्रत्ययांचें ग्रहण केलें असल्यामुळें, णित्च्या साहचर्यामुळें ‘ हन् ’ धातूहून होणारे ‘ हो हन्तेः ’ या सूत्रांत उद्दिष्ट असलेले ञित् प्रत्यय देखील कृत्प्रत्ययच घेतले पाहिजेत, व त्यामुळें ‘ ष्यञ् ’ हा तद्धितप्रत्यय पुढें असतांना ‘ भ्रूणहन् ’ यांतील हकाराला कुत्व पावतच नाहीं, आणि म्हणून ‘ भ्रौणहत्य ’ हें निपातित रूप कुत्वाचें निवारण होण्याकरितां पठित केलें आहे असें मानतां येत नाहीं, व तें प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानणेंच योग्य ठरतें. दुसरें असें कीं, कुत्वनिवारणार्थ ‘ भ्रौणहत्य ’ या रूपाचें निपातन केलें आहे असें मानलें तरी, त्यावरून हें सिद्ध होत नाहीं कीं, तें निपातन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरत नाहीं; कारण एखादें पाणिनीय सूत्र किंवा त्यांतील एखादा शब्द एकापेक्षां अधिक वस्तूंचा देखील ज्ञापक होऊं शकतो.)

**धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्यविज्ञानमिति पाठस्तु प्रसृड्भिरित्यादावनुदात्तस्य चर्दुपधस्येत्यमापादनेन भाष्ये दूषितः ।**

‘ धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्यविज्ञानम् ’—म्हणजे जर सूत्रांत धातूचें साक्षात् ग्रहण केलें असेल व त्या धातूला कांहीं कार्य होणें सांगितलें असेल तर तें कार्य, धातूहून होणारा प्रत्यय तशा धातूपुढें आला तरच, होतें,–असा या परिभाषेचा पाठ ( जो प्राचीन वैयाकरणांनीं मानला आहे तो ) स्वीकारल्यास, दोष उत्पन्न होतो; कारण ‘ प्रसृड्भिः ’ इत्यादि स्थलीं, ‘ अनुदात्तस्य च ऋदुपधस्य ’ सू० २४०२ ह्या सूत्रानें अमागम होण्याचा प्रसंग येणार असें त्या सूत्रावरील—६–१–५९ भाष्यांत सांगितलें आहे. ( ‘ प्रसृड्भिः=प्र+सृज्+क्विप्+भिस्=प्रसृज्+भिस् ’ येथें ‘ सृज् ’ धातूपुढें ‘ भिस् ’ प्रत्यय आला आहे. ‘ धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्य-

विज्ञानम् ' हा पाठ स्वीकारल्यास, ' अनुदात्तस्य चर्दुपधस्य ' या सूत्रांत कोणत्याहि धातूचा नामनिर्देश केला नसल्यामुळें, जरी ' भिस् ' हा धातूहून होणारा प्रत्यय नाहीं तरी, तें सूत्र लागू पडेल, व अमागम होण्याची आपत्ति येईल. म्हणून भाष्यकारांनीं त्या पाठाला दूषित ठरवून त्याचें प्रत्याख्यान केलें आहे व त्या ऐवजीं, ' धातोः कार्य-मुच्यमानं तत्प्रत्यये भवति ' अशी परिभाषा पठित केली आहे; व ह्या पाठाप्रमाणें, सूत्रांत धातूचा नामनिर्देश असण्याची गरज नसल्यामुळें, व ' भिस् ' हा धातूहून होणारा प्रत्यय नसल्यामुळें, ' प्रसृड्भिः ' ह्या स्थलीं ' अनुदात्तस्य चर्दुपधस्य ' हें सूत्र लागू पडत नाहीं, व अमागम होत नाहीं. )

यत्कार्यं प्रत्ययनिमित्तं तत्रेयं व्यवस्थापिका । तेन पदान्तत्वनिबन्धनं नशेर्वेति कुत्वं प्रणड्भ्यामित्यादौ भवत्येव ।

जेथें सूत्रांत प्रत्ययाच्या निमित्तामुळें कार्य होणें—म्हणजे धातूपुढें अमुक प्रत्यय आल्यास अमुक कार्य व्हावें असें सांगितलें आहे तेथेंच ही परिभाषा लागू पडते. असें आहे म्हणूनच, पदान्तत्वनिमित्तामुळें, ' नशेर्वा ' सू० ४२१ या सूत्रानें होणारें कुत्व, ' प्रणग्भ्याम् ' इत्यादि स्थलीं होतें. (' प्र+नश्+क्विप्+भ्याम्' येथें ' उपसर्गा-दसमासेऽपि ' सू० २२८७ या सूत्रानें णत्व होऊन व ' वेरपृक्तस्य ' सू० ३७५ या सूत्रानें ' क्विप्=व् ' चा लोप होऊन ' प्रणश्+भ्याम् ' अशी स्थिति झाल्यावर ' नश् ' धातूपुढें ' भ्याम् ' हा धातूहून न होणारा विभक्तिप्रत्यय आला असल्यामुळें, ' न-शेर्वा ' या सूत्रानें सांगितलेलें कुत्व कार्य, ह्या परिभाषेप्रमाणें, होऊं नयें, व ' प्रण-ग्भ्याम् ' असें विकल्पेंकरून रूप होऊं नयें. पण ' नशेर्वा ' ह्या सूत्रानें सांगितलेलें कार्य प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारें कार्य नाहीं. तें कार्य होण्यास ' पदान्तत्व ' हें निमित्त सांगितलें आहे—म्हणजे ' नश्' पदान्ती असल्यास त्याच्या अन्त्यवर्णाचे जागीं विकल्पेंकरून कवर्गाचा आदेश होतो असा त्या सूत्राचा अर्थ आहे. त्यामुळें प्रकृत परि-भाषा ' नशेर्वा ' या सूत्रास लागू पडत नाहीं, व ' प्रणड्भ्याम् ' आणि ' प्रणग्भ्याम् ' अशीं विकल्पेंकरून रूपें होतात. ' नश्' धातु शकारान्त असल्यामुळें ' व्रश्चभ्रस्ज ' सू० २९४ या सूत्रानें शकाराचे जागीं षकार होऊन व ' झलां जश् झशि ' सू० ५२ या सूत्रानें षकाराचे जागीं डकार होऊन ' प्रणड्भ्याम् ' असं रूप होतें. )

इयङादिविधौ तु नैषा । न भूसुधियोरिति निषेधेनानित्यत्वात् ॥ मृजे-र्वृद्धिरित्यत्र भाष्ये स्पष्टा ॥ ८९ ॥

( प्रकृत परिभाषा असल्यामुळें, ' सुधी + औ=सुधियौ ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाहीं; कारण ' ध्यै चिन्तायाम् ' या धातूस क्विप् प्रत्यय लागून व ' ध्यायतेः सम्प्रसारणं च '– सू० ३१५८ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें ' ध्यै ' यांतील यकारास सम्प्रसारण होऊन, व ' सम्प्रसारणाच्च ' सू० ३३० या सूत्रानें पूर्व-रूपएकादेश होऊन, आणि ' हलः ' सू० २५५९ या सूत्रानें इकाराचा दीर्घ होऊन

व ' वेरपृक्तस्य ' सू० ३७५ या सूत्रानें ' क्विप=व् ' चा लोप होऊन, ' धी ' हा शद्ब झाला आहे. ' सुष्ठु ध्यायतीति सुधीः ' या स्थलीं ' सुधी ' हें गतिपूर्वक ईकारान्त प्रातिपदिक अनेकाच् असून धात्वन्त आहे, व याचें प्रथमेचें द्विवचन करितांना ' सुधी+औ ' अशी स्थिति झाली असतां, जरी 'औ ' हा अजादि प्रत्यय आहे तरी, तो धातूहून होणारा प्रत्यय नसून सुप्प्रत्यय असल्यामुळें, ' एरनेकाचः ' सू० २७२ या सूत्राची किंवा ' अचि श्नु' सू० २७१ या सूत्राची, प्रकृत परिभाषा असल्यामुळें, प्राप्ति होऊं शकत नाहीं व ' सुधियौ ' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. तसेंच ' प्रतिभू + औ ' या स्थलीं ' प्रतिभू ' हें गतिपूर्वक अनेकाच् धात्वन्त प्रातिपदिक असून त्यापुढें ' औ ' हा सुप् प्रत्यय असल्यामुळें, ' ओः सुपि' सू० २८१ किंवा ' अचि श्नुधातु ' या सूत्रांची प्राप्तीच होऊं शकत नाहीं, व त्यामुळें 'प्रतिभुवौ' असें इष्टरूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति कशी टळते याचा खुलासा ग्रन्थकार या पंक्तींत करितात.) ज्या सूत्रांत इयङादि-म्हणजे इयङ्, उवङ् व यण्–आदेश होण्याचें विधान केलें आहे त्या सूत्रांना ही परिभाषा लागत नाहीं; कारण ' न भूसुधियोः' सू.२७३ या निषेधात्मक सूत्रावरुन हें सिद्ध होतें कीं ही परिभाषा अनित्य आहे. ( ' अचि श्नुधातु ' सू० २७१या इयङुवङ्विधायक सूत्रांत 'धातोः' हें पद आहे व या सूत्रान्वयें इवर्णान्त उवर्णान्त धातूपुढें अजादि प्रत्यय आला असतां, अन्त्य इकाराचे जागीं इयङ् व उकाराचे जागीं उवङ् आदेश होतो. ' एरनेकाचोऽसंयोग-पूर्वस्य ' सू० २७२ या सूत्रांत ' धातोः ' हें पद पूर्वसूत्रांतून अनुवृत्त आहे व या सूत्रान्वयें धात्वन्त अङ्ग अनेकाच् असून धातूचा अन्त्य इकार असंयोगपूर्व असल्यास आणि त्यापुढें अजादि प्रत्यय आल्यास, त्या इकाराचे जागीं यणादेश होतो. वरील दोन्ही सूत्रांत धातूस कार्य होणें सांगितलें असल्यामुळें त्यांना ही परिभाषा लागू पडते, व त्यांना ही परिभाषा लावल्यास, धातूहून विहित असा अजादि प्रत्यय धातूपुढें आल्यास इयङ्, उवङ् व यण् आदेश होतात असाच त्या सूत्रांचा अर्थ केला पाहिजे. पण तसा त्या सूत्रांचा अर्थ केल्यास, ' सुधी + औ ' या स्थलीं, जरी ' सुधी ' हें अनेकाच् अङ्ग असून ध्यैधात्वन्त आहे व तसेंच असंयोगपूर्व आहे तरी, त्याच्यापुढें आलेला ' औ ' हा सुप् प्रत्यय धातूहून विहित नसल्यामुळें, ' एरनेकाचः ' या सूत्राची प्राप्तीच नाहीं व त्यामुळें ' सुधी ' यांतील अन्त्य ईकारास त्या सूत्रान्वयें यणादेश होऊंच शकत नाहीं. मग, ' सुधी ' या धात्वन्त शद्बापुढें अजादि सुप् प्रत्यय आल्यास ' सुधी ' यांतील अन्त्य ईकाराचे जागीं यणादेश होऊं नये असा निषेध सांगणारें ' न भूसुधियोः ' हें निषेधात्मक सूत्र पाणिनीनें कां केलें? ' प्राप्तस्यैव निषेधः ' या न्यायान्वयें जें प्राप्त आहे त्याचाच निषेध केला जातो; जें प्राप्त नाहीं त्याचा निषेध करण्याची गरज काय? सारांश ही परिभाषा नित्य मानल्यास, ' न भूसुधियोः ' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. पण कोणतेंहि पाणिनीय सूत्र व्यर्थ ठरूं शकत नाहीं. आणि म्हणून तें सूत्र सार्थक ठरण्याकरितां प्रकृत परिभाषा

अनित्य मानणें भाग आहे–म्हणजे धात्वन्त शब्द इकारान्त असल्यास व त्यांतील अन्त्य इकार असंयोगपूर्व असल्यास आणि त्यापुढें अजादि सुप् प्रत्यय देखील आला असल्यास, तशा इकाराचे जागीं ' एरनेकाचः ' या सूत्रान्वयें यणादेश होतो असें मानणें भाग आहे—व अशा रीतीनें प्रकृत परिभाषा अनित्य मानली म्हणजेच, ' न भूसुधियोः' हें निषेधसूत्र चरितार्थ ठरतें, व त्या निषेधसूत्रावरून हें स्पष्ट होतें कीं प्रकृत परिभाषा अनित्य असल्यामुळें ती इयङुवङ्यणादेशविधायक सूत्रांना लागू पडत नाहीं. सारांश ' न भूसुधियोः ' हें निषेधक सूत्र असल्यामुळें, ' सुधी + औ ' या स्थलीं यणादेश न होतां, ' अचि श्नु ' या सूत्रानें इयङादेश होऊन ' सुधियौ' व ' प्रतिभुवौ ' अशीं इष्टरूपें सिद्ध होतात. ) ' मृजेर्वृद्धिः ' ७-२-११४ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा ९०

ननु सर्वक उच्चकैरित्यादौ सर्वनामाव्ययसंज्ञे न स्यातामत आह—

' सर्वकः ' ' उच्चकैः ' इत्यादि स्थलीं, सर्वनाम व अव्ययसंज्ञा अनुक्रमें होणार नाहींत ('सर्वादीनि सर्वनामानि' सू० २१३ ह्या सूत्रान्वयें, सर्वादिगणांत जे शब्द पठित आहेत त्यांनाच सर्वनामसंज्ञा प्राप्त होते. ' सर्व ' हा शब्द सर्वादिगणांत पठित आहे, पण ' सर्वक ' हा शब्द त्या गणांत पठित नाहीं. म्हणून ' सर्वक ' शब्दाला सर्वनामसंज्ञा होणार नाहीं. तसेंच ' स्वरादिनिपातमव्ययम् ' सू० ६४७ ह्या सूत्रान्वयें, स्वरादिगणांत पठित असलेल्या शब्दांनाच अव्ययसंज्ञा प्राप्त होते. ' उच्चैः ' हा शब्द स्वरादिगणांत पठित आहे, पण ' उच्चकैः ' हा शब्द पठित नाहीं. म्हणून ' उच्चकैः ' या शब्दाला अव्ययसंज्ञा प्राप्त होणार नाहीं. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

**तन्मध्यपतितस्तद्ग्रहणेन गृह्यते ॥ ९० ॥**

" ( सूत्रांत एखादा शब्द उच्चारला असल्यास त्या शब्दानें जसें सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या शब्दस्वरूपाचें ग्रहण होतें तसेंच ) त्या शब्दामध्यें–म्हणजे त्या शब्दांतील आदि व अन्त्य वर्णांच्या आंत–कांहीं वर्ण पडून त्या वर्णांसह बनलेल्या शब्दाचें देखील ग्रहण होतें. "

( ' सर्वकः ' व 'उच्चकैः ' हे शब्द ' अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक्टेः ' सू० २०२६ या सूत्रान्वयें, ' टि ' च्या पूर्वी ' अकच्=अक् ' होऊन सिद्ध झाले आहेत व ' अक् ' हा ' सर्व ' व ' उच्चैः ' या शब्दांच्या आदि व अन्त्य वर्णांच्या आंत पडला आहे, म्हणून या परिभाषेप्रमाणें ' सर्व ' व ' उच्चैः ' या शब्दांनीं जसें त्या शब्दांचें ग्रहण होतें

तसेंच ‘ सर्वक ’ व ‘ उच्चकैः ’ या शब्दांचें देखील ग्रहण होतें, व त्यांना सर्वनामसंज्ञा व अव्ययसंज्ञा अनुक्रमें प्राप्त होतात. )

**नेदमदसोरकोरिति सूत्रेऽकोरिति निषेधोऽस्या ज्ञापकः ॥ तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यते इति येन विधिरिति सूत्रे भाष्ये पाठः ॥ ९० ॥**

‘ नेदमदसोरकोः’ सू. ३४९ या सूत्रांतील ‘ अकोः’ हा निषेध प्रकृत परिभाषेचा ज्ञापक आहे. ( सर्वादिगणांत ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ हे शब्द पठित आहेत, अकच्सहित ‘ इदम् ’ व अदस् ’ हे शब्द त्या गणांत पठित नाहींत व त्यामुळें, जर ही परिभाषा नसती तर, ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ शब्दांनीं अकच्सहित ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ शब्दांचें ग्रहण होऊं शकलेंच नसतें; कारण ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ हे शब्द ज्या विशेषवर्णानुपूर्वीनें युक्त आहेत त्याहून भिन्न वर्णानुपूर्वीनें अकच्सहित ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ शब्द युक्त आहेत. म्हणून ‘ इदमदसोः अककारयोः भिसः ऐस् न स्यात् ’ असा ‘ भिस्’ प्रत्ययाचे जागीं ‘ ऐस् ’ आदेशाचा निषेध सांगणाऱ्या ‘ नेदमदसोरकोः’ या सूत्रांत ‘ अकोः’ हें पद घालण्याची कांहींच गरज नव्हती. पण ही परिभाषा असल्यामुळें, ‘ इदम् ’ व ‘ अदस् ’ या शब्दांनीं अकच्सहित तशा शब्दांचें ग्रहण होऊं शकतें हें पाणिनीस माहित होतें, व तशा शब्दांना ‘ नेदमदसोः’ या सूत्रांत सांगितलेला निषेध लागू नये, व ‘ इमकैः’ व ‘ अमुकैः’ अशीं इष्टरूपें सिद्ध व्हावीं म्हणून त्याला त्या सूत्रांत ‘ अकोः ’ हें पद घालणें भाग पडलें, व अशा रीतीनें तें पद प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें.) ‘ येन विधिः’ १–१–७२ या सूत्रावरील भाष्यांत ‘ तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यते ’—म्हणजे एखाद्या शब्दाच्या आंत कांहीं वर्ण पडून ते वर्ण त्या शब्दाचे अवयव बनल्यामुळें, त्या शब्दानें तशा अवयवसहित शब्दाचें ग्रहण होतें—अशा रीतीनें ही परिभाषा पठित केली आहे. ( पण जरी ही परिभाषा त्या भाष्यांत भिन्न शब्दांनीं पठित केली आहे तरी दोन्ही पाठ एकाच अर्थाचे बोधक आहेत. त्या भाष्यावरून हें देखील सिद्ध होतें कीं ‘ अनेका नदी गङ्गां यमुनां च प्रविष्टा गङ्गायमुनाग्रहणेन गृह्यते। तथा देवदत्तास्थो गर्भो देवदत्ताग्रहणेन गृह्यते ॥’ या लौकिकन्यायान्वयें प्रकृतपरिभाषा सिद्ध होऊं शकत नाहीं ; कारण अव्यय, सर्वनाम, इत्यादि संज्ञा त्या त्या गणांत पठित असलेल्या आनुपूर्वीविशिष्ट शब्दांनाच होतात, व त्यांत कोणताहि वर्ण अधिक किंवा कमी झाल्यास, कांहीं तरी शास्त्रीय प्रमाण असल्याखेरीज, तशा शब्दांना त्या संज्ञा प्राप्त होऊं शकत नाहींत. प्रकृतपरिभाषा तें शास्त्रीय प्रमाण आहे, व ‘ नेदमदसोरकोः’ या सूत्रांतील ‘ अकोः’ हा निषेध, वर सांगितल्याप्रमाणें, प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक आहे. सारांश ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध नसून ज्ञापकसिद्ध आहे हें लक्षांत ठेवावें. )

---

# परिभाषा ९१

ननु "गातिस्थाघुपाभूभ्यः" इति सिचो लुगपासीदित्यादौ पातेरपि स्यादत आह—

'गातिस्थाघुपाभूभ्यः सिचः परस्मैपदेषु' सू २२२३ या सूत्रान्वयें होणारा सिचाचा लुक् (लुग्विकरण) 'पा' धातूच्या लुङच्या 'अपासीत्' इत्यादि रूपांचे ठिकाणीं होईल. (व 'अपासीत्' असें इष्ट रूप न होतां, 'अपात्' असें अनिष्ट रूप होईल. तसें न व्हावें) म्हणून ही परिभाषा सांगतात.

## लुग्विकरणालुग्विकरणयोरलुग्विकरणस्य ॥ ९१ ॥

"सूत्रांत उच्चारलेला एखादा धातु जर असा असेल कीं तो लुग्विकरण असून अलुग्विकरण देखील आहे तर तशा धातूनें अलुग्विकरण धातूचेंच ग्रहण करावें."

('अदिप्रभृतिभ्यः शपः' सू० २४२३ या सूत्रान्वयें अदादिगणांत पठित असलेल्या धातुपुढें येणाऱ्या शप् विकरणाचा लुक् होतो–म्हणजे विकरणाचे जागीं लुक् होतो. म्हणून अदादिगणांतील धातूंना 'लुग्विकरण' म्हणतात. इतर गणांतील धातूंच्या विकरणाचा लुक् होत नसल्यामुळें, त्यांना 'अलुग्विकरण' म्हणतात. 'गातिस्थाघुपा' या सूत्रांत उच्चारलेला 'पा' धातु लुग्विकरण असून, अलुग्विकरण देखील आहे 'पा रक्षणे' हा धातु अदादिगणांत पठित आहे, व 'पा पाने' हा धातु भ्वादिगणांत पठित आहे. म्हणून वरील सूत्रांत उच्चारलेल्या 'पा' धातूनें अदादिगणांत पठित असलेल्या 'पा' धातूचें ग्रहण न होतां, प्रकृत परिभाषेप्रमाणें, भ्वादिगणांत पठित असलेल्या 'पा' धातूचेंच ग्रहण होतें, व त्यामुळें अदादिगणांत पठित असलेल्या 'पा' धातूच्या लुङाचें रूप करितांना, सिचाचा लुक् न होतां, 'अपासीत्' असें इष्ट रूप सिद्ध होतें; भ्वादिगणांत पठित असलेल्या 'पा' धातूच्या लुङाचें रूप करितांना सिचाचा लुक् होऊन 'अपात्' असें रूप होतें.)

अस्याश्च ज्ञापकः स्वरति सूतीति सूत्रे सूङिति वक्तव्ये सूतिसूयत्योः पृथङ्निर्देश इति कैयटः। तन्न। साहचर्यादलुग्विकरणस्यैव ग्रहणे प्राप्ते पृथङ्निर्देशस्य तज्ज्ञापकत्वासम्भवात्।

कैयटाचें असें म्हणणें आहे कीं 'स्वरतिसूतिसूयति' सू० २२७९ या सूत्रांत 'सूङ्' असा निर्देश न करितां 'सूतिसूयति' असा जो पृथक् निर्देश केला आहे तो प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक आहे. ('षूङ्' धातु अदादिगणांत व तसेंच दिवादिगणांत पठित आहे. पाणिनीनें वरील सूत्रांत जर 'सूङ्' असा निर्देश केला असता तर, ही परिभाषा असल्यामुळें, तशा निर्देशानें दिवादिगणांतील अलुग्विकरण 'षूङ्' धातूचेंच ग्रहण झालें असतें, अदादिगणांतील लुग्विकरण 'षूङ्' धातूचें ग्रहण झालें

नसतें. पाणिनीला दोन्ही प्रकारच्या धातूंचें ग्रहण करावयाचें होतें; म्हणून त्याला वरील सूत्रांत लुग्विकरणबोधक ' सूति ' व अलुग्विकरणबोधक ' सूयति ' अशा दोन्ही शब्दांचा पृथक् निर्देश करावा लागला, आणि अशा रीतीनें तो निर्देश प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरतो. जर ही परिभाषा नसती तर ' षूङ् ' अशा निर्देशानें दोन्ही प्रकारच्या धातूंचें आपोआपच ग्रहण होऊं शकलें असतें, व 'सूतिसूयति' असा पृथक् निर्देश करण्याची कांहींच गरज नव्हती.)—पण हें कैयटाचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' स्वरतिसूयति ' या सूत्रांत उच्चारलेल्या इतर सर्व धातु अलुग्विकरण असल्यामुळें, ( ' सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम् ' प. ११२ या ) साहचर्यन्यायान्वयें, ' सूङ् ' असा शब्द जरी वरील सूत्रांत उच्चारला असता तरी, ही परिभाषा नसती तरी, त्या शब्दानें अलुग्विकरण ' षूङ् ' धातूचेंच ग्रहण झालें असतें ( व अदादिगणांत पठित असलेल्या लुग्विकरण ' षूङ् ' धातूचें ग्रहण झालें नसतें. पण पाणिनीला दोन्ही प्रकारच्या धातूंचें ग्रहण वरील सूत्रांत करावयाचें होतें; म्हणून त्याला ' सूतिसूयति ' असा पृथक् निर्देश करावा लागला. सारांश तो निर्देश अन्य रीतीनें चरितार्थ ठरत असल्यामुळें ) तो पृथक् निर्देश प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरूं शकत नाहीं.

**ध्वनिता चेयं परिभाषा यस्य विभाषेत्यत्र भाष्ये । तत्र हि विदितै इति प्रयोगे निषेधमाशङ्क्य यदुपाधेर्विभाषा तदुपाधेर्निषेधो विभाषा गमहनविद्विशामिति सूत्रे शविकरणस्य ग्रहणं लुग्विकरणश्चायमित्युक्तम् । तत्र चो हेतौ । यतोऽयं लुग्विकरणोऽतो विशिसाहचर्याच्छविकरणस्य ग्रहणं न तु हनिसाहचर्यादस्यापि, एतत्परिभाषाविरोधादिति तदाशयः ॥**

( ही परिभाषा भाष्यांत कोठेंहि साक्षात् पठित नसून ) ' यस्य विभाषा ' ७-२-१५ या सूत्रावरील भाष्यांत ध्वनित केली आहे. त्या भाष्यांत ' विदितः ' या स्थलीं इडागमाचा निषेध व्हावा अशी शंका उपस्थित करून भाष्यकार असें म्हणतात कीं, ज्या उपाधिविशिष्टधातूसंबंधानें इडागमविभाषा सांगितली आहे तशाच उपाधिविशिष्ट धातूला, 'यस्य विभाषा' या सूत्रांत सांगितलेला इडागमनिषेध लागू शकतो. ' विभाषा गमहनविद्विशाम् ' सू० ३०९९ या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' विद् ' धातूनें शविकरण—म्हणजे तुदादिगणांत पठित असलेल्या—' विद् ' धातूचें ग्रहण होतें व असें म्हणण्याचें कारण भाष्यकार असें देतात कीं, 'लुग्विकरणश्चायम्', या वाक्यांतील ' च ' हा शब्द ( समुच्चय ' या अर्थाचा वाचक नसून ) ' हेतु ' या अर्थाचा वाचक आहे. भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं ज्या अर्थीं ' विद् ज्ञाने ' हा धातु लुग्विकरण आहे त्या अर्थीं ' विश् ' धातूच्या साहचर्यामुळें शविकरण ' विद् ' धातूचेंच ग्रहण करावें, ' हन् ' धातूच्या साहचर्यामुळें लुग्विकरण ' विद् ' धातूचें ग्रहण करूं नये; कारण तसें केल्यास प्रकृतपरिभाषेशीं विरोध येईल. ( ' विभाषा

गमहनविदविशाम् ' या सूत्रान्वयें, 'गम्, हन्, विद् ' व 'विश्' या धातूंहून क्सु प्रत्यय झाला असतां, त्या प्रत्ययास विकल्पेंकरून इडागम करावा असें विधान केलें आहे. ज्या धातूहून होणाऱ्या कोणत्याहि प्रत्ययाला विकल्पेंकरून इडागम हाण्याचें विधान केलें आहे त्या धातूहून होणाऱ्या ' निष्ठा ' प्रत्ययाला—म्हणजे क्त व क्तवत् या प्रत्ययांना –इडागम होत नाहीं असें ' यस्य विभाषा ' सू० ३०२५ या सूत्रांत सांगितलें आहे. म्हणून ' विभाषा गमहनविदविशाम् ' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' विद् ' धातूनें लुग्विकरण ' विद् ' धातूचें ग्रहण करावें, कीं अलुग्विकरण ' विद ' धातूचें ग्रहग करावें, किंवा दोहोंचेंहि ग्रहण करावें असा प्रश्न सहज उपस्थित होतो. त्या सूत्रांत ' विद् ' धातु ' हन् ' व ' विश् ' या दोन धातूंच्यामध्यें पठित केला आहे. ' हन् ' हा अदादिगणांत पठित असलेला धातु लुग्विकरण आहे व त्या धातूच्या साहचर्यामुळें ' विद् ' हा धातु देखील लुग्विकरणच आहे असें मानतां येते. तसेंच ' विश् ' हा धातु तुदादिगणांत पठित असल्यामुळें अलुग्विकरण आहे व त्या धातूच्या साहचर्यामुळें अलुग्विकरण ' विद् ' धातूचें—म्हणजे तुदादिगणांत पठित असलेल्या 'विद्' धातूचें–ग्रहण वरील सूत्रांत केलें आहे असें देखील मानतां येते. त्या सूत्रांत पठित असलेला ' विद् ' धातु लुग्विकरण मानल्यास, त्या धातूचें क्तप्रत्ययान्त रूप ' विदित ' असें न होतां, ' वित्त ' असें रूप होण्याची आपत्ति येते. असा प्रश्न उपस्थित झाला असतां त्या प्रश्नाचें भाष्यकार असें उत्तर देतात कीं, जेथें सूत्रांत उच्चारलेला एखादा धातु लुग्विकरण असून अलुग्विकरणहि आहे तेथें तशा धातूनें लुग्विकरण धातूचें ग्रहण न करितां, अलुग्विकरण धातूचेंच ग्रहण करावें, आणि हेंच ही परिभाषा सांगते. सारांश ही परिभाषा कोणत्याहि पाणिनीय सूत्रानें ज्ञापित होत नसून, वरील भाष्यानेंच ज्ञापित होते. आणि ही परिभाषा असल्यामुळें, ' विभाषा गमहनविदविशाम् ' या सूत्रांत उच्चारलेल्या ' विद् ' धातूनें तुदादिगणांतील शविकरण ' विद् ' धातूचेंच ग्रहण करितां येतें, अदादिगणांतील लुग्विकरण ' विद्' धातूचें ग्रहण करितां येत नाहीं. यामुळें ' यस्य विभाषा ' या सूत्रांत सांगितलेला इडागमनिषेध लुग्विकरण ' विद् ' धातूला लागू शकत नाहीं, व त्या धातूचें क्तप्रत्ययान्त ' विदित ' असें इष्टरूप सिद्ध होतें. )

**अत एव परिभाषायां लुग्विकरणस्यैवेति नोक्तम् ॥ कण्ठतस्तु भाष्ये एषा क्वापि न पठिता ॥ गातिस्थेति सूत्रे पिबतेर्ग्रहणं कर्तव्यमिति वार्तिककृता, सर्वत्रैव पाग्रहणेऽलुग्विकरणस्य ग्रहणमिति भाष्यकृता चोक्तम् ॥ स्वरतिसूतीति सूत्रे कैयटेन च स्पष्टमुक्ता ॥ ९१ ॥**

( ' यस्य विभाषा ' या सूत्रावरील भाष्यावरून ' लुग्विकरणालुग्विकरणयोरलुग्विकरणस्यैव ' अशाच प्रकारची परिभाषा ज्ञापित होत असल्यामुळें ) या परिभाषेत ' लुग्विकरणस्यैव ' असें म्हटलें नाहीं—म्हणजे ' लुग्विकरणालुग्विकरणयोः लुग्विकरण-

स्यैव ' अशा तऱ्हेची परिभाषा पठित केली नाहीं. ( ' सूतिसूयति ' हा पृथक् निर्देश कैयटाच्या म्हणण्याप्रमाणें जर या परिभाषेचा ज्ञापक मानला असता तर, तशा तऱ्हेची देखील परिभाषा त्या ज्ञापकावरून निघूं शकली असती; कारण तशा तऱ्हेची परिभाषा मानल्यानें देखील, तो पृथक् निर्देश चरितार्थ ठरूं शकला असता, आणि त्या पृथक् निर्देशांत ' सूति ' या लुग्विकरण धातूचा प्रथम निर्देश केला असल्यामुळें, असें देखील म्हणतां आलें असतें कीं जेथें सूत्रांत असा धातु उच्चारला आहे कीं जो लुग्विकरण असून अलुग्विकरणहि आहे तशा ठिकाणीं त्या धातूनें, अलुग्विकरण धातूचें ग्रहण न करितां, लुग्विकरण धातूचेंच ग्रहण करावें. पण वर सांगितल्याप्रमाणें तो पृथक् निर्देश अन्य रीतीनें चरितार्थ ठरत असून प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरत नसल्यामुळें व ' यस्य विभाषा ' या सूत्रावरील भाष्यावरून जशी प्रकृत परिभाषा पठित केली आहे तशाच प्रकारची परिभाषा ध्वनित होत असल्यामुळें, या परिभाषेचा जो पाठ दिला आहे तसाच पाठ मानणें योग्य आहे. ) भाष्यांत ही परिभाषा कोठेंहि साक्षात् पठित केली नाहीं. ' गातिस्था ' २-४-७७ या सूत्रावर ' पिबतेर्ग्रहणं कर्तव्यम् ' असें वार्तिककारानें वार्तिक केलें आहे. परंतु भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं जेथें जेथें सूत्रांत ' पा ' असा निर्देश केला आहे तेथें तेथें अलुग्विकरण ' पा ' धातूचेंच ग्रहण करावें. ( लुग्विकरण ' पा ' धातूचें ग्रहण करूं नये. यावरून देखील प्रकृतपरिभाषा ज्ञापित होते आणि वरील वार्तिक मानण्याची कांहींच गरज राहत नाहीं. ) ' स्वरतिसूति ' ७-२-४४ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें ही परिभाषा साक्षात् पठित केली आहे.

---

## परिभाषा ९२

**ननु प्रजिघाययिषतीत्यादौ हेरचङीति विधीयमानं कुत्वं न स्यादत आह—**

' प्रजिघाययिषति ' इत्यादि स्थलीं ' हेरचङि ' सू० २५३१ या सूत्रानें सांगितलेलें कुत्व होऊं शकणार नाहीं. ( कारण त्या सूत्राचा अर्थ असा आहे कीं ' अभ्यासात्परस्य हिनोतेः हस्य कुत्वं स्यात्, न तु चङि '. ' प्र+हि+णि+सन्+ति=प्र+है+णि सन्+ति=प्र+हाय्+इ+सन्+ति ' या स्थलीं ' सन्यङोः ' सू० २३९५ या सूत्रान्वयें द्विर्वचन केलें असतां, अभ्यासापुढें येणारा हकार ' हि ' धातूचा राहत नसून ' हि '-च्या णिजन्त रूपाचा हकार राहणार. कुत्व ' हि ' धातूच्या अभ्यासापुढें असणाऱ्या हकाराला सांगितलें आहे. ' हि ' च्या णिजन्त रूपाच्या—म्हणजे ' हायि ' च्या—अभ्यासापुढें असणाऱ्या हकारास कुत्व सांगितलें नाहीं. त्यामुळें ' प्रजिघाययिषति ' या स्थलीं णिजन्ताच्या अभ्यासापुढें येणाऱ्या हकारास कुत्व न होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## प्रकृतिग्रहणे ण्यधिकस्यापि ग्रहणम् ॥ ९२ ॥

" सूत्रांत एखादा धातु उच्चारून त्या धातूला कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास, त्या धातूच्या णिजन्त प्रकृतीला देखील तें कार्य होतें "

( ही परिभाषा असल्यामुळें, ' हेरचङि ' या सूत्रानें ' हि ' धातूला सांगितलेलें कुत्वकार्य त्या धातूच्या णिजन्त प्रकृतीला देखील होतें. म्हणून ' हायि ' चा हकार अभ्यासापुढें आल्यास, त्याला देखील ' हेरचङि ' या सूत्रान्वयें कुत्व होतें. )

**अचङीति प्रतिषेध एवास्या ज्ञापकः ॥ इयं च कुत्वविषयैव । हेरचङीति सूत्रे भाष्ये स्पष्टेयम् ॥ ९२ ॥**

' हेरचङि ' या सूत्रांत ' अचङि ' असा जो प्रतिषेध केला आहे तो या परिभाषेचा ज्ञापक होय. ( जर ही परिभाषा नसती तर तसा प्रतिषेध करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण ' णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्' सू० २३१९ या सूत्रान्वयें धातूच्या णिजन्ताहूनच कर्तरि चङ् होऊं शकतो, व सूत्रांत उच्चारलेल्या धातूनें जर त्या धातूच्या णिजन्त प्रकृतीचें ग्रहण होऊं शकत नसतें तर ' अचङि ' असा प्रतिषेध ' हेरचङि ' या सूत्रांत करण्याची कांहींच गरज नव्हती. ' प्राप्तस्यैव निषेधः ' या न्यायान्वयें जें प्राप्त आहे त्याचाच निषेध केला जातो. जें प्राप्तच नाहीं त्याचा निषेध करण्याची गरज काय? परंतु ज्या अर्थीं तसा निषेध केला आहे त्या अर्थीं त्या निषेधावरूनच हें स्पष्ट होतें कीं धातूला सांगितलेलें कार्य त्या धातूच्या णिजन्त प्रकृतीला देखील होतें आणि अशा रीतीनें वरील प्रतिषेध चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरतो.) ज्या सूत्रांत कुत्व होण्याचें विधान केलें आहे तशाच सूत्रांना ही परिभाषा लागू पडते ( ज्या सूत्रांत इतर कार्यांचें विधान केलें आहे त्या सूत्रांना ही परिभाषा लागू पडत नाहीं. जसें, ' अदिप्रभृतिभ्यः शपः' सू० २४२३ या सूत्रानें सांगितलेला शपाचा लुक्, अदादिगणांतील धातूच्या णिजन्त प्रकृतीपुढें येणाऱ्या शपाला लागू पडत नाहीं, म्हणूनच ' आदयति, शाययति ' इत्यादि रूपें सिद्ध होतात. कित्येक वैयाकरण असें म्हणतात कीं, ' न भाभूपूकमि ' सू० २८४० या णत्वाचा निषेध करणाऱ्या सूत्रावर ' ण्यन्तभादीनामुपसंख्यानम् ' असें वार्तिक वार्तिककारानें केलें असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते. पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' हेरचङि' या सूत्रावरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं प्रकृतपरिभाषा कुत्वाचें विधान करणाऱ्या सूत्रांनाच लागू पडते व इतर प्रकारचें विधान करणाऱ्या सूत्रांना ती लागू पडत नाहीं. म्हणून इतर प्रकारचें विधान करणाऱ्या सूत्रांचा दाखला देऊन ही परिभाषा अनित्य ठरविणें बरोबर नाहीं. ) ' हेरचङि ' ७-३-५६ या सूत्रांवरील भाष्यांत प्रकृतपरिभाषा सांगितली आहे.

---

# परिभाषा ९३

**ननु युष्मभ्यमित्यादौ भ्यसः इत्यत्र भ्यमितिच्छेदे भ्यसो भ्यमि कृतेऽन्त्यलोपे एत्वं स्यादत आह—**

'युष्मभ्यम्' इत्यादि स्थलीं, 'भ्यसोभ्यम्' सू० ३९५ या सूत्रांत 'भ्यम्' असा पदच्छेद केल्यास ('युष्मद्+भ्यम्' अशा स्थितींत) 'भ्यस्' चे जागीं 'भ्यम्' असा आदेश केल्यावर ('युष्मद्+भ्यम्' अशी स्थिति झाली असतां, 'शेषे लोपः' सू० ३८५ या सूत्रानें) अन्त्य दकाराचा लोप होऊन ('युष्म' असें अदन्त रूप झाल्यावर, 'बहुवचने झल्येत्' सू० २०५ या सूत्रान्वयें, 'भ्यम्' हा झलादि विभक्तिप्रत्यय पुढें असल्यामुळें,) एत्व होईल. (व 'युष्मेभ्यम्' असें विकृत रूप होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टळावी) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिः ॥ ९३ ॥

"अङ्गाधिकारांतील एखाद्या सूत्रानें सांगितलेलें कार्य केल्यावर जर पुन्हा त्याच अधिकारांतील दुसऱ्या सूत्रानें दुसरें कार्य प्राप्त होत असेल तर, तो विधीच नाहीं असें समजावें (व तें दुसरें सूत्र नाहीं असें समजून त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य करूं नये.)"

**अङ्गेऽङ्गाधिकारे वृत्तं निष्पन्नं यत्कार्यं तस्मिन्सति पुनरन्यस्याङ्गकार्यस्य वृत्तौ प्रवृत्तावविधानं भवतीत्यर्थः ॥**

('अङ्गे वृत्तं अङ्गवृत्तम् तस्मिन् अङ्गवृत्ते' या स्थलीं) 'अङ्गे' या पदाचा अर्थ 'अङ्गाधिकारे'—म्हणजे अङ्गाधिकारांत सांगितलेल्या सूत्रानें—असा समजावा. 'वृत्तम्' या पदाचा अर्थ 'झालेलें' असा समजावा. असें कार्य झाल्यावर पुन्हा अङ्गाधिकारोक्त दुसऱ्या कार्याची प्रवृत्ति होत असल्यास, तशा कार्याचें विधानच केलें नाहीं, (असें समजून तें दुसरें कार्य करूं नये) असा या परिभाषेचा अर्थ आहे. ('युष्मद्+भ्यस्' या स्थलीं 'भ्यसोभ्यम्' या अङ्गाधिकारांतील सूत्रान्वयें एकदां 'भ्यस्' चे जागीं 'भ्यम्' असा आदेश होऊन व 'शेषे लोपः' या सूत्रानें 'युष्मद्' यांतील अन्त्य दकाराचा लोप होऊन 'युष्म+भ्यम्' अशी स्थिति झाली असतां, 'बहुवचने झल्येत्' या अङ्गाधिकारांतील दुसऱ्या सूत्राची प्रवृत्ति होऊं पाहते. पण ही परिभाषा असल्यामुळें तें सूत्र नाहींच असें समजून, त्या सूत्रान्वयें होणारें कार्य करूं नये. तसें कार्य न केलें म्हणजेच, 'युष्मभ्यम्' हें इष्टरूप सिद्ध होतें; तसें कार्य केल्यास, वर सांगितल्याप्रमाणें 'युष्मेभ्यम्' असें अनिष्ट रूप होईल.)

**एषा च ज्यादादीयस इत्याद्विधानेन ज्ञापिता । अन्यथेकारलोपेनाकृत्सार्वेति दीर्घेण च सिद्धे तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव ।**

'ज्यादादीयसः' सू. २०१२ या सूत्रांत केलेलें 'आत्' चें विधान या परिभाषेचें ज्ञापक आहे. ही परिभाषा नसती तर, ईकाराचा लोप झाल्यावर व 'अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः' सू० २२९८ या सूत्रानें दीर्घ केल्यावर रूपसिद्धि झालीच असती व 'आत्' चें विधान व्यर्थ ठरलें असतें. ( 'प्रशस्य+ईयस्' या स्थलीं, 'ज्य च' सू० २०११ या सूत्रानें 'प्रशस्य' च्या जागीं 'ज्य' असा आदेश होऊन 'ज्य+ईयस्' अशी स्थिति झाली असतां, 'ज्यादादीयसः' या सूत्रानें 'ज्य' च्या पुढें असणाऱ्या 'ईयस्' च्या आदिवर्णाचें—म्हणजे ईकाराचे—जागीं 'आ' असा आदेश होऊन 'ज्य+आयस्=ज्यायस्' असें इष्ट रूप सिद्ध होतें 'ज्यादादीयसः' असें सूत्र न करितां, 'ज्यादीयसः' एवढेंच सूत्र जरी पाणिनीनें केलें असतें तरी रूपसिद्धि झाली असती; कारण 'ज्यादीयसः' या सूत्रांत, 'बहोर्लोपः' सू० २०१७ या पूर्वसूत्रांतून 'लोपः' या पदाची अनुवृत्ति झाली असती व 'ज्यादीयसः लोपः'—म्हणजे 'ज्य' च्या पुढें येणाऱ्या ईयसूच्या आदिवर्णाचा लोप होतो— असा त्या सूत्राचा अर्थ झाला असता, व त्या सूत्रान्वयें 'ज्य+ईयस्=ज्य+यस्' अशी स्थिति होऊन, 'ज्य' हें अदन्त अङ्ग असल्यामुळें व त्यापुढें असलेला 'यस्' हा यादि ताद्धित प्रत्यय असल्यामुळें, 'अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः' या सूत्रानें 'ज्य' चा दीर्घ होऊन 'ज्या+यस्=ज्यायस्' असें रूप झालेंच असतें, व अशा रीतीनें 'ज्यादादीयसः' या सूत्रांत केलेलें 'आत्' चें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. परंतु ही परिभाषा असल्यामुळें, 'ज्यादीयसः लोपः' अशा अङ्गाधिकारोक्त सूत्रानें एकदां ईलोपरूपी कार्य झाल्यावर पुन्हा 'अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः' या दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें दीर्घरूप कार्य होऊं शकलें नसतें. म्हणून 'ज्यादादीयसः' या सूत्रांत पाणिनीला 'आत्' हें पद मुद्दाम घालावें लागलें व अशा रीतीनें तें 'आत्' ग्रहण चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें. )

## अत एव भिन्नस्थानिकाङ्गकार्यविषयाप्येषा ॥

वर सांगितलेल्या ज्ञापकसूत्रावरून हें देखील सिद्ध होतें कीं, ज्यांना अङ्गाधिकारोक्त कार्यें होणें आहे ते कार्यी भिन्न असले तरी प्रकृत परिभाषा लागू पडते. ( या पंक्तींत 'अपि' शब्द घातला असल्यामुळें, जेथें अङ्गाधिकारोक्त कार्यांचा कार्यी एकच आहे तेथें तर ही परिभाषा लागतेच, पण कार्यी भिन्न असले तरी ही परिभाषा लागू पडते असें या पंक्तीवरून स्पष्ट होतें. 'ज्य+ईयस' या वरील उदाहरणांत लोपरूपी कार्याचा स्थानी 'ई' आहे व दीर्घरूप कार्याचा स्थानी 'ज्य' यांतील अन्त्य 'अ' आहे. असे भिन्न स्थानी असून देखील ही परिभाषा लागू पडते व त्यामुळेंच 'ज्यादात्' या सूत्रांत 'आत्' ग्रहण पाणिनीला करावें लागलें. )

## इयं चानित्या द्वयोरिति निर्देशात् ।

( 'अस्मदो द्वयोश्च' सू० ८१८ व 'किंयत्तदो निर्धारणे द्वयोरेकस्य' सू० २०४७ या दोन सूत्रांत ) 'द्वयोः' असा निर्देश केला असल्यामुळें, ही परिभाषा

अनित्य ठरते. ( 'द्वि' हा शब्द सर्वादिगणांत पठित असल्यामुळें, 'सर्वादीनि सर्व-नामानि' सू० २१३ या सूत्रान्वयें तो शब्द सर्वनामसंज्ञक आहे. म्हणून 'द्वि+ओस्' अशा स्थितींत, 'त्यदादीनामः' सू० २६५ या सूत्रानें 'द्वि' च्या अन्त्यवर्णाचे—म्हणजे इकाराचे—जागीं 'अ' असा आदेश होतो. त्यामुळें 'द्व+ओस्' अशी स्थिति झाली असतां 'द्व' हें अदन्त अङ्ग झाल्यामुळें व त्यापुढें 'ओस्' हा प्रत्यय आल्यामुळें 'ओसि च' सू० २०७ या सूत्रानें 'द्व' यांतील 'अ' चे जागीं 'ए' असा आदेश होऊन 'द्वे+ओस् =द्वय्+ओस्=द्वयोः' असें रूप सिद्ध होतें. या उदाहरणांत 'त्यदादीनामः' या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें अकारादेशरूपी कार्य झाल्यावर, 'ओसि च' या दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें एत्वरूपी कार्य, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, व्हावयास नको होतें. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, तसें कार्य झालें आहे, व अशा रीतीनें 'द्वयोः' हा निर्देश प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचा ज्ञापक ठरतो. त्याचप्रमाणें ही परिभाषा अनित्य आहे याचें 'येषाम्' हें देखील उदाहरण देतां येईल. 'यत्+आम्' या स्थलीं 'त्यदादीनामः' या सूत्रान्वयें 'यत्' यांतील अन्त्य तकाराचे जागीं अकार होऊन व 'अतो गुणे' सू० १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन, आणि 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू० २१७ या सूत्रानें 'आम्' प्रत्ययास सुडागम होऊन 'य+साम्' अशी स्थिति झाली असतां, 'बहुवचने झल्येत्' सू० २०५ या सूत्रानें 'य' यांतील अकाराचे जागीं 'ए' असा आदेश होऊन व 'आदेशप्रत्यययोः' सू० २१२ या सूत्रानें षत्व होऊन 'येषाम्' असें रूप सिद्ध होतें. वास्तविक ही परिभाषा नित्य असती तर 'त्यदादीनामः' या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें कार्य झाल्यावर पुन्हा 'बहुवचने झल्येत्' या दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें कार्य करावयास नको होतें. पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, इष्टरूप सिद्ध होण्याकरितां तसें कार्य केलें आहे. )

**अनित्यत्वबललभ्यार्थमादायैव भ्यसोभ्यमिति सूत्रे भाष्ये निष्ठितस्येति पठितम् ॥**

प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वापासून निघणाऱ्या अर्थाच्या आधारावर भाष्यकारांनीं 'भ्यसोभ्यम्' ७–१–३० या सूत्रावरील भाष्यांत या परिभाषेंत 'निष्ठितस्य' हें पद घालून ('अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिर्निष्ठितस्य' अशा रीतीनें) ही परिभाषा पठित केली आहे. ( व त्यामुळें या परिभाषेचा अर्थ असा होतो कीं अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्रथम कार्य केल्यावर जर प्रयोगार्ह रूप सिद्ध होत असेल तर दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें कार्य करूं नये, पण प्रयोगार्ह रूप सिद्ध होत नसेल तर दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें कार्य करण्यास कांहीं हरकत नाहीं.)

**केचित्त्वनया परिभाषया न किञ्चिल्लक्ष्यं साध्यते । अत एव ज्ञाजनोर्जा ज्यादादीयस इति सूत्रयोरेनां ज्ञापयित्वा किं प्रयोजनमिति प्रश्ने पिबतेर्गुणप्रतिषेध उक्तः स न वक्तव्य इत्येव प्रयोजनमुक्तम्, न तु लक्ष्यसिद्धिरूपम् ।**

किंत्येक वैयाकरणांचें असें मत आहे कीं प्रकृतपरिभाषा इष्ट रूपाची सिद्धि करण्याकरितां मुळींच उपयोगी पडत नाहीं—म्हणजे प्रकृतपरिभाषा नसून देखील अन्य रीतीनें इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात (आणि म्हणून ही परिभाषा अनावश्यक असल्यामुळें, ती मानण्याचें कांहींच कारण नाहीं.) असें असल्यामुळेंच, 'ज्ञाजनोर्जा' व 'ज्यादादीयसः' या दोन सूत्रांनीं जरी ही परिभाषा ज्ञापित होते तरी ही परिभाषा मानून उपयोग काय होणार असा प्रश्न उपस्थित करून त्या प्रश्नाचें भाष्यकारांनीं असें उत्तर दिलें आहे कीं, ही परिभाषा मानल्यानें वार्तिककारानें 'पिबेर्गुणप्रतिषेधः' असें जें वार्तिक केलें आहे तें वार्तिक करण्याची गरज राहत नाहीं. परंतु ही परिभाषा इष्ट रूप सिद्ध करण्याच्या कामीं मदत देते असें भाष्यकारांनीं म्हटलें नाहीं. (भाष्यकाराच्या म्हणण्याचा असा आशय आहे कीं, 'पा + शप् + ति' या स्थितींत 'पाघ्राध्मा' सू. २३६० या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें 'पा' चे जागीं 'पिब्' असा आदेश झाल्यावर, 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्राप्त झालेलें गुणरूपी कार्य, ही परिभाषा मानल्यास होऊं शकत नाहीं, व त्यामुळें 'पिबेर्गुणप्रतिषेधः' असें वार्तिक असण्याची कांहींच गरज नाहीं. पण भाष्यकारांनीं ही परिभाषा मानण्याचें जें वर प्रयोजन सांगितलें आहे तें देखील अगदीं लंगडें आहे; कारण ही परिभाषा नसून देखील, 'पा' चे जागीं होणारा आदेश 'पिब्' असा होत नाहीं व अदन्त 'पिब' असा आदेश होतो असें मानल्यानें, वरील वार्तिक असण्याची व त्याचप्रमाणें प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज राहत नाहीं. 'ज्यादादीयसः' हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें कसें ज्ञापक ठरतें हें वर सांगितलेंच आहे. पण 'ज्ञाजनोर्जा' हें सूत्र देखील प्रकृत परिभाषेचें ज्ञापक ठरतें असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'ज्ञाजनोर्जा' सू० २५११ असें सूत्र न करितां 'ज्ञाजनोर्जः' असें जरी सूत्र केलें असतें तरी—म्हणजे 'ज्ञा' व 'जन्' या धातूंपुढें 'शित्' प्रत्यय आल्यास त्यांचें जागीं 'जा' असा आदेश न होतां, 'ज' असा आदेश होतो असें जरी पाणिनीनें विधान केलें असतें तरी—'ज्ञा+श्ना+ति=ज+ना+ति' व 'जन्+श्यन्+ते=ज+य+ते' अशी स्थिति झाली असतां, 'अतो दीर्घो यञि' सू० २१७० या सूत्रानें 'ज' यांतील अकाराचा दीर्घ झालाच असता, व 'जानाति' व 'जायते' अशीं रूपें सिद्ध झालींच असतीं. मग 'ज्ञाजनोर्जा' असें सूत्र पाणिनीनें कां केलें? त्याचें कारण हेंच कीं, ही परिभाषा असल्यामुळें, 'ज्ञाजनोर्जः' अशा अङ्गाधिकारोक्त सूत्रानें एकदां 'ज' असा आदेश झाल्यावर पुन्हा 'अतो दीर्घो यञि' या दुसऱ्या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें दीर्घकार्य होऊं शकलें नसतें. म्हणून 'ज्ञाजनोर्जा' असें सूत्र करावें लागलें. अशा रीतीनें तें सूत्र प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

तदुक्तम्, भ्यसोभ्यमित्यत्राभ्यमिति च्छेदः शेषे लोपश्चान्त्यलोप एवातो गुणे इति पररूपेण सिद्धं युष्मभ्यमित्यन्यत्र निरूपितम्। एवं च

सूत्रद्वयस्थमेतज्ज्ञापनपरं भाष्यं भ्यसोऽभ्यमिति सूत्रस्थं च भाष्यमेकदेश्युक्तिरित्याहुः ॥ ९३ ॥

(ही परिभाषा इष्टरूपें सिद्ध करण्याकरितां उपयोगी पडत नसल्यामुळें, अनावश्यक आहे व ती मानण्याची कांहींच गरज नाहीं ) म्हणून, इतर स्थलीं सांगितल्याप्रमाणें, ते वैयाकरण असें म्हणतात कीं ' भ्यसोभ्यम् ' या सूत्राचा (' भ्यसःभ्यम् असा पदच्छेद न करितां ) ' भ्यसःअभ्यम् ' असा पदच्छेद करावा, व 'शेषे लोपः' या सूत्रानें (' युष्मद् ' यांतील ' टि 'चा–म्हणजे ' अद् ' चा–लोप न करतां ) अन्त्य दकाराचा लोप केल्यास व ' अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें पररूप एकादेश केल्यास ' युष्मभ्यम् ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें व त्यामुळें जीं दोन सूत्रें—म्हणजे ' ज्ञाजनोर्जा ' व ' ज्यादादीयसः'—ह्या परिभाषेचीं ज्ञापकें मानलीं आहेत त्या दोन सूत्रांवरील भाष्य व तसेंच ' भ्यसोभ्यम् ' या सूत्रावरील भाष्य ( सिद्धान्तीची उक्ति नसून ) एकदेशीची उक्ति आहे असें समजावें (' भ्यसोभ्यम ' या सूत्रावरील भाष्यांत, त्या सूत्राचा ' भ्यसःअभ्यम् ' असा पदच्छेद केल्यास, ' शेषे लोपः ' या सूत्रानें, ' युष्मद् ' यांतील अन्त्य दकाराचा लोप न करितां टिलोप करावा असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. तसें केल्यास, 'युष्मद् + भ्यस् = युष्मद् + अभ्यम् = युष्म् + अभ्यम्' युष्मभ्यम् ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें. पण तसें केल्यास उदात्त स्वराची निवृत्ति होईल अशी शंका उपस्थित करून भाष्यकारांनीं त्या शंकेचें देखील निवारण केलें आहे पण कांहीं वैयाकरण असें म्हणतात कीं, ' भ्यसोभ्यम् ' या सूत्राचा, भाष्यकारांनीं सुचविल्याप्रमाणें, ' भ्यसः अभ्यम् ' असा पदच्छेद करावा; पण ' शेषे लोपः' या सूत्रानें भाष्यकारांनीं जसा ' युष्मद् ' यांतील टिलोप केला आहे तसा टिलोप न करितां, अन्त्य दकाराचा लोप करावा. तसें केल्यास ' युष्मद् + भ्यस् = युष्मद् + अभ्यम् = युष्म + अभ्यम् ' अशी स्थिति झाल्यावर, ' अतो गुणे ' या सूत्रानें पररूप एकादेश केल्यास, ' युष्मभ्यम् ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें, व तें रूप सिद्ध करण्याकरितां प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं; कारण ' भ्यसोभ्यम् ' या अङ्गाधिकारोक्त सूत्रानें प्रथम कार्य केल्यावर ' अतो गुणे ' या सूत्रानें जरी नंतर कार्य केलें जातें तरी, तें सूत्र अङ्गाधिकारांतील सूत्र नसल्यामुळें, कोणतीच अडचण उपस्थित होत नाहीं मग प्रकृतपरिभाषा मानण्याची गरज काय असा त्या वैयाकरणांच्या म्हणण्याचा आशय आहे. पण त्यांचें म्हणणें बरोबर मानल्यास, जीं दोन सुत्रें या परिभाषेचीं भाष्यकारांनीं ज्ञापकें मानलीं आहेत त्या दोन सूत्रांवरील भाष्य व तसेंच ' भ्यसोभ्यम् ' या सूत्रावरील भाष्य त्यांच्या विरुद्ध जातें. यावर ते वैयाकरण असें म्हणतात कीं, ज्याअर्थीं भाष्यकारांनीं भाष्यांत हें स्पष्ट म्हटलें आहे कीं प्रकृतपरिभाषा इष्टरूपें सिद्ध करण्याच्या उपयोगीं मुळींच पडत नाहीं व ज्याअर्थी भाष्यकारांनीं ती परिभाषा मानण्याचें जें कारण दिलें आहे तें अगदीं लंगडें व सहज खोडण्यासारखें आहे त्या अर्थी वरील तीन्ही सूत्रांवरील भाष्य सिद्धान्तभाष्य आहे

असें मानतां येत नाहीं व तें भाष्य केवळ एकदेशीचें उक्ति आहे हें स्पष्ट होतें. त्यामुळें त्यांच्या म्हणण्यांत कांहीं दोष येत नाहीं, व प्रकृतपरिभाषा अनावश्यक असल्यामुळें, ती मानण्याची कांहींच गरज नाहीं असा त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे. )

---

# परिभाषा ९४

## यत्वोरोदिति वाच्ये ओर्गुण इति गुणग्रहणात्—

( आतां ग्रन्थकार नव परिभाषा—म्हणजे प० ९४ ते प० १०२—अशा सांगतात कीं ज्या भाष्यांत कोठेंहि पठित नाहींत किंवा ध्वनित नाहींत व त्यामुळें, ग्रन्थकाराच्या मतें, स्वीकारार्ह नाहींत. कित्येक वैयाकरणांनीं त्या परिभाषा पठित केल्या असल्यामुळें ग्रन्थकारानें त्यांचा उल्लेख केला आहे आणि त्यांचें खंडन देखील केलें आहे. ) ' ओरोत्' असें सूत्र न करितां, पाणिनीनें ' ओर्गुणः ' सू० ८४७ असें सूत्र करून त्या सूत्रांत संज्ञावाचक ' गुण ' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, खालीं दिलेली परिभाषा ज्ञापित होते ( असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

## संज्ञापूर्वकविधेरनित्यत्वम् ॥ ९४ ॥

" सूत्रांत संज्ञावाचक शब्दाचें ( विधेयांशांत ) ग्रहण करून कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास, तें विधान अनित्य समजावें. "

( ' ओर्गुणः ' या सूत्रान्वयें, स्थानसाम्यानें उकाराचे जागीं ' ओ ' असाच आदेश होतो. मग वरील सूत्रांत ' ओत् ' अशा रीतीनें साक्षात् निर्देश न करितां, ' गुणः ' असा अप्रत्यक्ष निर्देश कां केला? ' ओत् ' असा लघुनिर्देश न करितां, ' गुणः ' असा गुरुनिर्देश करण्याचें कांहीं तरी विशेष कारण असलें पाहिजे; नाहीं तर तसा निर्देश अप्रयोजक व व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. पण प्रकृतपरिभाषा ज्ञापित करणें हें त्या निर्देशाचें प्रयोजन मानल्यास, तो निर्देश चरितार्थ ठरतो असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

**इयं च विधेयकोटौ संज्ञापूर्वकत्व एव। तेन स्वायम्भुवमित्यादि सिद्धम् ॥ ९४ ॥**

जेथें संज्ञावाचक शब्दाचें ग्रहण सूत्रांत विधेयांशांत केलें असेल तेथेंच ही परिभाषा लागू पडते. ( व हें ' ओर्गुणः ' या ज्ञापकसूत्रावरूनच सिद्ध होतें; कारण त्या सूत्रांत संज्ञावाचक ' गुण ' शब्दाचें विधेयांशांत ग्रहण केलें आहे. ज्ञापकसूत्रावरून असें सिद्ध होत असल्यामुळें, उद्देश्यांत संज्ञावाचक शब्दाचें ग्रहण केलें असल्यास, ही परिभाषा लागू पडत नाहीं; जसें-' अचः परस्मिन् पूर्वविधौ ' सू० ५० या सूत्रांत

संज्ञावाचक ' अच् ' शब्दाचें ग्रहण उद्देश्यकोटींत केलें असल्यामुळें, त्या सूत्राला ही परिभाषा लागू पडत नाहीं, व त्यामुळें त्या सूत्रानें केलेलें विधान अनित्य मानतां येत नाहीं. त्या सूत्रानें केलेलें विधान नित्य असल्यामुळेंच, ' न पदान्तद्विर्वचन ' सू० ५१ या सूत्रांत सांगितलेला निषेध चरितार्थ ठरतो. ' अचः परस्मिन् ' हें सूत्र अनित्य असतें तर, ' न पदान्त ' हें निषेधक सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. ) ही परिभाषा असल्यामुळें, ' स्वायम्भुवम् ' इत्यादि रूपें सिद्ध होतात. ( ' तस्यापत्यम् ' सू० १०८८ या सूत्रान्वयें ' स्वयम्भू ' शब्दाहून अपत्यार्थक ' अण् ' प्रत्यय केला असतां ' तद्धितेष्वचामादेः ' सू० १०७५ या सूत्रानें आद्यचाला वृद्धि होऊन ' स्वाय-म्भू+अण् ' अशी स्थिति झाली असतां, ' ओर्गुणः ' या सूत्राची प्राप्ति होते, व तें सूत्र नित्य मानल्यास, ' स्वायम्भो+अण्=स्वायम्भव्+अ=स्वायम्भव ' असें रूप झालें पाहिजे, ' स्वायम्भुव ' असें रूप होऊं शकत नाहीं. पण त्या सूत्रांत संज्ञावाचक ' गुण ' शब्दाचा निर्देश केला असल्यामुळें, तें सूत्र अनित्य ठरतें. त्यामुळें गुणकार्य न होतां, ' अचि श्नुधातु ' सू० २७१ या सूत्रान्वयें उकाराचे जागीं उवङ् आदेश होऊन ' स्वायम्भुव ' असें रूप सिद्ध होतें. )

---

## परिभाषा ९५

**तथा निलोडित्येव सिद्ध आनिग्रहणात्—**

त्याचप्रमाणें ' नि लोट् ' एवढेंच सूत्र करून काम भागत असतां, ' आनि लोट् ' सू० २२३१ असें सूत्र केलें असल्यामुळें व त्या सूत्रांत ( ' आडुत्तमस्य पिच्च' सू० २२०४ या सूत्रान्वयें होणाऱ्या आडागमासहित ' नि ' प्रत्ययाचें ग्रहण करून ) ' आनि ' असा शब्द उच्चारला असल्यामुळें, खालीं दिलेली परिभाषा ज्ञापित होते ( असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

### आगमशास्त्रमनित्यम् ॥ ९५ ॥

" आगमाचें विधान करणारें सूत्र अनित्य समजावें. "

( उपसर्गामध्यें णत्व होण्याचें निमित्त असल्यास, लोट् लकारांत झालेल्या ' आनि ' या आदेशांत असणाऱ्या नकाराचें णत्व होतें असा 'आनि लोट् ' या सूत्राचा अर्थ आहे. ' मेर्निः ' सू० २२०३ या सूत्रानें लोट् लकारांत ' मि ' प्रत्ययाचे जागीं ' नि ' असा आदेश होणें सांगितलें आहे, व 'आडुत्तमस्य पिच्च' या सूत्रानें त्या 'नि' प्रत्ययाला आडागम केल्यास ' आनि ' असा आडागमसहित प्रत्यय होतो. 'आनि लोट् ' या सूत्रात जें णत्वविधान केलें आहे तें णत्व ' नि ' यांतील नकारासच होणें आहे. मग ' नि लोट् ' असें लहानसें सूत्र न करितां ' आनि लोट् ' असें मोठें सूत्र पाणिनीनें

का केलें ? तसें मोठें सूत्र करण्यांत पाणिनीचा कांहीं तरी विशेष हेतु असलाच पाहिजे व तो हेतु हाच कीं जेथें लोट् लकारांत धातूला आडागमरहित 'नि' प्रत्यय लागला आहे तशा स्थलीं धातूच्यापूर्वीं असलेल्या उपसर्गांत णत्व होण्याचें निमित्त असलें तरी 'नि' प्रत्ययांतील नकारास णत्व होऊं नये; पण जेथें लोट् लकारांत धातूला आडागमसहित 'नि' प्रत्यय–म्हणजे 'आनि'–लागला आहे तशाच स्थलीं 'आनि' यांतील नकारास णत्व व्हावें. यावरून हें सिद्ध होतें कीं आगमरहित प्रत्यय देखील लावतां येतो व त्यामुळें आगमशास्त्र अनित्य आहे हें सिद्ध होतें असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

तेन सागरं तर्तुकामस्येत्यादि सिद्धम् ॥

ही परिभाषा असल्यामुळें, 'सागरं तर्तुकामस्य' इत्यादि प्रयोग शुद्ध मानले जातात. ('ॠ' धातु सेट्क असल्यामुळें त्या धातूहून होणाऱ्या 'तुमुन्' प्रत्ययास 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू० २१८४ या सूत्रानें इडागम व्हावयास पाहिजे होता, व 'वॄतो वा' सू० २३९१ या सूत्रान्वयें 'तरीतुकामस्य' किंवा 'तरितुकामस्य' असा प्रयोग असावयास पाहिजे होता; पण आगमशास्त्र अनित्य असल्यामुळें इडागम न करितां 'तर्तुकामस्य' असें रूप केलें आहे व तसा प्रयोग, ही परिभाषा असल्यामुळें, शुद्ध मानला जातो असें कित्येक वैयाकरण म्हणतात. तसेंच 'शाकं पचानस्य' व 'क्षुब्धो राजा' असे जे भाषेंत प्रयोग आढळतात ते, प्रकृतपरिभाषा असल्यामुळेंच, शुद्ध मानले जातात. वास्तविक 'शाकं पचानस्य' या स्थलीं, 'आने मुक्' सू० ३१०१ या सूत्रान्वयें मुगागम होऊन 'शाकं पचमानस्य' असा प्रयोग असावयास पाहिजे होता, व त्याचप्रमाणें 'क्षुब्धो राजा' या स्थलीं, 'क्षुभ्' धातु सेट्क असल्यामुळें, 'आर्धधातुकस्येट्' या सूत्रान्वयें आर्धधातुक 'क्त' प्रत्ययाला इडागम होऊन 'क्षुभितो राजा' असा प्रयोग असावयास पाहिजे होता. पण आगमशास्त्र अनित्य असल्यामुळें, तसे प्रयोग देखील शुद्ध मानले जातात, असें कित्येक वैयाकरणांचें म्हणणें आहे. )

---

## परिभाषा ९६

तथा तनादिपाठादेव सिद्धे तनादिकृञ्भ्य इति सूत्रे कृञ्ग्रहणात्—

त्याचप्रमाणें तनादिगणांत 'कृञ्' धातु पठित असल्यामुळें, 'तनादिभ्य उः' एवढेंच सूत्र करून काम भागत असतां, 'तनादिकृञ्भ्यः उः' सू० २४६६ असें सूत्र करून त्या सूत्रांत 'कृञ्' धातूचें ग्रहण केलें असल्यामुळें, खालीं दिलेली परिभाषा ज्ञापित होते ( असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

गणकार्यमनित्यम् ॥ ९६ ॥

" सूत्रांत गणाचा उच्चार करून कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास तें कार्य अनित्य समजावें. "

( ' तनादिभ्य उः ' एवढें सूत्र केलें असतें तरी, ' कृञ् ' धातु तनादिगणांत पठित असल्यामुळें, त्या धातूला ' उ ' हें विकरण लागलेंच असतें. मग पाणिनीनें ' तनादिभ्य उः ' असें लहानसें सूत्र न करितां, ' तनादिकृञ्भ्यः उः ' असें मोठें सूत्र कां केलें ? त्या सूत्रावरून हें सिद्ध होतें कीं सूत्रांत गणाचा उच्चार करून सांगितलेलें कार्य अनित्य असतें. )

तेन न विश्वसेदविश्वस्तमित्यादि सिद्धम् ॥ ९६ ॥

ही परिभाषा असल्यामुळें, ' न विश्वसेदविश्वस्तम् ' इत्यादि प्रयोग शुद्ध मानले जातात. ( वास्तविक ' श्वस् ' धातु अदादिगणांत पठित असल्यामुळें, ' अदिप्रभृतिभ्यः शपः ' सू० २४२३ या सूत्रानें शपाचा लुक् व्हावयास पाहिजे होता. पण त्या सूत्रांत 'अदिप्रभृतिभ्यः' असा गणवाचक शब्द उच्चारून कार्य सांगितलें असल्यामुळें तें कार्य, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, अनित्य ठरतें—म्हणजे क्वचित् स्थलीं तें कार्य होत देखील नाहीं. त्यामुळें ' विश्वस्यात्' असा प्रयोग न करितां, ' विश्वसेत् ' अशा रीतीनें केलेला प्रयोग देखील शुद्ध मानला जातो असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

---

## परिभाषा ९७

तथा चक्षिङो ङित्करणात्—

त्याचप्रमाणें ' चक्षिङ् ' हा धातु ङित् करून पठित केला असल्यामुळें, खालीं दिलेली परिभाषा ज्ञापित होते ( असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

अनुदात्तेत्त्वलक्षणमात्मनेपदमनित्यम् ॥ ९७ ॥

" धातु अनुदात्तेत् असल्यास त्याला आत्मनेपदाचे प्रत्यय होतात असें सूत्रांत केलेलें विधान अनित्य समजावें. "

( ' चक्षिङ् ' हा धातु अनुदात्तेत् असल्यामुळें, 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू० २१५७ या सूत्रान्वयें त्या धातूला आत्मनेपदाचेच प्रत्यय प्राप्त होतात. मग पुन्हा त्या धातूला ' ङ् ' हा अनुबन्ध लावण्याची काय गरज होती ? पण तो धातु अनुदात्तेत् असून देखील त्याला ' ङ् ' हा अनुबन्ध लावला असल्यामुळें हें सिद्ध होतें कीं, अनुदात्तेत् धातूला क्वचित् स्थलीं आत्मनेपदाचे प्रत्यय होत नाहींत. ' चक्षिङ् ' धातूला आत्मनेपदाचेच प्रत्यय व्हावे म्हणून तो धातु ' ङित् ' करून धातुपाठांत पठित केला

आहे. अशा रीतीनें त्या ' ङित् ' करणामुळें प्रकृत परिभाषा ज्ञापित होते असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

तेन स्फायन्निर्मोक इत्यादि सिद्धम् ॥

ही परिभाषा असल्यामुळें, ' स्फायन्निर्मोकः' इत्यादि प्रयोग शुद्ध मानले जातात. ( वास्तविक ' स्फायी वृद्धौ ' हा भ्वादिगणांत पठित असलेला धातु अनुदात्तेत् आहे. त्यामुळें त्याला शतृप्रत्यय न होतां शानच् प्रत्यय व्हावयास पाहिजे होता व ' स्फायमानः निर्मोकः '–म्हणजे सापाची लांब कात–असा प्रयोग करावयास पाहिजे होता; परंतु अनुदात्तेत् धातूंना क्वचित् स्थलीं, या परिभाषेप्रमाणें, परस्मैपदाचे प्रत्यय देखील होत असल्यामुळें, ' स्फायन्निर्मोकः ' असा प्रयोग देखील शुद्ध मानला जातो असें कित्येक वैयाकरण म्हणतात. )

---

## परिभाषा ९८

तथा विनार्थनञा समासेनानुदात्तं पदमनेकमित्येव सिद्धे वर्जग्रहणात्—

( नञाचे जे सहा अर्थ सांगितले आहेत त्यांपैकीं ) ' विना ' या अर्थाच्या वाचक नञाशीं ( ' एक ' शब्दाचा ) समास करून ' अनुदात्तं पदमनेकम् ' असें सूत्र करून काम भागत असतां, ( ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' असें सूत्र करून त्या सूत्रांत) ' वर्ज ' शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें खालीं दिलेली परिभाषा ज्ञापित होते ( असें कित्येक वैयाकरण म्हणतात )

नञ्घटितमनित्यम् ॥ ९८ ॥

" सूत्रांत ' नञ् ' चा प्रयोग करून कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास तसा विधि–म्हणजे तें कार्य–अनित्य समजावा. "

तेन नेयङुवङ्स्थानित्यत्वाद्धे सुभ्रु इति सिद्धमिति ।

ही परिभाषा असल्यामुळें ' नेयङुवङ्स्थानावस्त्री ' सू० ३०३ हें सूत्र अनित्य ठरतें व त्यामुळें ' हे सुभ्रु ' इत्यादि प्रयोग शुद्ध मानले जातात. ('अचि श्नुधातुभ्रुवाम्' सू० २७१ या सूत्रान्वयें, अजादि प्रत्यय पुढें असल्यास, ' भ्रू ' यांतील ऊकाराचे जागीं उवङ् आदेश होतो. त्यामुळें ' नेयङुवङ् ' या सूत्रान्वयें ज्या ईकारान्त व ऊकारान्त शब्दांना अनुक्रमें इयङ् व उवङ् आदेश होणें सांगितलें आहे त्या शब्दांना, ' यू स्त्र्याख्यौ नदी ' सू० २६६ या सूत्रानें प्राप्त होणारी नदीसंज्ञा, होत नाहीं. ' सुभ्रू ' हा शब्द असा आहे कीं त्यापुढें अजादि विभक्तिप्रत्यय आल्यास त्यांतील अन्त्य

ऊकाराला उवङ् आदेश होतो. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें तो शब्द नदीसंज्ञक होऊं शकत नाहीं, आणि त्यामुळें ' सुभ्रू ' या शब्दाचें संबुद्धीचें रूप करितांना ' सुभ्रू+सु ' अशा स्थितींत, ' अम्बार्थनद्योर्ह्रस्वः ' सू० २६७ हें सूत्र लागू पडत नाहीं व ' हे सुभ्रु ' असें संम्बुद्धीचें रूप होऊं शकत नाहीं तथापि ' नेयङुवङ् ' हें सूत्र नञ्घटित असल्यामुळें तें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, अनित्य मानल्यानें ' हे सुभ्रु ' असा प्रयोग देखील शुद्ध मानला जातो असें कित्येक वैयाकरण म्हणतात.)

**तन्न । भाष्येऽदर्शनात् । भाष्यनुक्तज्ञापितार्थस्य साधुतानियामकत्वे मानाभावात् भाष्याविचारितप्रयोजनानां सौत्राक्षराणां पारायणादावदृष्टमात्रार्थकत्वकल्पनाया एवौचित्यात् ॥**

वर सांगितलेल्या ( ९४ ते ९८ या पांच ) परिभाषा स्वीकारतां येत नाहींत; कारण त्या भाष्यांत कोठेंहि पठित नाहींत. जी परिभाषा भाष्यांत पठित नाहीं ती ज्ञापकसिद्ध असली तरी, शब्दांचें साधुत्व ठरविण्यास—म्हणजे अमुक शब्द व्याकरण-रीत्या शुद्ध आहे हें ठरविण्यास—ती ऊपयोगी पडते असें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं. पाणिनीय सूत्रांतील ज्या ( आपाततः अनावश्यक ) अक्षरांच्या प्रयोजनाबद्दल भाष्यांत कांहीं विचार केला नाहीं त्या अक्षरांच्या पारायणानें—म्हणजे पाठानें—अदृष्टार्थाची प्राप्ति होते हेंच त्यांचे प्रयोजन आहे असेंच मानणें उचित आहे. ( पाणिनीय सूत्रांत कोठें कोठें एखादा शब्द आनावश्यक वाटण्याचा संभव आहे, आणि भाष्यकारांनीं तशा शब्दाचें जर भाष्यांत आवश्यकत्व किंवा प्रयोजन सांगितलें नसेल तर तसा शब्द सूत्रांतून काढून टाकणें योग्य नाहीं. अष्टाध्यायी ही श्रुति मानली असल्यामुळें, त्या अष्टाध्यायींतील शब्दांच्या—मग त्यापैकीं कांहीं शब्द आवश्यक वाटत नसले तरीं—पाठानेंच पुण्य लाभतें आणि म्हणून जशीं सूत्रें अष्टाध्यायींत पठित आहेत तशाच रीतीनें त्यांचा पाठ करणें योग्य आहे. सूत्रांत फेरबदल करून त्यांचा पाठ केल्यानें पुण्यप्राप्ति होणार नाहीं. जसें ' आनि लोट् ' या सूत्रांत ' आनि ' यांतील ' आ ' व ' लोट् ' हे शब्द जरी आपाततः अनावश्यक वाटतात तरी ' नि ' असें सूत्र पठित न करितां, ' आनि लोट् ' असेंच सूत्र पठित केलें पाहिजे. )

**किञ्च ज्ञापितेऽप्यानीत्यस्य न सार्थक्यमाडागमशून्यप्रयोगस्याप्रसिद्धेः । आड्ग्रहणं तु लोड्ग्रहणवदिति बोध्यम् ।**

दुसरें असें कीं, ' आनि लोट् ' या सूत्रानें ' आगमशास्त्रमनित्यम् ' ही परिभाषा ज्ञापित होत असली तरी (ही परिभाषा ज्ञापित झाल्यानें त्या सूत्रांतील) 'आनि' हा प्रयोग सार्थक ठरत नाहीं, कारण आट् आगम न लावतां ' नि ' एवढाच प्रत्यय लावून ( लोटाच्या उत्तमपुरुषाच्या एकवचनाचा ) कोठेंहि प्रयोग केलेला आढळत नाहीं. ( जर तसा प्रयोग भाषेंत रूढ असता तर परिभाषा चरितार्थ झाली असती, पण तसा प्रयोग भाषेंत कोठेंहि आढळत नसल्यामुळें ज्ञापकाला ' स्वांशे चारितार्थ्यम् '

येत नसल्यामुळें, ती परिभाषा मानतां येत नाहीं.) आट् ग्रहण हें लोट् ग्रहणासारखेंच समजावें–म्हणजे 'आनि लोट्' या सूत्रांतील 'लोट्' या पदाचें ग्रहण जसें अनावश्यक मानलें आहे तसेंच 'आनि' यांतील आट् ग्रहण अनावश्यक समजावें. ('आनि लोट्' ८–४–१६ या सूत्रावरील भाष्यांत, लोट् ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं 'प्रहिमानि कुलानि' व 'प्रवपानि मांसानि' अशा स्थलीं णत्व होऊं नये, असें म्हणून भाष्यकार 'आनिलोड्ग्रहणानर्थक्यमर्थवद्ग्रहणात्' असें वार्तिक पठित करून म्हणतात कीं, 'आनिलोड्ग्रहणमनर्थकम्। किं कारणम्। अर्थवद्ग्रहणात्। अर्थवतः आनि शब्दस्य ग्रहणम्। नैषोऽर्थवान्'. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं 'आनि लोट्' या सूत्रांतील 'लोट्' ग्रहण अनर्थक आहे, व तें जसें अनर्थक आहे तसें 'आनि' यांतील 'आट्' ग्रहण देखील, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, अनावश्यक आहे. म्हणून अशा अनावश्यक व 'स्वांशे' चरितार्थ नसणाऱ्या आट् ग्रहणानें 'आगमशास्त्रमनित्यम्' ही परिभाषा ज्ञापित होऊं शकत नाहीं.)

**अत एव घोर्लोपो लेटि वेति सूत्रे वेति प्रत्याख्यातम्। लोपेऽप्याट्पक्षे आटः श्रवणं भविष्यति दधादिति। अटि दधदिति। आगमशास्त्रस्यानित्यत्वे त्वाट्यसति दधादित्यसिद्ध्या वाग्रहणस्यावश्यकत्वेन तत्प्रत्याख्यानासङ्गतिः स्पष्टैव।**

('आगमशास्त्रमनित्यम्' ही परिभाषा नाहीं) म्हणूनच 'घोर्लोपो लेटि वा' सू० ३५८४ या सूत्रांतील 'वा' हें पद भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केलें आहे. (आगमशास्त्र अनित्य असतें तर भाष्यकारांनीं 'वा' या पदाचें प्रत्याख्यान केलें नसतें; कारण तसें प्रत्याख्यान केल्यानें 'धा' धातूंतील आकाराचा लेट् लकारांत नित्य लोप होऊन, आगमशास्त्राच्या अनित्यत्वामुळें प्रत्ययास आगम न करतेवेळीं, 'दधात्' व 'दधत्' अशीं वैकल्पिक इष्टरूपें सिद्ध होऊं शकलीं नसतीं. पण आगमशास्त्र नित्य असल्यामुळेंच, 'धा' धातूंतील आकाराचा) लोप झाला तरी, 'आट्' आगम प्रत्ययास लावल्यानें आटूचें श्रवण होऊन 'दधात्' असें रूप, व तसेंच अडागम प्रत्ययास लावल्यानें 'दधत्' असें रूप सिद्ध होऊं शकतें. पण आगमशास्त्र अनित्य मानल्यास (व 'धा' धातूंतील आकाराचा लोप केल्यास), आडागम प्रत्ययास न लावतेवेळीं, 'दधात्' असें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. तसें रूप सिद्ध होण्याकरितां ('घोर्लोपो लेटि वा' या सूत्रांत केलेलें) 'वा' पदाचें ग्रहण आवश्यक मानणें भाग आहे. पण तसें मानल्यास, ज्या भाष्यांत 'वा' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे तें भाष्य असंगत–चूक–ठरण्याची आपत्ति येते हें उघड आहे. ('धा' धातूचें लेट् लकाराचें प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रूप करितांना 'धा+लेट्=दधा+ति' अशा स्थितींत 'इतश्च लोपः परस्मैपदेषु' सू० ३४२६ या सूत्रानें 'ति' प्रत्ययांतील इकाराचा लोप करून 'लेटोऽडाटौ' सू० ३४२७ या सूत्रानें 'त्' प्रत्ययाला विकल्पेंकरून

'अट्' किंवा 'आट्' आगम केल्यावर 'दधा+आत्' व 'दधा+अत्' अशी स्थिति झाली असतां, ' घोर्लोपो लेटि ' अशा ' वा ' रहित सूत्रानें ' धा ' धातूंतील आकाराचा लोप केल्यावर ' दध्+आत्=दधात् ' व 'दध्+अत्=दधत् ' अशीं वैकल्पिक इष्ट रूपें सिद्ध होतात. पण आगमशास्त्र अनित्य मानल्यास आणि त्यामुळें ' त् ' प्रत्ययाला ' अट् ' किंवा ' आट् ' आगम न केल्यास, ' धा ' धातूंतील आकाराचा लोप केल्यावर ' दध्+त् ' अशी दोन्हीं स्थलीं स्थिति होईल, व ' झषस्तथोर्धः ' सू० २२८० या सूत्रानें ' त् ' चे जागीं धकार होऊन ' दध्ध् ' अशी स्थिति झाली असतां, ' संयोगान्तस्य लोपः ' सू० ५४ या सूत्रानें अन्त्य धकाराचा लोप होऊन ' दध् ' असें विकृत रूप होईल व ' दधात् ' आणि ' दधत् ' अशीं इष्ट रूपें होऊं शकणार नाहींत. तशीं रूपें सिद्ध होण्याकरितां ' घोर्लोपो लेटि वा ' या सूत्रांतील वाग्रहण आवश्यक मानावें लागेल, व आगमशास्त्र अनित्य मानलें असतां, ' त् ' प्रत्ययास आगम न करतेवेळीं ' धा ' धातूंतील आकाराचा विकल्पेंकरून लोप न केला तरच, ' दधा+त्=दधात् ' असें रूप सिद्ध होऊं शकेल. तरी पण ' दधत् ' असें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं; विकल्पेंकरून ' धा ' धातूंतील आकाराचा लोप केला व ' त् ' प्रत्ययास अडागम केला तरच तसें रूप सिद्ध होऊं शकेल. पण घोर्लोपो लेटि वा ' या सूत्रांतील ' वा ' ग्रहण आवश्यक मानल्यास, वरील भाष्याशीं विरोध येणार. म्हणून तसें मानतां येत नाहीं हें उघड आहे. सारांश प्रत्याख्यानपरभाष्यावरून हें सिद्ध होतें कीं आगमशास्त्र अनित्य नाहीं आणि त्यामुळें ' आगमशास्त्रमनित्यम् ' ही परिभाषा मानतां येत नाहीं.)

**एतेन यत्कैयटेन केचिदित्यादिनास्यैव वाग्रहणस्य तदनित्यत्वज्ञापकतोक्ता सापि चिन्त्या । प्रत्याख्यानपरभाष्यविरोधात् ।**

( ' घोर्लोपो लेटि वा ' या सूत्रांत ) जें ' वा ' ग्रहण केलें आहे तें कित्येक वैयाकरणांच्या मतें ' आगमशास्त्रमनित्यम् ' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे असें जें कैयटानें म्हटलें आहे तें देखील बरोबर मानतां येत नाहीं; कारण तसें मानल्यास, प्रत्याख्यानपरभाष्याशीं विरोध येईल. ( भाष्यकारांनीं ' वा ' पदाचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, तसें प्रत्याख्यात पद ' आगमशास्त्रमनित्यम् ' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक मानणें हें, प्रत्याख्यानपरभाष्य चूक आहे असें म्हणण्यासारखें, होईल. पण भाष्य चूक आहे असें म्हणण्याचा कोणासहि अधिकार नाहीं.)

**चक्षिङो ङकारस्यान्त इदित्वाभावसम्पादनेन चारितार्थ्याच्च ।**

' चक्षिङ् ' यांतील ङकार ' चक्ष् ' धातु इदित् नाहीं असें दर्शवीत असल्यामुळें, ङकार ग्रहण चरितार्थ ठरतें. ( व तें ङकारग्रहण ' अनुदात्तेत्त्वलक्षणमात्मनेपदमनित्यम् ' या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. धातुपाठांत 'चक्षिङ्' असा धातु पठित न करतां ' चक्षि ' असा धातु पठित केला असता तर, तो इदित्

मानला जाऊन ' इदितो नुम् धातोः ' सू० २२६२ या सूत्रान्वयें त्याला नुमागम होऊन विकृत रूप झालें असतें. तसें न व्हावें म्हणून ' चक्षिङ् ' असा धातु धातुपाठांत पठित केला आहे, आणि अशा रीतीनें ' चक्षिङ् ' यांतील ङकार चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें ङित्करण परिभाषा ९७ चें ज्ञापक मानतां येत नाहीं. )

तनादिसूत्रे कृञ्ग्रहणस्य भाष्ये प्रत्याख्यानाच्च ॥

' तनादि कृञ्भ्य उः ' ३-१-७९ या सूत्रावरील भाष्यांत त्या सूत्रांतील ' कृञ् ' या पदाचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें आहे. ( म्हणून त्या सूत्रांत केलेलें कृञ्-ग्रहण नाहींच असें मानलें पाहिजे, आणि त्यामुळें तें प्रत्याख्यात ' कृञ् ' ग्रहण ' गणकार्यमनित्यम् ' या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. )

---

## परिभाषा ९९ व १००

एवमेव—

याच प्रमाणें खालीं दिलेल्या दोन परिभाषा ( कित्येक प्राचीन वैयाकरण पठित करितात. )

### आतिदेशिकमनित्यम् ॥ ९९ ॥

" सूत्रांत अतिदेशानें सांगितलेलें कार्य अनित्य समजावें."

### सर्वविधिभ्यो लोपविधिरिड्विधिश्च बलवान् ॥ १०० ॥

" लोपविधायक व इट्विधायक सूत्रें इतर कार्य सांगणाऱ्या सूत्रांच्या मानानें बलवत्तर असतात. "

( अमुक कार्यासारखें दुसरें कार्य व्हावें असें ज्या सूत्रांत सांगितलें जातें त्याला आतिदेशिकविधि म्हणतात. जसें 'लोटो लङ्वत्' सू० २१९८ या सूत्रांत लङ्लकारांत जसें कार्य होतें तसेंच कार्य लोट्लकारांत करावें असें सांगितलें असल्यामुळें, हें सूत्र आतिदेशिकविधीचें उदाहरण आहे. ग्रन्थकारानें वर ज्या दोन परिभाषा सांगितल्या आहेत त्यांचीं ज्ञापकें दिलीं नाहींत. ग्रन्थकारास या परिभाषा मान्य नसल्या. मुळें त्यानें कदाचित् या परिभाषांचीं ज्ञापकें दिलीं नसतील. परंतु टीकाकारांनीं या दोन्ही परिभाषांचीं ज्ञापकें सांगितलीं आहेत. ( १ ) ' लोटो लङ्वत् ' हें सूत्र प० ९९ चें ज्ञापक मानलें आहे. ' लोटो लङ्वत् ' असें सूत्र न करितां, ' ङ्लोट् ' एवढेंच लहानसें सूत्र जरी केलें असतें तरी काम भागलें असतें. असें असून देखील ज्याअर्थी ' लोटो लङ्वत् ' असें मोठें अतिदेशविधायक सूत्र रचलें आहे त्या अर्थी अतिदेश हा साक्षात् विधानाहून भिन्न अर्थाचा बोधक मानला पाहिजे. सारांश

साक्षात् विधानानें जसें नित्य कार्य होतें तसें आतिदेशिकविधानानें होत नाहीं–म्हणजे आतिदेशिककार्य क्वचित् स्थलीं होत देखील नाहीं–असें मानलें म्हणजे ‘ जुह्वतु ’ हें रूप सिद्ध होतें. ‘ जुहु + झि ’ अशा स्थितींत, ‘ लोटो लङ्वत् ’ या अतिदेशामुळें, ‘ सिजभ्यस्तविदिभ्यश्च ’ सू० २२२६ या सूत्रानें ‘ झि ’ चे जागीं ‘ जुस् ’ आदेश पावला आहे. पण आतिदेशिककार्य अनित्य असल्यामुळें, ‘ झि ’ चे जागीं ‘ जुस् ’ आदेश न होतां ‘ अदभ्यस्तात् ’ सू० २४७९ व ‘ एरु : ’ सू० २१९६ या सूत्रांनीं ‘ झि ’ चे जागीं ‘ अतु ’ असा आदेश होऊन ‘ जुह्वतु ’ असें रूप सिद्ध होतें असें कित्येक वैयाकरण म्हणतात. वास्तविक पाहिलें असतां, ‘ आतिदेशिकमनित्यम् ’ ही परिभाषा न मानली तरी, ‘ जुह्वतु ’ असें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं; कारण ‘ सिजभ्यस्तविदिभ्यश्च ’ या सूत्रांत ‘ सिच् ’ चें ग्रहण केलें असल्यामुळें व ‘ सिच् ’ हा ङित्लुङ्लकारांतच होत असल्यामुळें, ‘ सिच् ’-च्या साहचर्यामुळें ‘ अभ्यस्त ’ पदानें ङित्लकारांत होणाऱ्या अभ्यस्ताचेंच ग्रहण होऊं शकतें, व तशा अभ्यस्त धातूपुढेंच ‘ झि ’ प्रत्यय आल्यास त्याचे जागीं ‘ जुस् ’ आदेश होतो असा ‘ सिजभ्यस्तविदिभ्यश्च ’ या सूत्राचा अर्थ केल्यास, लोट्लकारांत अभ्यस्त धातूपुढें येणाऱ्या ‘ झि ’ प्रत्ययाचे जागीं ‘ जुस् ’ आदेश होऊं शकत नाहीं व वर दाखविलेली अडचण दूर होते. सारांश ‘ लोटो लङ्वत् ’ हें सूत्र प० ९९ चें जें ज्ञापक मानलें आहे तसें तें ज्ञापक मानतां येत नाहीं, व त्यामुळें प० ९९ ज्ञापित होत नाहीं. म्हणून ती स्वीकारार्ह नाहीं. इतर वैयाकरणांच्या मतें, ‘ आतिदेशिकमनित्यम् ’ या परिभाषेचें ‘ प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ’ सू० २६२ हें सूत्र ज्ञापक आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ‘ स्थानिवदादेशः ’ सू० ४९ असें सूत्र असून देखील ‘ प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ’ हें सूत्र केलें असल्यामुळें, हें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक ठरतें व ते म्हणतात कीं या परिभाषेचें फल हें आहे कीं ‘ उभये ’ या उदाहरणांत, ‘ जस् ’ प्रत्यय पुढें असतां, वैकल्पिक सर्वनामसंज्ञा प्राप्त न होतां, नित्य सर्वनामसंज्ञा प्राप्त होते. ‘ उभ ’ शब्दाहून ‘संख्यायाः अवयवे तयप् ’ सू० १८४३ या सूत्रानें पावलेल्या ‘ तयप् ’ प्रत्ययाचे जागीं ‘उभादुदात्तो नित्यम् ’ सू० १८४५ या सूत्रान्वयें ‘अयच् ’ आदेश केल्यावर, ‘ अयच् ’ हा स्थानिवद्भावानें ‘ तयप् ’ आहे असें मानल्यास, ‘ प्रथमचरमतयाल्प ’ सू० २२६ या सूत्रान्वयें ‘ उभय ’ शब्दास, ‘ जस् ’ प्रत्यय पुढें असतां, विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा प्राप्त होते. पण ‘ स्थानिवदादेशः ’ या अतिदेशविधायक सूत्रानें सांगितलेलें आतिदेशिककार्य अनित्य असल्यामुळें, त्याला विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा न होतां, नित्य सर्वनामसंज्ञा होते. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ‘ उभय ’ शब्द सर्वादिगणांत पठित असल्यामुळें व तसेंच ‘ उभ ’ शब्दाहून जो ‘ अयच् ’ प्रत्यय होतो तो तयपाचे जागीं होणारा आदेश नसून स्वतंत्र निराळा प्रत्यय भाष्यकारांनीं मानला असल्यामुळें, त्याला ‘ प्रथमचरम ’ या सूत्रान्वयें

विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा प्राप्तच होत नाहीं. याचें कारण हें कीं तो शब्द ' तयप् ' प्रत्ययान्त नसून ' अयच् ' प्रत्ययान्त आहे. ' स्थानिवदादेशः ' १-१-५५ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं ' अयच् प्रत्ययान्तरम् ' व त्याचा अर्थ हा आहे कीं 'अत्र अयजेव विधीयते, न तु तयपः आदेशः'. सारांश वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं ज्या ज्ञापकांच्या आधारें ' आतिदेशिकम-नित्यम् ' ही परिभाषा मानली आहे तीं त्या परिभाषेचीं ज्ञापकें ठरत नसल्यामुळें, ती परिभाषा मानतां येत नाहीं. ( २ ) ' सर्वविधिभ्यो लोपविधिर्बलवान् ' या परि-भाषेचें देखील ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र ज्ञापक आहे असें प्राचीन वैयाकरण म्हणतात. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, प्रत्यय लागतांक्षणींच प्रत्यय-निमित्तक कार्य करून व नंतर प्रत्ययाचा लोप करून काम भागत असतां, ' प्रत्यय-लोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र करण्याची गरज काय होती ? पण ज्याअर्थी पाणिनीनें हें सूत्र मुद्दाम केलें आहे त्याअर्थी त्या सूत्रावरूनच हें सिद्ध होतें कीं लोपरूपी कार्य इतर कार्यांच्या मानानें बलवत्तर असल्यामुळें, तें प्रथम होतें, व त्यामुळें प्रत्यय-लोप प्रथम झाला असतां प्रत्ययनिमित्तक कार्य होणार नाहीं ; तसें न व्हावें म्हणून पाणिनीला ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें सूत्र करणें भाग पडलें, व अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ होऊन ' सर्वविधिभ्यो लोपविधिर्बलवान् ' या परिभाषेचें ज्ञापक ठरतें, व ही परिभाषा असल्यामुळेंच ' कानि सन्ति, कौस्तः' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊं शकतात. या दोन उदाहरणांत ' इको यणचि ' सू० ४७ व ' एचोऽय-वायावः' सू० ६१ या सूत्रांनीं यणादेश व आवादेश अनुक्रमें प्राप्त आहेत, व तसेंच ' श्नसोरल्लोपः' सू० २४६९ या सूत्रानें 'अस्' धातूच्या अलोपाची प्राप्ति आहे. अलोप प्रथम न केल्यास, यणादेश व आवादेश होण्याची आपत्ति येते. पण ही परिभाषा असल्यामुळें अलोप प्रथम होतो, व त्यामुळें यणादेशाचें व आवादेशाचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें तसे आदेश होत नाहींत व इष्ट प्रयोग सिद्ध होतात असें प्राचीन वैयाकरणांचें म्हणणें आहे. पण प्रत्ययाला मानून होणारें अलोपरूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, व शब्दान्तराला मानून होणारें यणादेश कार्य व आवादेश कार्य बहिरङ्ग असल्यामुळें, अन्तरङ्ग परिभाषेप्रमाणें, लोपकार्य प्रथम होतें व त्यामुळें यणादेश व आवादेश होऊं शकत नाहींत. सारांश ही परिभाषा न मानली तरी इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकतात. दुसरें असें कीं, ' प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ' हें नियामक सूत्र मानलें असल्यामुळें, तें सूत्र या परिभाषेचें ज्ञापक ठरूं शकत नाहीं आणि म्हणून ही परिभाषा स्वीकारतां येत नाहीं. ( ३ ) ' सर्वविधिभ्यो इड्विधिर्बलवान् ' या परिभाषा १०० च्या द्वितीयांशाचें ' आर्धधातुकस्येड्वलादेः' सू० २१८४ या सूत्रांत केलेलें इट्ग्रहण ज्ञापक आहे असें प्राचीन वैयाकरण म्हणतात. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ' नेड्वशि कृति ' या पूर्व सूत्रांतून इट्ची अनुवृत्ति, 'आर्धधातुकस्येट् ', या सूत्रांत होत असून देखील, पुन्हा त्या सूत्रांत इट्ग्रहण केलें असल्यामुळें हें ज्ञापित होतें कीं,

इडागमकार्य, इतर कार्यांच्या अपेक्षेनें, प्रथम होतें. पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण भाष्यकारांनीं ' आर्धधातुकस्येड्वलादेः ' या सूत्रांत ' नेड्वशि कृति ' या सूत्रांतून इट्ची अनुवृत्ति होत असतां देखील पुन्हा जें इट्ग्रहण केलें आहे त्याची सार्थकता भिन्न रीतीनें दाखविली आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं इट्ला गुण किंवा वृद्धि न होतां तो इट् इट्रूपानेंच कायम राहावा या करितां ' आर्धधातुकस्येट् ' या सूत्रांत इट्ग्रहण केलें आहे. आणि अशा रीतीनें तें इट्ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, इडागम सर्वांच्या पूर्वीं होतो या अर्थाचें, तें इट्ग्रहण, ज्ञापक मानतां येत नाहीं. दुसरें असें कीं भाष्यकारांनीं सिद्धांत सांगतेवेळीं ' आर्धधातुकस्येट् ' या सूत्रांतील इट्चें प्रत्याख्यान केलें आहे. त्यामुळें ह्या सूत्रांत ' इट् ' नाहींच असें मानणें भाग आहे, व तें प्रत्याख्यात केलेलें इट्ग्रहण ' सर्वविधिभ्यो इड्विधिर्बलवान् ' या परिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. सारांश ही परिभाषा ज्ञापकसिद्ध ठरत नसल्यामुळें, ती स्वीकारार्ह नाहीं. )

**इत्यादि भाष्यानुक्तं बोध्यम् ॥ स्वायम्भुवमित्यादि लोकेऽसाध्वेवेत्यन्यत्र विस्तरः ॥**

वरील दोन्ही परिभाषा भाष्यांत पठित नाहींत हें लक्षांत ठेवावें. ' स्वायम्भुवम् ' हा लौकिक प्रयोग अशुद्ध आहे. या संबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा १०१

**यदपि ननु हन्तेर्यङ्लुक्याशीर्लिङि वधादेशो न स्यादत आह—**

' हन् ' धातूच्या यङ्लुकाचें आशीर्लिङाचें रूप करितांना ( ' हन् ' असा धातु राहत नसून ' जङ्घन् ' असा यङ्लुकांत धातु होत असल्यामुळें, ' हनो वध लिङि ' सू० २४३३ या सूत्रानें ' हन् ' चे जागीं होणारा ) वधादेश होणार नाहीं. म्हणून ( कित्येक वैयाकरण ) ही परिभाषा सांगतात:—

**प्रकृतिग्रहणे यङ्लुगन्तस्यापि ग्रहणम् ॥ १०१ ॥**

" सूत्रांत धातु उच्चारून त्या धातूस कांहीं कार्य सांगितलें असल्यास, तें कार्य त्या धातूच्या यङ्लुकासहि होतें. "

**षाष्ठद्वित्वस्य द्विःप्रयोगत्वसिद्धान्तेन प्रयोगद्वयरूपे समुदाये प्रकृतिरूपत्वबोधनेनेदं न्यायसिद्धम् । अत एव जुहुधीत्यादौ द्वित्वे कृते धित्वसिद्धिरिति । तदपि न । भाष्येऽदर्शनात् ।**

अष्टाध्यायीच्या सहाव्या अध्यायांत जें द्विर्वचनकार्य सांगितलें आहे त्यासम्बन्धानें, मूळ धातूचा दोनदां प्रयोग करावा असा सिद्धान्त असल्यामुळें, दोन वेळ उच्चारलेला–म्हणजे साभ्यास–धातु मूळ धातूच आहे हा जो न्याय आहे ह्या न्यायानेंच ही परिभाषा सिद्ध होते. ( म्हणूनच, यङ्लुकांत दोन वेळ उच्चारलेला साभ्यास ' हन् ' धातु मूळ ' हन् ' धातूच आहे असें समजून त्या दोहोंचे जागीं आशीर्लिङांत वधादेश होतो, व ' वध्यात् ' असें ' हन् ' धातूच्या यङ्लुकाच्या आशीर्लिङाचें रूप सिद्ध होतें असें कित्येक वैयाकरण म्हणतात. ) असा सिद्धान्त आहे म्हणूनच, 'जुहुधि' इत्यादि स्थळीं, द्वित्व केल्यावर ' धि ' हा आदेश होतो. ( ' श्लौ ' सू. २३०९ ह्या सूत्रानें, ' हु ' धातूचें द्वित्व केल्यावर, ' जुहु + हि ' अशा स्थितींत, ' हुझल्भ्यो हेर्धिः' सू. २४२५ ह्या सूत्रानें, ' हि ' प्रत्ययाचे जागीं ' धि ' असा आदेश होतो. वास्तविक पाहिलें असतां, ' हु ' धातूपुढें ' हि ' प्रत्यय आल्यास, त्या प्रत्ययाचें ठिकाणीं ' धि ' असा आदेश व्हावा असें ' हुझल्भ्यः' ह्या सूत्रांत सांगितलें आहे. ' जुहु + हि ' ह्या उदाहरणांत ' हि ' हा प्रत्यय ' हु ' धातूपुढें नसून ' जुहु ' पुढें आहे. म्हणून ' हि ' चें जागीं ' धि ' असा आदेश होऊं नये. परंतु द्विर्वचन करून दोनदां उच्चारलेला साभ्यास धातु मूळ धातूच मानावा असा नियम असल्यामुळें, ' जुहु ' हा ' हु ' च आहे असें समजून, त्याच्यापुढील ' हि ' प्रत्ययाचे जागीं ' धि ' असा आदेश होतो.) पण ही परिभाषा देखील स्वीकारतां येत नाहीं. कारण ती भाष्यांत कोठेंच आढळत नाहीं.

**किञ्च तेन सिद्धान्तेन प्रत्येकं द्वयोस्तत्वबोधनेऽपि समुदायस्य तत्त्वबोधने मानाभावः ॥ अत एव दयतेर्दिगीति सूत्रेऽस्तेः परत्वाद् द्वित्वे कृते परस्यास्तेर्भूभावे पूर्वस्य श्रवणं प्राप्नोतीत्याशङ्क्य विषयसप्तम्याश्रयणेन परिहृतं भाष्ये । अन्यथा त्वदुक्तरीत्यैकाज्द्विर्वचनन्यायेन समुदायस्यैवादेशापत्तौ तदसङ्गतिः स्पष्टैव । तस्मादुत्तरखण्डमादायैव यथायोगं तत्तत्कार्यप्रवृत्तिर्बोध्या ॥**

दुसरें असें कीं, षष्ठाध्यायांत सांगितलेल्या पूर्वोक्त द्विर्वचनसिद्धान्तावरून जरी अभ्यास व धातु ह्या दोहोंपैकी, प्रत्येकास मूळ धातूच मानावा असें सिद्ध होत असलें तरी, अभ्यास व धातु ह्या दोहोंच्या समुदायास मूळ धातु मानावा असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. समुदायास मूळ धातु मानतां येत नसल्यामुळेंच, ' दयतेर्दिगि लिटि ' ७–४–९ ह्या सूत्रावरील भाष्यांत, द्विर्वचनाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें, ' अस् ' धातूचें प्रथम द्विर्वचन केल्यास व नंतर उत्तरखंडाचे जागीं ' भू ' असा आदेश केल्यास, पूर्वखंडाचें श्रवण होण्याची आपत्ति येईल अशी शंका उपस्थित करून, भाष्यकारांनीं ह्या शंकेचें निवारण विषयसप्तमी मानून केलें आहे. (' अस् + लिट् ' ह्या स्थितींत, ' लिटि धातोरनभ्यासस्य ' सू० २१७७ ह्या सूत्रानें द्विर्वचन प्राप्त

होतें, व तसेंच ' अस्तेर्भूः ' सू. २४७० ह्या सूत्रानें ' अस् ' चे जागीं ' भू ' हा आदेश होणें प्राप्त होतें. ' लिटि धातोरनभ्यासस्य ' हें परसूत्र असल्यामुळें, त्यानें होणारें द्वित्वकार्य प्रथम केल्यास, ' अस् + अस् ' अशी स्थिति होईल, व नंतर ' अस्तेर्भूः ' ह्या पूर्वसूत्रान्वयें, ' अस् ' धातूचे जागीं म्हणजे उत्तरखंडाचे ठिकाणीं ' भू ' असा आदेश केल्यास, ' अस् + भू ' अशी स्थिति होऊन लिटाच्या रूपांत पूर्वखंडाचें –म्हणजे ' अस् ' ह्या अभ्यासाचें––श्रवण होईल अशी शंका भाष्यकारांनीं उपस्थित केली आहे, व ह्या शंकेचें निवारण अशा रीतीनें केलें आहे कीं, ' अस्तेर्भूः ' हें सूत्र 'आर्धधातुके ' ह्या अधिकारांत पठित असल्यामुळें, ह्या सूत्रांत ' आर्धधातुके ' हें अधिकार सूत्र अनुवृत्त होतें व त्यामुळें ' आर्धधातुके अस्तेर्भूः ' असें तें सूत्र पठित केलें पाहिजे, व ह्या सूत्रांतील ' आर्धधातुके ' ह्या पदाचा अर्थ ' आर्धधातुके परे '–– म्हणजे ' आर्धधातुक प्रत्यय पुढें असतां '–– असा न करितां, ' आर्धधातुके ' ही विषयसप्तमी समजावी. तसें समजल्यास, ' आर्धधातुके ' ह्याचा अर्थ ' आर्धधातुके विषये '––म्हणजे आर्धधातुकाच्या विषयांत = ' आर्धधातुक प्रत्यय लावण्याचा प्रसंग आला असतां '––असा होतो. असा अर्थ केला म्हणजे, आर्धधातुक ' लिट् ' लावण्याचा प्रसंग आला असतां, प्रथम ' अस् ' चे जागीं ' भू ' असा आदेश करून मग ' लिट् ' लावावा, व त्यानंतर द्विर्वचन करावें असा सूत्रार्थ होऊन इष्ट रूप सिद्ध होतें.) तुमच्या–म्हणजे शंकाकाराच्या–म्हणण्याप्रमाणें 'एकाचो द्वे प्रथमस्य' या न्याया-न्वयें पूर्वोत्तरखंडरूप समुदायास धातु मानल्यास, ह्या समुदायाचे ठिकाणीं ' भू ' असा आदेश करण्याची आपत्ति येईल व वरील भाष्यांत केलेलें समाधान असंगत ठरेल. ('अस्+अस्' या समुदायाचे ठिकाणीं 'भू' असा आदेश केल्यास, स्थानिवद्भावानें ' भू ' हा साभ्यास धातु होईल व त्यामुळें ' लिटि धातोरनभ्यासस्य ' हें जें अनभ्यस्त धातूस लागू पडणारें सूत्र आहे तें सूत्र त्या साभ्यास ' भू ' ला लागू पडणार नाहीं, आणि तसेंच ' लक्ष्ये लक्षणस्य सकृत्प्रवृत्तिः ' या न्यायान्वयें एकदां द्विर्वचन झालें असल्यामुळें पुन्हा ' भू ' चे द्विर्वचन होऊं शकणार नाहीं. त्यामुळें ' अस् + अस् + लिट् = भू + लिट् = भू + णल् = भौ + अ = भाव् + अ = भाव' असें विकृत रूप होईल; आणि प्रथम ' अस् ' चे जागीं ' भू ' हा आदेश करून, व नंतर ' लिट् ' लावून द्विर्वचनादि कार्यें करावीं असें जें भाष्यकारांनीं सांगितलें आहे त्या म्हणण्याशीं विरोध येईल.) म्हणून धातूला मानून जें कार्य होणें सूत्रांत सांगितलें आहे तें कार्य उत्तरखंडांत असणाऱ्या धातूलाच मानून केलें पाहिजे.

**भूसुवोरित्यस्य तदन्ताङ्गस्येत्यर्थात् प्राप्तस्य गुणनिषेधस्य बोभूत्विति नियम इति न तद्विरोधः ।**

( ग्रन्थकारानें वर असें म्हटलें आहे कीं ही परिभाषा भाष्यांत पठित किंवा ध्वनित नसल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं. यावर शंकाकार असें म्हणतो कीं हें म्हणणें बरो-

वर नाहीं; कारण ' दाधर्तिदर्धर्ति ' ७-४-६५ या सूत्रावरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, जरी ' भूसुवोःस्तिङि ' या गुणनिषेधक सूत्रांत मूळ धातु ' भू ' व ' सू ' यांचा निर्देश केला आहे तरी भाष्यकारांनीं त्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' भू ' धातूनें त्या धातूच्या यङ्लुकांत प्रकृतीचें ग्रहण केलें आहे, व त्यामुळें प्रकृतपरिभाषा भाष्यकारास मान्य होती हें ध्वनित होतें, आणि म्हणून ही परिभाषा स्वीकारणें योग्य आहे. त्या भाष्यांत भाष्यकार असें म्हणतात ' बोभूत्विति किं निपात्यते । भवतेर्यङ्लुगन्तस्या-गुणत्वं निपात्यते । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धमत्रागुणत्वं भूसुवोरितङीति । एवं तर्हि नियमार्थं भविष्यति । ' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं ' बोभूतु ' हें रूप, ' दाधर्तिदर्धर्ति ' या सूत्रांत जीं निपातित रूपें पठित आहेत त्या रूपांत पठित करण्याची गरज नव्हती; कारण ' भूसुवोस्तिङि ' या सूत्रानें ' भू ' धातूस गुणनिषेध सांगितला असल्यामुळें, त्या सूत्रान्वयेंच ' बोभूतु ' हें रूप सिद्ध होतें. पण ज्या अर्थीं त्या रूपाचा निपातित रूपामध्यें पाणिनीनें पाठ केला आहे त्या अर्थीं तो पाठ नियमार्थ आहे असें समजावें–म्हणजे ' भूसुवोः ' या सूत्रानें सांगितलेला गुणनिषेध केवळ वेदांत ' बोभूतु ' एवढ्याच रूपास लागू पडतो व तो गुणनिषेध त्या धातूच्या यङ्लुकाच्या इतर रूपांना वेदांत देखील लागू पडत नाहीं व लौकिकप्रयोगाला तर मूळींच लागू पडत नाहीं. सारांश भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषा लक्षांत घेऊनच वरील भाष्य लिहिलें आहे हें स्पष्ट आहे. जर त्यांना प्रकृतपरिभाषा मान्य नसती तर मूळ धातूस लागणारें ' भूसुवोस्तिङि ' हें गुणनिषेधक सूत्र ' भू ' धातूच्या यङ्लुका-च्या रूपास त्यांनीं लावलें नसतें–असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. या शंकेला ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं, ' भू ' किंवा ' सू ' धातु ज्या अङ्गाच्या अन्तीं आहे अशा अङ्गापुढें सार्वधातुक ' तिङ् ' प्रत्यय आल्यास, त्या अङ्गांतील अन्त्य स्वराला गुण होत नाहीं असा ' भूसुवोस्तिङि ' या सूत्राचा अर्थ लक्षांत धरून भाष्यकारांनीं वरील भाष्य लिहिलें आहे, व तसा त्या सूत्राचा अर्थ केला म्हणजे, तें सूत्र ' भू ' धातूच्या यङ्लुकाच्या रूपांना देखील लागू पडणारें सूत्र ठरत असल्यामुळें, वरील भाष्य, प्रकृतपरिभाषा न मानून देखील, ठीक जुळतें, व त्यामुळें भाष्यकारांनीं वरील भाष्य लिहितांना प्रकृतपरिभाषा ध्वनित केली व त्यांना ती मान्य होती हें म्हणणें चूक ठरतें या पंक्तीचें हें विवेचन लक्षांत ठेवल्यास, तिचा जो अर्थ पुढें दिला आहे तो नीट ध्यानांत येईल. ) ' भू ' किंवा ' सू ' ज्या अङ्गाच्या अन्तीं आहे अशा अङ्गाला गुण होत नाहीं असा ' भूसुवोस्तिङि ' या सूत्राचा अर्थ केला म्हणजे त्या सूत्रानें प्राप्त असलेला गुणनिषेध ' बोभूतु ' एवढ्याच रूपास लागू पडतो असा जो नियम ( भाष्य-कारांनीं ) सांगितला आहे तो नियम ( ही परिभाषा स्वीकारार्ह नाहीं कारण ती भाष्यकारास मान्य नाहीं असें जें पूर्वीं म्हटलें आहे त्याच्या ) विरुद्ध ठरत नाहीं.

तस्माद्धन्तेयङ्लुकि वध्यादित्यादि माधवाद्युदाहृतं चिन्त्यमेवेत्यन्यत्र विस्तरः ॥

( धातूचें द्विर्वचन केलें असतां साभ्यास समुदायाला धातु मानतां येत नाहीं आणि तसेंच प्रकृतपरिभाषा नाहीं ) म्हणून ' हन् ' धातूच्या यङ्लुकाच्या आशीर्लिङाचीं ' वध्यात् ' इत्यादि रूपें होतात असें जें माधव इत्यादि वैयाकरणांनीं म्हटलें आहे तें बरोबर नाहीं ( कारण ' हन्हन् ' या समुदायास वर सांगितल्याप्रमाणें धातु मानतां येत नसल्यामुळें, त्या समुदायाचे जागीं ' हनो वध लिङि ' या सूत्रान्वयें वधादेश करितां येत नाहीं. तसेंच तें सूत्र मूळ ' हन् ' धातूला लागू पडणारें असल्यामुळें व प्रकृतपरिभाषा स्वीकारार्ह मानली नसल्यामुळें, तें सूत्र ' हन् ' धातूच्या यङ्लुकाच्या रूपांना लागू शकत नाहीं, म्हणून ' हन् ' धातूच्या यङ्लुकाच्या आशीर्लिङाचें रूप, ' वध्यात् ' असें न होतां, ' जङ्घन्यात् ' असें होतें. ) या संबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा १०२

**यदपि ननु वृद्धिर्यस्याचामादिरित्यत्रेकपरिभाषोपस्थितौ शालीयाद्यसिद्धिरत आह--**

'वृद्धिर्यस्याचामादिः' सु० १३३५ या सूत्रांत ' इको गुणवृद्धी ' सू० ३४ ही परिभाषा उपस्थित झाल्यास, 'शालीय 'इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. ('वृद्धिर्यस्याचामादिः' या सूत्रांत ' वृद्धि ' शब्द वापरला असल्यामुळें, ' इको गुणवृद्धी ' ही परिभाषा तेथें उपस्थित होऊन 'वृद्धि' शब्दाशीं एकवाक्यतापन्न झाली असतां, त्या सूत्राचा ' यस्य अचां आदिः इकः स्थाने वृद्धिः तत् वृद्धम् '–म्हणजे इकाचे स्थानीं होणारी वृद्धि ज्या शब्दाचा आदि स्वर आहे त्या शब्दाला ' वृद्ध ' संज्ञा प्राप्त होते–– असा अर्थ होईल, व त्या सूत्राचा असा अर्थ केल्यास, ' शाला ' या शब्दांतील आद्यच् इकाचे जागीं होणारा वृद्धिरूप स्वर नसल्यामुळें, ' शाला ' या शब्दाला वृद्धसंज्ञा प्राप्त होणार नाहीं, व त्यामुळें ' वृद्धाच्छः ' सू० १३३७ या सूत्रान्वयें त्याला 'छ' हा प्रत्यय होणार नाहीं आणि 'शालीयः' असें इष्टरूप सिद्ध होणार नाहीं. तसें न व्हावें ) म्हणून ( कित्येक वैयाकरण ) ही परिभाषा सांगतात:—

**विधौ परिभाषोपतिष्ठते नानुवादे ॥ १०२ ॥**

" विधेयाच्या विशेषणाच्या अर्थाचा संकोच किंवा नियमन करण्याकरितां –म्हणजे त्याचा अर्थ ठरविण्याकरितां–परिभाषा उपस्थित होते–म्हणजे त्याशीं संबद्ध अथवा अन्वित होते. अनुवाद्याच्या–म्हणजे उद्देशाच्या विशेषणाच्या–अर्थाचें नियमन करण्याकरितां परिभाषा उपस्थित होत नसते–म्हणजे तशा विशेषणाशीं संबद्ध किंवा अन्वित होत नसते. "

( या परिभाषेचा वर जो अर्थ दिला आहे तो अक्षरशः अर्थ केला नसून पुढील पंक्तींत ग्रन्थकारानें या परिभाषेचा जसा अर्थ सांगितला आहे त्याच्या अनुरोधानें केला आहे. वास्तविक या परिभाषेचा अक्षरार्थ असा आहे कीं विधेयाच्या ठिकाणीं परिभाषा उपस्थित होते, अनुवाद्याचे ठिकाणीं ती उपस्थित होत नाहीं–म्हणजे परिभाषा विधेयाची नियामिका होत असून उद्देश्याची नियामिका होत नाहीं. या परिभाषेंतील ' विधि ' शद्बाचा ' विधायकसूत्र ' असा अर्थ नसून ' विधेय ' असा अर्थ आहे, व लक्षणावृत्तीनें त्या शद्बाचा अर्थ ' विधेयविशेषण ' असा समजावा. त्यामुळें ' विधौ परिभाषा उपतिष्ठते ' या वाक्याचा 'विधेयविशेषणनियामिका परिभाषा भवति' असा अर्थ होतो. त्याचप्रमाणें, या परिभाषेंतील ' अनुवादे ' या पदाचा लक्षणावृत्तीनें ' अनुवाद्यविशेषणे ' असा अर्थ करावा व तसा अर्थ केला म्हणजे 'नानुवादे' या पदाचा ' अनुवाद्यविशेषणनियामिका परिभाषा न भवति ' असा अर्थ सिद्ध होतो. असा जो लक्षणावृत्तीनें वर दोन पदांचा अर्थ केला आहे तो लक्षांत ठेवला म्हणजे पुढील पंक्तींत ग्रन्थकारानें या परिभाषेचा जो अर्थ केला आहे तो नीट ध्यानांत येईल. )

**अनूद्यमानविशेषणेषु तन्नियामिका परिभाषा नोपतिष्ठत इति तदर्थः॥**

अनूद्यमानाच्या–म्हणजे उद्देश्याच्या–विशेषणांचे ठिकाणीं, त्या विशेषणांच्या अर्थाचा संकोच अथवा नियमन करणारी परिभाषा उपस्थित–म्हणजे प्रवृत्त–होत नसते असा ( या परिभाषेंतील ' नानुवादे ' या पदाचा ) अर्थ आहे. ( हा जो ग्रन्थकारानें प्रकृतपरिभाषेचा अर्थ केला आहे त्या अर्थाला धरून आपण ' वृद्धिर्यस्याचामादिः ' या सूत्राचें विवेचन करूं. या सूत्रांत ' वृद्धम् ' हें विधेय असून, ' तत् ' हें उद्देश्य आहे, व ' वृद्धिर्यस्याचामादिः ' हें वाक्य त्या उद्देश्याचें विशेषण आहे. या विशेषणवाक्यांत ' वृद्धि ' हें पद घातलें आहे व त्या पदाला लागू पडणारी ' इको गुणवृद्धी ' ही परिभाषा आहे. ती परिभाषा ' वृद्धि ' शब्दास लावून त्या शद्बाचा अर्थ केल्यास, ' इकाला होणारी वृद्धि ' असा त्या पदाचा मर्यादित अर्थ करावा लागेल व तसा अर्थ केल्यास, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, ' शाला ' या शद्बास वृद्धसंज्ञा प्राप्त होणार नाहीं व ' वृद्धाच्छः ' हें सूत्र लागू पडणार नाहीं, आणि त्यामुळें ' शालीयः ' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. परंतु ' अनूद्यमानविशेषणेषु परिभाषा नोपतिष्ठते ' असा नियम घालून देणारी प्रकृतपरिभाषा असल्यामुळें व ' वृद्धि ' हें पद विधेय किंवा उद्देश्य नसून उद्देश्याचें जें विशेषणवाक्य आहे त्यांत निर्दिष्ट केलेलें असल्यामुळें, त्या ' वृद्धि ' शद्बाच्या अर्थाचा संकोच करण्याकरितां ' इको गुणवृद्धी ' ही परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं, व त्यामुळें, ' वृद्धिरादैच् ' या वृद्धिसंज्ञाविधायकसूत्रांत 'वृद्धि' शद्बाचा जो अर्थ सांगितला आहे त्या अर्थान्वयेंच ' वृद्धिर्यस्याचामादिः ' या सूत्रांतील 'वृद्धी' पदाचा अर्थ केला पाहिजे, व तसा अर्थ केल्यास, 'शाला' या प्रातिपदिकांत 'आ' हा वृद्धिसंज्ञक आद्यच् असल्यामुळें, त्या प्रातिपदिकाला ' वृद्ध ' संज्ञा प्राप्त होते व

' वृद्धाच्छः ' हें सूत्र लागून ' शालीयः ' असें इष्टरूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. )

**विध्यङ्गभूतानां परिभाषाणां विधेयेनासिद्धतया सम्बन्धासम्भवेऽपि तद्विशेषणे व्यवस्थापकत्वेन चरितार्थानां तद्विशेषणव्यवस्थापकत्वे मानाभाव इति तर्कमूलेयम् ॥**

विधेयाला उपकारक—म्हणजे विधेयाचा अर्थ निश्चितपणें ठरविण्याकरितांच रचलेल्या—परिभाषांचा, विधेय असिध्द—म्हणजे साध्य—असल्यामुळें, जरी विधेयाशीं साक्षात् अन्वय होणें असंभवनीय आहे तरी त्या, विधेयाच्या विशेषणाचा—म्हणजे उद्देश्याचा—अर्थ निश्चितपणें ठरवून चरितार्थ ठरत असल्यामुळें, ( व अशा रीतीनें त्यांची आकांक्षा पूर्ण होत असल्यामुळें ) त्या उद्देश्याच्या विशेषणाशीं अन्वित होऊन त्याच्या अर्थाचें नियमन करतात असें म्हणण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं. या न्यायान्वयें प्रकृतपरिभाषा सिद्ध होते—म्हणजे याच न्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. ( पाणिनीय व्याकरणशास्त्राचा उद्देश इष्टरूपें कशा रीतीनें सिद्ध होतात हें सांगण्याचा असल्यामुळें, पाणिनीनें उद्देश्यविधेयघटित सूत्रें रचलीं आहेत—म्हणजे प्रत्येक कार्यविधायक सूत्रांत उद्देश्य व विधेय असून अमुक शब्दाला अमुक प्रकारचें कार्य व्हावें असें सांगितलें आहे. उद्देश्य व विधेय या दोहोंमध्यें विधेय प्रधान असून उद्देश्य अप्रधान असतें, व उद्देश्य विधेयाचें विशेषण असून सिद्ध असतें आणि विधेय साध्य असतें. विधायकसूत्रांशीं एकवाक्यतापन्न होऊन त्यांचा अर्थ निश्चितपणें ठरविणें या करितां परिभाषा निर्माण केल्या असल्यामुळें, सूत्रांत जें प्रधानरूपानें निर्दिष्ट आहे त्याशीं त्यांचा अन्वय होणें योग्य आहे. सूत्रांत विधेय प्रधान असतें हें नुकतेंच वर सांगितलें आहे. पण विधेय सिद्ध नसून साध्य असल्यामुळें—म्हणजे त्याला अजून अस्तित्व प्राप्त झालें नसल्यामुळें व तें पुढें सूत्रनिर्दिष्ट कार्य झाल्यावर प्राप्त होणारें असल्यामुळें—जेथें परिभाषेचा विधेयाशीं साक्षात् अन्वय होणें संभवत नाहीं तेथें ती विधेयाशीं साक्षात् अन्वित असलेलें जें त्याचें विशेषण—म्हणजे उद्देश्य—त्याशीं अन्वित होऊन, विशेषणद्वारा विधेयार्थ निश्चित करण्यास प्रवृत्त होते; व उद्देश्याशीं अन्वित होऊन ती चरितार्थ होत असल्यामुळें, जें विधेयाशीं साक्षात् संबंद्ध नसून उद्देश्याशीं साक्षात् संबंद्ध आहे अशा उद्देश्याच्या विशेषणाशीं अन्वित होण्याची तिला आकांक्षा उरत नाहीं. म्हणून प्रकृतपरिभाषेंतून टीकाकार असा मतितार्थ काढतात कीं ' परिभाषया प्रधानविधिसंस्कारे कर्तव्ये यावती परम्परा नाप्राप्ता ( आवश्यकी ) ततोऽधिकपरम्परा परिभाषाप्रवृत्तिं न प्रयोजयति'—म्हणजे प्रधान जें विधेय त्याला संस्कार करणें व त्याचा अर्थ निश्चितपणें ठरविणें हें परिभाषेचें प्रयोजन असल्यामुळें, परिभाषा प्रवृत्त होण्यास जेवढ्या परंपरेची आवश्यकता आहे त्याहून अधिक परंपरा त्या परिभाषेच्या प्रवृत्तीस कारणीभूत होत नाहीं. विषय कठिण असल्यामुळें तो स्पष्ट होण्याकरितां आपण ' इकॊ

यणाचि' हें सूत्र घेऊं. या सूत्रांत 'यण्' हें विधेय आहे—म्हणजे यणादेश होणें हें कार्य सांगितलें आहे—व 'इकः' हें उद्देश्य आहे—ह्मणजे इकाला यणादेश होणें सांगितलें आहे. 'इकः' हें उद्देश्य 'यण्' या विधेयाचें विशेषण आहे व 'इकः यण्' याचा अर्थ 'इक्स्थानिको यण् भवति' असा होतो. या सूत्रांतील 'अचि' हें पद 'इकः' या उद्देश्याचें विशेषण आहे व 'अचि इकः' याचा अर्थ 'अजव्यवहितपूर्वस्य इकः' असा होतो. त्यामुळें संपूर्ण सूत्राचा अर्थ 'अजव्यवहितपूर्वस्य इकः स्थाने यणादेशो भवति' असा होतो. पण इकाच्या जागीं यणादेश होतो असा जरी सूत्रार्थ होतो तरी कोणत्या इकाच्या जागीं कोणत्या यणाचा आदेश व्हावा हें निश्चित होत नाहीं. हें निश्चित करण्याकरितां 'स्थानेऽन्तरतमः' ही परिभाषा प्रवृत्त होते, व विधेयार्थ निश्चित करणें—म्हणजे कोणत्या प्रकारचा आदेश होतो हें ठरविणें—हें त्या परिभाषेचें प्रयोजन असल्यामुळें, ती परिभाषा 'यण्' या विधेयाशीं साक्षात् अन्वित होते व त्यामुळें 'स्थानार्थगुणप्रमाणतः स्थानिना इका यः सदृशतमः तादृश एव यण् भवति' असा सूत्रार्थ होतो. सारांश 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषेला प्रवृत्त होण्यास विधेयापेक्षां अधिक परंपरेची आवश्यकता नसल्यामुळें ती साक्षात् विधेयाशीं अन्वित होऊन चरितार्थ होते व त्यामुळें तिला विधेयविशेषणाशीं—म्हणजे उद्देश्याशीं—अन्वित होण्याची आकांक्षा राहत नाहीं. पण 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा अशी आहे कीं ती साक्षात् विधेयाशीं अन्वित होऊं शकत नाहीं व विधेयविशेषणाशींच—म्हणजे 'इकः' या षष्ठ्यन्त उद्देश्याशींच—अन्वित होऊं शकते; कारण ती परिभाषा प्रवृत्त होण्यास उद्देश्यगत अनिर्धारितसंबंधा—म्हणजे स्थानसंबंध खेरीजकरून इतर कोणत्याहि प्रकारच्या संबंधाचा बोध न करणारी—षष्ठी असणें हें निमित्त आवश्यक आहे. असें निमित्त 'इकः' या पदांत उपलब्ध असल्यामुळें, 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा त्या पदाशीं अन्वित होऊन त्या पदाचा 'इकः स्थाने' असा मर्यादित अर्थ करिते. सारांश ही परिभाषा साक्षात् विधेयाशीं अन्वित न होतां, विधेयविशेषण जें उद्देश्य त्याशीं अन्वित होऊन चरितार्थ ठरत असल्यामुळें तिला अधिकपरंपरेची आवश्यकता नाहीं. पण 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ही परिभाषा प्रवृत्त होण्यास सूत्रांत सप्तमीविभक्तीचा निर्देश असणें हें निमित्त आवश्यक आहे आणि तसें निमित्त उद्देश्याचें विशेषणच होत असतें. जसें 'इको यणचि' या सूत्रांत, वर सांगितल्याप्रमाणें, 'अचि' हें सप्तम्यन्त पद 'इकः' या उद्देश्याचें विशेषण आहे. तरी पण 'अचि' हा सप्तमीनिर्देश सूत्रांत असल्यामुळें, 'तस्मिन्निति निर्दिष्टे' ही परिभाषा प्रवृत्त होते; कारण ती प्रवृत्त होण्यास उद्देश्यविशेषणापर्यंतच्या परंपरेची आवश्यकता आहे. सारांश परिभाषा प्रवृत्त होण्यास जेवढ्या परंपरेची आवश्यकता आहे तेथेंच ती प्रवृत्त होते. जेथें एखाद्या सूत्रांत प्रवृत्त होण्यास आवश्यक परंपरेहून अधिक परंपरेची गरज आहे तेथें ती प्रवृत्त होऊं शकत नाहीं व याचीं उदाहरणें ग्रन्थकार पुढें सांगणार आहेत.)

**किञ्चोदीचामातः स्थाने इति सूत्रे स्थानेग्रहणमस्या लिङ्गम् । अन्यथा षष्ठी स्थाने इति परिभाषयैव तल्लाभे तद्वैयर्थ्यं स्पष्टमेवेति ।**

( ' प्रधानाप्रधानयोः ' प. १०६ या न्यायाच्या आधारावर ही परिभाषा रचली असून ती युक्तिसिद्ध आहे असें ग्रन्थकारांनीं पूर्वी म्हटलें आहे; आतां ग्रन्थकार असें सांगतात कीं, प्राचीन वैयाकरणांच्या मतें, ही परिभाषा युक्तिसिद्ध असून ज्ञापकसिद्ध देखील आहे व प्राचीन वैयाकरण तिचें जें ज्ञापक देतात तें ग्रन्थकार या पंक्तींत सांगतात.) दुसरें असें कीं 'उदीचामातः स्थाने' सू० ४६५ या सूत्रांत केलेलें 'स्थाने' या पदाचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे. जर ही परिभाषा नसती तर, ( ' आतः ' ही षष्ठी असल्यामुळें तिच्यापुढें ) ' षष्ठी स्थानेयोगा ' या परिभाषेप्रमाणें, ' स्थाने ' या शब्दाचा अध्याहार होऊं शकलाच असता ( व ' आतः ' याचा अर्थ ' आतः स्थाने ' असा झालाच असता व वरील सूत्रांत ' स्थाने ' हें पद घालण्याची कांहींच गरज नव्हती; ) व तें पद व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते हें उघड आहे. ( ' उदीचामातः स्थाने ' या सूत्रांत ' प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्यात इदाप्यसुपः ' सू० ४६३ हें सूत्र अनुवृत्त होतें व त्यामुळें त्या सूत्राचा ' यकपूर्वस्य स्त्रीप्रत्ययाऽऽतः स्थाने यो अत् तस्य कात्पूर्वस्य इत् वा स्यात् आपि परे ' असा अर्थ होतो. येथें ' इत् ' हें विधेय असून ' अतः ' हें उद्देश्य आहे—म्हणजे अकाराचे जागीं इकारादेश होणें सांगितलें आहे—व ' अतः ' या उद्देश्याचे ' आतः स्थाने ' हें विशेषण आहे, व ' आतः स्थाने अतः ' याचा अर्थ ' आत्स्थानिकस्य अतः ' असा होतो. येथें ' आतः ' व ' अतः ' या दोन्ही षष्ठी आहेत व ' षष्ठी स्थानेयोगा ' ही परिभाषा ' आतः ' व ' अतः ' या दोन्हीं ठिकाणीं प्रवृत्त केल्यास, ' आतः, अतः ' यांचा अर्थ ' आतः स्थाने यः अत् तस्य स्थाने ' असा होतोच. मग पाणिनीनें ' आतः ' या पदापुढें ' स्थाने ' या पदाचें ग्रहण कां केलें? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ' षष्ठी स्थानेयोगा ' ही परिभाषा ' अतः ' या उद्देश्यषष्ठीचे ठिकाणीं प्रवृत्त होऊन चरितार्थ झाली असल्यामुळें, ती ' आतः ' या उद्देश्यविशेषणषष्ठीचे जागीं प्रवृत्त होऊं शकली नसती व ' आतः ' या पदाचा ' आतः स्थाने ' असा अर्थ होऊं शकला नसता. त्यामुळें पाणिनीला ' आतः ' या पदापुढें ' स्थाने ' हें पद घालावें लागलें व अशा रीतीनें तें ' स्थाने ' ग्रहण, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें चरितार्थ होऊन, प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें. जर ही परिभाषा नसती तर ' स्थाने ' ग्रहण वरील सूत्रांत व्यर्थ ठरलें असतें. अशा रीतीनें प्रकृतपरिभाषा ज्ञापित होते असें प्राचीन वैयाकरण म्हणतात. )

**तन्न । उदात्तस्वरितयोर्यण इत्यादौ ष्यङः सम्प्रसारणमिति सूत्रभाष्योक्तरीत्याल्लोपोऽन इत्यादौ चैतस्या व्यभिचरितत्वात् । भाष्यानुक्तत्वाच्च । स्थानसम्बन्धो न परिभाषालभ्य इत्यर्थस्य षष्ठी स्थाने इति सूत्रे भाष्ये स्पष्टमुक्तत्वेन त्वदुक्तज्ञापकासम्भवाच्च । तत्र स्थानेग्रहणं तु स्पष्टार्थमेव ॥**

वर जें म्हटलें आहे तें बरोबर नाही; ( व प्रकृतपरिभाषा स्वीकारार्ह नाहीं ). कारण ' उदात्तस्वरितयोर्यणः ' सू० ३६५७ इत्यादि सूत्रांत, व ' ष्यङः सम्प्रसारणम् ' ६-१-१३ या सूत्रावरील भाष्यांत जसें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानान्वयें 'अल्लोपोऽनः' इत्यादि सूत्रांत, ही परिभाषा व्यभिचरित होते—म्हणजे ह्या परिभाषेच्या विरुद्ध रचलेलीं तीं सूत्रें आहेत व त्या सूत्रांच्या रचनेवरूनच ही परिभाषा नाहीं असें स्पष्ट होतें. व तसेंच प्रकृतपरिभाषेचा भाष्यांत कोठेंहि उल्लेख केलेला आढळत नाहीं. ( ' उदात्तस्वरितयोर्यणः ' या सूत्रांत ' उदात्तस्वरितयोः ' ही षष्ठी असून यणः' ही पञ्चमी आहे, व त्या सूत्राचा अर्थ ' उदात्तस्थाने स्वरितस्थाने च यो यण् ततः परस्यानुदात्तस्य स्वरितः स्यात् ' असा आहे. येथें ' स्वरितः ' हें विधेय असून ' अनुदात्तस्य ' हें उद्देश्य आहे, व त्या उद्देश्याचें ' यणः ' हें विशेषण असून ' उदात्तस्वरितयोः ' हें यणाचें विशेषण—म्हणजे उद्देश्याच्या विशेषणाचें विशेषण—आहे. त्यामुळें प्रकृतपरिभाषा मानल्यास, उद्देश्याचे ठिकाणीं प्रवृत्त होऊन चरितार्थ ठरणारी ' षष्ठी स्थानेयोगा ' ही परिभाषा ' उदात्तस्वरितयोः ' या उद्देश्यविशेषणाच्या विशेषणाचे ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकत नाहीं आणि म्हणून पाणिनीनें ' उदात्तस्वरितयोः ' या पदापुढें ' स्थाने ' हें पद उच्चारावयास पाहिजे होतें. पण तें पद उच्चारलें नसल्यामुळें, पाणिनीस प्रकृतपरिभाषा मान्य नव्हती हें स्पष्ट होतें. तसेंच ' ष्यङः सम्प्रसारणम् ' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं ' अल्लोपोऽनः' या सूत्राचें व्याख्यान करितांना 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ही परिभाषा उद्देश्याच्या विशेषणाच्या विशेषणाला लावली आहे. 'अल्लोपोऽनः'या सूत्राचा अर्थ असा आहे कीं 'असर्वनामस्थानयजादौ प्रत्यये परे अनः अवयवः यः अकारः तस्य लोपः स्यात्'. येथे 'लोपः' हें विधेय असून ' अत् ' हें उद्देश्य आहे व त्या उद्देश्याचें 'अनः' हें विशेषण असून 'अनः' या विशेषणाचें ' यजादौ प्रत्यये ' हें विशेषण आहे. 'तस्मिन्निति निर्दिष्टे' ही परिभाषा उद्देश्याच्या विशेषणाचे ठिकाणीं प्रवृत्त होऊन चरितार्थ होणारी आहे. तिला चरितार्थ होण्यास यापेक्षां अधिक परंपरेची आवश्यकता नाहीं. म्हणून जर प्रकृतपरिभाषा असती तर, भाष्यकारांनीं 'तस्मिन्निति निर्दिष्टे' ही परिभाषा उद्देश्याच्या विशेषणाच्या विशेषणाचें ठिकाणीं प्रवृत्त केली नसती पण ती त्यांनीं तशा ठिकाणीं उपयोगांत आणली असल्यामुळें त्यांना प्रकृतपरिभाषा मान्य नव्हती हें स्पष्ट होतें. तसेंच 'अचो रहाभ्यां द्वे' सू. ५९ या सूत्रांत 'द्वे' हें विधेय असून 'यरः' हें उद्देश्य आहे, व त्या उद्देश्याचें 'रहाभ्याम्' हें विशेषण असून त्या विशेषणाचें 'अचः' हें विशेषण आहे. असें असून देखील, 'अचः' याचा अर्थ मर्यादित व स्पष्ट करण्याकरितां 'तस्मादित्युत्तरस्य ' ही परिभाषा लावल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. सारांश पाणिनीयसूत्ररचना प्रकृतपरिभाषेच्या विरुद्ध असल्यामुळें, व भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेचा भाष्यांत कोठेंहि उल्लेख केला नसल्यामुळें आणि प्रकृतपरिभाषेविरुद्ध परिभाषांची प्रवृत्ति केली असल्यामुळें, प्राचीन वैयाकरणांनीं मानलेली प्रकृतपरिभाषा स्वीकारार्ह नाहीं. ) ' षष्ठी स्थानेयोगा ' १-१-४९ या सूत्रावरील

भाष्यांत भाष्यकारांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, पाणिनीयसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या षष्ठीचा स्थान्यादेशसंबंधरूप अर्थ सांगण्यास तें सूत्र आवश्यक नाहीं. ( कारण एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं स्थान्यादेशरूपसंबंधच संभवतो. दुसरा कोणताहि संबंध संभवतच नाहीं; व अशा रीतीनें तो संबंध शब्दसामर्थ्यामुळें व अन्तरङ्गत्वामुळें व्यक्त होत असल्यामुळें ' षष्ठी स्थानेयोगा ' हें सूत्र असण्याची कांहींच गरज नाहीं. भाष्य-कार म्हणतात ' ननु चोक्तम्–एकशतं षष्ठ्यर्थाः, यावन्तो वा सन्ति ते सर्वे षष्ठ्यामु-च्चारितायां प्राप्नुवन्तीति । नैष दोषः, यद्यपि लोके बहवोऽभिसंबंधा आर्या यौना मौखाः स्रौवाश्चेति । शब्दस्य तु शब्देन कोऽन्योऽभिसंबंधो भवितुमर्हति–अन्यदतः स्थानात् ।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, ' षष्ठीविभक्तीचे शंभर अर्थ आहेत असें म्हटलें आहे. म्हणून सूत्रांत षष्ठीविभक्त्यन्त शब्द उच्चारला असतां, षष्ठीचे जेवढे म्हणून अर्थ आहेत ते सर्व एकदम उपस्थित होतील. मग त्यांपैकीं कोणत्या अर्थाचें ग्रहण करावें? पण या शंकेंत कांहींच अर्थ नाहीं. जरी लौकिक व्यवहारांत अनेक प्रकारचे संबंध दिसून येतात–जसें स्वस्वामिभावसंबंध, जन्यजनकभावसंबंध, गुरुशिष्यसंबंध, यजमान-याजयितृसंबंध इत्यादि–तथापि शब्दाचा शब्दान्तराशीं स्थानसंबंधाखेरीज दुसरा कोण-ताहि संबंध संभवत नाहीं. ' असें म्हणून भाष्यकार पुढें असें म्हणतात कीं ' षष्ठी स्थानेयोगा ' हें सूत्र स्थान्यादेशसंबंध सांगणारें सूत्र नसून, ' निर्दिश्यमानस्य आदेशा भवन्ति ' या अर्थाचें प्रतिपादन करणारें तें सूत्र आहे, व अशा रीतीनें भाष्यकारांनीं तें सूत्र प्रत्याख्यात केलें असल्यामुळें, ज्या सूत्राच्या भरंवशावर ' उदीचामातः स्थाने ' या सूत्रांत केलेलें ' स्थाने ' या पदाचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानलें आहे तें प्रत्याख्यातसूत्र नाहींच असें मानलें पाहिजे, व तसें मानल्यास, ) ' उदीचामातस्थाने ' या सूत्रांत केलेलें ' स्थाने ' या पदाचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरूं शकत नाहीं. त्या सूत्रांत ' स्थाने ' या पदाचें ग्रहण स्पष्ट अर्थबोध होण्याकरितांच केलें आहे. ( वास्तविक त्या सूत्रांत ' स्थाने ' या पदाचें ग्रहण केलें नसतें तरी ' आतः ' या षष्ठीचा ' आतः स्थाने ' असाच अर्थ झाला असता. तथापि स्वतंत्र महर्षि पाणिनीनें स्पष्ट अर्थबोध होण्याकरितां तो शब्द सूत्रांत घातला आहे. अमुकच शब्द उच्चारून पाणिनीनें सूत्र रचलें पाहिजे होतें असें म्हणण्याचा आपणांस मुळींच अधिकार नाहीं. )

**किञ्च विधौ परिभाषेति प्रवाद इको गुणवृद्धी अचश्च इत्यनयोर्वि-धीयत इत्यध्याहारमूलकोऽन्यत्र तु नास्याःफलमित्यन्यत्र विस्तरः ॥ १०२॥**

' विधौ परिभाषा उपतिष्ठते ' ही जी परिभाषा प्राचीन वैयाकरणांनीं मानली आहे ती, ' इको गुणवृद्धी ' व ' अचश्च ' सू० ३४ व ३५ या दोन सूत्रांत 'विधीयते' असा जो अध्याहार करावा लागतो तेवढ्याकरितांच व त्या अध्याहाराच्या आधारावरच मानलेली आहे. हीं दोन सूत्रें खेरीजकरून इतर कोठेंहि ही परिभाषा मानल्यानें,

कांहींच फलनिष्पत्ति होत नाहीं. ( ' इको गुणवृद्धी ' या सूत्रांत ' वृद्धिरादैच् ' व ' अदेङ् गुणः' या दोन पूर्वसूत्रांतून ' गुण ' व ' वृद्धि ' हे शब्द अनुवृत्त होत असून देखील पुन्हा या सूत्रांत गुण व वृद्धि या शब्दांचें जें ग्रहण केलें आहे तें अशाकरितां केलें आहे कीं जेथें गुण किंवा वृद्धि हा शब्द विधेयकोटींत उच्चारून गुण किंवा वृद्धि होणें सांगितलें आहे–जसें ' मृजेर्वृद्धिः, मिदेर्गुणः' इत्यादि — तशाच ठिकाणीं ' इकः ' हें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें, इतरत्र तें उपस्थित होत नाहीं ; आणि म्हणूनच 'वृद्धिर्यस्याचामादिः' या सूत्रांत ' वृद्धि ' शब्द विधेयकोटींत उच्चारला नसून वृद्धीचें विधान केलें नसल्यामुळें, त्या सूत्रांत उद्देश्यकोटींत उच्चारलेल्या ' वृद्धि ' या पदाशीं ' इकः' हें पद अन्वित होऊं शकत नाहीं. सारांश ' विधीयते ' या पदाचा ' इको गुणवृद्धी ' व ' अचश्च ' या दोन सूत्रांत जो अध्याहार करावा लागतो त्याच्या आधारावरच प्रकृतपरिभाषा कल्पिली आहे ; या परिभाषेच्या आधारावर तसा अध्याहार केला नाहीं हें लक्षांत ठेवावें. वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं प्रकृतपरिभाषा पाणिनीस किंवा भाष्यकारास मान्य नव्हती, व ती मानल्यानें इष्टरूपसिद्धि होण्याकरितां कोणत्याहि प्रकारची मदत होत नसल्यामुळें व इष्टरूपें इतर रीतीनें सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, ती स्वीकारार्ह नाहीं. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा १०३

**ननु नमस्करोति देवान्नमस्यति देवानित्यादौ नमः स्वस्तीति चतुर्थी दुर्वारेत्यत आह—**

' नमस्करोति देवान्, नमस्यति देवान् ' इत्यादि स्थलीं ' नमःस्वस्ति ' सू० ५८३ या सूत्रान्वयें चतुर्थीविभक्तीचा प्रयोग टाळतां येणें अशक्य आहे. ( साक्षात्प्रभृतिगणांत ' नमस् ' शब्द पठित असल्यामुळें त्याचा ' कृञ् ' धातूशीं संबंध झाला असतां, ' साक्षात्प्रभृतीनि च ' सू० ७७५ या सूत्रान्वयें त्याला गतिसंज्ञा प्राप्त होऊन, व सकाराचे जागीं रुत्व व विसर्ग होऊन आणि ' नमस्पुरसोर्गत्योः' सू० १५४ या सूत्रानें विसर्गाचे जागीं सत्व होऊन, ' नमस्करोति ' असें रूप होतें. तसेंच ' नमोवरिवश्चित्रङः क्यच् ' सू० २६७५ या सूत्रानें ' नमस् ' शब्दास 'नमसः पुजायाम्' या वार्तिकान्वयें ' पूजा ' या अर्थामध्यें क्यच् प्रत्यय होऊन ' नमस्यति ' असें रूप होतें. ' नमस्करोति ' व ' नमस्यति ' या दोन्ही स्थळीं ' नमस् ' शब्द असल्यामुळें, ' नमः स्वस्ति ' या सूत्रान्वयें ' देव ' शब्दास चतुर्थी विभक्ति पावली आहे. तसेंच ' देवान् ' हें पद कर्मरूपसंबंधानें धातूशीं अन्वित असल्यामुळें त्याला ' कर्मणि द्वितीया ' सू० ५३७ या सूत्रानें द्वितीया देखील पावली आहे. पण ' नमःस्वस्ति ' हें सूत्र ' कर्मणि

द्वितीया ' या सूत्राच्या मानानें परसूत्र असल्यामुळें, ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या न्यायान्वयें ' देव ' शब्दास चतुर्थी प्राप्त होते व ती टाळतां येऊं शकत नाहीं. ' नमः' या पदाच्या अर्थाशीं ' देव ' या शब्दाचा अन्वय करण्याची विवक्षा असल्यास ' नमः स्वस्ति ' या सूत्रान्वयें चतुर्थी पावते, पण ' कृञ् ' धातूच्या अर्थामध्यें ' देव ' या शब्दाचा कर्मरूपानें अन्वय करण्याची विवक्षा असल्यास, 'कर्मणि द्वितीया' या सूत्रानें ' देव ' शब्दास द्वितीया पावते ; सारांश ' नमःस्वस्ति ' व ' कर्मणि द्वितीया ' या दोन सूत्रांचे विषय भिन्न असल्यामुळें, द्वितीया व चतुर्थी या विभक्तींची युगपत् प्राप्ति होत नाहीं व त्यामुळें येथें विप्रतिषेधन्याय लागू पडत नाहीं—असें कोणी म्हटल्यास त्याला उत्तर हें आहे कीं, ' नमःस्वस्ति ' या सूत्रांत ' नमः' इत्यादि पदांशीं दुसऱ्या पदाचा अमुक प्रकारचा संबंध असल्यासच तें सूत्र प्रवृत्त होतें, नाहीं तर होत नाहीं असा उद्देश्यकोटींत निर्देश केला नसल्यामुळें, ' देव ' शब्दाचा 'नमः' शब्दाशीं क्रिया-द्वारा संबंध असला तरी, ' नमःस्वस्ति ' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें, व अशा रीतीनें द्वितीया व चतुर्थी या दोन्ही विभक्तींची युगपत् प्राप्ति होत असल्यामुळें, व चतुर्थीचें सूत्र परसूत्र असल्यामुळें, ' देव ' शब्दास चतुर्थी होणें अपरिहार्य आहे. असें असून देखील अशा ठिकाणीं चतुर्थी न होतां द्वितीया कां होते याचें कारण कळावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः —

## उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी ॥ १०३ ॥

" उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति अधिक बलवती असते."

**कारकविभक्तित्वं च क्रियाजनकार्थकविभक्तित्वं तच्च प्रथमाया अप्यस्तीति सापि कारकविभक्तिरिति सहयुक्ते इत्यादिसूत्रेषु भाष्ये ध्वनितम् ॥**

(जवळ असलेल्या पदामुळें प्राप्त होणारी विभक्ति उपपदविभक्ति होय. ' उपपदविभक्तित्वं पदयोगनिमित्तकविभक्तित्वम् ' अशी उपपदविभक्तीची व्याख्या केली आहे.) जी विभक्ति प्रातिपदिकास लावली असतां, प्रातिपदिकार्थ क्रियेच्या उत्पत्तीस कारणीभूत होतो असा बोध होतो ती विभक्ति कारकविभक्ति होय. (' कारके ' या अधिकारांत जीं कारकें सांगितलीं आहेत त्यांचा अर्थ सांगणारी जी विभक्ति ती कारकविभक्ति होय असा कारकविभक्तीचा अर्थ केल्यास, प्रथमाविभक्ति कारकविभक्ति ठरणार नाहीं ; कारण जरी कर्ता व कर्म हीं कारकें कारकाधिकारांत सांगितलीं आहेत तरी कर्तरि किंवा कर्मणि प्रथमाविभक्ति होते असें पाणिनीनें कोठेंहि सांगितलें नाहीं. ' प्रातिपदिकार्थ ' सू० ५३२ व ' सम्बोधने च ' सू० ५३३ एवढींच प्रथमाविभक्ति होण्यासंबंधाचीं सूत्रें पाणिनीनें सांगितलीं आहेत. परंतु प्रथमाविभक्ति देखील भाष्यकारांनीं कारकविभक्ति मानली असल्यामुळें, ग्रन्थकारानें ' क्रियाजनकार्थ-विभक्तित्वम् ' अशी कारकविभक्तीची व्याख्या केली आहे व) हें लक्षण प्रथमा-विभक्तीस देखील लागू पडत असल्यामुळें, ती देखील कारकविभक्ति मानतां येते असें

'सहयुक्ते' २–३–१९ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ध्वनित केलें आहे. ( त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'सहयुक्ते अप्रधाने' या सूत्रांतील 'अप्रधाने' या पदाचें प्रत्याख्यान करतेवेळीं 'पुत्रेण सह आगतो देवदत्तः' हें उदाहरण देऊन असें म्हटलें आहे कीं 'देवदत्तः' याला तृतीयाविभक्ति न होतां प्रथमा होते व याचें कारण 'उपपदविभक्तेःकारकविभक्तिर्बलीयसी' हें होय. प्रथमाविभक्तीला कारकविभक्ति न मानल्यास, भाष्यकाराचें वरील म्हणणें असंगत ठरेल. सारांश वरील उदाहरणांत 'देवदत्त' या पदाला सहयोगे तृतीया ही विभक्ति पावली आहे, कारण 'सह' या पदाच्या अर्थाचा जसा पुत्राशीं सम्बन्ध आहे तसाच देवदत्ताशींहि आहे. तसेंच 'देवदत्त' आगमनक्रियेचा जनक असल्यामुळें त्याला कर्तरि प्रथमा ही कारकविभक्ति पावली आहे. तथापि प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, उपपदविभक्तीचा बाध करून कारकविभक्ति होते. त्याचप्रमाणें 'नमस्यति देवान्' इत्यादि उदाहरणांत देखील, चतुर्थी या उपपदविभक्तीचा बाध करून कर्मणिद्वितीयाविभक्ति होते. 'नमोवरिवः' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात 'नमसः क्यचि द्वितीया नोपपद्यते । नमस्यति देवानिति । किं कारणम् । नमःशब्देन योगे चतुर्थी विधीयते सा प्राप्नोति । प्रकृत्यन्तरत्वात् सिद्धम् । नमःशब्देन योगे चतुर्थी विधीयते । नमस्यतिशब्दश्चायम् । ननु च नमस्यतिशब्दे नमःशब्दोऽस्ति तेन योगे प्राप्नोति । नैष दोषः । अर्थवतो नमःशब्दस्य ग्रहणम् । न च नमस्यतिशब्दे नमः शब्दोऽर्थवान् । अथवोपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसीति द्वितीयाविभक्तिर्भविष्यति ।')

**इयं च वाचनिक्येव । अत एव यस्य च भावेन इति सप्तम्यपेक्षयाधिकरणसप्तम्या बलवत्त्वमनेन न्यायेन तत्र च दीयते इति सूत्रे भाष्ये ध्वनितं कैयटेन स्पष्टमुक्तम् ॥**

ही परिभाषा ( प्रधानाप्रधानन्यायाच्या आधारावर रचली नसून ) वाचनिकीच आहे—म्हणजे सूत्रासारखी वचनरूपानें भाष्यकारांनीं भाष्यांत पठित केली आहे, आणि ती सूत्रासारखीच प्रमाणभूत आहे. आणि ती वाचनिकी असल्यामुळेंच, 'सप्तम्यधिकरणे च' सू. ६३३ या सूत्रान्वयें होणारी अधिकरणसप्तमी ( कारकविभक्ति असल्यामुळें ) 'यस्य च भावेन' सू० ६३४ या सूत्रानें होणाऱ्या भावेसप्तमीपेक्षां —भावेसप्तमी उपपदविभक्ति असल्यामुळें—अधिक बलवती आहे असें 'तत्र च दीयते' ५–१–९६ या सूत्रावरील भाष्यांत ध्वनित केलें असून कैयटानें स्पष्ट म्हटलें आहे. ( त्या भाष्यांत भाष्यकारांनीं अशी शंका उपस्थित केली आहे कीं, 'तत्र च दीयते कार्यं भववत्' सू० १७६० हें वेगळें सूत्र असण्याची कांहींच गरज नाहीं, कारण त्या सूत्रानें होणारें कार्य 'तत्र भवः' सू. १४२८ या सूत्रान्वयें होऊं शकतेंच. पण भाष्यकार पुढें या शंकेचें अशा रीतीनें निवारण करितात कीं 'तत्र भवः' या सूत्रांत निर्दिष्ट असलेली 'तत्र' ही सप्तमी औपश्लेषिक अधिकरणसप्तमी आहे व त्या सूत्रा-

न्वयें तशा अर्थामध्येंच प्रत्यय होऊं शकतो, पण ज्याअर्थी 'तत्र च दीयते' हें वेगळें सूत्र केलें आहे आणि त्या सूत्रानें होणारें कार्य 'तत्र भवः' या सूत्रान्वयें देखील होऊं शकतें असें मानल्यास तें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते त्याअर्थी, 'तत्र च दीयते' या सूत्रांतील 'तत्र' ही सप्तमी भावेसप्तमी मानणें उचित आहे, आणि तसें मानल्यास, दोन्ही सूत्रें आपापल्या विषयांत चरितार्थ ठरतात आणि अशा रीतीनें 'मासे गते दीयते' किंवा 'मासे गते कार्यम्' या अर्थामध्यें प्रत्यय होण्याकरितां 'तत्र च दीयते' हें सूत्र आवश्यक आहे. प्रकृतपरिभाषा वाचनिकी मानल्यासच, वरील भाष्य उपपन्न ठरतें. ही परिभाषा प्रधानाप्रधानन्यायाच्या आधारावर रचली आहे असें मानल्यास, तें भाष्य असंगत ठरण्याची आपत्ति येते; कारण अधिकरणसप्तमी व भावेसप्तमी या दोन्ही प्रकारच्या सप्तमींचा क्रियेंत अन्वय होत असल्यामुळें एक सप्तमी प्रधान व दुसरी अप्रधान मानतां येत नाहीं व दोन्ही सप्तमी सारख्याच दर्जाच्या ठरत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा वाचनिकी मानल्याशिवाय, कारकविभक्ति उपपदविभक्तीपेक्षां अधिक बलवती मानतां येत नाहीं. या विषयासंबंधानें अधिक चर्चा पुढें करण्यांत येईल )

**एतेन क्रियान्वयित्वं कारकत्वमित्यपास्तं, यस्य च भावेनेति सप्तम्या अपि क्रियान्वयित्वात् ।**

( या पंक्तींतील 'एतेन' या पदाचा 'वक्ष्यमाणप्रकारेण'—म्हणजे पुढें जें सांगण्यांत येत आहे त्यामुळें—असा अर्थ समजावा. ) पुढें जें लगेच सांगण्यांत येत आहे त्यामुळें, क्रियेशीं जें अन्वित असतें तें कारक होय अशी जी कित्येक वैयाकरण 'कारक' शब्दाची व्याख्या करितात ती चूक ठरते. कारण 'यस्य च भावेन' सू० ६३४ या सूत्रान्वयें होणाऱ्या भावेसप्तमीचा देखील क्रियेंत अन्वय असतोच. ( सारांश जशी अधिकरणसप्तमी क्रियेंत आन्वित असते तशीच भावेसप्तमी देखील क्रियेंत आन्वित होत असल्यामुळें, दोन्ही सप्तमी कारकविभक्ति होतील, व एक सप्तमी दुसऱ्या सप्तमीपेक्षां बलवती मानतां येणार नाहीं. तरी पण भाष्यकारांनीं भावेसप्तमी उपपदविभक्ति मानून व अधिकरणसप्तमी कारकविभक्ति मानून, भावेसप्तमीपेक्षां अधिकरणसप्तमी, त्यामुळें, अधिक बलवती मानली आहे. भावेसप्तमी ही कारकविभक्ति नसून उपपदविभक्ति आहे याबद्दल दोन्ही पक्षांत ऐकमत्य आहे. असें असल्यामुळें 'क्रियान्वयित्वं कारकत्वम्' ही जी 'कारक' शब्दाची व्याख्या दिली आहे ती बरोबर मानतां येत नाहीं. )

**ये तु प्रधानीभूतक्रियासम्बन्धनिमित्तकार्यत्वेन कारकविभक्तीनां बलवत्त्वं वदन्ति तेषामुभयोरपि क्रियासम्बन्धनिमित्तकत्वेन तदसङ्गतिः स्पष्टैव । नमोवरिव इति सूत्रे नमस्यति देवानित्यादौ चतुर्थीवारणाय भाष्ये उपन्यासस्यासङ्गतिश्च ॥**

कित्येक वैयाकरण–सीरदेव इत्यादि–असें म्हणतात कीं वाक्यांत असलेल्या प्रधानक्रियेशीं ज्या विभक्तीचा संबंध असतो तशाच विभक्तीचे ठिकाणीं कारकविभक्तित्व ही संज्ञा प्राप्त होते, व त्यामुळें कारकविभक्ति ( उपपदविभक्तीपेक्षां ) अधिक बलवती ठरते. पण अधिकरणसप्तमी व भावेसप्तमी या दोन्ही सप्तमींचा प्रधानक्रियेंत अन्वय होत असल्यामुळें, त्यांचें म्हणणें चूक ठरतें हें उघड आहे. ( ' कटे आस्ते ' किंवा ' स्थाल्यां पचति ' येथील अधिकरणसप्तमीचा जसा प्रधानक्रियेंत अन्वय होतो त्याचप्रमाणें ' गोषु दुह्यमानासु गतः '–म्हणजे ' गोदोहनदशायां गतः '–येथें देखील भावेसप्तमीचा प्रधानक्रियेंत अन्वय होतो असें असून देखील भाष्यकारांनीं अधिकरणसप्तमी ही कारकविभक्ति मानली आहे व भावेसप्तमी ही उपपदविभक्ति मानली आहे. त्यामुळें ' प्रधानीभूतक्रियासम्बन्धनिमित्तकविभक्तित्वं कारकविभक्तित्वम् ' ही कारकविभक्तीची व्याख्या भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें बरोबर आहे असें मानतां येत नाहीं. ) तसेंच ' नमो वरिवः ' ३–१–१९ या सूत्रावरील भाष्यांत ' नमस्यति देवान् ' इत्यादि स्थलीं चतुर्थीचें निवारण करण्याकरितां भाष्यकारांनीं जो उपन्यास केला आहे त्याच्या देखील विरुद्ध त्यांचें म्हणणें पडतें ( त्या भाष्यांत भाष्यकारांनीं ' प्रकृत्यन्तरत्वात् सिद्धम् ' असें वार्तिक पठित करून व तसेंच ' अथवोपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी ' असें दुसरें कारण सांगून चतुर्थीचें निवारण केलें आहे. त्या भाष्यांत 'प्रधानीभूत क्रियासम्बन्धनिमित्तकत्वं कारकविभक्तित्वम् ' अशी कारकविभक्तीची व्याख्या करून चतुर्थीविभक्तीचें 'नमस्यति देवान्' या स्थलीं निवारण केलें नाहीं. तशा व्याख्येनें चतुर्थीचें निवारण करतां आलें नसतें; कारण उपपदविभक्ति व कारकविभक्ति या दोन्ही विभक्ति क्रियेंत सारख्याच अन्वित असतात. सारांश वर दिलेल्या कारकविभक्तीच्या दोन्ही व्याख्या बरोबर आहेत असें मानतां येत नाहीं, व ' क्रियाजनकार्थकविभक्तित्वं कारकविभक्तित्वम् ' हीच कारकविभक्तीची व्याख्या मानणें योग्य ठरतें. )

**एतेन क्रियाकारकसम्बन्धोऽन्तरङ्ग इति तन्निमित्ता विभक्तिरन्तरङ्गोपपदार्थेन तु यत्किञ्चित्क्रियाकारकभावमूलकः सम्बन्ध इति तन्निमित्ता विभक्तिर्बहिरङ्गेत्यपास्तम् । नमस्यतीत्यत्र नमःपदार्थेऽपि क्रियाकारकभावेनैवान्वयात् । अत्र च नमःपदार्थस्यापि क्रियात्वं मुण्डयतौ मुण्डस्येव ॥**

क्रिया व कारक यांचा संबंध अन्तरङ्ग असतो व त्या संबंधामुळें होणारी विभक्ति अन्तरङ्ग ठरते; जवळ असलेल्या पदाच्या अर्थाशीं संबंध होऊन त्या संबंधामुळें जी विभक्ति उत्पन्न होते ती बहिरङ्ग होय; कारण तसा संबंध कोणत्यातरी क्रियेचा अध्याहार करून व उपपदनिमित्तकविभक्ति त्या अध्याहृतक्रियेचें कारक मानून करावा लागतो ( म्हणून कारकविभक्ति अन्तरङ्ग ठरते, व तिच्या मानानें उपपदविभक्ति बहिरङ्ग ठरत असल्यामुळें, प्रधानाप्रधानन्यायमूलक प्रकृतपरिभाषा आहे व त्या न्यायान्वयें उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति अधिक बलवती ठरते ) असें जें ( कैयटानें ) म्हटलें आहे

तें म्हणणें देखील चूक ठरतें. 'नमस्यति देवान्' या उदाहरणांत ( 'देवान्' या पदाचा ) 'नमः' या पदाच्या ( नमस्क्रियारूप ) अर्थाशीं क्रियाकारकरूपसंबंधानेंच अन्वय होतो. ( 'मुण्डमिश्र' सू० २६७७ या सूत्रानें 'मुण्ड' शब्दाहून 'करोति' या अर्थामध्यें 'णिच्' केला असतां 'मुण्डं करोति') 'मुण्डयति' या स्थलीं 'मुण्ड' शब्दाचे जागीं जसें क्रियात्व आहे तसेंच 'नमस्यति' यांतील 'नमः' या पदाचा क्रियारूपच अर्थ आहे. ( 'देवेभ्यो नमः' व 'नमस्यति देवान्' या दोन्ही वाक्यांच्या अर्थांमध्यें कांहींच फरक नाहीं; कारण दोन्ही स्थलीं नमस्क्रियारूप अर्थामध्येंच 'देव' पदाचा अन्वय आहे. प्रथम वाक्यांत 'नमः' शब्दास पारिभाषिक 'अव्यय' संज्ञा आहे व दुसऱ्या वाक्यांत 'नमस्यति' यांतील 'नमस्य' या क्यच्प्रत्ययान्ताला 'सनाद्यन्ता धातवः' सू० २३०४ या सूत्रान्वयें पारिभाषिक 'धातु' संज्ञा प्राप्त होते व त्यामुळें 'देव' शब्दास 'कर्म' संज्ञा प्राप्त होत असल्यामुळें त्याला कारकविभक्तित्व येतें. हा केवळ पारिभाषिक फरक आहे पण अर्थबोधांत कांहींच फरक नाहीं. म्हणून एक विभक्ति अन्तरङ्ग व दुसरी बहिरङ्ग मानतां येत नाहीं व त्यामुळें प्रकृतपरिभाषा प्रधानाप्रधानन्यायाच्या आधारावर रचली आहे असें मानतां येत नाहीं, व ती वाचनिकीच आहे हें मानणें योग्य ठरतें. )

**सहयुक्ते इत्यादौ च प्रधाने प्रथमासाधनार्थमियं भाष्य उपन्यस्तेत्यन्यत्र विस्तरः ॥ १०३ ॥**

'सहयुक्ते' २-३-१९ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ( 'पुत्रेण सहागतो देवदत्तः' या उदाहरणांत देवदत्त जो प्रधान आहे त्या ) प्रधानाचे ठिकाणीं प्रथमाविभक्ति साधण्याकरितां भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेचा उपन्यास करून तिचा उपयोग केला आहे. ( 'सह' या पदाच्या अर्थामध्यें जसा 'पुत्र' या पदाचा अन्वय आहे तसाच 'देवदत्त' या पदाचा देखील आहे; कारण 'सह' या पदानें द्योतित संबंध दोघांवर सारखाच आहे. मग 'पुत्रेण' येथें जशी 'सहयुक्ते' या सूत्रानें तृतीया होते तशी देवदत्ताला तृतीया कां होऊं नये? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं 'आगतः' या पदानें जी आगमनरूप क्रिया सांगितली आहे त्या क्रियेचा उत्पत्तिकर्ता देवदत्त हा प्रधानत्वानें विवक्षित आहे, पुत्र विवक्षित नाहीं; पुत्रनिष्ठव्यापार 'सह' शब्दानें द्योतित होतो. म्हणून 'देवदत्त' या शब्दास तृतीया न होतां प्रथमाविभक्ति होते. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे. ( कित्येक वैयाकरणांस ग्रन्थकाराचें विवेचन मान्य नसल्यामुळें, 'उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी' या सारख्याच शब्दांत पठित केलेल्या दोन परिभाषा आहेत असें ते मानतात. त्यांपैकीं एक परिभाषा वाचनिकी असून, तिचा उद्देश सूत्रांत निर्दिष्ट असलेली विभक्ति कोणत्या प्रकारची आहे—म्हणजे उपपदविभक्ति आहे कीं कारकविभक्ति आहे—याचा निर्णय करणें हा होय, व तसा निर्णय भाष्यकारादिकांच्या व्याख्यानानेंच होऊं शकतो. म्हणून 'उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी व्याख्यानतः' अशा रीतीनें ते पहिल्या प्रकारची प्रकृतपरि-

भाषा पठित करितात व म्हणतात कीं 'तत्र च दीयते' या सूत्रावरील भाष्यांत अशा तऱ्हेची परिभाषा ध्वनित केली आहे. त्यांच्या मताप्रमाणें दुसऱ्या प्रकारची प्रकृतपरिभाषा प्रधानाप्रधानन्यायमूलक असून, लौकिकप्रयोगांत कोण या प्रकारच्या विभक्तीचा—म्हणजे उपपदविभक्तीचा किंवा कारकविभक्तीचा—उपयोग व्याकरणरीत्या शुद्ध ठरतो याचा निर्णय करणें हा तिचा उद्देश आहे. )

---

# परिभाषा १०४

## नन्वदमुयङित्यादौ पूर्वस्यापि मुत्वापत्तिरत आह—

'अदमुयङ्' इत्यादि स्थलीं पूर्व दकारास देखील मुत्व होण्याची आपत्ति येते. ( 'अदस् + अञ्च् + क्विन्' येथें 'ऋत्विग्दधृक्' सू० ३७३ या सूत्रानें 'अञ्च्' धातूस 'क्विन्=व्' प्रत्यय झाला असतां, 'अनिदिताम्' सू० ४१५ या सूत्रानें 'अञ्च्' यांतील नकाराचा लोप होऊन, व 'वेरपृक्तस्य' सू० ३७५ या सूत्रानें 'क्विन्=व्' या प्रत्ययाचा लोप होऊन 'अदस् + अच्' अशा स्थितींत, 'विष्वग्देवयोः' सू० ४१८ या सूत्रानें 'अदस्' यांतील 'टि' चे जागीं—म्हणजे 'अस्' चे जागीं—'अद्रि' असा आदेश झाल्यावर 'अदद्रि + अच्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'अदसोऽसेर्दादु दो मः' सू० ४१९ या सूत्रानें उत्तर दकाराचे जागीं मकार व त्याच्या लगेंच पुढच्या वर्णाचे जागीं उकार होऊन जसें 'अदमुयच्' असें रूप होतें त्याचप्रमाणें पूर्वदकाराचे जागीं मकार व त्याच्या लगेंच पुढें असणाऱ्या वर्णाचे जागीं उकार होऊन 'अमुमुयच्' असें देखील रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य ॥ १०४ ॥

"जेथें एखाद्या सूत्रानें सांगितलेलें आदेशरूपी कार्य अन्त्यवर्णाहून भिन्न दोन वर्णांना एखाद्या शब्दस्वरूपांत युगपत् प्राप्त होतें तशा ठिकाणीं तें कार्य अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें असणाऱ्या वर्णासच—म्हणजे उपान्त्यवर्णासच—होतें."

( वास्तविक या परिभाषेचा अक्षरार्थ असा आहे कीं 'जेथें सूत्रांत सांगितलेलें आदेशरूपी कार्य अन्त्यवर्णाहून भिन्न वर्णास प्राप्त होतें तशा ठिकाणीं तें कार्य अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें असलेल्या वर्णास करावें. पण असा अर्थ केल्यास इष्टरूपाची सिद्धि होण्यांत अडचण येईल असें ग्रन्थकारानें सांगून वर जसा प्रकृत परिभाषेचा अर्थ दिला आहे तसा अर्थ त्यानीं पुढील पंक्तींत केला आहे, व त्यामुळें त्या अर्थाला धरून वरील अर्थ केला आहे. 'अदद्रि + अच्' या उदाहरणांत एकेच वेळीं दोन दकारांचे जागीं मकार व त्यांच्या लगेंच पुढें असणाऱ्या वर्णाचे

जागीं उकार होणें, ' अदसोऽसेः ' या सूत्रान्वयें, प्राप्त झालें आहे. परंतु प्रकृतपरिभाषा असल्यामुळें तें कार्य अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें असणाऱ्या रकारास व दकारास होतें; प्रथम दकारास व लगेंच त्याच्या पुढें असणाऱ्या वर्णास तें कार्य होत नाहीं, आणि त्यामुळें ' अमुमुयच् ' असें विकृत रूप न होतां, ' अदमुयच्' असें इष्टरूप सिद्ध होतें. ज्यांना प्रकृतपरिभाषा मान्य नाहीं त्यांच्या मतें ' अदसोऽसेः ' या सूत्रान्वयें ' अदद्रि+अच् ' यांतील दोन्ही दकारांचे जागीं मकार व त्यांच्या लगेंच पुढें असणाऱ्या वर्णांचे जागीं उकार होऊन ' अमुमुयच् ' असें जें रूप सिद्ध होतें तेंच इष्टरूप आहे. ते म्हणतात कीं, ' चरीकृप्यते ' या उदाहरणांत ज्याप्रमाणें ' कृपो रो लः ' सू० २३५० या सूत्रानें दोन्ही रकारांचे जागीं लकार होऊन ' चलीक्लृप्यते ' असें रूप होतें त्याचप्रमाणें ' अदद्रि+अच् ' येथें ' अमुमुयच् ' असेंच रूप होऊं शकतें. इतर वैयाकरण ' अदसोऽसेः ' या सूत्रांतील ' असेः ' या पदाचा ' सकाररहितस्य ' असा अर्थ न करितां त्या पदाचा ' अः सेः यस्य सः असिः ' असा बहुव्रीहिसमास करून ' सकारस्थानिकाकारवतः' असा त्या पदाचा अर्थ करितात व म्हणतात कीं, ' त्यदादीनामः ' सू० २६५ या सूत्रान्वयें जेथें ' अदस् ' यांतील अन्त्यवर्णाचे जागीं अकार होऊन व ' अतो गुणे' सू० १०१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन ' अद ' असें रूप होतें तेथेंच ' अदसोऽसेः ' हें सूत्र लागू पडतें ' अदद्रि + अच् ' येथें ' अदस् ' यांतील ' टि ' चे जागीं ' अद्रि ' असा आदेश झाला असल्यामुळें, या उदाहरणास ' अदसोऽसेः ' हें सूत्र लागूच पडत नाहीं व त्यामुळें प्रकृत परिभाषा उपस्थित होऊंच शकत नाहीं. त्यांच्या मतें ' अदद्र्यच् ' असेंच शुद्ध रूप आहे. सारांश तीन भिन्न मतानुसार तीन भिन्न रूपें—म्हणजे ' अदमुयच्, अमुमुयच्, व अदद्र्यच् ' सिद्ध होतात; व असें आहे म्हणूनच भाष्यकारांनीं भाष्यांत खालील श्लोक पठित केला आहे: ' अदसोऽद्रेः पृथङ्मुत्वं केचिदिच्छन्ति लत्ववत् । केचिदन्त्यसदेशस्य नेत्येकेऽसेर्हि दृश्यते॥ )

**अन्त्यसदेशानन्त्यसदेशयोरेकप्रयोगे युगपत्प्राप्तावन्त्यसदेशस्यैवेति तदर्थः। अन्यथा धात्वादेर्नत्वसत्वे नेता सोतेत्यादावेव स्यातां न तु नमति सिञ्चतीत्यादौ ॥**

जेथें एखाद्या सूत्रानें सांगितलेलें कार्य शब्दस्वरूपांतील अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें असणाऱ्या—म्हणजे उपान्त्य—वर्णास व तसेंच अधिक मागें असलेल्या वर्णास युगपत् प्राप्त होत असेल तर तेथें तें कार्य उपान्त्यवर्णासच करावें असा या परिभाषेचा अर्थ आहे. प्रकृतपरिभाषेचा असा अर्थ न केल्यास ( व जेथें सूत्रांत सांगितलेलें कार्य एखाद्या शब्दस्वरूपाच्या अन्त्यवर्णास पावत नाहीं तशा ठिकाणीं तें कार्य त्या शब्दस्वरूपाच्या उपान्त्य वर्णास करावें असा या परिभाषेचा अर्थ केल्यास ) 'नेता, सोता,' इत्यादि स्थलींच नत्व व सत्व होईल, पण ' नमति, सिञ्चति ' इत्यादि

स्थलीं नत्व व सत्व होणार नाहीं. ( 'नी, सू, नम् व सिच्' हे धातु धातुपाठांत 'णीञ्, षूङ्, णम, षिच' अशा रीतीनें पठित केले आहेत. 'धात्वादेः षः सः' सू० २२६४ व 'णो नः' सू० २२८६ या सूत्रांत, ज्या धातूंच्या आदिवर्णांत षकार व णकार धातुपाठांत पठित आहे तशा धातूंच्या षकाराचे जागीं सकार व णकाराचे जागीं नकार होणें सांगितलें आहे 'धात्वादेः षः सः' या सूत्रानें होणारें सत्व 'षू' यांतील अन्त्यवर्ण जो ऊकार त्याला पावलें नसून, 'ष्' या उपान्त्यवर्णास पावलें आहे, पण 'षिच्' या स्थलीं तें कार्य 'च्' या अन्त्यवर्णास किंवा 'इ' या उपान्त्यवर्णास पावलें नसून उपान्त्यवर्णाच्या मागें असलेल्या षकारास पावलें आहे. तसेंच 'णो नः' या सूत्रानें होणारें नत्व 'णी' या धातूंतील 'ई' या अन्त्यवर्णास पावलें नसून 'ण्' या उपान्त्यवर्णास पावलें आहे, पण 'णम्' या स्थलीं तें कार्य 'णम्' या धातूंतील 'म्' या अन्त्यवर्णास किंवा 'अ' या उपान्त्यवर्णास पावलें नसून उपान्त्यवर्णाच्या मागें असणाऱ्या णकारास पावलें आहे. प्रकृतपरिभाषेचा ग्रन्थकारानें जसा अर्थ केला आहे तो बरोबर मानल्यास, 'णी, षू, णम व षिच्' या चारहि उदाहरणांत नत्व व सत्व उपान्त्यवर्णास व तसेंच मागें असलेल्या वर्णास युगपत् पावलें नसल्यामुळें, त्या चारहि उदाहरणांना प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं व त्यामुळें त्या उदाहरणांत नत्व व सत्व होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. पण ग्रन्थकारानें केलेला प्रकृतपरिभाषेचा अर्थ बरोबर न मानतां, 'जेथें सूत्रांत सांगितलेलें कार्य अन्त्यवर्णास पावत नाहीं तशा ठिकाणीं तें कार्य उपान्त्यवर्णास करावें' असा या परिभाषेचा अर्थ केल्यास, 'णी' व 'षू' या स्थलीं उपान्त्यवर्ण णकार व षकार असल्यामुळें तेथें नत्व व सत्व होईल, पण 'णम्' व 'षिच्' येथें उपान्त्यवर्ण णकार व षकार नसल्यामुळें त्याठिकाणीं नत्व व सत्व होणार नाहीं व 'णमति' व 'षिञ्चति' अशीं विकृत रूपें होण्याची आपत्ति येईल. म्हणून तो अर्थ बरोबर न मानतां ग्रन्थकारानें जसा प्रकृतपरिभाषेचा अर्थ केला आहे तोच अर्थ बरोबर मानणें योग्य आहे. 'निर्दिश्यमानस्य आदेशा भवन्ति' ही परिभाषा असल्यामुळें वरील चारहि उदाहरणांत अन्त्यवर्णास नत्व व सत्व पावत नाहीं हें उघड आहे.)

अनन्त्यविकारे इति च लिङ्गम् ॥

जेथें सूत्रनिर्दिष्ट कार्य एखाद्या शब्दस्वरूपांतील ('निर्दिश्यमानस्य' ही परिभाषा असल्यामुळें) अन्त्यवर्णास पावत नाहीं तशाच ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडते—म्हणजे 'यत्रानन्त्यविकारस्तत्रैव अन्त्यसदेशस्येत्युपतिष्ठते' असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ होतो. ( जेथें 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेप्रमाणें, अन्त्यवर्णास कार्य पावलें आहे तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं हें उघड आहे. 'अन्त्यसदेशस्य' एवढीच जर ही परिभाषा असती तर अन्त्यवर्णास पावलेलें कार्य उपान्त्यवर्णास करण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टळावी म्हणूनच 'अनन्त्यविकारे' हें पद प्रकृतपरिभाषेंत घातलें आहे. )

**अन्त्येन समानो देशो यस्य सोऽन्त्यसदेशः। तत्वं चान्त्यवर्णतद्वर्णयोरितराव्यवधानेन बोध्यम्। अत एव विद्ध इत्याद्यर्थं न संप्रसारणे इति चरितार्थम् ॥**

ज्या वर्णाचा देश अन्त्यवर्णाशीं समान आहे तो अन्त्यसदेश वर्ण होय. याचा अर्थ असा कीं ज्या वर्णाच्या व अन्त्यवर्णाच्या मध्यें इतर वर्णाचें व्यवधान नाहीं—म्हणजे इतर कोणताहि वर्ण नाहीं—त्या वर्णालाच अन्त्यसदेश असें म्हणतां येतें. प्रकृतपरिभाषेंतील 'अन्त्यसदेश' शद्वाचा असा अर्थ असल्यामुळेंच, 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' सू० ३६३ हें सूत्र, 'विद्ध' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां, चरितार्थ ठरतें. ('व्यध्+क्त' अशा स्थितींत 'ग्रहिज्यावयिव्यधि' सू० २४१२ या सूत्रानें 'व्यध्' यांतील दोन्ही यणांस—म्हणजे वकारास व यकारास—संप्रसारण पावलें आहे. या दोन वर्णांपैकीं यकार हा वकाराच्या मानानें अन्त्यवर्णाच्या अधिक जवळ आहे, व प्रकृतपरिभाषेंतील 'अन्त्यसदेशस्य' या पदाचा 'अनेक वर्णांपैकीं अन्त्यवर्णाच्या अधिक जवळ असलेला वर्ण' असा अर्थ असता तर, 'विद्ध' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरितां रचलेलें 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' हें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती, व यकार अन्त्यवर्णाच्या अधिक जवळ असल्यामुळें, 'ग्रहिज्या' या सूत्रानें प्राप्त झालेलें संप्रसारण यकारासच झालें असतें, व वकार यकाराच्या मानानें दूर असल्यामुळें त्याला संप्रसारण झालेंच नसतें. पण 'अन्त्यसदेश' या शद्वाचा 'उपान्त्यवर्ण' असा अर्थ असल्यामुळें व 'व्यध्' या स्थलीं अकार उपान्त्यवर्ण असून दोन्ही यणांपैकीं कोणताहि यण् उपान्त्यवर्ण नसल्यामुळें, 'व्यध्' या उदाहरणास प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं, व त्यामुळें 'ग्रहिज्या' या सूत्रानें दोन्ही यणांस संप्रसारण होऊन विकृत रूप झालें असतें. तसें न व्हावें व पूर्वयणास संप्रसारण न होतां केवळ उत्तरयणासच संप्रसारण व्हावें म्हणून, पाणिनीला 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' हें सूत्र मुद्दाम करावें लागलें. व 'अन्त्यसदेश' या शद्वाचा 'उपान्त्यवर्ण' असा अर्थ असल्यामुळेंच तें सूत्र चरितार्थ ठरतें. )

**अल्लोपो न इत्यादेरनस्तक्षणेत्यादावाद्याकारादावप्रवृत्तिरप्यस्याः फलं, यजादिस्वादिपराङ्गान्ताङ्गस्याकारस्य लोप इत्यर्थस्यैवाङ्गांशे प्रत्ययस्योत्थिताकाङ्क्षतैयौचित्याद्ङ्गावयवयजादिस्वादिपरस्यान इत्यादिक्रमेणानेकत्रानेकक्लिष्टकल्पनापेक्षयास्या उचितत्वात् ॥**

या परिभाषेचें फळ हें आहे कीं—म्हणजे ही परिभाषा असल्यामुळेंच—'अनस्तक्ष्णा' इत्यादि उदाहरणांत 'अल्लोपोऽनः' या सूत्राची आद्य अकाराचे ठिकाणीं प्रवृत्ति होत नाहीं—म्हणजे त्या सूत्रानें 'अनस्तक्ष्णा' यांतील आद्य अकाराचा लोप न होतां उपान्त्य अकाराचाच लोप होतो. प्रत्ययाला (अङ्गावयवाची आकांक्षा राहत नसून) अङ्गाची आकांक्षा राहत असल्यामुळें, 'अल्लोपोऽनः' या सूत्राचा 'यजादि-

स्वादिप्रत्यय अन्नन्त अङ्गापुढें आल्यास त्यांतील अकाराचा लोप होतो, ' असाच अर्थ करणें उचित आहे. तसा अर्थ न करितां, अनेक क्लिष्ट कल्पना लढवून त्या सूत्राचा, ' अङ्गावयव जो अन् त्याच्या लगेंच पुढें यजादिस्वादिप्रत्यय आल्यास तशा अन् मधील अकाराचा लोप होतो,' असा अर्थ करणें बरोबर नाहीं. ('अनस्तक्षन्+टा' येथें ' अन-स्तक्षन् ' या अङ्गापुढें असर्वनामस्थान अजादि ' टा=आ ' हा सुप् प्रत्यय आला अस-ल्यामुळें त्या अङ्गाला 'यचि भम् ' सू० २३१ या सूत्रान्वयें भसंज्ञा होते, व 'अल्लोपो-ऽनः ' हें सूत्र अङ्गाधिकारांत व तसेंच ' भस्य ' या अधिकारांत पठित असल्यामुळें, ' अङ्गस्य ' व ' भस्य ' हीं दोन्ही सूत्रें त्यांत अनुवृत्त होऊन त्या सूत्राचा ' अन्नन्तस्य भसंज्ञकस्य अङ्गस्य अनः अकारलोपः स्यात् ' असा सरळ अर्थ होतो. असा त्या सूत्राचा अर्थ केला म्हणजे ' अनस्तक्षन्+टा ' येथें अन्नन्त भसंज्ञक ' अनस्तक्षन् ' या अङ्गांतील ' अन् ' मधील अकारास लोप पावतो. पण या अङ्गांत दोन ' अन् ' आहेत. त्यांपैकीं प्रथम ' अन् ' ' अनस् ' या अङ्गावयवांत आहे व दुसरा ' अन् ' अङ्गाच्या अन्तीं आहे, व दोन्ही 'अन्' मधील अकाराचा लोप पावला आहे. परंतु प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ' न् ' या अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें असलेल्या उपान्त्य अकाराचा लोप होतो व ' अनस् ' यांतील आद्य अकाराचा लोप होत नाहीं आणि ' अनस्तक्ष्णा ' असें इष्टरूप सिद्ध होतें. असें असून देखील दीक्षितांनीं दोन्ही 'अन्' मधील अकाराचा लोप टाळण्याकरितां व अन्त्य ' अन् ' मधीलच अकाराचा लोप व्हावा या हेतूनें ' अल्लोपोऽ नः ' या सूत्राचा, वर जसा सरळ अर्थ दिला आहे तसा न करितां, असा अर्थ केला आहे कीं, अङ्गांतील ज्या ' अन् ' पुढें असर्वनामस्थान यजादिस्वादिप्रत्यय येतो त्या ' अन् ' मधील अकाराचा लोप होतो, व ' अनस्तक्षन् ' यांतील प्रथम ' अन् ' पुढें तसा प्रत्यय नसल्यामुळें व अखेरच्या ' अन् ' पुढेंच तसा प्रत्यय असल्यामुळें, दीक्षि-तांनीं केलेल्या अर्थान्वयें प्रथम ' अन् ' मधील अकाराचा लोप पावतच नाहीं व अन्त्य ' अन् ' मधील अकाराचा लोप पावत असल्यामुळें, त्या अकाराचाच लोप होतो. पण प्रत्ययाला अङ्गावयवाची आकांक्षा राहत नसून अङ्गाची आकांक्षा राहत असल्या-मुळें, तसा अर्थ करणें बरोबर नाहीं. दोन ' अन् ' मधील अकारलोप टाळण्याकरितांच दीक्षितांनीं तसा क्लिष्ट सूत्रार्थ केला आहे. पण प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ज्याअर्थी सरळ अर्थ करून देखील इष्टरूप सिद्ध होतें त्याअर्थी दीक्षितांना ओढाताण करून तसा अर्थ करण्याची कांहींच गरज नव्हती असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

न चैषा ष्यङः संप्रसारणमिति सूत्रे भाष्ये प्रत्याख्यातेति भ्रमित-व्यम् । वार्तिकोक्तफलानामनेकक्लिष्टकल्पनाभिरन्यथासिद्धिं प्रदर्श्यापि या-न्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा कर्त्तव्या प्रतिविधेयं दोषेषु, प्रतिविधानं चोदात्तनिर्देशात्सिद्धमित्युपसंहारात् । मिमार्जिषतीत्यर्थं चैषा ।

**तत्र वृद्धेः पूर्वमन्तरङ्गत्वाद् द्वित्वे परत्वादभ्यासकार्ये ततोऽभ्यासेकारस्य वृद्धिवारणायवश्यकी । न च वृद्धौ पुनरभ्यासह्रस्वत्वेन सिद्धिः । लक्ष्ये लक्षणस्येति न्यायेन पुनरप्रवृत्तेः ॥**

'ष्यङः सम्प्रसारणम्' ६-१-१३ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं प्रकृत-परिभाषेचें प्रत्याख्यान केलें आहे असा गैरसमज होऊं देऊं नये. वार्तिककारानें प्रकृतपरिभाषेचीं जीं अनेक प्रयोजनें सांगितलीं आहेत तीं प्रयोजनें, प्रकृतपरिभाषा नसून देखील, इतर रीतीनें सिद्ध होऊं शकतात असें, अनेक क्लिष्ट कल्पना लढवून, दाखविल्यानंतर देखील, भाष्यकार असें म्हणतात कीं ही परिभाषा असण्याचीं जीं प्रयोजनें आहेत–म्हणजे ही परिभाषा मानल्याशिवाय जीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत–त्याकरितां ही परिभाषा असणें आवश्यक आहे; ही परिभाषा मानल्यानें जेथें दोष उत्पन्न होत असतील–म्हणजे जेथें अनिष्टरूपें होण्याचा संभव आहे–तेथें प्रतिविधान करावें–म्हणजे उपायान्तर योजावें, आणि तें प्रतिविधान हें आहे कीं जेवढ्या सूत्रांना ही परिभाषा लागू पडते तेवढ्या सूत्रांचे ठिकाणीं उदात्त निर्देश करावा. ( असें केल्यास कोणत्या सूत्रांना ही परिभाषा लागू पडत नाहीं व कोणत्या सूत्रांना ही लागू पडते हें सहज कळूं शकेल व अशा रीतीनें दोषांचें निवारण होईल.) अशा तऱ्हेचा भाष्यकारांनीं उपसंहार केला आहे. ( या उपसंहारावरून हें स्पष्ट होतें कीं भाष्यकारांनीं ही परिभाषा प्रत्याख्यात केली नाहीं. भाष्यकार म्हणतात 'न हि दोषाः सन्तीती परिभाषा न वक्तव्या लक्षणं वा न प्रणेयं, न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रीयन्ते, न च मृगाःसन्तीति यवा नोप्यन्ते तस्माद्यान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या प्रतिविधेयं दोषेषु ॥ इदं प्रतिविधीयत उदात्तनिर्देशात् सिद्धम् । यत्रैषा परिभाषेष्यते तत्रोदात्तनिर्देशः कर्तव्यः । ततो वक्तव्यमनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवत्युदात्तनिर्देश इति' ) 'मिमार्जिषति' हें रूप सिद्ध होण्याकरितां ही परिभाषा असण्याची आवश्यकता आहे. 'मिमार्जिषति' या उदाहरणांत, वृद्धिकार्याच्या मानानें द्विर्वचन कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, द्विर्वचन प्रथम केल्यानंतर, आणि अभ्यासकार्य सांगणारीं सूत्रें ( 'मृजेर्वृद्धिः' या ) वृद्धिविधायकसूत्राच्या मानानें परसूत्रें असल्यामुळें, अभ्यासकार्य केल्यावर अभ्यासांतील इकाराला वृद्धि न व्हावी म्हणून ही परिभाषा असणें आवश्यक आहे. वृद्धि केल्यानंतर 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत्प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें, अभ्यासाचे जागीं पुन्हा ऱ्हस्वकार्य करतां येत नाहीं. ( 'मृज्+सन्' अशा स्थितींत, 'सन्यङोः' सू० २३९५ या सूत्रानें द्विर्वचन पावलें आहे. हें द्विर्वचनकार्य प्रत्ययाला मानून होणारें कार्य नाहीं; कारण सन्नन्त व यङन्त अङ्गाला द्वित्व होतें असा 'सन्यङोः' या सूत्राचा अर्थ आहे. म्हणून हें कार्य अन्तरङ्ग आहे. 'मृजेर्वृद्धिः' सू० २४७३ या सूत्रानें होणारें वृद्धिकार्य प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारें असल्यामुळें, द्विर्वचनकार्याच्या अपेक्षेनें बहिरङ्ग आहे. म्हणून प० ५० प्रमाणें

द्विर्वचनरूपी अन्तरङ्गकार्य प्रथम होतें. तें कार्य प्रथम होऊन 'मृज्मृज्' असें द्विर्वचन झाल्यावर, 'मृजेर्वृद्धिः' या सूत्रानें वृद्धि प्रथम न होतां, अभ्यासकार्य सांगणाऱ्या सूत्रांची प्रथम प्रवृत्ति होते; कारण तीं सूत्रें परसूत्रें आहेत आणि 'पूर्वात् परं बलवत्' या न्यायानें तीं सूत्रें प्रथम प्रवृत्त होतात. प्रकृत उदाहरणास लागू पडणारी अभ्यासविकाराचीं सूत्रें 'ऱ्हस्वः' सू० २१८०, 'हलादिः शेषः' सू० २१७२ 'उरत्' सू० २२८४ व 'सन्यतः' सू० २३१७ हीं सूत्रें होत. 'अभ्यासविकारेषु बाध्यबाधकभावो नास्ति' या न्यायान्वयें तीं सूत्रें अष्टाध्यायीपाठक्रमानुसार प्रवृत्त होतात. वरील चार सूत्रांपैकीं 'ऱ्हस्वः' हें प्रथम सूत्र असल्यामुळें तें प्रथम प्रवृत्त होतें. हें खरें कीं 'मृज्' या अभ्यासांतील ऋकार ऱ्हस्व आहे. तरी पण, 'पर्जन्यवल्लक्षणप्रवृत्तिः', प. १२० हा न्याय असल्यामुळें, ऱ्हस्व ऋकाराचे जागीं ऱ्हस्व ऋकार करून 'ऱ्हस्वः' हें सूत्र आपली कामगिरी बजावतें. त्यानंतर 'हलादिः शेषः' हें सूत्र प्रवृत्त होऊन 'मृज्' या अभ्यासांतील जकाराचा लोप होतो व त्यामुळें 'मृमृज्' अशी स्थिति झाली असतां, 'उरत्' या सूत्रानें अभ्यासांतील ऋकाराचा अकार होऊन 'ममृज्' असें रूप झाल्यावर, 'सन्यतः' या सूत्रानें अभ्यासांतील अकाराचे जागीं इकार होऊन 'मिमृज्+सन्' अशी स्थिति झाली असतां, 'मृजेर्वृद्धिः' हें वृद्धिविधायक सूत्र प्रवृत्त होतें. या सूत्रानें 'मिमृज्' यांतील इकारास व ऋकारास वृद्धि पावली आहे. परंतु 'मिमृज्' यांतील अन्त्यवर्णाच्या लगेंच मागें ऋकार असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें केवळ ऋकारास वृद्धि होते व मागें असलेल्या इकारास वृद्धि होऊं शकत नाहीं, आणि त्यामुळें 'मिमार्ज्+सन्+ति' अशा स्थितींत 'आर्धधातुकस्येट्' सू० २१८४ या सूत्रानें सनाला इडागम होऊन 'मिमार्ज्+इ+स+ति=मिमार्जिषति' असें रूप सिद्ध होतें. प्रकृतपरिभाषा असल्यामुळेंच, 'मिमृज्' यांतील दोन्हीं इकांना वृद्धि होत नाहीं आणि त्यामुळेंच इष्टरूप सिद्ध होतें; ही परिभाषा नसती तर 'मैमार्जिषति' असें विकृत रूप होण्याची आपत्ति आली असती. म्हणून 'मिमार्जिषति' हें रूप सिद्ध होण्याकरितां प्रकृत परिभाषा असणें आवश्यक आहे असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे. येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, प्रकृतपरिभाषा नसली तरी 'मिमार्जिषति' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें; कारण 'मिमृज्' यांतील ऋकाराची व इकाराची वृद्धि करून 'मैमार्ज्' असें रूप झाल्यावर, 'मै' या अभ्यासांतील 'ऐ' चे जागीं 'ऱ्हस्वः' या सूत्रान्वयें, 'एच इग्घ्रस्वादेशे' सू० ३२३ या सूत्रानें, इकार होऊन 'मिमार्जिषति' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें. पण ही शंका बरोबर नाहीं; कारण 'ऱ्हस्वः' हें सूत्र प्रथम प्रवृत्त झालें असल्यामुळें, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायानुसार तें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकत नाहीं, आणि त्यामुळें 'मैमार्ज्' याचे जागीं 'मिमार्ज्' असें रूप होऊं शकत नाहीं. म्हणून 'मिमार्जिषति' हें रूप सिद्ध करण्याकरितां प्रकृतपरिभाषा मानणें आवश्यक आहे असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. )

यत्तु न सम्प्रसारण इति सूत्रे भाष्ये नैतस्याः परिभाषायाः प्रयोजनानीत्युक्तं तस्यायमर्थः । एतत्सूत्रप्रयोजनान्येतस्याः परिभाषाया न भवन्ति व्यधादावन्त्यसमानदेशयणोऽभावादिति । नैतान्येतस्याः प्रयोजनानीति पाठोऽपि क्वचिद्दृश्यते ॥ वाचनिक्येवैषा । स्पष्टा च ष्यङ इति सूत्रेऽदसोऽसेरिति सूत्रे च केचिदन्त्यसदेशस्येत्यनेन भाष्य इत्यन्यत्र विस्तरः ॥ १०४ ॥

' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' ६-१-३७ या सूत्रावरील भाष्यांत ' नैतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि' असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्याचा अर्थ असा आहे कीं ज्या प्रयोजनाकरितां ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' हें सूत्र केलें आहे तें प्रकृतपरिभाषेचें प्रयोजन नव्हे; कारण ' व्यध् ' इत्यादि स्थलीं अन्त्यवर्णाच्या मागें 'यण्' नाहीं. ( पूर्वीं सांगितलेंच आहे कीं ' विद्ध ' इत्यादि रूपांची सिद्धि करण्याकरितां ' न सम्प्रसारणे सम्प्रसारणम् ' हें सूत्र केलें आहे. ' ग्रहिज्या ' या सूत्रानें ' व्यध् ' यांतील दोन्ही यणांस—यकारास व वकारास–संप्रसारण पावलें होतें व दोहोंचेंहि सम्प्रसारण केलें असतें तर 'विद्ध' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकलें नसतें. म्हणून पूर्वयणास सम्प्रसारण न होतां, केवळ उत्तरयणास सम्प्रसारण होऊन 'विद्ध' इत्यादि रूपें सिद्ध व्हावीं या करितां तें सूत्र पाणिनीस करावें लागलें. ' व्यध् ' या स्थलीं अन्त्य धकाराचे लगेंच मागें अकार असून ' यण् ' नसल्यामुळें, त्या स्थलीं प्रकृतपरिभाषा लागूच पडत नाहीं. म्हणून 'विद्ध' इत्यादि रूपें सिद्ध व्हावीं हें प्रकृतपरिभाषेचें प्रयोजन मानतांच येत नाहीं असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ) ' नैतान्येतस्याः प्रयोजनानि ' असा देखील पाठ भाष्याच्या कांहीं प्रतींत आढळतो. ( परंतु वरील पाठाचा जो अर्थ वर सांगितला आहे तोच अर्थ या पाठाचा देखील आहे. ) ही परिभाषा ( ज्ञापकसिद्ध किंवा न्यायसिद्ध नसून ) वाचनिकीच आहे. ' ष्यङः सम्प्रसारणम्' ६-१-१३ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा पठित केली आहे व 'अदसोऽसेः ' ८-२-८० या सूत्रावरील भाष्यांत ' केचिदन्त्यसदेशस्य ' या शब्दांनीं सांगितली आहे. ( ' अदसोऽद्रेः पृथङ्मुत्वम् ' ही जी कारिका त्या भाष्यांत पठित केली आहे त्या कारिकेंत 'केचिदन्त्यसदेशस्य' हे शब्द आहेत व त्या शब्दांनीं प्रकृतपरिभाषा भाष्यकारांनीं पठित केली आहे. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा १०५

नन्वव्यक्तानुकरणस्यात इति पररूपं पटत् इति पटितीत्यादावलोऽन्त्यस्येत्यन्त्यस्य प्राप्नोतीत्यत आह—

'अव्यक्तानुकरणस्यात इतौ' सू० ८१ या सूत्रान्वयें 'पटत् इति' अशा स्थलीं 'अत्' व 'इ' या दोहोंच्या ठिकाणीं पररूप एकादेश–म्हणजे इकार–होऊन 'पटिति' असें रूप होतें. पण अशा स्थलीं 'पटत्' यांतील 'अत्' मध्यें 'त्' हा जो अन्त्यवर्ण आहे त्याचे जागीं, 'अलोऽन्त्यस्य' सू० ४२ या सूत्रान्वयें पररूप आदेश होणें प्राप्त आहे. ('पटत्' हा ध्वनीचें अनुकरण करणारा अदन्त शब्द आहे, अशा शब्दापुढें 'इति' हें अव्यय आल्यास 'अत्' व 'इ' यांचे जागीं 'इ' असा पररूप एकादेश होऊन 'पटत् + इति=पटिति' असें रूप होतें. परंतु 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा असल्यामुळें त्या परिभाषेप्रमाणें 'अत्' यांतील अन्त्यवर्ण 'त्' व त्यापुढील 'इ' या दोहोंचे जागीं पररूप एकादेशाची प्राप्ति होते, व तसा एकादेश झाल्यास, 'पटत्+इति=पट+इति' अशी स्थिति होऊन 'आद्गुणः' सू० ६९ या सूत्रान्वयें 'पटेति' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरनभ्यासविकारे ॥ १०५ ॥

"जेथें (सूत्रांत षष्ठ्यन्त) अनर्थक वर्णसमूहाचे जागीं आदेशरूपी कार्य होणें सांगितलें आहे तेथें 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा लागू पडत नाहीं. पण जेथें सूत्रांत अभ्यासविकाररूप कार्य सांगितलें असेल तेथें अनर्थकाचे जागीं आदेश होणें सांगितलें असल्यास, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा लागू पडते."

(ही परिभाषा असल्यामुळें व 'पटत्' हा शब्द ध्वनीचें अनुकरण करणारा अर्थरहित वर्णसमुदाय असल्यामुळें, अशा ठिकाणीं 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा प्रवृत्त होत नाहीं, व त्यामुळें 'अत्' व 'इ' यांचे जागीं पररूप एकादेश होऊन 'पटिति' असें इष्टरूप सिद्ध होतें. प्रकृतपरिभाषा कोणत्या प्रकारची आहे—म्हणजे न्यायसिद्ध, कीं ज्ञापकसिद्ध, कीं वाचनिकी आहे—हें ग्रन्थकारानें सांगितलें नाहीं. तथापि 'नाम्रेडितस्यान्त्यस्य तु वा' सू० ८२ या सूत्रांतील 'अन्त्यस्य' हें पद प्रकृतपरिभाषेच्या प्रथमांशाचें ज्ञापक आहे. प्रकृतपरिभाषा नसती तर 'पटत्पटत्' अशा द्विरुक्तरूपाच्या अन्त्यवर्णाचे व पुढील 'इति' यांतील इकाराचे जागीं, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा असल्यामुळें, पररूप एकादेश झालाच असता व त्या सूत्रांत केलेलें 'अन्त्यस्य' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरलें असतें. परंतु 'नानर्थकेऽलोऽन्त्यविधिः' ही परिभाषा असल्यामुळें, 'अत्' व 'इ' यांचे जागीं पूर्वसूत्राप्रमाणें जो एकादेश प्राप्त झाला होता तो न होतां, 'त्' या अन्त्यवर्णाचे व पुढील इकाराचे जागींच पररूप एकादेश व्हावा म्हणून 'नाम्रेडितस्य' या सूत्रांत केलेलें 'अन्त्यस्य' या पदाचें ग्रहण चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेच्या प्रथमांशाचें ज्ञापक ठरतें. तसेंच 'अर्तिपिपर्त्योश्च' सू० २४९२ या सूत्रांत केलेला 'पिपर्ति' हा निर्देश प्रकृतपरिभाषेच्या 'अनभ्यासविकारे' या द्वितीयांशाचा ज्ञापक आहे. 'अर्तिपिपर्त्योश्च' या सूत्रानें

' पॄ ' या जुहोत्यादिगणांतील धातूच्या अभ्यासाच्या अन्त्यवर्णाचे जागीं इकारादेश होणें सांगितलें आहे. अभ्यास अनर्थक—म्हणजे अर्थरहित–असल्यामुळें, संपूर्ण ' पॄ ' या अभ्यासाचे जागीं, ' नानर्थकेऽलोऽन्त्यविधिः ' या परिभाषेच्या प्रथमांशान्वयें, इकारादेश पावला होता. पण अभ्यासाच्या अन्त्यवर्णाचे—म्हणजे दीर्घ ऋकाराचेंच–जागीं इकारादेश होणें इष्ट असल्यामुळें, 'अर्तिपिपर्त्योश्च' या सूत्रांत 'पिपर्ति' चें ग्रहण करावें लागलें व अशा रीतीनें तें ग्रहण चरितार्थ होऊन, ' अनभ्यासविकारे ' या अंशाचें ज्ञापक ठरतें. ही परिभाषा असल्यामुळेंच, ' इदम्+भ्याम् ' अशा स्थितींत ' त्यदादीनामः ' सू० २६५ या सूत्रानें ' इदम् ' यांतील अन्त्य मकाराचे जागीं अकार होऊन व ' अतो गुणे ' सू० १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन ' इद+भ्याम् ' अशी स्थिति झाली असतां, ' हलि लोपः ' सू० ३४७ या सूत्रानें ' इद ' यांतील संपूर्ण अनर्थक ' इद् ' चा लोप होतो; ही परिभाषा नसती तर, अलोऽन्त्यस्य ' या सूत्रान्वयें, ' इद् ' यांतील अन्त्य दकाराचाच लोप झाला असता. तसेंच ' घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च ' सू० २४७१ व त्याचप्रमाणें ' अत्र लोपोऽभ्यासस्य ' सू० २६२० या सूत्रांनीं सांगितलेला अभ्यासलोप संपूर्ण अनर्थक अभ्यासाचा होतो; ही परिभाषा नसती तर, ' अलोऽन्त्यस्य ' या सूत्रान्वयें अभ्यासांतील अन्त्य अलाचाच लोप झाला असता. )

**अनभ्यासेत्युक्तेर्बिभर्तीत्यादौ भृञामिदित्याद्यन्त्यस्यैवाभ्यासोऽनर्थकोऽर्थावृत्त्यभावात् किंतूत्तरखण्ड एवार्थवानित्यन्यत्र निरूपितम् ॥**

'अनभ्यासविकारे' असा या परिभाषेंत प्रतिषेध सांगितला असल्यामुळें, ' भृञामित् ' सू० २४९६ या सूत्रान्वयें ( संपूर्ण अभ्यासाचे जागीं इकारादेश न होतां ) अभ्यासांतील अन्त्य अलाचेच जागीं इकारादेश होतो. अभ्यास हा अर्थवान् नसतो; कारण धातूचें द्विर्वचन केल्यानें धातूच्या अर्थाची पुनरावृत्ति होत नसते आणि म्हणून ज्यांत मूळ धातु असतो तो उत्तरखंडच फक्त अर्थवान् असतो असें इतर ठिकाणीं सांगितलें आहे. ('भृ' या जुहोत्यादिगणांतील धातूचें 'श्लौ' सू २४९० या सूत्रानें द्विर्वचन होऊन व 'अभ्यासे चर्च' सू० २१८२ या सूत्रानें अभ्यासांतील भकाराचे जागीं बकार होऊन 'बृभृ' अशी स्थिति झाली असतां,'बृ' हा अभ्यास अनर्थक असल्यामुळें, 'नानर्थकेऽलोऽन्त्यविधिः' या प्रकृतपरिभाषेच्या प्रथमांशान्वयें 'बृ' या संपूर्ण अभ्यासाचे जागीं ' भृञामित् ' या सूत्रानें इकारादेश पावला आहे; पण ' अनभ्यासविकारे ' हा प्रतिषेध प्रकृतपरिभाषेंत सांगितला असल्यामुळें, येथें ' अलोऽन्त्यस्य ' हें सूत्र प्रवृत्त होतें, व त्यामुळें संपूर्ण अभ्यासाचे जागीं इकारादेश न होतां, अभ्यासांतील अन्त्य अलाचें –म्हणजे ऋकाराचे–जागीं इकार होऊन ' बिभृ ' अशी स्थिति होते. )

**एषालोऽन्त्यात्सूत्रे भाष्ये स्पष्टा । फलानामन्यथासिद्धिकरणेन प्रत्याख्याता चेति तत एवावधार्यम् ॥ १०५ ॥**

'अलोऽन्त्यात्' १-१-६५ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे, आणि ही परिभाषा असल्यामुळें, सिद्ध होणारीं रूपें, ही परिभाषा नसली तरी, इतर रीतीनें सिद्ध होऊं शकतात असें सांगून, भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेचें प्रत्याख्यान केलें आहे हें देखिल त्या भाष्यावरून ध्यानांत येईल. ( ग्रन्थविस्तारभयास्तव त्या भाष्याचें येथें विवेचन केलें नाहीं. तें भाष्य सहज लक्षांत येण्याजोगें आहे व त्या भाष्यांत प्रकृतपरिभाषा न मानली तरी उग्र प्रयोजनांकरितां ही परिभाषा सांगितली आहे तीं प्रयोजनें इतर रीतीनें कशीं सिद्ध होऊं शकतात हें भाष्यकारांनीं स्पष्टपणें दाखविलें आहे. )

---

## परिभाषा १०६

ननु ब्राह्मणवत्सा च ब्राह्मणीवत्सश्चत्यादौ पुमान् स्त्रिया इत्येकशेषापत्तिः स्त्रीत्वपुंस्त्वातिरिक्तकृतविशेषाभावादत आह—

'ब्राह्मणवत्साच ब्राह्मणीवत्सश्च' इत्यादि उदाहरणांत 'पुमान् स्त्रिया' सू० ९३३ या सूत्रान्वयें एकशेष होण्याची आपत्ति येते, कारण वरील दोन शब्दांत पुल्लिङ्गत्व व स्त्रीलिङ्गत्व याखेरीज दुसऱ्या कोणत्याच प्रकारचा फरक नाहीं—म्हणजे एकेस्थलीं 'ब्राह्मण' शब्द पुल्लिंग असून 'वत्सा' हा शब्द स्त्रीलिंग आहे, व दुसरें ठिकाणीं 'ब्राह्मणी' हा शब्द स्त्रीलिंग असून 'वत्स' हा शब्द पुल्लिंग आहे आणि म्हणून दोहोंत केवळ लिङ्गाचाच फरक आहे. ( अशा ठिकाणीं एकशेष होण्याची आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

**प्रधानाप्रधानयोः प्रधाने कार्यसंप्रत्ययः ॥ १०६ ॥**

" सूत्रांत सांगितलेलें कार्य प्रधान व अप्रधान या दोहोंस सारखेंच लागू पडणारें असल्यास, तें कार्य ( अप्रधानास न होतां ) प्रधानास होतें. "

( 'ब्राह्मणवत्सा' व 'ब्राह्मणीवत्सः' या उत्तरपदार्थप्रधान षष्ठीतत्पुरुषसमासांत 'वत्स' व 'वत्सा' हे प्रधान असून 'ब्राह्मण' व 'ब्राह्मणी' हे अप्रधान आहेत, कारण ते जन्यजनकभावरूपसंबंधानें 'वत्सा' व 'वत्स' या शब्दांत विशेषणरूपानें अन्वित होतात. म्हणून ही परिभाषा असल्यामुळें, 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें सांगितलेलें एकशेषरूपी कार्य 'ब्राह्मण' व 'ब्राह्मणी' या अप्रधानांचे ठिकाणीं होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें 'ब्राह्मणीवत्सश्च ब्राह्मणवत्सा च' यांचा 'ब्राह्मणवत्सौ' असा एकशेष होऊं शकत नाहीं. 'ब्राह्मणवत्सश्च ब्राह्मणवत्सा च' असें जर समासाचे अवयव असते तर 'ब्राह्मणवत्सौ असा एकशेष होऊं शकला असता. )

**तेन प्रधानस्त्रीत्वपुंस्त्वातिरिक्ताप्रधानस्त्रीत्वपुंस्त्वकृतविशेषस्यापि सत्त्वेन न दोषः ।**

वरील उदाहरणांत केवळ ' प्रधान ' शब्दांत स्त्रीत्व व पुंस्त्व हा फरक नसून अप्रधान शब्दांत देखील तसा फरक असल्यामुळें, एकशेष होऊं शकत नाहीं व कांहीं अडचण उपास्थित होत नाहीं.

**स्पष्टा चेयं पुमान् स्त्रिया नपुंसकमनपुंसकेनेत्यनयोर्भाष्ये ॥ अन्तरङ्गोपजीव्यादपि प्रधानं प्रबलमिति हेतुमति चेत्यत्र भाष्यकैयटयोः ॥१०६॥**

' पुमान् स्त्रिया ' १–२–६७ व 'नपुंसकमनपुंसकेन' १–२–६९ या सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे व ' हेतुमति च ' ३–१–२६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं व तसेंच कैयटानें आपल्या वृत्तींत म्हटलें आहे कीं अन्तरङ्गापेक्षां व तसेंच उपजीव्यापेक्षां देखील प्रधान अधिक प्रबल असतें. ( ' पाचयति ओदनं देवदत्तो यज्ञदत्तेन ' या वाक्यांत ' यज्ञदत्तेन' हा प्रयोज्यकर्ता आहे. तो अन्तरङ्ग व उपजीव्य आहे, कारण पचनक्रिया त्याचे शिवाय होऊं शकत नाहीं व ती सर्वस्वी त्याच्यावर अवलंबून आहे. तरी ' देवदत्तः ' हा प्रयोजककर्ता 'पाचयति' या णिजन्तानें उक्त असल्यामुळें प्रधान ठरतो व प्रयोज्यकर्ता अनुक्त असल्यामुळें, अन्तरङ्ग व उपजीव्य असून देखील, अप्रधान ठरतो. म्हणून प्रयोजककर्त्याला उक्तेकर्तरि प्रथमा होऊन प्रयोज्यकर्त्याला, ' गतिबुद्धि ' सू० ५४० हें नियामकसूत्र असल्यामुळें कर्मत्व न होतां, अनुक्तेकर्तरितृतीया होते. ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध आहे व तो लौकिकन्याय पुढें दिल्याप्रमाणें कैयटानें सांगितला आहे. 'यथा लोके बहुषु गच्छत्सु राजा गच्छतीति प्रधानं राजा व्यपदिश्यते । राज्ञश्च प्राधान्यं तदधीनप्रवृत्तिनिवृत्तित्वादन्येषाम् । )

---

## परिभाषा १०७

**ननु स्वस्त्रादित्वप्रयुक्तो मातृशब्दस्य ङीब्निषेधः परिच्छेत्तृवाचकमातृशब्देऽपि स्यादत आह—**

' न षट्स्वस्त्रादिभ्यः ' सू० ३०८ या सूत्रानें सांगितलेला ' ङीप् ' प्रत्ययाचा निषेध जसा जननीवाचक ' मातृ ' शब्दास लागतो तसाच तो निषेध ' परिच्छेत्ता ' –म्हणजे मोजणारा–या अर्थाच्या वाचक ' मातृ ' शब्दास देखील लागू पडण्याची आपत्ति येईल ( व तो निषेध तशा ' मातृ ' शब्दास लागू पडल्यास ' ऋन्नेभ्यो ङीप्' सू० ३०६ या सूत्रान्वयें त्या शब्दाचें ' मात्री ' असें स्त्रीलिंगाचें इष्टरूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

**अवयवप्रसिद्धेः समुदायप्रसिद्धिर्बलीयसी ॥ १०७ ॥**

" शद्बांच्या अवयवांपासून उत्पन्न होणाऱ्या यौगिक अर्थापेक्षां त्या पूर्ण शद्बाहून उत्पन्न होणारा स्वतंत्र रूढ अर्थ अधिक बलवान् असतो. "

**तेन शुद्धरूढस्य जननीवाचकस्यैव ग्रहणं न परिच्छेत्तृवाचकस्य ॥ योगजबोधे तदनालिङ्गितशुद्धरूढिजोपस्थितिः प्रतिबन्धिकेति व्युत्पत्तिरेव तद्बीजम् । रथकाराधिकरणन्यायसिद्धोऽयमर्थः ॥**

ही परिभाषा असल्यामुळें ( ' न षट्स्वस्रादिभ्यः ' या सूत्रांतील ' स्वस्रादिभ्यः ' यांत अन्तर्भूत असलेल्या ' मातृ ' शद्बानें ) ' जननी ' या केवळ रूढ अर्थाच्या वाचक ' मातृ ' शद्बाचें ग्रहण होतें; ' परिच्छेत्ता ' या यौगिक अर्थाच्या वाचक ' मातृ ' शद्बाचें ग्रहण होऊं शकत नाहीं; कारण अवयवांच्या अर्थांपासून उत्पन्न होणाऱ्या अर्थाशीं ज्याचा कांहीं संबंध नाहीं—म्हणजे जो अवयवार्थाहून भिन्न अर्थ आहे–व जो संपूर्ण शद्बापासून स्वतंत्र उत्पन्न होणारा शुद्ध रूढ अर्थ आहे तो ( शद्ब उच्चारतांक्षणींच ) प्रथम मनांत येतो, व अवयवांपासून उत्पन्न होणाऱ्या अर्थाचा बोध होऊं देण्यांत तो प्रतिबंधक होतो–म्हणजे तो अवयवार्थाचा बोध होऊं देत नाहीं. ( जननीवाचक ' मातृ ' शद्ब ' मान पूजायाम् ' या धातूस ' तृच् ' प्रत्यय होऊन व नकाराचा लोप होऊन सिद्ध होतो. 'मातृ' म्हणजे मोजणारा हा शद्ब 'मा माने' या धातूस ' तृच्' प्रत्यय लागून सिद्ध होतो. जननीवाचक ' मातृ' शद्ब त्यांतील अवयवांच्या अर्थाचा बोध करणारा नसून लोकांत रूढ असलेल्या ' जननी ' या अर्थाचा वाचक आहे. ' मातृ ' हा मोजणारा या अर्थाचा वाचक शद्ब त्यांतील अवयवांच्या अर्थांचा बोधक शद्ब आहे—म्हणजे ' मा ' म्हणजे मोजणें व ' तृच्' म्हणजे करणारा या प्रत्ययप्रकृतींच्या यौगिक अर्थाचा बोधक शद्ब आहे. ' मातृ ' हा शद्ब उच्चारल्यास 'जननी' या रूढ अर्थाचाच एकदम बोध होतो, मोजणारा हा अर्थ मनांत येत नाहीं. म्हणून ' न षट्स्वस्रादिभ्यः' या सूत्रांत सांगितलेला निषेध ' मातृ ' या जननीवाचक रूढ अर्थ सांगणाऱ्या शद्बासच लागू पडतो, मोजणारा असा यौगिक अर्थ सांगणाऱ्या ' मातृ ' शद्बास तो निषेध लागू पडत नाहीं, व त्यामुळें त्या शद्बाला स्त्रीवाचक ' ङीप् ' प्रत्यय होऊन त्याचें ' मात्री ' असें स्त्रीलिंगाचें रूप होतें. ' योगाद्रूढिर्बलीयसी ' या लौकिक ) न्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे व रथाधिकरणन्यायान्वयें ही परिभाषा सिद्ध होते, ( ' वर्षासु रथकार आदधीत ' अशी श्रुति आहे व तिचा अर्थ असा आहे कीं वर्षाऋतूंत रथकारानें अग्न्याधान करावें. येथें हा प्रश्न उपस्थित होतो कीं ' रथकार ' या शद्बाचा कोणता अर्थ घ्यावा. ' रथं करोतीति रथकारः '—म्हणजे रथ करणारा असा या शद्बाचा यौगिक अर्थ आहे व 'रथकार ' शद्बानें रथ करणाऱ्या त्रैवर्णिक पुरुषाचें ग्रहण करावें असा पूर्वपक्ष आहे. परंतु ' रथकार ' या शद्बाचा रूढ अर्थ, याज्ञवल्क्य स्मृतींत सांगितल्याप्रमाणें, माहिष्यापासून करणीचे ठायीं उत्पन्न होणारा पुरुष असा आहे. क्षत्रियापासून वैश्य-

स्त्रियेचे ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या पुरुषास ' माहिष्य ' म्हणतात, व वैश्यापासून शूद्र-स्त्रियेचे ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या मुलीस ' करणी ' म्हणतात, व अशा माहिष्यापासून करणीचे ठिकाणीं उत्पन्न होणारा पुरुष ' रथकार ' होय. म्हणून सिद्धान्तपक्ष असा आहे कीं वरील श्रुतींत पठित असलेल्या ' रथकार ' शब्दानें रथ करणाऱ्या त्रैवर्णिक पुरुषाचें ग्रहण न होतां रूढार्थवाचक रथकाराचेंच ग्रहण होतें. माधवकृत जैमिनीयन्यायमालाविस्तर या ग्रन्थांत या न्यायाचें स्पष्टीकरण केलें आहे व तेथें असें म्हटलें आहे कीं ' आधानें श्रूयते । वर्षासु रथकार आदधीत इति । तत्र रथं करोति इति व्युत्पत्त्या त्रैवर्णिको रथकारः इति चेत् । मैवम् । सङ्कीर्णजातिविशेषे रूढत्वात् । वैश्यायां क्षत्रियादुत्पन्नो माहिष्यः । शूद्रायां वैश्यादुत्पन्ना करणी । तस्यां करण्यां माहिष्यादुत्पन्नो रथकारः । तथाच याज्ञवल्क्यः—माहिष्येण करण्यां तु रथकारः प्रजायते '—पहा आनंदाश्रम सीरीज् पान ३१०. याच न्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. )

**कश्चित्तु दीधीवेवीटामित्यत्रानया परिभाषया दीधीङ्वेवीङोरेव ग्रहणं न दीङ्धीङ्वेङ्वीनामिति । नन्न । तथा सति दीवेधीवीटामित्येव वदेदित्यन्ये ॥ १०७ ॥**

एक वैयाकरण ( प्रकृतपरिभाषेचा भिन्न रीतीनें अर्थ करून–म्हणजे जेथें समुदायाचें ग्रहण होऊं शकतें तेथें अवयवांचें ग्रहण न करितां समुदायाचें ग्रहण करावें असा अर्थ करून–) असें म्हणतो कीं, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें ' दीधीवेवीटाम्' सू. २११० या सूत्रानें 'दीधीङ्' व 'वेवीङ्' या ( समुदायात्मक ) धातूंचेंच ग्रहण होऊं शकतें; ' दी, घी, वे 'व'वी' या (अवयवात्मक) धातूंचें ग्रहण करितां येत नाहीं. इतर वैयाकरण म्हणतात कीं हें वरील म्हणणें बरोबर नाहीं; कारण पाणिनीला जर वर दिलेल्या चार धातूंचे सूत्रांत ग्रहण करणें अभिप्रेत असतें तर ( संदेह उत्पन्न न व्हावा म्हणून ) ' दीवेधीवीटाम् ' असें त्यानें सूत्र केलें असतें.

---

## परिभाषा १०८

**ननु वातायनार्थे गवाक्षेऽवङो वैकल्पिकत्वाद्गोक्ष इत्याद्यपि स्यादत आह—**

( पदाच्या अन्तीं ' गो ' शब्द असल्यास व त्याच्या लगेंच पुढें ' अच् ' आल्यास, ' गो ' यांतील ओकारचे जागीं, ' अवङ् स्फोटायनस्य ' सू० ८८ या सूत्रानें ) विकल्पेंकरून ' अवङ् ' असा आदेश होणें सांगितलें असल्यामुळें, ज्याप्रमाणें वातायन–म्हणजे झरोका किंवा खिडकी–या अर्थाच्या वाचक ' गवाक्ष ' या

ठिकाणीं जसा अवङादेश होतो त्याचप्रमाणें ( प्राण्यङ्गवाचक—म्हणजे गाईचा किंवा बैलाचा डोळा या अर्थाच्या वाचक—) ' गोक्ष ' या शब्दाचे ठिकाणीं देखील अवङादेश होण्याची आपत्ति येते. ( कारण वरील दोन्हीं उदाहरणांत ' गो+अक्ष ' यांचाच सन्धि करणें आहे व दोन्हीं स्थलीं ' गो ' शब्द पदान्तीं असून त्याच्या पुढें ' अ ' हा अच् आहे. म्हणून दोन्हीं स्थलीं अवङादेश होऊन ' गवाक्ष ' असें रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## व्यवस्थितविभाषयापि कार्याणि क्रियन्ते ॥ १०८ ॥

" ( सूत्रांत एखादें कार्य विकल्पेंकरून करावें असें सांगितलें असल्यास ) कोठें कोठें व्यवस्थितविभाषेनें देखील तें कार्य केलें जातें—म्हणजे लक्ष्यानुसार कांहीं उदाहरणांत तें कार्य अवश्य केलें जातें, कांहीं उदाहरणांत तें कार्य मुळींच केलें जात नाहीं, व कांहीं स्थलीं तें कार्य विकल्पेंकरून केलें जातें. "

( बालमनोरमेंत ' अवङ् स्फोटायनस्य ' या सूत्राच्या वृत्तींत ' क्वचित् भवतीत्यंश एव प्रवर्तते, क्वचित्तु न भवतीत्यंश एव, क्वचिदुभयमित्येवं लक्ष्यानुसारेण व्यवस्थया प्रवृत्ता विभाषा व्यवस्थितविभाषा '—पहा द्वितीयावृत्ति पान ४५—अशी ' व्यवस्थितविभाषा ' या शब्दाची व्याख्या केली आहे. ही परिभाषा असल्यामुळें, ' गवाक्ष ' या स्थलीं नित्य अवङ् होतो, ' गोक्षः ' या स्थलीं अवङ् मुळींच होत नाहीं व ' एङः पदान्तादति ' सू० ८६ या सूत्रान्वयें सन्धि होऊन ' गोक्षः ' असें रूप होतें. पण जेथें वातायन किंवा प्राण्यङ्ग हा अर्थ विवक्षित नाहीं तेथें विकल्पेंकरून ' अवङ् ' होऊन दोन्हीं प्रकारचीं वैकल्पिक रूपें होतात. पण येथें अशा तऱ्हेनें विभाषेची व्यवस्था करण्यास कोणतें साधन उपलब्ध आहे हा प्रश्न सहजच उपस्थित होतो व त्या प्रश्नाचें उत्तर म्हणून ग्रन्थकार पुढील पंक्ति सांगतात. )

## लक्ष्यानुसाराद्व्यवस्था बोध्या ॥

लक्ष्याकडे—म्हणजे भाषेंत जीं रूपें शुद्ध मानलीं आहेत त्यांच्याकडे—नजर ठेऊन अशी विभाषेची व्यवस्था केली जाते हें जाणावें. ( अखिललक्ष्यैकचक्षुष्क पुरुष—म्हणजे लौकिकप्रयोगांत प्रचलित असलेलीं सर्व शब्दांचीं सर्व रूपें ज्याला पूर्णपणें अवगत आहेत असा भाष्यकारासारखा अलौकिक विद्वान् सर्वज्ञ पुरुष—विभाषेची व्यवस्था लावून देऊं शकतो. म्हणून भैरवींत असें म्हटलें आहे कीं ' एतादृशव्यवस्थानिश्चयो लक्ष्यैकचक्षुष्कसाध्य इति भाष्यकारीयव्याख्यानतो निर्णयः कार्यः' सारांश, ज्यांच्या नजरेसमोर सर्व शुद्ध रूपें खेळत होतीं अशा सर्वज्ञ भाष्यकारांच्या व्याख्यानानुसारच विभाषेची व्यवस्था लावली जाते. ' शाच्छोरन्यतरस्याम् ' ७-४-४१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं व्यवस्थितविभाषेचीं उदाहरणें 'देवत्रातो गलो ग्राह इतियोगे च सद्विधिः । मिथस्ते न विभाष्यन्ते गवाक्षः संशितव्रतः' या कारिकेंत दिलीं आहेत. (१) 'नुदविदोन्दत्रा' सू० ३०३८ या सूत्रानें, 'त्रा' धातूस निष्ठा 'क्त' प्रत्यय लागला असतां, त्याचे जागीं

विकल्पेंकरून ' न ' असा आदेश होणें सांगितलें आहे. पण ' देवत्रातः, भवत्रातः ' इत्यादि संज्ञावाचक शब्दांचे जागीं तकाराचा नकार मुळींच होत नाहीं. जेथें संज्ञा-विवक्षित नाहीं तशाच ठिकाणीं ' त्राण, त्रात ' अशीं वैकल्पिक रूपें होतात. (२) तसेंच ' गॄ + अच् ' या स्थलीं ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ या सूत्रानें ' गॄ ' यांतील ऋकारास गुण होऊन ' गर् + अच् ( अ ) ' अशी स्थिति झाली असतां, ' अचि विभाषा ' सू० २५४१ या सूत्रानें, अजादि प्रत्यय पुढें आल्यास, ' गॄ ' धातूच्या रकाराचे जागीं विकल्पेंकरून लकार होणें सांगितलें आहे. पण 'गळा' या प्राण्यङ्गवाचक ' गल ' शद्बांत रकाराचे जागीं लकार नित्य होतो; 'विष' या अर्थाच्या वाचक ' गर ' शद्बांत लकारादेश मुळींच होत नाहीं. ( ३ ) 'विभाषा ग्रहः ' सू० २९०५ या सूत्रानें ' ग्रह् ' धातूस ' ण ' व ' अच् ' प्रत्यय विकल्पेंकरून होणें सांगितलें आहे. पण मत्स्यादि जलचर हा अर्थ वाच्य असल्यास, ' ग्रह् ' धातूस ' ण ' प्रत्ययच होतो, ' अच् ' प्रत्यय होत नाहीं, व ' अत उपधायाः ' सू० २२८२ या सूत्रानें उपधावृद्धि होऊन ' ग्राहः ' असेंच रूप होतें. पण सूर्यचन्द्रादि वाच्य असल्यास, ' ग्रह् ' धातूस केवळ ' अच् ' प्रत्यय होतो, ' ण ' प्रत्यय होत नाहीं, व ' ग्रहः ' असेंच रूप होतें. ( ४ ) ' लक्षणहेत्वोः क्रियायाः ' सू० ३१०३ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं ' सदादयश्च बहुलम्' असें वार्तिक पठित केलें आहे व त्यामुळें ' सत् '–म्हणजे शतृशानच्–विकल्पें-करून होतो. पण ' इति ' हें पद पुढें आल्यास, लटाचे जागीं शतृशानच् मुळींच होत नाहीं. म्हणून ' हन्तीति पलायते, वर्षतीति धावति ' असाच प्रयोग होतो. ' लटः शतृशानचौ ' सू० ३१०० या सूत्रांत भाष्यकारांनीं ' नन्वोर्विभाषा ' या पूर्व-सूत्रांतून ' विभाषा ' या पदाची अनुवृत्ति केली आहे व ' लटः शतृशानचौ ' या सूत्रांत ' अप्रथमासमानाधिकरणे ' हें पद असणें आवश्यक आहे कीं काय असा प्रश्न उपस्थित करून त्यांचें असें उत्तर दिलें आहे कीं ' वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । नित्यार्थम् । अप्रथमासमानाधिकरणे नित्यौ शतृशानचौ यथा स्याताम् । क्व तर्हीदानीं विभाषा । प्रथमासमानाधिकरणे पचन् पचतीति पचमानः पचते इति ' ( ५ ) ' गवाक्षः ' या उदाहरणासंबंधानें पूर्वी विवेचन केलेंच आहे व ' अवङ् स्फोटाय-नस्य ' या सूत्रांत सांगितलेल्या विभाषेची भाष्यकारांनीं कशी व्यवस्था लावली हें सांगितलेंच आहे. ( ६ ) ' शो तनूकरणे ' या धातूस निष्ठा क्तप्रत्यय लावला असतां, ' आदेच उपदेशेऽशिति ' सू० २३७० या सूत्रानें ओकाराचें आत्व होऊन ' शा+क्त' अशी स्थिति झाली असतां, ' शाच्छोरन्यतरस्याम् ' सू० ३०७५ या सूत्रानें ' आ ' चे जागीं विकल्पेंकरून इकारादेश होणें सांगितलें आहे. परंतु ' व्रत ' हा अर्थ विव-क्षित असल्यास, तशा ठिकाणीं आकाराचे जागीं नित्य इकार होतो. त्यामुळें ' संशितं व्रतम्, संशितो ब्राह्मणः, संशितव्रतः ' अशीं रूपें सिद्ध होतात; या ठिकाणीं विक-ल्पेंकरून आत्व होत नाहीं. म्हणूनच ' इयतेरित्वं व्रते नित्यम् ' असें वचन पठित

केलें आहे. सारांश या विवेचनावरून कारिकेंत सांगितलेल्या सहा उदाहरणांत भाष्य-कारांनीं विभाषेची व्यवस्था कशी लावली आहे हें स्पष्ट होईल, व ही व्यवस्थित-विभाषा भाष्यकारांनीं इष्टरूपसिद्धीकरितांच केली आहे हें उघड आहे.)

**शाच्छोरिति सूत्रे लटःशत्रित्यादिसूत्रेषु च भाष्ये स्पष्टा ॥ १०८ ॥**

'शाच्छोरन्यतरस्याम्' ७-४-४१ व 'लटःशतृशानचौ' ३-२-१२४ इत्यादि सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे.

---

## परिभाषा १०९

### विधिनियमसम्भवे विधिरेव ज्यायान् ॥ १०९ ॥

" जेथें एखादें सूत्र विधिपर व तसेंच नियमपर लावतां येत असेल तर तें सूत्र विधिपर लावणें हा बलवत्तर पक्ष आहे—म्हणजे जेथें शक्य असेल तेथें सूत्र नियामक न मानतां विधायक मानून तशा रीतीनें त्या सूत्राचा अर्थ करणें हा योग्य पक्ष आहे. "

('विधिरत्यन्तमप्राप्तौ नियमः पाक्षिके सति । तत्र चान्यत्र च प्राप्तौ परिसंख्येति गीयते ॥' अशी विधि, नियम, व परिसंख्या यांची मीमांसकांनी व्याख्या केली आहे. व्याकरणशास्त्रांत 'नियम' शब्दानें 'तत्र चान्यत्र च प्राप्तौ परिसंख्या' अशी जी परिसंख्या सांगितली आहे तिचेंच ग्रहण केलें जातें. मीमांसकांच्या मतें परिसंख्या दोषत्रयदुष्ट आहे—म्हणजे परिसंख्या मानल्यानें तीन दोष उद्भवतात—आणि म्हणून शक्य असल्यास, कोणतेंहि श्रुतिवचन किंवा स्मृतिवचन परिसंख्या-वचन मानूं नये. 'श्रुतार्थस्य परित्यागादश्रुतार्थस्य कल्पनात् । प्राप्तस्य बाधादित्येवं परिसंख्या त्रिदूषणा ॥' असे परिसंख्येंत तीन दोष सांगून, मीमांसक 'पञ्च पञ्चनखा भक्ष्याः' हें परिसंख्येचें उदाहरण देतात व त्या उदाहरणांत खालीं सांगितल्याप्रमाणें तीन दोष दाखवितातः— 'श्रुतस्य पञ्चनखभक्षणस्य हानात्, अश्रुताऽपञ्चनखभक्षणनिवृत्तेः कल्पनात्, प्राप्तस्य चाऽपञ्चनखभक्षणबाधनात् इति । अस्मिंश्च दोषत्रये दोषद्वयं शब्द-निष्ठम् । प्राप्तबाधस्त्वर्थनिष्ठ इतिदिक् ।' पहा अर्थसंग्रह विद्याविलास प्रेस काशीमध्यें छापलेली प्रत पान १५३ व १५४. एखादें सूत्र नियमपर मानल्यास, त्या सूत्रांत वर दिलेले तीन दोष उत्पन्न होत असल्यामुळें तें सूत्र नियमपर न मानतां विधिपर मानणें योग्य आहे हें आतां ग्रन्थकार पुढील पंक्तींत सांगतात. )

**नियमे ह्यश्रुताया अन्यनिवृत्तेः सामर्थ्यात्परिकल्पनमुक्तानुवाददोषश्चेति लाघवाद्विधिरेवेति बोध्यम् ॥ यस्य हल इत्यत्र इजादेः सनुम इत्यादौ च भाष्ये स्पष्टेयम् ॥ १०९ ॥**

सूत्र नियमपर मानल्यास सूत्रांतील शब्दांनीं जो अर्थ सांगितला नाहीं पण ( सूत्र करण्याच्या उद्देशाकडे लक्ष दिलें असतां ) शब्दसामर्थ्यानें जो अन्यनिवृत्तिपर अर्थ निघतो तशा अर्थाची कल्पना करणें, व तसेंच पूर्वीं सांगितलेल्या विधिसूत्राचा अनुवाद करणें असे दोष उत्पन्न होतात म्हणून ( हे दोष टाळण्याकरितां ) सूत्र विधिपर मानणें यांत लाघव आहे. ( एखाद्या सूत्राचा नियमपर अर्थ केल्यास (१) त्या सूत्रांत उच्चारलेल्या शब्दांचा जो वास्तविक अर्थ होतो त्याचा परित्याग करावा लागतो (२) सूत्रांत उच्चारलेल्या शब्दांनीं जो निषेधात्मक अर्थ सांगितला नाहीं त्या अर्थाची कल्पना करावी लागते (३) व पूर्वीं पठित असलेल्या विधिसूत्राचा नियमसूत्रांत अनुवाद करून विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या कार्याचा बाध करावा लागतो. सारांश श्रुतहानि, अश्रुतकल्पना व प्राप्तबाध असे तीन दोष, सूत्र नियमपर मानल्यानें, उत्पन्न होत असल्यामुळें, सूत्र नियमपर न मानतां विधिपर मानणें हें योग्य आहे; व वरील मीमांसान्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे आणि म्हणून ती युक्तिसिद्ध समजावी. ) ' यस्य हलः ' ६–४–४९ व ' इजादेः सनुमः ' ८–४–३२ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे ( ' हेतौ ' सू० ५६८ या सूत्रांतील ' हेतु' शब्दाचा लोकांत रूढ असलेला अर्थ–म्हणजे कारण, किंवा निमित्त, किंवा प्रयोजन–केल्यास तें सूत्र विधिपर ठरतें, व त्या सूत्राचा अर्थ ' हेत्वर्थे तृतीया स्यात् ' असा होतो; पण ' हेतु ' शब्दाच्या लौकिकार्थाचें ग्रहण न करितां, ' तत्प्रयोजको हेतुश्च ' सू० २५७५ या सूत्रान्वयें होणारा कृत्रिम अर्थ केल्यास–म्हणजे प्रयोजक कर्ता असा अर्थ केल्यास–' हेतौ ' या सूत्राचा असा नियमपर अर्थ होईल कीं, हेतुवाचक शब्दाहून जर तृतीया करणें असेल तर णिजन्तप्रकृतीच्या प्रयोजककर्त्याहूनच ती तृतीया करावी. प्रकृतपरिभाषेप्रमाणें सूत्राचा विधिपर अर्थ करणें संभवत असतांना नियमपर अर्थ करणें योग्य नसल्यामुळें, ' हेतौ ' या सूत्राचा, वर सांगितल्याप्रमाणें, नियमपर अर्थ न करितां विधिपर अर्थ करणेंच श्रेयस्कर आहे. नियमपर अर्थ केल्यास अनिष्टापत्ति येईल हें उघड आहे. ' यस्य हलः ' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असा प्रश्न उपस्थित केला आहे कीं, हें सूत्र अतो लोपः ' या सूत्रानंतर पठित केलें असल्यामुळें, त्या सूत्राचें ' यस्य हलः ' हें सूत्र नियामक सूत्र मानावें किंवा स्वतंत्र विधायक सूत्र मानावें? 'यस्यः हल' हें नियामकसूत्र मानल्यास, त्याचा असा अर्थ होईल कीं यकारापुढील अकाराचा ' अतो लोपः ' या सूत्रानें पावलेला लोप तेव्हांच करावा कीं जेव्हां तो यकार हलापुढें आहे. पण त्या सूत्राचा असा नियमपर अर्थ केल्यास, 'लोलूयिता, योयूयिता' इत्यादि स्थलीं, यकार हलापुढें नसून उकारापुढें असल्यामुळें, अकाराचा लोप होणार नाहीं व 'लोलूयेता, योयूयेता' इत्यादि अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां भाष्यकारांनीं ' यस्य हलः ' या सूत्रावरील भाष्यांत प्रकृतपरिभाषा पठित केली आहे व म्हटलें आहे कीं, जेथें सूत्राचा विधिपर अर्थ होऊं शकतो तेथें त्याचा नियमपर अर्थ करूं नये, व असें म्हणून भाष्यकारांनीं

'यस्य हलः' हें स्वतंत्र विधायक सूत्र मानलें आहे, व 'यस्य हलः' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' य ' नें ' य् ' व ' अ ' या संघाताचें ग्रहण करून ' आदेः परस्य ' या सूत्रानें केवळ यकाराचा लोप केला आहे, व ' अतो लोपः ' सू० २३०८ या सूत्रानें अकाराचा लोप करून इष्ट रूपाची सिद्धि केली आहे. )

---

## परिभाषा ११०

नन्वाशंसायां भूतवच्चेत्यनेन लुङ इव लङ्लिटोरप्यतिदेशः स्यादत आह—

' आशंसायां भूतवच्च ' सू० २७९० या सूत्रांत, इच्छारूपी अर्थाचें अभिधान करणें असल्यास–म्हणजे जी इष्ट वस्तु अझून प्राप्त झाली नाहीं ती पुढें प्राप्त व्हावी अशी इच्छा प्रदर्शित करणें असल्यास–भूतकाल वाचक प्रत्यय देखील लावावा असें सांगितलें असल्यामुळें, जसा लुङ्चा अतिदेश होतो तसाच लङ् व लिट्चा अतिदेश होण्याची आपत्ति येते. ( कारण 'भूते' या अधिकारांत लुङ्, लङ्, व लिट् हे तिन्ही लकार पठित आहेत व ज्याअर्थी ' भूतवत् ' या अतिदेशानें भूतकालाचे प्रत्यय देखील विकल्पेंकरून लावावे असें सांगितलें आहे त्याअर्थी वरील तिन्ही लकार भूतकालवाचक असल्यामुळें, तीन्ही लकारांचा विकल्पेंकरून प्रयोग करतां येईल व त्यामुळें ' देवश्चेत् वर्षिष्यति ' या अर्थामध्यें जसा ' देवश्चेदवर्षीत् ' असा लुङाचा प्रयोग करतां येतो त्याचप्रमाणें ' देवश्चेदवर्षत् व ' देवश्चेद्ववर्ष ' असा लङाचा व लिटाचा देखील प्रयोग करतां येईल. तसा प्रयोग होण्याची आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

### सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः ॥ ११० ॥

"सूत्रांत सामान्यार्थवाचक शब्दाचा उच्चार करून अतिदेशानें कार्य करणें सांगितलें असल्यास, तशा सामान्य अतिदेशानें विशेषाचा–म्हणजे विशेष धर्माचा–अतिदेश होत नसतो."

('अतिदेशा नाम इतरधर्मस्य इतरस्मिन् प्रयोगाय आदेशः' किंवा 'अन्यत्रैव प्रणीतायाःकृत्स्नाया धर्मसंहतेः। अन्यत्र कार्यतः प्राप्तिरतिदेशः स उच्यते॥' अशी मीमांसकांनीं अतिदेशाची व्याख्या केली आहे, व अतिदेश बहुधा शब्दास इवार्थक ' वति ' प्रत्यय लावून सांगितला जातो; जसें, ' इणवदिकः, स्थानिवदादेशः, भूतवत् ' इत्यादि. ' आशंसायां भूतवच्च ' या सूत्रांत सामान्यभूतकालवाचक ' भूत ' या शब्दाचा उच्चार करून अतिदेश सांगितला आहे. 'लुङ्' सू. २२१८ या सूत्रान्वयें होणारा लुङ् लकारच सामान्यभूतकालाचा वाचक आहे. लङ् व लिट् हे लकार सामान्यभूतकालाचे वाचक

नसून विशेषभूतकालाचे वाचक आहेत. ‘ अनद्यतने लङ् ’ सू० २२०५ या सूत्रान्वयें लङ् हा ‘ अनद्यतन ’ अशा विशेषभूतकालाचा वाचक असून, ‘ परोक्षे लिट् ’ सू० २१७१ या सूत्रानें होणारा लिट् ‘ अनद्यतन परोक्ष ’ अशा विशेषभूतकालाचा वाचक आहे. म्हणून प्रकृतस्थलीं सामान्यभूतकालवाचक ‘भूत’ असा शब्द उच्चारून भूतवच्च’ असा सामान्यातिदेश केला असल्यामुळें, त्या अतिदेशानें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, लङाचा व लिटाचा प्रयोग करितां येत नाहीं, केवळ सामान्यभूतकालवाचक लिङाचाच प्रयोग करितां येतो, आणि त्यामुळें ‘ देवश्चेदवर्षत् ’ किंवा ‘ देवश्चेद्ववर्ष ’ असे प्रयोग ‘ देवश्चे-द्वर्षिष्यति ’ या अर्थामध्यें करितां येत नाहींत. )

**सामान्योपस्थितिकाले नियमेन विशेषोपस्थापकसामग्र्यभावोऽस्या बीजम् । तेनानद्यतनभूतरूपे विशेषे विहितयोस्तयोर्नातिदेशः ।**

( सामान्यार्थवाचक शब्द उच्चारला असतां, त्या शब्दापासून उत्पन्न होणाऱ्या सामान्यार्थाचा बोध होतेवेळीं, विशेष अर्थाचा बोध होण्याचें साधन नियमेंकरून— म्हणजे नेहमी—विद्यमान असतेंच असें नाहीं ( व त्यामुळें तसा सामान्यार्थवाचक शब्द कानीं पडला असतां विशेषार्थाचा बोध होऊं शकत नाहीं. तुम्हास भेटण्यांकरितां बाहेर कोणी आला आहे असें नोकरानें सांगितल्यास, कोणी तरी मनुष्य भेटीस आला आहे असा बोध होतो, पण तो गृहस्थ कोण आहे व तो ब्राह्मण आहे कीं इतर जातीचा आहे इत्यादि विशेष अर्थाचा बोध होत नाहीं अमुक वेळीं अमुक गृहस्थ भेटीस येणार आहे असें जर पूर्वीं ठरलें असेल तरच तो विशेष गृहस्थ भेटीस आला असावा असा बोध होऊं शकतो. पण बहुधा सामान्यार्थवाचक शब्द उच्चारला असतां विशेष अर्थाचा बोध होऊं शकत नाहीं, आणि कोणताहि शब्द उच्चारला असतां त्या शब्दापासून उत्पन्न होणाऱ्या ज्या अर्थाचा सर्वांस प्रथम बोध होतो तोच त्या शब्दाचा अर्थ समजला पाहिजे.) आणि याच न्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. ( व ती युक्तिसिद्ध आहे. ) आणि ही परिभाषा असल्यामुळें, ‘अनद्यतन भूत’ या विशेष अर्थामध्यें होणाऱ्या लङ् व लिट् या लकारांचा ( ‘ भूतवच्च ’ असा सामान्य अतिदेश असल्यामुळें, प्रकृतस्थलीं ) अतिदेश करितां येत नाहीं.

**इयमनित्या न ल्यपीति लिङ्गात् । तेन स्थानिवत्सूत्रेण विशेषातिदेशो-ऽपि ॥ स्पष्टं चैतत्सर्वं स्थानिवत्सूत्रे भाष्ये ॥ ११० ॥**

प्रकृतपरिभाषा अनित्य आहे याचें ‘ न ल्यपि ’ सू० ३३३५ हें सूत्र ज्ञापक आहे. ( हलादि आर्धधातुक कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असल्यास, ‘ घुमास्था ’ सू० २४६२ या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या धातूंच्या अकाराचे जागीं ईकार होतो असें त्या सूत्रांत सांगितलें आहे. तशा धातूंच्या पुढें ‘ ल्यप् ’ प्रत्यय आल्यास त्या धातूंच्या अकाराचे जागीं ईकार होऊं नये म्हणून ‘ न ल्यपि ’ हें निषेधसूत्र केलें आहे. पण ‘ ल्यप् ’ हा प्रत्यय तर कित् नाहीं आणि त्यामुळें, ल्यप् प्रत्यय पुढें आल्यास अका-

राचे जागीं ईकार होत नाहीं असें सांगणारें ' न ल्यपि ' हें निषेधसूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. ल्यप् जर कित् असता तरच, ' प्राप्तस्यैव निषेधः' या न्यायान्वयें तसें सूत्र करणें आवश्यक झालें असतें. हें खरें कीं ' समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ' सू० ३३३२ या सूत्रानें जेव्हां ' क्त्वा ' चे जागीं ल्यप् होतो तेव्हां ' स्थानिवदादेशः ' सू० ४९ या सूत्रान्वयें, ' ल्यप् ' हा ' क्त्वा ' च आहे असें मानतां येतें. पण प्रकृत परिभाषेप्रमाणें ' स्थानिवदादेशः ' अशा सामान्य अतिदेशानें, 'क्त्वा' चे ठिकाणीं जो कित्वरूपी विशेष धर्म आहे त्या विशेष धर्माचा ल्यपाचे ठिकाणीं अतिदेश करतां येत नाहीं—म्हणजे ल्यप्ला कित् मानतां येत नाहीं. कित्व हा ' क्त्वा ' चा सामान्यधर्म असता—म्हणजे प्रत्येक ' क्त्वा ' व्यक्तीचे जागीं जर कित्व धर्म राहत असता—तर प्रकृत परिभाषेप्रमाणें कित्वाचा अतिदेश ल्यपाचे ठिकाणीं होऊं शकला असता. परंतु ' न क्त्वा सेट् ' सू० ३३२२ हें सूत्र असें सांगतें कीं ' सेट् '—म्हणजे इडागमसहित—' क्त्वा ' कित् नसतो. या सूत्रावरून हें स्पष्ट होतें कीं प्रत्येक ' क्त्वा ' कित् असतो असें कांहीं नाहीं. अनिट् ' क्त्वा ' कित् असतो, पण सेट् ' क्त्वा ' कित् नसतो. सारांश कित्व हा धर्म प्रत्येक ' क्त्वा ' व्यक्तीचे जागीं राहत नसल्यामुळें, त्याला ' क्त्वा ' चा सामान्यधर्म मानतां येत नाहीं. विशेष ' क्त्वा ' व्यक्तींचे ठिकाणीं राहणारा तो धर्म असल्यामुळें, तो विशेषधर्म ठरतो, व अशा विशेष धर्माचा अतिदेश, ' स्थानिवदादेशः ' या सामान्यातिदेशविधायकसूत्रानें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ल्यपाचे ठिकाणीं करतां येत नाहीं. मग ' न ल्यपि ' हें निषेधसूत्र पाणिनीनें कशास केलें ? पण तें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें, हें सिद्ध होतें कीं प्रकृतपरिभाषा अनित्य आहे—म्हणजे कोठें कोठें सामान्यातिदेशविधायकसूत्रानें विशेष धर्माचा देखील अतिदेश होत असतो, व ' क्त्वा ' च्या कित्व या विशेषधर्माचा ल्यपाचे जागीं अतिदेश झाल्यास इष्ट रूपें सिद्ध होणार नाहींत. म्हणून पाणिनीला ' न ल्यपि ' हें निषेधसूत्र मुद्दाम करावें लागलें व अशा रीतीनें तें सूत्र प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें ) आणि ही परिभाषा अनित्य असल्यामुळें, ' स्थानिवदादेशः ' या ( सामान्यातिदेशविधायक ) सूत्रान्वयें विशेष धर्माचा देखील अतिदेश होत असतो. ' स्थानिवदादेशः ' या सूत्रावरील भाष्यांत हें सर्व स्पष्टपणें सांगितलें आहे. )

---

## परिभाषा १११

### ननु तित्स्वरितमिति स्वरितत्वं किरतीत्यादावपि स्यादत आह—

' तित्स्वरितम् ' सू० ३७२९ या सूत्रान्वयें ' किरति ' इत्यादि स्थलीं स्वरितत्व होण्याची आपत्ति येईल. ( ' कॄ+श+ति ' अशा स्थलीं, ' ऋत इद्धातोः ' सू० २३९० या सूत्रानें ' कॄ ' धातूंतील ॠकाराचे जागीं ' इत् '—म्हणजे इ—असा आदेश

होतो व ' उरण्रपरः सू० ७० या सूत्रानें इकारापुढें रकार होऊन ' किर्+अ+ति= किरति ' असें रूप होतें. 'तित्स्वरितम् ' या सूत्राचा, ज्यांत तकार इत् आहे अशा वर्णाचा इतर वर्णाचे जागीं आदेश झाला असतां तो अच्रूपी वर्ण स्वरित होतो, असा अर्थ केल्यास, ' कॄ ' यांतील ऋकाराचे जागीं तकार आहे इत् ज्यांत असा ' इत्=इ ' आदेश झाला असल्यामुळें, ' कि ' यांतील इकार स्वरित होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्य ग्रहणम् ॥ १११ ॥

" सूत्रांत जर एखादा असा शब्द उच्चारला असेल कीं जो प्रत्ययाचा व तसेंच प्रत्ययभिन्नाचा वाचक आहे तर तशा ठिकाणीं त्या शब्दानें प्रत्ययाचेंच ग्रहण केलें जातें. "

( ' कॄ ' यांतील ऋकाराचे जागीं ' इत् ' हा आदेश झाला आहे, प्रत्यय झाला नाहीं. ' तित्स्वरितम् ' या सूत्रांत असलेल्या, 'तित्' या पदानें, प्रकृतपरिभाषे-प्रमाणें, तकार आहे इत् ज्यांत अशा प्रत्ययाचेंच ग्रहण होतें, आदेशाचें ग्रहण होत नाहीं. म्हणून प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ' किरति ' या स्थलीं ' कि ' यांतील इकारास स्वरितत्व होत नाहीं. )

**इयं चाङ्गस्येति सूत्रे भाष्ये पठिता। वर्णग्रहणे च न प्रवर्तते इति तत्रैव कैयटे स्पष्टम्।**

' अङ्गस्य ' ६—४—१ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा (वचनरूपानें) पठित केली आहे ( व त्यामुळें ती वाचनिकी समजावी. ) आणि त्या भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं जेथें सूत्रांत वर्णाचें ग्रहण केलें असेल तेथें ही परिभाषा लागू पडत नाहीं. ( जसें, ' इको यणचि ' या सूत्रांत ' इकः ' हें पद उच्चारलें आहे व तें द इक्प्रत्याहारांतील वर्णाचें-म्हणजे इ, उ, ऋ, ऌ या वर्णाचें—वाचक आहे. म्हणून ' इकः ' याचे जागीं प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं. ती परिभाषा लावल्यास, ' इको यणचि' या सूत्राचा असा अनिष्ट अर्थ होईल कीं इक्प्रत्याहारांतील प्रत्ययरूपी वर्णापुढें अच् आल्यास तशा वर्णाचे जागीं यणादेश करावा, व असा त्या सूत्राचा अर्थ केल्यास, ' अस्य=विष्णोः अपत्यम् इः, एः अयनम् ययनम् ' अशा स्थलींच यणादेश होईल; कारण ' अ ' या प्रातिपदिकास ' अत इञ् ' सू० १०९५ या सूत्रान्वयें अपत्यार्थी इञ् प्रत्यय लावला असतां, ' यस्येति च ' सू० ३११ या सूत्रानें अकाराचा लोप होऊन, ' इ ' हा प्रत्ययच शिलक राहतो व तशा प्रत्ययरूपी वर्णापुढें ' अयनम् ' यांतील अकार आला असल्यामुळें, ' इ+अयनम्=ययनम् ' असें यणादेश होऊन रूप होईल. पण ' दधि+अत्र ' किंवा ' मधु+अत्र ' या स्थलीं अन्त्य इकार व उकार प्रत्ययरूपी वर्ण नसल्यामुळें यणादेश होणार नाहीं व ' दध्यत्र, मध्वत्र ' अशीं इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. तसेंच ' आद्गुणः ' सू० ६९ या

सूत्राचा, प्रत्ययरूपी अवर्णापुढें अच् आल्यास गुणरूपी एकादेश होतो असा अर्थ केल्यास, ' उपेन्द्रः, रमेशः ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. त्याचप्रमाणें ' अस्य च्वौ ' सू० २११८ या सूत्राचा, प्रत्ययरूपी अकारापुढें च्विप्रत्यय आल्यास त्या अकाराचे जागीं ईकार होतो असा अर्थ केल्यास, 'शुक्लीभवति, कृष्णीभवति ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. म्हणूनच कैयटानें म्हटलें आहे कीं ' वर्णग्रहणे एषा न प्रवर्तते. )

**अत एव सनाशंसभिक्ष उः वले इत्यत्र सन्वलयोः प्रत्यययोर्ग्रहणम् ॥**

ही परिभाषा असल्यामुळेंच ' सनाशंसभिक्ष उः ' सू० ३१४८ व तसेंच ' वले ' सू० १०४० या सूत्रांतील ' सन् ' व ' वल ' या शब्दांनीं ' सन् ' व ' वल ' प्रत्ययांचेंच ग्रहण होतें. ( ' षण सम्भक्तौ ' किंवा ' षणु दाने ' व ' वल संवरणे ' या धातूंचें ग्रहण होत नाहीं. )

**परे तु तित्स्वरितमिति सूत्रे एषा परिभाषा लक्ष्यसंस्काराय भाष्ये क्वापि नाश्रितेति कैयटेनोक्तम् । अङ्गस्येति सूत्रे तत्प्रत्याख्यानायैषा भाष्य एकदेशिनोक्ता । अत एव तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यमिति वार्त्तिककृतोक्तम् ॥ उक्तसूत्रयोर्व्याख्यानात्प्रत्यययोरेव ग्रहणमित्याहुः ॥ १११ ॥**

इतर वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं (– व ' परे तु ' या शब्दांनीं ही पंक्ति सुरु केली असल्यामुळें, हेंच ग्रन्थकाराचें मत आहे असें समजावें–) ' तित्स्वरितम् ' ६-१-१८५ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें म्हटलें आहे कीं भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषेचा इष्ट रूपें सिद्ध करण्याकरितां कोठेंहि उपयोग केला नाहीं ( आणि म्हणून जिचा इष्ट रूपें सिद्ध करण्याचे कामी मुळींच उपयोग होऊं शकत नाहीं अशी ही निरुपयोगी परिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं असें ते वैयाकरण म्हणतात. हें खरें कीं ) ' अङ्गस्य ' ६-४-१ या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे, पण 'अङ्गस्य' या सूत्राचें कसें तरी प्रत्याख्यान करण्याकरितां, एकदेशीनें ती पठित केली आहे. ( त्या भाष्यांत एकदेशीनें असें म्हटलें आहे कीं 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य '–प० १४–व प्रकृतपरिभाषा या दोन परिभाषांनीं सर्व काम भागू शकत असल्यामुळें, ' अङ्गस्य ' हें सूत्र असण्याची कांहीं गरज नाहीं. पण सिद्धान्तपक्ष असा आहे कीं 'अङ्गस्य' या सूत्राचें प्रत्याख्यान केल्यास, ' निरुतम् , दुरुतम् ' इत्यादि अनेक इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत; म्हणून ' अङ्गस्य ' या सूत्राचें प्रत्याख्यान करणें योग्य नाहीं व तें सूत्र असणें आवश्यक आहे. सारांश सिद्धान्तीनें प्रकृतपरिभाषा पठित केली नसल्यामुळें व ती मानल्यानें इष्ट रूपें सिद्ध करण्यांत कोणतीहि मदत होत नसल्यामुळें ती मानण्याची कांहींच गरज नाहीं. आणि सिद्धान्त पक्षाप्रमाणें ) ही परिभाषा नसल्यामुळेंच, 'तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यम्' असें वार्तिक

वार्तिककारानें पठित केलें आहे. ( जर ही परिभाषा वार्तिककारास मान्य असती तर त्याला वरील वार्तिक करण्याची कांहींच गरज नव्हती; कारण प्रकृतपरिभाषेनें ' तित्स्वरितम् ' या सूत्रांतील 'तित्' या पदानें, ज्यांत तकार इत् आहे अशा प्रत्ययांचेंच–म्हणजे यत्, तव्यत् इत्यादि तित् प्रत्ययांचेंच–ग्रहण झालें असतें.ही परिभाषा न मानल्यास, ' सनाशंसभिक्ष उः ' व ' वले ' इत्यादि सूत्रांतील ' सन् ' व 'वल' या शब्दांनीं ' सन् ' व ' वल ' या प्रत्ययांचें ग्रहण न होतां ' सन् ' व ' वल् ' या धातूंचें ग्रहण होण्याची आपत्ति येईल—असें कोणी म्हटल्यास ग्रन्थकार म्हणतात कीं ) वरील दोन सूत्रांत व्याख्यानाच्या आधारें ' सन् ' व ' वल या प्रत्ययांचेंच ग्रहण करतां येतें. ( भाष्यकारादिकांच्या व्याख्यानाचा आश्रय केल्यास,' सन्' व ' वल ' हे वरील दोन सूत्रांत प्रत्ययांचेच वाचक आहेत असे स्पष्टपणें करूं शकत असल्यामुळें व अशा रीतीनें व्याख्यानानें काम भागूं शकत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं. दुसरें असें कीं ' अपृक्त एकाल् प्रत्ययः ' सू० २५० या सूत्रांत पाणिनीनें ' प्रत्यय ' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्याला देखील ही परिभाषा मान्य नव्हती हें उघड आहे. त्याला ही परिभाषा मान्य असती तर त्यानें ' एकाल् अपृक्तः ' एवढेंच सूत्र केलें असतें व प्रकृतपरिभाषान्वयें, ' एकाल् ' या पदानें एकाल् प्रत्ययाचेंच ग्रहण झालें असतें. सारांश ही परिभाषा सूत्रकारास व वार्तिककारास मान्य नसल्यामुळें, व भाष्यकारांनीं इष्ट रूपें सिद्ध करण्यांत तिचा कोठेंहि उपयोग केला नसल्यामुळें–म्हणजे ही परिभाषा न मानल्यास अमुक इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत असें कोठेंहि म्हटलें नसल्यामुळें—आणि ही परिभाषा सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेशीची उक्ति असल्यामुळें, व व्याख्यानानें सर्व काम भागूं शकत असल्यामुळें, ही परिभाषा स्वीकारार्ह नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. )

---

## परिभाषा ११२

**ननु विपराभ्यां जेरित्यात्मनेपदं परा सेना जयतीत्यर्थके पराजयति सेनेत्यत्र प्राप्नोतीत्यत आह—**

' परा सेना जयति ' या अर्थामध्यें प्रयोग केलेल्या ' परा जयति सेना ' या वाक्यांतील ' परा जयति ' या स्थलीं ' विपराभ्यां जेः ' सू० २६८५ या सूत्रान्वयें आत्मनेपद प्रत्यय होण्याची आपत्ति येते ( व ' पराजयते सेना ' असा विकृत वाक्यप्रयोग होईल. ही आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

**सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम् ॥ ११२ ॥**

" जेथें सूत्रांत एखादा शब्द इतर शब्दांबरोबर उच्चारला असून तो एका धर्मानें इतर सहउच्चारलेल्या शब्दाशीं सदृश आहे व दुसऱ्या धर्मानें त्या शब्दाशीं सदृश नाहीं तर अशा ठिकाणीं त्या शब्दानें, सहउच्चारलेल्या शब्दांत जो धर्म आहे तत्सदृशधर्मवाचक त्या शब्दाचें, ग्रहण करावें. "

( एखादा शब्द अनेकार्थवाचक असल्यास त्या शब्दाच्या कोणत्या अर्थाचें ग्रहण करावें या संबंधाची भर्तृहरीनें खालीं दिलेली कारिका सांगितली आहे–' संयोगो विप्रयोगश्च साहचर्यं विरोधिता । अर्थः प्रकरणं लिङ्गं शब्दस्यान्यस्य सन्निधिः । सामर्थ्यमौचिती देशः कालो व्यक्तिः स्वरादयः । शब्दार्थस्यानवच्छेदे विशेषस्मृतिहेतवः ॥' ही कारिका मम्मटानें काव्यप्रकाशाच्या द्वितीयोल्लासांत पठित करून तिचें सोदाहरण विवेचन केलें आहे. या कारिकेंत अनेकार्थवाचक शब्दाचा विशिष्ट अर्थ निश्चित करण्यास उपयोगी पडणारीं जीं अनेक निमित्तें सांगितलीं आहेत त्यांपैकीं 'साहचर्य' हें एक निमित्त आहे. ' साहचर्य ' याचा अर्थ ' सादृश्य ' असा आहे, व असें सादृश्य दोन शब्दांत समानधर्मत्वामुळें राहूं शकतें. म्हणून प्रकृतपरिभाषेंतील ' सहचरित ' या शब्दाचा सदृशधर्मवान् व 'असहचरित' या शब्दाचा विसदृशधर्मवान् असा अर्थ होतो. ' विपराभ्यां जेः ' या सूत्रांत ' वि ' व ' परा ' हे दोन शब्द ' विपराभ्याम् ' या सामासिकशब्दांत एकत्र उच्चारले आहेत व या दोन शब्दांत ' उपसर्गत्व ' हा समानधर्म आहे. कारण हे दोन्ही शब्द प्रादिगणांत पठित आहेत व त्यांचा क्रियेशीं संबंध झाला असतां ' उपसर्गाः क्रियायोगे ' सू० २२ या सूत्रान्वयें त्यांना उपसर्गसंज्ञा प्राप्त होते. पण ' वि ' या शब्दाचा अर्थ ' पक्षी ' व ' परा ' या शब्दाचा अर्थ ' दुसरी ' असा केल्यास, ते दोन शब्द विसदृश ठरतात. म्हणून त्यांचे ठिकाणीं उपसर्गत्वरूपी समानधर्म असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ' विपराभ्याम् ' या पदानें ' वि ' व ' परा ' या उपसर्गांचेंच ग्रहण केलें पाहिजे. ' अन्या ' या अर्थाच्या वाचक ' परा ' शब्दाचें किंवा पक्षिवाचक ' वि ' शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं. ' परा सेना जयति ' या अर्थामध्यें प्रयोग केलेल्या ' परा जयति सेना ' या वाक्यांत ' परा ' हा शब्द उपसर्ग नसून ' अन्या ' या अर्थाचें वाचक तें पद आहे. म्हणून ' विपराभ्यां जेः ' हें सूत्र येथें लागू पडत नाहीं व त्यामुळें ' जि ' धातूला आत्मनेपदाचे प्रत्यय होऊं शकत नाहींत. )

**तेन विशब्दसाहचर्यादुपसर्गस्यैव पराशब्दस्य ग्रहणमिति तत्रैव भाष्ये स्पष्टम् ॥ सहचरणं सदृशयोरेवेति सहचरितशब्देन सादृश्यवानुच्यते । रामलक्ष्मणावित्यादावपि सादृश्यमेव नियामकम् । सदृशयोरेव सहविवक्षा तयोरेव सहप्रयोग इत्युत्सर्गाच्च ।**

ही परिभाषा असल्यामुळें, ' वि ' व ' परा ' या दोहोंत उपसर्गत्वरूपी समानधर्म असल्यामुळें ( 'विपराभ्यां जेः' या सूत्रांत ' वि ' या शब्दाबरोबर उच्चारलेल्या )

'परा' या शब्दानें 'परा' या उपसर्गाचेंच ग्रहण करतां येतें असें त्या सूत्रावरील भाष्यांत—१–३-१९—भाष्यकारांनीं म्हटलें आहे. सारख्या स्वभावाचच लोक एकत्र आढळतात ( व त्यांचा एकत्र सहवास घडतो व मैत्री जुळून येते. या लौकिकन्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे. व ती लौकिकन्यायसिद्ध समजावी. ) म्हणून या परिभाषेंतील 'सहचरित' या शब्दाचा 'सादृश्यवान्' असा अर्थ होतो. 'रामलक्ष्मणौ' इत्यादि उदाहरणांत, 'राम' व 'लक्ष्मण' यांचे ठिकाणीं असणारा (दशरथपुत्रत्वरूपी) समानधर्म त्यांचा अर्थ निश्चित करण्यांत कारणभूत होतो ('राम' व 'लक्ष्मण' हे शब्द अनेकार्थवाचक आहेत. 'रामः पशुविशेषे स्याज्जामदग्न्ये हलायुधे । राघवे चासिते श्वेते मनोज्ञेऽपि च वाच्यवत् ।' असें 'राम' शब्दाचे विश्वकोशांत अनेक अर्थ सांगितले आहेत. तसेंच 'लक्ष्मण' शब्दाचे दशरथपुत्र लक्ष्मण, दुर्योधन पुत्र लक्ष्मण, चांगल्या लक्षणांनीं युक्त किंवा भाग्यशाली, व सारस पक्षी असे अनेक अर्थ आहेत. पण 'रामलक्ष्मणौ' या पदांत राम व लक्ष्मण यांचा एकत्र उच्चार केला असल्यामुळें व त्यांच्यांत दशरथपुत्रत्वरूपी समानधर्म असल्यामुळें, 'राम' शब्दानें दाशरथि रामाचेंच व 'लक्ष्मण' शब्दानें दशरथपुत्र लक्ष्मणाचेंच ग्रहण होतें ) दुसरें असें कीं ज्यांचा धर्म समान आहे असेच शब्द एकत्र उच्चारले जातात व तशाच शब्दांचा ( सूत्रांत ) एकत्र प्रयोग केला जातो असा सामान्य नियम आहे ( आणि असा सामान्य नियम असल्यामुळेंच, वर सांगितल्याप्रमाणें, 'विपराभ्याम्' यांतील 'वि' व 'परा' या शब्दांनीं, उपसर्गत्वरूपी समानधर्म ज्यांच्यामध्यें आहे अशा 'वि' व 'परा' या उपसर्गांचेंच ग्रहण होतें. )

**ध्वनितं चेदं कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीयेति सूत्रे भाष्ये । तत्र हि पञ्चम्यपाङ्परिभिरिति सूत्रेण लक्षणादिद्योतकपरियोगे पञ्चमीमाशङ्क्य यद्यप्ययं परिर्दृष्टापचारो वर्जने चावर्जने च, अयं खल्वपशब्दोऽदृष्टापचारो वर्जनार्थ एव कर्मप्रवचनीयस्तस्य कोऽन्यः सहायो भवितुमर्हत्यन्यो वर्जनार्थाद्यथास्य गोः सहायेनार्थ इति गौरेवानीयते नाश्वो न गर्दभ इत्युक्तम् । तेन हि सदृशानामेव प्रयोगे सहायभावो बोधितः ॥**

'कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया' २–३–८ या सूत्रावरील भाष्यांत वर जें सांगितलें आहे तें ध्वनित केलें आहे, आणि त्या भाष्यांत 'पञ्चम्यपाङ्परिभिः' सू० ५९८ या सूत्रान्वयें लक्षणादि अर्थाच्या वाचक 'परि' या कर्मप्रवचनीयाच्या योगें पञ्चमी कां होऊं नये अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचें निरसन करितांना भाष्यकार असें म्हणतात कीं, जरी 'परि' हा शब्द एकच अर्थाचा वाचक नसून ( 'अपपरी वर्जने' सू० ५९६ या सूत्रान्वयें ) वर्जनार्थाचा वाचक आहे व तसेंच ( 'लक्षणेत्थंभूताख्यानभागवीप्सासु प्रतिपर्यनवः' सू० ५५२ या सूत्रान्वयें लक्षण, इत्थंभूताख्यान, भाग, व वीप्सा या ) 'वर्जन' या अर्थाखेरीज इतर अर्थांचा देखील वाचक आहे तरी, 'अप'

हा शब्द एकच अर्थाचा–म्हणजे ' वर्जन ' या अर्थाचाच– वाचक कर्मप्रवचनीय आहे. म्हणून या ' अप ' शब्दाला वर्जनार्थवाचक ' परि ' शब्दाखेरीज इतर कोणत्या अर्थामध्यें असलेल्या ' परि ' शब्दाचें साहचर्य राहू शकतें ? जसें या बैलाला जोड पाहिजे असें कोणी म्हटल्यास, बैलच आणला जातो, घोडा किंवा गाढव आणलें जात नाहीं. ( त्याचप्रमाणें वर्जनार्थवाचक ' अप ' या शब्दाचा वर्जनार्थवाचक ' परि ' हा शब्दच जोड होऊं शकतो. लक्षणादि अर्थांमध्यें असणारा 'परि' हा शब्द त्याचा जोड होऊं शकत नाहीं. म्हणून ' अपपरी वर्जने ' या सूत्रांत असलेला ' परि ' हा शब्द वर्जनार्थवाचकच मानला पाहिजे, आणि अशा वर्जनार्थवाचक ' परि ' शब्दाच्या योगेंच पञ्चमी होऊं शकते, ' लक्षणेत्थंभूताख्यानभागवीप्सा ' या अर्थांच्या वाचक ' परि ' शब्दाच्या योगें पञ्चमी होऊं शकत नाहीं असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ) या भाष्यावरून हें देखील स्पष्ट होतें कीं ज्यांचा धर्म समान आहे अशाच शब्दांचा सूत्रांत एकत्र प्रयोग केला जातो.

**द्विस्त्रिश्चतुरिति सूत्रे साहचर्येणैव कृत्वोऽर्थस्य ग्रहणे सिद्धे कृत्वोऽर्थग्रहणादेषाऽनित्या । तेन दीधीवेवीटामित्यत्र धातुसाहचर्येऽप्यागमस्येटो ग्रहणमित्यन्यत्र विस्तरः ॥ ११२ ॥**

' द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे' सू० १५७ या सूत्रांत ' द्विस्, त्रिस् ' या (सुजन्त ) शब्दांच्या साहचर्यामुळें, ( प्रकृतपरिभाषेप्रमाणें ) कृत्वोऽर्थवाचक ( सुजन्त ' चतुर् ' शब्दाचेंच ) ग्रहण होऊं शकत असून देखील, त्या सूत्रांत ' कृत्वोऽर्थे ' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, ही परिभाषा अनित्य ठरते. ( 'द्वित्रिचतुर्भ्यः सुच्' सू० २०८६ या सूत्रान्वयें, 'द्वि, त्रि,' व 'चतुर्' या शब्दांना 'क्रियाभ्यावृत्तिगणन' या अर्थामध्यें ' सुच् =स् ' प्रत्यय होत असतो, व ' चतुर् ' शब्दास ' सुच्=स् ' प्रत्यय लागला असतां, ' रात्सस्य ' सू० २८० या सूत्रानें सकाराचा लोप होऊन ' चतुर् ' असेंच सुजन्त रूप राहतें. 'चतुर्' हा शब्द रकारान्त प्रातिपदिक आहे व तसेंच सुजन्त अव्यय आहे. त्यामुळें ' द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे ' असें सूत्र न करितां पाणिनीनें ' द्विस्त्रिश्चतुरिति ' एवढेंच जर सूत्र केलें असतें तर ' चतुर् ' या शब्दानें रकारान्त ' चतुर् ' या प्रातिपदिकाचें व तसेंच ' चतुर् ' या सुजन्त अव्ययाचें देखील ग्रहण झालें असतें; तसें न व्हावें व ' कृत्वः ' या अर्थाचा वाचक सुजन्त ' चतुर् ' या अव्ययाचेंच ग्रहण व्हावें म्हणून वरील सूत्रांत ' कृत्वोऽर्थे ' या पदाचें पाणिनीनें ग्रहण केलें आहे–असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण द्विस् व त्रिस् या सुजन्त अव्ययांबरोबर ' चतुर् ' हा शब्द वरील सूत्रांत उच्चारला असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, 'चतुर्' या रकारान्त प्रातिपदिकाचें ग्रहण न होतां ' चतुर् ' या सुजन्त अव्ययाचेंच ग्रहण झालें असतें. असें असून देखील ज्याअर्थी वरील सूत्रांत ' कृत्वोऽर्थे ' हें पद घातलें आहे त्याअर्थी हें सिद्ध होतें कीं, प्रकृतपरिभाषा अनित्य आहे–म्हणजे कोठें कोठें

ज्यांचा धर्म समान नाहीं अशा शद्बांचा देखील एकत्र प्रयोग किंवा उच्चार केला जातो. असें असल्यामुळें ' चतुर् ' या शद्बानें सुजन्त ' चतुर् ' या अव्ययाचेंच ग्रहण व्हावें म्हणून पाणिनीला वरील सूत्रांत ' कृत्वोऽर्थे ' हें पद घालावें लागलें व अशा रीतीनें तें पद प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें. ) आणि ही परिभाषा अनित्य असल्यामुळेंच ' दीधीवेवीटाम् ' सू० २१९० या सूत्रांत ' दीधी ' व ' वेवी ' या धातूंचें साहचर्य असून देखील ' इट् ' या शद्बानें ( भ्वादिगणांत पठित असलेल्या ' इट् गतौ ' या धातूचें ग्रहण न होतां ) इडागमाचें ग्रहण केलें जातें. ( जर ही परिभाषा नित्य असती तर ' इट् ' शब्दानें ' इट् ' धातूचेंच ग्रहण करणें भाग पडलें असतें, व 'दीधीवेवीटाम् ' हें गुणवृद्धीचा निषेध करणारें सूत्र असल्यामुळें, 'इट्+अ ति ' अशा स्थितींत ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ या सूत्रानें गुण होऊं शकला नसता, व ' एटति ' असें इष्टरूप सिद्ध न होतां ' इटति ' असें विकृत रूप झालें असतें. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा ११३

**नन्वस्थीत्यनङ् प्रियसक्थ्ना ब्राह्मणेनेत्यत्र न स्यादङ्गस्य नपुंसकत्वाभावादत आह—**

' प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन ' या उदाहरणांत 'प्रियसक्थ्ना' यांतील अङ्ग नपुंसक नसल्यामुळें, ' अस्थिदधि ' सू० ३२२ या सूत्रानें होणारा अनङ् आदेश होऊं शकणार नाहीं. ( 'अस्थिदधि' या सूत्रांत ' नपुंसकस्य ' हें पद 'नपुंसकस्य झलचः' या पूर्वसूत्रांतून अनुवृत्त होतें व हें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, ' नपुंसकस्य ' हें अनुवृत्त पद ' अङ्गस्य ' या अधिकारसूत्रांतील ' अङ्गस्य ' या पदाचें विशेषण मानल्यास, ' अस्थिदधि ' या सूत्राचा अर्थ असा होईल कीं अस्थ्यादिशद्बान्त नपुंसकलिंगी अङ्गाच्या पुढें तृतीयादिविभक्तीचा अजादि प्रत्यय आल्यास, त्या अङ्गांतील अन्त्य इकाराचे जागीं ' अनङ्=अन् ' असा आदेश करावा, व तसा सूत्रार्थ केल्यास, ' प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन ' या प्रयोगांतील ' प्रियसक्थ्ना ' याचें अङ्ग नपुंसक नसून पुल्लिंगी असल्यामुळें, त्या अङ्गांतील अन्त्य इकाराचे जागीं अनङादेश होणार नाहीं व ' प्रियसक्थ्ना ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. तसें रूप सिद्ध व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

**श्रुतानुमितयोः श्रुतसम्बन्धो बलवान् ॥ ११३ ॥**

" जेथें सूत्रांत पठित किंवा अनुवृत्त असलेल्या विशेषणवाचक पदाचा सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या पदाशीं संबंध होऊं शकतो व तसेंच ज्या प्रकरणांत–म्हणजे

अधिकारांत तें सूत्र पठित आहे त्या प्रकरणांतील पदाशीं देखील संबंध होऊं शकतो, तर तशा ठिकाणीं त्या विशेषणवाचक पदाचा प्रकरणप्राप्तपदाशीं संबंध न करितां, सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या पदाशीं संबंध–अन्वय–करणें–म्हणजे तें विशेषणवाचक पद प्रकरणप्राप्त पदाचें विशेषण न मानतां, सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या पदाचें विशेषण मानणें–हा पक्ष अधिक बलवान् आहे. ''

( ' अस्थिदधि ' या सूत्रांत ' नपुंसकस्य ' हें पद पूर्वसूत्रांतून अनुवृत्त होतें व तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित आहे हें वर सांगितलेंच आहे. ' नपुंसकस्य ' हें अनुवृत्त विशेषणवाचक पद ' अस्थिदधि ' या सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या 'अस्थि, दधि, सक्थि, अक्षि ' यांचें विशेषण होऊं शकतें व तसेंच ' अङ्गस्य ' या अधिकारसूत्रांतील 'अङ्गस्य' या प्रकरणप्राप्त पदाचें देखील विशेषण होऊं शकतें. परंतु प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ' नपुंसकस्य ' हें पद प्रकरणप्राप्त ' अङ्गस्य ' या पदाचें विशेषण न मानतां सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या ' अस्थि, दधि ' इत्यादि शब्दांचेंच विशेषण मानलें पाहिजे, व तसें मानलें म्हणजे ' अस्थिदधि ' या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, ज्या अङ्गाच्या अन्तीं ' अस्थि, दधि ' इत्यादि शब्दांपैकीं शब्द असून तो शब्द जर नपुंसकलिंगी असेल तर तशा अङ्गाच्या–मग तें अङ्ग नपुंसकलिंगी असो किंवा नसो–अन्त्यवर्णाचे –म्हणजे इकाराचे—जागीं अनङादेश करावा. वरील अर्थावरून हें स्पष्ट होतें कीं अङ्ग नपुंसक असण्याची गरज नाहीं; मात्र अङ्गाच्या अन्तीं असणारा ' अस्थि , दधि' शब्दांपैकीं शब्द नपुंसकलिंगीच असला पाहिजे. तो भिन्न लिंगाचा शब्द असल्यास त्याच्या अन्त्यवर्णाचे जागीं अनङादेश होऊं शकत नाहीं ' आदृगमहनजनः किकिनौ लिट्च ' सू० ३१५१ या सूत्रान्वयें आकारान्त ' धा ' धातूस ' कि ' प्रत्यय होऊन व लिटांत होणारें कार्य होऊन ' दधि ' हा शब्द पुलिंगी होऊं शकतो. ह्मणून अङ्गाच्या अन्तीं असणारा ' अस्थि, दधि ' इत्यादि शब्दांपैकीं शब्द नपुंसकलिंगी असला पाहिजे असें ह्मटलें आहे. ' प्रियसक्था ब्राह्मणेन ' या उदाहरणांत ' प्रियसक्था ' हें पद जरी पुल्लिंगी आहे तरी त्याच्या ' प्रियसक्थि 'या अङ्गाच्या अन्तीं असणारा ' सक्थि ' हा शब्द नपुंसकलिंगी असल्यामुळें, वर दिलेल्या अर्थाप्रमाणें, ' सक्थि' यांतील अन्त्य इकाराचे जागीं ' अनङ्=अन् ' आदेश होऊन व ' अल्लोपोऽनः ' सू० २३४ या सूत्रानें ' अन् 'यांतील अकाराचा लोप होऊन ' प्रियसक्था ' असें इष्टरूप सिद्ध होतें व ' प्रियसक्था ब्राह्मणेन ' हा प्रयोग शुद्ध ठरतो. येथें जें विवेचन केलें आहे तेंच आतां ग्रन्थकार पुढील पंक्तींत थोडक्यांत सांगतात. )

**श्रुतेनैव सम्बन्धो नानुमितेन प्रकरणादिप्राप्तेनेत्यर्थः । प्रकरणादितः श्रुतेर्बलवत्त्वादिति भावः । एवं च तत्र लिङ्गमस्थ्यादीनामेव विशेषणं नाङ्गस्य ।**

' श्रुतेनैव '–म्हणजे सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या शब्दाशींच–संबंध करावा, ' अनुमित '–म्हणजे प्रकरणादिप्राप्त–शब्दाशीं संबंध–अन्वय–करूं नये; कारण ' श्रुत–

म्हणजे साक्षात् पठित—हें प्रकरणादिकांपेक्षां बलवत्तर असतें. ( ‘ श्रुतिलिङ्गवाक्य-प्रकरणस्थानसमाख्यानां पारदौर्बल्यमर्थविप्रकर्षात् ’ हा प्रसिद्ध मीमांसा न्याय आहे, व त्याचा अर्थ असा आहे कीं ‘श्रुति,लिङ्ग, वाक्य, प्रकरण, स्थान, व समाख्या’ या प्रमाणां-पैकीं पुढचें पुढचें प्रमाण पूर्वपूर्वप्रमाणाच्या मानानें दुर्बल असतें; कारण पूर्वपूर्वप्रमा-णानें लौकर अर्थबोध होत असून उत्तरोत्तरप्रमाणानें अर्थबोध होण्यास विलंब लागतो. या न्यायाच्या आधारावरच प्रकृतपरिभाषा रचली आहे, आणि म्हणून ती युक्तिसिद्ध समजावी. वरील मीमांसान्याय देखील लौकिक व्यवहाराच्या आधारावरच रचला आहे. म्हणून प्रकृतपरिभाषा लौकिकन्यायसिद्ध देखील मानतां येते.) असा न्याय असल्यामुळें ( अस्थिदधि ’ या सूत्रांत अनुवृत्त असलेलें ) ‘ नपुंसकस्य ’ हें पद ( सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या ) ‘ अस्थि, दधि ’ या शद्बांचें विशेषण होतें. ‘ अङ्गस्य ’ या (प्रकर-णप्राप्त ) पदाचें विशेषण होत नाहीं.

**शिशीलुग्नुम्विधिषु तु गृह्यमाणस्याभावात् प्रकरणप्राप्ताङ्गस्यैव विशेषणम् ।**

‘ शि, शी, व लुक् ’ हे आदेश होण्याबद्दल सांगणाऱ्या सूत्रांत व तसेंच नुमविधायकसूत्रांत ‘ नपुंसकस्य ’ हें पद ‘ अङ्गस्य’ या प्रकरणप्राप्तपदाचेंच विशेषण होतें; कारण त्या सर्व सूत्रांत ‘ नपुंसकस्य ’ हें पद ज्याचें विशेषण होऊं शकेल असा शद्ब साक्षात् पठित नाहीं. ( ‘ जश्शसोः शिः ’ सू० ३१२ हें सूत्र ‘ जस् ’ व ‘शस्’ या प्रत्ययांचे जागीं ‘शि’—म्हणजे इ—आदेश होतो हें सांगणारें सूत्र आहे. ‘ औ ’ प्रत्ययाचे जागीं ‘ शी ’—म्हणजे ई —आदेश होतो असें सांगणारें ‘ नपुं-सकाच्च ’ सू० ३१० हें सूत्र आहे. ‘ सु ’ व ‘ अम् ’ या प्रत्ययांचा ‘ लुक् ’ होतो हें सांगणारें ‘ स्वमोर्नपुंसकात् ’ सू० ३१९ हें सूत्र आहे. ‘ नपुंसकस्य झलचः ’ सू० ३१४ हें नुम्विधायकसूत्र आहे. हीं सर्व सूत्रें अङ्गाधिकारप्रकरणांत पठित आहेत. या सर्व सूत्रांत ‘ नपुंसकस्य ’ हा विशेषणवाचक शद्ब साक्षात् पठित किंवा अनु-वृत्त आहे. परंतु त्या सर्व सूत्रांत असा कोणताहि शद्ब साक्षात् पठित नाहीं कीं ज्याचें ‘ नपुंसकस्य ’ हा विशेषणवाचकशद्ब विशेषण होऊं शकेल. म्हणून विशे-षणाला विशेष्याची आकांक्षा असल्यामुळें, ‘ नपुंसकस्य ’ हें पद ‘ अङ्गस्य ’ या प्रकरणप्राप्तपदाचें विशेषण होतें व ‘ नपुंसकस्य अङ्गस्य ’ असा अर्थ होतो. )

**अत एव वा नपुंसकस्येति सूत्रं वा शाविति न कृतम् । तत्र नपुंसक-ग्रहणं हि गृह्यमाणस्य शत्रन्तस्यैव नपुंसकत्वे यथा स्यादूबहवो ददतो येषु तानि कुलानि बहुददतीत्यत्र मा भूदूबहु निददन्ति येषु ते बहुददन्त इत्यत्र यथा स्यादित्येवमर्थम् ॥ स्पष्टं चेदं स्वमोर्नपुंसकादित्यत्र भाष्ये ॥**

ही परिभाषा असल्यामुळेंच, ‘ वा शौ ’ असें सूत्र न करितां, ‘ वा नपुं-सकस्य ’ सू० ४४४ असें सूत्र केलें आहे व त्या सूत्रांत ‘ नपुंसक ’ हें पद

अशाकरितां घातलें आहे कीं त्या सूत्रांत ( अनुवृत्त ) असणारा अभ्यस्त शत्रन्त शब्द नपुंसक असल्यासच विकल्पेंकरून नुमागम व्हावा. ' बहवो ददतो येषु तानि कुलानि बहुददति ' अशा स्थलीं नुमागम होऊं नये व ' बहूनि ददन्ति येषु ते बहुददन्तः' अशा स्थलीं नुमागम व्हावा याकरितां त्या सूत्रांत ' नपुंसकस्य ' या शब्दाचें ग्रहण केलें आहे. ' स्वमोर्नपुंसकात् ' ७-१-२३ या सूत्रावरील भाष्यांत हें स्पष्ट सांगितलें आहे ( ' वा नपुंसकस्य ' असें सूत्र न करतां ' वा शौ ' असें सूत्र केलें असतें तर, ' शि ' हा प्रत्यय नपुंसक शब्दाहूनच होत असल्यामुळें, त्या सूत्रांत ' नपुंसकस्य ' हें पद अनुवृत्त करण्याची गरज राहिली नसती, व तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, ' अङ्गस्य ' हें प्रकरणप्राप्तपद अनुवृत्त झालें असतें, व तसेंच ' नाभ्यस्तात् शतुः ' या पूर्वसूत्रांतून ' अभ्यस्तात् शतुः ' हीं पदें अनुवृत्त झालीं असतीं, व त्या सूत्राचा 'अभ्यस्तात्परः यः शतृप्रत्ययः तदन्तः शब्दः अन्ते यस्य अङ्गस्य तस्य अङ्गस्य नुम् वा स्यात् , शौ परे सति'—म्हणजे ज्या अङ्गाच्या शेवटीं अभ्यस्त शत्रन्त शब्द असेल-मग तो शत्रन्त शब्द पुल्लिंगी असो किंवा नपुंसकलिंगी असो—तशा अङ्गापुढें ' शि ' प्रत्यय आल्यास त्या अङ्गाला नुमागम होतो—असा अर्थ झाला असता, व त्यामुळें ' बहवो ददतो येषु तानि बहुददति कुलानि ' अशा स्थलीं शत्रन्त ' ददत् ' शब्द पुल्लिंगी असून देखील विकल्पेंकरून नुमागम झाला असता व ' बहुददन्ति ' असें वैकल्पिक अनिष्ट रूप सिद्ध होण्याची आपत्ति आली असती. पण तसें होणें इष्ट नसल्यामुळें, पाणिनीनें ' वा नपुंसकस्य ' असें सूत्र करून त्या सूत्रांत 'नपुंसकस्य' या पदाचें ग्रहण केलें आहे, व या विशेषणवाचक ' नपुंसक ' शब्दाला विशेष्याची आकांक्षा असल्यामुळें आणि त्या सूत्रांत ' नाभ्यस्तात् शतुः ' या पूर्वसूत्रांतून ' अभ्यस्तात् शतुः ' हीं पदें अनुवृत्त होत असल्यामुळें व तशा रीतीनें सूत्रोपात्त ठरत असल्यामुळें, ' नपुंसकस्य ' हें पद ' अभ्यस्तात् शतुः ' या पदांचें विभक्तिविपरिणामानें विशेषण होतें, ' अङ्गस्य ' या प्रकरणप्राप्त पदाचें विशेषण होत नाहीं; व त्यामुळें ' वा नपुंसकस्य ' या सूत्राचा अर्थ असा होतो कीं, ज्या अङ्गाच्या अन्तीं नपुंसक अभ्यस्त शत्रन्त शब्द आहे—मग तें अङ्ग पुल्लिंगी असो किंवा नपुंसकलिंगी असो—तशाच अङ्गाला विकल्पेंकरून नुमागम होतो. आणि असा सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, ' बहवो ददतो येषु तानि बहुददति ' या स्थलीं जरी अङ्ग नपुंसकलिंगी आहे तरी अङ्गाच्या अन्तीं असणारा अभ्यस्त शत्रन्त शब्द पुल्लिंगी असल्यामुळें येथें नुमागम होऊं शकत नाहीं. पण ' बहूनि ददन्ति येषु ते बहुददन्तः ' या स्थलीं अङ्ग पुल्लिंगी असून देखील त्या अङ्गाच्या अन्तीं नपुंसक अभ्यस्त शत्रन्त शब्द असल्यामुळें नुमागम होतो. येथें हें लक्षांत ठेवावें कीं पूर्वसूत्रांतून उत्तर सूत्रांत अनुवृत्त होणारे शब्द त्या उत्तरसूत्रांत साक्षात् पठितच आहेत असें मानलें पाहिजे; व ते शब्द तसे अनुवृत्त होत असल्यामुळेंच, त्यांचें उत्तरसूत्रांत पुनरुच्चारण केलें जात नाहीं. तसें केल्यास सूत्र व्यर्थ मोठें होईल, व

तसें करणें ' अर्धमात्रालाघवेन ' प० १३३ या न्यायाविरुद्ध होईल. परंतु प्रकरण प्राप्त असलेलें पद त्या प्रकरणांत पठित असलेल्या सूत्रांत साक्षात् पठित आहे असें मानतां येत नाहीं. हा भेद ध्यानांत ठेवला म्हणजे प्रकृतपरिभाषेचा अर्थ नीट लक्षांत येईल.)

**केचित्त्वचो रहाभ्यां द्वे इत्यत्र श्रुतेन रेफस्य निमित्तत्वेन यरन्तर्भावादनुमितं कार्यित्वं बाध्यत इत्येतदुदाहरणमाहुः। तन्न। तक्रकौण्डिन्यन्यायेन सिद्धेरित्यन्यत्र विस्तरः ॥ ११३ ॥**

कित्येक वैयाकरण ( सीरदेव इत्यादि ) ' अचो रहाभ्यां द्वे ' सू० ५९ हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें उदाहरण होय असें म्हणतात व सांगतात कीं त्या सूत्रांत रकार हा निमित्तरूपानें साक्षात् पठित असून, तो ' यर् ' प्रत्याहारांत अंतर्भूत असल्यामुळें, कार्यी या रुपानें केवळ अनुमित होतो आणि म्हणून त्याचें निमित्तत्व त्याच्या कार्यित्वाचें बाधक ठरतें–म्हणजे तो रकार केवळ द्वित्वाचें निमित्त होतो व तो द्वित्वाचा कार्यी होऊं शकत नाहीं–आणि त्यामुळें त्याला द्वित्व होऊं शकत नाहीं. ( ' अचः पराभ्यां रेफहकाराभ्यां परस्य यरः द्वे वा स्तः ' असा ' अचो रहाभ्यां द्वे ' या सूत्राचा अर्थ आहे. या सूत्रांतील ' रहाभ्याम् ' या निमित्तवाचक पदांत रकाराचें निमित्तरूपानें साक्षात् ग्रहण केलें आहे—म्हणजे रकाररुपानें ग्रहण केलें आहे. त्या सूत्रांत 'यरोऽनुनासिके ' या पूर्वसूत्रांतून ' यरः' हें षष्ठ्यन्त पद अनुवृत्त आहे व ' यर् ' हा कार्यित्वरूपानें निर्दिष्ट आहे–म्हणजे यर्‌ला द्वित्वकार्य होणें सांगितलें आहे. ' यर् ' प्रत्याहारांत रकार हा अंतर्भूत आहे हें खरें. तरीपण जसा तो रकार निमित्तकोटींत साक्षात् रकाररूपानें निर्दिष्ट आहे तसा तो उद्देश्यकोटींत साक्षात् रकाररूपानें निर्दिष्ट नसून यर्प्रत्याहारान्तर्गतत्वरूपसामान्यधर्मविशिष्ट—म्हणजे यर्त्वधर्मविशिष्ट–अशा स्वरूपांत निर्दिष्ट आहे. सारांश रकार हा निमित्तरूपानें साक्षात् पठित असून कार्यी या रूपानें अनुमित असल्यामुळें, तो कार्यी न ठरतां केवळ निमित्त ठरतो आणि म्हणून जसें यर्-प्रत्याहारांतील इतर वर्णांना द्वित्व होतें तसें त्याला द्वित्व होत नाहीं. जसें ' मद्र्ह्रदः' या स्थलीं अकारापुढें हकार असून व त्यापुढें रकार असून देखील त्या रकाराला द्वित्व होत नाहीं, असें सीरदेव इत्यादि वैयाकरणांचें म्हणणें आहे. पण ग्रन्थकार म्हणतात कीं ) हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तक्रकौण्डिन्यन्यायान्वयें रकार द्वित्वाचा कार्यी होऊं शकत नाहीं हें सिद्ध होतें. ( ' सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम् तक्रं कौण्डिन्याय ' या स्थलीं तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो व कौण्डिन्यास दही न मिळतां केवळ ताक मिळतें हें मागें सांगितलेंच आहे. हा न्याय प्रकृतस्थलीं लावल्यास, सर्व यरांना द्वित्वाचें दान सांगितलें असल्यामुळें व रकाराला निमित्ताचें दान सांगितलें असल्यामुळें, त्याचे ठिकाणीं निमित्तदानामुळें द्वित्वदानाचा बाध होतो असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय दिसतो. परंतु प० ५८ मध्यें ग्रन्थकारानें असें म्हटलें आहे

कीं ' तक्रकौण्डिन्यन्यायोऽपि तदप्राप्तियोग्येऽचरितार्थविषयो विधेयविषय एव ' आणि त्यामुळें यर् व रकार यांचा विधेयकोटींत निर्देश नसून उद्देश्य कोटींत निर्देश असल्यामुळें, प्रकृतस्थलीं तक्रकौण्डिन्यन्याय न लागू पडतां माठरपरिवेषणन्याय लागू पडतो— म्हणजे रकाराचे ठिकाणीं द्वित्वाचें निमित्तत्व सोपविलें असल्यामुळें तो द्वित्वकार्य अनुभवूं शकत नाहीं—असें कित्येक टीकाकारांचें म्हणणें आहे. सारांश 'अचो रहाभ्यां द्वे ' हें सूत्र प्रकृतपरिभाषेचें उदाहरण मानतां येत नाहीं हें उघड आहे. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा ११४

**ननु तत्पुरुषे तुल्यार्थ इति स्वरः परमेण कारकेण परमकारकेणेत्यादौ स्यात्तथा "गातिस्थाघुपाभूभ्य" इति लुक् पै शोषण इत्यतः कृतात्वात्परस्यापि स्यादत आह—**

' परमेण कारकेण परमकारकेण ' असा ' परमकारकेण ' इत्यादि शब्दांचा समास केल्यास, ' तत्पुरुषे तुल्यार्थतृतीया ' सू० ३७३६ या सूत्रानें पूर्वपदप्रकृतिस्वर होण्याची आपत्ति येते आणि तसेंच ' पै शोषणे ' या धातूचें आत्व करून लुङाचें रूप करतेवेळीं ' गातिस्था ' सू० २२२३ या सूत्रान्वयें सिचाचा लुक् होण्याची आपत्ति येते. ( ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

### लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् ॥ ११४ ॥

" जर सूत्रांत असा एखादा शब्द उच्चारला असेल कीं जो त्या शब्दाच्या मूळस्वरूपाचा वाचक आहे व तसेंच दुसऱ्या एखाद्या शब्दास पाणिनीय सूत्रें लावून मूळ शब्दासारख्या तयार झालेल्या शब्दाचा देखील वाचक आहे तर तशा ठिकाणीं सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें त्या शब्दाच्या लाक्षणिक रूपाचें ग्रहण न करितां मूळ शब्दस्वरूपाचेंच ग्रहण करावें. "

( ' परमकारकेण ' या स्थलीं वास्तविक ' परमश्चासौ कारकश्च परमकारकः ' असा प्रथमातत्पुरुष-म्हणजे कर्मधारय-समास होऊन ' परमकारक ' असा सामासिक शब्द तयार झाल्यावर त्याला तृतीयेच्या एकवचनाचा प्रत्यय लावून ' परमकारकेण ' असें रूप होतें. हें खरें कीं ' परमेण कारकेण परमकारकेण ' असा देखील ' परमकारकेण ' या शब्दाचा समास होऊं शकतो; कारण ' विशेषणं विशेष्यण बहुलम् ' सू० ७३६ या सूत्रान होणारा विशेषणसमास केवळ प्रथमान्त पदांचाच होतो असें नसून द्वितीयाद्यन्त पदांचा देखील तसा समास होऊं शकतो. कैयटानें असें म्हटलें आहे कीं ' विशेषणसमासो न प्रथमान्तानामेव भवत्यपि तु द्वितीयाद्यन्तानामपि. ' पण एवढ्या

वरून ' परमेण कारकेण परमकारकेण ' हा तृतीया तत्पुरुष मानला जाऊं शकत नाहीं. तृतीया तत्पुरुष तोच होय कीं जो 'तृतीया ' या अधिकारांत जीं सूत्रें पठित आहेत त्यांपैकीं कोणत्या तरी सूत्रानें झाला आहे, व तीं सूत्रें ६९२-६९७ हीं होत. त्या सूत्रांपैकीं कोणत्याहि सूत्राच्या कक्षेंत ' परमेण कारकेण परमकारकेण ' हा समास येऊं शकत नसल्यामुळें, त्याला प्रतिपदोक्त तृतीयातत्पुरुषसमास मानतां येत नाहीं.'परमेण कारकेण ' असा तृतीयाविभक्तीचा त्या समासांत उपयोग केला असल्यामुळें, तो केवळ लाक्षणिक तृतीयातत्पुरुष होय. म्हणून प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ' तत्पुरुषे तुल्यार्थतृतीया ' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या तृतीयातत्पुरुषसमासानें, लाक्षणिक तृतीयातत्पुरुषाचें ग्रहण होत नसून, प्रतिपदोक्त तृतीयातत्पुरुषाचेंच ग्रहण होत असल्यामुळें, ' परमेण कारकेण परमकारकेण ' या स्थलीं पूर्वपदप्रकृतिस्वर होऊं शकत नाहीं, व ' समासस्य ' सू० ३७३४ या सूत्रान्वयें होणारा अन्तोदात्त स्वरच पूर्ण सामासिकशद्बाला होतो. तसेंच ' गातिस्थाघुपाभूभ्यः ' सू० २२२३ या सूत्रांत उच्चारलेल्या ' पा ' धातूनें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, जो धातु धातुपाठांत ' पा ' अशा रूपानें उच्चारला आहे तशाच प्रतिपदोक्त ' पा ' धातूचें ग्रहण करतां येतें. ' पै ' धातूला ' आदेच उपदेशे ' सू० २३७० हें सूत्र लावल्यानें आत्व होऊन जरी तो मूळ ' पा ' धातूसारखा बनतो तरी तशा लाक्षणिक ' पा ' धातूचें, ' गातिस्था ' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' पा ' धातूनें, ग्रहण करतां येत नाहीं. त्यामुळें 'पै' धातूच्या लुङ्‌चें रूप करितांना सिचाचा लुक् न होतां ' अपासीत् ' असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

**लक्षणं लाक्षणिकमुपचारात् ॥ तत्तद्विभक्तिविशेषाद्यनुवादेन विहितो हि समासादिः प्रतिपदोक्तस्तस्यैव ग्रहणं शीघ्रोपस्थितिकत्वात् । द्वितीयो हि विलम्बोपस्थितिकः । पै इत्यस्य पा इति रूपं लक्षणानुसन्धानपूर्वकं विलम्बोपस्थितिकं पिबतेस्तु तच्छीघ्रोपस्थितिकम् । इदमेव ह्येतत्परिभाषाबीजम् ॥**

( प्रकृतपरिभाषेंत ' लक्षणप्रतिपदोक्तयोः ' या ठिकाणीं जो ' लक्षण ' शद्ब घातला आहे त्या )' लक्षण' शद्बाचा अर्थ 'उपचारानें'-म्हणजे लक्षणावृत्तीनें-'लाक्षणिक ' असा होतो. ( वास्तविक ' लक्षण ' या शद्बाचा अर्थ ' सूत्र' असा आहे व ' लक्षणेन सम्पादितम् '-म्हणजे सूत्र लावून तयार झालेलें-असा ' लाक्षणिक ' शद्बाचा अर्थ आहे. तरी पण अभेदोपचारानें ' लक्षण ' या शद्बाचा अर्थ ' लाक्षणिक' असा होतो व तसा अर्थ केला म्हणजे 'लाक्षणिकप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् ' असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ होतो. ) त्या त्या विशेषविभक्तीचा-म्हणजे द्वितीया, तृतीया, चतुर्थी अशा प्रकारचा-सूत्रांत उच्चार करून जेथें तत्पुरुषसमास होण्याचें विधान केलें आहे तशा सूत्रांनीं होणाऱ्या प्रतिपदोक्त तत्पुरुषसमासाचेंच ' तत्पुरुषसमास ' या शद्बानें ग्रहण होतें. ' ( म्हणून ' तत्पुरुषे तुल्यार्थतृतीया ' या

सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' तृतीयातत्पुरुष ' या शद्बानें, ' तृतीया ' असा उच्चार करून ६९२ ते ६९७ हीं जीं सूत्रें पठित केलीं आहेत व त्या सर्व सूत्रांत सू० ६९२ मध्यें उच्चारलेलें ' तृतीया ' हें पद अनुवृत्त आहे तशा सूत्रांनीं होणाऱ्या प्रतिपदोक्त तृतीयातत्पुरुषाचेंच, ग्रहण होतें, ' विशेषणं विशेष्येण बहुलम् ' या सूत्रान्वयें होणाऱ्या ' परमेण करकेण परमकारकेण ' अशा लाक्षणिक समासाचें, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ग्रहण होऊं शकत नाहीं. ) याचें कारण हें आहे कीं ( 'तृतीयातत्पुरुष ' असा शद्ब उच्चारतांक्षणींच ) प्रथम प्रकारचा–म्हणजे प्रतिपदोक्त तृतीयातत्पुरुष –समासच एकदम ध्यानांत येतो; दुसऱ्या प्रकारचा–म्हणजे लाक्षणिक तृतीयातत्पुरुष–समास उशीरानें ध्यानांत येतो–म्हणजे तशा लाक्षणिक तृतीयातत्पुरुषाचा प्रथम बोध न होतां प्रतिपदोक्त तृतीयातत्पुरुषाचाच एकदम बोध होतो. तसेंच ( कोठेंहि सूत्रांत ' पा ' असा धातु उच्चारला असतां ) ' पा पाने ' या प्रतिपदोक्त धातूचाच एकदम बोध होतो. ( ' आदेच ' या सूत्रानें आत्व केल्यावर मूळ ' पा ' धातूसारख्या होणाऱ्या लाक्षणिक ) ' पै शोषणे ' या धातूचा बोध होण्यास विलंब लागतो ( म्हणून सूत्रांत उच्चारलेल्या ' पा ' धातूनें प्रतिपदोक्त ' पा ' धातूचेंच ग्रहण करतां येतें. प्रकृतपरिभाषेप्रमाणें ' पै शोषणे ' अशा लाक्षणिक धातूचें ग्रहण करतां येत नाहीं. ) प्रतिपदोक्त शद्बस्वरूपाचा चटकन् बोध होणें व लाक्षणिक शद्बस्वरूपाचा विलंबानें बोध होणें ( असा जो लौकिक व्यवहारांत सर्वत्र अनुभव येतो ) त्याच्याच आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. ( व ती लौकिकन्यायसिद्ध समजावी. )

**इयं च वर्णग्रहणेऽप्योत्सूत्रे भाष्ये सञ्चारित्वात् ।**

जेथें सूत्रांत केवळ अलाचें—म्हणजे वर्णाचें—ग्रहण केलें आहे तेथें देखील ही परिभाषा लागू पडते; कारण ' ओत् ' १-१-१५ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं तशा ठिकाणीं देखील या परिभाषेचा उपयोग केला आहे ( हो, अहो, आहो, उताहो ' इत्यादि ओदन्त निपात ' चादि 'या आकृतिगणांत अन्तर्भूत आहेत व अशा साक्षात् पठित ओदन्त निपातांना, ' ओत् ' सू० १०४ या सूत्रान्वयें, प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होते व त्यांच्यापुढें अच् आल्यास, 'प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ' सू० ९० असें सूत्र असल्यामुळें, दोहोंचा सन्धि होत नाहीं. ' ऊर्यादिच्विडाचश्च ' सू० ७६२ या सूत्रान्वयें च्विप्रत्ययान्ताला देखील निपातसंज्ञा होत असते. असा च्विप्रत्ययान्त शद्ब जर ओदन्त असला तर त्याला देखील ' ओत् ' या सूत्रान्वयें प्रगृह्यसंज्ञा व्हावी, व त्याला तशी संज्ञा प्राप्त झाल्यास, ' अनदः अदः अभवत् अदोभवत् , अतिरः तिरः अभवत् तिरोभवत् ' अशा स्थलीं, ' अदो ' व ' तिरो ' हे च्विप्रत्ययान्त ओदन्त निपात असल्यामुळें, त्यांतील ओकारापुढें असलेल्या अकाराचाल्यांच्याशी सन्धि होणार नाहीं, व 'अदो अभवत, तिरो अभवत् ' अशीं विकृत रूपें होण्याची

आपत्ति येईल. ती आपत्ति टळावी म्हणून वार्तिककारानें 'ओतश्चिवप्रतिषेधः' असें वार्तिक केलें आहे व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं 'ओत्' हें प्रगृह्यसंज्ञाविधायकसूत्र च्विप्रत्ययान्त ओदन्त निपातांना लागत नाहीं व तशा निपातांना प्रगृह्यसंज्ञा होत नाहीं, आणि त्यामुळें तशा निपातांपुढें अच् आल्यास सन्धि होतो.' ओत्' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं हें वार्तिक पठित करून त्याचें वर दिलेलें प्रयोजन सांगितलें आहे. पण भाष्यकार पुढें म्हणतात कीं असें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं, कारण ज्या प्रयोजनाकरितां तें वार्तिक केलें आहे तें प्रयोजन प्रकृतपरिभाषेनें सिद्ध होऊं शकतें. कारण च्विप्रत्ययान्त ओदन्त निपात मूळचे—म्हणजे प्रतिपदोक्त—ओदन्त निपात नसून, पाणिनीय सूत्रें लावल्यावर त्यांना ओदन्तत्व येत असतें. जसें 'अनदः अदः अभवत्' येथें मूळ शब्द 'अदस्' आहे व 'ससजुषो रुः' सू० १६२, 'अतो रो रुः' सू० १६३ इत्यादि सूत्रांनीं कार्य केल्यावरच त्याला 'अदो' असें ओदन्तत्व प्राप्त होतें. म्हणून 'ओत्' या सूत्रानें, अशा लाक्षणिक च्विप्रत्ययान्त ओदन्त निपाताचें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ग्रहण करतां येत नाहीं, व जे मूळचे ओदन्त निपात आहेत तशांचेंच ग्रहण करतां येतें व त्यामुळें 'अदो अभवत्' असा प्रकृतिभाव न होतां, 'अदोऽभवत्' असा सन्धि होतो. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'ओत्' या सूत्रांत 'ओ' या अलाचें ग्रहण केलें असून देखील तशा ठिकाणीं भाष्यकारांनी प्रकृतपरिभाषा लावली आहे आणि म्हणूनच 'इयं च वर्णग्रहणेऽपि' असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे. )

**यत्तु वर्णग्रहणे नैषादेच इत्यत्रोपदेशग्रहणादिति, तत्तु तस्मिन्नेव सूत्रे शब्देन्दुशेखरे दूषितमिति तत एव द्रष्टव्यम् ॥**

'आदेच उपदेशे' या सूत्रांत 'उपदेशे' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, ज्या सूत्रांत केवळ अलाचें ग्रहण केलें आहे तशा सूत्रांना प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं हें सिद्ध होतें असें जें ( सीरदेवाचें ) म्हणणें आहे तें 'आदेच' या सूत्रावरील शब्देन्दुशेखरांत चूक आहे असें सिद्ध करून दाखविलें आहे, व तें त्या ग्रन्थांतच पाहून घ्यावें. ( 'आदेच' या सूत्रानें 'ए, ऐ, ओ, औ' या वर्णांपुढें शिद्भिन्न प्रत्यय आला असतां त्यांचे जागीं आकार होणें सांगितलें आहे. सारांश या सूत्रांत केवळ वर्णग्रहण केलें आहे—म्हणजे वर्णाला कार्य होणें सांगितलें आहे. सीरदेवाचें असें म्हणणें आहे कीं, ज्या सूत्रांत केवळ वर्ण ग्रहण केलें आहे अशा सूत्रांना प्रकृतपरिभाषा लागू पडली असती तर 'आदेच उपदेशे' या सूत्रांत 'उपदेशे' हें पद घालण्याची कांहींच गरज नव्हती; कारण 'आदेचः अशिति' एवढेंच जरी सूत्र केलें असतें तरी, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, धातुपाठांत उपदिष्ट असलेल्या प्रतिपदोक्त एजन्त धातूंनीं त्यांचेंच ग्रहण झालें असतें व लाक्षणिक एजन्त धातूंचें—म्हणजे 'चि, नी, स्तु' इत्यादि धातूंपुढें आर्धधातुकप्रत्यय आला असतां, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू० २१६८ या

सूत्रानें गुण होऊन चे, ने, स्तो अशीं एजन्त रूपें झाल्यावर तशा लाक्षणिक एजन्त रूपांचें-ग्रहण होऊं शकलेंच नसतें. असें असून देखील ज्याअर्थी त्या सूत्रांत 'उपदेशे' हा शब्द पाणिनीनें मुद्दाम घातला आहे त्याअर्थी हें स्पष्ट होतें कीं, ज्या सूत्रांत वर्ण-ग्रहण केलें आहे तशा सूत्रांना प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं. पण ग्रन्थकार म्हणतात कीं हें सीरदेवाचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण भाष्यकारांनीं 'आदेच' या सूत्रांत घातलेल्या 'उपदेश' या पदाचें असें फल सांगितलें आहे कीं, त्या सूत्रांत 'धातु' हा शब्द साक्षात् पठित किंवा अनुवृत्त नसल्यामुळें, तें सूत्र प्रातिपदिकास देखील लाग-ण्याचा संभव होता, व 'गोभ्याम्' या स्थलीं 'गो' या ओदन्त शब्दापुढें 'भ्याम्' हा अशित् प्रत्यय आला असल्यामुळें, 'गो' यांतील ओकाराला आत्व होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टळावी म्हणून 'आदेच' या सूत्रांत 'उपदेशे' हें पद पाणिनीनें मुद्दाम घातलें आहे. जसा धातुपाठ तयार करून पाणिनीनें त्यांत धातु उपदिष्ट—म्हणजे पठित—केलया आहेत तसा प्रातिपदिकपाठ तयार केला नाहीं व त्यांत प्रातिपदिकें उपदिष्ट केलीं नाहींत. त्यामुळें 'आदेच' या सूत्रांत 'उपदेशे' हें पद घातलें असल्यामुळें, प्रातिपदिकांचें ग्रहण न होतां, धातूंचेंच ग्रहण होतें, व 'आदेच' या सूत्राचा अर्थ असा होतो कीं धातुपाठांत पठित असलेल्या एजन्त धातूंपुढें अशित् प्रत्यय आल्यास धातूंच्या एचाला आत्व होतें. सारांश 'आदेच' या सूत्रांत केलेलें 'उपदेशे' या पदाचें ग्रहण, भाष्यकारांनीं वर सांगितल्याप्रमाणें, अन्य रीतीनें चरि-तार्थ ठरत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा, ज्या सूत्रांत वर्णग्रहण केलें आहे तशा सूत्रांना, लागू पडत नाहीं याचें तें पद ज्ञापक मानतां येत नाहीं. 'आदेच' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं 'उद्देशश्च प्रातिपदिकानां, नोपदेशः'.)

**अनित्या चेयं भुवश्च महाव्याहृतेरिति महाव्याहृतिग्रहणादित्यन्यत्र विस्तरः ॥ ११४ ॥**

'भुवश्च महाव्याहृतेः' सू० ३६०५ या सूत्रांत 'महाव्याहृतेः' हें पद घातलें असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा अनित्य ठरते. ('भुवस्' हा शब्द महाव्याहृतीचा वाचक आहे हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. 'भू' धातूस क्विप् प्रत्यय लागून 'भू' असें जें प्राति-पदिक तयार होतें त्या प्रातिपदिकाचें प्रथमेचें बहुवचन 'भुवः' असें होतें; पण महा-व्याहृतिवाचक 'भुवः' या प्रतिपदोक्त शब्दानें तशा लाक्षणिक 'भुवः' या शब्दाचें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ग्रहण होऊं शकलेंच नसतें. असें असून देखील ज्याअर्थी 'भुवश्च महाव्याहृतेः' या सूत्रांत 'महाव्याहृतेः' हें पद पाणिनीनें घातलें आहे त्याअर्थी हें स्पष्ट होतें कीं प्रकृतपरिभाषा अनित्य आहे—म्हणजे कोठें कोठें प्रतिपदोक्त शब्दानें लाक्षणिक स्वरूपाचें देखील ग्रहण होतें 'भुवश्च' या स्थलीं तसें न व्हावें म्हणून पाणिनीनें 'महाव्याहृतेः' हें पद त्या शब्दापुढें घातलें आहे. अशा रीतीनें तें पद प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें.) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा ११५

नन्वेवं देङो दोधातोश्च कृतात्वस्य घुसंज्ञा न स्यात्तथा मेङ आत्वे प्रणिमातेत्यादौ नेर्गदनदेति णत्वं न स्यात्तथा गै इत्यस्यात्वे घुमास्थेतीत्वं न स्यादत आह—

लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा–प. ११४—स्वीकारल्यास, ' देङ् ' व ' दो ' धातु यांचें आत्व केल्यावर त्यांना घुसंज्ञा प्राप्त होणार नाहीं, तसेंच ' मेङ् ' धातूचें आत्व केल्यावर ' नेर्गदनद ' सू० २२८५ या सूत्रान्वयें ' प्रणिमाता ' इत्यादि स्थलीं णत्व होऊं शकणार नाहीं, व त्याचप्रमाणें ' गै ' धातूचें आत्व केल्यावर ' घुमास्था ' सू० २४६२ या सूत्रान्वयें ईत्व होऊं शकणार नाहीं. ( ' आदेच ' सू० २३७० या सूत्रान्वयें ' देङ् ' व ' दो ' या धातूचें आत्व केल्यावर व त्यांचें ' दा ' असें लाक्षणिक रूप झाल्यावर, ' दाधा घ्वदाप् ' सू० २३७३ या सूत्रांत ' दा ' व ' धा ' या प्रतिपदोक्त धातूंना ' घु ' संज्ञा होणें सांगितलें असल्यामुळें, तशा लाक्षणिक ' दा ' धातूस घुसंज्ञा होणार नाहीं व त्यामुळें ' घुमास्था ' सू० २४६२ व ' स्थाघ्वोरिच्च ' सू० २३८९ इत्यादि सूत्रान्वयें घुसंज्ञक धातूंना जें कार्य होणें सांगितलें आहे तें ' देङ् ' व ' दो ' धातूंना होऊं शकणार नाहीं व त्या दोन धातूंचीं विकृत रूपें होण्याची आपत्ति येईल. तसेंच ' आदेच ' या सूत्रानें, ' मेङ् ' धातुपुढें तृच्प्रत्यय आला असतां, आत्व होऊन ' माता ' असें रूप झाल्यावर त्याच्यामागें ' प्र ' व 'नि' हे उपसर्ग आल्यास, ' नेर्गदनद ' सू० २२८५ या सूत्रान्वयें ' नि ' यांतील नकारास णत्व होऊं शकणार नाहीं. कारण ' नेर्गदनद ' या सूत्रांत प्रतिपदोक्त ' मा ' धातूचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या प्रतिपदोक्त ' मा ' धातूनें, आत्व केल्यावर तयार झालेल्या ' मा ' अशा ' मेङ् ' धातूच्या लाक्षणिक रूपाचें, ग्रहण होऊं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें 'आदेच' या सूत्रानें ' गै ' धातूचें आत्व केल्यावर जसें ' घुमास्थागापा ' सू० २४६२ या सूत्रान्वयें प्रतिपदोक्त ' गा ' धातूस ईत्व होतें तसें ' गै ' च्या लाक्षणिक ' गा ' रूपास होणार नाहीं. ही आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

## गामादाग्रहणेष्वविशेषः ॥ ११५ ॥

" ' गा ' धातूला, ' मा ' धातूला व तसेंच ज्या सूत्रांत ' दा ' धातूचें ग्रहण केलें आहे त्या सूत्राला–म्हणजे ' दाधा घ्वदाप् ' सू० २३७३ या सूत्राला–लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा–प. ११४–लागू पडत नाहीं ( व त्याचप्रमाणें लुग्विकरणपरिभाषा–प. ९१–व तसेंच निरनुबंधकपरिभाषा–प. ८२–देखील लागू पडत नाहींत. )

( ही परिभाषा प. ११४ चा अपवाद आहे. ही परिभाषा असल्यामुळें, ' देङ् ' व ' दो ' धातूंना आत्व केल्यावर तशा लाक्षणिक धातूंना देखील ' दाधा घ्वदाप् ' या

सूत्रान्वयें घुसंज्ञा प्राप्त होते व त्यामुळें घुसंज्ञकधातूंना जीं कार्यें होणें सांगितलीं आहेत तीं कार्यें या धातूंना देखील होतात. तसेंच 'मा' या प्रतिपदोक्त धातूनें, 'मेङ्' धातूला आत्व केल्यावर तशा लाक्षणिक 'मा' धातूचें देखील, ग्रहण होतें, आणि तसेंच 'गा' या प्रतिपदोक्त धातूनें, 'गै' धातूला आत्व केल्यावर तशा लाक्षणिक 'गा' धातूचें देखील, ग्रहण होतें, आणि त्यामुळें इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. या परिभाषेंतील 'गामादाग्रहणेषु' या पदाचा 'गामादाग्रहणं येषु सूत्रेषु' असा बहुव्रीहिसमास करूं नये. तसा समास केल्यास, 'गातिस्था' सू० २२२३ या सूत्रांत 'पा' धातूचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या सूत्रास प्रकृतपरिभाषा लागून 'पा' धातूनें 'पै' धातूचें ग्रहण होण्याची आपत्ति येईल व ज्याप्रमाणें 'पा' धातूचें 'अपात्' असें लुङाचें रूप होतें तसेंच 'पै' धातूचें लुङाचें 'अपासीत्' असें इष्ट रूप न होतां, 'अपात्' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. म्हणून 'दाग्रहणं यस्मिन् सूत्रे तत् दाग्रहणम्' असा प्रथम बहुव्रीहिसमास करावा. त्यायोगानें 'दाधा घ्वदाप्' या सूत्रांत 'दा' व 'धा' या दोन्हीं धातु निर्दिष्ट असल्यामुळें, 'दाग्रहण' या शब्दानें 'दा' व 'धा' या दोन्हीं धातूंचें ग्रहण होतें, व 'धा' धातूनें जसें प्रतिपदोक्त 'धा' धातूचें ग्रहण होतें तसेंच 'धेट्' धातूला आत्व केल्यावर तशा लाक्षणिक धातूचें देखील ग्रहण होतें. 'दाग्रहणम्' या शब्दाचा वर सांगितल्याप्रमाणें बहुव्रीहिसमास केल्यावर, 'गा च मा च दाग्रहणं च तानि गामादाग्रहणानि' असा द्वंद्वसमास करावा. असा समास केला म्हणजे 'गाधातौ, माधातौ, दाघटितसूत्र च अविशेषः'—म्हणजे 'तत्र लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषालुग्विकरणपरिभाषानिरनुबन्धकपरिभाषाः नोपतिष्ठन्ते' असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ होतो व या अर्थानुसारच या परिभाषेचें वर भाषांतर केलें आहे. कित्येक वैयाकरण 'दाग्रहणम्' या पदानें 'दो दद्घोः' सू० ३०७७ या सूत्राचें ग्रहण करतात व त्या सूत्रांत 'धा' धातु पठित नसल्यामुळें, 'धाग्रहणेष्यविशेषः' अशी वेगळी परिभाषा पठित करितात. पण 'दाग्रहण' या पदाचा वर जसा अर्थ केला आहे तसा केल्यानें अशी वेगळी परिभाषा मानण्याचें कांहीं कारण राहत नाहीं, व प्रकृतपरिभाषेनें 'दा' व 'धा' या दोन्हीं धातूंचें ग्रहण होतें. )

**अत्र च ज्ञापकं दैपः पित्वम्। तद्धि घुदाविति सामान्यग्रहणार्थम्। अन्यथा लाक्षणिकत्वादेव विधौ तद्ग्रहणे सिद्धे किं निषेधे सामान्यग्रहणार्थेन पित्वेन, तेन चैकदेशानुमतिद्वारा सम्पूर्णपरिभाषा ज्ञाप्यते॥**

'दैप् शोधने' ( या भ्वादिगणांतील ) धातूला पकारानुबंध लावून तो धातु पित् असा जो पठित केला आहे तें त्याचें पित्वकरण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे. तें पित्व अशाकरितां केलें आहे कीं ( 'दाधा घ्वदाप्' या सूत्रांत ) 'अदाप्' असें जें सामान्य उच्चारण केलें आहे त्यानें 'दैप्' धातूचें देखील ग्रहण व्हावें. प्रकृतपरि-

भाषा नसती तर, लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषेप्रमाणें, 'दा' या प्रतिपदोक्त धातूनें ('आदेच' या सूत्रानें आत्व करून प्रतिपदोक्त 'दा' धातूसारख्या होणाऱ्या लाक्षणिक) 'दैप्' धातूचें ग्रहण झालेंच नसतें, व 'दैप्' धातूचें ग्रहण न व्हावें म्हणून त्या धातूला पकारानुबंध लावून 'अदाप्' असा जो सामान्यनिषेध सांगितला आहे तसा निषेध सांगण्याची कांहींच गरज नव्हती. ('दाप्' व 'दैप्' या दोन धातूंचें वास्तविक भिन्न स्वरूप आहे; एक आकारान्त असून दुसरा ऐकारान्त आहे. हें खरें कीं 'आदेच' या सूत्रानें 'दैप्' चें आत्व केल्यावर त्याचें 'दाप्' असें लाक्षणिक रूप होतें. पण लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषान्वयें, 'दाप्' या प्रतिपदोक्त धातूनें, 'दाप्' असें लाक्षणिक स्वरूप प्राप्त होणाऱ्या 'दैप्' धातूचें ग्रहण झालेंच नसतें. परंतु प्रकृतपरिभाषेप्रमाणें लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा 'दा' धातूस लागू पडत नसल्यामुळें, 'दाप्' धातूनें 'दैप्' धातूचें ग्रहण होतें. तथापि 'दै' या धातूस पकारानुबंध न लावतां 'दै' असा धातु धातुपाठांत पठित केला असता तर 'दाप्' नें 'दैप्' चें ग्रहण होऊं शकलें नसतें, व त्यामुळें 'अदाप्' या पदानें केवळ 'दाप्' धातूचेंच ग्रहण झालें असतें व 'दै' धातूचें ग्रहण झालें नसतें. पण 'दाप्' व 'दैप्' या दोन्ही धातूंना घुसंज्ञा प्राप्त होणें इष्ट नसल्यामुळें, व 'दा' या प्रतिपदोक्त धातूनें प्रकृतपरिभाषेप्रमाणें 'दाप्' व 'दै' या दोन्हीं धातूंचें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें, घुसंज्ञाविधायकसूत्रांत त्यांचें ग्रहण होऊं नये म्हणून त्या सूत्रांत 'अदाप्' असा सामान्यनिषेध सांगितला आहे, व त्या सामान्यनिषेधांत 'दै' धातूचा अन्तर्भाव व्हावा म्हणून त्या धातूला पकारानुबंध लावला आहे आणि अशा रीतीनें त्याचें पित्वकरण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें.) अशा रीतीनें प्रकृतपरिभाषेचा एक अंश—म्हणजे 'दा' हा अंश—ज्ञापित झाला असल्यामुळें, त्या योगानें संपूर्ण परिभाषा ज्ञापित होते.

**इयं च लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषानिरनुबन्धकपरिभाषालुग्विकरणपरिभाषाणां बाधिका। दाधाघ्विति सूत्रे भाष्ये स्पष्टा॥**

'दाधा घ्वदाप्' १-१-२० या सूत्रावरील भाष्यांत हें स्पष्ट सांगितलें आहे कीं प्रकृतपरिभाषा लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषेची, लुग्विकरणपरिभाषेची, व तसेंच निरनुबंधकपरिभाषेची बाध करणारी—म्हणजे अपवादात्मक—परिभाषा आहे (व त्यामुळें 'गा, मा, दा,' व 'धा' या चार धातूंना त्या तीन परिभाषा लागू पडत नाहींत, आणि म्हणूनच 'दा' धातूनें 'देङ्' धातूचें, व लुग्विकरण 'दा' धातूचें, ग्रहण होतें.)

**गातिस्थेति सूत्रे इणादेशगाग्रहणमेवेष्यत इति न दोष इत्यन्यत्र विस्तरः॥ ११५॥**

'गातिस्था' सू० २२२३ या सूत्रांतील 'गा' या शब्दानें ('इणो गा लुङि' सू० २४५८ या सूत्रान्वयें) 'इण्' धातूच्या जागीं लुङ्लकारांत जो 'गा' असा

आदेश होतो त्याचेंच ग्रहण करावें अशी भाष्यकाराची इष्टि असल्यामुळें—म्हणजे असें भाष्यकारांनीं सांगितलें असल्यामुळें–' गातिस्था ' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' गा ' शद्वानें ' गै ' धातूचें ग्रहण होत नाहीं आणि म्हणून कांहीं दोष उत्पन्न होत नाहीं. ( वास्तविक प्रकृतपरिभाषेप्रमाणें ' गा ' धातूनें ' गै ' धातूचें ग्रहण होतें, व ' गातिस्था ' या सूत्रांत ' गा ' असा प्रतिपदोक्त धातु असता तर त्या धातूनें ' गै ' धातूचें ग्रहण झालें असतें. पण भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं ' गातिस्था ' या सूत्रांत उच्चारलेला जो ' गा ' शद्व आहे तो ' गा 'या प्रतिपदोक्त धातूचा वाचक नसून ' इणो गा लुङि ' या सूत्रानें ' इण् ' धातूच्या जागीं लुङ्लकारांत होणाऱ्या ' गा ' या आदेशाचा वाचक आहे, आणि भाष्यकाराचें म्हणणें प्रमाण मानलेंच पाहिजे. म्हणून ' इण् ' च्या जागीं होणाऱ्या ' गा ' या आदेशानें ' गै ' धातूचें ग्रहण होऊं शकत नाहीं, व असें ग्रहण न होणें प्रकृतपरिभाषेच्या विरुद्ध जात नाहीं. अशी, वर सांगितल्याप्रमाणें, भाष्यकाराची इष्टि असल्यामुळें ' गै ' धातूचें किंवा ' गा ' धातूचें लुङाचें रूप करितांना, सिचाचा लुक् न होतां 'अगासीत् अगासिष्टाम् अगासिषुः' अशीं रूपें होतात. पण ' इण् ' धातूचें लुङाचें रूप करितांना ' अगात्, अगाताम्, अगुः' अशीं रूपें होतात. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा ११६

ननु वृद्ध्यादिसंज्ञाः समुदाये स्युरत आह—

( ' वृद्धिरादैच् , अदेङ्गुणः ' सू० १६ व १७ इत्यादि सूत्रांन्वयें होणाऱ्या ) ' वृद्धि ' इत्यादि संज्ञा समुदायाला होण्याची आपत्ति येते. ('वृद्धिरादैच् , अदेङ्गुणः' इत्यादि सूत्रांत ' आदैच् ' व ' अदेङ् ' असा उद्देश्यकोटींत निर्देश करून त्या उद्देश्याला अनुक्रमें वृद्धिसंज्ञा व गुणसंज्ञा होणें सांगितलें असल्यामुळें, ' आदैच् '–म्हणजे ' आ, ऐ, औ '–या समुदायास वृद्धिसंज्ञा व तसेंच ' अदेङ् '–म्हणजे ' अ, ए, ओ '-या समुदायास गुणसंज्ञा, प्राप्त होईल व त्या समुदायांतील प्रत्येक वर्णास वृद्धिसंज्ञा व गुणसंज्ञा प्राप्त होणार नाहीं. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतात:—

प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः ॥ ११६ ॥

"( सूत्रांत उद्देश्यकोटींत अनेक उद्देश्यांचा निर्देश केला असल्यास ) प्रत्येक उद्देश्य विधेयाशीं अन्वित करून वेगळीं वेगळीं वाक्यें करावी, "

( ' वृद्धिरादैच् ' या सूत्रांत आ व ऐच्—म्हणजे ऐ, औ–या तीन वर्णांचा उद्देश्य कोटींत निर्देश केला असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ' आ वृद्धिसंज्ञः स्यात्'

ऐ वृद्धिसंज्ञः स्यात्, औ वृद्धिसंज्ञः स्यात् ' अशीं तीन भिन्न वाक्यें करावीं, व असें केल्यानें आ, ऐ, औ या प्रत्येकास वृद्धिसंज्ञा प्राप्त होते व समुदायास तशी संज्ञा होण्याची आपत्ति टळते. )

देवदत्तादयो भोज्यन्तामित्यत्र भुजिवत् ॥ ११६ ॥

' देवदत्तादयो भोज्यन्ताम् ' या वाक्यांत जसा देवदत्तादिकांपैकीं प्रत्येकाचा भोजनक्रियेशीं अन्वय होतो तसेंच या ठिकाणीं समजावें. ( ' देवदत्तयज्ञदत्तविष्णुमित्राः भोज्यन्ताम् ' या लौकिकप्रयोगांत जसा ' देवदत्तः भोज्यताम्, यज्ञदत्तः भोज्यताम्, विष्णुमित्रः भोज्यताम्' असा अर्थ होतो त्याप्रमाणें जेथें सूत्रांत अनेक उद्देश्यें उच्चारलीं असून एक विधेय उच्चारलें आहे तेथें प्रत्येक उद्देश्याचा विधेयाशीं अन्वय करून भिन्न वाक्यें करावीं—म्हणजे सूत्रांत सांगितलेलें कार्य प्रत्येक उद्देश्यास करावें. सारांश ही परिभाषा वरील लौकिकव्यवहाराच्या आधारावर रचली असून लौकिकन्यायसिद्ध आहे. )

---

## परिभाषा ११७

नन्वेवं संयोगसंज्ञासमाससंज्ञाभ्यस्तसंज्ञा अपि प्रत्येकं स्युरत आह—

' प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः ' ही मागील परिभाषा स्वीकारल्यास संयोगसंज्ञा, समाससंज्ञा, व अभ्यस्तसंज्ञा समुदायांतील प्रत्येक घटकास प्राप्त होण्याची आपत्ति येते. ( ' हलोऽनन्तराः संयोगः ' सू० ३० हें संयोगसंज्ञा होण्याबद्दलचें सूत्र आहे व या सूत्रांत ' अनन्तराः हलः ' हें उद्देश्य असून या सूत्रानें अनेक अव्यवहित हलांना संयोगसंज्ञा होणें सांगितलें आहे. मागील परिभाषेप्रमाणें, तशा हलांपैकीं प्रत्येक हलास संयोगसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येते. तसेंच ' प्राक् कडारात् समासः ' सू० ६४८ या अधिकारांत ' सह सुपा ' सू० ६४९ हें सूत्र पठित आहे व ' सुबन्तं सुबन्तेन सह समस्यते ' असा त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, ज्या दोन सुबन्तांचा समास होतो त्या दोहोंना मिळून समाससंज्ञा प्राप्त होते. मागील परिभाषा स्वीकारल्यास, समासांतील प्रत्येक अवयवास समाससंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येते. त्याचप्रमाणें ' उभे अभ्यस्तम् ' सू० ४२६ हें अभ्यस्तसंज्ञेचें सूत्र आहे. षष्ठाध्यायांत जें द्वित्व प्रकरण सांगितलें आहे त्याच्या अन्वयें द्विर्वचन केलें असतां, पूर्वखण्ड व उत्तरखण्ड या दोहोंनाहि, मागील परिभाषेप्रमाणें, अभ्यस्तसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

क्वचित्समुदायेऽपि ॥ ११७ ॥

कोठें कोठें ( सूत्रांत अनेक उद्देश्यें निर्दिष्ट असलीं तरी त्या सर्वांना एकच उद्देश्य समजून तसें ) समुदायरूप उद्देश्य विधेयाशीं अन्वित करून एकच वाक्य करावें. ''

**गर्गाः शतं दण्ड्यन्तामर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्तीत्यादौ दण्डनवत् ॥ लक्ष्यानुरोधेन च व्यवस्था ॥ ११७ ॥**

' गर्गांजवळून शंभर ( निष्क ) दंड वसूल करावा, राजांना पैशाशीं काम आहे ' इत्यादि स्थलीं जसा प्रत्येक गर्गापासून शंभर ( निष्क ) दंड वसूल न करितां गर्गसमुदायापासून तो दंड वसूल केला जातो त्याचप्रमाणें येथें समजावें व ( या दोन परस्परविरुद्ध परिभाषांचा) लक्ष्यानुसार उपयोग करावा—म्हणजे या दोन परिभाषांपैकीं जेथें जी परिभाषा लावून इष्ट प्रयोजन सिद्ध होत असेल तेथें ती लावावी. ( वरील लौकिकन्यायान्वयें ' हलोऽनन्तराः संयोगः ' या सूत्रांत ' अनन्तराः ' असा पर्युदास असल्यामुळें, व ' सह सुपा ' या सूत्रांत ' सह ' या शब्दाचा निर्देश केला असल्यामुळें, आणि तसेंच ' उभे अभ्यस्तम् ' या सूत्रांत ' उभे ' हें पद घातलें असल्यामुळें, येथें समुदायाचे ठिकाणीं संज्ञा होण्याची विवक्षा आहे हें लक्षांत ठेवून या ठिकाणीं मागील परिभाषा न लावतां प्रकृतपरिभाषा लावावी. जेथें सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या उद्देश्यांपैकीं प्रत्येकास कार्य होण्याची विवक्षा असेल तेथें मागील परिभाषा लावावी, आणि अशा रीतीनें प० ११६ व ११७ यांची लक्ष्यानुसार व्यवस्था लावावी. प्रकृतपरिभाषा देखील वर सांगितलेल्या लौकिकन्यायाच्या आधारावर रचली आहे आणि ती लौकिकन्यायसिद्ध आहे )

---

## परिभाषा ११८

**ननु यू स्त्र्याख्यावित्यत्र व्यक्तिपक्षे दीर्घनिर्देशादनण्त्वेन ग्राहकसूत्राप्राप्त्योदात्ताद्यन्यतमोच्चारणेऽन्यस्वरकस्य संज्ञा न स्यादत आह—**

व्यक्तिपक्ष स्वीकारल्यास, ' यू स्त्र्याख्यौ नदी ' सू० २६६ या सूत्रांत दीर्घ ईकार व ऊकार यांचा निर्देश केला असल्यामुळें, व दीर्घ ईकार व ऊकार हे अण्प्रत्याहारान्तर्गत वर्ण नसल्यामुळें, त्यांना ' अणुदित् सवर्णस्य ' सू० १४ हें ग्रहणकशास्त्र लागू पडत नाहीं. त्यामुळें उदात्तादि तीन स्वरांपैकीं ज्या विशिष्ट स्वरांत वरील सूत्रामध्यें ' यू ' हा शब्द उच्चारला आहे त्याहून भिन्न स्वराचा दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त नित्यस्त्रीलिंग शब्द असल्यास त्याला नदीसंज्ञा प्राप्त होणार नाहीं. ( ' ईश्च ऊश्च यू ' येथें ' यू ' हें प्रथमेचें द्विवचन आहे. ' यू + औ ' या स्थितींत ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' सू० १६४ या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घरूप एकादेश झाला आहे वास्तविक ' दीर्घाज्जसि च ' सू० २३९ हें निषेधक सूत्र असल्यामुळें तसा एका-

देश व्हावयास नको होता, पण येथें निषेधाभाव छान्दस आहे असें बालमनोरमेंत म्हटलें आहे. ' यू ' हें प्रातिपदिक ' फिषोऽन्त उदात्तः ' फिट् सू० १ या सूत्रान्वयें उदात्त असून, ' औ ' हा प्रत्यय ' अनुदात्तौ सुप्पितौ ' सू० ३७०९ या सूत्रान्वयें अनुदात्त आहे व दोहोंचे जागीं होणारा एकादेश ' एकादेश उदात्तेनोदात्तः ' सू० ३६५८ या सूत्रान्वयें उदात्त होतो. त्यामुळें ' यू स्त्र्याख्यौ ' या सूत्रांतील ' यू ' हा शब्द पाणिनीयस्वरप्रक्रियान्वयें उदात्तस्वरांत उच्चारला असल्यामुळें, उदात्तस्वराहून भिन्न स्वरांत उच्चारलेल्या दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त नित्यस्त्रीलिंग शब्दास नदी-संज्ञा प्राप्त न होण्याची आपत्ति येते; कारण 'स्वं रूपं शब्दस्य' सू० २५ असें सूत्र असल्यामुळें भिन्न स्वरांत उच्चारलेल्या शब्दांत फरक होतो व तशा स्वरांत उच्चारलेल्या शब्दानें मूळस्वरांत उच्चारलेल्या शब्दाचें ग्रहण होणार नाहीं. ही जी शंका ग्रन्थकारानें उपस्थित केली आहे ती अष्टाध्यायी त्रिस्वरयुक्त पठित आहे हा सिद्धान्तपक्ष स्वीकारल्यास व तसेंच व्यक्तिपक्षाचा आश्रय केल्यासच उपपन्न होते. म्हणूनच ग्रन्थकारानें या पंक्तींत ' व्यक्तिपक्षे ' असा शब्द घातला आहे. व्यक्तिपक्ष स्वीकारल्यास, दीर्घ ईकार किंवा ऊकार ज्या स्वरांत उच्चारला आहे त्याहून भिन्न स्वरांत उच्चारलेल्या ईकाराचा व ऊकाराचा तो वाचक होऊं शकत नाहीं. ' अणुदित् सवर्णस्य ' हें ग्रहणकशास्त्र दीर्घ ईकारास व ऊकारास लागू पडत नाहीं; कारण अण्प्रत्याहारांत ऱ्हस्व इकार व उकार निर्दिष्ट आहेत. त्यामुळें ऱ्हस्व इकारानें व उकारानें जसें अठराहि प्रकारच्या इकारांचें व उकारांचें ग्रहणकशास्त्रान्वयें ग्रहण होऊं शकतें तसें दीर्घ ईकारानें व ऊकारानें होऊं शकत नाहीं. दीर्घ ईकार व ऊकार हे केवळ दीर्घ ईकार व ऊकार या जातींचेच वाचक आहेत. परंतु जातिपक्ष स्वीकारल्यास, दीर्घ ईकारानें व ऊकारानें सर्व प्रकारच्या इकारांचें व उकारांचें ग्रहण होऊं शकतें व तो पक्ष मानल्यास, ' अणुदित् सवर्णस्य ' या सूत्रांत केलेलें अण्प्रत्याहाराचें ग्रहण व्यर्थ ठरतें. म्हणूनच ग्रन्थकारांनीं व्यक्तिपक्ष स्वीकारून वरील शंका उपस्थित केली आहे. जातिपक्ष स्वीकारल्यास ती शंका उपस्थित होऊंच शकत नाहीं. वर दाखविलेली आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## अभेदका गुणाः ॥ ११८ ॥

" ( गुणांत होणाऱ्या फरकामुळें शब्दस्वरूप भिन्न होत नाहीं; कारण ) गुणामुळें भेद उत्पन्न होत नसतो. "

( प्रकृतपरिभाषा असल्यामुळें ' यू स्त्र्याख्यौ नदी ' या सूत्रांत ' यू ' हा शब्द उदात्तस्वरांत उच्चारला असला तरी त्या शब्दानें भिन्न स्वरांत उच्चारलेल्या दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त नित्यस्त्रीलिंग शब्दाचें ग्रहण होतें. )

**असति यत्ने स्वरूपेणोच्चारितो गुणो न भेदको न विवक्षित इत्यर्थः ॥**

यत्न न करितां स्वरूपानें उच्चारलेला गुण त्या विशिष्ट गुणानें युक्त अशाच शद्बाचा वाचक होतो असें नसून भिन्न गुणांनीं युक्त अशा त्या शद्बाचा देखील वाचक होतो, व स्वरूपानें उच्चारलेला गुण विवक्षित नसतो असा या परिभाषेचा अर्थ आहे. ( या परिभाषेंत उच्चारलेल्या ' गुण ' या शद्बानें उदात्तत्व, अनुदात्तत्व, स्वरितत्व, अनुनासिकत्व, व निरनुनासिकत्व या पांच गुणांचें ग्रहण होतें. 'स्वरूपेण उच्चारितः' या पदांचा ' उदात्तादिरूपेण उच्चारितः, न तु उदात्तादिशद्बोच्चारणपूर्वकमुच्चारितः ' असा अर्थ समजावा. प्रत्येक अच् तीन स्वरांपैकीं कोणत्याहि एका स्वरांत उच्चारला जाऊं शकतो. तथापि पाणिनीयस्वरप्रक्रियेप्रमाणें अचाला जो स्वर प्राप्त होत असेल त्या स्वरानें युक्त तो अच् सूत्रांत उच्चारला असल्यास, स्वरूपतः प्राप्त अशाच स्वरानें तो अच् उच्चारला आहे असें समजावें व अशा ठिकाणीं तो स्वरूपतः प्राप्त स्वर विवक्षित नसतो. पण पाणिनीयस्वरप्रक्रियेप्रमाणें जेथें एखाद्या अचाला विशिष्ट प्रकारच्या स्वराची प्राप्ति होत असून देखील त्या अचाला अमुकच प्रकारचा भिन्न स्वर व्हावा असा सूत्रांत शद्बानें निर्देश केला असेल तर तशा ठिकाणीं यत्न करून स्वर सांगितला आहे असें समजावें, व तसा शद्बोच्चारणपूर्वक मुद्दाम सूत्रांत सांगितलेला स्वर विवक्षित असतो, आणि तशा स्वरानें युक्त अशा अचानें भिन्नस्वरयुक्त त्या अचाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. तसेंच सर्व अच् व य्, व्, ल् हीं अन्तःस्थ व्यञ्जनें अनुनासिक व निरनुनासिक अशीं उच्चारलीं जाऊं शकतात, व ङ्, ञ्, ण्, न्, म् या पांच वर्गांतील अन्त्य व्यञ्जन अनुनासिक आहे. अनुनासिकाच्या व निरनुनासिकच्या जागीं स्थानिसादृश्यानें अनुक्रमें अनुनासिक व निरनुनासिक आदेश होणें हें 'स्थानेऽन्तरतमः' सू० ३९ या सूत्रान्वयें प्राप्त असून देखील, जेथें अनुनासिकाचे जागीं निरनुनासिक आदेश व्हावा किंवा निरनुनासिकाचे जागीं अनुनासिक आदेश व्हावा असें सूत्रांत शद्बोच्चारणपूर्वक सांगितलें असेल तर तशा ठिकाणीं यत्न करून सांगितलेला विशिष्ट प्रकारचा गुण विवक्षित आहे असें समजावें व तशा गुणविशिष्ट वर्णानें भिन्नगुणविशिष्ट त्या वर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं असें या परिभाषेचें तात्पर्य आहे. )

**अत्र चास्थिदधीत्यादावनङादेरुदात्तस्यैवोच्चारणेन सिद्धे उदात्तग्रहणं ज्ञापकम् ॥**

' अस्थिदधि ' इत्यादि सूत्रांत ' अनङ् ' इत्यादिकांचें उदात्तस्वरांत उच्चारण केल्यानें काम भागत असतां, पुन्हा त्या सूत्रांत, ' उदात्त ' हा जो शद्ब उच्चारला आहे तो प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक आहे. ( अष्टाध्यायी स्वरयुक्त पठित आहे असा पक्ष स्वीकारला, किंवा ती स्वररहित पठित आहे असा पक्ष स्वीकारला, तरी सूत्रांत विशिष्टस्वरयुक्त शद्ब उच्चारला असल्यास, तसा स्वर विवक्षित नसतो व तसा स्वर शद्बोच्चारणपूर्वक उच्चारला असल्यासच विवक्षित असतो असा नियम असल्यामुळें, पाणिनीला ' अस्थिदधि ' या सूत्रांत ' उदात्तः ' हा शद्ब मुद्दाम घालावा लागला.

तसा नियम नसता तर ' अनङ् ' यांतील आद्य अकार उदात्तस्वरांत पठित असल्यामुळें, किंवा अष्टाध्यायी स्वररहित पठित आहे असा पक्ष स्वीकारल्यास, तसा पठित केल्यानें काम भागलें असतें. पण पाणिनीला हें माहित होतें कीं तशा रीतीनें उच्चारलेला ' अनङ् ' यांतील उदात्तस्वर, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, विवक्षित समजला जाणार नाहीं व त्याला तर ' अनङ् ' नेहमी उदात्तच असणें इष्ट होतें. म्हणून त्यानें ' अस्थिदधि ' या सूत्रांत ' उदात्तः ' या शब्दाचा उच्चार केला आहे, व अशा रीतीनें यत्नपूर्वक उच्चारलेला तो शब्द प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरतो. )

**स्वरूपेणोच्चारित इत्युक्तेरनुदात्तादेरन्तोदात्तादित्युदात्तादिशब्दोच्चारणे विवक्षैव ।**

' स्वरूपेणोच्चरितो गुणो न विवक्षितः ' असा वर सांगितलेला नियम असल्यामुळें, ज्या ठिकाणीं सूत्रांत ' अनुदात्तादेः ' अन्तोदात्तात् ' इत्यादि विशिष्ट शब्दांचें उच्चारण केलें असेल तेथें गुण—म्हणजे स्वर–विवक्षित आहे असें समजावें. ( अशा ठिकाणीं विशेष यत्न करून ' अनुदात्तादेः ' किंवा अन्तोदात्तात् ' असा शब्द सूत्रांत मुद्दाम उच्चारला असल्यामुळें, स्वर विवक्षित आहे असें मानलें पाहिजे, आणि त्यामुळें ' अनुदात्तादेः ' या पदानें ' उदात्तादेः ' किंवा ' स्वरितादेः ' अशा भिन्न स्वराचें ग्रहण करतां येत नाहीं, आणि तसेंच 'अन्तोदात्तात्' या पदानें 'अनुदात्तान्तात्' अशा भिन्न स्वराचें ग्रहण करतां येत नाहीं. )

**उञ ऊँ इत्यत्राननुनासिके एवोच्चारणीये यत्नाधिक्येनानुनासिकोच्चारणाद्विवक्षा बोध्या । पथिमथ्यृभुक्षामित्यादौ स्थान्यनुरूपतयानुनासिक एवोच्चारणीये निरनुनासिकोच्चारणात्तद्विवक्षा । एतदर्थमेवासति यत्न इत्युक्तम् ॥**

' उञः ' सू० १०६ व ' ऊँ ' सू० १०७ या दोन सूत्रांपैकीं ' ऊँ ' या सूत्रांत निरनुनासिक ऊकाराचा उच्चार करणें प्राप्त असून देखील, अनुनासिक ऊँकाराचें मुद्दाम विशेष यत्न करून उच्चारण केलें असल्यामुळें, उकाराचे जागीं अनुनासिक ऊँकाराचा आदेश व्हावा अशी विवक्षा आहे असें मानलें पाहिजे. ( वास्तविक निरनुनासिक उकाराचे जागीं ' स्थानेऽन्तरतमः ' सू० ३९ या सूत्रान्वयें स्थानिसदृश–म्हणजे निरनुनासिक–ऊकाराचाच आदेश व्हावयास पाहिजे होता. असें असून देखील ज्याअर्थी पाणिनीनें सू० १०७ मध्यें अनुनासिक ऊँकार मुद्दाम उच्चारला आहे त्या अर्थी हें स्पष्ट होत कीं अशा स्थलीं अनुनासिक ऊँकाराचाच आदेश व्हावा, निरनुनासिक ऊकाराचा आदेश होऊं नये हें सांगण्याचा पाणिनीचा हेतु होता. त्यामुळें अशा ठिकाणीं अनुनासिक ऊँकारानें निरनुनासिक ऊकाराचें ग्रहण करतां येत नाहीं व तसा आदेश उकाराचे जागीं करतां येत नाहीं. ) तसेंच 'पथिमथ्यृभुक्षामात्' सू० ३६५ या सूत्रांत स्थानीला अनुरूप अशा अनुनासिक आकाराचें उच्चारण करणें प्राप्त असून

देखील, विशेष यत्न करून सूत्रांत मुद्दाम निरनुनासिक आकाराचें उच्चारण केलें असल्यामुळें, अशा ठिकाणीं निरनुनासिक गुण विवक्षित आहे असें मानलें पाहिजे. ( पथिन्, मथिन् ऋभुक्षिन् या शब्दांपुढें 'सु' हा विभक्तिप्रत्यय आल्यास त्यांच्या अन्त्यवर्णाचे जागीं 'आ' असा आदेश होतो हा वरील सूत्राचा अर्थ आहे. या सूत्रांत सांगितलेले तीन्ही शब्द नकारान्त आहेत, व नकार अनुनासिक वर्ण असल्यामुळें, त्याचें जागीं होणारा आदेश, 'स्थानेऽन्तरतमः' या सूत्रान्वयें वास्तविक अनुनासिक आकार असला पाहिजे होता. असें असून देखील पाणिनीनें निरनुनासिक आकाराचें सूत्रांत मुद्दाम उच्चारण केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, पाणिनीला निरनुनासिक आकाराचाच वरील शब्दांतील अन्त्य नकाराचे जागीं आदेश होणें इष्ट होतें. म्हणून अशा ठिकाणीं निरनुनासिक आकारानें अनुनासिक आकाराचें ग्रहण करतां येत नाहीं व अनुनासिक आकारादेश करतां येत नाहीं. ) याकरितांच 'असति यत्ने' हे शब्द 'असति यत्ने स्वरूपेणोच्चारितो गुणो न भेदको न विवक्षितः' या पंक्तींत घातले आहेत (व ते शब्द त्या पंक्तींत घातले असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं सूत्रांत विशिष्टस्वर-युक्त शब्द उच्चारला असल्यास तसा स्वर विवक्षित नसतो, व त्या स्वराचा सूत्रांत शब्दोच्चारणपूर्वक निर्देश केला असला तरच तो स्वर विवक्षित आहे असें मानतां येतें. )

**न चैवमस्थ्यादीनां नब्विषयस्येत्याद्युदात्ततयान्त्यादेशस्यानङः स्थान्यनुरूपेऽनुदात्त एवोच्चारणीये उदात्तोच्चारणं विवक्षार्थं भविष्यतीति कथमस्य ज्ञापकत्वमिति वाच्यम् । परमास्थिशद्वादावन्तोदात्त उदात्तगुणकस्यापि स्थानित्वेन विवक्षायां मानभावात् ॥**

'नब्विषयस्यानिसन्तस्य' फिट् सू० २६ या सूत्रान्वयें इसन्त प्रातिपदिकें खेरीज करून इतर सर्व नपुंसकलिंगी प्रातिपदिकांस आद्युदात्तस्वर होत असल्यामुळें व 'अस्थिदधि' या सूत्रांत सांगितलेलीं तीन्ही प्रातिपदिकें नपुंसकलिंगी असल्यामुळें तीं आद्युदात्त आहेत, ( व 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू० ३६५० या सूत्रान्वयें त्यांचा अन्त्यस्वर अनुदात्त आहे ) म्हणून त्या अन्त्यस्वराचे जागीं होणारा 'अनङ्' आदेश स्थानिसादृश्यामुळें—म्हणजे 'स्थानेऽन्तरतमः' या सूत्रान्वयें—अनुदात्त व्हावयास पाहिजे होता; असें असून देखील 'अस्थिदधि' या सूत्रांत 'उदात्तः' हा शब्द उच्चारला असल्यामुळें, 'अनङ्' उदात्त असावा अशी विवक्षा आहे हें सिद्ध होतें. ( आणि अशा रीतीनें 'उदात्तः' हा शब्द चरितार्थ ठरत असल्यामुळें ) तो शब्द प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक मानतां येत नाहीं—असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'परमास्थि' इत्यादि सामासिक शब्द ( 'समासस्य' सू० ३७३४ या सूत्रान्वयें ) अन्तोदात्त होत असल्यामुळें, व अशा ठिकाणीं उदात्त इकाराचे जागीं स्थानिसादृश्यानें उदात्त अनङादेशच पावत असल्यामुळें, 'अस्थिदधि' या सूत्रांत अनङाचें उदात्तत्व

विवक्षित आहे असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ( सूत्रांत निर्दिष्ट असलेला एखादा शब्द एखाद्या परिभाषेचा ज्ञापक तेव्हांच मानतां येतो कीं जेव्हां, ती परिभाषा नसल्यास, तो शब्द व्यर्थ ठरतो व ती परिभाषा मानल्यानेंच त्या शब्दाला सार्थकता येते असें पूर्वी सांगितलेंच आहे. ‘ अस्थिदधि ’ या सूत्रांत उच्चारलेला ‘ उदात्तः ’ हा शब्द असा आहे काय कीं ही परिभाषा मानल्यानेंच तो चरितार्थ ठरतो, नाहींतर व्यर्थ ठरतो? कित्येक वैयाकरण म्हणतात कीं ही परिभाषा नसली तरी तो शब्द इतर रीतीनें चरितार्थ ठरत असल्यामुळें या परिभाषेचा ज्ञापक ठरूं शकत नाहीं, व आपलें म्हणणें सिद्ध करण्याकरितां ते असें सांगतात कीं, ‘ अस्थि, दधि, सक्थि, व अक्षि ’ हीं प्रातिपदिकें नपुंसक असल्यामुळें, ‘ नब्विषयस्य ’ या सूत्रान्वयें आद्युदात्त आहेत व त्यामुळें त्यांचा अन्त्यस्वर इकार हा ‘ अनुदात्तं पदमेकवर्जम् ’ या सूत्रान्वयें अनुदात्त आहे. अशा अनुदात्त इकाराचे जागीं स्थानिसदृश अनुदात्त अनङादेशाची प्राप्ति होते. परंतु उदात्त अनङादेश होणें इष्ट असल्यामुळें, ‘ अस्थिदधि ’ या सूत्रांत पाणिनीला ‘ उदात्तः ’ हा शब्द घालावा लागला, व अशा रीतीनें, ही परिभाषा न मानली तरी, तो शब्द चरितार्थ ठरत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक होऊं शकत नाहीं. यावर ग्रन्थकार असें म्हणतात कीं ‘ अस्थि, दधि, सक्थि, अक्षि ’ हे शब्द नेहमी आद्युदात्त असते तर वरील शंका कदाचित् योग्य ठरली असती, पण ते शब्द नेहमीच उदात्त असतात असें नसून जेव्हां ते समासाचे चरमावयव असतात तेव्हां ते ‘ समासस्य ’ या सूत्रान्वयें अन्तोदात्त होतात—म्हणजे त्यांचा अन्त्य इकार उदात्त होतो—व तशा उदात्त इकाराचे जागीं स्थानिसदृश उदात्तच अनङादेश पावतो. मग पुन्हां त्या सूत्रांत ‘ उदात्तः ’ हा शब्द घालण्याची गरज काय होती? तो शब्द वास्तविक व्यर्थ ठरूं पाहतो. पण सूत्रांत शब्दोच्चारणपूर्वक स्वराचा निर्देश केला नसल्यास स्वर विवक्षित नसतो या अर्थाची प्रकृतपरिभाषा मानल्यासच तो शब्द चरितार्थ ठरतो, व अशा रीतीनें प्रकृतपरिभाषा असल्यामुळेंच तो शब्द चरितार्थ होत असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेचा ज्ञापक ठरतो. )

**चतसर्याद्युदात्तनिपातनं करिष्यते वधादेशे आद्युदात्तनिपातनं करिष्यते पदाद्योऽन्तोदात्ता निपात्यन्ते सहस्य स उदात्तो निपात्यत इत्यादिभाष्यं त्वेकश्रुत्याष्टाध्यायीपाठे क्वचिदुदात्ताद्युच्चारणं विवक्षार्थमित्याशयेन । त्रैस्वर्येण पाठ इति पक्षे तु ज्ञापकपरं भाष्यमिति कैयटादयः ॥**

‘ चतसृ ’ हा शब्द निपातनानें आद्युदात्त करावा, ‘ वध् ’ हा आदेश निपातनानें आद्युदात्त करावा, ‘ पद ’ इत्यादि आदेश निपातनानें अन्तोदात्त करावे, ‘ सह ’ चे ठिकाणीं होणारा ‘ स ’ हा आदेश निपातनानें उदात्त करावा असें जें भाष्यांत त्या त्या ठिकाणीं सांगितलें आहे तें, अष्टाध्यायी स्वररहित पठित आहे असा पक्ष स्वीकारल्यास, तशा ठिकाणीं निपातन करून सांगितलेला तो तो स्वर विवक्षित आहे असें ज्ञापित करण्याच्या हेतूनें भाष्यकारांनीं तसें म्हटलें आहे असें समजावें. पण अष्टा-

ध्यायी स्वरयुक्त पठित आहे असा पक्ष स्वीकारल्यास तें भाष्य प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक समजावें–असें कैयटादिकांचें म्हणणें आहे. ( ( १ ) ' चतेरुरन् ' उणादि सू० ७३६ या सूत्रानें 'चते याचने' या भ्वादिगणांतील ' चत् ' धातूस उणादि ' उरन् ' प्रत्यय होऊन ' चतुर् ' असा शब्द होतो, व तो नित्प्रत्ययान्त असल्यामुळें, ' ञ्नित्यादिर्नित्यम् ' सू० ३६८६ या सूत्रान्वयें आद्युदात्त होतो. अशा शब्दापुढें ' शस् ' हा द्वितीयाविभक्तीच्या बहुवचनाचा प्रत्यय आल्यास 'चतुरः शसि' सू० ३६८२ या सूत्रान्वयें ' चतुर् ' शब्द अन्तोदात्त होतो. स्त्रीवाचक ' चतुर् ' शब्दापुढें विभक्तिप्रत्यय आल्यास, ' त्रिचतुरोः ' सू० २९८ या सूत्रानें ' चतुर् ' चे जागीं ' चतसृ ' असा आदेश होतो. त्यामुळें तो आदेश स्थानिसाम्यानें अन्तोदात्त होतो. 'चतसृ+शस्=चतसृ+अस्' अशा स्थितींत 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश होऊन, 'चतस्र्+अस्=चतस्रः' अशी स्थिति झाली असतां, 'उदात्तयणो हल्पूर्वात्' सू० ३७२० या सूत्रानें उदात्ताच्या जागीं होणाऱ्या हल्पूर्वक यणादेशापुढील शसादि विभक्तिप्रत्यय उदात्त होत असल्यामुळें, ' अस् ' या प्रत्ययांतील अकार उदात्त होऊन ' चतस्रः ' हा शब्द अन्तोदात्त होतो. तसा तो शब्द अन्तोदात्त न व्हावा व ' चतुरः शसि ' या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या स्वराचा बाध व्हावा म्हणून ' चतसर्याद्युदात्तनिपातनं च ' असें वार्तिक ' त्रिचतुरोः' ७–२–९९ या सूत्रावरील भाष्यांत पठित करून भाष्यकार म्हणतात ' चतसर्याद्युदात्तनिपातनं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । चतस्रः पश्य । शसिस्वरो मा भूत् इति'. या भाष्याचा अर्थ वरील विवेचनावरून स्पष्ट होईल (२). ' हन् ' धातु धातुपाठांत अनुदात्त असा पठित आहे व ' अनुदात्ता हलन्तेषु धातवो द्व्यधिकं शतम् ' या कारिकेंत तो धातु संगृहित केला आहे. तो एकाच् असल्यामुळें, त्याच्यापुढें वलादि आर्धधातुक प्रत्यय आल्यास, 'एकाच उपदेशे' सू० २२४६ या सूत्रानें तशा प्रत्ययाला इडागम होत नाहीं. 'हनो वध लिङि' व 'लुङि च' सू० २४३३ व २४३४ या सूत्रांनीं आशीर्लिङांत व लुङांत 'हन्' चे जागीं 'वध्' असा आदेश होतो. तो वधादेश स्थानिसाम्यानें अनुदात्त मानल्यास, त्याच्या पुढें येणाऱ्या वलादि आर्धधातुक प्रत्ययांना इडागम होणार नाहीं व ' आवधिषीष्ट ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. म्हणून ' वधादेशे आद्युदात्तनिपातनं करिष्यते' असें 'स्थानिवदादेशः' १-१-५६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं म्हटलें आहे. त्या भाष्यांत भाष्यकार ' इड्विधिश्च ' असें आक्षेपवार्तिक पठित करून त्याचा अर्थ असा सांगतात कीं ' इड्विधेयः । आवधिषीष्ट एकाच उपदेशऽनुदात्तात् इतीट्प्रतिषेधः प्राप्नोति. ' याचा अर्थ असा कीं ' हन् ' चे जागीं होणारा ' वध् ' हा आदेश स्थानिसाम्यानें अनुदात्त झाल्यास, ' एकाच उपदेशे ' या सूत्रान्वयें त्याला इडागम होणार नाहीं व त्यामुळें ' आवधिषीष्ट ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. असें सांगून पुढें समाधान करतेवेळीं भाष्यकार असें म्हणतात कीं ' नैष दोषः । आद्युदात्तनिपातनं करिष्यते । स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति. ' याचा अर्थ असा कीं वार्तिककारानें वर जो दोष दाख-

विला आहे तो दोष, 'वध्' हा आदेश निपातनानें आद्युदात्त केला म्हणजे, टाळतां येतो व तसा निपातनानें केलेला स्वर, स्थानिसाम्यानें 'वध्' चे जागीं होणाऱ्या अनुदात्तस्वराचा, बाधक होईल, आणि अशा निपातनानें 'वध्' चे अनुदात्तत्व नष्ट होऊन तो उदात्त झाल्यानें, 'एकाच उपदेशे' हें सूत्र त्याला लागू पडणार नाहीं व त्यामुळें त्याला इडागम होऊन लिङाचीं व लुङाचीं इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येणार नाहीं. येथें हें लक्षांत ठेवावें कीं 'हनो वध लिङि' या सूत्रानें 'हन्' चे जागीं 'वध्' असा एकाच् आदेश होतो असें गृहीत करून वरील भाष्य लिहिलें आहे. पण 'हन्' चे जागीं 'वध' असा द्व्यच्क आदेश होतो असें मानलें म्हणजे उदात्त निपातन करण्याची कांहींच गरज राहत नाहीं; कारण 'एकाच उपदेशे' हें इडागमनिषेधकसूत्र एकाच् धातूलाच लागतें, 'वध' अशा द्व्यच्क आदेशाला लागू पडत नाहीं, व त्यामुळें इडागम होऊन इष्ट रूपें अनायासेंच सिद्ध होऊं शकतात. 'हनो वध लिङि' २-४-४२ या सूत्रावरील भाष्यांत 'अथादन्तः। न दोषो भवति' असें 'वध' या आदेशासंबंधानें म्हटलें आहे. (३) 'पाद' हा स्वाङ्गवाचक शब्द असल्यामुळें, 'स्वाङ्गशिटामदन्तानाम्' फिट् सू० २९ या सूत्रान्वयें तो आद्युदात्त आहे. 'पादस्य पदाज्यातिगोपहतेषु' सू० ९९० या सूत्रानें जेव्हां 'पाद' चे जागीं 'पद' असा आदेश होतो तेव्हां तो आदेश स्थानिसाम्यानें आद्युदात्त होतो. तो आद्युदात्त न होतां अन्तोदात्त व्हावा म्हणून 'पादस्य' ६-३-५२ या सूत्रावरील भाष्यांत 'पदादेशेऽन्तोदात्तनिपातनम्' असें वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात 'पदादेशेऽन्तोदात्तनिपातनं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। पदोपहतार्थम्। पादेनोपहतम् पदोपहतम्। तृतीया कर्मणीति पूर्वपदान्तोदात्तत्वं यथा स्यात्।' या भाष्याचा भावार्थ असा आहे कीं 'पाद' चे जागीं होणारा 'पद' हा आदेश आद्युदात्त होत असला तरी तो निपातनानें अन्तोदात्त करावा, व तसें निपातन करण्याचें प्रयोजन हें आहे कीं 'तृतीया कर्मणि' सू० ३७८२ या सूत्रानें, कर्मणि क्तान्त पद पुढें असतां तृतीयान्त पूर्वपदाला जेव्हां प्रकृतिस्वर होतो तेव्हां तो अन्तोदात्त व्हावा, व तो तसा झाल्यानें 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' सू० ३६५९ या सूत्रान्वयें 'पद+उपहतम्=पदोपहतम्' या स्थलीं 'आद्गुणः' सू० ६९ या सूत्रानें होणारा गुणरूपी एकादेश विकल्पेंकरून उदात्त किंवा स्वरित व्हावा. (४) 'सह' हा शब्द 'चादि' या आकृतिगणांत अन्तर्भूत असलेला निपात असल्यामुळें, 'निपाता आद्युदात्ताः' फिट् सू० ८० या सूत्रान्वयें तो आद्युदात्त आहे. 'सहस्य सः संज्ञायाम्' सू० १००९ या सूत्रानें जेव्हां 'सह' चे जागीं 'स' असा आदेश होतो तेव्हां त्याचा स्थानी 'सह' यांतील 'स' मधील अकार उदात्त व 'ह' मधील हकार अनुदात्त असल्यामुळें 'स' हा आदेश स्थानिसाम्यानें स्वरित होतो व तसें झाल्यास, सपुत्रः, सभार्यः इत्यादि बहुव्रीहिसमासांत 'स' यांतील अकार स्वरित होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां भाष्यकारांनीं त्या 'स' चें आद्युदात्त निपातन करावें असें

म्हटलें आहे. ‘ सहस्य सः संज्ञायाम् ’ ६·३·७८ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं ‘ सहस्य हलोपवचनम् ’ असें आक्षेपवार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं पाणिनीनें ‘ सहस्य सः संज्ञायाम् ’ असें सूत्र न करितां ‘ सहस्य हलोपः संज्ञायाम् ’ असें सूत्र केलें पाहिजे होतें व तसें सूत्र केल्यानें स्वरांमध्यें येणारा दोष जो वर दाखविला आहे तो टाळतां आला असता. यावर भाष्यकार म्हणतात कीं असें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं; कारण वार्तिककारानें दाखविलेला दोष सकाराचें आद्युदात्त निपातन केल्यानें टाळतां येतो. ते म्हणतात ‘ स तर्हि लोपो वक्तव्यः । न वक्तव्यः । आद्युदात्तनिपातनं करिष्यते । स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति । ’ भाष्यकारांनीं केलेली या पंक्तींत जीं चार निपातनें सांगितलीं आहेत तीं करण्याचा हेतु काय होता याचें आतांपर्यंत विवेचन केलें. आतां अष्टाध्यायी स्वररहित पठित आहे असा एक पक्ष असून ती स्वरसहित पठित आहे असा दुसरा पक्ष आहे असें ग्रन्थकारानीं सांगितलें आहे, व ते म्हणतात कीं कैयटादिकांचें असें मत आहे कीं अष्टाध्यायी स्वररहित पठित आहे असा पक्ष स्वीकारल्यास, निपातन करून अमुक अमुक प्रकारचे स्वर करावे असें जें ठिकठिकाणीं भाष्यांत म्हटलें आहे तेथें तेथें तसा निपातनानें सांगितलेला स्वर विवक्षित आहे असें समजावें; पण द्वितीय पक्ष स्वीकारल्यास वरील भाष्य प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक समजावें. पण हें कैयटादिकांचें मत ग्रन्थकारास मान्य नाहीं, व ते स्वतःचें मत पुढील पंक्तींत सांगतात. )

**परे तु निपातनं नामान्यादृशे प्रयोगे प्राप्तेऽन्यादृशप्रयोगकरणं तत्तद्रूपायत्नात्तत्र तत्रोदात्तादिविवक्षा । तिसृचतस्रित्यत्र द्वन्द्वप्रयुक्तेऽन्तोदात्ते उच्चारणीये आद्युदात्तोच्चारणमन्यत्र स्थान्यनुरूपे स्वर उच्चारणीये तत्तदुच्चारणं विवक्षार्थम् ॥ सम्पूर्णाष्टाध्याय्याचार्येणैकश्रुत्या पठितेत्यत्र न मानम् । क्वचित्पदस्यैकश्रुत्यापि पाठो यथा दाण्डिनायनादिसूत्रे ऐक्ष्वाकेति । यद्यप्यध्येतार एकश्रुत्यैवाङ्गानि पठन्ति ब्राह्मणवत्तथापि व्याख्यानतोऽनुनासिकत्वादिवदुदात्तनिपातनादिज्ञानमित्याहुः ॥**

( ही पंक्ति ‘ परे तु ’ या शद्बांनीं सुरु केली असल्यामुळें या पंक्तींत जें मत सांगितलें आहे तें ग्रन्थकाराचें मत आहे असें समजावें. ) इतर वैयाकरण असें म्हणतात कीं पाणिनीय सूत्रांन्वयें एक प्रकारचें रूप सिद्ध होत असतां भिन्न प्रकारच्या रूपाचें उच्चारण करणें याला ‘ निपातन ’ म्हणतात. ( जसें ‘ अचतुरविचतुर ’ सू० ९४५ या सूत्रांत पंचवीस अदन्त शद्ब उच्चारले आहेत. पाणिनीय सूत्रें लावल्यास तशीं अदन्त रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत, पण तशींच रूपें असणें इष्ट असल्यामुळें, त्यांचें निपातन करून वरील सूत्रांत उच्चारण केलें आहे. तसेंच ‘दाण्डिनायनहास्तिनायन’ सू० ११४५ या सूत्रांत निर्दिष्ट केलेलीं रूपें पाणिनीयसूत्रांनीं प्रक्रिया केल्यास सिद्ध न होतां भिन्न प्रकारचीं रूपें सिद्ध होतात; पण तशींच रूपें सिद्ध होणें इष्ट असल्यामुळें, निपातन करून तीं रूपें त्या सूत्रांत उच्चारलीं आहेत. आणि पाणिनीयसूत्रांन्वयें किंवा स्थानि-

साम्यामुळें एका विशिष्ट प्रकारच्या स्वराची किंवा अनुनासिकाची किंवा निरनुनासिकाची प्राप्ति होत असतां भिन्न स्वराचा किंवा निरनुनासिकाचा अथवा अनुनासिकाचा उच्चार करून जेथें सूत्रांत निर्देश केला आहे तेथें ) त्या त्या प्रकारचा विशेष प्रयत्न करून उच्चार केला असल्यामुळें उदात्तादि गुणांची विवक्षा आहे असें समजावें ( व त्यामुळें तशा ठिकाणीं भिन्न गुणविशिष्ट शद्बाचें ग्रहण करतां येत नाहीं. ) 'तिसृचतसृ' हा द्वंद्वसमास असल्यामुळें ( ' समासस्य ' या सूत्रान्वयें तो समास ) अन्तोदात्त होत असून देखील ( ' चतसर्याद्युदात्तनिपातनं करिष्यते ' असें म्हणून ) ' चतसृ ' हा शद्ब आद्युदात्त व्हावा असें उच्चारण करणें–म्हणजे यथाप्राप्तस्वर न होतां भिन्नस्वर व्हावा असें सांगणें–व तसेंच स्थानी ज्या स्वरानें युक्त आहे तशा स्वरानें युक्त असा आदेश न उच्चारतां भिन्नस्वरयुक्त आदेशाचें उच्चारण करणें म्हणजे 'हन्, पाद' व 'सह' या स्थानींचा जसा स्वर आहे तसा स्वर स्थानिसाम्यानें त्यांचे जागीं होणाऱ्या ' वध्, पद् ' व 'स' या आदेशांना प्राप्त होत असून देखील त्यांचे ठिकाणीं निपातनानें भिन्न स्वराचें उच्चारण करणें–अशा सर्व स्थलीं जें जें भिन्न स्वराचें उच्चारण केलें जातें तेथें तसाच स्वर विवक्षित आहे हें सांगण्याच्या हेतूनें केलें जातें. संपूर्ण अष्टाध्यायी पाणिनीनें स्वररहित पठित केली आहे असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. हें खरें कीं कोठें कोठें सूत्रांत एखादा शद्ब स्वररहित पठित केला आहे; जसें ' दाण्डिनायन ' सू० ११४५ या सूत्रांत ' ऐक्ष्वाक ' हा शद्ब स्वररहित पठित केला आहे ( पण तसें करण्याचें कारण हें कीं एक प्रकारचा ' ऐक्ष्वाक ' शद्ब आद्युदात्त असून दुसऱ्या प्रकारचा ' ऐक्ष्वाक ' शद्ब अन्तोदात्त आहे, व वरील सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ' ऐक्ष्वाक ' शद्बानें तशा भिन्नस्वरयुक्त दोन्ही प्रकारच्या शद्बांचें ग्रहण व्हावें म्हणून तो शद्ब मुद्दाम स्वररहित उच्चारला आहे. ' जनपदशद्बात् क्षत्रियादञ् ' सू० ११८६ या सूत्रानें ' इक्ष्वाकु ' शद्बास अपत्यार्थें अञ् प्रत्यय होऊन ' ऐक्ष्वाक ' हा शद्ब निपातनानें सिद्ध होतो व हा शद्ब ञित् प्रत्ययान्त असल्यामुळें, ' ञ्नित्यादिर्नित्यम् ' सू० ३६८६ या सूत्रान्वयें तो आद्युदात्त होतो. तसेंच दुसरा ' ऐक्ष्वाक ' शद्ब ' कोपधादण् ' सू० १३५६ या सूत्रानें ' तत्र भवः ' या अर्थामध्यें ' इक्ष्वाकु ' शब्दास अणूप्रत्यय होऊन निपातनानें सिद्ध होतो व ' आद्युदात्तश्च ' सू० ३७०८ या सूत्रान्वयें अणूप्रत्यय आद्युदात्त असल्यामुळें, तो अणूप्रत्ययान्त 'ऐक्ष्वाक' शद्ब अन्तोदात्त होतो, व ' दाण्डिनायन' या सूत्रांत उच्चारलेल्या स्वररहित ' ऐक्ष्वाक ' शद्बानें वरील दोन्हीं प्रकारच्या आद्युदात्त व अन्तोदात्त ' ऐक्ष्वाक ' शब्दांचें ग्रहण होतें. ) जरी वैदिक ग्रन्थांचा पाठ करणारे द्विज जसें ब्राह्मणग्रन्थांचें स्वररहित पठन करतात त्याचप्रमाणें ( ' शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दसां गणः। ज्योतिषामयनं चैव वेदाङ्गानि षडेव तु ॥ ' या श्लोकांत सांगितलेल्या सहाहि ) वेदाङ्गांचें स्वररहित पठन करितात तरी (जरी आतां अष्टाध्यायी स्वरयुक्त लिहिली जात नाहीं व पठित केली जात नाही व कोणता अच् अनुनासिक उच्चारला आहे हें त्या ग्रन्थांत दर्शविलें जात नाही तरी ' प्रतिज्ञानुनासिक्याः पाणि-

पाणिनीयाः ' या न्यायान्वयें ) ज्याप्रमाणें कोणता अच् अनुनासिक उच्चारला आहे याचें भाष्यकारादिकांच्या व्याख्यानावरून ज्ञान होतें त्याचप्रमाणें सूत्रांत कोणता स्वर निपातनानें उच्चारला आहे याचें देखील ज्ञान भाष्यकारादिकांच्या व्याख्यानावरूनच करून घेतलें पाहिजे. ( सारांश अष्टाध्यायिसंबंधानें कैयटानें जे दोन पक्ष सांगितले आहेत ते दोन्ही पक्ष न स्वीकारतां, अष्टाध्यायी स्वरयुक्त पठित आहे हाच पक्ष मानणें योग्य आहे. अष्टाध्यायींत निपातनानें केलेले स्वर देखील पठित होते, पण दुर्दैवानें पाणिनीनें जशी स्वरयुक्त अष्टाध्यायी पठित केली होती तशी अष्टाध्यायी आतां उपलब्ध नसल्यामुळें भाष्यकारादिक जे पाणिनीचे विश्वसनीय व पूज्य अनुयायी आहेत त्यांच्या व्याख्यानाच्या सहायानेंच सूत्रांत कोठें कोणता स्वर निपातनानें पठित केला आहे याचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. महर्षि पाणिनीनें अष्टाध्यायी रचतांना सर्व कांहीं यथास्थित करून ठेविलें होतें, पण कालाच्या सपाट्यांत आतां स्वर लुप्त झाले असल्यामुळें निपातित स्वरांचें ज्ञान भाष्यकारादिकांच्या व्याख्यानाच्या सहायाशिवाय होणें शक्य नाहीं. म्हणून ' व्याख्यानमेव शरणम् ' या न्यायाचें अवलंबन केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय दिसतो. )

**विधेयाणविषये त्वप्रत्यय इति निषेधान्न गुणाभेदकत्वेन सवर्णग्रहणम् । अत एव घटवदित्यादौ मतोर्मस्य नानुनासिको वकारः । अत एव तद्वानासामिति सूत्रनिर्देशः । अन्यथा प्रत्यये भाषायामिति नित्यमनुनासिकः स्यात् ।**

( ' अणुदित् सवर्णस्य चाप्रत्ययः ' सू० १४ या सूत्रांत ) ' अप्रत्ययः ' असा निषेध सांगितला असल्यामुळें, ( व ' प्रत्ययः' या शब्दाचा अर्थ ' विधीयमानः ' किंवा ' भाव्यमानः ' असा असल्यामुळें ) प्रत्ययामध्यें अण्प्रत्याहारांतील वर्ण असल्यास तशा वर्णानें भिन्नगुणविशिष्ट सवर्णाचें ग्रहण करतां येत नाहीं. ( सारांश अशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडत नाहीं व ' भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न ' प. १९ ही परिभाषा लागू पडते). असें आहे म्हणूनच 'घटवत्' इत्यादि स्थलीं 'मतुप्' यांतील मकाराचे जागीं अनुनासिक वकार होत नाहीं. ( ' तदस्यास्ति ' सू० १८९४ या सूत्रानें 'घट' शब्दाहून 'मतुप्' प्रत्यय केला असतां ' घट+मतुप् ' अशा स्थितींत, ' मादुपधायाश्च मतोर्वः ' सू० १८९७ या सूत्रान्वयें ' मतुप् ' प्रत्ययांतील मकाराचे जागीं वकार होतो. मकार अनुनासिक असल्यामुळें त्याचे जागीं स्थानिसाम्यानें अनुनासिक वकाराचा आदेश झाला पाहिजे. परंतु वकार अण्प्रत्याहारांतील वर्णांत अन्तर्भूत असल्यामुळें व तो भाव्यमान—म्हणजे पुढें होणारा—असल्यामुळें, प्रत्ययांतील मकाराचे जागीं अनुनासिक वकार न होतां निरनुनासिक वकार होतो व त्यामुळें ' घटवँत् ' असें अनिष्ट रूप न होतां ' घटवत् ' असें इष्टरूप सिद्ध होतें. आणि ' भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न ' असा नियम असल्यामुळेंच व तशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडत

नसल्यामुळेंच, ' तद्वानासामुपधानो मन्त्रः ' सू० ३४७१ या सूत्रांत ) ' तद्वान् ' असा जो निर्देश केला आहे तो शुद्ध ठरतो. (' तत् ' या शब्दाहून मतुप् प्रत्यय केला असतां ' तत् ' या शब्दाच्या उपधेंत अकार असल्यामुळें, ' मादुपधायाश्च ' या सूत्रानें ' मतुप् ' यांतील मकाराचे जागीं वकार होतो. पण मकार अनुनासिक असल्यामुळें त्याचे जागीं होणारा वकार स्थानिसाम्यानें अनुनासिक होण्याची आपत्ति येते व 'तद्वाँन्' =तन्वान् असें अनिष्ट रूप होऊं पाहतें. पण ज्याअर्थी पाणिनीनें वरील सूत्रांत 'तद्वान्' असा शब्द उच्चारला आहे त्याअर्थी हें स्पष्ट होतें कीं प्रत्ययांत अणूप्रत्याहारांतील वर्ण असल्यास, तशा वर्णानें सवर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. ) असा नियम नसता तर ' प्रत्यये भाषायां नित्यम् ' या वार्तिकान्वयें मागील वर्ण अवश्य अनुनासिक झाला असता. ('प्रत्यये भाषायां नित्यम् '—सू० ११६ वरील वार्तिक—या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं अनुनासिक वर्णानें सुरु होणारा प्रत्यय पुढें आल्यास, त्याच्या लगेच मागें पदान्तीं असणाऱ्या ' यर् ' प्रत्याहारांतील वर्णाचे जागीं नियमेंकरून अनुनासिक वर्ण होतो. ' तत्+वतुप् ' या स्थलीं ' मतुप् ' यांतील मकाराचे जागीं होणारा वकार स्थानिसाम्यानें अनुनासिक होतो असें मानल्यास, ' तत् ' या पदाच्या अन्तीं ' यर् ' प्रत्याहारांत अंतर्भूत असलेला तकार आल्यामुळें व पुढें अनुनासिक वकारानें सुरु होणारा ' वतुप् ' प्रत्यय असल्यामुळें, ' तन्वाँन् ' असें रूप झालें असतें व ' तद्वानासाम् ' या सूत्रांत ' तद्वान् ' असा जो पाणिनीनें निर्देश केला आहे तो चूक ठरला असता. )

**जातिपक्षे तु नास्योपयोग इति बोध्यम् । यू इत्यादौ दीर्घमात्रवृत्ति-जातिनिर्देशान्न क्षतिरित्यन्यत्र विस्तरः ॥ ११८ ॥**

जातिपक्ष स्वीकारल्यास ही परिभाषा असण्याची कांहींच गरज राहत नाहीं. ( पण जातिपक्ष स्वीकारल्यास ' यू स्त्र्याख्यौ नदी ' सू० २६६ या सूत्रांतील दीर्घ ईवर्ण व ऊवर्ण यांनीं ऱ्हस्व इवर्ण व उवर्ण यांचें देखील ग्रहण होईल व त्यामुळें ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त नित्य स्त्रीलिंगी शब्दांना नदीसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येईल–असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण ) ' यू स्त्र्याख्यौ नदी ' या सूत्रांत दीर्घ ईकाराचा व ऊकाराचा निर्देश केला असल्यामुळें, व तशा दीर्घ जातीचीच विवक्षा आहे असा बोध होत असल्यामुळें, दीर्घ ईकार व ऊकाररूप जाति ज्यांचे ठिकाणीं आहे अशाच दीर्घ ईकार व ऊकारांचे ' यू ' शब्दानें ग्रहण होऊं शकतें ( व त्यामुळें ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त नित्य स्त्रीलिंगी शब्दास नदीसंज्ञा प्राप्त होण्याचा प्रसंग येत नाहीं ) आणि कांहीं दोष उद्भवत नाहीं. या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा ११९

**ननु सर्वनामानीत्यत्र णत्वाभावनिपातनेऽपि लोके सणत्वप्रयोगस्य साधुत्वं स्यादत आह—**

'सर्वादीनि सर्वनामानि ' सू० २१३ या सूत्रांतील ' सर्वनामानि ' या शद्बांत जरी निपातनानें णत्व केलें नाहीं तरी लौकिकप्रयोगांत ' सर्वणामानि ' असा णत्वयुक्त प्रयोग केल्यास तसा प्रयोग शुद्ध ठरण्याचा प्रसंग येईल. ( ' सर्वनाम ' हा संज्ञावाचक शद्ब असल्यामुळें, ' पूर्वपदात् संज्ञायाम् अगः ' सू० ८५७ या सूत्रानें 'नाम' यांतील नकाराचें णत्व झालें पाहिजे होतें. तसें णत्व न करितां स्वतंत्र महर्षि पाणिनीनें जरी निपातनानें ' सर्वनाम ' असा शद्ब वरील सूत्रांत उच्चारला आहे तरी भाषेंत ' सर्वणाम ' असा प्रयोग शुद्ध मानण्यास कांहीं हरकत नसावी. कारण ' पूर्वपदात् ' या सूत्रानें तसाच णत्वयुक्त शद्ब सिद्ध होतो. पण तसें होणें इष्ट नाहीं ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## बाधकान्येव निपातनानि ॥ ११९ ॥

" ( सूत्रानें जसा शद्ब सिद्ध होतो तसा तो शद्ब न उच्चारतां ) निपातन करून भिन्न रूपानें तो शब्द उच्चारला असल्यास, तें निपातन ( त्या शब्दापुरतें त्या सूत्राचें नेहमीकरितां ) बाधकच होतें. "

**तत्तत्कार्यं नाप्राप्ते निपातनारम्भात् ।**

एखाद्या सूत्रानें सांगितलेल्या कार्याची अवश्यप्राप्ति असून देखील ज्याअर्थी ( त्या सूत्रान्वयें प्राप्त होणारें कार्य न करितां ) निपातनानें भिन्न स्वरूपाच्या शद्बाचा उच्चार केला जातो त्याअर्थी तें निपातन स्वतःपुरतें त्या सूत्राचें नेहमीकरितां बाधक होतें. ( असा नियम असल्यामुळें, ज्या अर्थी पाणिनीनें ' पूर्वपदात् संज्ञायां अगः ' या सूत्रान्वयें अवश्यप्राप्त होणारें णत्व कार्य न करितां, ' सर्वनाम ' असा शब्द निपातन करून उच्चारला आहे त्याअर्थी तो शब्द स्वतःपुरता वरील सूत्राचा नेहमीकरितां बाधक होतो, आणि त्यामुळें भाषेंत देखील ' सर्वणाम ' असा प्रयोग केल्यास तो वरील निपातनाच्या विरुद्ध असल्यामुळें चूक ठरतो. )

**पुराणप्रोक्तेष्विति निपातितपुराणशब्देन पुरातनशब्दस्य बाधः प्राप्तोऽपि पृषोदरादित्वान्नेति बोध्यम् । पुराणेति पृषोदरादिः पुरातनेति चेत्यन्ये ॥ इयं सर्वादिसूत्रे भाष्ये स्पष्टा ॥ अबाधकान्यपि निपातनानीति तु भाष्यविरुद्धम् ॥ ११९ ॥**

' पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु ' सू० १४८१ या सूत्रांत निपातन करून उच्चारलेल्या 'पुराण ' या शद्बानें ' पुरातन ' या रूपाचा बाध होऊं पाहतो. ( कारण ' सायंचिरम् ' सू० १३९१ या सूत्रांत अव्ययाला ' तुट् ' या आगमासहित ' यु= अन ' असा प्रत्यय होणें सांगितलें आहे. ' पुरा ' हें कालवाचक अव्यय असल्यामुळें त्याला तुडागमसहित ' यु ' प्रत्यय केल्यास–म्हणजे ' तन ' असा प्रत्यय केल्यास–' पुरातन ' असें रूप सिद्ध होतें, ' पुराण ' असें रूप सिद्ध होत नाहीं. असें असून देखील ज्याअर्थी ' पुराणप्रोक्तेषु ' या सूत्रांत पाणिनीनें निपातन करून

' पुराण ' असा शब्द उच्चारला आहे त्याअर्थी ' पुरातन ' हा प्रयोग अशुद्ध ठरण्याचा प्रसंग येतो ) तरी पण ' पुरातन ' हा शब्द ' पृषोदरादि ' आकृतिगणांत अंतर्भूत असल्यामुळें ( व तो तशा रीतीनें शुद्ध ठरत असल्यामुळें,) ' पुराण ' शब्दानें ' पुरातन ' या शब्दाचा बाध होत नाहीं इतरांचें असें म्हणणें आहे कीं ' पुराण' व ' पुरातन ' हे दोन्ही शब्द पृषोदरादि या आकृतिगणांत अंतर्भूत आहेत. ( तसें असल्यास ' पुराणप्रोक्तेषु ' या सूत्रांत उच्चारलेला ' पुराण ' हा शब्द निपातन करून उच्चारला आहे असें मानतां येत नाहीं व तो मूळ शुद्ध रूपानेंच उच्चारला आहे असें मानलें पाहिजे व दोन्ही शब्द पृषोदरादिगणांत अंतर्भूत असल्यामुळें, दोन्हीं रूपें शुद्ध ठरतात.) 'सर्वादीनि सर्वनामानि' १-१-२७ या सूत्रावरील भाष्यांत प्रकृतपरिभाषा पठित केली आहे. (त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात कीं, 'सम्+तत' अशा स्थितींत ' मोऽनुस्वारः ' सू० १२२ या सूत्रानें मकाराचा अनुस्वार होऊन ' संतत ' असें रूप सिद्ध होत असतां. ' अपरस्पराः क्रियासातत्ये ' सू०१०५९ या सूत्रांत पाणिनीनें ' सतत ' असें निपातित रूप करून ' सातत्ये' असा प्रयोग केला असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें ' संतत ' हें रूप शुद्ध मानतां येत नाहीं; पण भाषेंत तसें रूप देखील प्रचलित असल्यामुळें, तें रूप सिद्ध करण्याकरितां यत्न करणें अवश्य आहे, आणि असें म्हणून, भाष्यकार ' समो हिततत्तोर्वा ' असें वार्तिक पठित करतात, व त्या वार्तिकान्वयें ' सम् ' या शब्दापुढें ' हित ' व ' तत ' हे शब्द आले असतां ' सम् ' यांतील मकाराचा विकल्पेंकरून लोप होऊन ' सतत ' व ' संतत ' अशीं पाक्षिक रूपें सिद्ध होतात. ) ' अबाधकान्यपि निपातनानि ' अशी जी परिभाषा कित्येक वैयाकरण पठित करितात ती भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं. (कारण जर तशी परिभाषा असती तर ' संतत ' हा शब्द देखील शुद्ध ठरला असता व तें रूप शुद्ध ठरविण्याकरितां ' समो हिततत्तोर्वा ' असें जें वार्तिक भाष्यकारांनीं मुद्दाम पाठत केलें आहे तें वार्तिक पठित करण्याची कांहींच गरज नव्हती. म्हणून ' बाधकान्येव निपातनानि ' अशीच परिभाषा मानणें योग्य आहे. )

---

## परिभाषा १२०

**ननूखधातोर्द्वित्वे स्वत एव ह्रस्वत्वात्पूर्वमभ्यासह्रस्वत्वाप्रवृत्तौ हलादिःशेषे सवर्णदीर्घे, ह्रस्वापत्तिरत आह—**

( ' उख गतौ ' या भ्वादिगणांतील धातूचें लिटाचें प्रथमपुरुषाच्या द्विवचनाचें रूप करतेवेळीं ' लिटि धातोरनभ्यासस्य ' सू० २१७७ या सूत्रानें ) ' उख् ' धातूचें द्विर्वचन केलें असतां, अभ्यासांतील अच् मूळचा ऱ्हस्व असल्यामुळें, ' ऱ्हस्वः ' सू० २१८० या सूत्राची प्रथम प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. ' हलादिः शेषः ' सू० २१७९

या सूत्रान्वयें 'उख्' या अभ्यासांतील 'ख्' या हलाचा लोप होऊन 'अकः सवर्णे दीर्घः' सू० ८५ या सूत्रानें सवर्णदीर्घ झाल्यावर–म्हणजे 'उख्+उख्=उ+उख्=ऊख्' अशी स्थिति झाल्यावर–( 'अन्तादिवच्च' सू० ७५ या सूत्रान्वयें दीर्घऊकाररूपी एकादेश अभ्यासवर्णाचा अन्त आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'ऱ्हस्वः' हें सूत्र तेव्हांच प्रवृत्त होऊं शकतें व तें सूत्र तेव्हां प्रवृत्त झाल्यास, एकादेश) ऱ्हस्व होण्याची आपत्ति येते. ( व 'ऊखतुः' असें शुद्ध रूप सिद्ध न होतां, 'उखतुः' असें विकृत रूप होण्याचा प्रसंग येतो. तसें न व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः––

## पर्जन्यवल्लक्षणप्रवृत्तिः ॥ १२० ॥

"( सूत्रांत सांगितलेलीं कार्यें करण्याकरितां ) सूत्रें पर्जन्याप्रमाणें प्रवृत्त होतात."

( जेथें पावसाची गरज आहे तेथें पाऊस पडतो व जेथें गरज नाहीं तेथें देखील पाऊस पडतो. जसें एखाद्या मोठ्या सरोवरांत अगाध जल भरलें असल्यामुळें किंवा समुद्रांत अगाध जल असल्यामुळें, तेथें पाऊस पडल्यानें कांहींच फायदा होत नाहीं. तरी पण तेथें देखील पाऊस पडतोच. त्याचप्रमाणें गरज असो किंवा नसो–म्हणजे सूत्रें प्रवृत्त झाल्यानें कांहीं फायदा होवो किंवा न होवो–सूत्रें आपापलीं कार्यें करण्यास प्रवृत्त होतच असतात. )

**एवं च ह्रस्वस्यापि ह्रस्वे कृते लक्ष्ये लक्षणस्येति न्यायेन न पुनर्ह्रस्वः। तदुक्तमिको झलिति सूत्रे भाष्ये। कृतकारि खल्वपि शास्त्रं पर्जन्यवदिति। सिद्धेऽपि ह्रस्वादिकारीत्यर्थः॥**

( 'उख्' धातूचें 'उख्उख्' असें द्विर्वचन केल्यावर व 'हलादिः शेषः' या सूत्रानें अभ्यासांतील खकाराचा लोप झाल्यावर, 'ऱ्हस्वः' हें सूत्र प्रवृत्त होतें व अभ्यासखण्डांतील 'उ' हा अच् जरी मूळचा ऱ्हस्व अच् आहे तरी त्या ) ऱ्हस्व अचाचे ठिकाणीं ऱ्हस्वकार्य होतेंच, व अशा रीतीनें 'ऱ्हस्वः' या सूत्राची एकदां प्रवृत्ति झाल्यावर, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायान्वयें तें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकत नाहीं ( व सवर्णदीर्घकार्य केल्यानंतर 'ऊख्' असें रूप झाल्यावर दीर्घ ऊकाराचा, 'ऱ्हस्वः' या सूत्रानें, ऱ्हस्व करतां येत नाहीं, आणि त्यामुळेंच 'ऊखतुः' हें इष्टरूप सिद्ध होतें. ) 'इको झल्' १-२-९ या सूत्रावरील भाष्यांत 'कृतकारि खल्वपि शास्त्रं पर्जन्यवत्' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे ( व त्याचा अर्थ असा आहे कीं जें पूर्वीं सिद्ध होतें तें देखील कार्य, सूत्र पर्जन्याप्रमाणें निश्चयेंकरून करतें. त्या भाष्यांत 'अकृतकारि खल्वपि शास्त्रमग्निवत्' असें वचन प्रथम पठित करून, नंतर त्याच्या विरुद्ध 'कृतकारि खल्वपि शास्त्रं पर्जन्यवत्' असें वचन पठित केलें आहे. म्हणून 'उख्' या अभ्यासांतील उकार जरी मूळचा ऱ्हस्व अच् आहे व त्याचे ठिकाणीं

ऱ्हस्वत्व करण्यापासून कांहीं फायदा नाहीं तरी ) ऱ्हस्व सिद्ध असून देखील, 'ऱ्हस्वः' हें शास्त्र प्रवृत्त होऊन त्या ऱ्हस्वाचे ठिकाणीं ऱ्हस्वत्व करतें.

**न च लक्ष्ये लक्षणस्य सकृदेव प्रवृत्तिरित्यत्र न मानमिति वाच्यम्। समो वा लोपमेक इति लोपेनैकसकारस्य द्वित्वेन द्विसकारस्य पुनर्द्वित्वेन च त्रिसकारस्य सिद्धौ समः सुटीति सूत्रस्यैव मानत्वात्। सम्प्रसारणाच्च सिचि वृद्धिरित्यादौ भाष्ये स्पष्टमुक्तत्वाच्च।**

' लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः ' हा न्याय मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं– असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ' समो वा लोपमेके ' या भाष्यवचनाप्रमाणें ' सम् ' यांतील मकाराचा लोप करून एक सकारयुक्त, व ( ' अनचि च ' सू० ४८ या सूत्रान्वयें ) द्वित्व केलें असतां द्विसकारयुक्त, आणि पुन्हा त्याच सूत्रानें द्वित्व केलें असतां त्रिसकारयुक्त रूप सिद्ध होत असून देखील, ' समः सुटि ' सू० १३५ हें जें सूत्र केलें आहे तें सूत्र वरील न्यायाचें ज्ञापक आहे. ( ' सम्+कृ+तृच् ' या स्थलीं ' सम्परिभ्यां करोतौ भूषणे ' सू० २५५० या सूत्रानें ' कृ ' धातूस ' सुट् ' होऊन ' सम्+स्कृ+तृच्=सम्+स्कर्ता ' अशी स्थिति झाली असतां, ' समो वा लोपमेके ' या भाष्यवचनानुसार, ' अलोऽन्त्यस्य ' सू० ४२ या सूत्रान्वयें ' सम् ' यांतील मकाराचा लोप होतो. हा लोप रुप्रकरणांत सांगितला असल्यामुळें, या ठिकाणीं ' अत्रानुनासिकः पूर्वस्य तु वा ' सू० १३६ व ' अनुनासिकात्परोऽनुस्वारः ' सू० १३७ हीं दोन्हीं सूत्रें प्रवृत्त होतात–पहा सू० १३८ वरील कौमुदी–व त्यामुळें ' संस्कर्ता ' व सँस्कर्ता ' अशीं एकसकारयुक्त पाक्षिक रूपें सिद्ध होतात. तशीं रूपें सिद्ध झाल्यावर, ' अनचि च ' या सूत्रानें ' संस्स्कर्ता ' व ' सँस्स्कर्ता ' अशीं द्विसकार-युक्त पाक्षिक रूपें सिद्ध होतात, आणि पुन्हा तेंच सूत्र लावलें तर त्रिसकारयुक्त पाक्षि-करूपें सिद्ध होऊं शकतात. मग द्विसकारयुक्त रूपें सिद्ध करण्याकरितां पाणिनीनें 'समः सुटि ' हें सूत्र कां केलें? या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं पाणिनीला हें पूर्णपणें माहित होतें कीं ' अनचि च ' हें सूत्र एकदां लागल्यावर, ' लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायान्वयें तें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकणार नाहीं, आणि पाणिनीला तर एकसकारयुक्त, द्विसकारयुक्त व त्रिसकारयुक्त अशीं तीन प्रकारचीं रूपें सिद्ध करणें इष्ट होतें. म्हणून ' अनचि च ' या सूत्रान्वयें द्विसकारयुक्त रूप सिद्ध केल्यास, तें सूत्र त्रिसकारयुक्त रूप सिद्ध करण्याकरितां प्रवृत्त होऊं शकणार नाहीं हें जाणून, पाणिनीनें द्विसकारयुक्त रूप सिद्ध करण्याकरितां ' समः सुटि ' हें सूत्र मुद्दाम केलें व अशा रीतीनें तें सूत्र ' लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः ' या न्यायाचें ज्ञापक ठरतें. 'समः सुटि' या सूत्रान्वयें 'सम्+स्कर्ता' अशा स्थितींत 'सम्' यांतील मकाराचे जागीं रकार होऊन ' सर्+स्कर्ता ' अशी स्थिति झाली असतां ' खरवसानयोर्वि-सर्जनीयः' सू० ७६ या सूत्रानें रकाराचा विसर्ग होऊन व ' संपुंकानां सो वक्तव्यः'

–सू० १३८ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें विसर्गाचा सकार होऊन व त्याच्या पूर्व-वर्णाचे जागीं विकल्पेंकरून अनुस्वार व अनुनासिक होऊन, 'संस्स्कर्ता' व 'सँस्स्कर्ता' अशीं पाक्षिक रूपें सिद्ध होतात, आणि अशीं रूपें सिद्ध झाल्यावर 'अनचि च' हें सूत्र प्रवृत्त होऊन त्रिसकारयुक्त पाक्षिक रूपें सिद्ध होतात. यावरून हें सिद्ध होतें कीं 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय पाणिनीस मान्य होता. हा न्याय नसता तर 'अनचि च' हें सूत्र पुनः पुनः प्रवृत्त होऊन अनंतसकारयुक्त रूपें सिद्ध होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरितां हा न्याय मानणें भाग आहे.) दुसरें असें कीं 'सम्प्रसारणाच्च' ६–१–१०८ व 'सिचि वृद्धिः' ७–२–१ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत हा न्याय स्पष्टपणें सांगितला आहे. (सारांश हा न्याय, वर सांगितल्याप्रमाणें, पाणिनीस मान्य असल्यामुळें व तसेंच भाष्यकारांनीं तो न्याय अनेक ठिकाणीं सांगितला असल्यामुळें, तो न्याय मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं हें म्हणणें व्यर्थ आहे.)

**अत्र विकारकृतो लक्ष्यभेदो नेति सिचि वृद्धिरिति भाष्यात्प्रतीयत इत्यन्यत्र विस्तरः ॥ १२० ॥**

'सिचि वृद्धिः' या सूत्रावरील भाष्यावरून असें दिसून येतें कीं 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय लावतेवेळीं, विकारामुळें–म्हणजे आदेश झाल्यामुळें किंवा आगम लागल्यामुळें–मूळ शब्दस्वरूपांत फरक झाला असला तरी तशा झालेल्या फरकामुळें मूळ शब्दस्वरूपांत बदल झाला आहे असें समजूं नये (व विकारामुळें मूळ शब्दस्वरूपांत फरक झाला असला तरी तो न्याय प्रवृत्त होतोच, व त्या न्यायान्वयें एखादें सूत्र एकदां प्रवृत्त झाल्यावर, मूळ शब्दस्वरूपांत फरक पडला असला तरी, तें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. 'सिचि वृद्धिः' या सूत्रावरील भाष्यांत वरील न्यायाचें 'उदवोढाम्' हें उदाहरण दिलें आहे. या उदाहरणांत उदपूर्वक 'वह्' या अनिट्क धातूच्या लुङाचें प्रथमपुरुषाचें द्विवचन करतेवेळीं 'उद्+अ+वह्+सिच्+ताम्' अशा स्थितींत, 'वदव्रजहलन्तास्याचः' सू० २२६७ हें वृद्धिविधायक सूत्र, ओत्वकार्यविधायक सूत्राच्या मानानें, परसूत्र असल्यामुळें, प्रथम प्रवृत्त होतें, व त्या सूत्रानें 'वह्' यांतील अकाराची वृद्धि होऊन 'उद्+वाह्+सिच्+ताम्' अशी स्थिति झाल्यावर, आणि 'झलो झलि' सू. २२८१ या सूत्रानें सिचाचा लोप झाल्यावर, 'हो ढः' सू० ३२४ या सूत्रानें 'वाह्' यांतील हकाराचा ढकार होऊन, व नंतर 'झषस्तथोर्धः' सू० २२८० या सूत्रानें 'ताम्' या प्रत्ययांतील तकाराचा धकार होऊन, व 'ष्टुना ष्टुः' सू ११३ या सूत्रानें त्या धकाराचा ढकार होऊन, 'ढो ढे लोपः' सू० २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप होऊन, व नंतर, ढलोप झाला असल्यामुळें, 'सहिवहोरोदवर्णस्य' सू० २३५७ या सूत्रानें 'वा' यांतील आकाराचा ओकार होऊन, 'उदवो+ढाम्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत जरी

सिचाचा लोप पूर्वीं झाला आहे तरी ‘ प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ’ सू० २६२ या सूत्रान्वयें त्या लुप्त सिचाला मानून पुन्हा ‘ वदव्रजहलन्तस्य ’ हें सूत्र प्रवृत्त होऊं पाहतें, व तें सूत्र पुन्हा प्रवृत्त झाल्यास, ‘ वो ’ यांतील ओकारास वृद्धि होऊन ‘ उदवौढाम् ’ असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. पण तें सूत्र पूर्वीं एकदां ‘ वह् ’ यांतील अकाराची वृद्धि करण्याकरितां प्रवृत्त होऊन गेलें असल्यामुळें, जरी ‘ वह् ’ धातूंतील अकाराचें मूळ स्वरूप बदलून त्याचे जागीं ओकार झाला आहे तरी ‘ अत्र विकारकृतो लक्ष्यभेदो न ’ असें पूर्वीं सांगितलें असल्यामुळें, येथें ‘ लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः ’ हा न्याय प्रवृत्त होतो, व तो ‘ वदव्रज ’ या सूत्राची पुन्हा प्रवृत्ति होऊं देत नाहीं, आणि त्यामुळें ‘ उदवौढाम् ’ असें अनिष्ट रूप न होतां, ‘उदवोढाम्’ असें इष्टरूप सिद्ध होतें. या उदाहरणावरून हें स्पष्ट होतें कीं ज्याला कार्य होणें आहे त्या कार्याच्या मूळ स्वरूपांत फरक पडला असला तरी, ‘ लक्ष्ये लक्षणस्य ’ हा न्याय लागू पडतो, व एकदां जें सूत्र प्रवृत्त होऊन गेलें आहे तें अशा ठिकाणीं देखील पुन्हा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. परंतु येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कार्यी भिन्न असल्यास —म्हणजे एखाद्या सूत्रानें ज्याला प्रथम कार्य झालें आहे त्याहून भिन्न कार्याला त्याच सूत्रानें कार्य होणें प्राप्त झालें असल्यास–तशा ठिकाणीं कार्यी भिन्न असल्यामुळें, ‘लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः’ हा न्याय लागू पडत नाहीं व एकदां प्रवृत्त झालेलें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकतें. त्यामुळें जरी ‘ सुधी+उपास्यः ’ या स्थलीं ‘ इको यणचि ’ सू० ४७ या सूत्रानें यणादेश होऊन ‘ सुध्य्+उपास्यः ’ अशा स्थितींत, ‘अनचि च’ सू० ४८ या सूत्रानें एकदां धकारास द्वित्व झाल्यावर पुन्हा, तोच अचानंतरचा धकार कार्यी असल्यामुळें, ‘ अनचि च ’ हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं तरी, ‘षड्+सन्तः’ या स्थलीं ‘ डः सि धुट् ’ सू० १३१ या सूत्रानें सकारास ‘ धुट्=ध् ’ हा आगम होऊन ‘ षड्+धूसन्तः ’ अशी स्थिति झाली असतां, ‘ खरि च ’ सू० १२१ या सूत्रानें धकाराचा प्रथम तकार झाल्यावर ‘षड्+तूसन्तः ’ अशा स्थितींत पुन्हा तेंच सूत्र—म्हणजे ‘ खरि च ’ हें सूत्र–प्रवृत्त होऊन डकाराचा टकार होतो; कारण तें सूत्र प्रथम प्रवृत्त होतेवेळीं धकार हा कार्यी होता व तें सूत्र दुसऱ्यानें प्रवृत्त होतेवेळीं तो धकार कार्यी नसून, डकार हा कार्यी होता. म्हणून अशा ठिकाणीं कार्यी भिन्न असल्यामुळें ‘ लक्ष्ये लक्षणस्य ’ हा न्याय लागू पडत नाहीं, व ‘ खरि च ’ हें सूत्र एकदां प्रवृत्त झालें असून देखील, पुन्हा प्रवृत्त होऊं शकतें. या विषयासंबंधानें अनेक उदाहरणें देतां येतील पण ग्रन्थविस्तारभयास्तव तीं देतां येत नाहींत. ही परिभाषा ‘ पर्जन्यवत् ’–पर्जन्यो यावदूनं पूर्णं च] सर्वमभिवर्षति–या लौकिकन्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें, लौकिकन्यायासिद्ध आहे. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा १२१

ननु स्यन्दूधातोः स्यन्त्स्यतीत्यादौ सकारादिविशेषापेक्षत्वादात्मनेपदनिमित्तत्वाभावनिमित्तत्वाच्च न वृद्भ्यश्चतुर्भ्य इति निषेधस्य बहिरङ्गत्वेनान्तरङ्गत्वादूदिल्लक्षणस्येड्विकल्पस्यापत्तिरत आह—

' स्यन्दू ' धातूचीं ' स्यन्त्स्यति ' इत्यादि रूपें करतेवेळीं, ' न वृद्भ्यश्चतुर्भ्यः ' सू० २३४८ या सूत्रानें सांगितलेल्या ' इट् ' निषेधाला सकारानें सुरू होणाऱ्या विशेष आर्धधातुक प्रत्ययाची व तसेंच आत्मनेपदाच्या अभावाची अपेक्षा असल्यामुळें, तें 'इट् ' निषेध कार्य, ऊदित्त्वामुळें होणाऱ्या इड्विकल्परूपी कार्याच्या मानानें बहिरङ्ग ठरतें, व इड्विकल्परूपी कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, तें कार्य होण्याची आपत्ति येते. (' स्यन्दू प्रस्रवणे ' हा भ्वादिगणांतील धातु ऊदित् असल्यामुळें—म्हणजे त्या धातूंतील ऊकार इत् असल्यामुळें—' स्यन्द् + स्य + ति ' अशा स्थितींत, ' स्यन्द् ' धातूपुढें वलादि आर्धधातुक प्रत्यय असल्यामुळें ' स्वरतिसूति ' या सूत्रान्वयें ' स्य ' या वलादि आर्धधातुक प्रत्ययास विकल्पेंकरून इडागमाची प्राप्ति होते. पण तो धातु वृतादि चार धातूंत अंतर्भूत असल्यामुळें व त्याच्यापुढें सकारानें सुरु होणारा ' स्य ' हा आर्धधातुक प्रत्यय असल्यामुळें आणि त्याच्यापुढें परस्मैपदी प्रत्यय आला असल्यामुळें, ' न वृद्भ्यश्चतुर्भ्यः ' या सूत्रानें इडागमनिषेध पावतो. इडागमनिषेधाची प्रवृत्ति होण्याकरितां सकारानें सुरू होणाऱ्या अशा विशिष्ट आर्धधातुकप्रत्ययाची व तसेंच आत्मनेपदिप्रत्यय पुढें नसणें या दोन निमित्तांची अपेक्षा आहे; पण विकल्पेंकरून इडागम होण्याकरितां ऊदित् धातुपुढें कोणताहि आर्धधातुकप्रत्यय असला तरी चालतें व आत्मनेपदिप्रत्यय पुढें नसणें या निमित्ताची देखील आवश्यकता नाहीं. म्हणून इड्निषेधाच्या मानानें इड्विकल्परूपी कार्य अन्तरङ्ग ठरतें व इड्निषेध बहिरङ्ग ठरतो. त्यामुळें ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' या परिभाषेप्रमाणें इड्निषेधक शास्त्र असिद्ध ठरत असल्यामुळें, विकल्पेंकरून इडागमरूपी अन्तरङ्गकार्य केल्यास, ' स्यन्दिष्यति ' व ' स्यन्त्स्यति ' अशीं पाक्षिक रूपें होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी व ' स्यन्दिष्यति ' असें पाक्षिक रूप न होतां, ' स्यन्त्स्यति ' एवढेंच इडागमरहित रूप व्हावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## निषेधाश्च बलीयांसः ॥ १२१ ॥

" निषेधकसूत्रें बलवत्तर असतात "

अन्तरङ्गादुपजीव्यादपि बलीयांस इत्यर्थः ॥ चतुर्भ्य इति तु स्पष्टार्थमेव । अत एव तत्प्रत्याख्यानं भाष्योक्तं सङ्गच्छते ॥

विधायकसूत्रानें होणारें कार्य अन्तरङ्ग असलें तरी आणि विधायकसूत्र जरी उपजीव्य आहे तरी तशा सूत्रांपेक्षां देखील निषेध सांगणारें सूत्र बलवत्तर ठरतें असा या परिभाषेचा अर्थ आहे. ( अन्तरङ्गकार्यविधायक सूत्र परसूत्रापेक्षां व तसेंच नित्य-सूत्रापेक्षां देखील बलवत्तर असतें असें प. ३८ मध्यें पूर्वीं सांगितलेंच आहे व ज्या-अर्थीं निषेधकसूत्र प्रकृतपरिभाषेप्रमाणें अन्तरङ्गकार्यविधायकसूत्रापेक्षां देखील प्रबल असतें त्याअर्थीं तें पर व नित्यसूत्रापेक्षां प्रबल असतें हें आपोआपच सिद्ध होतें. विधायकसूत्र उपजीव्य असून निषेधकसूत्र उपजीवक आहे; कारण विधायकसूत्र असल्यामुळेंच व तें सूत्र सर्वत्र प्रवृत्त झाल्यास कित्येक अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते म्हणूनच, निषेधसूत्र सांगितलें जातें. सारांश विधायकसूत्र असल्यामुळेंच निषेधक-सूत्र अस्तित्वांत येतें. आणि ' उपजीव्यविरोधस्यायुक्तत्वम् '–म्हणजे ज्याच्यावर आपलें अस्तित्व व जीवन सर्वस्वीं अवलंबून आहे अशा उपजीव्याचा उपजीवकानें विरोध करणें अयोग्य आहे–असा जरी न्याय आहे तरी, निषेधकशास्त्र उपजीवक असून देखील उपजीव्यविधायकशास्त्राचा बाध करतें व त्याला प्रवृत्त होऊं न देतां, स्वतःच प्रवृत्त होतें. अशी ही परिभाषा असल्यामुळें ' न वृद्भ्यः ' हें निषेधकसूत्र बहिरङ्गशास्त्र असून देखील ' स्वरतिसूति ' या अन्तरङ्ग विकल्पविधायकसूत्राचा बाध करतें व इडागम मुळींच होऊं देत नाहीं, आणि त्यामुळें ' स्यन्दिष्यति ' असें पाक्षिक रूप न होतां, ' स्यन्त्स्यति ' असेंच रूप होतें. ) ' न वृद्भ्यश्चतुर्भ्यः ' या सूत्रांत ' चतुर्भ्यः ' या पदाचें ग्रहण अर्थ स्पष्ट व्हावा एवढ्याकरितांच केलें आहे. ( कित्येक वैयाकरण असें म्हणतात कीं ' न वृद्भ्यः ' एवढेंच सूत्र जरी पाणिनीनें केलें असतें तरी, ' स्यन्दू ' धातु वृतादिगणांत पठित असल्यामुळें, त्याला इट्निषेध लागू पडलाच असता, व त्यामुळें त्या सूत्रांत केलेलें ' चतुर्भ्यः ' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. पण पाणि-नीय सूत्रांतील कोणताहि शब्द व्यर्थ आहे असें मानतां येत नाहीं. म्हणून ' चतुर्भ्यः ' हा शब्द वरील सूत्रांत कांहीं तरी विशेष प्रयोजनाकरितां घातला आहे असें मानणें भाग आहे, व तें प्रयोजन हेंच आहे कीं, वैकल्पिक इडागम अन्तरङ्ग असल्यामुळें व इडागम-निषेध बहिरङ्ग असल्यामुळें, अन्तरङ्गशास्त्रानें बहिरङ्गशास्त्राचा बाध होण्याची जी आपत्ति येते ती आपत्ति टळावी. अशा रीतीनें वरील सूत्रांत ' चतुर्भ्यः ' हा शब्द घातला असल्यामुळें, ही परिभाषा न मानतां देखील, ' स्यन्दू ' धातूचीं इष्ट रूपें सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, ही परिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं–यावर ग्रन्थकार असें म्हणतात कीं, वरील सूत्रांत ' चतुर्भ्यः ' हें जें पद घातलें आहे तें केवळ सूत्राचा अर्थ स्पष्ट होण्याकरितां घातलें असून शंकाकारानें सांगितलेल्या विशेष प्रयोजनाकरितां घातलें नाहीं. ) आणि म्हणूनच भाष्यकारांनीं त्या पदाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें योग्य ठरतें ( शंकाकारानें सुचविलेल्या विशेष प्रयोजनाकरितां जर ' न वृद्भ्यः ' या सूत्रांत ' चतुर्भ्यः ' हें पद घातलें असतें तर, भाष्यकारांनीं त्या पदाचें प्रत्याख्यान न करितां, उलट त्या पदाची सार्थकता व आवश्यकता दाखविली असती. सारांश,

भाष्यकारांनीं 'चतुर्भ्यः' या पदाचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, त्या पदाच्या भरवशावर शंकाकारानें जी शंका रचली आहे ती निर्मूल व व्यर्थ ठरते. प्रकृतपरिभाषान्वयें निषेधशास्त्र बहिरङ्ग असून देखील अन्तरङ्गविधायकशास्त्राचा बाध करतें म्हणूनच भाष्यकारांनीं ' चतुर्भ्यः ' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे. )

**अत एव सवर्णसंज्ञादेर्निषेधविषये न विकल्पः। अन्यथा मीमांसकरीत्या विधेरुपजीव्यत्वेन प्राबल्यात्तस्य सर्वथा बाधानुपपत्त्या दुर्वारः स इति मञ्जूषायां विस्तरः।**

ही परिभाषा असल्यामुळेंच, जेथें निषेधसूत्र लागू पडतें तेथें विकल्पेंकरून सवर्णसंज्ञा इत्यादि संज्ञा प्राप्त होऊं शकत नाहींत. प्रकृतपरिभाषा न मानल्यास—म्हणजे निषेधकसूत्र विधायकसूत्राचा बाध करीत नाहीं असें मानल्यास—विधायकशास्त्र उपजीव्य असल्यामुळें प्रबल ठरेल, व निषेधशास्त्र त्याचा बाध करूं शकणार नाहीं, आणि त्यामुळें मीमांसकांच्या तऱ्हेनें विकल्प होण्याची आपत्ति येईल व तो विकल्प टाळतां येणें अशक्य होईल. या विषयाची मञ्जूषाग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे. ( ' तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम् ' सू० १० हें सवर्णसंज्ञाविधायक सूत्र असून ' नाज्झलौ ' सू० ११ हें सवर्णसंज्ञेचा निषेध करणारें सूत्र आहे आणि तें निषेधकसूत्र असल्यामुळेंच, अच् व हल् यांचें उच्चारणस्थान एकच असलें तरी ते सवर्ण होत नाहींत. सर्व श्रुति सारख्याच प्रमाणभूत असल्यामुळें, श्रुतींत परस्पर विरोध मानतां येत नाहीं—म्हणजे ' उदिते जुहोति, अनुदिते जुहोति' व तसेंच 'अतिरात्रे षोडशिनं गृह्णाति, नातिरात्रे षोडशिनं गृह्णाति ' इत्यादि श्रुति जरी परस्पर विरुद्ध दिसतात तरी त्यांच्यांत विरोध मानतां येत नाहीं—व अशा ठिकाणीं विकल्प मानावा असा जो मीमांसान्याय आहे तो न्याय व्याकरणशास्त्रांत लागू केल्यास, ' नाज्झलौ ' हें निषेधसूत्र ' तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम् ' या विधायकसूत्राचें बाधक न ठरतां, केवळ विकल्प सांगणारें सूत्र होईल, व अकार, हकार, व कवर्गांतील वर्ण यांना वैकल्पिक सवर्णसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येईल. सारांश वर सांगितलेला मीमांसान्याय व्याकरणशास्त्रांत लावणें अयोग्य आहे, व निषेधकसूत्र विधायकसूत्राचें बाधक ठरतें हेंच मानणें योग्य आहे. )

**अत एव द्वन्द्वे च विभाषा जसीति चरितार्थम्॥ विध्युन्मूलनाय प्रवृत्तिरस्या बीजम्॥ न लुमता कमेर्णिङित्यनयोर्भाष्ये स्पष्टैषा॥ १२१॥**

निषेधकसूत्र विधायकसूत्राचें बाधक ठरतें असा नियम असल्यामुळेंच, ' द्वन्द्वे च ' सू० २२३ व ' विभाषा जसि ' सू० २२५ हीं सूत्रें चरितार्थ ठरतात. ( ' सर्वादीनि सर्वनामानि ' सू० २१२ हें सर्वनामसंज्ञाविधायक सूत्र असून, सर्वनामसंज्ञेचा निषेध सांगणारीं जीं सूत्रें आहेत त्यांपैकीं ' द्वन्द्वे च ' हें एक सूत्र आहे, व त्या सूत्राचा अर्थ असा आहे कीं द्वन्द्वसमासाच्या अन्तीं सर्वनाम असल्यास तशा सामासिक शब्दास सर्व-

नामसंज्ञा होत नाहीं. या सूत्राच्या लगेच पुढें 'विभाषा जसि' हें सूत्र आहे व तें सूत्र असें सांगतें कीं, सर्वनामान्तद्वन्द्वसमासापुढें 'जस्' प्रत्यय आल्यास तशा सामासिक शब्दास विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होते. निषेधकसूत्रानें विधायकसूत्राचा नेहमीकरितां बाध न होतां, मीमांसकरीत्या केवळ विकल्प होतो असा नियम व्याकरणशास्त्रांत असता तर, 'द्वन्द्वे च' या निषेधकसूत्रानें सर्वनामसंज्ञेचा बाध न होतां, विकल्पेंकरून द्वन्द्वसमासांत सर्वनामसंज्ञा प्राप्त झालीच असती, आणि 'विभाषा जसि' हें सर्वनामसंज्ञेचा विकल्प सांगणारें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. पण तें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, निषेधक सूत्रांनीं विकल्प होत नसून विधायकसूत्राचा बाध होत असतो, व 'जस्' प्रत्यय पुढें असतां सर्वनामसंज्ञेचा बाध न होतां ती संज्ञा विकल्पेंकरून होणें इष्ट असल्यामुळें, पाणिनीस 'विभाषा जसि' हें सूत्र करावें लागलें, आणि अशा रीतीनें 'द्वन्द्वे च' हें सूत्र असून देखील 'विभाषा जसि' हें सूत्र चरितार्थ ठरतें.) विधायकसूत्राचा बाध व्हावा म्हणूनच निषेधकसूत्र केलें जातें व तें सूत्र प्रवृत्त होतें, आणि याच न्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. (कंसाचा नाश करण्याकरितांच श्रीकृष्णाचा अवतार झाला, व श्रीकृष्ण कंसापेक्षां अधिक बलाढ्य असल्यामुळेंच ते कंसाचा नाश करूं शकले. सारांश एखाद्याचा नाश करण्याकरितां ज्याचा अवतार होतो तो ज्याचा नाश करणें आहे त्याच्यापेक्षां अधिक बलवान् असलाच पाहिजे हा लौकिकन्याय आहे, आणि या लौकिकन्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली असल्यामुळें, ती लौकिकन्यायसिद्ध आहे.) 'न लुमताङ्गस्य' १-१-६३ व 'कमेर्णिङ्' ३-१-३० या सूत्रांवरील भाष्यांत या परिभाषेचा उल्लेख केला आहे. ('कमेर्णिङ्' या सूत्रांत उच्चारलेल्या 'णिङ्' ला णकार व ङकार हे दोन अनुबन्ध लावले आहेत. 'अत उपधायाः' सू० २२८२ या सूत्रान्वयें 'कम्' या धातूंतील अकारास वृद्धि व्हावी म्हणून 'णिङ्' ला णकारानुबन्ध लावला आहे, व 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू० २१५७ या सूत्रान्वयें 'कम्' धातूला आत्मनेपदाचे प्रत्यय व्हावे म्हणून 'णिङ्' ला ङकारानुबन्ध लावला आहे. पण भाष्यकार म्हणतात कीं 'क्ङिति च' सू० २२१७ हें गुणवृद्धिनिषेधक सूत्र असल्यामुळें व 'णिङ्' हा प्रत्यय ङित् असल्यामुळें, 'प्रतिषेधबलीयस्त्वात् प्रतिषेधः प्राप्नोति'—म्हणजे निषेधकसूत्र बलवत्तर असल्यामुळें 'क्ङिति च' या निषेधकसूत्रान्वयें 'अत उपधायाः' या वृद्धिविधायक सूत्राचा बाध होणें प्राप्त होतें व वृद्धि होऊं नये. जरी हें भाष्य एकदेशि आहे तरी त्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं निषेधकसूत्र विधिसूत्रापेक्षां बलवत्तर असल्यामुळें त्याचें बाधक होतें. वास्तविक 'क्ङिति च' हें सूत्र इग्लक्षणगुणवृद्धीचें बाधक असल्यामुळें, 'अत उपधायाः' या सूत्रानें अकारास होणाऱ्या वृद्धीचें तें बाधक होऊं शकत नाहीं. 'न लुमताङ्गस्य' या सूत्रावरील भाष्यांत देखील 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' या वार्तिकाचें प्रत्याख्यान करतेवेळीं, 'स्वादिषु असर्वनाम-

स्थाने ' सू० २३० या सूत्रांत ' असर्वनामस्थाने ' असा प्रतिषेध सांगितला असल्यामुळें, ' प्रतिषेधाश्च बलीयांसः इति प्रतिषेधः प्राप्नोति ' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. या भाष्याचें विवेचन न करितां एवढें सांगणें पुरे आहे कीं, या भाष्यावरून देखील हें स्पष्ट होतें कीं निषेधकसूत्रानें विकल्प सांगितला जात नसून, तें सूत्र विधायकसूत्राचा बाध करीत असतें. तसेंच ' सर्वादीनि सर्वनामनि ' १—१—२७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात "अथ कः प्रतिषेधो नाम? अविशेषेण किंचिदुक्त्वा विशेषेण 'न' इत्युच्यते, तत्र व्यक्तमाचार्यस्याभिप्रायो गम्यते–' इदन्न भवति ' इति " )

---

# परिभाषा १२२

नन्वत्यन्तस्वार्थिकानामर्थप्रत्यायकत्वरूपप्रत्ययत्वानुपपत्तिरत आह—

जो प्रत्यय स्वतः कांहीं विशेष अर्थाचा बोधक असतो त्याचेंच ठिकाणीं 'प्रत्यय' ही संज्ञा उपपन्न होत असल्यामुळें, जे प्रत्यय प्रकृतीच्या अर्थाहून अधिक अर्थाचा बोध करीत नाहींत त्यांना ' प्रत्यय ' ही संज्ञा प्राप्त होऊं शकणार नाहीं. ( कारण ' प्रत्याययतीति प्रत्ययः'–म्हणजे जो कांहीं तरी विशेष अर्थाचा बोध करतो–अशी ' प्रत्यय ' शब्दाची व्युत्पत्ति असल्यामुळें, जो स्वतः कोणत्याहि अर्थाचा वाचक नसून केवळ प्रकृतीचा अर्थ सांगतो तशा प्रत्ययाला 'प्रत्यय' ही संज्ञा प्राप्त होऊं नये. 'इञ्, ढक्, ढूक्, फञ् ' इत्यादि प्रत्यय अपत्यार्थाचे वाचक आहेत; व तसेंच इतर प्रत्यय इतर अर्थांचे वाचक आहेत, आणि म्हणून ते प्रत्ययसंज्ञार्ह आहेत; पण ' गुप्तिज्किद्भ्यः सन् ' सू. २३९३,'कर्मेणिङ्' सू. २३१०, 'दिवात्तल्, अवेः कः, यावादिभ्यः कन्, लोहितान्मणौ' सू० २०९५–२०९८ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या प्रत्ययांना कांहींच अर्थ नसून ज्या प्रकृतीहून ते प्रत्यय होतात त्या प्रकृतीच्या अर्थाचाच केवळ अनुवाद करतात. म्हणून त्यांना 'प्रत्यय' संज्ञा होऊं नये. पण तसें होणें इष्ट नाहीं ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## अनिदिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे ॥ १२२ ॥

" ज्या प्रत्ययांचा पाणिनीय सूत्रांत कोणताच अर्थ सांगितला नाहीं ते प्रत्यय जरी प्रकृतीच्याच अर्थाचे बोधक असतात तरी ते प्रत्ययसंज्ञार्ह समजावे. "

यस्यार्थः प्रकृत्या प्रत्याय्यते सोऽपि प्रत्यय इत्यस्याप्यङ्गीकारात्तस्य प्रत्ययत्वमिति न दोषः । स्वार्थे इत्यस्य स्वीयप्रकृत्यर्थे इत्यर्थः ॥ महासंज्ञाबलादर्थाकाङ्क्षायामन्यानुपस्थितिरस्या बीजम् ॥

(ज्याला स्वतःचा कांहीं अर्थ आहे तोच प्रत्ययसंज्ञार्ह आहे असें नसून) ज्याचा अर्थ प्रकृति सांगते तो देखील ( व्याकरणशास्त्रांत ) प्रत्ययसंज्ञार्ह मानला असल्यामुळें, कांहीं दोष उद्भवत नाहीं. ( ' प्रत्याययतीति प्रत्ययः ' एवढीच ' प्रत्यय ' शब्दाची व्युत्पत्ति न मानतां, ' प्रत्याय्यते इति प्रत्ययः ' अशी देखील ' प्रत्यय ' शब्दाची व्युत्पत्ति मानावी. त्यामुळें ज्याचा अर्थ प्रकृतीनें ज्ञापित होतो त्याला देखील प्रत्ययसंज्ञा प्राप्त होऊं शकते. सारांश स्वार्थिकप्रत्यय अर्थरहित नसून प्रकृतीच्या अर्थाचा बोध करणारे असल्यामुळें, ते देखील प्रत्ययसंज्ञार्ह आहेत. ) ' प्रत्यय ' ही महासंज्ञा असल्यामुळें, प्रत्ययाला कांहीं तरी अर्थ असलाच पाहिजे अशी आकांक्षा उत्पन्न होते, आणि स्वार्थिकप्रत्यय होतेवेळीं, प्रकृतीहून भिन्न अशा कोणत्याहि अर्थाची उपस्थिति होत नसल्यामुळें तसे प्रत्यय, त्यांच्या जवळ जी प्रकृति उपस्थित आहे—म्हणजे ज्या प्रकृतीहून ते प्रत्यय होतात—त्या प्रकृतीच्या अर्थाचा ते बोध करतात, या ('उपस्थितं परित्यज्य ' इत्यादि ) न्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे ( व ही युक्तिसिद्ध आहे. ' प्रत्ययः ' ३–१–१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात ' प्रत्यय इति महती संज्ञा क्रियते । संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करणे एतत् प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत प्रत्याययतीति प्रत्ययः । यदि प्रत्याययतीति प्रत्ययोऽविकादीनां प्रत्ययसंज्ञा न प्राप्नोति, नहि ते किंचित् प्रत्याययन्ति । एवं तर्हि प्रत्याय्यते इति प्रत्ययः । एवमपि सनादीनां न प्राप्नोति । एवं तर्ह्युभयसाधनश्चायं कर्तृसाधनः कर्मसाधनश्च ' । )

## सुपि स्थ इत्यादिसूत्रेषु भाष्ये स्पष्टैषा ॥ १२२ ॥

' सुपि स्थः ' ३–२–४ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. ( ' सुपि स्थः ' या सूत्रावरील भाष्यांत ' सुपिस्थो भावे च ' असें वार्तिक पठित करून भाष्यकार त्या वार्तिकाचें प्रयोजन असें सांगतात कीं ' स्था ' धातूहून भावे 'क' प्रत्यय होऊन ' आखूत्थः, श्येनोत्थः, शलभोत्थः' इत्यादि रूपें सिद्ध व्हावीं. 'आतोऽनुपसर्गे कः' सू० २९१५ या सूत्रानें होणारा 'क' प्रत्यय, कर्मणि उपपद असतां, कर्तृवाचक अर्थांत होत असतो. ' आखूत्थः ' इत्यादि वरील उदाहरणांत ' भावे '—ह्मणजे क्रियार्थक–' क ' प्रत्यय झाला आहे व ' उत्थः ' याचा अर्थ ' उत्थानम् ' असा आहे, आणि हीं रूपें ' सुपि स्थः ' सू० २९१६ या सूत्रानें होणाऱ्या कर्तृवाचक कप्रत्ययानें सिद्ध होऊं शकत नाहींत. ह्मणून त्या सूत्रांत 'भावे च' हीं पदें घालावीं असा वार्तिककाराच्या म्हणण्याचा आशय आहे. पण भाष्यकार म्हणतात कीं हें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं; कारण ' सुपि स्थः ' या सूत्राचा ' स्थः ' असा योगविभाग केल्यानें, भावे ' क ' प्रत्यय होऊन वरील रूपें सिद्ध होऊं शकतात. हें खरें कीं भाव ' क ' प्रत्यय केल्यास, तो प्रत्यय स्वतः कांहींच अर्थाचा वाचक न होतां, केवळ क्रियेच्याच अर्थाचा वाचक होईल. पण तसें झालें तरी त्याला प्रत्ययसंज्ञा होऊं

शकणार नाहीं असें नाहीं; कारण प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, त्याला प्रत्ययसंज्ञा होऊं शकते असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें हें लक्षांत ठेवावें कीं प्रकृत परिभाषेंत निर्दिष्ट असलेल्या ‘ प्रत्यय ’ या शद्वानें आदेश व आगम यांचें ग्रहण होत नाहीं, व ते कोणत्याहि अर्थाचे वाचक नसल्यामुळें, त्यांना प्रत्ययसंज्ञा होऊं शकत नाहीं.)

---

# परिभाषा १२३

## योगविभागादिष्टसिद्धिः ॥ १२३ ॥

“ सूत्राचा विभाग करून विभक्त केलेल्या भागानें इष्टरूपांचीच सिद्धि करावी”

**इष्टसिद्धिरेव नत्वनिष्टापादनं कार्यमित्यर्थः । तत्तत्समानविधिकाद्वितीययोगेन विभक्तस्यानित्यत्वज्ञापनमेतद्बीजम् ॥ १२३ ॥**

सूत्राचा विभाग करून जें पृथक् सूत्र तयार केलें जातें त्याचा उपयोग इष्टरूपें सिद्ध करण्यांतच करावा, अनिष्टरूपें करण्यांत करूं नयें असा या परिभाषेचा अर्थ आहे. ( पाणिनीय सूत्रें इष्ट रूपांची सिद्धि करण्याकरितांच रचलीं आहेत व तीं, ‘ अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् । अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥ ’ या सूत्रालक्षणान्वयें, विश्वतोमुख–म्हणजे सर्वत्र लागू पडणारीं व सर्व इष्टरूपांची सिद्धि करणारीं –आहेत असें मानलें पाहिजे. जेथें क्वचित् स्थलीं योगविभाग केल्याशिवाय एखाद्या सूत्रानें कांहीं इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकत नाहींत तशा स्थलीं, योगविभाग करून तीं रूपें सिद्ध करावीं, व असें केल्यानेंच सूत्राचें विश्वतोमुखत्व सिद्ध होत असल्यामुळें, क्वचित् स्थलीं योगविभाग करणें इष्ट आहे. पण योगविभागानें तयार केलेल्या पृथक् सूत्राचा अनिष्ट रूपें सिद्ध करण्याकडे कधींहि उपयोग करूं नये. जसें—‘ समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्’ सू० ३३३२ या सूत्रांत ‘क्त्वा’ या आकारान्त शद्वाचें ‘क्त्वः’ असें षष्ठीच्या एकवचनाचें रूप निर्दिष्ट केलें आहे. पण ‘क्त्वा’ हा शद्व आकारान्त धात्वन्त शद्व नसल्यामुळें, त्याला ‘आतो धातोः’ सू० २४० हें सूत्र लागू शकत नाहीं. म्हणून त्या सूत्राचा ‘ आतः ’ असा विभाग करावा व ‘ आतः ’ असें पृथक् सूत्र केल्यानें, त्या सूत्राचा ‘ आकारान्तस्य भसंज्ञकस्य अङ्गस्य लोपो भवति ’ असा अर्थ होत असल्यामुळें, ‘क्त्वः’ हें षष्ठीचें रूप सिद्ध होतें, व असें रूप सिद्ध करण्याकरितांच त्या पृथक् सूत्राचा उपयोग करावा, ‘ हाहा ’ या गंधर्वविशेषवाचक आकारान्त शद्वाचे ठिकाणीं त्याचा उपयोग करूं नये; कारण तसें केल्यास, त्या शद्वाच्या षष्ठीच्या एकवचनाचें, ‘ हाहाः ’ असें इष्ट रूप न होतां, ‘ हाहः ’ असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल आणि म्हणूनच ‘ इष्टसिद्धिरेव, नत्वनिष्टापादनं कार्यम् ’ असें ग्रन्थकारानें म्हटलें आहे.)

ज्या सूत्राचा विभाग केला जातो त्या सूत्रांत जें विधेय असतें तेंच, योगविभाग करून तयार केलेल्या पृथक् सूत्रांत, विधेय राहत असल्यामुळें, तसें तयार केलेलें पृथक् सूत्र अनित्य आहे असें ज्ञापित होतें, व याच्याच आधारावर प्रकृतपरिभाषा रचली आहे. ( व ही युक्तिसिद्ध आहे. योगविभाग करून तयार केलेलें पृथक् सूत्र केवळ इष्ट रूपां-चीच सिद्धि करण्याकरितां केलें जात असल्यामुळें, व तें सूत्र सर्वत्र लावल्यास अनि-ष्टरूपें देखील होण्याची आपत्ति येत असल्यामुळें, तें सूत्र अनित्य असतें हें उघड आहे आणि म्हणूनच तशा सूत्राचा इष्टरूपें सिद्ध करण्यांतच उपयोग करावा, व तें अनित्य मानून त्याचा अनिष्टरूपें तयार करण्यांत उपयोग करूं नये. )

---

## परिभाषा १२४

### पर्यायशब्दानां लाघवगौरवचर्चा नाद्रियते ॥ १२४ ॥

" सूत्रांत पर्यायवाचक शद्बांचा उपयोग करतेवेळीं, एक शद्ब मोठा व दुसरा शद्ब लहान आहे याकडे लक्ष दिलें जात नसतें. "

**तत्र तत्रान्यतरस्यां विभाषा वेति सूत्रनिर्देशज्ञापितामिदम् ॥ १२४ ॥**

कोठें कोठें सूत्रांत पाणिनीनें ' अन्यतरस्याम् ' हा शद्ब घातला आहे, कोठें कोठें ' विभाषा ' हा शद्ब वापरला आहे, व कोठें कोठें ' वा ' हा शद्ब उपयोगांत आणला आहे. यावरूनच ही परिभाषा ज्ञापित होते. ( व ती ज्ञापकसिद्ध सम-जावी. ' अन्यतरस्याम्, ' ' विभाषा,' व ' वा' हे तीन्ही पर्यायवाचक—म्हणजे एकाच अर्थाचे वाचक—शद्ब आहेत. त्यांपैकीं ' वा ' हा शद्ब सर्वांत लहान आहे. सूत्रांत सर्वांत लहान पर्यायवाचक शद्ब घालावा असा जर नियम असता तर, पाणिनीनें सर्व विकल्पविधायकसूत्रांत ' वा ' हाच शद्ब घातला असता, व ' विभाषा, अन्यतर-स्याम् ' असे मोठे शद्ब उपयोगांत आणले नसते. यावरूनच हें सिद्ध होतें कीं सूत्रांत पर्यायवाचक शद्बांचा उपयोग करतेवेळीं लहान मोठा याकडे लक्ष न देतां वाटेल तो पर्यायवाचक शद्ब उपयोगांत आणला जातो, आणि त्यामुळें ही परिभाषा प० १३३ चा अपवाद आहे असें समजावें. )

---

## परिभाषा १२५

### ज्ञापकसिद्धं न सर्वत्र ॥ १२५ ॥

" ज्ञापकानें ( व तसेंच लौकिकन्यायानें किंवा युक्तीनें ) ज्ञापित होणारी परिभाषा सर्वत्र लागू पडत नाहीं. "

स्पष्टमेव पठितव्येऽनुमानाद्बोधनमसार्वत्रिकत्वार्थमित्यर्थः । तेन ज्ञापकसिद्धपरिभाषयानिष्टं नापादनीयमिति तात्पर्यम् । भाष्येऽपि ध्वनितमेतन्ङ्याप्सूत्रादौ ॥ ज्ञापकेति न्यायस्यप्युपलक्षणम् ॥ न्यायज्ञापकसिद्धानामपि केषाञ्चित्कथनमन्येषामनित्यत्वबोधनायेति भावः। यथा तत्स्थानापन्ने तद्धर्मलाभ इति न्यायसिद्धं स्थानिवत्सूत्रं, ज्ञापकसिद्धं च तत्रानल्विधाविति ॥ १२९ ॥

( ज्याप्रमाणें अष्टाध्यायींत कित्येक परिभाषा—म्हणजे ' तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य, तस्मादित्युत्तरस्य ' इत्यादि—साक्षात् पठित केल्या आहेत त्याचप्रमाणें प्रकृत ग्रन्थांत सांगितलेल्या ज्ञापकसिद्ध परिभाषा अष्टाध्यायींत ) साक्षात् पठित करावयास पाहिजे असून देखील, ( त्या साक्षात् पठित न करितां सूत्रांत ज्ञापक शब्द उच्चारून ) त्यांचा अनुमानानें बोध करून देण्यांत—म्हणजे त्यांना ज्ञापित करून देण्यांत— ( सूत्रकाराचा ) हेतु हाच होता कीं ज्या परिभाषा अष्टाध्यायींत साक्षात् पठित केल्या नाहींत त्या सर्वत्र लागू पडणाऱ्या परिभाषा नव्हत हें समजावें. आणि ज्ञापकसिद्ध परिभाषा सर्व उदाहरणांना लागू पडणाऱ्या परिभाषा नसल्यामुळें, जेथें त्या उपयोगांत आणल्या असतां इष्ट रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत तेथें त्या उपयोगांत आणूं नयेत असें या परिभाषेचें तात्पर्य आहे. ( सारांश जेथें ज्ञापकसिद्ध परिभाषा उपयोगांत आणल्यास इष्टरूपांची सिद्धि होऊं शकत असेल तेथेंच त्यांचा उपयोग करावा. जेथें त्या लावल्यानें अनिष्ट रूपें सिद्ध होत असतील तेथें, त्या अनित्य मानून, त्यांचा उपयोग करूं नये; कारण परिभाषा करण्याचा मुख्य हेतु हाच आहे कीं त्यांच्या योगानें इष्टरूपांची सिद्धि व्हावी. ) ' ङ्याप् प्रातिपदिकात् ' ४-१-१ या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे. ( त्या भाष्यांत ' प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम् ' ही परिभाषा पठित करून ती असण्याची अनेक प्रयोजनें दाखविलीं आहेत, व ती मानल्यास कोणकोणते दोष उत्पन्न होण्याचा संभव आहे हें देखील विस्तारपूर्वक सांगून भाष्यकार म्हणतात कीं, एखादी परिभाषा मानल्यानें कांहीं स्थलीं दोष उत्पन्न होण्याचा संभव असेल तरी अशी परिभाषा न करणें हें योग्य नव्हें. ज्या परिभाषेचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं होत असून क्वचित् स्थलीं होत नसेल तशी परिभाषा मानण्यांत कांहीं हरकत नाहीं असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. भाष्यकार म्हणतात ' न हि दोषाःसन्तीति परिभाषा न कर्तव्या लक्षणं वा न प्रणेयम् । न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यः नाधिश्रीयन्ते । न च मृगाः सन्तीति यवा नोप्यन्ते तस्माद्यान्येतस्याः परिभाषाया प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या । प्रतिविधेयं च दोषेषु ।'' हेंच प्राकृत भाषेंत सांगणें असल्यास असें म्हणतां येईल कीं, घर बांधल्यानें घरांत घुशी बिळें करतील या भीतीनें लोक घरें बांधत नाहींत असें नाहीं व ते घरें बांधतातच व घुशींचा उपद्रव न व्हावा म्हणून अवश्य उपाय योजितात. या पंक्तींत ज्ञापकसिद्ध परिभाषा अनित्य अस-

तात असें सांगितलें असल्यामुळें, लौकिकन्यायसिद्ध व युक्तिसिद्ध परिभाषा नित्य असतात असा ग्रह होण्याचा संभव आहे. तसा ग्रह न व्हावा म्हणून ग्रन्थकार म्हणतात कीं ) प्रकृतपरिभाषेंत जो 'ज्ञापक' शब्द उच्चारला आहे तो न्यायाचें देखील उपलक्षण आहे–म्हणजे 'ज्ञापक' शब्दानें केवळ ज्ञापकसिद्ध परिभाषांचें ग्रहण न करितां, लौकिकन्यायसिद्ध व युक्तिसिद्ध परिभाषांचें देखील ग्रहण करावें व तशा परिभाषा देखील ज्ञापकसिद्ध परिभाषेसारख्याच सर्वत्र लागू पडणाऱ्या नसून अनित्य आहेत असें समजावें. अष्टाध्यायींत कांहीं न्यायसिद्ध व ज्ञापकसिद्ध परिभाषा साक्षात् पठित केल्या असून, इतर न्यायसिद्ध व ज्ञापकसिद्ध परिभाषा पठित केल्या नाहींत; याचें कारण हेंच कीं तशा पठित न केलेल्या परिभाषा अनित्य आहेत हें ज्ञापित व्हावें. ( कांहीं ज्ञापकसिद्ध व न्यायसिद्ध परिभाषा अष्टाध्यायींत साक्षात् पठित केल्या आहेत असें जें ग्रन्थकारानें वर म्हटलें आहे त्याच्या पुष्टिकरणार्थ ते अष्टाध्यायींत साक्षात् पठित असलेल्या एका परिभाषेचें उदाहरण देतात.) उदाहरणार्थ, 'तत्स्थानापन्ने तद्धर्मलाभः'– म्हणजे जो ज्याच्या जागीं होतो त्याला, ज्याच्या जागीं तो स्थानापन्न होतो त्याचे, धर्म प्राप्त होतात–( जसें राजा मेल्यावर त्याचा पुत्र जेव्हां राज्यारूढ होतो तेव्हां राजाचे सव धर्म त्याला प्राप्त होतात ) या लौकिकन्यायानेंच 'स्थानिवदादेशः' सू० ४९ ही परिभाषा सिद्ध होते, व त्या परिभाषेचा 'अनल्विधौ' हा अंश ज्ञापकसिद्ध आहे. ( 'अदो जग्धिर्ल्यप्ति किति' सू० ३०८० या सूत्रांत केलेलें 'ल्यप्' ग्रहण 'अनल्विधौ' या अंशाचें ज्ञापक आहे. 'अदो जग्धिः ति किति' एवढेंच सूत्र जरी केलें असतें तरी त्याचा अर्थ असा झाला असता कीं, 'अद्' धातुपुढें तकारानें सुरू होणारा कित्प्रत्यय आल्यास, 'अद्' चे जागीं 'जग्ध्' असा आदेश करावा; आणि 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू० ३३३२ या सूत्रान्वयें 'क्त्वा' चे जागीं ल्यबादेश झाल्यावर, 'स्थानिवदादेश :' या सूत्रान्वयें 'क्त्वा' चे धर्म 'ल्यप्' ला प्राप्त झालेच असते, व त्यामुळें 'अद्' धातुपुढें ल्यप् प्रत्यय आला असतां, 'अद्' चे जागीं 'जग्ध्' असा आदेश होऊं शकलाच असता. असें असून देखील 'अदो जग्धिः' या सूत्रांत पाणिनीनें ल्यपाचें ग्रहण कां केलें ? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं, तकारादित्व हा धर्म तकार या वर्णाचे ठिकाणीं असणारा धर्म आहे, व वर्णाश्रयनिमित्तक—म्हणजे वर्णाचे ठिकाणीं असणारा धर्म—'अनल्विधौ' या सूत्रान्वयें आदेशास प्राप्त होऊं शकत नसल्यामुळें, जरी 'क्त्वा' चे जागीं होणाऱ्या ल्यबादेशास 'क्त्वा' चे ठिकाणीं असणारा कित्व धर्म प्राप्त होतो तरी, वर्णाचे ठिकाणीं असणारा तादित्वरूपी धर्म त्याला प्राप्त होऊं शकत नाहीं, व त्यामुळें ल्यप् 'तादि' मानतां येत नाहीं. म्हणून 'अद्' धातुपुढें 'ल्यप्' आल्यास तो 'तादि' मानतां येत नसल्यामुळें, 'अद्' चे जागीं 'जग्ध्' असा आदेश होऊं शकणार नाहीं. पण तसा आदेश होणें इष्ट असल्यामुळें, पाणिनीला 'अदो जग्धिः' या सूत्रांत 'ल्यप्' ग्रहण करावें लागलें, आणि अशा रीतीनें तें 'ल्यप्' ग्रहण 'अनल्विधौ'

या अंशाचें ज्ञापक ठरतें. 'स्पष्टमेव पठितव्येऽनुमानाद्बोधनमसार्वत्रिकार्थम्' या न्यायान्वयें प्रकृतपरिभाषा सिद्ध होत असल्यामुळें, ती युक्तिसिद्ध समजावी, व असा न्याय असल्यामुळेंच, 'अपपरिबहिरञ्चवः पञ्चम्या' सू० ६६६ या सूत्रानें जरी असें ज्ञापित होतें कीं 'बहिः' या शब्दाच्या योगानें पञ्चमी होते तरी, 'ज्ञापकसिद्धन्न सर्वत्र' असा न्याय असल्यामुळें, 'करस्य बहिः' इत्यादि प्रयोग शुद्ध ठरतात. )

---

# परिभाषा १२६

**ननु द्रोग्धा द्रोग्धा द्रोढा द्रोढेत्यादौ घत्वादीनामसिद्धत्वात्पूर्वं द्वित्वे एकत्रघत्वमपरत्र ढत्वमित्यस्याप्यापत्तिरत आह—**

'घत्व, ढत्व इत्यादि कार्यं असिद्ध असल्यामुळें, 'द्रोग्धा द्रोग्धा द्रोढा द्रोढा' इत्यादि उदाहरणांत प्रथम द्विर्वचन केल्यास, दोन पैकीं एका स्थलीं घत्व व दुसऱ्या स्थलीं ढत्व होण्याची आपत्ति येईल. (पदाद्विरुक्तप्रकरण अष्टाध्यायीच्या आठव्या अध्यायाच्या प्रथम पादांत—म्हणजे सिद्धकाण्डांत—सांगितलें आहे. घत्व व ढत्व होणें हीं कार्यें त्रिपादींत सांगितलीं आहेत. 'पूर्वत्रासिद्धम्' सू० १२ या सूत्रान्वयें, सिद्धकाण्डाच्या–म्हणजे सपादसप्ताध्यायीच्या–दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत असल्यामुळें, 'द्रुह्' धातूस 'ण्वुल् तृचौ' सू० २८९५ या सूत्रानें तृच् प्रत्यय लावून 'द्रुह्+तृच्' अशा स्थितींत, त्रिपादींत सांगितलेलें घत्व व ढत्व कार्य प्रथम न करितां, 'नित्यवीप्सयोः' सू० २१४० या सापादिक सूत्रान्वयें द्विर्वचनकार्य प्रथम केल्यास, 'द्रुह्+तृच्, द्रुह्+तृच्' अशी स्थिति झाल्यावर, 'पुगन्तलघूपधस्य च' सू० २१८९ या सूत्रानें उपधेंतील उकाराचा गुण होऊन 'द्रोह्+तृच् द्रोह्+तृच्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'वा द्रुहमुह' सू० ३२७ या त्रिपादींतील सूत्राची प्राप्ति होते या सूत्रानें 'द्रुह्' यांतील हकारास विकल्पेंकरून घत्व होणें सांगितलें असल्यामुळें, जेव्हां घत्व करणें नसेल तेव्हां 'हो ढः' सू० २२४ या सूत्रानें हकारास ढत्व होतें. हें घत्वढत्वकार्य वैकल्पिक असल्यामुळें, 'द्रोह्+तृच् द्रोह्+तृच्= द्रोह्+ता, द्रोह्+ता' या उदाहरणांतील प्रथम भागांतील हकाराचे जागीं घकार व द्वितीय भागांतील हकाराचे जागीं ढकार केल्यास, 'द्रोघ्+ता, द्रोढ्+ता' अशी स्थिति होऊन व 'झषस्तथोर्धोऽधः' सू० २२८० या सूत्रानें 'ता' यांतील तकाराचा धकार होऊन 'द्रोघ्+धा, द्रोढ्+धा' अशी स्थिति झाली असतां, प्रथमभागाचे, 'झलां जश् झशि' सू० ५२ या सूत्रानें घकाराचा गकार होऊन 'द्रोग्धा' असें रूप होईल, व द्वितीय भागाचें 'ष्टुना ष्टुः' सू० ११३ या सूत्रानें 'धा' यांतील धकाराचा ढकार होऊन व 'ढो ढे लोपः' सू० २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप होऊन 'द्रोढा' असें रूप होईल, व द्विर्वच-

नाचा ' द्रोग्धा द्रोग्धा ' किंवा ' द्रोढा द्रोढा ' असा इष्ट प्रयोग सिद्ध न होतां, ' द्रोग्धा द्रोढा ' किंवा ढत्व प्रथम भागांत व घत्व द्वितीय भागांत केल्यास ' द्रोढा द्रोग्धा ' असा अनिष्ट प्रयोग होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टळावी ) म्हणून ही परिभाषा सांगतात :—

## पूर्वत्रासिद्धीयमद्वित्वे ॥ १२६ ॥

" द्वित्वभिन्न कार्य पूर्वसूत्रानें करतेवेळीं, ' पूर्वत्रासिद्धम् ' हें सूत्र लागू पडतें."

**द्वित्वभिन्ने पूर्वत्र कर्तव्ये परमसिद्धमित्यर्थः ।**

पूर्वसूत्रान्वयें द्वित्वभिन्न कार्य करतेवेळीं त्रिपादींतील परसूत्रें असिद्ध ठरतात असा या परिभाषेचा अर्थ आहे. ( या परिभाषेंतील ' अद्वित्वे ' या पदांत असलेल्या ' द्वित्व ' या शद्वानें, षष्ठाध्यायाच्या प्रथम पादांत पठित असलेल्या ' लिटि धातोरनभ्यासस्य, सन्यङोः, चङि ' इत्यादि सूत्रांनीं सांगितलेल्या द्विर्वचनाचें, व तसेंच अष्टमाध्यायाच्या प्रथम पादांतील ' सर्वस्य द्वे ' या अधिकारांत पठित असलेल्या सूत्रांनीं होणाऱ्या पदद्विर्वचनाचें, आणि त्याचप्रमाणें अष्टमाध्यायांतील चतुर्थ पादांत सांगितलेल्या वर्णद्वित्वाचें, ग्रहण होतें. द्वित्वकार्य करणें असल्यास, 'पूर्वत्रासिद्धम् ' हें सूत्र लागू पडत नाहीं असा प्रकृतपरिभाषेचा अर्थ करूं नये. तसा अर्थ केल्यास, ' दिव्+भ्याम् ' या स्थलीं 'अनचि च ' सू० ४८ या त्रैपादिक सूत्रानें द्वित्व करतेवेळीं, तें सूत्र ' दिव उत् ' सू० ३३७ या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरणार नाहीं, व द्वित्वकार्य प्रथम होऊन ' दिव्व्+भ्याम् ' अशी स्थिति झाल्यावर ' दिव उत् ' हें सूत्र प्रवृत्त केल्यास, अन्त्य वकाराचे जागीं उकार होऊन पूर्व वकार जसाचा तसाच कायम राहील व विकृत रूप होण्याची आपत्ति येईल· म्हणून प्रकृत परिभाषेचा असा अर्थ समजावा कीं, द्वित्वरूपी कार्य करणें झाल्यास—मग तें कार्य सापादिक सूत्रान्वयें होणारें असो किंवा त्रैपादिक सूत्रान्वयें होणारें असो—त्या द्वित्वकार्यविधायक सूत्राच्या दृष्टीनें त्रैपादिक परसूत्रें असिद्ध ठरत नाहींत. पण द्वित्वभिन्न कार्य सांगणाऱ्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें द्वित्वकार्य सांगणारें त्रैपादिक सूत्र असिद्ध ठरतेंच, आणि तसेंच द्वित्वभिन्नकार्य सांगणाऱ्या त्रैपादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें द्वित्वकार्य सांगणारें त्रैपादिक परसूत्र देखील असिद्ध ठरतें. प्रकृतपरिभाषेचा असा तात्पर्यार्थ असल्यामुळें, ' दिव्+भ्याम्' या स्थलीं 'दिव उत् ' व ' अनचि च' हीं दोन सूत्रें युगपत् प्राप्त झालीं असतां, 'दिव उत् ' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें ' अनचि च ' हें द्वित्वकार्य सांगणारें त्रैपादिक सूत्र ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें, असिद्ध ठरत असल्यामुळें, द्वित्वकार्य प्रथम न होतां उत्वकार्य प्रथम होतें, व त्यामुळें ' द्युभ्याम् ' असें इष्टरूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. त्याचप्रमाणें ' वाच्+सु ' या स्थलीं ' हल्ङ्याब्भ्यः ' सू० २५२ या सूत्रानें सुलोप होऊन व ' चोः कुः ' सू० ३७८ या सूत्रानें कुत्व होऊन ' वाक् ' अशी स्थिति झाली असतां, ' झलां जशोऽन्ते ' सू० ८४ व ' अनचि च' सू० ४८ या दोन त्रैपादिक सूत्रांची युगपत् प्राप्ति होते. या दोन सूत्रांपैकीं ' झलां जशोऽन्ते ' हें 'अन-

चि च ' या सूत्राच्या मानानें, पूर्वसूत्र असल्यामुळें, ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें, प्रथम प्रवृत्त होतें, व ' अनचि च ' हें द्वित्वकार्य सांगणारें सूत्र असून देखील त्याची प्रथम प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. 'झलां जशोऽन्ते ' हें सूत्र प्रथम प्रवृत्त होऊन 'वाग्' अशी स्थिति झाली असतां, ' अनचि च ' हें सूत्र नंतर प्रवृत्त होऊं शकतें. पण या द्वित्व-कार्यसंपादक सूत्राच्या दृष्टीनें, या सूत्रानंतर पठित असलेलीं सूत्रें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें असिद्ध ठरत नसल्यामुळें, ' वाऽवसानें ' सू० २०६ हें उत्तरसूत्र प्रथम प्रवृत्त होऊन 'वाक्' व ' वाग् ' अशी स्थिति झाल्यावर, ' अनचि च' हें सूत्र प्रवृत्त होऊन ' वाक्क् ' व ' वाग्ग् ' अशीं इष्टरूपें सिद्ध होतात. सारांश द्वित्वकार्य करणें झाल्यास–मग तें सापा-दिकसूत्रानें होणारें द्वित्वकार्य असो किंवा त्रैपादिकसूत्रानें होणारें द्वित्वकार्य असो— द्वित्वकार्यसंपादक सूत्राच्या पलीकडे असणारीं त्रैपादिकसूत्रें, त्या द्वित्वकार्यसंपादक सूत्राच्या दृष्टीनें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, असिद्ध ठरत नाहींत; पण ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें द्वित्वकार्यसंपादक त्रैपादिकसूत्र, त्याच्या पूर्वी पठित असलेल्या सूत्रांच्या दृष्टीनें, असिद्ध ठरतेंच असा या परिभाषेचा तात्पर्यार्थ आहे. ही परिभाषा असल्यामुळें, ' द्रुह्+तृच् ' या स्थलीं, ' नित्यवीप्सयोः ' सू० २१४० या सापादिकसूत्रानें द्वित्वकार्य करण्याचा प्रसंग आला असतां, घत्व व ढत्वकार्य सांगणारीं त्रैपादिक सूत्रें असिद्ध ठरत नाहींत. म्हणून तीं परसूत्रें असल्यामुळें प्रथम प्रवृत्त होतात, आणि ' द्रोग्धा ' व 'द्रोढा' अशीं वैकल्पिक रूपें सिद्ध झाल्यावर, ' नित्यवीप्सयोः ' या सूत्रानें द्विर्वचन कार्य केलें असतां, ' द्रोग्धा द्रोग्धा ' किंवा ' द्रोढा द्रोढा ' असे वैकल्पिक इष्ट प्रयोग सिद्ध होतात. येथें सहज असा प्रश्न उद्भवतो कीं, प. १२७ प्रमाणें ' द्रोग्धारं द्रोग्धारं हन्ति ' किंवा ' द्रोढारं द्रोढारं हन्ति ' असाच प्रयोग होऊं शकतो व ' द्रोग्धारं द्रोढारं हन्ति ' असा किंवा ' द्रोढारं द्रोग्धारं हन्ति ' असा प्रयोग होऊंच शकत नाहीं. म्हणून इष्ट प्रयोगाची सिद्धि करण्याकरितां प्रकृत परिभाषेची मदत घेण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. या प्रश्नाचें कैयटानें 'सर्व-स्य द्वे ' ८–१–१ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत समर्पक उत्तर दिलें आहे व तें हें आहे ' ननु न ह्येकस्या आकृतेश्चरितः प्रयोगो द्वितीयस्यास्तृतीयस्या इति न्यायाद्यदा पूर्वस्य घत्वादि तदा परस्यापि लाघवाद्भविष्यति । एवं मन्यते धात्वाकृतिः प्रत्ययाकृति-श्चैकैव, प्रक्रान्तार्थभेदाशङ्कापि नास्ति । ' कैयटाच्या म्हणण्याचा अर्थ हा आहे कीं प० १२७ अशाच ठिकाणीं लागू पडते कीं जेथें भिन्न स्वरूपाचा प्रयोग केल्यास संदेह उत्पन्न होण्याचा संभव आहे. पण प्रकृतउदाहरणांत प्रकृति व प्रत्यय–म्हणजे 'द्रुह्' ही प्रकृति व ' तृच् ' हा प्रत्यय–हे दोन्ही द्विर्वचनस्थलीं एकच असल्यामुळें व ' द्रोग्धारं द्रोढारं हन्ति ' असा प्रयोग केला तरी अर्थासंबंधानें संदेह उत्पन्न होण्याचा संभव नसल्यामुळें, या स्थलीं प० १२७ मुळींच लागू पडत नाहीं व प्रकृतपरिभाषाच लागू पडते. )

पूर्वत्रासिद्धमित्यधिकारभवं शास्त्रमस्या लिङ्गम् । यत्र च सिद्धत्वासिद्धत्वयोः फले विशेषस्तत्रैवेयम् । कृष्णर्द्धिरित्यादौ जश्त्वात्पूर्वमनन्तरं वा द्वित्वे रूपे विशेषाभावेन नास्याः प्रवृत्तिरित्यन्यत्र विस्तरः ॥ सर्वस्य द्वे इति सूत्रे भाष्ये स्पष्टेयम् ॥ १२६ ॥

'पूर्वत्रासिद्धम्' या अधिकारांत पठित असलेलें त्रैपादिकसूत्र लावण्याचा प्रसंग आला असतां, ही परिभाषा उपस्थित होते–म्हणजे प्रवृत्त होते. जेथें त्रैपादिक परसूत्र सिद्ध किंवा असिद्ध मानल्यानें रूपांत कांहीं फरक पडत असेल तेथेंच ही परिभाषा लागू पडते. 'कृष्णर्द्धिः' इत्यादि उदाहरणांत जश्त्व करण्यापूर्वी किंवा जश्त्व केल्यानंतर द्वित्व केलें तरी रूपांत कांहीं फरक पडत नसल्यामुळें, अशा ठिकाणीं ही परिभाषा प्रवृत्त होत नाहीं–म्हणजे लागू पडत नाहीं. ( 'कृष्ण+ऋद्धिः' या उदाहरणांत 'ऋधु' धातूस 'स्त्रियां क्तिन्' सू० ३२७२ या सूत्रानें 'भावे' या अर्थामध्यें 'क्तिन्=ति' प्रत्यय झाला आहे. 'कृष्ण+ऋध्+ति' येथें 'आद्गुणः' सू० ६९ या सूत्रानें गुणरूपी एकादेश होऊन व 'उरण्रपरः' सू० ७० या सूत्रानें तो रपर होऊन, व 'झषः तथोर्धः' सू० २२८० या सूत्रानें 'ति' या प्रत्ययांतील तकाराचा धकार होऊन 'कृष्णर्ध्+धिः' अशी स्थिति झाली असतां, 'अचो रहाभ्यां द्वे' सू० ५९ या द्वित्वकार्यसंपादकसूत्राची व तसेंच 'झलां जश् झशि' सू० ५३ या जश्त्वकार्यसंपादकसूत्राची युगपत् प्राप्ति होते. हीं दोन्ही त्रैपादिकसूत्रें असून या दोहोंत 'झलां जश् झशि' हें परसूत्र आहे. हें सूत्र जरी द्वित्वकार्यसंपादकसूत्राच्या पलीकडील सूत्र आहे तरी, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, तें असिद्ध ठरत नाहीं. म्हणून परसूत्र असल्यामुळें तें प्रथम प्रवृत्त केल्यास, 'कृष्णर्द्+धिः' अशी स्थिति झाल्यावर, 'अचो रहाभ्यां द्वे' हें सूत्र नंतर प्रवृत्त होऊन त्या सूत्रानें दकाराचें द्वित्व होऊन व नंतर 'झरो झरि सवर्णे' सू० ७१ या सूत्रानें पूर्व दकाराचा लोप होऊन 'कृष्णर्द्धिः' असें रूप होतें. 'कृष्णर्ध+धिः' येथें प्रकृतपरिभाषा न लावतां जश्त्व करण्यापूर्वी द्वित्व प्रथम केलें तरी, कृष्णर्ध्ध्+धिः' अशी स्थिति झाल्यावर 'झलां जश् झशि' या सूत्रानें दोन्ही धकारांचा दकार होऊन व 'झरो झरि' या सूत्रानें पूर्वदकाराचा लोप होऊन 'कृष्णर्द्धिः' असेंच रूप सिद्ध होतें. सारांश 'कृष्णर्द्धिः' या उदाहरणांत प्रकृतपरिभाषा लावली किंवा न लावली तरी एकसारखेंच इष्टरूप तयार होत असल्यामुळें, अशीं उदाहरणें प्रकृतपरिभाषेचा विषय नव्हत असें समजून अशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा उपयोगांत आणण्याची कांहीं गरज नाहीं. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे. 'सर्वस्य द्वे' या सूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. ( ही परिभाषा वार्तिककारानें वार्तिकरूपानें पठित केली असल्यामुळें ती स्वतंत्र वाचनिकी समजावी. कित्येक वैयाकरण 'न मु ने' सू० ४३९ या सूत्राचा 'न' असा योगविभाग करून म्हणतात कीं या योगविभागानें प्रकृतपरिभाषा सिद्ध होते. पण 'न' असा योगविभाग करण्याकरितां भाष्यांत कोठेंहि आधार नसल्यामुळें तसा

योगविभाग करतां येत नाहीं असें भैरवीकाराचें मत आहे. कांहीं वैयाकरण ' अणुदित् ' सू० १४ या सूत्रांत केलेलें अणूप्रत्याहाराचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक आहे असें म्हणतात. ' अणुदित् ' या सूत्रांत अणूप्रत्याहाराचें ग्रहण न करितां अचूप्रत्याहाराचें ग्रहण करून ' अजुदित् ' असें सूत्र केलें असतें तरी काम भागूं शकलें असतें. त्या सूत्रांत अणूप्रत्याहाराचें ग्रहण एवढ्याचकरितां केलें आहे कीं निरनुनासिक य्, व्, ल्, यांनीं अनुनासिक यँ्, वँ्, लँ् यांचें ग्रहण व्हावें व तसें ग्रहण केल्यानें निरनुनासिक य्, व्, ल् यांना, ' अनचि च ' या सूत्रानें जसें द्वित्व होतें तसेंच अनुनासिक यँ्, वँ्, लँ् यांना देखील व्हावें व ' सय्यँन्ता ' इत्यादि स्थलीं ' सय्यँय्यँन्ता ' असें वैकल्पिक रूप व्हावें. पण ' अनचि च ' हें त्रैपादिक पूर्वसूत्र असून ' अनुस्वारस्य ययि परसवर्णः ' सू० १२४ हें परसूत्र आहे, आणि ही परिभाषा न मानल्यास, ' पूर्वत्रासिद्धम् ' या न्यायान्वयें, तें परसूत्र, ' अनचि च ' या पूर्वसूत्राच्या दृष्टीनें, असिद्ध ठरत असल्यामुळें अनुनासिक यँ्, वँ्, लँ् यांना द्वित्व होण्याचा प्रसंगच येऊं शकत नाहीं, व त्यामुळें ' अणुदित् ' या सूत्रांत केलेलें अणूप्रत्याहाराचें ग्रहण व्यर्थ ठरतें. पण प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, ' अनचि च ' या द्वित्वसंपादकसूत्राच्या दृष्टीनें, ' अनुस्वारस्य ' हें परसूत्र असून देखील, असिद्ध ठरत नाहीं, व त्यामुळें तें प्रथम प्रवृत्त होऊन अनुस्वाराच्या जागीं अनुनासिक यँकार होतो, व नंतर ' अनचि च ' हें सूत्र प्रवृत्त होऊन त्या अनुनासिक यँकाराचें द्वित्व होतें. अशा रीतीनें, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, तें अणूग्रहण चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक ठरतें असें ते वैयाकरण म्हणतात. कित्येक वैयाकरणांच्या मताप्रमाणें ' उभौ साभ्यासस्य ' सू० २६०६ हें सूत्र केलें असल्यामुळें, प्रकृतपरिभाषा अनित्य ठरते; कारण ' प्र+अन्+णि+चङ्+त् ' अशा स्थितींत ' चङि ' सू० २३१५ या सापादिक सूत्रानें द्वित्व पावलें असून त्या सूत्राच्या दृष्टीनें, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, ' उभौ साभ्यासस्य ' हें णत्वसंपादक त्रैपादिकसूत्र असिद्ध ठरत नाहीं. म्हणून प्रथम णत्व करून नंतर द्वित्व केल्यानें ' प्राणिणत् ' असें रूप सिद्ध होऊं शकलेंच असतें. म्हणून 'उपसर्गस्थात् निमित्तात् अनितेः णत्वं भवति ' या अर्थाचें सूत्र करून काम भागलें असतें व ' उभौ साभ्यासस्य ' असें सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. पण प्रकृतपरिभाषा अनित्य असल्यामुळें, ती क्वचित् स्थलीं लागू पडत नाहीं, व त्यामुळें पाणिनीला 'उभौ साभ्यासस्य' हें सूत्र करावें लागलें, आणि अशा रीतीनें तें सूत्र प्रकृतपरिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें असें त्या वैयाकरणांचें मत आहे. )

---

## परिभाषा १२७

ननु गोष्वश्वेषु च स्वामीत्यादिवद् गोष्वश्वानां च स्वामीत्यपि स्यात्स्वामीश्वरेति सूत्रेण षष्ठीसप्तम्योर्विधानादत आह—

' स्वामीश्वराधिपति ' सू० ६३६ या सूत्रांत ' स्वामी ' शद्बाच्या योगें विकल्पेंकरून षष्ठी व सप्तमी होण्याचें विधान केलें असल्यामुळें, जसा ' गोषु अश्वेषु च स्वामी ' ( किंवा गवामश्वानां च स्वामी ) असा वाक्यप्रयोग होतो, त्याचप्रमाणें ' गोषु अश्वानां च स्वामी ' असा देखील प्रयोग करतां येईल. ( पण तसा प्रयोग करणें इष्ट नाहीं ) म्हणून ही परिभाषा सांगतात

## एकस्या आकृतेश्चरितः प्रयोगो द्वितीयास्यास्तृतीयस्याश्च न भविष्यति ॥ १२७ ॥

" ( वाक्यांतील अनेक शद्ब त्या वाक्यांतील एखाद्या शद्बाशीं सारख्याच संबंधानें अन्वित असल्यास, तशा अन्वित असलेल्या शद्बांपैकीं ) पहिल्यानें उच्चारलेल्या शद्बाचा ज्या विशिष्ट प्रकारानें वाक्यांत प्रयोग केला असेल त्याहून भिन्न प्रकारानें, पुढें उच्चारलेल्या इतर अन्वित शद्बांचा, प्रयोग करूं नये "

( स्वस्वामिभावादि संबंध दाखविणें असल्यास षष्ठी विभक्तीचा, ' षष्ठी ' सू० ६०६ या सूत्रान्वयें, उपयोग केला जातो. पण ' स्वामीश्वर ' सू० ६३७ या सूत्रांत जे सात शद्ब निर्दिष्ट केले आहेत त्यांच्या योगें, स्वस्वामिभावसंबंध दाखविणें असल्यास, विकल्पेंकरून षष्ठी किंवा सप्तमी करावी असें त्या सूत्रांत सांगितलें आहे. त्यामुळें ' गवामश्वानां च स्वामी ' हा प्रयोग जसा शुद्ध ठरतो तसाच ' गोषु अश्वेषु च स्वामी ' हा प्रयोग देखील शुद्ध ठरतो. वरील वाक्यांत ' गो ' आणि ' अश्व ' हे शद्ब ' स्वामी ' या शद्बाशीं एकाच प्रकारच्या संबंधानें—म्हणजे स्वस्वामिभावसंबंधानें—अन्वित आहेत. म्हणून या वाक्यांत ' गो ' हा प्रथम शद्ब षष्ठींत किंवा सप्तमींत उच्चारला असतां, ' अश्व ' या दुसऱ्या शद्बाचा, प्रकृतपरिभाषेप्रमाणें, त्याच विभक्तींत प्रयोग केला पाहिजे. म्हणून ' गवामश्वेषु च स्वामी ' हा प्रयोग शुद्ध ठरत नाहीं. तसा प्रयोग केल्यास, वाक्याच्या अर्थाबद्दल संदेह उत्पन्न होण्याचा संभव आहे, व त्या वाक्याचा ' गवां स्वामी अश्वेषु तिष्ठति ' असा अर्थ होण्याचा संभव आहे. म्हणून तसा संदेह उत्पन्न न व्हावा याकरितां, दोन्ही अन्वित शद्बांचा एकाच विभक्तींत—मग ती षष्ठी असो किंवा सप्तमी असो—प्रयोग करावा असें ही परिभाषा सांगते. )

**यत्रान्याकृतिकरणे भिन्नार्थत्वसंभावना तद्विषयोऽयं न्याय इत्यन्यत्र विस्तरः ॥ कृञ्चानुप्रयुज्यते इति सूत्रे स्पष्टेयम् ॥ १२७ ॥**

जेथें अन्वित पदांचा वेगवेगळ्या प्रकारानें उपयोग केला असतां वाक्यार्थाबद्दल संशय उत्पन्न होण्याचा संभव आहे तशाच ठिकाणीं प्रकृतपरिभाषा लागू पडते. ( जेथें संशय उत्पन्न होण्याचा संभव नाहीं तशा ठिकाणीं प्रकृतपरिभाषा उपयोगांत आणण्याची गरज नाहीं. ) ' कृञ्चानुप्रयुज्यते लिटि ' ३-१-४० या सूत्रावरील

भाष्यांत ही परिभाषा सांगितली आहे. ( व त्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें म्हटलें आहे कीं 'वेदलोकप्रसिद्धोयं न्यायः । यथा हि । खादिरे बध्नाति- पालाशे बध्नातीत्यादौ विकल्पितेषु साधनेषु येनैव साधनेनोपक्रान्ता क्रिया तेनैव निर्वाह्यते ।...... तस्माद्योर्थो यथा शब्दाकृत्या प्रतिपादयितुमुपक्रान्तस्तथैवासौ निर्वाह्यो न त्वन्यथा शब्दाकृत्येत्यर्थः । एवं हि प्रतिपत्तिलाघवं भवति ।' या लौकिक न्यायाच्या आधारावर प्रकृतपरिभाषा रचली असल्यामुळें ती लौकिकन्यायसिद्ध समजावी.)

---

# परिभाषा १२८

ननु विव्याधेत्यादौ परत्वाद्धलादिः शेषे वस्य संप्रसारणं स्यादत आह—

'विव्याध' इत्यादि स्थलीं, 'हलादिः शेषः' सू० २१७९ हें परसूत्र असल्यामुळें, वकारास संप्रसारण होण्याची आपत्ति येईल. ( 'व्यध् + लिट्' या स्थलीं 'लिटि धातोः' सू० २१७७ या सूत्रान्वयें द्विर्वचच करून 'व्यध्व्यध्' अशी स्थिति झाली असतां, 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' सू० २४०८ या सूत्रानें 'व्यध्' या अभ्यासांतील यणाला–म्हणजे यकारास व वकारास–संप्रसारण प्राप्त होतें आणि तसेंच 'हलादिः शेषः' या सूत्रानें यकारलोपाची प्राप्ति होते. 'हलादिः शेषः' हें परसूत्र असल्यामुळें यकाराचा लोप प्रथम केल्यास, अभ्यासांतील वकारास संप्रसारण होण्याची आपत्ति येते व वकाराचें संप्रसारण केल्यास, 'विव्याध' असें इष्टरूप सिद्ध न होतां 'उव्याध' असें अनिष्ट रूप सिद्ध होईल तसें न व्हावें) म्हणून ही परिभाषा सांगतात.

## सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् ॥ १२८ ॥

" ( एखाद्या उदाहरणांत संप्रसारणकार्य व तसेंच इतर कार्य युगपत् प्राप्त झाल्यास, इतर कार्यांच्या मानानें ) संप्रसारणकार्य व त्या संप्रसारणाच्या आश्रयानें होणारें कार्य बलवत्तर ठरतें. "

( ही परिभाषा असल्यामुळें 'व्यध्' या अभ्यासांतील यकाराचा लोप प्रथम न होतां, यकाराचें संप्रसारण होतें, व तें झाल्यावर 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' सू० ३६३ हें सूत्र असल्यामुळें, वकारास सम्प्रसारण होत नाहीं. नंतर 'हलादिः शेषः' हें सूत्र प्रवृत्त होऊन अभ्यासांतील धकाराचा लोप होतो व 'विव्याध' असें इष्टरूप सिद्ध होतें. )

**तदाश्रयं सम्प्रसारणाच्चेति पूर्वरूपम् ॥ वस्तुतो लिट्यभ्यासस्येति सूत्रे उभयेषांग्रहणस्योभयेषां संप्रसारणमेव यथा स्यादित्यर्थकत्वेनेदं सिद्धमित्येषा व्यर्थैति लिट्यभ्यासस्येति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । फलान्तरान्यथासिद्धिरपि तत्रैव भाष्ये स्पष्टा ।**

'सम्प्रसारणाच्च' सू० ३३७ या सूत्रानें होणारें पूर्वरूप एकादेशकार्य हें संप्रसारणाच्या आश्रयानें होणारें कार्य होय. वास्तविक 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' या सूत्रांत 'उभयेषाम्' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या सूत्राचा अर्थ असा होतो कीं ('वचिस्वपि' सू० २४०९ व 'ग्रहिज्या' सू० २४१२ या) दोन्हीं सूत्रांत सांगितलेल्या धातूंच्या अभ्यासाला संप्रसारण कार्यच होतें (व इतर युगपत् प्राप्त झालेलें कार्य संप्रसारणकार्य होण्यापूर्वी होऊं शकत नाहीं) व असा त्या सूत्राचा अर्थ असल्यामुळें, 'विव्याध' हें इष्टरूप सिद्ध होतें आणि प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं असें 'लिट्यभ्यासस्य' ६-१-१७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं म्हटलें आहे, आणि त्या भाष्यांत हें देखील स्पष्टपणें सांगितलें आहे कीं, ही परिभाषा मानल्यानें जीं रूपें सिद्ध होतात तीं इतर रीतीनें सिद्ध होऊं शकतात. (त्या भाष्यांत प्रकृतपरिभाषा वार्तिकरूपानें पठित केली असल्यामुळें ती स्वतंत्र वाचनिकी समजावी. भाष्यकारांनीं 'रमाह्वेपियङ्यणः' असें प्रकृतपरिभाषेचें प्रयोजन सांगून पुढें असें म्हटलें आहे कीं संप्रसारणकार्य नित्य असल्यामुळें तें प्रथम होतें व रमादेश इत्यादि कार्यें पर असून देखील संप्रसारणकार्य होण्यापूर्वी होऊं शकत नाहींत. आणि तसेंच संप्रसारणाच्या आश्रयानें होणारें पूर्वरूप एकादेशकार्य अन्तरङ्ग ठरत असल्यामुळें तें देखील प्रथम होतें, आणि म्हणून प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहींच गरज नाहीं. सारांश भाष्यकारांनीं प्रकृतपरिभाषा प्रत्याख्यात केली आहे.)

**णौ च संश्चङोरित्यादौ संश्चङोरित्यादि विषयसप्तमीति तत्रापि न दोष इत्यन्यत्र विस्तरः ॥ १२८ ॥**

'णौ च संश्चङोः' सू० २५७९ इत्यादि स्थलीं 'संश्चङोः' इत्यादि विषयसप्तमी मानल्यास, तशा ठिकाणीं देखील कांहीं दोष उत्पन्न होत नाहीं. ('णौ च संश्चङोः' या सूत्राचा अर्थ असा आहे कीं 'श्वि' धातूपुढें 'णिच्' प्रत्यय व त्यापुढें 'सन्' किंवा 'चङ्' आल्यास 'श्वि' धातूंतील वकारास विकल्पेंकरून संप्रसारण होतें. 'अ+श्वि+णि+चङ्+त्' या स्थलीं 'अचो ञ्णिति' सू. २५४ या सूत्रानें 'श्वि' यांतील इकारास वृद्धि पावली आहे आणि तसेंच 'णौ च संश्चङोः' या सूत्रानें 'श्वि' यांतील वकारास वैकल्पिक संप्रसारण पावलें आहे. केवळ 'णि' या प्रत्ययाला मानून होणारें वृद्धिकार्य अन्तरङ्ग ठरतें, व त्याच्या मानानें, 'णि' व 'चङ्' यांना मानून होणारें संप्रसारणकार्य बहिरङ्ग ठरतें. म्हणून अन्तरङ्गपरिभाषेप्रमाणें वृद्धिकार्य प्रथम केल्यास 'अशूशवत्' असें इष्टरूप सिद्ध न होतां, 'अशीश्वयत्' असें अनिष्टरूप, प्रकृतपरिभाषा

न मानल्यास, सिद्ध होईल. म्हणून प्रकृतपरिभाषा मानणें आवश्यक आहे अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेचें ग्रन्थकार असें उत्तर देतात कीं ' संश्वङोः' ही विषयसप्तमी मानल्यानें वर दाखविलेली आपत्ति सहज टाळतां येतें. ती विषयसप्तमी मानल्यानें ' णौ च संश्वङोः ' या सूत्राचा अर्थ असा होतो कीं णिजन्त ' श्वि ' धातूला ' सन् ' किंवा ' चङ् ' लावण्याचा प्रसंग आला असतां संप्रसारणकार्य प्रथम करावें व नंतर इतर कार्यें करावीं. असा त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, संप्रसारण कार्य प्रथम केल्यानें ' अशूशवत् ' असें इष्टरूप सिद्ध होतें व प्रकृतपरिभाषा मानण्याची कांहीं गरज नाहीं. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा १२९

यत्तु—

( आतां ग्रन्थकार अशा तीन परिभाषा सांगतात कीं ज्या भाष्यांत कोठेंहि पठित किंवा ध्वनित नसल्यामुळें स्वीकारार्ह नाहींत. )

**क्वचिद्विकृतिः प्रकृतिं गृह्णाति ॥ १२९ ॥**

" कोठें कोठें मूळशब्दाहून साधलेल्या शब्दस्वरूपानें मूळ शब्दस्वरूपाचें ग्रहण होतें. "

**तेन निसमुपविभ्यो ह्व इत्यत्र ह्वाग्रहणेन ह्वेञो ग्रहणसिद्धिः ॥**

( कित्येक वैयाकरण वर सांगितलेली परिभाषा पठित करतात व म्हणतात कीं) ही परिभाषा असल्यामुळें, 'निसमुपविभ्यो ह्वः' सू० २७०३ या सूत्रांत उच्चारलेल्या 'ह्वः' या शब्दानें ' ह्वेञ् ' धातूचें ग्रहण होतें. ( ' ह्वेञ् ' धातूचें ' आदेच ' सू० २३७० या सूत्रानें आत्व करून तयार झालेल्या ' ह्वा ' या आकारान्त शब्दाचें, ' आतो धातोः' सू. २४० या सूत्रानें आकाराचा लोप करून, पञ्चमीचें रूप केलें आहे, व या शब्दानें, प्रकृतपरिभाषा असल्यामुळें 'ह्वेञ्' धातूचें ग्रहण होत असल्यामुळें, त्या धातूपूर्वी 'नि, सम्, उप,' किंवा 'वि' हा उपसर्ग असल्यास त्या धातूला केवळ आत्मनेपदाचेच प्रत्यय होतात व उभय पदांचे प्रत्यय होत नाहींत, आणि ' निह्वयते, उपह्वयते ' इत्यादि इष्टरूपें सिद्ध होतात. ही परिभाषा नसती तर ' ह्वा ' या शब्दानें मूळ ' ह्वेञ् ' धातूचें ग्रहण झालें नसतें व ' निह्वयते ' इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकलीं नसतीं आणि जेथें ' आदेच ' या सूत्रानें ' ह्वेञ् ' धातूचें ' ह्वा ' असें रूप होतें तशाच ठिकाणीं आत्मनेपदप्रत्यय नियमेंकरून झाले असते. ही आपत्ति टळावी म्हणून कित्येक वैयाकरणांनीं ही परिभाषा पठित केली आहे. )

---

# परिभाषा १३०

## औपदेशिकप्रायोगिकयोरौपदेशिकस्यैव ग्रहणम् ॥ १३० ॥

" जेथें सूत्रांत एखादा असा शब्द वापरला असेल कीं जो पाणिनीय उपदेशांत साक्षात् उच्चारलेला आहे व जो भाषेंत रूढ असलेल्या प्रयोगांतहि आढळतो तेथें त्या शब्दानें, उपदेशांत साक्षात् उच्चारलेल्या शब्दाचेंच, ग्रहण करावें. "

**तेन दादेर्धातोरित्यत्रौपदेशिकधातोरेव ग्रहणमिति ।**

ही परिभाषा असल्यामुळें ' दादेर्धातोर्घः ' सू० ३२५ या सूत्रांतील ' दादेर्धातोः ' या शब्दांनीं, औपदेशिक धातूंचेंच — म्हणजे धातुपाठांत साक्षात् पठित असलेल्या व दकारानें सुरू होणाऱ्या धातूंचेंच–ग्रहण होतें. ( व ' दामलिह् ' इत्यादि दकारानें सुरु होणाऱ्या नामधातूंचें ग्रहण होत नाहीं असें कित्येक वैयाकरणांचें म्हणणें आहे. )

**तन्न । तयोर्निर्मूलत्वाद्भाष्याव्यवहृतत्वाच्च । न च विकृतिः प्रकृतिं गृह्णातीति ग्रहिज्येति सूत्रस्थभाष्येणाद्यायास्तिरस्काराच्च । निसमुपविभ्यो ह्व इत्यादौ ह्वेञोऽनुकरणे सौत्रः प्रयोगः । आत्वविषय एवात्मनेपदं प्रयोगस्थानमेवानुकरणस्य घुसंज्ञासूत्रे भाष्ये स्पष्टमुक्तत्वादित्यन्ये ।**

वर ज्या दोन परिभाषा–म्हणजे प. १२९ व १३०—सांगितल्या आहेत त्या स्वीकारतां येत नाहींत, कारण त्यांचें ज्ञापक कोठेंहि आढळत नाहीं व भाष्यांत त्यांचा कोठेंहि उपयोग केला नाहीं. उलटें ' ग्रहिज्या ' ६-१-१६ या सूत्रावरील भाष्यांत ' न च विकृतिः प्रकृतिं गृह्णाति ' असें म्हटलें असल्यामुळें प. १२९ तिरस्कारार्ह ठरते. ( त्या भाष्यांत भाष्यकारांनीं ' विकृतिः प्रकृतिं गृह्णाति ' असें वचन पठित न करितां त्याच्या उलट ' न च विकृतिः प्रकृतिं गृह्णाति ' असें म्हटलें आहे व त्या वचनाचा अर्थ करितांना कैयटानें असें म्हटलें आहे कीं ' प्रकृत्या विकृतिर्गृह्यते स्थानिवद्भावात्, न तु विकृत्या प्रकृतिः, भिन्नरूपत्वात्. ' सारांश प. १२९ भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं. ) ' निसमुपविभ्यो ह्वः ' इत्यादि सूत्रांत ' ह्वेञ् ' धातूचें अनुकरण करून सौत्रप्रयोग केला आहे ( व सौत्रप्रयोगांत त्या मूळ धातूचें अनुकरण केलें असल्यामुळें, ' ह्वः ' या पदानें ' ह्वेञ् ' धातूचें ग्रहण होण्यांत कांहीं हरकत येत नाहीं. ) इतर वैयाकरणांचें असें म्हणणें आहे का, ' दाधा घ्वदाप् ' १-१-१९ या घुसंज्ञाविधायक सूत्रावरील भाष्यांत, लौकिकप्रयोगांत जसें शब्दस्वरूप असतें तशाच शब्दस्वरूपाचें सूत्रांत अनुकरण केलें जातें असें भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें असल्यामुळें, ( ' निसमुपविभ्यो ह्वः ' या सूत्रांत ) जो ' ह्वा ' या शब्दाचा निर्देश केला आहे त्यानें, आत्व केलें असतां जेव्हां ' ह्वेञ् ' धातूचें ' ह्वा ' असें स्वरूप होतें तेव्हांच केवळ आत्मने-

पदाचे प्रत्यय होतात. ( जेथें ' ह्वेञ् ' धातूचें आत्व होत नाहीं तेथें, ' ह्वेञ् ' धातु ञित् असल्यामुळें ' स्वरितञितः ' सू० २१५८ या सूत्रान्वयें विकल्पेंकरून उभय-पदांचे प्रत्यय त्या धातूस होतात सारांश त्यांच्या मतें ' ह्वा ' या विकृतीनें ' ह्वेञ् ' या प्रकृतीचें ग्रहण होऊं शकत नाहीं. )

**अन्यापि तत्र तत्रोपदेशग्रहणं कुर्वतः सूत्रकृतो वार्तिककृतश्चासम्मता। इह हि व्याकरणे सर्वेष्वेव सानुबन्धकग्रहणेषु रूपमाश्रीयते यत्रास्यैतद्रूप-मिति, रूपनिर्ग्रहश्च शब्दस्य नान्तरेण लौकिकं प्रयोगं तस्मिंश्च लौकिके प्रयोगे सानुबन्धकानां प्रयोगो नास्तीति कृत्वा द्वितीयः प्रयोग उपास्यते क उपदेशो नामेति घसंज्ञासूत्रस्थभाष्येण प्रायोगिकासम्भवे औपदेशिकस्य ग्रहणमित्यर्थस्य लाभेन भाष्यासम्मता च ॥ भाष्ये सानुबन्धकेत्यादि प्रकृताभिप्रायेण । दादेरिति सूत्रे दादिपदस्यौपदेशिकदादित्ववति लक्षणेति न दोष इत्यन्यत्र विस्तरः ॥ १३० ॥**

तसेंच ठिकठिकाणीं सूत्रांत व वार्तिकांत सूत्रकार पाणिनीनें व वार्तिककारानें ' उपदेशे ' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, त्यांना प० १३० मान्य नव्हती. ( त्यांना जर ती परिभाषा मान्य असती तर, त्या परिभाषेप्रमाणेंच प्रायोगिक शब्दस्वरूपांचें ग्रहण न होतां, औपदेशिक शब्दस्वरूपांचेंच ग्रहण झालें असतें, व सूत्रांत किंवा वार्तिकांत ' उपदेशे ' हें पद घालण्याची कांहींच गरज नव्हती आतां ग्रन्थकार पुढील पंक्तींत असें सांगतात कीं भाष्यकारास देखील प. १३० मान्य नव्हती. ) ' तरप्तमपौ घः' १–१–२१ या घसंज्ञाविधायकसूत्रा-वरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, ' या व्याकरणशास्त्रांत जेथें जेथें अनुबन्धसहित शब्दस्वरूपाचें ग्रहण केलें जातें तेथें तेथें त्या शब्दानें त्याच सानुबन्धक शब्दस्वरूपाचें ग्रहण होऊं शकतें. एखादा शब्द सूत्रांत उच्चारला असतां त्या शब्दानें कोणत्या शब्दस्वरूपाचें ग्रहण होतें हा निश्चय करतेवेळीं, लौकिकप्रयोगाचा आश्रय केल्याखेरीज तसा निश्चय करतां येत नाहीं. पण लौकिकप्रयोगांत अनुबन्धयुक्त शब्दांचा कधींहि प्रयोग केला जात नसतो. म्हणून अशा ठिकाणीं दुसऱ्या प्रकारच्या प्रयोगाचा आश्रय करणें भाग आहे. तो दुसऱ्या प्रकारचा प्रयोग ' उपदेश ' हा होय. या भाष्या-वरून हें स्पष्ट होतें कीं जेथें सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें लौकिकप्रयोगांत रूढ असलेल्या शब्दस्वरूपाचें ग्रहण होणें असंभवनीय आहे तशाच ठिकाणीं औपदेशिक शब्दस्वरूपाचें ग्रहण करावें, आणि वरील भाष्याचा असा तात्पर्यार्थ असल्यामुळें, प. १३० भाष्य-कारास संमत नव्हती हें उघड आहे. ( वरील भाष्यांत भाष्यकारांनीं ' घसंज्ञायां नदी-तरे प्रतिषेधः' असें वार्तिक पठित केलें आहे व त्याचा अर्थ असा आहे कीं ' नदीतर ' या शब्दांतील ' तर ' याला ' घ 'संज्ञा होऊं नये. ' नद्याः तरः नदीतरः '–म्हणजे नदीच्या पार होण्याचा उतारघाट–या शब्दांतील ' तर ' हा शब्द ' तॄ ' धातूस ऋदो-

रप् सू० ३२३२ या सूत्रानें ' अप् ' प्रत्यय होऊन व ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू० २१६८ या सूत्रानें ऋकारास गुण होऊन, ' तॄ+अप्=तर्+अप्=तरप्=तर ' अशा रीतीनें सिद्ध झाला आहे. या ' तर ' शब्दाचें घसंज्ञक ' तरप् ' नें ग्रहण होऊं शकते काय या प्रश्नाचें उत्तर देतेवेळीं भाष्यकारांनीं ' इह हि व्याकरणे......उपदेशो नाम ' हें भाष्य लिहिलें आहे, व ते पुढें म्हणतात 'न चैष उपदेशे तरप्शब्दः । अथ वाऽस्त्वस्य घसंज्ञा, को दोषः? । घादिषु नद्या ऱ्हस्वो भवतीति ऱ्हस्वत्वं प्रसज्येत । समानाधिकरणेषु घादिष्वित्येवं तत् । यदा तर्हि सैव नदी, स एव तरस्तदा प्राप्नोति ।' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं ' तॄ ' धातूस ' अप् ' प्रत्यय होऊन बनलेला ' तर ' हा शब्द, उपदेशांत—म्हणजे ' तरप् तमपौ घः ' या सूत्रांत—पठित असलेला 'तरप् ' शब्द नव्हे. 'नदीतरः' या शब्दांतील 'तर' हा शब्द 'तरप्' च आहे असें मानल्यास, 'घरूप' सू० ९८५ या सूत्रानें 'नदी' या शब्दांतील इकार ऱ्हस्व होऊन 'नदितरः' असें विकृतरूप होण्याची आपत्ति येईल. दुसरें असें कीं, 'तरप्' प्रत्यय स्वार्थिक असल्यामुळें, जेथें ' तरप् ' हा प्रकृतीच्या अर्थाचा वाचक असून त्याचें प्रकृतीशीं सामानाधिकरण्य असतें तशाच ठिकाणीं तो 'तरप्' घसंज्ञक ' तरप् ' शब्द आहे असें मानलें जाऊं शकतें. ' नद्याः तरः नदीतरः ' या षष्ठीतत्पुरुष समासांत ' नदी' व ' तर ' या दोन शब्दांचें सामानाधिकरण्य नसून वैयधिकरण्य आहे, व 'नदी' हा ऱ्हस्व नसून दीर्घ आहे. म्हणून या लौकिकप्रयोगावरूनच हें स्पष्ट होतें कीं ' नदीतर ' हा शब्द घसंज्ञकतरप्-प्रत्ययान्त नाहीं, आणि म्हणून वरील वार्तिकाची कांहींच गरज नाहीं. भाष्यकाराचें असें मत असल्यामुळें, ते वरील वार्तिकांत अकारप्रश्लेष करून तेंच वार्तिक ' घसंज्ञायां नदीतरेऽप्रतिषेधः ' अशा रीतीनें पठित करतात व म्हणतात कीं ' घसंज्ञायां नदीतरेऽप्रतिषेधः, अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । घसंज्ञा कस्मान्न भवति । तरब्ग्रहणं ह्यौपदेशिकम् । औपदेशिकस्य तरपो ग्रहणम् । न चैष उपदेशे तरप्शब्दः । किं वक्तव्यमेतत्? । नहि । कथमनुच्यमानं गंस्यते? । ' आणि ' कथमनुच्यमानं गंस्यते ' या प्रश्नाचें उत्तर देतांना त्यांनीं ' इह हि व्याकरणे......उपदेशो नाम' हें भाष्य लिहिलें आहे. त्या भाष्याचा अर्थ वर सांगितलाच आहे. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें कोणत्या शब्दस्वरूपाचें ग्रहण करावें हा निश्चय करितांना, औपदेशिकप्रयोगास प्राधान्य न देतां, लौकिकप्रयोगास प्राधान्य दिलें आहे, आणि प. १३० या भाष्याच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें, ती स्वीकारार्ह नाहीं असें ग्रन्थकाराचें म्हणणें आहे. हें खरें कीं त्या भाष्यांत सानुबन्धक शब्दांचाच उल्लेख केला आहे. पण ग्रन्थकार म्हणतात कीं तें भाष्य उभयसाधारण भाष्य असून सानुबन्धक व निरनुबन्धक शब्दांस लागू पडणारें भाष्य आहे, आणि त्या भाष्यांत सानुबन्धक ' तरप् ' शब्द हा चर्चेचा विषय असल्यामुळें, तेथें सानुबन्धक शब्दांचा उल्लेख केला आहे. हेंच आतां ग्रन्थकार पुढील पंक्तींत सांगतात. ) वरील भाष्यांत सानुबन्धक शब्द चर्चेचा विषय होता म्हणून त्या भाष्यांत ' सानुबन्धक ' इत्यादि शब्द वापरले आहेत. ' दादे-

धोतोर्घः ' सू० ३२५ या सूत्रांत उच्चारलेल्या ' दादि ' या पदाचा, उपदेशांत साक्षात् पठित असलेले व दकारानें सुरु होणारे धातु, असा लक्षणेनें अर्थ होत असल्यामुळें कांहीं दोष उद्भवत नाहीं. ( व त्या पदानें उपदेशांत—म्हणजे धातुपाठांत—पठित नसलेल्या ' दामलिह् ' इत्यादि नामधातूंचें ग्रहण होऊं शकत नाहीं. म्हणून तशा शद्बांचें ग्रहण न व्हावें या करितां प. १३० मानण्याची कांहीं गरज नाहीं. सारांश प. १२९ व १३० स्वीकारार्ह नाहींत असें ग्रन्थकाराचें मत आहे. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

# परिभाषा १३१

यदपि नन्वजर्घा बेभिदीतीत्यादौ तत्तद्गणप्रयुक्ता विकरणा यङ्लुकि स्युस्तथा यङ्लुकि बेभिदितेत्यादावेकाच इतीण्निषेधः स्यादत आह—

' अजर्घाः, बेभिदीति ' इत्यादि स्थलीं त्या त्या गणांत सांगितलेलीं विकरणें यङ्लुकांत देखील लावण्याची आपत्ति येईल; (म्हणजे ' गृधु ' धातु दिवादिगणांत पठित असल्यामुळें त्याला ' श्यन् ' विकरण, व तसेंच ' भिद् ' धातु रुधादिगणांत पठित असल्यामुळें त्याला ' श्नम् ' विकरण, यङ्लुकाचें रूप करितांना, लावण्याची आपत्ति येईल ) व तसेंच ' बेभिदिता ' इत्यादि यङ् लुकाच्या रूपांत, 'एकाच उपदेशे' सू० २२६६ असें इडागमनिषेधक सूत्र असल्यामुळें, ( व 'भिद् ' धातु हा धातुपाठांत एकाच् व अनुदात्त असा पठित केला असल्यामुळें ) इडागम न होण्याची आपत्ति येईल- ( ती आपत्ति टळावी म्हणून कांहीं वैयाकरण ) ही परिभाषा पठित करितात.

**शितपा शपानुबन्धेन निर्दिष्टं यद्गणेन च । यत्रैकाज्ग्रहणं चैव पञ्चैतानि न यङ्लुकि ॥ १३१ ॥**

" सूत्रांत मूळ धातूस (१) ' श्तिप् ' प्रत्यय लावून, किंवा (२) ' शप् ' विकरण लावून, किंवा (३) अनुबन्धसहित धातूचा निर्देश करून, किंवा (४) गणाचा उच्चार करून, किंवा (५) ' एकाच् ' या शद्बाचें ग्रहण करून, कार्य होणें सांगितलें असल्यास, तीं पांच प्रकारचीं सूत्रें यङ् लुकांत लागू पडत नाहींत. ( व त्या सूत्रांना सांगितलेलीं कार्यें यङ्लुकांत होत नाहींत. ) "

**अनुबन्धनिर्देशो द्विधा स्वरूपेण ङित इत्यादिपदेन च । हन्ति याति वाति, सनीवन्तेति सूत्रे भरेति, दीङोयुडचि अनुदात्तङितः, दिवादिभ्यः श्यन्, एकाच उपदेशे, इत्युदाहरणानि ।**

सूत्रांत अनुबन्धाचा निर्देश दोन प्रकारांनीं केला जातो; (१) जसा धतुपाठांत

अनुबन्धसहित धातु पठित आहे त्याच स्वरूपानें तो उच्चारणें, किंवा (२) 'ङितः' इत्यादि सामान्यपद उच्चारणें. 'हन्ति, याति वाति,' (हीं 'इक्श्तिपौ धातुनिर्देशे'– सू० ३२८५ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें होणारा कृत् श्तिप् प्रत्यय धातूंना लावून त्यांचा सूत्रांत निर्देश केल्याची उदाहरणें आहेत. 'हो हन्तेः' सू० ३५८ या सूत्रांत 'हन्' धातूचा व 'नेर्गदनद' सू० २२८५ या सूत्रांत 'या', 'हन्', व 'वा' या धातूंचा श्तिप् प्रत्यय लावून निर्देश केला आहे.) 'सनीवन्त' सू० २६१८ या सूत्रांत ('भृञ् भरणे' या भ्वादिगणांतील धातूस शप् प्रत्यय लावून) 'भर' असा निर्देश केला आहे. 'दीङो, युडचि' सू० २५०७ (या सूत्रांत 'दीङः' अशा सानुबन्धक धातूचा मूळ स्वरूपानें निर्देश केला आहे—म्हणजे तो धातु जसा धातुपाठांत पठित आहे त्याच रूपानें त्याचा सूत्रांत निर्देश केला आहे,) 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू० २१५७ (या सूत्रांत 'ङितः' हें सामान्यपद उच्चारून सामान्य रीतीनें अनुबन्धाचा निर्देश केला आहे.) 'दिवादिभ्यः श्यन्' सू० २५०५ (या सूत्रांत 'दिवादिभ्यः' असा गणनिर्देश केला आहे.) 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' सू० २२४६ (या सूत्रांत 'एकाच्' या शब्दाचें ग्रहण केलें आहे.) हीं उदाहरणें प्रकृतपरिभाषेचीं उदाहरणें होत.

**द्वित्वं सनाद्यन्ता इति भूवादय इति धातुत्वं च भवत्येव गुणो यङ्लुकोरित्यादिभिर्निषेधानित्यत्वकल्पनात्। तेन भष्भावोऽप्यजर्घा इत्यादौ भवति। अत एव श्वीदित इति सूत्रे कैयटे यत्रैकाज्ग्रहणं किञ्चिदिति पाठः॥**

('सन्यङोः' सू० २३९५ या, यङन्ताचें द्वित्व होणें असें विधान करणाऱ्या, सूत्रांत 'एकाचो द्वे प्रथमस्य' या पूर्व सूत्रांतून 'एकाचः' हें पद अनुवृत्त होत असून देखील–म्हणजे त्या सूत्रांत 'एकाचः' या अनुवृत्तपदाचें ग्रहण केलें असून देखील–यङ्लुगन्त धातूस) द्वित्व होतेंच, (व त्यामुळें, 'यत्रैकाज् ग्रहणं न तद्यङ्लुकि' असें जें प्रकृतपरिभाषेंत म्हटलें आहे तें अनित्य ठरतें.) तसेंच 'सनाद्यन्ता धातवः' सू० २३०४ व 'भूवादयो धातवः' सू० १८ या सूत्रांन्वयें यङ्लुगन्त धातूस धातुसंज्ञा प्राप्त होतेच. ('सनाद्यन्ता धातवः' या सूत्राचा असा अर्थ आहे कीं 'सन्, क्यच्, काम्यच्, क्यङ्, क्यष् आचारक्विप्, णिच्, यङ्, यक्, आय, ईयङ् व णिङ्' या बारा प्रत्ययांपैकीं कोणताहि प्रत्यय ज्याच्या अन्तीं असतो त्याला धातुसंज्ञा प्राप्त होते. वर सांगितलेल्या प्रत्ययांपैकीं 'यङ्' या प्रत्ययानें यङ्लुकचें ग्रहण होतें. वरील सूत्रांत 'सनाद्यन्ताः' असा समुदायरूपानें–म्हणजे गणरूपानें–निर्देश केला आहे. असें असून देखील यङ्लुगन्ताला या सूत्रान्वयें धातुसंज्ञा प्राप्त होते. त्यामुळें 'गणेन यन्निर्दिष्टं तत्र' असें जें या परिभाषेंत सांगितलें आहे तें अनित्य ठरतें. 'सनाद्यन्ता धातवः' हें सूत्र भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केलें अस-

त्यामुळें, कदाचित् कोणी असें म्हणेल कीं अशा प्रत्याख्यात केलेल्या सूत्रान्वयें यङ्लुगन्ताला धातुसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. वास्तविक या सूत्राचें प्रत्याख्यान करणारें भाष्य सिद्धान्तीची उक्ति नसून एकदेशीची उक्ति आहे. तथापि तें भाष्य सिद्धान्तीची उक्ति आहे असें मानलें तरी, ' भूवादयो धातवः ' या सूत्रानें यङ्लुगन्ताला धातुसंज्ञा प्राप्त होते. धातुपाठांत ' भू सत्तायाम् ' हा धातु प्रथम उच्चारला आहे व 'वा' धातूचाहि धातुपाठांत अदादिगणामध्यें निर्देश केला आहे. तसेंच अदादिगणाच्या शेवटीं धातुपाठांत ' चर्करीतं च ' हें गणसूत्र पठित केलें आहे व ' यङ्लुगन्तमदादौ बोध्यम् '–म्हणजे यङ्लुगन्त धातु अदादिगणांत अन्तर्भूत आहे असें समजावें–असा त्या गणसूत्राचा दीक्षितांनीं अर्थ केला आहे. सारांश ' भूवादयो धातवः ' या सर्व-गणांचा उच्चार करणाऱ्या सूत्रानें यङ्लुगन्तास धातुसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळें, ' गणेन यत् निर्दिष्टं तद्यङ्लुकि न ' असें जें प्रकृतपरिभाषेंत म्हटलें आहे तें अनित्य ठरतें हें उघड आहे. ) तसेंच ' गुणो यङ्लुकोः ' सू० २६३० इत्यादि सूत्रांवरून देखील हें स्पष्ट होतें कीं प्रकृतपरिभाषेंत सांगितलेला ( 'पञ्चैतानि न यङ्लुकि' हा ) निषेध अनित्य आहे असें मानलें पाहिजे. ( ' गुणो यङ्लुकोः ' या सूत्राचा अर्थ असा आहे कीं ' अभ्यासस्य गुणः स्यात् यङि यङ्लुकि च ' व या सूत्राचा असा अर्थ असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, यङ्लुकांत द्वित्व होतें. वास्तविक ही परिभाषा नित्य मानल्यास, वर सांगितल्याप्रमाणें, 'सन्यङोः' या सूत्रांत 'एकाचः' हें पद अनुवृत्त असल्यामुळें, यङ्लुगन्त धातूला द्वित्व होऊं नये, पण द्वित्व होत असल्यामुळें ही परिभाषा अनित्य आहे असें मानणें भाग आहे. ) ही परिभाषा अनित्य असल्यामुळेंच, 'अजर्घाः' इत्यादि यङ्लुकाच्या रूपांत ' भष् ' होतो–म्हणजे गकाराचे जागीं घकार होतो. ( वास्तविक ही परिभाषा नित्य असती तर, 'एकाचो बशो भष्' सू० ३२६ या सूत्रांत ' एकाच् ' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, यङ्लुकाच्या रूपांत भष्भाव व्हावयास नको होता. ' अजर्घाः ' हें ' गृह् ' धातूच्या यङ्लुकाच्या लङाचें द्वितीयपुरुषाचें एकवचन आहे व या रूपाची सिद्धि बालमनोरमेंत करून दाखविली आहे—पहा बालमनोरमा, द्वितीयावृत्ति पान ९२१. ) आणि ही परिभाषा अनित्य असल्यामुळेंच, ' श्वीदितः ' ७–२–१४ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें ( या परिभाषेच्या तृतीय चरणाचा ) ' यत्रैकाज्ग्रहणं किञ्चित् ' असा पाठ केला आहे. ( व त्यामुळें या परिभाषेचा अर्थ असा होतो कीं या परिभाषेंत सांगितलेला पांच प्रकारचा निषेध यङ्लुकांत कोठें कोठें लागू पडत नाहीं. )

**एकाच उपदेशेऽनुदात्तादिति सूत्रे एकाज्ग्रहणेनैकदेशानुमत्यैषा ज्ञाप्यते । अन्यथोपदेशेऽनेकाचामुदात्तत्वस्यैव सत्त्वेन तद्वैयर्थ्यं स्पष्टमेवेति ।**

'एकाच उपदेशेऽनुदात्तात् ' सू० २२४६ या सूत्रांत ' एकाचः ' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, प्रकृतपरिभाषेचा एक भाग–म्हणजे ' यत्रैकाज् ग्रहणं चैव ' हा

भाग—ज्ञापित होतो व अशा रीतीनें या परिभाषेच्या एका भागाला पाणिनीची संमति आहे असें मानतां येत असल्यामुळें, त्या पदानें संपूर्ण परिभाषा ज्ञापित होते. जर ही परिभाषा नसती तर, धातुपाठांत पठित असलेल्या सर्व अनेकाच् धातु उदात्तच असल्यामुळें, 'एकाच्' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरलें असतें हें उघड आहे. ( धातुपाठांत जे अनेकाच् धातु पठित आहेत ते सर्व उदात्त असल्यामुळें, ' उपदेशेऽनुदात्तात् ' एवढेंच जरी सूत्र पाणिनीनें केलें असतें तरी इडागमनिषेध अनेकाच् धातूंना लागू पडलाच नसता व तो केवळ अनुदात्त एकाच् धातूंना लागू पडला असता. असें असल्यामुळें, ' एकाच उपदेशे ' या सूत्रांत केलेलें ' एकाचः ' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. पण ज्या सूत्रांत ' एकाच् ' या पदाचें ग्रहण केलें असतें तीं सूत्रें यङ्लुकांत लागू पडत नाहींत अशी प्रकृतपरिभाषा असल्यामुळें व यङ्लुकांत इडागमनिषेधाचें सूत्र लागणें इष्ट नसल्यामुळें, त्या सूत्रांत केलेलें ' एकाचः ' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरत नाहीं, व अशा रीतीनें. प्रकृतपरिभाषा असल्यामुळें, तें पद चरितार्थ होऊन प्रकृतपरिभाषेच्या एका अंशाचें ज्ञापक ठरतें, व त्यामुळें ही संपूर्ण परिभाषा पाणिनीस मान्य होती असें अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं असें जे वैयाकरण ही परिभाषा पठित करितात त्यांचें म्हणणें आहे. )

**तदपि न ॥ भाष्यानुक्तत्वात् । एकाज्ग्रहणस्य वधिव्यावृत्त्यर्थमावश्यकत्वाच्च । न च वधिस्स्थान्युपदेश एकाजेवेतिवाच्यम् । साक्षादुपदेशासम्भवेनैतद्विषये स्थान्युपदेशग्रहणादुपदेशत्वावच्छेदेनैकाजित्यर्थाच्च । किं चोत्तरार्थमेकाज्ग्रहणम् । अत एव जागरितवानित्यादावुपदेश उगन्तत्वमादाय श्र्युकः कितीतीण्निषेधो न । तत्रोपदेश इत्यनुवृत्तिश्च स्तीर्णमित्यादाविण्निषेधायेत्याकरे स्पष्टम् ।**

पण ही परिभाषा देखील स्वीकारार्ह नाहीं; कारण ती भाष्यांत कोठेंहि पठित ( किंवा ध्वनित ) केली नाहीं. ( आणि ' एकाच उपदेशे ' या सूत्रांत केलेलें जें ' एकाचः ' या पदाचें ग्रहण प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानलें आहे तें ) एकाच् ग्रहण, (' हन् ' या धातूचे ठिकाणीं होणाऱ्या ) ' वध ' या आदेशास इडागम निषेध लागू न पडावा याकरितां, करणें आवश्यक होतें. ( ज्या स्थानीचे जागीं ' वध ' हा आदेश होणें सांगितलें आहे तो मूळ स्थानी—म्हणजे ' हन् ' हा धातु—धातुपाठांत अनुदात्त पठित असल्यामुळें, ' वध ' हा आदेश, स्थानिसाम्यानें, अनुदात्त झाला असता, व ' उपदेशेऽनुदात्तात् ' एवढेंच जर सूत्र केलें असतें तर, तो आदेश द्व्यच्क असून देखील, त्याला इडागमनिषेध लागू पडला असता. तो निषेध त्याला लागू पडणे इष्ट नसल्यामुळें, वरील सूत्रांत ' एकाचः ' या पदाचें ग्रहण केलें आहे, व ' वध ' द्व्यच्क असल्यामुळें, त्याला इडागमनिषेध लागू पडत नाहीं सारांश वरील सूत्रांत ' एकाचः ' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरत नसून अन्य रीतीनें चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें पद प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं, व ज्या ज्ञापकाच्या आधारावर प्रकृतपरि-

भाषा मानली आहे तें या परिभाषेचें ज्ञापक ठरत नसल्यामुळें व इतर कोणतेंहि ज्ञापक उपलब्ध नसल्यामुळें, ही ज्ञापकशून्य परिभाषा स्वीकारतां येत नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) या 'वध' आदेशाचा स्थानी जो 'हन्' धातु आहे तो उपदेशांत–म्हणजे धातुपाठांत–एकाच् पठित असल्यामुळें, त्याचे जागीं होणाऱ्या 'वध' या आदेशास देखील 'एकाच उपदेशे' हें इडागमनिषेधाचें सूत्र लागू पडतें (व तो द्व्यच्क असून देखील त्याला इडागम होऊं शकणार नाहीं)–असें कोणी म्हटल्यास तें ह्मणणें बरोबर नाहीं; कारण ('हनो वध लिङि') या साक्षात् पठित सूत्रानें 'वध' या आदेशाचें (द्व्यच्क रूपानें) ग्रहण होऊं शकत असल्यामुळें, त्याच्या स्थानीचें ज्या उपदेशांत–धातुपाठांत–ग्रहण केलें आहे तो उपदेश त्याचे ठिकाणीं लावणें अयोग्य आहे, व दुसरें असें कीं जो उपदेशांत साक्षात् एकाच् रूपानें पठित आहे त्यालाच 'एकाच्' म्हणतां येतें. ('हन्' धातु धातुपाठांत एकाच् रूपानें पठित केला आहे, पण त्याचे ठिकाणीं होणारा 'वध' हा आदेश 'हनो वध लिङि' या साक्षात् पठित सूत्रांत द्व्यच्करूपानें पठित केला आहे, आणि या साक्षात् पठित सूत्रानें 'वध' चें द्व्यच्करूपानें ग्रहण संभवत असून देखील, त्याचा स्थानी 'हन्' धातुपाठांत एकाच्रूपानें पठित आहे एवढ्याचमुळें, तो स्थान्युपदेश आदेशाचे ठिकाणीं लागू करणें अयोग्य आहे. 'वध' हा आदेश उपदेशांत द्व्यच्करूपानें पठित असल्यामुळें त्याचा स्थानी एकाच् आहे एवढ्यावरून त्याला एकाच् मानतां येत नाहीं. जो एकाच् रूपानें साक्षात् पठित आहे त्यालाच 'एकाच्' ही संज्ञा प्राप्त होऊं शकते. 'वध' हा द्व्यच्करूपानें पठित असल्यामुळें त्याला कोणत्याहि तऱ्हेनें एकाच् मानतां येत नाहीं आणि म्हणून 'एकाच उपदेशे' या सूत्रांत 'एकाचः' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, 'वध' चे ठिकाणीं इडागमनिषेध लागू पडत नाहीं.) दुसरें असें कीं 'एकाच उपदेशे' या सूत्रांत केलेलें 'एकाचः' या पदाचें ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं तें पद उत्तरसूत्रांत–म्हणजे 'श्र्युकः किति' सू० २३८१ या सूत्रांत–अनुवृत्त व्हावें, व तें पद उत्तरसूत्रांत अनुवृत्त होत असल्यामुळेंच, 'जागृ' हा धातु उपदेशांत उगन्त असा पठित केला असून देखील, त्याला 'श्र्युकः किति' या सूत्रानें सांगितलेला इट्निषेध लागू पडत नाहीं व 'जागरितवान्' इत्यादि रूपें सिद्ध होतात. (जर 'एकाच उपदेशे' या सूत्रांत 'एकाचः' हें पद घातलें नसतें तर, 'श्र्युकः किति' या सूत्रांत त्या पदाचा उच्चार केला नसल्यामुळें तें सूत्र द्व्यच्क उगन्त धातूस देखील लागू पडलें असतें, व 'जागृ' या अनेकाच् उगन्त धातूपुढें 'क्तवत्' हा कित्प्रत्यय आला असतां, त्या प्रत्ययाला इडागम झाला नसता व 'जागरितवान्' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकलीं नसतीं. ह्मणून 'एकाच उपदेशे' या सूत्रांत 'एकाचः' या पदाचें ग्रहण करावें लागलें व अशा रीतीनें देखील तें पद चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें प्रकृतपरिभाषेचें ज्ञापक मानतां येत नाहीं. 'श्र्युकः किति' या सूत्रांत जशी 'एकाच उपदेशे' या सूत्रांतून 'एकाचः' या पदाची अनुवृत्ति केली आहे त्याच-

प्रमाणें त्या सूत्रांतून ) ‘ उपदेशे ’ या पदाची देखील अनुवृत्ति केली आहे व ती अशा करितां केली आहे कीं ‘ स्तीर्णम् ’ इत्यादि स्थलीं इट्निषेध लागू पडावा असें (‘एकाच उपदेशे’ ७–२–१० या सूत्रावरील ) भाष्यांत सांगितलें आहे. (‘ स्तॄ ’ धातुपाठांत ॠगन्त असा पठित आहे; पण जेव्हां ‘ ॠत इद्धातोः ’ सू० २३९० या सूत्रानें ‘ स्तॄ ’ यांतील ॠकाराचे जागीं इकार होतो व ‘ उरण्रपरः ’ सू० ७० या सूत्रानें तो इकार रपर होतो तेव्हां ‘ स्तॄ+क्त ’ अशा स्थितींत ‘ स्तिर्+क्त ’ असें रूप होऊन ‘ स्तॄ ’ धातूचें ॠगन्तत्व नष्ट होतें, व मूळ ‘ स्तॄ ’ धातूचें स्वरूप बदलून त्याचें ‘ स्तिर् ’ असें रूप झाल्यामुळें, ‘ श्र्युकः किति ’ या सूत्रांत ‘ एकाच उपदेशे ’ या सूत्रांतून ‘ उपदेशे ’ या पदाची अनुवृत्ति केली नसती तर, क्तप्रत्याला इडागम झाला असता व ‘ स्तीर्णम् ’ असें इष्टरूप सिद्ध होऊं शकलें नसतें. पण त्या सूत्रांत पूर्व सूत्रांतून ‘ उपदेशे ’ हें पद अनुवृत्त केलें असल्यामुळें व ‘ स्तॄ ’ हा धातु उपदेशांत–धातुपाठांत–ॠगन्त असा पठित असल्यामुळें, जरी क्तप्रत्यय लावला असतां त्याच्या रूपांत फरक पडतो तरी, ‘ क्त ’ या कित् प्रत्ययाला इडागम होत नाहीं व ‘हलि च ’ सू० ३५४ या सूत्रानें ‘स्तिर् ’ यांतील इकाराचा दीर्घ होऊन व ‘ रदाभ्याम् ’ सू० ३०१६ या सूत्रानें निष्ठाप्रत्ययाचे जागीं नकार होऊन व ‘ रषाभ्यां नो णः ’ सू० २३५ या सूत्रानें त्या नकाराचें णत्व होऊन ‘ स्तीर्ण ’ असें इष्ट रूप सिद्ध होतें. )

**न च भाष्ये यङ्लोपे बेभिदितेत्यादाविट्प्रवृत्त्यर्थमुपदेशोऽनुदात्तादेकाचः श्रूयमाणादङ्गादित्यर्थे सनीट्प्रतिषेधो वक्तव्यो बिभित्सतीति दोषोपन्यासवद्यङ्लुकि दोषानुपन्यासेन तत्रेडिष्टः । यङ्लोपेत्यादिभाष्यं तूपक्रमोपसंहारबलेन न यङ्लुग्विषयम् । किंच तस्य तद्विषयकत्वे यङ्लोपे स्थानिवत्त्वस्येव यङ्लुक्युपायाप्रदर्शनेन न्यूनतापत्तिरिति वाच्यम् । इड्विषये यङ्लुको लोकेऽनभिधानेन छन्दसि सर्वविधीनां वैकल्पिकत्वेन च तत्र दोषानुपन्यासेनादोषात् । अन्यथैकाज्ग्रहणं किमर्थमिति प्रश्नस्योत्तरत्र जागर्त्यर्थमिह च वध्यर्थमित्युत्तरस्य च भाष्ये निरालम्बनतापत्तेः ॥**

( या पंक्तींतील ‘ न च भाष्ये यङ्लोपे ’ पासून ‘ न्यूनतापत्तिरिति वाच्यम् ’ पर्यंत शंकाग्रन्थ आहे व बाकीच्या पंक्तींत त्या शंकेचें उत्तर दिलें आहे. ग्रन्थकारानें पूर्वीं असें म्हटलें आहे कीं प्रकृतपरिभाषेचा भाष्यांत कोठेंहि उल्लेख केला नसल्यामुळें ती स्वीकारार्ह नाहीं. यावर शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं जरी ही परिभाषा भाष्यकारांनीं साक्षात् पठित केली नाहीं तरी ती भाष्यकारास मान्य होती, व तो आपलें म्हणणें सिद्ध करण्याकरितां भाष्याचा दाखला देतो. ) ‘ बेभिदिता ’ इत्यादि स्थलीं यङ्लोप झाला असतां इडागम व्हावा याकरितां ‘ एकाच उपदेशे ’ या सूत्राचा जर

असा अर्थ केला कीं ' जो धातु उपदेशांत अनुदात्त पठित आहे तशा धातूच्या एकाच अङ्गापुढें वलादि आर्धधातुकप्रत्यय आला असतां त्याला इडागम होऊं नये ' तर, ' बिभित्सति ' या स्थलीं इडागम न व्हावा याकरितां ' सनि इट्प्रतिषेधो वक्तव्यः ' –म्हणजे ' सन् ' प्रत्यय पुढें आल्यास त्याला इडागम करूं नये–अशा प्रकारचें वचन पठित करावें लागेल. अशा प्रकारचा सनाचे ठिकाणीं दोष दाखवितेवेळीं भाष्यकारांनीं तशा प्रकारचा दोष यङ्लुकाच्या रूपांत दाखविला नाहीं. यावरून हें सिद्ध होतें कीं यङ्लुकाच्या रूपांत इडागम होणें भाष्यकारास इष्ट होतें. ('भिद्+यङ्+ता' या स्थलीं ' सन्यङोः ' सू० २३९५ या सूत्रानें द्विर्वचन करून व ' हलादिः शेषः ' या सूत्रानें अभ्यासांतील दकाराचा लोप करून, व ' गुणो यङ्लुकोः ' सू० २६३० या सूत्रानें अभ्यासाला गुण करून व ' अभ्यासे चर्च ' सू० २१८१ या सूत्रानें अभ्यासवर्णाला जश्त्व करून ' बेभिद्य+ता ' अशी स्थिति झाली असतां, ' यस्य हलः ' सू० २६३१ व ' अतो लोपः ' सू० २३०८ या सूत्रांनीं यकाराचा व अकाराचा लोप होऊन ' बेभिद्+ता ' अशी स्थिति होते. अशा स्थितींत ज्या मूळ धातूचें ' बेभिद् ' असें रूप झालें आहे तो धातु धातुपाठांत अनुदात्त पठित असल्यामुळें व त्या एकाच् ' भिद् ' धातूपुढें ' ता ' हा वलादि आर्धधातुकप्रत्यय आल्यामुळें, ' एकाच उपदेशेऽनुदात्तात् ' हें सूत्र असल्यामुळें, इडागम होणार नाहीं. पण त्याला इडागम होणें इष्ट असल्यामुळें ' एकाच उपदेशे ' या सूत्राचा वर जसा अर्थ केला आहे तसा अर्थ करावा लागेल, व तसा अर्थ केल्यास ' बेभिद् ' हें अङ्ग अनेकाच् असल्यामुळें, इडागमनिषेध लागू पडणार नाहीं व ' ता ' या प्रत्ययाला इडागम होऊन ' बेभिदिता ' असें इष्टरूप सिद्ध होईल. पण त्या सूत्राचा तसा अर्थ केल्यास, ' भिद्+सन्+ति ' अशा स्थितींत, वर सांगितल्याप्रमाणें गुणकार्य खेरीजकरून इतर द्वित्वादि कार्यें केल्यावर- ' बिभिद्+सन्+ति ' अशी स्थिति झाली असतां, ' सन् ' हा आर्धधातुक वलादिप्रत्यय ' बिभिद् ' या अनेकाच् अङ्गापुढें असल्यामुळें, त्याला इडागम होण्याची आपत्ति येईल व इष्टरूप सिद्ध होणार नाहीं असा भाष्यकारांनीं दोष दाखविला आहे, व ते म्हणतात कीं ही आपत्ति टाळण्याकरितां ' सनि इट्प्रतिषेधो वक्तव्यः ' असें वचन पठित करावें लागेल. शंकाकार म्हणतो कीं सनाच्या रूपांत असा दोष दाखवितेवेळीं भाष्यकारांनीं यङ्लुकाच्या रूपांत तशा प्रकारचा दोष दाखविला नाहीं व ' यङ्लुकि इट्प्रतिषेधो वक्तव्यः ' अशा प्रकारचें वचन पठित करावें लागेल असें ' एकाच उपदेशे ' या सूत्रावरील भाष्यांत म्हटलें नाहीं. वास्तविक पाहिलें असतां, ' एकाच उपदेशे ' या सूत्राचा वर जसा अर्थ केला आहे तसा केल्यास, जसा सनाच्या रूपांत दोष उत्पन्न होतो तसाच यङ्लुकाच्या रूपांत देखील होतो. असें असून देखील ज्याअर्थीं भाष्यकारांनीं यङ्लुकाच्या रूपांत तसा दोष दाखविला नाहीं त्याअर्थीं हें स्पष्ट होतें कीं, यङ्लुकांत इडागमप्रतिषेध न होतां इडागम व्हावा हें भाष्यकारास इष्ट होतें. पण ' यत्रैकाज्ग्रहणं न तद्यङ्लुकि ' अशा प्रकारची परिभाषा मानल्याशिवाय इडागमप्रतिषेधाचें निवारण

होणार कसें ? सारांश भाष्यकारास प्रकृतपरिभाषा मान्य असल्यामुळेंच त्यांनीं यङ्लुकांत दोष दाखविला नाहीं व वरील भाष्यावरून भाष्यकारास प्रकृतपरिभाषा मान्य होती हें ध्वनित होतें, असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. यावर कोणी अशी शंका करील कीं वरील भाष्य यङ्लोप व यङ्लुक् या दोहोंच्या संबंधाचें भाष्य असल्यामुळें भाष्यकारांनीं वरील भाष्यांत जो दोष दाखविला आहे. व दोषनिवारणार्थ जो उपाय सुचविला आहे तो केवळ यङ्लोपासंबंधानें नसून यङ्लुकासंबंधानें देखील आहे. या शंकेवर शंकाकाराचें असें उत्तर आहे कीं) वरील भाष्यांत जसा विषयोपक्रम व विषयोपसंहार केला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं तें भाष्य केवळ यङ्लोपासंबंधाचेंच आहे. ( एखाद्या प्रकरणाचें तात्पर्य काय आहे याचा निर्णय करण्याकरितां 'उपक्रमोपसंहारावभ्यासोपूर्वताफलम् ' हीं जीं पांच साधनें सांगितलीं आहेत त्यांपैकीं ' उपक्रम ' व ' उपसंहार ' हीं मुख्य साधनें आहेत. वरील भाष्यांत भाष्यकारांनीं ' किं पुनः कारणमेवं विज्ञायत उपदेशेऽनुदात्तादेकाच श्रूयमाणादिति। यङ्लोपार्थम्। यङ्लोपे मा भूदिति ' असा उपक्रम करून, ' अकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति । ननु च लोपे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । ' अशा रीतीनें उपसंहार केला आहे. उपक्रम व उपसंहार केवळ यङ्लोपासंबंधानेंच असून त्या भाष्यांत यङ्लुकासंबंधानें मुळींच चर्चा केली नाहीं व ' यङ्लुक् ' असा शब्द देखील वापरला नाहीं. म्हणून तें भाष्य यङ्लुकाला देखील लागू पडतें असें मानणें अयोग्य आहे.) दुसरें असें कीं वरील भाष्याचा विषय यङ्लुक् देखील होता असें मानलें तर, जसा यङ्लोपाच्या विषयांत स्थानिवद्भाव मानून दोषनिवारणाचा उपाय भाष्यकारांनीं सुचविला आहे तसा कोणताहि उपाय यङ्लुकाच्या विषयांत सुचविला नसल्यामुळें, त्या भाष्यांत न्यूनतादोष येण्याची आपत्ति येते. ( ' एकाच उपदेशे ' या सूत्रावरील भाष्यांत सिद्धान्त सांगतेवेळीं भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं त्या सूत्रांतील ' उपदेशे ' हें पद केवळ ' अनुदात्तात् ' या पदाचें विशेषण न समजतां, ' एकाचः ' व ' अनुदात्तात् ' या दोन्हीं पदांचें विशेषण समजावें, व तसें मानल्यास सूत्रार्थ असा होतो कीं ' उपदेशे एकाचः उपदेशे अनुदात्तात् धातोः परस्य वलाद्यार्धधातुकप्रत्ययस्य इडागमो न भवति. ' या अर्थान्वयें ' बेभिद्य+ता ' या स्थळीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें ' यस्य हलः ' व 'अतो लोपः ' या सूत्रांनीं यकाराचा व अकाराचा लोप होऊन ' बेभिद+ता ' अशी स्थिति झाल्यावर, ' भिद् ' या एकाच् व अनुदात्त धातूपुढें ' ता ' हा वलादि आर्धधातुकप्रत्यय आला असल्यामुळें त्याला इडागमनिषेध पावतो व त्याला इडागम न केल्यास, ' बेभिदिता ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकत नाहीं. यावर भाष्यकार असें म्हणतात कीं ' भिद्य ' यांतील यकाराचा व अकाराचा जरी लोप झाला आहे तरी ' अचः परस्मिन् पूर्वविधौ ' सू० ५० या सूत्रान्वयें अकाराचे जागीं झालेला लोपरूपी आदेश स्थानिवद्भावानें अकारच आहे असें मानतां येतें, व त्यामुळें ' भिद् ' या एकाच् व अनुदात्त धातूमध्यें व ' ता ' या प्रत्ययामध्यें अका-

राचें व्यवधान असल्यामुळें, ' ता' या प्रत्ययाला इडागम होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं व 'बेभिदिता' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें. पण यङ्लुकांत यङाचा लुक् होतो व 'न लुमताङ्गस्य' सू.२६३ हें सूत्र असल्यामुळें, तशा ठिकाणीं लोपरूपी अजादेश स्थानिवद्भावानें अकारच आहे असें मानतां येत नाहीं व त्यामुळें धातूंत व ' ता ' प्रत्ययांत अकाराचें व्यवधान राहत नसल्यामुळें ' ता ' प्रत्ययाला इडागम होऊं शकत नाहीं. पण इडागम होणें तर इष्ट आहे; तरी पण भाष्यकारांनीं वरील भाष्यांत यङ्लुकाच्या रूपांत इडागम होण्याकरितां कोणताहि उपाय सुचविला नाहीं. म्हणून जर वरील भाष्य यङ्लोपाच्या व यङ्लुकाच्या संबंधाचें आहे असें मानलें तर, यङ्लुकाच्या रूपांत, वर सांगितल्याप्रमाणें, जो दोष उद्भवतो त्या दोषाचें निवारण करण्याकरितां कोणताहि उपाय सुचविला नसल्यामुळें, त्या भाष्यांत न्यूनतादोष येऊं पाहतो. पण भाष्य दोषयुक्त आहे असें मानणें अयोग्य आहे, व भाष्यकारास प्रकृतपरिभाषा मान्य होती हें मानल्याशिवाय त्या न्यूनतारूपी दोषाचें निवारण होऊं शकत नाहीं. म्हणून भाष्यकारास ही परिभाषा मान्य होती असेंच मानलें पाहिजे असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें शंकाग्रन्थ संपला व यापुढें ग्रन्थकार या शंकेचें असें उत्तर देतात कीं ) इडागमसहित यङ्लुकाचा प्रयोग भाषेंत कोठेंहि होत नाहीं, व वैदिक प्रयोगांत ( ' सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते ' प. ३५ अशी परिभाषा असल्यामुळें ) सर्वच कार्यें विकल्पेंकरून होत असतात. त्यामुळें भाष्यांत यङ्लुकासंबंधानें जरी दोष दाखविला नाहीं तरी तें भाष्य न्यूनतादोषयुक्त आहे असें मानतां येत नाहीं. ( सारांश जर भाषेंत इडागमसहित यङ्लुकाचा प्रयोग असता तर वरील भाष्यास न्यूनतारूप दोष लागू पडला असता. पण तसा प्रयोग भाषेंत होत नसल्यामुळें, भाष्यकारास यङ्लुकाच्या रूपांमध्यें इडागम होण्याकरितां उपाय सुचविण्याची कांहीं गरज नव्हती, आणि म्हणून वरील भाष्य न्यूनतादोषयुक्त ठरत नाहीं. )

न चार्धधातुकाक्षिप्तधातोरेकाच इति विशेषणम् । एवं च बिभित्तेत्यादावुत्तरखण्डस्य धातोरेकाच्त्वमस्त्येव उत्तरखण्डेऽस्तित्ववत् । एतच्च दयतेरिति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ॥ एवं च प्रकृतभाष्यासङ्गतिरिति वाच्यम् । आक्षेपे आक्षिप्तस्यान्वये च मानाभावात् । अङ्गत्वं तु विशिष्ट एवेत्येकाचो द्वे, इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । निरूपितं च तनादिशेषे शब्देन्दुशेखरे । धातुत्वं तूत्तरखण्ड एव ।

(या पंक्तींत ' आर्धधातुकाक्षिप्तधातोः' येथून ' एवं च प्रकृतभाष्यासङ्गतिः ' पर्यंत शंकाग्रन्थ आहे. व बाकीच्या पंक्तींत त्या शंकेचें उत्तर दिलें आहे. शंकाकार अशी शंका करतो कीं ' एकाच उपदेशे ' हें सूत्र ' धातोः ' या अधिकारांत पठित नसून अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, जरी त्या सूत्रांत ' धातोः ' हें पद अनुवृत्त होऊं शकत नाहीं तरी, आर्धधातुकप्रत्यय धातूहूनच होत असल्यामुळें आणि अशा

रीतीनें आर्धधातुकप्रत्ययाला धातूची आकांक्षा असल्यामुळें, त्या आकांक्षेची पूर्ति होण्याकरितां आर्धधातुकप्रत्यय असा शद्ब उच्चारतांक्षणींच ) आर्धधातुकप्रत्ययानें धातु आक्षिप्त होतो व तशा 'धातोः' या आक्षिप्त पदाचें 'एकाचः' हें विशेषण होतें ( व त्यामुळें सूत्रार्थ असा होतो कीं उपदेशांत जो धातु अनुदात्त पठित आहे तशा एकाच् धातूपुढें वलादि आर्धधातुकप्रत्यय आल्यास त्याला इडागम होत नाहीं, व असा त्या सूत्राचा अर्थ केला म्हणजे ) 'बिभित्सति' इत्यादि स्थलीं उत्तरखण्डांत असणारा धातु एकाच्च सांपडतो ( व त्यामुळें त्या स्थलीं सन्प्रत्ययाला इडागम होऊं शकत नाहीं व इष्टरूप सिद्ध होतें. 'अस्' धातूचें द्विर्वचन करून 'अस् अस्' अशी स्थिति झाली असतां उत्तरखण्डांत असलेला ) 'अस्' जसा धातु मानला जातो तसेंच याठिकाणीं समजावें ( —म्हणजे 'भिद् भिद्+सन्+ति' या स्थलीं उत्तरखण्डांत असलेला जो 'भिद्' तो धातु मानला जातो व तो धातुपाठांत अनुदात्त पठित असल्यामुळें आणि तो एकाच् असून त्याच्यापुढें वलादि आर्धधातुक 'सन्' प्रत्यय आला असल्यामुळें, त्या प्रत्ययाला इडागम होत नाहीं. ) 'द्यतेर्दिगि' ७-४-९ या सूत्रावरील भाष्यांत हें सांगितलें आहे कीं जो उत्तरखण्डांत असतो तो धातु समजावा. असें असल्यामुळें 'एकाच उपदेशे' या सूत्रांतील वरील भाष्य असंगत ठरतें; ( कारण 'सनि इट्प्रतिषेधो वक्तव्यः' हें वचन पठित करावें लागेल असें त्या भाष्यांत म्हटलें आहे. वास्तविक 'एकाच उपदेशे' या सूत्राचा जो नुकताच वर अर्थ दिला आहे तो बरोबर मानल्यास, तसें वचन पठित केलें पाहिजे असें म्हणण्याची कांहींच गरज नव्हती, आणि म्हणून तें भाष्य असंगत ठरतें येथें शंकाग्रन्थ संपला. आतां ग्रन्थकार या शंकेवर असें उत्तर देतात कीं ) हें म्हणणें बरोबर नाहीं. ( कारण 'एकाच उपदेशे' हें सूत्र धात्वधिकारांत पठित नसल्यामुळें त्या सूत्रांत ) 'धातोः' हें पद आक्षिप्त करण्यास व त्या आक्षिप्त पदाचें 'एकाचः' हें विशेषण मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. ( वास्तविक तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें त्या सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद आक्षिप्त होऊन 'एकाचः' हें त्याचें विशेषण होणें योग्य आहे. ) व अङ्गसंज्ञा साभ्यास धातूलाच होत असते असें 'एकाचो द्वे प्रथमस्य' ६-१-१ या सूत्रावरील भाष्यांत सांगितलें आहे व शद्बेन्दुशेखरांत तनादिगणांच्या शेवटीं या संबंधानें निरूपण केलें आहे मात्र धातु उत्तरखण्डांतच असतो—म्हणजे उत्तरखण्डालाच धातुसंज्ञा असते. ( सारांश 'एकाच उपदेशे' हें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, 'एकाचः' हें पद 'धातोः' याचें विशेषण न मानतां 'अङ्गस्य' याचेंच विशेषण मानलें पाहिजे, आणि जरी उत्तरखण्डाला धातुसंज्ञा होत असते तरी धातूच्या साभ्यास शद्बस्वरूपाला अङ्गसंज्ञा होत असल्यामुळें, व 'विभिद् + सन् + ति' या उदाहरणांत 'सन्' या वलादि आर्धधातुक प्रत्ययापूर्वीं असलेलें 'विभिद्' हें अङ्ग अनेकाच् असल्यामुळें, या स्थलीं सनाला इडागम पावतो, व त्याला इडागम केल्यास, 'विभित्सति' असें

इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाहीं, आणि म्हणूनच ‘ सनि इट्प्रतिषेधो वक्तव्यः ’ असें वचन पठित करावें लागेल असें भाष्यकारांनीं पूर्वभाष्यांत म्हटलें आहे. त्या भाष्यांत कोठेंहि परस्पर विरोध दिसत नाहीं. आणि म्हणून तें भाष्य असंगत ठरतें हें म्हणणें अयोग्य आहे. हें खरें कीं, सिद्धान्तपक्ष सांगतेवेळीं उत्तरभाष्यांत, ‘ एकाच उपदेशे ’ हें पद ‘ एकाचः ’ व ‘ अनुदात्तात् ’ या दोहोंचेंहि विशेषण मानून, ‘ सनि इट्प्रतिषेधो वक्तव्यः ’ हें वचन पठित करण्याची आवश्यकता नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. तथापि हा सिद्धान्तपक्ष जरी सांगितला नसता तरी त्याच्या पूर्वीच्या भाष्यांत परस्परविरुद्धतारूप दोष आढळून येत नसल्यामुळें तें भाष्य देखील सुसंगत ठरतें असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. )

अत एवैकाचो बशो भषिति सूत्रे धातोरवयवस्यैकाच इति वैयधिकरण्येनान्वये गर्धब्सिद्धिः प्रयोजनमुक्तं भाष्ये न तु प्रसिद्धमजर्घा इति ।

उत्तरखण्डाला धातुसंज्ञा असते म्हणूनच ( ‘ दादेर्धातोर्घः ’ ८-२-३२ या सूत्रावरील भाष्यांत ) ‘ एकाचो बशो भष् ’ या सूत्रांतील ‘ एकाचः ’ या पदाचा ‘ धातोः ’ या अनुवृत्त पदाशीं ‘ धातोः अवयवस्य एकाचः ’ असा वैयधिकरण्यानें अन्वय करण्याचें प्रयोजन भाष्यकारांनीं हें सांगितलें आहे कीं ‘ गर्धप् ’ हें रूप सिद्ध व्हावें, आणि तसा अन्वय करण्याचें प्रयोजन सांगतांना ‘ अजर्घाः ’ हें जें प्रसिद्ध रूप आहे त्या रूपाची सिद्धि व्हावी असें भाष्यकारांनीं म्हटलें नाहीं. ( ‘ प्रातिपदिकात् धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च ’ या गणसूत्रान्वयें ‘ गर्दभ ’ या प्रातिपदिकास ‘ तत्करोति तदाचष्टे ’ या अर्थामध्यें णिच् प्रत्यय केला असतां, ‘ गर्दभ+णिच् ’ या णिजन्ताला ‘ सनाद्यन्ता धातवः ’ सू० २३०४ या सूत्रान्वयें धातुसंज्ञा प्राप्त झाल्यावर, तशा नामधातूहून ‘क्विप् च सू० २९८३ या सूत्रानें क्विप् प्रत्यय केला असतां, ‘ टेः ’ सू० १७८६ या सूत्रानें ‘ गर्दभ ’ यांतील ‘ टि ’ चा-म्हणजे अकाराचा-लोप होऊन, व ‘ णेरनिटि ’ सू० २३१३ या सूत्रानें णिलोप व ‘ वेरपृक्तस्य ’ सू० ३७५ या सूत्रानें ‘क्विप्=व् ’ लोप होऊन ‘ गर्दभ् ’ असें प्रातिपदिक होतें. याला ‘ सु’ हा विभक्तिप्रत्यय लावला असतां ‘ गर्दभ्+सु ’ अशा स्थितींत, ‘ एकाचो बशो भष् ’ सू० ३२६ या सूत्रांचा ‘ एकाचः झषन्तस्य धातोः बशो भष् भवति’ असा सामानाधिकरण्यानें—म्हणजे ‘ एकाचः ’ हें ‘ धातोः ’ या अनुवृत्त पदाचें विशेषण करून—अन्वय केल्यास, ‘ गर्दभ् ’ हा नामधातु अनेकाच् असल्यामुळें, त्याला तें सूत्र लागू पडणार नाहीं व भष्भाव-म्हणजे ‘ दभ् ’ यांतील दकाराचा धकार-होणार नाहीं. तो व्हावा म्हणून भाष्यकारांनीं ‘ धातोः अवयवः यः एकाच् झषन्तः तदवयवस्य बशः स्थाने भष् भवति ’ असा वैयधिकरण्यानें-म्हणजे ‘ धातोः ’ ही अवयवषष्ठी मानून-अन्वय केला आहे, व तसा अन्वय केला असल्यामुळें, ‘ गर्धभ् ’ असें रूप होऊन व ‘ वाऽवसाने ’ सू० २०६ या सूत्रानें भकाराचा विकल्पेंकरून पकार होऊन ‘ गर्धप् ’ असें रूप सिद्ध होतें. ‘ अजर्धाः ’ हें ‘ गृधु अभिकाङ्क्षायाम् ’ या दिवादिगणांतील

धातूच्या यङ्लुकाच्या लङाचें मध्यमपुरुषाचें एकवचन आहे. येथें ' सन्यङोः ' सू० २३९५ या सूत्रानें द्वित्व होऊन, व ' हलादिः शेषः ' सू० २१७९ या सूत्रानें अभ्यासांतील धकाराचा लोप होऊन, व ' उरत् ' सू० २२४४ या सूत्रानें अभ्यासांतील ऋकाराचे जागीं अकार होऊन ' अ+जगृधू+स् ' अशी स्थिति झाली असतां, 'रुग्रिकौ च लुकि' सू० २६५२ या सूत्रानें 'ज' या अभ्यासाला ' ऋक्=र् ' हा आगम होऊन, व ' पुगन्तलघूपधस्य च ' सू० २१८९ या सूत्रानें ' गृध् ' यांतील ऋकाराला गुण होऊन, व ' हल्ङ्याब्भ्यः ' सू० २५२ या सूत्रानें ' स् ' प्रत्ययाचा लोप होऊन ' अजर्गर्ध् ' अशी स्थिति होते. या स्थलीं ' गर्ध् ' हा उत्तरखण्डांत असणारा झषन्त एकाच् धातूच आहे आणि म्हणून भाष्यकारांनीं ' एकाचो बशो भष् ' या सूत्राचा वैयधिकरण्यानें अन्वय करतेवेळीं ' अजर्धाः ' हें प्रसिद्ध उदाहरण तसा अन्वय करण्याचें प्रयोजन आहे असें म्हटलें नाहीं. जर ' गर्ध् ' हा उत्तरखण्डांतील धातूचा अवयव असता तर तें उदाहरण भाष्यकारांनीं दिलें असतें. प्रकृत उदाहरणांत सामानाधिकरण्यानें अन्वय करून देखील भष्भाव होऊ शकतो, व तसा भष्भाव केल्यावर ' अजर्घर्ध ' अशी स्थिति झाली असतां ' झलां जशोऽन्ते ' सू० ८४ या सूत्रानें अन्त्य धकाराचा दकार होऊन, व 'दश्च' सू० २४६८ या सूत्रानें त्या दकाराचा रकार होऊन ' अजघर्र् ' अशी स्थिति झाल्यावर, ' रो रि ' सू० १७३ या सूत्रानें पूर्वरकाराचा लोप होऊन व ' ढ्रलोपे ' सू० १७४ या सूत्रानें ' घर् ' यांतील अकाराचा आकार होऊन, व ' खरवसानयोर्विसर्जनीयः ' सू० ७६ या सूत्रानें अन्त्य रकाराचा विसर्ग होऊन ' अजर्धाः ' हें प्रसिद्ध रूप सिद्ध होतें. वरील विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं, भाष्यकारांनीं म्हटल्याप्रमाणें, उत्तरखण्डालाच धातुसंज्ञा आहे व पूर्वोत्तरखण्डरूप समुदायाला अङ्गसंज्ञा आहे. जर द्विर्वचन केल्यावर साभ्यास समुदायाला धातुसंज्ञा होत असती तर भाष्यकारांनीं ' एकाचो बशो भष् ' या सूत्राचा वैयधिकरण्यानें अन्वय करण्याचें प्रयोजन सांगतांना, ' अजर्धाः ' या प्रसिद्ध रूपाची सिद्धि होणें हें प्रयोजन आहे असें सांगितलें असतें, व ' गर्धप् ' या अप्रसिद्ध रूपाची सिद्धि होणें हें प्रयोजन आहे असें म्हटलें नसतें. )

अजर्घा बेभिदीतीत्यादौ श्नम्श्यनादयस्तु चर्करीतं चेत्यस्यादादौ पाठेन यङ्लुगन्ते गणान्तरप्रयुक्तविकरणस्याप्राप्त्या न भवन्ति ॥ छान्दसत्वादेव कार्यान्तराणामपि छन्दसि दृष्टप्रयोगेष्वदृष्टानामभावो बोध्यः ॥ भाषायां तु तादृशानामभाव एव । श्तिप्शबादिनिर्देशास्तु 'भवतेर' इत्यादिसूत्रस्थतन्निर्देशवन्नार्थसाधका इत्यन्यत्र विस्तरः ॥ १३१ ॥

'अजर्धाः, बेभिदीति' इत्यादि यङ्लुकांच्या रूपांत ' श्यन्, श्नम् ' इत्यादि विकरणें होत नाहींत याचें कारण हें आहे कीं ' चर्करीतम् ' असा अदादिगणांत पाठ असल्यामुळें, इतर गणांत होणाऱ्या विकरणांची यङ्लुकांत प्राप्ति होत नसल्यामुळें,

तशीं विकरणें यङ्लुकांत होत नाहींत. ( ' चर्करीतम् ' ही यङ्लुकाची संज्ञा असल्या-मुळें, यङ्लुगन्त धातु अदादिगणांत अन्तर्भूत होतात, व तशा धातूंना ' कर्तरि शप् ' सू० २१६७ या सूत्रानें शप्विकरण लागून ' अदिप्रभृतिभ्यः शपः ' सू० २४२३ या सूत्रानें त्या शपाचा लुक् होतो आणि म्हणून यङ्लुगन्त धातु लुग्विकरण समजले जातात. सारांश यङ्लुकांत गणप्रयुक्त कार्यें होत नाहींत याचें कारण प्रकृतपरिभाषा नसून ते धातु लुग्विकरण आहेत हें होय. ' श्तिपा शपानुबन्धेन ' या प्रकृतपरिभाषेंत सांगितलेल्या कार्यांचा अभाव वेदांतील यङ्लुकाच्या रूपांत जेथें आढळून येतो तेथें देखील त्या कार्यांच्या अभावाला प्रकृतपरिभाषा कारण नसून, ' सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते ' प. ३५ ही परिभाषा कारण आहे असें ग्रन्थकार आतां सांगतात. ) वेदांत आढळणाऱ्या यङ्लुकाच्या रूपांत जेथें इतर कार्यांचा अभाव दिसून येतो तेथें तीं रूपें वैदिक असल्यामुळें ( व वैदिक प्रयोगांत सर्व कार्यें विकल्पेंकरून होत अस-ल्यामुळें ) तसा अभाव दिसून येतो. पाणिनीय सूत्रांत ' श्तिप् ' किंवा ' शप् ' प्रत्यय लावून जेथें धातूचा निर्देश केला आहे तेथें तो कोणत्याहि विशिष्टप्रयोजनाच्या सिद्धी-करितां केला नसून, ज्याप्रमाणें ' भवतेरः ' सू० २१८१ या सूत्रांत ' भू ' धातूला ' श्तिप् ' प्रत्यय लावून ' भू ' धातूचा निर्देश कोणत्याहि प्रयोजनाकरितां केला नाहीं त्याचप्रमाणें, तसा निर्देश निष्प्रयोजनक–म्हणजे निरर्थक–आहे असें समजावें. ( ' भव-तेरः ' या सूत्रांत लिट् लकारामध्यें ' भू ' धातूच्या अभ्यासाचे जागीं अकार होणें सांगितलें आहे. म्हणून त्या कार्याची यङ्लुकांत प्राप्तिच होऊं शकत नाहीं, व तें कार्य न होण्यास प्रकृतपरिभाषा कारण नाहीं. तसेंच ' अनुदात्तङित आत्मनेपदम् ' सू० २१५७ या सूत्रानें होणारे आत्मनेपदप्रत्यय यङ्लुकांत होत नाहींत याचें कारण ' शेषात् कर्तरि परस्मैपदम् ' सू० २१५९ हें सूत्र होय, व त्या सूत्रान्वयें यङ्लुकाच्या रूपांत परस्मैपदीप्रत्ययच होतात. सारांश प्रकृतपरिभाषेंत जीं कार्यें यङ्लुकांत न होणें सांगितलीं आहेत त्या सर्व कार्यांचा यङ्लुकांत अभाव इतर रीतीनें सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, ही ज्ञापकशून्य व भाष्यकारांनीं पठित किंवा ध्वनित न केलेली परिभाषा मानण्याचें कांहींच कारण नाहीं असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ) या विषयासंबंधानें इतर ग्रन्थांत विस्तृत चर्चा केली आहे.

---

## परिभाषा १३२

**ननु जभोचि, रधेश्च, नेट्यलिटीत्येव सूत्र्यतां किं द्वी रधिग्रहणेनेत्यत आह—**

( ' रधिजभोरचि ' सू० २३०२ व ' नेट्यलिटि रधेः ' सू० २५१६ अशीं दोन सूत्रें न करितां पाणिनीनें वास्तविक ) ' जभोऽचि; रधेश्च ' व ' नेट्यलिटि '

अशीं तीन सूत्रें करावयास पाहिजे होतीं ( असें न करितां त्यानें वरील दोन सूत्रें करून ) ‘ रध् ’ धातूचा दोनदां उच्चार कां केला ? ( वर सांगितल्याप्रमाणें पाणिनीनें तीनें सूत्रें केलीं असतीं तर तृतीय सूत्रांत ‘ रधेः ’ हें पद अनुवृत्त झालेंच असतें व त्या सूत्रांत पुन्हा ‘ रधेः ’ या पदाचें उच्चारण करण्याची गरज पडली नसती व पाणिनीनें केलेल्या दोन सूत्रांचा जो अर्थ होतो तोच वर सांगितलेल्या तीन सूत्रांचा अर्थ झाला असता. असें असून देखील त्यानें दोनच सूत्रें करून ‘ रधेः ’ या शब्दाचें उच्चारण दोनदां कां केलें याचें कारण कळावें ) म्हणून ही परिभाषा सांगतातः—

## पदगौरवाद्योगविभागो गरीयान् ॥ १३२ ॥

“ सूत्रांत जास्त पदें घालण्यापेक्षां अधिक सूत्रें करणें यांत गौरव आहे.”

**प्रतिवाक्यं भिन्नवाक्यार्थबोधकल्पनेन गौरवं स्पष्टमेव । परन्तु भाष्यासम्मतेयम् । टाङसाति सूत्रस्थभाष्यविरुद्धा च । तत्र च इनादेशे इकारप्रत्याख्यानं योगविभागेनैव कृतमिति बहवः ॥ १३२ ॥**

प्रत्येक वाक्याचा अर्थ भिन्न होत असल्यामुळें, जितकीं वाक्यें अधिक तितका त्यांतील प्रत्येक वाक्याच्या अर्थाचा बोध करून घेण्यांत क्लेश अधिक हें उघड आहे. ( सारांश दोन सूत्रें करून काम भागत असतां, तीन सूत्रें करणें यांत गौरवदोष येतो. प्रत्येक सूत्राचा अर्थ निश्चित करतेवेळीं त्यांत पूर्वसूत्रांतून कोणकोणतीं पदें अनुवृत्त होतात हें ठरवून त्याचा अर्थ करावा लागतो. त्यामुळें जितकीं सूत्रें अधिक तितका त्यांचा अर्थ निश्चित करण्यांत अधिक क्लेश पडतो हें उघड आहे. म्हणून सूत्रसंख्या जेवढी कमी करणें शक्य असेल तेवढी करावी, सूत्रें थोडीं मोठीं झालीं तरी हरकत नाहीं असें या परिभाषेचें तात्पर्य आहे. आणि अशी परिभाषा असल्यामुळेंच पाणिनीनें तीन सूत्रें न करितां दोनच सूत्रें केली. लाघवगौरवमूलक लौकिकन्यायाच्या आधारावरच ही परिभाषा रचली आहे व ती लैकिकन्यायसिद्ध समजावी. ) परंतु बऱ्याच वैयाकरणांचें असें मत आहे कीं ही परिभाषा भाष्यकारास संमत नाहीं; ( कारण तिचा भाष्यांत कोठेंहि उल्लेख केला नाहीं व अधिक सूत्रें करण्यांत गौरव आहे असें भाष्यांत कोठेंहि म्हटलें नाहीं. एवढेंच नसून ) ही परिभाषा ‘ टाङसि ’ ७-१-१२ या सूत्रावरील भाष्याच्या विरुद्ध आहे; कारण त्या भाष्यांत ‘ इन ’ या आदेशांतील इकाराचें प्रत्याख्यान, योगविभाग करूनच, भाष्यकारांनीं केलें आहे. ( वृक्ष+टा=वृक्ष+इन ’ या स्थलीं ‘ टाङसि ’ सू० २०१ या सूत्रान्वयें ‘ टा ’ चे जागीं ‘ इन ’ असा आदेश न केला तर, ‘ आद्गुणः ’ सू० ६९ या सूत्रानें होणारा गुणरूपी एकादेश होणार नाहीं व ‘ वृक्षेण ’ असें इष्टरूप सिद्ध होणार नाहीं. याकरितां ‘ टा ’ चे जागीं ‘ इन ’ असा आदेश करावा असें पाणिनीचें म्हणणें दिसतें. पण भाष्यकार म्हणतात कीं ‘ आङि चापः ’ सू० २८९ या सूत्राचा योगविभाग करून ‘ आङि च ’ व ‘ आपः ’

अशीं दोन पृथक् सूत्रें केल्यास ' इन ' या आदेशांत इकार असण्याची गरज राहत नाहीं व ' न ' असा आदेश केल्यानें देखील काम भागतें; कारण ' आङि च ' या सूत्रांत, ' बहुवचने झल्येत् ' या पूर्वसूत्रांतून ' एत् ' या पदाची अनुवृत्ति केल्यानें त्या सूत्राचा असा अर्थ होईल कीं ' आङ् '–म्हणजे ' टा '–प्रत्यय पुढें असल्यास अदन्त अङ्गाच्या अन्त्य अकाराचे जागीं ' ए ' असा आदेश करावा व त्या अर्थान्वयें. ' वृक्ष+टा=वृक्षे+टा=वृक्षे+न=वृक्षेण ' असें इष्टरूप सिद्ध होऊं शकतें. सारांश वरील भाष्यावरून असें दिसून येतें कीं, एक वर्ण अधिक उच्चारण्यापेक्षां एक सूत्र अधिक करण्यांत लाघव आहे, व या मताविरुद्ध ही परिभाषा असल्यामुळें ती स्वीकारार्ह नाहीं असें बरेच वैयाकरण म्हणतात. परंतु वरील भाष्य एकदेशीची उक्ति असून ती सिद्धान्तीची उक्ति नसल्यामुळें व प्रकृतपरिभाषा लौकिकन्यायसिद्ध असल्यामुळें आणि भाष्यकारांनीं तिचें कोठेंहि साक्षात् प्रत्याख्यान केलें नसल्यामुळें, ' अप्रतिषिद्धमनुमतं भवति ' या न्यायान्वयें ही परिभाषा भाष्यकारांना मान्य नव्हती हें म्हणणें बरोबर नाहीं, व या परिभाषेचें प्रत्याख्यान करूं नये; ' ऋलृक् ' या शिवसूत्रांतील लृकार गाळण्याकरितां वार्तिककारानें अनेक वार्तिकें रचून जो प्रयत्न केला आहे त्याचा उपहास करतेवेळीं भाष्यकारांनीं ' महतो वंशस्तम्भात् लट्वानुकृष्यते '—म्हणजे वेळूंचा मोठा पुंज कापून त्यांतून लहानसा पक्षी काढणें किंवा डोंगर पोखरून उंदीर काढणें–असें म्हटलें आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं भाष्यकारास प्रकृतपरिभाषा मान्य नव्हती असें म्हणतां येत नाहीं आणि म्हणून तिचें प्रत्याख्यान करूं नये असें इतर वैयाकरणांचें मत आहे. )

---

## परिभाषा १३३

### अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः ॥ १३३ ॥

" ( सूत्रांत ) अर्धमात्रा देखील कमी केल्यानें वैयाकरणांना, पुत्र झाला असतां जसा आनंद होतो तसा, आनंद होतो."

एओङ्ऐऔच्सूत्रयोर्ध्वनितैषा भाष्ये । तत्रानेकपदघटितसूत्रे प्रायेण पदलाघवविचार एव न तु मात्रालाघवविचार इति ऊकालोऽच्, अपृक्त एकालित्यादिसूत्रेषु भाष्ये ध्वनितम् । तत्र हि सूत्रे अल्ग्रहणहल्ग्रहणयोर्विशेषविचारे संज्ञायां हल्ग्रहणं ण्यक्षत्रियेतिसूत्रे अणिञोरिति वाच्यमिति त्रीणि पदान्यल्ग्रहणे तदेकं स्वादिलोपे हल्ग्रहणं ण्येतिसूत्रे अणिञोरिति न वाच्यमपृक्तस्येति वाच्यमिति त्रीण्येव पदानीति नास्ति लाघवकृतो विशेष इत्युक्तम् ।

' एओङ् ऐऔच् ' या माहेश्वरसूत्रावरील भाष्यांत ही परिभाषा ध्वनित केली आहे. ( त्या भाष्याचा आशय हा आहे कीं एकमात्रिक ऱ्हस्व एकार व ओकार असते तर पाणिनीनें ' एओङ् ' या शिवसूत्रांत द्विमात्रिक दीर्घ एकार व ओकार यांचें उच्चारण न करितां ऱ्हस्व एकार व ओकार यांचेंच उच्चारण केलें असतें; कारण तसें केल्यानें ' एओङ् ' या सूत्रांत ज्या साडेचार मात्रा आहेत त्याऐवजीं अडीच मात्रांचें सूत्र झालें असतें, व अशा रीतीनें त्या सूत्रांत दोन मात्रा कमी होऊं शकल्या असत्या. पण तसें अडीच मात्रांचें सूत्र केलें असतें तर ' अदेङ् गुणः ' या सूत्राऐवजीं ' अदे ओ गुणः ' असें सूत्र पठित करावें लागलें असतें, कारण दीर्घ एकार व दीर्घ ओकार यांनाच गुण-संज्ञा होणें इष्ट होतें. असें जरी केलें असतें तरी, ' एओङ् ' या सूत्राच्या अडीच मात्रा व ' अदे ओ गुणः ' या सूत्रांतील दीर्घ ए व ओ यांच्या चार मात्रा अशा एकंदर साडेसहा मात्रा झाल्या असत्या. पण पाणिनीनें अर्धमात्रालाघव होत असून देखील तशीं सूत्रें न करितां, ' एओङ् ' असें दीर्घ एकाराचें व ओकाराचें ज्यांत ग्रहण आहे असें साडेचार मात्रांचें सूत्र व ' अदेङ् गुणः '–येथें ' एङ् ' च्या अडीच मात्रा होतात –अशीं एकंदर सात मात्रा असणारीं जीं दोन सूत्रें केलीं त्यावरून हें स्पष्ट होतें कीं अर्ध एकार व अर्ध ओकार कोठेंहि पठित नाहींत. वेदांतील एका शाखेंत अर्ध एकार व अर्ध ओकार उच्चारण्याची जरी प्रथा आहे तरी भाष्यकार म्हणतात कीं, ' पारिषद-कृतिरेषा तत्रभवताम् । नैव हि लोके नान्यस्मिन्वेदेऽर्ध एकारोर्ध ओकारो वास्ति । ' सारांश या भाष्यांत भाष्यकारांनीं अर्धमात्रालाघवाचा विचार केला आहे असा नागेशाच्या म्हणण्याचा अभिप्राय आहे व हें नागेशानें उद्योतांत स्पष्टपणें म्हटलें आहे. ) ' ऊकालोऽच् ' १-२-२७ व ' अपृक्त एकाल् ' १-२-४१ इत्यादि सूत्रांवरील भाष्यावरून हें ध्वनित होतें कीं जेथें सूत्रांत अनेक पदें घातलीं आहेत तेथें त्या पदांपैकीं कांहीं पदें गाळतां येणें शक्य आहे काय या संबंधानेंच बहुधा विचार केला जातो, कांहीं मात्रा गाळतां येतील काय यासंबंधानें बहुधा विचार केला जात नाहीं. वरील दोन सूत्रांपैकीं ' अपृक्त एकाल् ' या सूत्रावरील भाष्यांत, या सूत्रांत ' अल् ' या पदाचें ग्रहण करावयास पाहिजे होतें किंवा ' हल् ' या पदाचें ग्रहण करावयास पाहिजे होतें असा प्रश्न उपस्थित करून, त्या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकार म्हणतात कीं ( ' अपृक्त एकाल् ' सू० २५१ या सूत्रांत ' अल् ' चे जागीं ' हल् ' हें पद घातल्यास त्या ) अपृक्तसंज्ञाविधायक सूत्रांत ' हल् ' हें पद असावें लागेल व ' ण्यक्ष-त्रियार्ष ' सू० १२७६ या सूत्रांत ' अण् ' व ' इञ् ' हीं दोन पदें असावीं लागतील व अशा रीतीनें एकंदर तीन पदें राहणार. ( ' अपृक्त एकाल् ' या सूत्रांत ' अल् ' या पदाचें जें पाणिनीनें ग्रहण केलें आहे तें पद त्या सूत्रांत तसेंच राहूं दिलें तर ) त्या अपृक्तसंज्ञाविधायकसूत्रांत ' अल् ' हें पद असावें लागेल, पण ' ण्यक्षत्रियार्ष ' या सूत्रांत ' अण् ' व ' इञ् ' हीं दोन पदें असण्याची गरज राहणार नाहीं. तथापि त्या सूत्रांत ' अपृक्त ' हें पद घालावें लागेल, आणि तसेंच ' हल्ङ्याब्भ्यः ' सू० २५२ या

सूत्रांत 'हल्' हें पद राहूं द्यावें लागेल, व अशा रीतीनें देखील एकंदर तीन पदें राहणारच, व ('अपृक्त एकाल्' या सूत्रांत 'अल्' या पदाऐवजीं 'हल्' हें पद घातल्यानें) कांहींच लाघवनिष्पत्ति होणार नाहीं. (सारांश वरील भाष्यांत भाष्यकारांनीं पदलाघवाचाच विचार केला आहे. मात्रालाघवाचा विचार केला नाहीं )

**अचि श्नु इति सूत्रे इण इत्येव सिद्धे य्वोरिति संमृद्य ग्रहणान्न पूर्वेणेणग्रहणं तत्र विभाक्तिनिर्देशे संमृद्य ग्रहणे च सार्धास्तिस्रो मात्रा इण्ग्रहणे तिस्रो मात्रा इति लण्सूत्रे भाष्योक्तेः। तथा ओतः श्यनीति सूत्रे शितीति वक्तव्यम्। तत्रायमप्यर्थः। ष्ठिवुक्लमिवति सूत्रे शितीति न कर्तव्यं भवतीति भाष्ये न केवलं मात्रालाघवं यावदयमप्यर्थ इति कैयटोक्तेः प्रायेणेति शिवम् ॥ १३३ ॥**

( वरिल पंक्तींत ग्रन्थकारानें असें म्हटलें आहे कीं सूत्रांतून एखादें पद गाळतां येणें शक्य आहे काय याबद्दलच प्रायः भाष्यकारांनीं विचार केला आहे व मात्रालाघवाबद्दल विचार केला नाहीं. परंतु त्या पंक्तींत 'प्रायेण'—म्हणजे बहुधा—हें पद घातलें आहे. त्याचें कारण हें कीं भाष्यकारांनीं जसा पदलाघवविचार केला आहे तसा क्वचित् स्थलीं मात्रालाघव विचार देखील केला आहे, व हे म्हणणें सिद्ध करण्याकरितां ग्रन्थकार 'लण्' या शिवसूत्रावरील भाष्याचा दाखला देतात. ) 'लण्' सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं 'अचि श्नु' सू. २७१ या सूत्रांत 'इणः' हें पद घालून काम भागत असतां, इ व उ यांचा संधि करून 'य्वोः' असें पद उच्चारलें आहे. त्याचें कारण हें कीं 'इण्' प्रत्याहारांतील णकारानें पूर्व णकाराचें ग्रहण होऊं नये. ( 'इण्' प्रत्याहारांत असलेल्या णकारानें जर 'अइउण्' या प्रथम शिवसूत्रांत असलेल्या णकाराचें ग्रहण होऊं शकलें असतें तर 'इण्' चा अर्थ इ व उ असा झालाच असता, व 'अचि श्नु' या सूत्रांत 'इणः' असें पद उच्चारल्यानें इकार व उकार यांचेंच ग्रहण झालें असतें. पण तीन मात्रांच 'इणः' हें पद न उच्चारतां, पाणिनीनें 'य्वोः' असें साडेतीन मात्रांचें पद मुद्दाम घातलें आहे. यावरूनच हें स्पष्ट होतें कीं 'इण्' प्रत्याहारांत असलेल्या णकारानें पूर्वणकाराचें ग्रहण होत नसून उत्तरणकाराचें ग्रहण होत असतें, आणि 'इणः' असें पद उच्चारलें असतें तर इवर्णापासून लवर्णापर्यंत जेवढे वर्ण शिवसूत्रांत उच्चारले आहेत तेवढ्या सर्व वर्णांचें ग्रहण झालें असतें. पण पाणिनीला 'अचि श्नु' या सूत्रांत इकार व उकार या दोनच वर्णांचें ग्रहण करणें इष्ट होतें. म्हणून 'य्वोः' या पदांत अर्धमात्रा जास्त असून देखील त्यानें त्या सूत्रांत 'इणः' हें पद न घालतां 'य्वोः' हें पद घातलें आहे. ) इ व उ यांचा संधि करून त्या संधानें तयार झालेल्या शद्बाचा षष्ठीच्या द्विवचनांत निर्देश केल्यामुळें, त्यांत—म्हणजे 'य्वोः' या शद्बांत—साडेतीन मात्रा हातात. पण 'इणः' या पदाचें ग्रहण केलें असतां तीन मात्रा होतात. ( सारांश

